समर्थ महापुरुषार्थी वर । अविवेकेसि वेढा लाविलें दुर्धर । अज्ञानपतन-काळीं अगोचर । दीक्षा दाखविली ॥ ९१ ॥ नोवरा न दिसे सर्वांपरीं । अक्षता पडती भूमीवरी । चटपट जनअभ्यंतरीं । लागली चुरचुर ॥ ९२ ॥ ह्मणती काय जाला वर । पाहाती घरोघरीं नारीनर । वरें घेतलें दुस्तर । ब्रह्मारण्य तें ॥ ९३ ॥ अविवेकाच्या भयें भारी । अज्ञान अडरोण भरी । होऊनि उदास सर्वांपरीं । धांव घेतली पुढें ॥ ९४ ॥ दुस्तर अहंकृतीचे पर्वत । दृश्य वोसाडे अप्रांत । अक्षोभ सरिता भरित । मोह अतिशयभरें ॥ ९५ ॥ निजशौर्यें धांव घालूनि । नद्या पर्वत उल्लंघूनि । पवाडला एकांतवनीं । विश्रांतीच्या ॥ ९६ ॥ ब्रह्मचर्य आंगीं उत्कट । वरी अद्भुतदशा पिसाट । एकांतवनीं निकट । गांठी हृदयस्थेसीं ॥ ९७ ॥ द्वादशवरुषें अतिविरक्ती । एकांतवनीं वनचरसंगती । महाअद्भुतवेध मारुति । वानरमेळीं दर्शन ॥ ९८ ॥ अप्रांत वनाचा पैसारु । नसेचि जनाचा संचार । तेथें महारुद्र-साक्षात्कार । समर्थांसी ॥ ९९ ॥ दर्शनरूप छायावेध । प्रवर्तविला निजबोध । मानसगतिहून प्रसिद्ध । वेग अतिशयें ॥ १०० ॥ अचिंत्य चिंतिलें ठायीं । बोधकिरणचक्रें पाहीं । वृत्ति भूमंडळीं सर्वही । शुद्धीनें निघाला ॥ १ ॥ लीलामहारुद्र अवतार । महाविरक्तीचें शरीर । पाहात चालिला सविस्तर । सिद्धांचीं स्वरूपें ॥ २ ॥ तें चि पुढें निरूपण । समर्थांसी श्रीरामदर्शन । जाला अनुग्रह तो पावन । आत्मप्रतीतीनें ॥ ३ ॥ समर्थचरित्र अनुसंधान । कथाभागीरथी हे पावन । स्वरूपसागरासि निर्वाण । अनंतमुखें मिळाली ॥ ४ ॥ कृतत्रेतद्वापारीं । जाले अद्भुत अवतारी । परि या समर्थांची सरी । कोणी न पावे ॥ ५ ॥ कलयुगीं प्रथमचरण । जालें समर्थांचें अवतरण । प्रतीतउत्सवें[11] असाधारण । वर्तविलें कृतयुग ॥ ६ ॥ इति श्रीराम-

---

१ मोक्ष इच्छिणारा. २ आड रान. ३ ओसाड मैदानें. ४ शिरला. ५ हृदयस्थ आत्म्यासी. ६ अमर्याद. ७ विस्तार. ८ ज्ञान किरणांचीं चक्रें. ९ मिळणें, संगम. १० पुष्कळ मार्गांनी, पक्षीं अनंत मौनीच्या मुखानें. ११ आत्मप्रत्ययाच्या आनंदानें.

सोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । समर्थांची पावनलीला । ह्मणे मेरू अनंत ॥ १०७ ॥ प्रथमरुद्र १ ॥ षष्ठउल्लास ६ ॥ संपूर्ण ॥ ॥ ओव्या ॥ १०७ ॥ ॥ ॥ ॥

---

श्रीरामचंद्रायनमः॥ श्रीरामसमर्थ अवतारी । स्वरूपज्ञानसाक्षात्कारी । भवसागर उतरी । निजबोधविभवे ॥ १ ॥ मुळींच प्रवृत्तींचा निरास । नातळती अहंस्फूर्तीस । याचि सद्भावें जगास । बोधे उत्धरिलें ॥ २ ॥ निजबोधाच्या निर्धारीं । दीक्षा वर्तविली शरीरीं । सावधान ह्मणतां संसारीं । सावध जाहले ॥ ३ ॥ निजविरक्तीच्या बळें । वधिले षड्वैरी छळें । करूनि कल्पनेचे वाटोळे । पावले स्वरूपीं ॥४॥ सूर्याचें प्रतिबिंब जळीं । जळ आटतां पावे सूर्यमंडळीं । तेवि कल्पना नाशें निश्चळीं । निश्चळ जाले ॥ ५ ॥ प्रारब्धयोगें वनांतर । विरक्तिदशेनें दुर्धर । नाना स्थळांतरें दुस्तर । संचरती तेथें ॥ ६ ॥ पंचभूत दृश्याकार । मूळ अविद्येचा संसार । महावसुमतीचा विस्तार । धुंडित चालले ॥ ७ ॥ विरक्तीचें आंगीं वारें । उदासवृत्तीने वावरे । वस्तीनें गिरिकंदरें । वसविलीं बहु ॥ ८ ॥ महातपस्वी अनुष्ठाते थोर । वसविती गुंफा योगेश्वर । नाना हटयोग विस्तार । पाहिले दृष्टींसी ॥ ९ ॥ सात्विक प्रेम भाविक भक्त । स्वरूपप्रतीतीनें विरक्त । अखंडसमाधि नित्य मुक्त । सिध्द दृष्टीसी पाहिले ॥ १० ॥ निवृत्ति दर्‍कुटीचे निवासी । अनुभव गुहा सुखवासी । विरक्तिपर्णकुटीचे तापसी। तपोधन पाहिले ॥ ११ ॥ स्वानंदशिखरीं विलासले । जे वृत्तीस नाहीं आले । नित्य उन्मनीमाजि राहिले । ते पाहिले समर्थ ॥ १२ ॥ एक बाह्यदीक्षेनें संपन्न । योगदीक्षा प्रकाशमान । अतरीं इच्छा धरूनि ध्यान । बैसले किती ॥१३॥ कुटिल वासना जडली । दिगंबरतनु सलोभ मुळीं। सकामइच्छा ध्यान समेळीं । दीक्षाविभूषित ॥१४॥ अनेक प्रकारचे महंत । हटयोगसाधनें समाधिस्थ । नानाचमत्कारें अत्यद्भुत । सिध्दी चोळल्या ॥१५

१ स्पर्श करीत नाहात. २ परब्रह्मात. ३ पचभुतात्मक दृश्य जग. ३ पर्वताचे. ५

नानातीर्थं क्षेत्रें विशेष। महापट्टणें वनें उद्देस। स्वइच्छाविहार तोष। अरि विरक्तीचा ॥ १६ ॥ विश्रांतिनदीतीरीं वसले। तपतेजें सूर्यसम प्रकाशले। महासित्व तपस्वी भले। अनुष्ठाते पुरुष ॥ १७ ॥ कोणासि नाहीं संभाषण। ईक्षणेंचि हृदय घेऊन। निजांगविरक्तीनें पूर्ण भरले विजेनीं ॥ १८ ॥ नाहीं जनविकल्पाचा वारा। चालिले विचारीत विचारा। स्वरूपसाक्षात्कारजिन्हारा। प्रकटीत ॥ १९ ॥ द्वादशवर्षें पूर्व वनवास। त्यावरि द्वादशवर्षें संचारास। आहारेंवीण शरीरास। शक्ति काहींच नसे ॥ २० ॥ नाही क्षुधेतृषेचें देहीं भान। नसे विश्रांति निद्रा जाण। वायूसारिखें संचरण। होतसे स्वइच्छा ॥ २१ ॥ शरीरउपजीविकाजीवन। सदोदित रघुनंदन। निजप्राणाचा ही प्राण। नित्यतृप्तीनें असे ॥ २२ ॥ निजध्यासें राम चि सर्वत्र दिसे। जिवलग त्यावीण कोणी नसे। कृपासंजीवनीनें जीवितसे। जिवाचा निजजीव ॥ २३ ॥ जैसें हिरण्यकश्यपें द्वेषछळें। प्रल्हादाचें धारिष्ट पाहिलें। तैसेपरीच चित्त शोधिलें। आपआपण समर्थें ॥ २४ ॥ प्रल्हादासि त्या सेवकजनीं। लोटिले कडेलोटणी। स्वइच्छाचि समर्थानीं। तेहीं प्रतीति पाहिली ॥ २५ ॥ वनेंदाहो अग्नींत रिघाले। व्याघ्रसिंहसहवासें राहिले। सर्प स्वइच्छा खेळविले। आंगावरी ॥ २६ ॥ विषाची निर्विष प्रतीती। मरणाची चिरंजीव स्थिती। बुडण्याची तारक रीती। पाहिली समर्थें ॥ २७ ॥ अक्षोभजळीं उडी टाकूनि। चळवळ न करितां जीवनीं। पाहिलें धारिष्ट शोधूनि। सदय श्रीरामाचें ॥ २८ ॥ मासोपवासी महामहिमे। येथें वर्षानुवर्षें चालिली क्रमें। साक्षात् रामावतार नेमें। वनविचरण ॥ २९ ॥ दीक्षा रामाची पावन। ते चि दीक्षेनें समर्थ पूर्ण। फिरतां वनवासी दारुण। काळयोग जाहला ॥ ३० ॥ राम प्रत्यक्ष व्हावयासि कारण। क्षोभलीं पंचभूतें संपूर्ण। भूमि तापली सूर्यंकडून। महाउष्णकाळीं ॥ ३१ ॥ पर्वताचे पाठार

१ ओस. २ जनापासून दूर. ३ आपण होऊन. ४ वणवा. ५ डोहांत. ६ पाण्यांत ७ धैर्यानें. ८ डोंगर सपाटी.

लागले । विस्तीर्णतेसि विस्तारले । वृक्षतृणादि उगवले । नाहींच ज्यावरी ॥ ३२ ॥ जीवनाचा लेश नाहीं । सारिखें च सर्वत्रही । जैसें समुद्रजळ पांहीं । सारिखें च समान ॥ ३३ ॥ तैसें पाषाणाचें काळेपण । जैसें दृश्यरहित गगन । तैसें स्थळ तें विस्तीर्ण । समर्थ तेथें ठाकले ॥ ३४ ॥ सूर्य मध्यान्हीचा महा खडतर । किरणें वर्षपती वैश्वानर । अग्निरूप तो स्थावर । पदगतीस पोळवी ॥ ३५ ॥ नाहीं विश्रांतीचा पवन । धैर्यास भेडसावीत रान । कल्पांतवेळा ते निर्वाण । योडवली सहजें ॥ ३६ ॥ संतप्त तीव्र चंडकिरणीं । पोळों लागली क्षमाधरणी । सूर्यकांत खडतरोनि । सूर्यरश्मीनें प्रज्वळ ॥ ३७ ॥ करूनियां निजनिर्धार । स्वामी स्थिरावले अतिस्थीर । तव तो पर्वत हरहर । शब्दें गडाडिला ॥ ३८ ॥ जय जय जय जय रघुवीर । घोष प्रगटती भयंकर । घुमों लागलीसे गंभीर । आकाशवाणी ॥ ३९ ॥ उदासीनतायोग निर्लोभ । निघाले धारिष्ट ते अक्षोभ । क्षोभलें चित्त सलोभ । कारुण्य उदेलें ॥ ४० ॥ क्षुधा तृषा बाधा झळंबली । प्राणांतदशा जाणवली । संपूर्ण ममतेनें आठवली । मूर्ति रघूत्तमाची ॥ ४१ ॥ तत्वाची माळ तुटली । जेवि शिखरावरि उटंगेली । आवळ्याची मोट सुटली । ते सावरेल काय ॥ ४२ ॥ जवं जवं देहाचें निर्दान । तवं तवं प्रगटे आत्मनिधान । देहभाव प्राणार्विसजन । अवघाचि विसरे ॥ ४३ ॥ त्या निर्वाणदशे माझारीं । आला समर्थाचा साहकारी । काळनिवर्तक निर्धारी । धनुर्धारी रघुवीर ॥ ४४ ॥ स्वकरें समर्थासि कुर्वाळिलें । मंत्रसंजीवनीसंधान केलें । श्रवणावाटे पाजिलें । परमामृत ॥ ४५ ॥ समर्थाचीं नेत्रारविंदें । रघूत्तमकरारविंदें । स्पर्शतांचि स्वतेजस्वानंदें । दृष्टी उघडली ॥ ४६ ॥ दृष्टीसि देखिला राजीवनयन । आनंदलें समर्थाचें मन । समीप बैसले उठोन । अभिवंदन केलें

१ सूर्य किरणांतून तर अग्नीचा वर्षाव होत होता. २ पर्वत. ३ ओढवली. ४ शांतपणे. ५ उलगडली, फोंफावली. ६ शेवट ( होण्याची वेळ ) ७ संजीवनी मंत्राचा प्रयोग.

॥ ४७ ॥ रघुराजपदकमळीं । समर्थे ठेविला मौळी[1] । हात माथां ठेऊनि तात्काळीं । दिधलें आलिंगन ॥ ४८ ॥ सिद्धयोगियांचा विसावा । स्वसुख सायुज्यतेचा[2] ठेवा । तो प्रत्यक्ष होऊनि तेव्हां । अनुग्रह करितसे ॥ ४९ ॥ कृपावात्सल्यरसें उचित । विचारलें जें अपेक्षित । आलों तुझिया प्रीतीनें धांवत । पुरवीन अभिष्ट ॥ ५० ॥ राम सप्रेमें असे द्रवत । माय बहु काळें पुत्रासि देखत । कळवळिलें तैसें चित्त । जगज्जनकाचें ॥ ५१ ॥ समर्थ ह्मणती तुजवीण कांहीं । मज इच्छा उरलीच नाहीं । आतां ठाव दे तुझीये पायीं । हेचि मज अपेक्षा ॥५२॥ अंतर परिक्षूनि आलासि । बिरुदें आलीं प्रत्ययासी । आतां देहसंस्कारवृत्तीसि । उरों नेदीं सर्वथा ॥ ५३ ॥ जाळियांहीं तुझें दर्शन । उरावें काय माझें मीपण । आतां कृपा करूनि निर्वाण । गती देयीं ॥ ५४ ॥ बोधसमुद्र रघुनंदन । आत्मदीक्षा[3] भवकदनें[4] । ब्रह्मोपदेशें सावधान । समर्थासि केलें ॥ ५५ ॥ स्थूलशरीराची भाजणी । केली सूक्ष्माची चाळणी । कारणदेहाची सांडणी । करविली तात्काळ ॥ ५६ ॥ महाकारण साक्षीज्ञान । साक्ष्यत्वासि विसर्जन[5] । निर्विकल्पसमाधिघनें[6] । अनुग्रहो केला ॥ ५७ ॥ महासमाधिसुखसेजेसी । विसांवले योगविशेषी । तुर्या परिपक्वदशेसी । मुराली सहजें ॥ ५८ ॥ जैसें पाडाचें[7] आम्रफळ । सेजेसि मुरालियां होय रसाल । विशेषगोडीनें परिमळ । अवचट प्रगटे ॥ ५९ ॥ तेवि निर्विकल्पसमाधीसि । सहजस्थिति ये अनायासी । तुर्या परिपक्वउन्मनीसी । प्रगट करी ॥ ६० ॥ महासमाधि संवत्सर । वसविलें तें पर्वतशिखर । समीपसद्गुरु धनुर्धर । संरक्षण होता ॥ ६१ ॥ सहजप्रतीतीच्या निर्भरें । जालें महाकारण चेयिरें[9] । परि स्वरूपसाक्षात्कारें । अखंडीत निद्रा[10] ॥६२॥ हेंचि

१ मस्तक. २ सायुज्य मोक्ष. ३ आत्मज्ञानरूपी दीक्षेनें. ४ संसारनाश. ५ नाश. ६ धर्ममेघ. ७ उत्तम पिकलेलें. ८ आढी लावून ( गवतावर ). ९ जागृत. १० समाधिरूप.

आश्चर्यासि कारण । देहबुद्धीसि न येतां प्रमाण । पूर्वसंस्कारें संपूर्ण । देह वर्ते ॥ ६३ ॥ सूत्र चळोनि राहिलें । यंत्रपुतळी कळा चाले । जेवि निद्रेच्या भरें उठिले । चालिलें जाय ॥ ६४ ॥ तैसें अभिनव प्राक्तन । कर्मसंस्कारासि नातळोन । लोकदृष्टया संपूर्ण । प्रारब्ध वर्तलें ॥ ६५ ॥ आश्चर्यें दृढावली वृत्ति । निर्विकार दिसे सर्व प्रवृत्ति । साक्षात्काराची निवृत्ति । जाली अखंडता ॥ ६६ ॥ कोठोनि आलों कोठे जावें । न सुचताचि कांहीं जिवें । सभाग्यसृष्टीच्या दैवें । चालविलें समर्थासि ॥ ६७ ॥ पदोपदीं स्वानंदें निर्भर । घेती समाधीचें सुख अपार । देखतांचि दृष्टी गिरिवर । ह्मणती स्वरूपें बोधला ॥ ६८ ॥ वृक्षाआंगीं चेष्टा न दिसे । ह्मणती यासि समाधीचेंचि पिसें । स्वरूपाच्याचि निजध्यासें । वाणली दशा ॥ ६९ ॥ फिरती श्वापदांचे कळप । सबाह्यअंतरीं स्वरूप । त्याचि दृष्टीनें तद्रूप । देखती सर्व ॥ ७० ॥ आकाशीं प्रवृत्ति संचरे । तें आकाश तिळमरि न सरे । तेवि निचरतां शरीरें । स्वरूप न चळे ॥ ७१ ॥ याचि प्रतीतीच्या निर्धारें । स्वरूपबोधसाक्षात्कारें । फिरत फिरत चमत्कारें । आले कृष्णातीरासि ॥ ७२ ॥ समर्थ महायोगेश्वर । नसेचि प्रवृत्तीचा संस्कार । अखंडसमाधिस्थ निर्धार । संकल्पशून्य ते ॥ ७३ ॥ अद्वैतबोध हृदयीं पूर्ण । दशा प्रगटली स्वानंदघन । सहजस्थिति निर्वाण । जाला उद्धार जगाचा ॥ ७४ ॥ तोंचि पुढें निरूपण । परंपरा उपदेश आख्यान । महद्भुतरुद्रदर्शन । अवधारिजे श्रोतीं ॥ ७५ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । रामअनुग्रह समर्थाला । ह्मणे मेरूअनंत ॥ ७५ ॥
॥ रुद्र १ ॥ उल्लास ७ ॥ संपूर्ण ॥ ॥

---

१ एकदा सहजसमाधिसुखाची प्राप्ति झाल्यावर देह जें कर्म करतो तें केवळ देहाच्या पूर्व संस्कारामुळे. यांतलि संपूर्ण शब्द लक्षांत ठेविला पाहिजे. देह अशा स्थितींत केवळ पोटापुरतें भिक्षा मागण्याचें कर्म करितो असें नव्हे, तर त्या शरीराला अनुरूप असें सर्व कांहीं करतो, प्राप्त कर्मे कोणतेंही टाकीत नाहीं. २ नव्या जुन्या कोणत्याच कर्मांच्या बंधनांत न सांपडता. ३ समर्थां सारखे नित्य समाधिसुख अनुभवणारे योगी कर्मे करितात तीं जगाच्या सुदैवामुळे करितात. ४ आत्मरूप.

॥ ४७ ॥ रघुराजपदकमळीं । समर्थे ठेविला मौळी । हात माथां ठेऊनि तात्काळीं । दिधलें आलिंगन ॥ ४८ ॥ सिद्धयोगियांचा विसावा । स्वसुख सायुज्यतेचा ठेवा । तो प्रत्यक्ष होऊनि तेव्हां । अनुग्रह करितसे ॥ ४९ ॥ कृपावात्सल्यरसें उचित । विचारलें जें अपेक्षित । आलों तुझिया प्रीतीनें धांवत । पुरवीन अभिष्ट ॥ ५० ॥ राम सप्रेमें असे द्रवत । माय बहु काळें पुत्रासि देखत । कळवळिलें तैसें चित्त । जगज्जनकाचें ॥ ५१ ॥ समर्थ ह्मणती तुजवांचून कांहीं । मज इच्छा उरलीच नाहीं । आतां ठाव दे तुझीये पायीं । हेचि मज अपेक्षा ॥५२॥ अंतर परिक्षूनि आलासि । बिरुदें आलीं प्रत्ययासी । आतां देहसंस्कारवृत्तीसि । उरों नेदीं सर्वथा ॥ ५३ ॥ जालियांहीं तुझें दर्शन । उरावें काय माझें मीपण । आतां कृपा करूनि निर्वाणें । गती देयीं ॥ ५४ ॥ बोधसमुद्र रघुनंदन । आत्मदीक्षों भवकदनें । ब्रह्मोपदेशें सावधान । समर्थासि केलें ॥ ५५ ॥ स्थूळशरीराची भाजणी । केली सूक्ष्माची चाळणी । कारणदेहाची सांडणी । करविली तात्काळ ॥ ५६ ॥ महाकारण साक्षीज्ञान । साक्ष्यत्वासि विसर्जन । निर्विकल्पसमाधिधनें । अनुग्रहो केला ॥ ५७ ॥ महासमाधिसुखसेजेसी । विसांवले योगविशेषी । तुर्या परिपक्वदशेसी । मुराली सहजें ॥ ५८ ॥ जैसें पाडाचें आम्रफळ । सेजेसि मुरालियां होय रसाळ । विशेषगोडीनें परिमळ । अवचट प्रगटे ॥ ५९ ॥ तेवि निर्विकल्पसमाधीसि । सहजस्थिति ये अनायासीं । तुर्या परिपक्वउन्मनीसी । प्रगट करी ॥ ६० ॥ महासमाधि संवत्सर । वसविलें तें पर्वतशिखर । समीपसद्गुरु धनुर्धर । संरक्षण होता ॥ ६१ ॥ सहजप्रतीतीच्या निर्भरें । जालें महाकारण चेयिरें । परि स्वरूपसाक्षात्कारें । अखंडीत निद्रा ॥६२॥ हेंचि

१ मस्तक. २ सायुज्य मोक्ष. ३ आत्मज्ञानरूपी दीक्षेनें. ४ संसारनाश. ५ नाश. ६ धर्ममेघ. ७ उत्तम पिकलेलें. ८ आटी लावून ( गवतावर ). ९ जागृत. १० समाधिरूप.

आश्चर्यासि कारण । देहबुद्धीसि न येतां प्रमाणें । पूर्वसंस्कारें संपूर्ण । देह वर्ते ॥ ६३ ॥ सूत्र चळोनि राहिलें । यंत्रपुतळी कळा चाले । जेवि निद्रेच्या भरें उठिलें । चालिलें जाय ॥ ६४ ॥ तैसें अभिनव प्राक्तन । कर्मसंस्कारासि नातळोन । लोकदृष्ट्या संपूर्ण । प्रारब्ध वर्तलें ॥ ६५ ॥ आश्चर्यें दृढावली वृत्ति । निर्विकार दिसे सर्व प्रवृत्ति । साक्षात्काराची निवृत्ति । जाली अखंडता ॥ ६६ ॥ कोठोनि आलों कोठें जावें । न सुचतांचि कांहीं जिवें । सभाग्यसृष्टीच्या दैवें । चालविलें समर्थासि ॥ ६७ ॥ पदोपदीं स्वानंदें निर्भर । घेती समाधीचें सुख अपार । देखतांचि दृष्टी गिरिवर । ह्मणती स्वरूपें बोधला ॥ ६८ ॥ वृक्षाआंगीं चेष्टा न दिसे । ह्मणती यासि समाधीचेंचि पिसें । स्वरूपाच्याचि निजध्यासें । बाणली दशा ॥ ६९ ॥ फिरती श्वापदांचे कळप । सबाह्यअंतरीं स्वरूप । त्याचि दृष्टीनें तद्रूप । देखती सर्व ॥ ७० ॥ आकाशीं प्रवृत्ति संचरे । तें आकाश तिळभरि न सरे । तेविं विचरतां शरीरें । स्वरूप न चळे ॥ ७१ ॥ याचि प्रतीतीच्या निर्धारें । स्वरूपबोधसाक्षात्कारें । फिरत फिरत चमत्कारें । आले कृष्णातीरासि ॥ ७२ ॥ समर्थ महायोगेश्वर । नसेचि प्रवृत्तीचा संस्कार । अखंडसमाधिस्थ निर्धार । संकल्पशून्य ते ॥ ७३ ॥ अद्वैतबोध हृदयीं पूर्ण । दशा प्रगटली स्वानंदघन । सहजस्थिति निर्वाण । जाला उद्धार जगाचा ॥ ७४ ॥ तोंचि पुढें निरूपण । परंपरा उपदेश आख्यान । महद्भुतरुद्रदर्शन । अवधारिजे श्रोतीं ॥ ७५ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । रामअनुग्रह समर्थाला । ह्मणे मेरूअनंत ॥ ७५ ॥
॥ रुद्र १ ॥ उल्लास ७ ॥ संपूर्ण ॥ ॥

---

१ एकदां सहजसमाधिगुणाची प्राप्ति झाल्यावर देह जें कर्म करतो तें केवळ देहाच्या पूर्व संस्कारामुळें. यांतलि संपूर्ण शब्द लक्षांत ठेविला पाहिजे. देह अशा स्थितींत केवळ पोटापुरतें भिक्षा मागण्याचें कर्म करितो असें नव्हे, तर त्या शरीराला अनुरूप असें सर्व कांहीं करतो, प्राप्त कर्म भोगतेंही टाळीत नाहीं. २ नव्या जुन्या कोणत्याच कर्मांच्या बंधनांत न सांपडतां. ३ समर्थांसारखे नित्य समाधिसुख अनुभवणारे योगी कर्में करितात तीं जगाच्या सुदैवामुळें करितात. ४ आत्मस्वरूप.

श्रीरामचंद्रायनमः श्रीरामसमर्थमहारुद्रा.। स्वानंदसुधास्वयंभचंद्रा। आक्षोभविज्ञानसमुद्रा। भरणें भरिसी सुखें ॥ १ ॥ प्रबोधशिवमौळीं वसोनि । प्रथम कळासमृतिसंजीवनीं। ईक्षणामृतकिरणीं । करिसी-संवर्धन ॥ २ ॥ निरवधिसुखें चिदंबर। वर्षो लागला धाराधर। अमृतघन निरंतर। समर्थहृदय ॥ ३ ॥ पिसाटदशा अनिवार। आंगीं महद्भूतसंचार। प्रवृत्तिर्जनाचे संभार। पाठीं लागती ॥ ४ ॥ संपूर्ण वेड-तें लागलें। जगदधीस आश्चर्य वाटलें। एकासि अवचट वेधें केलें। तैसेंचि पिसाट ॥ ५ ॥ भत्र धुळीचा धुळारा। पोरें टाकिती ते सैरा। पळती पाठोपाठी त्वरा। धांवती मोकाटें ॥ ६ ॥ परमानंदवनकाया। कांहीं उपचार नसोनियां। जैंवि अमृतपान करूनियां। तेज आंगासि ये ॥ ७ ॥ तैसे परीं आंगीं वर्चस। ब्रह्मानंदेंसी दीक्षा उदास। मुखीं हरहरहर घोप। सर्वदां उठे ॥ ८ ॥ जय जय जय रघुवीर। भवविजयरणधीर। अहंरिपुदशकंधर। निर्जित महावीरा ॥ ९ ॥ यादवा रामा माधवा रामा। संसारसागरीं तारिं गा आह्मा। याचि निजध्यासें प्रेमा। अखंडीत कीर्तनीं ॥ १० ॥ महाउन्माद विरक्तिभरें। असतां कीर्तनीं रामनिर्धारें। परंपरेसी अत्यादरें। राघव प्रत्यक्ष ॥ ११ ॥ कीर्तन करितां नदीतीरीं। संपूर्णजनसंभारीं। पाहातां दुरुनि दृष्टीभरी। रामरूप दिसती ॥ १२ ॥ शाहापुरनगरा-माझारीं। योग अनुष्ठानें अधिकारी। नगरीचा प्रभू निर्धारीं। आला समर्थासमीप ॥१३॥ पाहे तव प्रत्यक्ष श्रीराम। आकृतीनें चि वेधिला परम। विशेष दीक्षा निरूपम। आश्चर्य पावला ॥ १४ ॥ अखंडदंडा-येंमान सृष्टीं। पायीं जाऊनि घातली मिठी। ह्मणे त्राहें त्राहें कृपादृष्टी। पाहें मज समर्था ॥ १५ ॥ सद्भाववज्रमिठी सत्व। दयेनें द्रवलें हृदय-

---

१ आत्मानंदरूप अमृताचा स्वयंभू चंद्र. २ अचल ज्ञानरूप समुद्राला. ३ भरती आणतोस. ४ ज्ञानस्वरूपी शिवाच्या मस्तकीं बसून. ५ मेघ. ६ प्रवृत्तींत ह्म० संसारांत गढलेल्या लोकांचे. ७ मोकळे, स्वैर. ८ तेज. ९ अहंकाररूप रावणाला जिंकणाऱ्या. १० दंडाप्रमाणें पडून. ११ जमिनीवर.

साक्षत्व । परमानंदे तें परतत्व । बोळले सुख ॥ १६ ॥ समर्थकृपेनें उदार । माथा ठेऊनि पद्मकर । ह्मणती उठ आता अभ्यंतर । प्राकट करीं ॥ १७ ॥ पुन्हा अभय घेऊनि पुरतें । प्रार्थिता होय भावार्थें । ह्मणे गृहासि येऊनि समर्थें । कीजे मज सनाथ ॥ १८ ॥ विनयसप्रेमभक्तीनें । करीं धरूनियां प्रीतीनें । गृहासि आणिले आवडीनें । मांडिलें अर्चन ॥१९॥ जनप्रवृत्तीचा न पडे वारा । ऐसा अरण्यवास संचारा । नावडेचि प्रवृत्ती अंतरा । उठोन पळती ॥ २० ॥ जैसीं कस्तुरीमृगे सुसीळ । वसती अरण्यप्रदेशीं निर्मळ । तयासि जनसहवासमळ । प्राणांत होय ॥ २१ ॥ अरण्यवासी विहंगम । करूनि उपचार परम । ठेविता सदनीं सप्रेमें । जन्मभूमिका इछिती ॥ २२ ॥ तेवि त्या जनसहवासें । अतिसंकोचित मानसें । मायामयदृश्यातीत वसे । लक्ष्य ब्रह्मारण्यीं ॥ २३ ॥ प्रथम कमळाकरें भावें । शक्तीसह कृतार्थाजिवें । होऊनियां अंतर्भावें । समर्थ आर्जविला ॥ २४ ॥ प्रपचाची तडाफोडी । फोडिती संग्रहैंउतरडी । चित्तासि विक्षेपाची रूढी । निघूनि जावया ॥ २५ ॥ तितुकी घसणी साहोनि । नित्य नवा आनंद मनीं । पंचप्राण कुर्वाळुनि । टाकिलें जिहीं ॥ २६ ॥ तेथें काय असेल प्रपंचआस । तरीच जोडले समर्थ त्यास । लाधले जो सहवास । ब्रह्मादिकासी दुर्लभ तो ॥ २७ ॥ त्याचि द्वारे परंपरा । घराणी जाली येकसरा । बोध चालिला ग्रामांतरा । विद्यातीनें ॥ २८ ॥ ग्रामाचीं ग्रामें संपूर्ण । उपदेश मालिका महाजन । बोधमंडळवृष्टीनें घन । मंडळेंचि मंडळें होती ॥ २९ ॥ प्रथम जन्मनवमींचें पर्व । आलें अभिनवाचें अपूर्व । वसविले पारगाव । उत्सवें पार टाकिला ॥ ३० ॥ पारगावींचा अधिकारी । तो अनुकूळ सर्वांपरीं । उत्सवस्थळ आरामांतरीं ।

---

१ तुझ्या मनात काय आहे ते सांग. २ कमळाजीपंत, समर्थांच्या जुन्या दोन चरित्रां पैकीं दुसऱ्यांतील कडके ९–१० पहा. ३ घरदार इत्यादि प्रपंचात् गुंतवून टाकण्याऱ्या गोष्टींचा त्याग करून मनाला शुद्ध करणारीं कारणेंच नाहींशीं करतात. ४ घागायागा, सांग. ५ गणराय ६ टिरणें.

रमणीय शोभा ॥ ३१ ॥ देशोदेशींचे यात्राकर । आले सिंहासनेंसी अपार । ठेसे पताका मनोहर । महावैभवें ॥ ३२ ॥ प्रथम उत्सवाची रचना । असंख्य भक्त गणवेना । प्रथमेपासूनि निवेदना । भक्ती रूढविल्या ॥ ३३ ॥ याच उत्सवीं भीमें साह्य केलें । मार्गी आम्रवृक्षीं अवरोधिलें । सव्यासि आठवितांचि कडाडिलें । भंगिलें अवरोधासी ॥ ३४ ॥ सुरक्षीत रथ चालिला । अमृताचा दिवस पाहीला । असंख्य समुदाय मिळाला । रामपर्वणीसी ॥ ३५ ॥ तेथूनि गुप्तगती अभिनव । भीम पाहावयाचा अंतर्भाव । उरुण बाहेगांवाचें नांव । समर्थ पावले तेथें ॥ ३६ ॥ कृष्णेमाजि भीमकुंड वितंड । त्यामध्यें गुप्तगतीनें प्रचंड । भीम असे तो महिमा उदंड । सांगती स्थळपुराणीक ॥३७॥ जे ते प्रशंसाचि सांगती । जनमनासि झकविती । परि कोणासि न ये प्रतीती । प्रत्यक्षतेवीण ॥ ३८ ॥ समर्थाचें सामर्थ्य अत्यद्भुत । प्रगट करावयासि ते महद्भुत । तेथील स्थळिकासी पूर्ववृत्तांत । रुद्राचा विचारिला ॥ ३९ ॥ समर्थापासीं परमपवित्र । सांगीतलें त्रेतायुगीचें चरित्र । लंकेसी वधूनि दशवक्र । राम विजयी जाला ॥ ४० ॥ मुक्त केले देव संपूर्ण । लंकेसि स्थापिला बिभीषण । सीतेसह पुष्पकीं आरूढोन । अयोध्येसी येतां मार्गी ॥ ४१ ॥ कृष्णेमाजि करावया स्नान । भूमंडळासि आलें ते विमान । कृष्णातीरीं उतरलें सैन्य । कपी आणि राक्षसांचें ॥ ४२ ॥ सीतेसि ठेविलें सिरठें गांव जेथें । रामसुमित्र पश्चिमेचेनि पंथें । कृष्णेसी देखून सुखाब्धि भरितें । दाटिलें हृदयीं ॥ ४३ ॥ कृष्णा निजतनूचि केवळ । प्रतीतीचा स्वानंदकल्लोळ । केवळ दयेचेंचि सुसीतळ । जीवन भरलेंसे ॥ ४४ ॥ अपुल्या स्वरूपज्ञानें आपण । स्वानंदजीवनीं सनातन ॥ कीजेत स्वानुभवें मज्जन । ते श्रीरामें आदरिलें ॥ ४५ ॥ सकळ तीर्थांच्या श्रेणी । पुनीत होती श्रीरामचरणीं ॥ तो ही मान देऊनि महापर्वणीं । तीर्थविधि करी ॥४६॥

१ प्रतिमा, मूर्ति. २ उगवला. ३ ही कथा निवृत्ति रामाच्या १ ल्या समासांत अशीच सांगितली आहे.

लोकउद्धारास्तव । सत्कर्मप्रवृत्तिसद्भावें । अत्यादरें महानुभावें । वर्तती सन्मार्गें ॥ ४७ ॥ महाजनो येन गतः स पंथा । त्याचि सन्मार्गें प्रवाह येतां । क्रमेंचि करूनि तत्वता । पात्रे स्वरूपीं ॥ ४८ ॥ अवतारामाजि परम । पावनचरित्रें श्रीराम । लोकसंग्रहासि सत्कर्म । दाक्षेनें वर्तला ॥ ४९ ॥ प्रातःस्नान कृष्णाप्रवाहीं । तोपला संपूर्ण हृदयीं । तळासि जाऊनि सुखेंचि पाहीं । बैसला ध्यानस्थ ॥ ५० ॥ स्वसुखमज्जनें सुस्नात । सद्भावें नित्यकर्म आचरत । परमानंदें आविर्भूत । शिवार्चन केलें ॥ ५१ ॥ ध्यानस्थ बैसला शिवध्यानीं । तैसाचि सुमित्र शिवार्चनीं । असतां ध्यानस्थ कृष्णेलागूनि । पूर आला प्रेमाचा ॥ ५२ ॥ निजजनक आत्माराम । प्रतीतीचें परंधाम । हृदयासि आला विश्राम । सुखें पार टाकिला ॥ ५३ ॥ परमानंदें घडघडायमान । लोट चालिलासे संपूर्ण । चित्कल्लोळ उकळ्यां भरूनि । वरिवरि भरे ॥ ५४ ॥ लोटलाटा गहागजरें । रामासि भेटावया प्रेम न संवरे । कृष्णा तुंबळ देखोनि अतित्वरें । भीमें पवाडला ॥ ५५ ॥ रामपाठिसीं उभा ठाकोनि भीम । परतोनि सारिला बांध दुर्गम । योजनद्वय डोहो निःसीम । अद्यापि वरि असे ॥ ५६ ॥ दोहीं बाहीं जळ अवरोधिलें । त्याचि संकेतें बाहुनाम पडिलें । विभागोनि जळ वाहिलें । जाहलें बेट मध्यभागीं ॥ ५७ ॥ परमानंदशिव । हृदयीं साठवूनिया राघव । रुद्रासि न देखत अभिनव । अयोध्येसि गेला ॥ ५८ ॥ तया भीमकुंडामाझारीं घसरत गेला पाताळवरी । त्याचि आविर्भवें त्रिपुरारी । राहिला तेथें ॥ ५९ ॥ पुरातनभक्तजनीं । बेटीं स्थापना केली मंत्रविधानीं । विग्रह करूनि कार्मुकपाणी । अर्चिलें नित्यउत्सवें ॥ ६० ॥ रामलक्ष्मण निरुपम । अधिष्ठानरूपें बळभीम । प्रत्यक्षकरील तो परम । रामावतार दुसरा ॥ ६१ ॥ ऐसें सा स्थळपुराणिकीं सांगीतलें । समर्थचित्त चाकोटलें ।

---

१ एकूण रामावताराचें देखील रहस्य म्हणजे लोकसंग्रहास्तव आचारिलेला कर्मयोग हें च आहे. २ लाटा. ३ भरती. ४ पूर. ५ बलभीम, मारुति. ६ प्रवेशला आला. ७ मूर्ति. ८ चापपाणि राम. ९ चकित झालें.

भीम भेटीचें लागलें । अनुसंधान जिथीं ॥ ६२ ॥ अंतरीं ठेवूनि अनुसंधान । दाखविली लीळा संपूर्ण । रात्रीं भयंकर माध्यान्ह । कृष्णेसि आले ॥ ६३ ॥ समर्थाचे अंकित जन । आले पाठिसींच धांवोन । त्यासि दगडवरि मारोन । घातलें परतें ॥ ६४ ॥ त्यामाजि धारिष्टाचें येक मूळ । दगड मारितांही ढळेना अचळ । समर्थसमागमें तात्काळ । आलें भावार्थें ॥ ६५ ॥ समर्थें जळांत उडी घातली । त्या मुळेंहीं पाठिसी उडी टाकिली । मग प्रवेशूनि त्या देउळीं । राहिले नावेकें ॥ ६६ ॥ उदासीन दिसे देवालय । ह्मणती सखा मज भेटेल काय । दाटोनि आलें हृदय । करुणारसें ॥६७॥ देउळीं ठेवूनि तया मुळासि । ह्मणती जागाचि ऐस निश्चयेंसी । हाक मारितांचि सत्वरेंसी । कपाट उघडीं तूं ॥ ६८ ॥ अद्भुतप्रेमभरें पूर्ण । केलें बळभीमस्मरण । कोशद्वय महावन । तेथें रिघाले ॥ ६९ ॥ महाकंटकाचें अहिंचण । भुजंग असती दारुण । नाना श्वापदें मार्गविहीन । प्रवर्तोचें नसे पां ॥ ७० ॥ अकल्पित गति समर्थाचि । जाणों न सके तो विरंची । दीक्षा देही मनुष्याची । प्राकृतांसि दिसे ॥ ७१ ॥ समर्थाचें जाणे अभ्यंतर । तो एक जाणिजे ईश्वर । भीमकुंडापासीं येऊनि सत्वर । भयंकर खवळिलें ॥ ७२ ॥ बहुता काळीचें उग्रदैवत । जळामाजी होतें अतिक्षुधित । अभिमंत्रूनि रोषयुक्त । पाचारूनि वळें ॥ ७३ ॥ रुद्रावेश समर्थी भरला । कल्पांतकाळघोष उठिला । जळांतूनि बोभाइला । निंखंदुनि शब्दें ॥ ७४ ॥ प्रळयावेशें वळें घोष । जळीं तडक फुटला सरोष । हर हर शब्दें आकाश । घुमों लागलें ॥ ७५ ॥ राम अभिनवपारिजात । मूळमध्याश्रितहनुमंत । होता जळामाजि ध्यानस्थ । दचकला तो ॥ ७६ ॥ समर्थहातींच्या क्रमुकफळें । चेतविलें रुद्रासि तात्काळें । कल्पांतकाळ आवेशबळें । जळांतूनि उठिला ॥७७॥ प्रळयमेघ धडाडिला । प्रळयविजा कडक फुटला । ब्रह्मगोळ घुमारला । तेणें नादें ॥ ७८ ॥ तेणें महाधांपें भूकंप जाला ।

---

१ थोडावेळ. २ दार. ३ ?. ४ वाट. ५ हाक मारली. ६ निन्दा करून. ७ सुपारीनें.

गर्भपातें कल्पांत गमला । प्रकाशघन प्रगटला । महारुद्र ॥ ७९ ॥ नानाप्रभेचे बंबाळें । अंतराळ कवळीत महाज्वाळ । नानावाद्यें घोष तुंबळ । ध्वनीनें उठती ॥ ८० ॥ नळे आंडीत उठिले । नक्षत्रमाळा ज्वाळ निघाले । भीमस्वरूप प्रगटलें । तयामाझारीं ॥ ८१ ॥ अद्भुतावेश भयंकर । आंगपुष्टीनें दाटिलें अंबर । ज्वाळारूप अतिदुस्तर । जळावरि चालिला ॥ ८२ ॥ पश्चिमेपासूनि पूर्वेसी । आला मिरवित गजेरेसीं । समर्थ येऊनि देउळासी । उघडविलें द्वार ॥ ८३ ॥ पूर्वींच देवालय होतें सिध्द । सुधाबिंब स्वहस्तेंचि प्रसिध्द । जीवनपूर्णकुंभ विशुध्द । आचमनासि ठेविला ॥ ८४ ॥ भावार्थगुळाची भेट थोर । समर्थांचें केवळ अभ्यंतर । जाणोनि तो भयंकर । देउळांत भरला ॥ ८५ ॥ भीमआवेशें धारला तेथें । तो जाग्रत बाह्याचा हनुमंत । गुळ भक्षिला सत्वरित । जीवन प्राशिलें ॥ ८६ ॥ तेणें क्षुधेचें नव्हे उपशमन । आवेशें उठावला दारुण । समर्थ भीमासि आलिंगन जाहलें तेव्हां । ॥ ८७ ॥ समर्थांचे श्रवणीं गोष्टी । सांगीतली भीमें स्नेहें निकटी । ह्मणती माझी क्षुधा मोठी । सांभाळीं जिवें ॥८८॥ तुझे क्षुधेसि ब्रह्मांड न पुरे । वारे निजतृप्तीनेंचि अवतरे । समर्थभावप्रत्योत्तरें । तोपला भीम ॥ ८९ ॥ तऱ्हीं क्षुधेचा आवेश दुर्धर । रोषें गुर्गुरिला भयंकर । तो कल्पांतरुद्र निरंतर । राहिला समर्थी ॥ ९० ॥ तेंचि खचरें वैराग्य उदेलें । वेष पालटऊनि वर्तविलें । समर्थचरित्र अवधारिलें । पाहिजे श्रोतीं ॥ ९१ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । समर्थरुद्र प्रगटला । ह्मणे मेरुअनंत ॥ ९२ ॥ ॥ प्रथमरुद्र १ अष्टम उल्लास ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ रुद्रस्थिति । महाआवेश उग्रमूर्ति । प्रगट करीत कीर्ती । चालिला सृष्टींत ॥ १ ॥ समर्थरुद्र येकात्मता । रामदर्शनार्थ सवेगता । वैराग्यस्थितीनें उग्रता । बाणली शरीरीं ॥२॥

१ लोट. २ मोठ्यानें आवाजकरीत. ३ पाण्यानें भरलेली घागर. ४ तीव्र.

परमसुंदर सौम्य रूप। जालें आकृतीनें काळें स्वरूप। दृष्टीसि देखतांचि सर्कंप। सैळोनि पडिजे ॥ ३ ॥ विस्मरणाची भरणी भरली। जनाची बोळखि टाकिली। पिसाट काया प्रवर्तली। महाविजनीं ॥ ४ ॥ समीप जातां कोणी तरीं। अचूक घेती दगडवरी। रूप पाहातांचि अभ्यंतरीं। चळकंप सुटे ॥ ५ ॥ दारुण वैराग्य उद्भवलें। खचरट अरण्य धरिलें। क्षुधेतृषेसि बोळविलें। विसरोंचि सर्व ॥ ६ ॥ रुद्र अधिष्ठानदेवता। आंगीं भरली सकोपता। काया विक्राळ पाहातां। पूर्वील नव्हे चि ॥ ७ ॥ विचरतां स्वछंद दशेनें। महापर्वतासि जालें येणें। वोसाड व्याघ्रदरीमाजि तेणें। काळें वस्ति जाली ॥८॥ व्याघ्र दरीमाजि पसरला। त्या गवीचे मुखीं समर्थ बैसला। मार्गावरोधें गडाडिला। पंचानन तो ॥ ९ ॥ अद्भुततेज सत्ता दुर्धर। भयाभीत जाला वनचर। आंगनिकटीनें चि सत्वर। बाहेरि पडिला ॥ १० ॥ गळां घालूनि करपाश। अवरोधिलें त्या व्याघ्रास। अभिनव समर्थमहिमेस। काय ह्मणावें ॥ ११ ॥ हें चि आश्चर्यसें वाटे जना। कळिकाळव्याघ्रावरोधना। क्षणामाजि ब्रह्मांडें नाना। लीळीं रचोनि खची ॥ १२ ॥ व्याघ्रासि कुर्वाळूनि स्वकरें। सांगीतलें समर्थें अत्यादरें। जें यात्रकरासि भयवारें। लागों नेंदी तूं ॥ १३ ॥ समर्थें गवी परिदुसरी गवी दाखविली। तेथें चि व्याघ्रें वस्ति केलि। समर्थें गवी परिशोधिली। वोसाड ते ॥ १४ ॥ तेथेंचि केला रहिवास। समाधिनिद्रेमध्यें विलास। तैं क्षुधेनें शरीरास। अत्यंत बाधिलें ॥ १५ ॥ समाधि मूर्छित निद्रा। जाणवले स्वसुख रामचंद्रा। सुमित्रासह कृपासमुद्रा। आगमन जालें ॥ १६ ॥ अमृतईक्षण कृपाकरें। कुर्वाळूनि समर्थासि प्रीतिभरें। स्वानंदतृप्तीचीं चौरें। घातलीं वदनीं ॥ १७ ॥ रामप्रसाद परमामृत। तेणें समर्थ जाले सावधचित्त। रुद्रवेष उपशांत। कांहीं जाला ॥ १८ ॥ रामचंद्रामृतकिरणीं। निवाला रुद्र अंतःकरणीं। निर्जळपर्वत धरणीं। पवाडले महाजळ वाहूं लागलें ॥ १९ ॥ तेथूनि पुढें स्वछंदस्थिति। पवाडले महा-

१ धावरून, २ गुहेचे. ३ वाघ. ४ शरीर आवरून. ५ लीलेनें. ६ खाणें.

पर्वतीं। अखंड उदोचि जाला ह्मणती। शक्तीचा आवेश तो ॥ २० ॥ ज्वालामुखीचें अर्चन। सर्वांगीं होय तैलपान। महाआवेशें रूप दारुण। कज्जेळ डोळां ॥ २१ ॥ कांकणें घालूनियां करीं। पीतवर्ण वस्त्रशरीरीं। काया पुरुष अलंकारी। प्रकृतिरूप ॥ २२ ॥ अर्धनारीनटेश्वरलीला। दाखविली समर्थांनीं डोळां। न कळोनी हा जनासि जिव्हाळा। ह्मणती वेडें लागलें ॥ २३ ॥ खडतर रामउपासक। समर्थस्वामी पुण्यश्लोक। शक्तीच्या रूपें लौकीक। व्यर्थ चि जाला ॥ २४ ॥ उपासनामंत्र चळला। तरी च येवढा भ्रम जाला। समर्थांचा भ्रम चुकवावयाला। ह्मणती करा अनुष्ठान ॥ २५ ॥ महानुभाव योगेश्वर। अद्वैतदशेचे गिरिवर। ब्रह्मादिकांसि पार। न कळे तयाचा ॥ २६ ॥ वरकड मानवी किंकर। त्यांसि काय कळेल पार। केवल आत्मनिष्ठांचे निर्धार। कळों आलें ॥ २७ ॥ निकट रामउपासकें। तेंही भ्रमलीं माया कौतुकें। समर्थमहिमा विवेकें। आकळिला नव जाय ॥ २८ ॥ जाणे एक कैलासपति। सम समर्थांची स्थिति। द्वितीय जन्मउत्सवतिथि। नवमी पातली ॥ २९ ॥ महापर्वत सभोंवते। स्थळ पाहूनि अभिनव तें। रामपातिष्ठेसि समर्थें। कारण केलें ॥ ३० ॥ महावोसाड भयंकर राण। मसणवटी भूतसंस्थान। जेथें दिवसां जातां सळोन। पडती लोक ॥ ३१ ॥ तया देशीचें अधिपत्य जया। तें स्थळ मागून घेतलें तया। त्वरेनें मसणवटीस येऊनियां। भूतांसि प्रार्थिलें ॥ ३२ ॥ अद्भूत सामर्थ्य असतां आंगीं। सत्ता करणें नाहीं जगीं। योगसंपन्न वीतरागी। समर्थस्वामी ॥ ३३ ॥ भूतें पापणीं होतीं स्थापिलीं। आपुल्या करें येकघटिली। वस्त्रात बांधोनि नेलीं। इतरस्थळां ॥ ३४ ॥ गोरी गडदेरा उदंड। भूमिका केली अखंड। पारिशुरधीनें ते प्रचंड। देवालय निर्मिलें ॥ ३५ ॥ आदिपुरुष जुनाटमूर्ति। पाटणीच्या पारावरी होती। गुप्तगतीनें रातोराती। जाऊनि आणिली ॥ ३६ ॥ शंभरि उचलितां नुचले। समर्थहस्तगतीनें तात्काळें। येऊनि देवाल्यीं अवलीळे।

१ उदय, जयजयकार. २ स्वरूप. ३ रहस्य, मर्म. ४ गारेचे दगड. ५ सांपळली. ६ पाटणगांवच्या. ७ पिंपळाच्या पारावर.

प्रतिष्ठिली ते ॥ ३७ ॥ देवाळयाची रचना । अद्भुत ते वर्णवेना । पदरीं कांहीं असेना । मागणेंचि नाहीं ॥ ३८ ॥ सद्भाविक येक अंकित । त्यावरि कृपा असे बहुत । अंकिचन तें वित्त । मागीतलें तया ॥ ३९ ॥ ते ह्मणे माझें अभ्यंतर । स्वामी जाणताति साचार । श्रीगुरूसी वंचना करूनिया थोर । गतीसी कैंवि पावेन ॥ ४० ॥ ह्मणती चिंध्याचें तुझें गांठोडें । सोडोनि दाखवी निवाडें । आणूनि दावितां रोकडें । सापडलें द्रव्य तें ॥ ४१ ॥ ऐसी अघटितमहिमा । स्थापीत चालिले बळभीमा । अक्राअक्रीं निरुपमा । होती रुद्रप्रतिष्ठा ॥४२॥ चाफळीं रामराजेश्वर । व्यापूनि देशदेशांतर । देशाधिपती महाथोर । भीम वसले ॥ ४३ ॥ मुख्य उत्सवाचें स्थळ । महाठाव तें रमणीय चांफळ । विस्तीर्ण आम्रवनें सफळ । समर्थ हातिचीं ॥ ४४ ॥ नानासुमनवनें चंपक । समर्थरचनेचें अतिकौतुक । विश्वंभरयात्रा बहुतलोक । उत्सवासि मिळती ॥ ४५ ॥ दिंड्या पताका महावैभवें । उत्सवासि आरंभ भावेंजिवें । दिवस नेमूनि सद्भावें । भारवाही केले ॥ ४६ ॥ रघुवीरभजनाचा । विधि[1] सन्निध आला नवमीचा । समीरजभजनाचा । यत्न केला पाहिजे ॥४७॥ चिंतीत असतां अभ्यंतरीं । बाह्यांची[2] भीमें केली थोरी । क्षुधारोपें त्यानगरीं । शिक्षा करी दुर्धर ॥ ४८ ॥ पूजाऱ्यासि[4] टाकी देवळाबाहेरी । रात्रीं गृहासि जाऊनि विदारी । लघुरूप ब्रह्मचारी । मारीत ठोंसरे ॥ ४९ ॥ पीडा पाऊनि ते पार्येनी । भीमशिक्षीत गाऱ्हाणें घेऊनि । आले समर्थापासीं धांवोनि । सांगितला वृत्तांत ॥ ५० ॥ तयापासीं खारिका देऊनि । स्वामीनें पाठविलें सांगोनि । जो फळार करावया तत्क्षणीं । होयील पूर्ण तृप्ती ॥ ५१ ॥ क्षणभरी लागेल भोजना । होयील असंभाव्य संभावना । रामउत्सवें क्रमेंचि निधाना । तोपर्यंत तुज ॥५२॥ हें समर्थ अभय घेऊनि । गेले ग्रामासि ते परतोनि । रुद्ररूपासि खारिका देऊनि । समजाविलें ॥ ५३ ॥ आजेमातें पुरुषार्थी दैवत । आज्ञेमाजि

---

१ विधि, उत्सव. २ मारुति. ३ बाहु क्षेत्राची, वाहेगांवची. ४ पुजारी (?) ५ उग्र (?).

असे वर्तत । शिशुसारिखें खेळवीत । रूढविली प्रसन्नता ॥ ५४ ॥ त्रैलोक्यनाथ आराधिला । चाफळीचा उत्सव घेता जाला । रामजन्म-नौमीचा केला । समारंभ समर्थें ॥ ५५ ॥ तया उत्सवानंतरें । उत्सव-सहित त्या गजरें । येऊनि बाह्यासि सत्वरें । तोपविला रुद्र ॥ ५६ ॥ समाराधना अभिनव । नाना सदन्नपरवैडी नवनव । रुद्रदृष्टीपुढें सदैव । रासी केल्या ॥ ५७ ॥ तेणें सुखासेंचि तो धाला । यरकड काय पाहिजे त्याला । देव भावार्थाचा भुकेला । प्रसित्वेंचि कीं ॥५८॥ अभिनव समर्थाची लीला । जिहीं प्रत्यक्ष पाहिलीं डोळां । कृतार्थ ते जन सोहळा । देखिला समर्थाचा ॥ ५९ ॥ सृष्टींत उदंड समुदाव । स्वरूपाचें निजवैभव । महंत मंडण अभिनव । निस्पृह दीक्षा ॥ ६० ॥ नानाविधजनअंतःकरणें । समर्थदृष्टीनेंचि परीक्षा करणें । चित्त घेऊनि निजकृपेनें । बोधविजे तया ॥ ६१ ॥ असंख्य निस्पृहाची थंटें । भजनविधी लाविल्या निकटें । नित्यनेम तोप उत्कटें । बळावली दीक्षा ॥ ६२ ॥ सामर्थ्यबोध चमत्कार । प्रतीतीसि सगुणसाक्षात्कार । येक-वेळेसीं अद्भुत थोर । जालें तें अवधारा ॥ ६३ ॥ निरपेक्षाची समा-राधना । संतृप्त केलें सकळजना । समर्थ निस्पृहाचा राणा । पर्वतीं असतां ॥६४॥ बैसले असतां शिखरावरी । भीम आला वानरशरीरीं । पंचभक्षें आपुल्याकरीं । चारिलीं तया ॥ ६५ ॥ त्याचि प्रसंगीं येक ब्राह्मण । व्यवसायमुळें कष्टी होऊन । प्राणनिदानीं समर्थदर्शन । घ्यावयासि आला ॥ ६६ ॥ साष्टांगीं समर्थासि वंदिलें । बोलवितां कोणासिही न बोले । समर्थचरणीं ठेविलें । काढीच ना मस्तक ॥६७॥ समर्थासि ह्मणे याचि निश्चयें । अभीष्टपूर्तीचें द्याल अभय । तरीच हा ठेवीन देह । हेचि प्रतिज्ञा माझी ॥ ६८ ॥ समर्थासि प्रत्यक्ष बलभीम । लोकीं मज सांगीतलें वर्म । कृपाकरूनियां परम । महारुद्र भेटवा ॥ ६९ ॥ केली तेणें समर्थाची जोडी । प्राण गेलियां पाय न सोडी ।

---

१ प्रकार. २ देव भावाचा भुकेला । दास सेवकाचा झाला । या तुकोबाच्या उक्तिप्रमाणें. ३ समुदाय. ४ जोड, संगत.

द्रवलें समर्थहृदय रोकडी । होय रुद्रप्रत्यक्षता ॥ ७० ॥ समर्थें सांगीतलें निजबीज । माझ्या वचनींच तूं उमज । भीमप्रत्यक्षतेचें स्थळ तुज । सांगेन तें तूं न सोडीं ॥ ७१ ॥ केवळ दुर्बळ अन्नार्थी । भोजन करीत असतां पंक्ती । तेथें जाऊनियां समर्थी । द्विज वृध दाखविला ॥ ७२ ॥ जो फुंकिलियानें पडे सृष्टी । पाहोनि विस्मित जाला दृष्टी । जेऊनि आंचवितांच मिठी । घातली तयाचे पायीं ॥ ७३॥ वृधें अपार करुणा केली । लोकांची मींदी मिळाली । समर्थआज्ञेनें धरिली । दृढता दुर्धर ॥ ७४ ॥ रात्रीचें काळोखें भरलें । लोक वोसरोनि गेले । अतिवृधानें झिंजाडिलें । तया ब्राह्मणासी ॥ ७५ ॥ पाहे तो पिंगळाक्ष भयंकर । दीर्घलांगूळ करी गुर्गुर । धांवोनि धरिला द्विजवर । गुर्गुरीत रोषें ॥ ७६ ॥ इतुकें होतांचि तत्क्षणीं । समर्थ गेले पर्वतवनीं । भीम ह्मणे ब्राह्मणा लागूनि । छळिलें माझ्या सख्यासि ॥७७॥ माथां ठेवूनि अभयंकर । बोलिला आर्जवी समर्थ धुर । रुद्र किरणिचक्रें सत्वर । भेटला सख्यासि त्या ॥ ७८ ॥ कितीबेळा रुद्रचमत्कार । समर्थमहिमा आगोचर । जावळीपासीं वसलें पार । तेथेंही ऐसेंचि केलें ॥ ७९ ॥ एकांतीं देवगृहा आंत । दृष्टीसि न पडतां भोजन करित । स्थिति न कळतां भावीक तेथें । वनिता वाढावयास गेली ॥ ८० ॥ तंव तो प्रत्यक्ष कपिस्वरूपें । दोहीं हातें जेवितां तोपरूपें । जाला भयंकर तेणें सकंपें । सळोनि पडली ते ॥ ८१ ॥ अग्निस्वरूपी तपोरूप । सूर्य विद्युल्लतीचा प्रताप । विज्ञानस्वरूपीं आपेंआप । सुखाब्धीचि आंगें ॥ ८२ ॥ सिरिध तिष्ठत असती पुढें । परि पाहेचि ना तयाकडे । सगुणसाक्षात्कारेंचि रोकडें । चालिलें सामर्थ्य ॥ ८३ ॥ लीळा पळत असतां पुढें । पाणजंजाळ चहुंकडे । धांवें सरिसाचि पवाडे । सरितेवरूनि त्या ॥ ८४ ॥ असतां विशाळमंडपाआंत । पर्जन्य लागला रात्रद्भुत । मंडप कोसळला तेथें । तैसेंचि राहिले ॥ ८५ ॥ कितीयेक दिवसानीं । आले सम-

---

१ जमिनीवर. २ समूह. ३ लाल डोळ्यांचा. ४ लांब शेपटीचा. ५ उड्डाण. ६ पाण्याचा लोटच्या लोट.

थांचे शुध्दीलागूनि । चिरे काढितां तत्क्षणीं । उठोनि पळाले ॥ ८६ ॥ महापुरांत उडी टाकिली । काया तेथें बुडोनि गेली । कितीयेक दिवस राहिली । वाळुमध्यें ॥ ८७ ॥ जळ वोहटलिया वरी । शोधितां नदीपात्रांतरीं । वाळु काढितांचि वज्रशरीरी । निघोनि चालिले ॥ ८८ ॥ लीला नदीतीरीं कौतूहल । धनुर्धरदीक्षेनें तात्काळ । चिमणी विंधुनी पडितांचि तळमळ । करूनि प्राण सोडिला ॥ ८९ ॥ हांसों लागले द्विज सकळ । ह्मणती हा संतमहिमा केवळ । महादयेचें हृदय सीतळ । प्रत्यक्ष पाहा ॥ ९० ॥ तो मृतपक्षी घेऊनि हातीं । ह्मणती काय जालीस जगज्योती । करें कुर्वाळितां सप्रतीती । पक्षी उडोनि गेला ॥ ९१ ॥ तेन्हां आश्चर्य वाटलें तया । सद्भावें लागती समर्थांच्या पायां । ह्मणती अविश्वासी आह्मी सदया । समर्था नुपेक्षीं ॥ ९२ ॥ ऐश्या अभिनवांच्या कोटी । विस्तारल्या सर्वसृष्टीं । तें समर्थचरित्र श्रवणपुटीं । घ्यावें अत्यादरें ॥ ९३ ॥ इतिश्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिन्हाळा । समर्थप्रतापसूर्य उदेला । ह्मणे मेरूअनंत ॥ ९४ ॥ प्रथमरुद्र १ ॥ नवमउल्लास ९ ॥ संपूर्ण ॥ ॥ ७ ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थयोगस्थिति । सृष्टींत चमत्काराची प्रतीती । विरक्ति वनविहारविश्रांति । निजबोधदर्शनें ॥ १ ॥ स्वानंदसत्ता अगोचर । चमत्कारेंचि उध्दरिले जन अपार । समर्थबोध विश्वंभर । विश्वीं भरला ॥ २ ॥ नाहीं निजदेहाचा उपचार । नसे सलोभ संस्कार । अतिशयविरक्तीनेंचि उध्दार । केला विश्वजनाचा ॥ ३ ॥ पक्षपक्ष मासवरी । आहारवर्जित शरीरीं । अखंड होती राणेभरी । रामवेध स्वछंदें ॥ ४ ॥ त्या समर्थांचें विचरणें । सहवास हो जयां कारणें । तयाचें कृतोध्दार जिणें । पावन करी सकळां ॥ ५ ॥ अरे आर्कोश फोडुनि देउळीं करा । त्यामाजि आहे तें विवरा । तेथें माझी

१ हें ब्राह्मणांचे बोलणें उपरोधिक आहे. २ अद्भुत चमत्काराच्या. ३ रानांत भटकणारे. ४ हृदयाकाश.

द्रवलें समर्थहृदय रोकडी । होय रुद्रप्रत्यक्षता ॥ ७० ॥ समर्थें सांगीतलें निजबीज । माझ्या वचनींच तूं उमज । भीमप्रत्यक्षतेचें स्थळ तुज । सांगेन तें तूं न सोडीं ॥ ७१ ॥ केवळ दुर्बेळ अन्नार्थी । भोजन करीत असतां पंक्ती । तेथें जाऊनियां समर्थीं । द्विज वृध दाखविला ॥ ७२ ॥ जो फुंकिलियानें पडे सृष्टी । पाहोनि विस्मित जाला दृष्टी । जेऊनि आंचवितांच मिठी । घातली तयाचे पायीं ॥ ७३॥ वृधें अपार करुणा केली । लोकांची मांदी मिळाली । समर्थआज्ञेनें धरिली । दृढता दुर्धर ॥ ७४ ॥ रात्रीचें काळोखें भरलें । लोक वोसरोनि गेले । अतिवृधानें झिंजाडिलें । तया ब्राह्मणासी ॥ ७५ ॥ पाहे तो पिंगळाक्ष भयंकर । दीर्घलांगूल करी गुर्गुर । धांवोनि धरिला द्विजवर । गुर्गुरीत रोषें ॥ ७६ ॥ इतुकें होतांचि तत्क्षणीं । समर्थ गेले पर्वतवनीं । भीम म्हणे ब्राह्मणा लागूनि । छळिलें माझ्या सख्यासि ॥७७॥ माथां ठेवूनि अभयंकर । बोलिला आर्जवी समर्थ धुर । रुद्र किरणिचक्रें सत्वर । भेटला सख्यासि त्या ॥ ७८ ॥ कित्तीवेळा रुद्रचमत्कार । समर्थमहिमा आगोचर । जावळीपासीं वसलें पार । तेथेंही ऐसेंचि केलें ॥ ७९ ॥ एकांतीं देवगृहा आंत । दृष्टीसि न पडतां भोजन करित । स्थिति न फळतां भावीक तेथें । वनिता वाढावयास गेली ॥ ८० ॥ तंव तो प्रत्यक्ष कपिस्वरूपें । दोहीं हातें जेवितां तोपरूपें । जाला भयंकर तेणें सकंपें । सळोनि पडली ते ॥ ८१ ॥ अग्निस्वरूपी तपोरूप । सूर्य विख्यातीचा प्रताप । विज्ञानस्वरूपीं आपेंआप । सुखाब्धीचि आंगें ॥ ८२ ॥ सिद्धि तिष्ठत असती पुढें । परि पाहेचि ना तयाकडे । सगुणसाक्षात्कारेंचि रोकडें । चालिलें सामर्थ्य ॥ ८३ ॥ लीला पळत असतां पुढें । पाणजंजाळ चहुंकडे । धांवें सरिसाचि पवाडे । सरितेवरूनि त्या ॥ ८४ ॥ असतां विशाळमंडपाआंत । पर्जन्य लागला चालद्धुत । मंडप कोसळला तेथें । तैसेंचि राहिले ॥ ८५ ॥ कितीयेक दिवसानीं । आले सम-

१ जमिनीवर. २ समूह. ३ लाल डोळ्यांचा. ४ लांब शेपटीचा. ५ उड्डाण.
६ पाण्याचा लोटच्या लोट.

थांचे शुश्रीलागूनि । चिरे काढितां तत्क्षणीं । उठोनि पळाले ॥ ८६ ॥ महापुरांत उडी टाकिली । काया तेथें बुडोनि गेली । कितीयेक दिवस राहिली । वाळुमध्यें ॥ ८७ ॥ जळ वोहटलिया वरी । शोधितां नदीपात्रांतरीं । वाळु काढितांचि वज्रशरीरीं । निघोनि चालिले ॥ ८८ ॥ लीला नदीतीरीं कौतूहल । धनुर्धरदीक्षेनें तात्काळ । चिमणी विंधुनी पडितांचि तळमळ । करूनि प्राण सोडिला ॥ ८९ ॥ हांसों लागले द्विज सकळ । ह्मणती हा संतमहिमा केवळ । महादयेचें हृदय सीतळ । प्रत्यक्ष पाहा ॥ ९० ॥ तो मृतपक्षी घेऊनि हातीं । ह्मणती काय जालीस जगज्योती । करें कुर्वाळितां सप्रतीती । पक्षी उडोनि गेला ॥ ९१ ॥ तेन्हां आश्चर्य वाटलें तया । सद्भावें लागती समर्थाच्या पायां । ह्मणती अविश्वासी आह्मी सदया । समर्था नुपेक्षीं ॥ ९२ ॥ ऐश्या अभिनवांच्या कोटी । विस्तारल्या सर्वसृष्टीं । तें समर्थचरित्र श्रवणपुटीं । घ्यावें अत्यादरें ॥ ९३ ॥ इतिश्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिन्हाळा । समर्थप्रतापसूर्य उदेला । ह्मणे मेरूअनंत ॥ ९४ ॥ प्रथमरुद्र १ ॥ नवमउल्लास ९ ॥ संपूर्ण ॥ ॥ छ ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थयोगस्थिति । सृष्टींत चमत्काराची प्रतीती । विरक्ति वनविहारविश्रांति । निजबोधदशेनें ॥ १ ॥ स्वानंदसत्ता अगोचर । चमत्कारेंचि उत्धरिले जन अपार । समर्थबोध विश्वंभर । विश्वीं भरला ॥ २ ॥ नाहीं निजदेहाचा उपचार । नसे सलोभ संस्कार । अतिशयविरक्तीनेंचि उत्धार । केला विश्वजनाचा ॥ ३ ॥ पक्षपक्ष मासवरी । आहारवर्जित शरीरीं । अखंड होती राणँमरी । रामवेध स्वछंदें ॥ ४ ॥ त्या समर्थांचें विचरणें । सहवास हो जयां कारणें । तयाचें कृतोत्धार जिणें । पावन करी सकळां ॥ ५ ॥ अरे आर्कोश फोडुनि देउळीं करा । त्यामाजि आहे तें विवरा । तेथें माझी

१ हें ब्राह्मणाचें बोलणें उपरोधिक आहे. २ अद्भुत चमत्काराच्या. ३ रानात भटकणारे. ४ हृदयाकाश.

विस्मयेंसी । समर्थें भेटि दिधली मातेसी । निर्लोभ अक्षोभ स्थितीसि । काय ह्मणोनि वर्णावें ॥ ३५ ॥ सूर्य जया देशासि गेला । तेंउता प्रकाशचि जाला । प्रकाशघन समर्थकीर्तीला । काय ह्मणोनि वर्णावें ॥ ३६ ॥ क्षणामाजि. पालटे स्थिति । कोणाचें कांहीं च न होती । देखिलें ना आईकिलें रीती । अनोळखि रुढे ॥ ३७ ॥ अनोळिखिचे ठायीं चमत्कारें । वोळखि धरिती निर्धारें । वोळखीचे ठायीं साचारें । देखती अनोळख ॥ ३८ ॥ पावन श्रीराम अवतार । पावन समर्थ योगेश्वर । पावन सकळहीं साचार । समर्थ दर्शनें ॥ ३९ ॥ समर्थ-विरक्तीच्या तेजें । पतितांसि विरक्ती उपजे । सात्विकासी तरि सहजें । दीक्षाचि लाभे ते ॥ ४० ॥ समर्थ तपस्वी महाउदास । अखंड पर्वतींच निवास । चंद्रगिरीवरि विशेषें । राहणें समर्थांचें ॥ ४१ ॥ बत्थासि उपजे विरक्ति अभक्तासि संभवे भक्ति । स्थळदर्शनेंचि मुक्ति । होय सकळां ॥४२॥ परमकठिण अवघडें । स्थळें विशाळें चहुंकडे । तुटले पर्वताचे कडे । संपुटाकारें ॥४३॥ दऱ्या दरकुट्या विवरें । रमणीय गुहा कंदरें । सुशोभित स्थाणुशिखरें । उंचस्थळीं बैसका ॥४४॥ निबिड तरुवर लागले । अति उन्नत समान सरळे । गगनासि बोलिती डोले । पक्षी तेथिंचे ॥ ४५ ॥ गिरिपाठारिंचे जळवोघ । धराधवाचा अमोघ । खळाळ रिचेंवती सेघें । प्रवाह जाती ॥ ४६ ॥ अभिनव समर्थांची करणी । पाणी खेळऊनि धरणीं । डबीबीत स्वयंमपुष्करणी । अक्षोभ तोय ॥ ४७ ॥ नानावनस्पती सुमन याती । आरामतरुवर स्वहस्तीं । पर्वताचिया अंतस्तीं । महावैभव ॥ ४८ ॥ मठ मठिका पर्णकुटिका । आकळें तापसाच्या बैसका । समान साधूनि भूमिका । नाना अंतस्तें

---

१ तेथें. २ समर्थांच्या उपदेशानें संसारांतील नित्य गोष्टींचा कंटाळा आला व आत्मज्ञानाची गोडी लागली. ह्म० गीतेंत वर्णिलेल्या 'या निशा सर्वभूतानां' इ० योग्याच्या स्थितीप्रत लोक पोंचले. ३ द्रोणाच्या आकाराचे. ४ वहातात. ओततात. ५ सर्व. ६ मल्न टेवी. ७ गुप्त. ८ जमिनीत गुहा करून त्यांत तपश्चर्येला बसण्यासारख्या उत्तम गुप्त जागा तयार केल्या.

|| ४९ || अठराभार वनस्पती । सदा सफलित वृक्षजाती । नित्य वसंताची वसती । शोभेची आगळिक || ५० || त्या वनफळासि नसेचि जोडी । अमृताची फिकी गोडी । नाना सुस्वादपरवडी । लांचावे रसना || ५१ || तरुवरि छाया पडे दाट । वनाचा पैसार नसे शेवट । नाना विहंगम घनदाट । कलरव करिती || ५२ || वृक्षीं विचरती वानरें । क्रीडाकल्लोळ महागजरें । शाखा आंदोळत भूभूकारें । भरिती नभ || ५३ || वृक्षदाटीनें अपार । वृक्षाग्रीं होय तें पाठार । तया पैसारें भारंभार । कपी चौताळती || ५४ || कृष्णवदनें पसरट । पिंगटनेत्र वाबरेंओंठ । वरुनि लांगुलाचे सांट । अचाट गर्जती || ५५ || चपळागें सडपातळ । उसाळती बळें सबळ । समानगती अंतराळ । भूमी तैयासी || ५६ || येक बोटें धरुनि वृक्षडाळ । लांगुळ धरुनि गोळांगुळ । असंख्य वानरमाळ । अंतराळीं झेंपावती ||५७|| अवचितें दचकोनि पाहती । चपळ डोळे मिचकाविती । पुंसें७ चुंबुन खाजविती । सर्वांग चेष्टेनें || ५८ || अति सकुमार हेमवर्ण । ईंद्र कपिमाजि वसे संपूर्ण । पाहतां पाहतां दृष्टी भरून । पाहावेंच वाटे || ५९ || भडेस न पुरे रुद्र पाहातां । वाटे जावें त्या पासीं च आतां । सांगती होऊनी सप्रेमता । सर्वांग पाहावें || ६० || लागली वनस्थली विशेष । फिरती श्वापदें कर्कश । रीस व्याघ्र बहुवस । त्या वनांतरीं || ६१ || तरसें वनमार्जारें शृगालें । हरिणें चित्ते विक्राळें । कस्तुरीमृगें निर्मळें । नाना वनचरें || ६२ || वनह्मैसे वनगाई । वनगज तये ठायीं । निर्भय वसती निश्चयीं । समर्थ तेथें || ६३ || नाना विस्तीर्ण सरोवरें । क्रीडती मत्स्य आणि मगरें । जळपक्षी आणि जळचरें । नाना प्रकारचीं || ६४ || बक कारंडक चकोरें । शुक पिक चक्रवाक । सांरें सौयिळें चित्रवर्ण पांखरें । मयूरें शाहाबाजें || ६५ ||

---

१ वासाच्या प्रकारांनीं. २ विस्तार. ३ भयंकर. मोकळे केंस ४ भय. ५ त्यांना आकाश किंवा जमीन सारखी न वाटे. ६ वानर. ७ (?). ८ मारुनि. ९ वृत्ती होईना १० सारिका, मैना. ११ शब्द. १२ (?) सुंदर.

॥ ९६ ॥ रामसमर्थचरित्र सुंदर । श्रवणेंचि होय साक्षात्कार । समर्थअर्चन मनोहर । अवधारिजे पुढें ॥९७॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । समर्थवनविहारअवलीळा । क्षणे मेरु अनंत ॥ ९८ ॥ प्रथमरुद्र १ दशमउल्लास १० संपूर्ण ॥ ॥ छ ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ आत्मरूप । षड्गुणऐश्वर्य चित्स्वरूप । षड्गुणेश्वर सत्स्वरूप । मूळपुरुषा ॥ १ ॥ अमनउन्मनैकालितांबरा । विदितावबोधधरोधरा । सुवेद्यतत्वसुखकरा । प्रगटबोधा ॥ २ ॥ परम उपरमस्थान । परमगुरुत्वें सुप्रसन्न । निजयोगऐश्वर्यसंपन्न । स्वभावप्रभवा ॥ ३ ॥ प्रचुरतरप्रज्ञातरा । प्रमेयअद्वितीयपरावरा । प्रबोधपाथेय भवसागरा । भवभयशमना ॥ ४ ॥ संसर्ग कल्मषहरणा । सुखैकघनसुधाकिरणा । सदयाब्धी संसरणा । निवारिसी सुखें ॥ ५ ॥ चिद्रंगनिस्तरंगभरणा । सशांतपरेशआभरणा । विज्ञानप्रतिष्ठीतकरणा । करुणामूर्ती ॥ ६ ॥ स्वानंदज्योतिर्लिंगसोज्वळा । हृदयद्योतक उजाळा । प्रकाशविभवचित्कळा । झळाळ निजतेजें ॥ ७ ॥ विज्ञानजलजेंविकसिता । आत्मदिनमानप्रकाशता । स्वरूपपाथिक सुपथा । प्रकाश करिसी ॥ ८ ॥ भवभयभार्जनभंजना । भेदानिर्जितप्रभंजना । सुवेद्यहिरण्यंअंजना । निधान प्रकटिसी ॥ ९ ॥ अखिलजगत्कारणहरा । निखिलतत्वांगजिर्हारा । सकळागमनिगमधरा । समर्थस्वामी ॥ १० ॥ स्वरूप-

---

१ ज्ञान, शक्ति, बल, ऐश्वर्य, वीर्य, तेज हे सहा गुण. २ समाधिरूप वस्त्र नेसलेला. ३ शेषा. शेष हा मोठा ज्ञानी आहे. ४ संसाराला. ५ ज्याचें विज्ञानरूप कमल फुललें आहे असा. ६ आत्मस्वरूपी दिवस ज्याचा उगवला आहे असा. ७ आत्मस्वरूपाकडे जाणाऱ्यांचा मार्ग. ८ संसारभयरूप भांडें फोडणारा. ९ भेदरूप वायूला जिंकिलें आहे असा. १० ज्ञानरूप अंजन डोळ्यांत घालून परमात्मरूप ठेवा दाखविणारा. ११ दृश्य सृष्टीचें कारण जी माया तिचें हरण करणारा. १२ सर्व तत्वांचें रहस्य.

क्षणांसुप्रतिष्ठिता । स्वहितावबोधअवचिता । अवधानावतंसउन्नता ।
वरी विलससी ॥११॥ ज्ञप्तिसुखउत्तुंगवेशा । प्रतीती आस्तिक्य सुवेद्या ।
सत्य सनातन आद्या । आदिपुरुषा ॥ १२ ॥ जगदानंदभरणभरणी ।
अभिनवदशाची कारण करणी । भवजळतारकउत्थरणी । तव कृपा
॥ १३ ॥ अघटितघटनाघटीयंत्री । विमुक्तबोधकरें मोक्षसूत्री । स्वप्रकाश
घन सर्वत्री । समानदया ॥ १४ ॥ स्वपददायक सदया । परमकृपालु
विदितहृदया । त्रिविधतापहरदया । अमृतघना ॥ १५ ॥ परमसं-
पन्नपरमार्था । अनाथनाथ श्रीसमर्था । कृतार्थपरंपरा निगमार्था । प्रबोध-
विसी ॥ १६ ॥ हृदयविबोधकसाक्षरें । रहस्यबीज अनाक्षरें । अक्षरब्र-
ह्मगतिनिर्धारें । कृतार्थ करिसी ॥ १७ ॥ महावाक्य प्रणवपर ।
सच्चित्सुख अभ्यंतर । अबोधस्वयंभसाक्षात्कार । तुझेनि समर्था ॥१८॥
अभिरामजगदभ्यंतर । शिवहृदयांबुजरससार । प्रबोधामृतधाराधर ।
वर्षसी सुखें ॥ १९ ॥ पुरार्जितसुकृतसिद्धी । विज्ञानवैराग्यउपलब्धी ।
निरतिशय निरवधी । दयासंपन्नमूर्ती ॥ २० ॥ मुमुक्षुचातकतृषा
वारी । सद्भावचकोरामृतसुधाकरी । निववीलें हृदय परोपरी । अभि-
वंदन तुतें ॥ २१ ॥ षड्गुणऐश्वर्य भगवान । पुढती तुज अभिवंदन ।
सर्वदा कृपावलोकन । ईक्षणें तारीं ॥ २२ ॥ अभिवदनी बोळला
समर्थ । कृपेनें केलेंचि कृतार्थ । पुढती प्रशंसूनि परमार्थ । उजळणी
करी ॥ २३ ॥ बोधांचे शिखर निवृत्ति । स्वरूपीं नसेचि कांहीं प्रवृत्ति ।
वस्तु प्रत्यक्ष सर्वार्थी । व्यापकपणें ॥ २४ ॥ बोधबोधकग्राहिक । कारण
नसेचि निश्चयात्मक । हा निज अतरींचा विवेक । चळों नेदीं ॥ २५ ॥
मिथ्याप्रारब्ध सत्सगती । उपासनाक्रमविशारदमूर्ति । सर्वहृदयस्थदाश-

---

१ आत्मस्वरूपी पृथ्वीवर स्थिर झालेला. २ आत्मस्वरूपीं दक्षता हा च तुरा खोंवून. ३ नौका. ४ ज्ञान देणाऱ्या अक्षरानीं म्हणजे उपदेशानें. ५ अडाणी माणसें. यात अक्षर शब्दावर कोटी आहे. अनाक्षरांना अक्षर ब्रह्माचें ज्ञान देऊन कृतार्थ करितो. ६ मेघ. ७ खाण. ८ पाणी. ९ चंद्रिमा, चांदणें. १० ज्ञानाचा शेवट म्हणजे निवृत्ति होय.

निजनिर्वाडें । उपरमल्या वृत्ती ॥ ४३ ॥ ध्यानदृष्टीस समर्थमूर्ति । होय सहजचि भवनिवृत्ति । तटस्थवेध ब्रह्मप्रतीति । समर्थदर्शनें ॥ ४४ ॥ तोपलेन सद्भक्तीनिर्धारें । स्वरूपानुभवमहागजरें । स्वयंभसमारंभनिर्धारें । स्वानंद रूढला ॥ ४५ ॥ नानासंगीत सुस्वरें । वाद्यें वाजती सुखनिर्भरें । भेरी दुंदुभी नगारे । कर्णे तुतारे सनया ॥ ४६ ॥ घांटा जे गेटें मृदंग टाळ । गाती हरिदास प्रेमळ । महासभासद सकळ । आरती उभे ठाकले ॥ ४७ ॥ दशांगपैरिमळपरवडी । धूपारती महा प्रौढी । उजळलें एकारत आवडी । एकनिष्ठेची ॥ ४८ ॥ महानैवेद्य अमृतसित्धी । परिपक्वफळें भावत्रिशुत्धी । भोजन जाहलें प्रसित्धी । राजोपचारें ॥ ४९ ॥ समर्थपंक्तीसि अनुक्रमें । सित्ध साधू ऋषी सप्रेमें । जाहलीं भोजनें निस्तनेमें । यथोचितभावें ॥ ५० ॥ पुन्हा परिशुत्धसिंहासनीं । पूजनविधी अलंकरणी । साधुसज्जन सन्मानी । अर्चिले सर्व ॥ ५१ ॥ महाआरत उजळलें । स्तवन अंतर्भावें जालें । अभिवंदन केलें । अष्टांगभावें ॥ ५२ ॥ पुढती करूनियां नमन । मागीतलें आश्वासन । तें आठवितांचि दर्शन । द्यावें अंतरस्थितीनें ॥ ५३ ॥ परमकृपाळ सदयहृदय । माथां कर ठेऊनि कृपान्वयें । दिल्हें वरदान अभय । मनोरथसित्धीनें ॥ ५४ ॥ मागुतेन कृपेनें श्रवणीं । रहस्य सांगीतलें समर्थांनीं । जें सर्वस्वें ओंजेवीं भजनीं । कोदंडपाणिविग्रह ॥ ५५ ॥ जें का ध्येय सदाशिवाचें । परम जाप्य जापकाचें । सित्धसाधुऋषींचें । आराध्यदैवत ॥५६॥ जें निजजीवन जीवांचें । जें हृदय सर्व निगमाचें । जें कुळदैवत विरक्तांचें । आर्जेवीं तया ॥ ५७ ॥ परम पवित्र अवतार चरित्र । परत्रगतीचें सत्क्षेत्र । स्वयंभसाक्षात्कारी स्वतंत्र । न विसंबें तयासी ॥ ५८ ॥ रामा ऐसें दैवत कैंचें । अवतरलें सभाग्य सृष्टीचे । नाम चरित्र विद्यार्तीचें । पावन अधिदैवत ॥ ५९ ॥ नलगे तत्वशोधन । न करणें अध्यात्मविवरण । सर्वदा

१ आत्मनिश्चयाच्या योगानें. २ वाळूच्या घड्याळाच्या आकाराचा डमरू. ३ दहा प्रकारच्या सुवासिक द्रव्यांनीं. ४ कीं. ५ उपासना कर. ६ श्रीरामाची मूर्ति.

करीं रामध्यान । सगद्गदीत मानसें ॥ ६० ॥ राम घननीळ सांवळा । सकळप्राप्तीचा जिव्हाळा । राहे जयाच्या ध्यानडोळां । तोचि कृतार्थ ॥ ६१ ॥ सद्भावें श्रीरामस्मरण । करील तोचि ज्ञानी पावन । काय करावें तें ब्रह्मज्ञान । रामीं प्रेम नसतां ॥ ६२ ॥ ऐसें समर्थे संबोधनीं । दृढाविलें रामभजनीं । जैसें अर्भकासि जननी । क्षणक्षणां सिकवी ॥ ६३ ॥ सकळभक्तांचा कळवळा । सदयसमर्थाची लीळा । येकात्मतेचा जिव्हाळा । जीवापासूनि सांगणें ॥ ६४ ॥ ऐसा समर्थ माझा उदार । जिवीं जडला निरंतर । लागला समर्थवेध निर्धार । येणेंचि सभाग्य आह्मीं ॥ ६५ ॥ परमगुरुचें स्मरण । सगद्गदीत जिवें होय ध्यान । प्राप्तीची निजप्राप्ति संपूर्ण । स्वामीच्याचि आठवें ॥६६॥ समर्थ माझी गतीची निजगती । समर्थ माझी प्रतीतीची प्रतीति । समर्थ विश्रांतीची विश्रांति । जोडली मज ॥ ६७ ॥ समर्थ माझी तारक जननी । समर्थ ज्ञानसंजीवनी । समर्थनिजकृपेची खाणी । अवचट लाधलों ॥ ६८ ॥ समर्थ माझी अमृतवाहिनी । समर्थ माझी स्वानंदभरणी । समर्थ उन्मनीची निजउन्मनी । मज प्रत्यक्ष जाली ॥ ६९ ॥ समर्थ कैवल्याची धरणी । समर्थलीळा अकैळ करणी । साच समर्थचरित्र श्रवणीं । चाकाटलें चित्त ॥ ७० ॥ समर्थवचनें चित्त चमत्कारे । समर्थविरक्तीनें विरक्ति भरे । समर्थविख्यातीनें अवतरे । निजांगीं उद्बोध ॥ ७१ ॥ समर्थासि प्रशंसितां कोणी । मज्जे मन सुखाब्धिजीवनीं । समर्थमूळपुरुषस्तवनीं । आदरेंचि प्रवर्ते ॥ ७२ ॥ समर्थ मज संकटीं सोडविता । समर्थ पावे मज आठवितां । समर्थावांचूनि सर्वथा । इतर गती असेना ॥ ७३ ॥ निजध्यास निश्चयेंसीं । वसोनि नित्य समर्थापासीं । असतां समर्थ सहवासी । माग्यासि काय उणें ॥ ७४ ॥ समर्थ तोचि अनंतमौनी । परमगुरु गुरुस्थानी । मेरू दंडवत लोटांगणीं । सद्भावें चरणीं रुळतसे ॥ ७५ ॥ समर्थाचें चरित्रकथन । करी पात्र-

१ अंतःकरणपूर्वक. २ निश्चयानें. ३ अमृताची नदी. ४ न कळण्यासारखी. ५ चटक लागली. ६ बुडे. ७ आनंदसागरांत. ८ ग्रन्थकार मेरु स्वामी.

नासी पावन । मायानिवर्तक ज्ञान । समर्थकृपेचें ॥ ७६ ॥ माया-शर्वरी वोहटली । विवेकपाहाट फुटली । आत्मरवितेजें धवळली । दिशा दश सोज्वळ ॥ ७७ ॥ बोधतमांतकमंडळ । उदेलें स्वयंभ हृदयीं निर्मळ । विज्ञानप्रभेनें झळाळ । अनंतरश्मी ॥ ७८ ॥ भावहृदया-द्रीवरूनि । ज्ञेयचिदंबर घेऊनि । आला विज्ञान अनुसंधानीं । मूळ अस्ताचला ॥ ७९ ॥ हृदय सदोदित पाताळीं । अखंडमंडळ अंत-राळीं । उदयअस्तवीण झळाळी । प्रभा दिनकराची ॥ ८० ॥ प्रकाश ना तो अंधकार । स्वरूपावरी अगोचर । समर्थबोध सूर्य साचार । पवाडलों ॥ ८१ ॥ नाहीं स्वरूपासि पारावार । बोध अभिन्न साक्षात्कार । अभेदस्वरूपें निर्धार । समर्थबोधरवि ॥ ८२ ॥ द्वैताद्वैतभाव न साहे । प्रतीतीचें प्रमाण न राहे । ते अभिन्नअनुभवाचें स्वयें सूर्यमंडळ ॥ ८३ ॥ अनुभवें सूर्यसमान । समर्थ स्वयंभ चिद्गगन । समर्थकृपेनें अनुसंधान । फावलें मज ॥ ८४ ॥ जन्मँमूळ निजमूळासि भेटलें । सैंधवें सिंधूसि मिळालें । ज्ञानवन्हीसि दिधलें । क्षेमभाव कर्पुरें ॥ ८५ ॥ सुमनसुवास प्रीती । मिळाला गगन स्वस्थिती । स्वानंदसमुद्राप्रती । वर्षला सुखैकघन ॥ ८६ ॥ प्रमाण प्रतीतीचीं द्वारें । समर्थांच्या आठवनिर्धारें । मिळालीं समर्थांच चमत्कारें । जेंवि सरिता सागरीं ॥ ८७ ॥ आता प्रवृत्तीसि नसे चि ठाव । निवृत्तीसि नसे चि भाव । स्वभावसिद्ध निरावेव । हे ही स्फूर्ति नसे ॥ ८८ ॥ नसेचि प्रारब्धबोधवुद्धी । नसेचि समाधिस्थ समाधि । नसेचि स्मरण ना त्रिशुद्धी । ना विस्मरण ॥ ८९ ॥ कोण जन्मला होता कैचा । कोणासि संसारबंध मुळींचा । कोठील कवण मुक्तीचा । लाभ घेतला कवणें ॥ ९० ॥ कवण विस्मयासि कारण । कवण उमजला आप-आपण । सद्गुरूकृपेनें विमोचन । कवणाचें जालें ॥ ९१ ॥ उपरमें वृत्तीनें साचार । कवणासि उपदेशिलें अभ्यंतर । कवण निवळोन

१ रात्र. २ ज्ञानसूर्याचें बिंब. ३ भक्तिरूप उदयाचलावरून. ४ ब्रह्मरूप आकाश आक्रमून. ५ प्रवेशला. ६ ज्ञानरूप आकाश. ७ जीव. ८ ब्रह्माला. ९ मीठ.

आपपर । परता जाला ॥ ९२ ॥ कवणासि जाला होता विकार । कव-णाचें स्वरूप निर्विकार । कवणासि 'जाला साक्षात्कार । कवणे परी ॥ ९३ ॥ संकल्पेंवीण कवण । बरळला इतुकें निष्कारण । कवणाचा परिहार जाणोन । कवणें केला ॥ ९४ ॥ कवण निःशेष जागा जाला । कवण मौनी वाचेसि आला । कवण कैंचा काय जाला । काय कीं नकळे ॥ ९५ ॥ कवणाची धारणा बुडाली । कवणाची आदि विघ-डली । कवणाची शुध्दि उडाली । पुसता कवण ॥ ९६ ॥ न कळे ऐसें हें अभिनव । कळला पाहिजे अंतर्भाव । परमगुरूचा अनुभव । ऐशे प्रकारीं ॥ ९७ ॥ परमगुरूचें अनुसंधान । स्वयें सद्गुरू तोचि आपण । आक्षेपनिवृत्ति निरूपण । द्वितीयरुद्रीं ॥ ९८ ॥ माया अविवेचें विदोण । जनासि वाटे हें गहन । जेंवि गर्भांधाचें ज्ञान । रत्नपरिक्षेसी ॥ ९९ ॥ सद्गुरूसूर्यप्रभा संपूर्ण । गर्भांधासि दृष्टि देऊन । चिद्रत्नप-रिक्षा सज्ञान । केलें श्रीअनंतें ॥ १०० ॥ प्रथमरुद्रीं अनुसंधान । मंगळाचरण गणेशवंदन । सरस्वतीसद्गुरूसज्जन । स्तवनपंचरत्नें ॥ १०१ ॥ उपरि समर्थचरित्र विख्याति । षड्गुणैश्वर्यसंपत्ती । स्तव-नपट्कविश्रांति । जाली परम ॥ २ ॥ मूळपुरुषसमर्थदयेनें । परंप-रेसी कारण उपदेशानें । चालिला अनुग्रह प्रतीतीनें । प्रबोधरीती ॥ ३ ॥ महानुभाव महास्थिती । निजात्मबोध अतिप्रीती । अव-धानें पुढती पुढतीं । ग्रंथाभिवृत्ति कीजे ॥ ४ ॥ तुह्मी दयासंपन्न सनातन । सर्वभूतीं कृपा समान । सुखप्रतीतीनें संपूर्ण । सृष्टीसि तोषवा ॥ ५ ॥ त्याचि अर्थे कृपा संपूर्ण । वक्तेचि परि तुह्मी श्रोते होऊन । अवधारा अवधान देऊन । बोल अरुंधतीचे ॥ ६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । समर्थअर्चनीं तोष आगळा । ह्मणे मेरूअनंत ॥ १०७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ६ ॥
प्रथमरुद्र १ एकादशउल्लास ११ संपूर्ण ॥ ॥ ॥ ॥
येकूण रुद्र १॥ उल्लास ११॥ वोव्या ९५४ श्लोक १॥ ॥ ७ ॥

---

१ कौतुक, आश्चर्य, २ अनंतमौनीनें. ३ अडाण्याचे, अज्ञान बुद्धीच्या मासे.

# रुद्र २ रा



श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः । श्रीरामं परमानंदमुपदेष्टारमीश्वरं। व्यापकं सर्वलोकाना कारण तं नमाम्यहं ॥ १ ॥

श्रीरामसमर्थ जगन्मगळ। जगदात्मा निजमूळ। जगदाद्य जगन्मूळ। निर्मूळकर्ता ॥ १ ॥ जगत्पावन अनादिसिद्ध। जगद्रूप स्वतःसिद्ध। जगदोद्धरण प्रसिद्ध। जगन्निवास ॥ २ ॥ जगदातर जगज्जीवन। जगद्गुरु जगदाभरण। जगत्पालन करुणाघन। जगद्बधनहर्ता ॥ ३ ॥ जगन्नायक जगजागर। जगन्मोहकपरिहार। जगप्रकृतीचा संसार। बोधें निवारी ॥ ४ ॥ नाटकलाघवी माया। जिणें भुलविलें जगत्रया। जगज्जाळ रचूनिया। खेळे लीळा ॥ ५ ॥ लक्ष चौरयासी पर[1]वडी। रची सकलपउतर[2]डी। काढी घाली घडमोडी। किती होतसे ॥ ६ ॥ ऐसी ते परम लाघवी। स्नेह लाउनि प्रमादें गोवी। जीवींचि जीवासि संभवी। अभिनव लीळा ॥ ७ ॥ जियेचे वस्तीचें स्थळ। असे सोंळ-माळ विशाळ। स्वइछेनें क्रीडाकल्लोळ। करितसे ॥ ८ ॥ आकाश असता सुनिश्चळ। सावकाशेंचि त्या विशाळ। व्यापकपणें चळवळ। तितुकी वायोची ॥ ९ ॥ पाहता स्वरूप तें निर्मळ। न साहे भावनेचा मळ। अभ्यतर न घेता अमूळ। विस्तारली ॥ १० ॥ जैसी वल्ली अतराळीं। मुळेंवीन वृक्ष पाहेंळी। पैसावली तैसी कंकाळी। अचंचळीं त्या ॥ ११ ॥ निरावकाश संपूर्ण। ब्रह्मस्फूर्तीसि पैसांवि हीन। अग्र पश्चात काहीं नसोन। निरावकाशें ॥ १२ ॥ निरावकाशें प्रवेश नाहीं। सावकाशें त्याची ठाई। ठाव करूनि प्रवाहीं। पडिली इतुकी ॥ १३ ॥ जैसा येखादा भोळा। नृप चक्रवर्ती लीळा। तयाची अतुरी

---

१ प्रकार ( प्राणियोनांचे ) २ वासनाची कोठारें, ‹जण ( ? ) ३ लावच लाव. ४ झाडाला कवटाळते ( ? ) ५ ( ? ) माया. ६ परब्रह्मीं. ७ ( ? ) पसरी

सकळा । कळाप्रवीण ॥ १४ ॥ वल्लभसौभाग्यें अभंग । वर्तवी राष्ट्रींचा प्रसंग । तैसी निर्गुणींच हे निःसंग । रूढली बळें ॥ १५ ॥ स्वभावेंचि ते विदेही । इच्छया देह धरी सर्वही । नारी नपुंसकदेहीं । पुरुषता आणी ॥१६॥ वनितारूप अभ्यंतरीं । नाना सोंगें पुरुषाचीं धरी । विश्वरूपेंचि ते सुंदरी । प्रगटली कैसी ॥ १७ ॥ ब्रह्मादिकांसि न कळे कपट । इंद्र महींद्रजाळें उत्कट । पाहतां शिणले परिपाठ । डोळे सकळांचे ॥ १८ ॥ चाळिती तर्कांच्या प्रौढी । कळेची मायेची रूढी । जाणीव रूपेंचि धोंडी । घाली कल्पांतीच्या ॥ १९ ॥ नसोनि आस्तिक्यपण । करोनि निजवस्तीसी आपण । अस्तिनास्तिसंधी मोपर्ण । निर्माण केलें ॥ २० ॥ निरावकाशें उश्वास नसे । दाटिलें नित्यांपैसें । जाणीव प्रबळउश्वासें । अजपा होय ॥ २१ ॥ नाहीं आस्तिक्याची भावना । हेचि भार्यंळी विवंचना । अवघा अवकाश दाटोनि रसना । प्रणवें रूढली ॥ २२ ॥ चतवारखाणीवाणी निर्धार । जगन्मूळ जाणीवसार । ज्ञप्तिसुखा माजी विस्तार । स्वानंद तो ॥ २३ ॥ जगाचें मूळजाणीव बीज । स्वरूपज्ञानें भर्जितें सहज । साक्षात्कारें निर्बीज । निवृत्ति रूढली ॥ २४ ॥ स्वयंम सुवर्णाचे अलंकार । साच चि कर्ता तो घडणार । तेणेंचि कृत्रिमें केलिया साचार । परतें सारी ॥ २५ ॥ सोनपितळेचें सिंहासन । दिधलें करविलासी आश्चिर्य पूर्ण । सुवर्णाचें घेउन आपण । सुखी होऊं पाहे ॥ २६ ॥ तेवि मायेंत महाज्ञान । फडोविकडी असाधारण । भुलोनि जाय साधारण । प्रशंशितांची ॥ २७ ॥ साचार संत गुप्त स्थिती । असतांची प्रगट स्थिती । परिक्षुनि परिक्षावंतीं । सल्लाम

---

१ आंतून. २ गाढड. ३ (मायेची) घागणूक. ४ मोटमोठ्या तर्कशास्त्रज्ञांनां देखील मायेच्या खेळाचें आकलन होत नाहीं. ५ हमे. ६ अहंकार. अस्तित्व आणि नास्तित्व यांचा अहंकार हा दुवा आहे. ७ नित्य+अपरें (आपोआप). ८ (?) कल्पना करी. ९ जरायुज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज्ज या चार प्राणिकोटी; आणि परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी या चार वाचा यांचा निश्चय. १० मूळ संकल्प; मी पुष्कळ व्हावें (बहुस्यां प्रजायेय) अशा प्रकारचें स्फुरण. ११ भाजलेलें.

यावा ॥ २८ ॥ जरि मायेचें ब्रह्म अनुसरणें । तरि प्रवृत्ति नसे संसरण । लोभकार्या वरूनि कारण । माया मूळीचि दिसे ॥ २९ ॥ अवकाशीं नसेचि वारा । परि निरोधरूपें वायुपसारा । ज्ञान आस्तिक्याचा थारा । तेथेंचि असे ॥३०॥ स्थिरेंचि झडझडाटें वाजे । कोंतराचि काचे सहजें । तेणें वायू माजो सतेजें । वरुपतसे तोय ॥ ३१ ॥ निरंधन तेज बंबाळ । विबरूप विशाळ ज्वाळ । कल्लोळ धाविती अंतराळ । कवळित ते ॥ ३२ ॥ प्रकाशतोईं चनवांकेडी । चित्र विचित्र ज्वाळा प्रौढी । गगन भरूनि परवडी । तेज वरुपे ॥ ३३ ॥ प्रकाशजीवनाच्या गारा । विघरत द्रवती सरांरां । असंभावित तारा । गगनोदरीं ॥ ३४ ॥ संपूर्ण तोय तेज उभारा । भरला गगन गाभारा । असंभाव्य ते सैरा । प्रळय जळापरी ॥ ३५ ॥ ऐसें उष्ण तेज कोसळलें । तैसेंचि शित तेज स्रवलें । तें उष्णयोगें तापलें । अतिशयेंसीं ॥ ३६ ॥ कढों लागलेंसे उसळत । कडकडीत रस अद्भुत । तेथुनि तिडॅक्या फुटत । भास्करा ऐशा ॥ ३७ ॥ त्या परतोनि तेथ मिळती । कांहीं येक अवकाश स्थिती । त्रिवीच सजीव होती । द्वादशादित्य ते ॥ ३८ ॥ अभिनवचंद्रसंभव । प्रकाशतोय आळेलें सजीव । ते मंडळाकारें सदैव । प्रवृत्तीसि आलें ॥३९॥ कडकडीत कढतां जळ । आटोनि जाला अवघा गाळ । सर्तामुसेसि भूगोल । विस्तारला ॥ ४० ॥ अपूर्व मायेचें चरित्र । येकेक ब्रह्मांड अैसेंपात्र । अनंत ब्रह्मांडें विचित्र । उतरडी केल्या ॥४१॥ आश्चर्य मायेचें फरणें । लटकियानें साचा आणिलें उणें । वंध्या पुत्राचें करणें । स्त्रप्नीचें आश्चर्य ॥ ४२ ॥ कांहींच असेना जेथें । सर्व निर्माण केलें तेथें । महा बळीवंत सामर्थ्यें । अघटीत घडी ॥४३॥ केव्हडी मायेची बाजिगीरी । सत्य लोपोनि सर्वापरी । नानाविकारें उभारी । असत्यासी ॥ ४४ ॥ पराचें करी खुतर । तें वियाँ कळों ये साचार । माया गारुड अगोचर । ब्रह्मांदिकां न कळे ॥ ४५ ॥

---

१(१). २ मेघवर्षाव. वांकडी-वर्षाव. ३ पुनः, आणखी. ४ ठिणग्या. ५घट्ट झालें. ६ अस्तित्वरूप मुशींत. ७नवल मायेचें कर्तृपण (पाठांतर).८जादू. ९ज्ञानानें. ९

सकळा । कळाप्रवीण ॥ १४ ॥ वल्लभसौभाग्यें अभंग । वर्तवी राष्ट्रींचा प्रसंग । तैसी निर्गुणींच हे निःसंग । रूढली बळें ॥ १५ ॥ स्वभावेंचि ते विदेही । इछया देह धरी सर्वही । नारी नपुंसकदेहीं । पुरुषता आणी ॥१६॥ वनितारूप अभ्यंतरीं । नाना सोंगें पुरुषाचीं धरी । विश्वरूपेंचि ते सुंदरी । प्रगटली कैसी ॥ १७ ॥ ब्रह्मादिकांसि न कळे कपट । इंद्र महींद्रजाळें उत्कट । पाहतां शिणले परिपाठ । डोळे सकळांचे ॥ १८ ॥ चाळिती तर्कांच्या प्रौढी । कळेची मायेची रूढी । जाणीव रूपेंचि धोंडी । घाली कल्पांतीच्या ॥ १९ ॥ नसोनि आस्तिक्यपण । करोनि निजवस्तीसी आपण । अस्तिनास्तिसंधी मीपर्ण । निर्माण केलें ॥ २० ॥ निरावकाशें उश्वास नसे । दाटिलें नित्यार्पिसें । जाणीव प्रबळउश्वासें । अजपा होय ॥ २१ ॥ नाहीं आस्तिक्याची भावना । हेचि भावळी विवंचना । अवघा अवकाश दाटोनि रसना । प्रणवें रूढली ॥ २२ ॥ चतवारखाणीवाणी निर्धार । जगन्मूळ जाणीवसार । ज्ञप्तिसुखा माजी विस्तार । स्वानंद तो ॥ २३ ॥ जगाचें मूळजाणीव बीज । स्वरूपज्ञानें भर्जित सहज । साक्षात्कारें निर्बीज । निवृत्ति रूढली ॥ २४ ॥ स्वयंम सुवर्णाचे अलंकार । साच चि कर्ता तो घडणार । तेणेंचि कृत्रिमें केलिया साचार । परतें सारी ॥ २५ ॥ सोनपितळेचें सिंहासन । दिधलें करवित्यासी आश्चिर्य पूर्ण । सुवर्णाचें घेउन आपण। सुखी होऊं पाहे ॥ २६ ॥ तेवि मायेंत ब्रह्मज्ञान । कडोविकडी असाधारण । भुलोनि जाय साधारण । प्रशंशितांची ॥ २७ ॥ साचार संत गुप्त स्थिती । असतांची प्रगट स्थिती । परिक्षुनि परिक्षावंतीं । सह्याम

१ आंतून. २ गारुड. ३ (मायेची) चागणूक. ४ मोटमोठ्या तर्कशास्त्रज्ञांनां देखील मायेच्या खेळाचें आकलन होत नाही. ५ हले. ६ अहंकार. अस्तित्व आणि नास्तित्व यांचा अहंकार हा दुवा आहे. ७ नित्य+अर्पिसें (आपोआप). ८ (?) कल्पना करी. ९ जरायुज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज्ज या चार प्राणिकोटी; आणि परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी या चार वाचा यांचा निश्चय. १० मूळ संकल्प; मी पुष्कळ व्हावें (बहुस्यां प्रजायेय) अशा प्रकारचें स्फुरण. ११ भाजलेलें.

वाधा ॥ २८ ॥ जरि मायेचें ब्रह्म अनुसरणे । तरि प्रवृत्ति नसे संसरण । लोभकार्या वरूनि कारण । माया मूळीचि दिसे ॥ २९ ॥ अवकाशीं नसेचि वारा । परि निरोधरूपें वायुपसारा । ज्ञान आस्तिक्याचा थारा । तेथेंचि असे ॥३०॥ स्थिरेंचि झडझडाटें वाजे । फांतरा चि फाचे सहजें । तेणें वायू माजी सतेजें । घरपतसे तोय ॥ ३१ ॥ निरंधन तेज वंब्राळ । मित्ररूप विशाळ ज्वाळ । कल्लोळ धाविती अंतराळ । कवळित ते ॥ ३२ ॥ प्रकाशतोई घनवांकेंडी । चित्र विचित्र ज्वाळा प्रौढी । गगन भरूनि परवडी । तेज वस्पे ॥ ३३ ॥ प्रकाशजीवनाच्या गारा । विघरत द्रवती सरारां । असंभावित तारा । गगनोदरीं ॥ ३४ ॥ संपूर्ण तोय तेज उभारा । भरला गगन गाभारा । असंभाव्य ते सैरा । प्रळय जळापरीं ॥ ३५ ॥ ऐसें उष्ण तेज फोसळलें । तैसेंचि शित तेज स्रवलें । तें उष्णयोगें तापलें । अतिशयेंसीं ॥ ३६ ॥ कढों लागलेंसे उसळत । कडकडीत रस अद्भुत । तेथुनि तिडक्या फुटत । भास्करा ऐशा ॥ ३७ ॥ त्या परतोनि तेथ मिळती । कांहीं येक अवकाश स्थिती । त्रिप्रीच सजीव होती । द्वादशादित्य ते ॥ ३८ ॥ अभिनवचंद्रसंभव । प्रकाशतोय आळेलें सजीव । ते मंडळाकारें सदैव । प्रवृत्तीसि आले ॥३९॥ कडकडीत कढतां जळ । आटोनि जाला अवघा गाळ । सर्च्चामुसेसि भूगोल । विस्तारला ॥ ४० ॥ अपूर्व मायेचें चरित्र । येकेक ब्रह्मांड ऐसेंपात्र । अनंत ब्रह्मांडें विचित्र । उतरडी केल्या ॥४१॥ आश्चर्य मायेचें करणें । लटकियानें साचा आणिलें उणें । वंध्या पुत्राचें करणें । स्वप्नींचें आश्चर्य ॥ ४२ ॥ काहींच असेना जेथें । सर्व निर्माण केलें तेथें । महा बळीवंत सामर्थ्यें । अघटीत घडी ॥४३॥ केव्हडी मायेची बाजिगीरी । सत्य लोपोनि सर्वांपरी । नानाविकारें उभारी । असत्यासी ॥ ४४ ॥ परार्चे करी खुतर । तें वियीं काळीं ये साचार । माया गारुड अगोचर । ब्रह्मांदिकां न कळे ॥ ४५ ॥

---

१(१). २ मेघवर्षाव. घाकडी-वर्षाव. ३ पुन', आणखी. ४ ठिणग्या. ५घट्ट झालें. ६ अस्तित्वरूप मुर्शीत. ७नवल मायेचें कर्तृपण (पाठांतर).८जादू. ९ज्ञानानें. ९

सकळा । कळाप्रवीण ॥ १४ ॥ वल्लभसौभाग्यें अभंग । वर्तवी राष्ट्रींचा प्रसंग । तैसी निर्गुणींच हे निःसंग । रूढली वळें ॥ १५ ॥ स्वभावेंचि ते विदेही । इछया देह धरी सर्वही । नारी नपुंसकदेहीं । पुरुषता आणी ॥१६॥ वनितारूप अभ्यंतरीं । नाना सोंगें पुरुषाचीं धरी । विश्वरूपेंचि ते सुंदरी । प्रगटली कैसी ॥ १७ ॥ ब्रह्मादिकांसि न कळे कपट । इंद्र महींद्रजाळें उत्कट । पाहतां शिणले परिपाठ । डोळे सकळांचे ॥ १८ ॥ चाळिती तर्कांच्या प्रौढी । कळेची मायेची रूढी । जाणीव रूपेंचि धोंडी । घाली कल्पांतींच्या ॥ १९ ॥ नसोनि आस्तिक्यपण । करोनि निजवस्तीसी आपण । अस्तिनास्तिसंधी मीपर्ण । निर्माण केलें ॥ २० ॥ निरावकाशें उश्वास नसे । दाटिलें नित्यापैसें । जाणीव प्रबळउश्वासें । अजपा होय ॥ २१ ॥ नाहीं आस्तिक्याची भावना । हेचि भावंळी विवंचना । अवघा अवकाश दाटोनि रसना । प्रणवें रूढली ॥ २२ ॥ चतवारखाणीवाणी निर्धार । जगन्मूळ जाणीवसार । ज्ञतिसुखा माजी विस्तार । स्वानंद तो ॥ २३ ॥ जगाचें मूळजाणीव बीज । स्वरूपज्ञानें भर्जित सहज । साक्षात्कारें निर्बीज । निवृत्ति रूढली ॥ २४ ॥ स्वयंम सुवर्णाचे अलंकार । साच चि कर्ता तो घडणार । तेणेंचि कृत्रिमें केलिया साचार । परतें सारी ॥ २५ ॥ सोनपितळेचें सिंहासन । दिधलें करविलासी आश्चिर्य पूर्ण । सुवर्णाचें घेउन आपण । सुखी होऊं पाहे ॥ २६ ॥ तेवि मायेंत ब्रह्मज्ञान । कडोविकडी असाधारण । भुलोनि जाय साधारण । प्रशंसितांची ॥ २७ ॥ साचार संत गुप्त स्थिती । असतांची प्रगट स्थिती । परिक्षुनि परिक्षावंतां । सद्धाम

१ आंतून. २ गाढ. ३ (मायेची) वागणूक. ४ मोठमोठ्या तर्कशास्त्रज्ञांनां देखील मायेच्या खेळाचें आकलन होत नाहीं. ५ हले. ६ अहंकार. अस्तित्व आणि नास्तित्व यांचा अहंकार हा दुवा आहे. ७ नित्य+अपैसें (आपोआप). ८ (?) कल्पना करी. ९ जरायुज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज्ज या चार प्राणिकोटी; आणि परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी या चार वाचा यांचा निश्चय. १० मूळ संकल्प; मी पुष्कळ व्हावें (बहुस्यां प्रजायेय) अशा प्रकारचें स्फुरण. ११ भाजलेलें.

यावा ॥ २८ ॥ जरि मायेचें ब्रह्म अनुसरणे । तरि प्रवृत्ति नसे संसरण । क्षोभकार्या वरूनि कारण । माया मूळीचि दिसे ॥ २९ ॥ अवकाशीं नसेचि वारा । परि निरोधरूपें वायुपसारा । ज्ञान आस्तिक्याचा थारा । तेथेंचि असे ॥३०॥ स्थिरेंचि झडझडाटें वाजे । फांतराचि फाचे सहजें । तेणें वायू माजो सतेजें । वरुपतसे तोय ॥ ३१ ॥ निरंधन तेज बंबाळ । बिंबरूप विशाळ ज्वाळ । कल्लोळ धावित्ती अंतराळ । कवळित ते ॥ ३२ ॥ प्रकाशतोईं वनवांकेडी । चित्रविचित्र ज्वाळा प्रौढी । गगन भरूनि परवडी । तेज वर्षे ॥ ३३ ॥ प्रकाशजीवनाच्या गारा । विघरत द्रवती सरारां । असंभावित तारा । गगनोदरीं ॥ ३४ ॥ संपूर्ण तोय तेज उभारा । भरला गगन गाभारा । असंभाव्य ते सैरा । प्रळय जळापरी ॥ ३५ ॥ ऐसें उष्ण तेज कोसळलें । तैसेंचि शित तेज स्रवलें । तें उष्णयोगें तापलें । अतिशयेंसीं ॥ ३६ ॥ कढों लागलेंसे उसळत । कडफडीत रस अद्भुत । तेथुनि तिर्डक्या फुटत । भास्करा ऐशा ॥ ३७ ॥ त्या परतोनि तेथ मिळती । कांहीं येक अवकाश स्थिती । बिंबीच सजीव होती । द्वादशादित्य ते ॥ ३८ ॥ अभिनवचंद्रसंभव । प्रकाशतोय आळेलें सजीव । ते मंडळाकारें सदैव । प्रवृत्तीसि आलें ॥३९॥ फडफडीत कढतां जळ । आटोनि जाला अवघा गाळ । सर्वांमुसेसि भूगोल । विस्तारला ॥ ४० ॥ अपूर्व मायेचें चरित्र । येकेक ब्रह्मांड ऐसेंपात्र । अनंत ब्रह्मांडें विचित्र । उतरडी केल्या ॥४१॥ आश्चर्य मायेचें करणें । लटकियानें साचा आणिलें उणें । वंध्या पुत्राचें करणें । स्वप्नीचें आश्चर्य ॥ ४२ ॥ कांहींच असेना जेथें । सर्व निर्माण केलें तेथें । महा बळीवंत सामर्थ्यें । अघटीत घडी ॥४३॥ केन्हडी मायेची बाजिगीरी । सत्य लोपोनि सर्वांपरी । नानाविकारें उभारी । असत्यासी ॥ ४४ ॥ पराचें करी खुतर । तें विदाँ कळों ये साचार । माया गारुड अगोचर । ब्रह्मांदिकां न कळे ॥ ४५ ॥

१(?). २ मेघवर्षाव. वांकडी–वर्षाव. ३ पुनः, आणखी. ४ ठिणग्या. ५घट झाले. ६ अस्तित्वरूप मुशींत. ७नवल मायेचें कर्तृपण (पाठांतर).८जादू. ९ज्ञानानें.

सत्य दृष्टीसी भारूनि पुरी । दावी असत्य बोडंबरी । हरिहरासी पिसें करी । तेथ जीवासी कोण पुसे ॥ ४६ ॥ शिवादिकांसी गोवी माया । केवी जीवें निस्तरीजे तिया । कैचें स्वरूप कैची तया । निज विश्रांती ॥ ४७ ॥ घालूनि महाभ्रम प्रावर्ण । अळ्यादिकें निरावर्ण । भरण भरी नानावर्ण । जगडंबर ॥ ४८ ॥ नवलाची अपूर्वता । नसोनि पूर्वापर तत्वता । जीव शीव अक्षोभता । क्षोभ दावी ॥ ४९ ॥ न करी नेणें अनिछे जे । तया चि वरी सर्व उमजें । विस्तारीत सहजें । दृश्य रचना ॥५०॥ असोनि नुमसे सर्वा ठाईं । बाळठ रचोनि त्याचि अतिशई । साक्षत्व प्रातिपादि प्रवाहीं । तयासी घाली ॥ ५१ ॥ भौंरी उपचारी सावरी । अंतरीं विहारी तारी सारी । सिंतरीं हारी मारी वारी । भरी भर्णें ॥ ५२ ॥ जडवी कढवी घडवी । चढवी पडवी रडवी । दडवी अडवी बुडवी । नानाविध ॥ ५३ ॥ नाना दुस्तर दुःख आवर्त । नाना प्रमादाचे प्रर्वर्त । नाना प्रकारीचे विवेर्त । रूढवी तेथ ॥ ५४ ॥ नानासुखें आनंदवित । नाना उन्मा दरसें द्रावित । नाना प्रमाद प्रवर्तवित । स्वयेंचि सैरा ॥ ५५ ॥ भांडवी मत्सरें कल्होळवी । परस्परें तिरस्कार दाखवी । शत्रु मित्रत्वें भावी । आपपर सर्वत्र ॥ ५६ ॥ अकाळ द्वंद्वासि पेटवी । नाना नटनाट्य उठवी । नाना ऐश्वर्य पाठवी । कटाक्ष हाव भाव ॥ ५७ ॥ डोळस करूनि आंधळें । दावी सृष्टीसी ठिसाळें । अभिनव कळा खेळ खेळें । दुर्जन विण ॥ ५८ ॥ आप आपणासी सिंतरी । होडनि भर्तार आणि अंतुरी । भूत लावुनियां मंतरी । महा मोहक ॥ ५९ ॥ मिथ्या पुरुपार्थ वर्तवी । सत्य पराभवें प्रवर्तवी । मायाअभ्र चिंद्रवी । करि निस्तेज ॥ ६० ॥ ऐसें कांहीं येक संसर्गी । प्रसंग करूनि असंसर्गी । सर्ग स्थित्यंत विसर्गी । दृष्टिबंधन ॥ ६१ ॥ खराच्यां उदरासी खोटें ये । खरेंचि तें मरोनियां

१ इंद्रजाल, जादू. २ पांघरूण. ३ मोह घाली. ४ चुकवी. ५ फसवी. ६ उत्तेजनः देई. ७ भोंवरा. ८ प्रवृत्ति. ९ भ्रम. १० ज्ञानरूप सूर्याला. ११ रान्याच्या.

जाय । असें विपरितचि होय । सुपरिता परी ॥ ६२ ॥ भ्रमातिशय-माया । जयाच्या स्मरणेंचि जाय लया । आठऊं आतां तया । सद्गुरू स्वामीसी ॥ ६३ ॥ अजन्मीं जन्मबंधन । अकर्मी कर्मकारण । अमूळीं मूळस्फुरण । निवर्तविलें ॥ ६४ ॥ निर्विकारों सर्व विकार । परात्परीं, पराविस्तार । निर्विकल्पीं सर्व संस्कार । निर्मूळ केला ॥ ६५ ॥ काळ नसोनि काळ भासला । त्रिकाळ अकाळीं सरला । स्वरूपासीं जाहला । स्वरूपलाभ ॥ ६६ ॥ मायेनें आस्तिक्यासि आणिलें । तेणें चि प्रकृतीसी परिहारिलें । उभयवृत्तीरहित दिल्हें । समाधान स्वामीनें ॥६७॥ निज अनुसंधानें परतोनियां । पाहतां प्रचितीनें हृदया । असे वस्तुमात्र माया । कैंचि तेथ ॥ ६८ ॥ ब्रह्म सहज निर्विकार । मिथ्या मायेचा विकार । साच लटिकें स्वप्नाकार । असे चि ना तेथ ॥ ६९ ॥ माया ब्रह्म द्वैताद्वैत । हें अवघेंचि कल्पनाजात । ब्रह्मासि ब्रह्म अवभासत । तरि तेंचि ते माया ॥ ७० ॥ या कारणें मायाविवर्जित । नाहीं प्रवृत्तिसी अनुप्रवर्त । वेदांतसिद्धांतें विवर्त । परिहारिला ॥ ७१ ॥ सद्गुरुस्वामीची लीला । मुळींचि वारूनि जन्ममूला । भेदासी न येतां जिव्हाळा । दिल्हा स्वरूपाचा ॥ ७२ ॥ त्रिपुटीस नसतां ठाव । दिल्हा स्वरूपाचा अनुभव । सद्गुरूचें हें अभिनव । न कळे कोण्हा ॥ ७३ ॥ सद्गुरूकृपा युक्तीसि न कळे । सद्गुरूदीक्षा तर्कासि नाकळे । सद्गुरूदया आकळे । केवळभाविका ॥ ७४ ॥ सद्गुरूदयेनें चि पूर्ण । सद्गुरूकृपा कळे निर्वाण । जैसें ज्ञानेंचि निजविज्ञान । प्रत्ययासि ये ॥ ७५ ॥ सोडविलें मायेपासून । त्या सद्गुरूचें महिमान । देउनिया अवधान । अवधारिजे श्रोतीं ॥ ७६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरु कृपेचा जिव्हाळा । मायेचा महिमा निवळा । ह्मणे मेरू अनंत ॥ ७७ ॥ द्वितीय रुद्र प्रथम उल्लास ॥ १ ॥

---

१ सरळ, सन्मासारखें.

श्रीरामकर्ता ॥ श्रीरामसमर्थ गुरु आया । भवनिवर्तक वेदांतवेद्या । तुझी कृपा प्रबळ सुविद्या । बोळली मज ॥ १ ॥ भवरोगशमनसंजीवनीं । स्वरूपसाक्षात्कारउन्मनीं । अक्षयानंदसदनीं । ठेविलें सुखें ॥ २ ॥ नसेचि मायेचा विकल्पवारा । ऐसिया स्वरूपीं दिधला थारा । सुप्रसन्न दयेच्या दातारा । महिमा अभिनव ॥ ३ ॥ तुझे कृपेचें महिमान । स्मरण करितां होय ज्ञान । स्वप्नींही नुरे भवभान । तुझीया दासासी ॥ ४ ॥ तुझा अनुग्रह अभयंकर । तेथ विश्रांतीसि ये साक्षात्कार । विकल्पेंसी संसार । देशधडी होय ॥ ५ ॥ जन्ममरणभवसंस्कार । धाकेंचि होय निर्विकार । समूळवासनाविस्तार । पळोनि जाय दूरी ॥ ६ ॥ माया मोह भव तिरस्कार । होय खपुष्पाऐसा विस्तार । तुझा कटाक्ष अगोचर । उरों नेदि द्वैतासी ॥ ७ ॥ अभंग तुझे कृपेचें कवच । अक्षयसुखें करी साच । अपरोक्षदर्शनें मुळींच । मूळवृत्तीसी ये ॥ ८ ॥ गुरूपंचाननध्वनी दुर्धर । ऐकतांचि भवकुंजरें । उम्यांच प्राण सोडी निर्धार । तुझ्याचि निजध्यासें ॥ ९ ॥ गुरुकृपाज्ञानाग्नि प्रबळ । लागतां भवकर्पूर निर्मूळ । ना तो गुरुकृपार्क उजाळ । भवतमासी नुरवी ॥ १० ॥ ना ते गुरुकृपा अमृतपान । होतां नुरे भवरूप मरण । ना ते गुरुकृपा सुख संपन्न । भवदरिद्र नुरवी ॥ ११ ॥ गुरुकृपा परम पवित्र । तेथें कैंचा भव अपवित्र । गुरूदया स्वतंत्र परतंत्र । कांक्षाची नुरवी ॥ १२ ॥ गुरुकृपा सायोज्यविमान । वसवी स्वरूपसिद्धि चिद्गगन । गुरूदया स्वानंदउद्यान । सुखरूप वस्ती ॥ १३ ॥ गुरुकृपा शाश्वत सिंहासन । स्वराज्यसुखें सुखैक घन । स्वानुभविक नित्य नूतन । चिद्विलास होती ॥ १४ ॥ गुरुकृपा स्वानंदसुखघन । गुरूदया अढळ अधिष्ठान । अभंग प्रतिष्ठा संपूर्ण । स्वरूपता सुखें ॥ १५ ॥ स्थापूनि स्वरूपासिंहासनीं । सबाह्य स्वयेंचि वियमानीं । दीक्षासंरक्षण निंदानीं । परिपाळीतसे ॥ १६ ॥

---

१ सर्व प्रमांचद. २ गुरुरूप सिंहाची गर्जना. ३ संसाररूप हत्ती. ४ प्रकाश. ५ संकटसमयीं,

स्वानंदाच्या महागजरें । वेदनिजबोध मंगळतुरें । अनुभवदशा निजकरें । पट्टाभिषेक करी ॥ १७ ॥ विज्ञानामृतनिर्धारीं । कृपाभिषेक निरंतरी । केवळ अंतरंग उपचारी । अभंग दयेनें ॥ १८ ॥ देऊनि पूर्ण कृपांबर । समाधीसुख अगोचर । संपूर्णता निर्विकार । अलंकृत करी ॥ १९ ॥ अक्षय सुखेंचि घनवट । विस्तारूनि अनुभवताट । बोधपंचामृतें सुखें उत्कट । नित्य तृप्तीसि दे ॥ २० ॥ नित्यतृप्ति अखंडेंकरस । अर्थपरवडी स्वानंदसुरस । अर्थोपपत्तीनें ग्रास । घाली स्वकरें ॥ २१ ॥ ऐसें परमानंदपरिपालन । अक्षय स्वराज्य देऊन । कृपावात्सल्यें परिपूर्ण । आपुलें ह्मणवी ॥ २२ ॥ स्वरूपलावण्य अगोचर । विज्ञान सुवर्णशृंगार । प्रचीतीच्यां निजकरें साचार । अलंकृत केलें ॥२३॥ स्वानंदभद्रीं निरंतर । बैसविलें आस्तिक्य अगोचर । विजयश्री साचार । राज्यधर केलें ॥२४॥ अखंडतेचें अद्वैत छत्र । येक छत्रपती स्वतंत्र। निजविश्वास परत्र । मंत्री दिधला ॥ २५ ॥ स्वराज्य दिल्हियाचा कांहीं । फुंजे जयाचे ह्रदईं नाहीं । त्याचि प्रतीतीनें स्वामी पाहीं । ह्रदईं निर्विकल्प ॥ २६ ॥ सागरापरिस सखोल । गगनाचा अंतरभाव वोल । निज जिन्हाळा केवळ । ह्रदय स्वामीचें ॥ २७ ॥ परम औदार्याची कीर्ती । वर्णिती वेदादि आदिमूर्ती । जेथ राहिल्या सर्वप्रवृत्ती । निवृत्ति निश्चयें ॥ २८ ॥ आपुलेंचि स्वरूपदान । करी ऐसा सृष्टींत कवण । परम उदार सनातन गुरू चक्रवर्ती ॥ २९ ॥ सकळ कांहीं साधनें जोडे । सद्गुरूकृपा साधनें न जोडे । जेथ तर्क मंदावले बापुडे । जाहले अविवेकी ॥ ३० ॥ सद्गुरूचे प्रासीस्तव । मिथ्यादिकीं सांडुनि वैभव । उदास वीतरागें निर्भव । तपें आचरती ॥ ३१ ॥ सनका-

---

१ मंगळवाद्यें. २ कृपारूप वस्त्र. ३ आत्मप्रत्ययाच्या, साक्षात्काराच्या. ४ सिंहासनीं. ५ गर्व. ६ गुरुस्तवनदर्शनें साम्राज्याधिपतीचें ध्येय जें येथें सुचविलें तें किती थोर आहे पहा ! शिष्याला स्वराज्य देण्यापूर्वी तो त्याला पात्र झाला पाहिजे असें खरा चक्रवर्ती कधीं च ह्मणत नाहीं. तर आपल्या हातानें शिष्याला स्वराज्याधिष्ठित करून त्याचें कोणतेंही उणें न पाहतां त्याला आत्मप्रत्यय आणून स्वावलंबी करितो. हा सर्व च भाग विशेष मननीय आहे.

दिक गुरुविश्वासें । नित्यसमाधी निजध्यासें । ज्याचे प्राप्तीस्तव वेडेपिसे । होऊनि राहिले ॥ ३२ ॥ सिद्ध साधु महामुनि । वेदांतवेत्ते ब्रह्मज्ञानी । ब्रह्मऋषी वित्पंन्न[1] जनीं । अपेक्षिती गुरूकृपा ॥ ३३ ॥ त्रिकाळ वेत्रें[2] काळरहित । सद्गुरु प्राप्तीसि अखंडित । प्रांणवधारणा[3] ध्यानस्त । बैसले सर्वदा ॥ ३४ ॥ कपिलादि महासिद्ध । आत्मनिष्ठ योगी प्रसिद्ध । गुरुप्रसन्नतेनें स्वतःसिद्ध । विश्रांतीसि आले ॥ ३५ ॥ सद्गुरूप्रसन्नंते[4] कारणें । नाना पुरश्चरणें[5] धरणें । घेऊन बैसले साधनें । नाना हटयोग ॥३६॥ महा विरक्तीच्या बळें । होऊनि संसारीं मोकळें । भवनिवृत्तीच्या सळें[6] । भरले वनांतरीं ॥ ३७ ॥ अति दुर्घटीं कडेकपाटीं । निजध्यासें प्राणसंकटीं । गुरूभेटीस्तव संवंसाटी[7] । करिती जीवित्वाची ॥ ३८ ॥ ऐसें फिरतां दिक्पटीं । दुर्लभ सद्गुरूची भेटी । दैवें सभाग्य जो सृष्टीं । अकल्पित गुरूयोग ॥ ३९ ॥ येकीं बैसकची[8] वर्जिली । फिरती उदासीन नानास्थळीं । सुकृताच्या योगें सकळीं । भेटी होय गुरूची ॥ ४० ॥ करूनि तपाचिया कोटी । ईश्वर पाहूं ये दृष्टी । परंतु सद्गुरूची भेटी । होणें दुर्लभ ॥ ४१ ॥ दुर्लभ सद्गुरूचें दर्शन । दुर्लभ सद्गुरूकृपेचें ज्ञान । दुर्लभ सद्गुरूचें भजन । ब्रह्मादिकांशी ॥ ४२ ॥ दुर्लभ संसारीं मानवदेह । त्याहीं माजी दुर्लभ आत्मनिश्चय । दुर्लभ सद्गुरुकृपाप्रत्यय । सहजस्थितीचा ॥ ४३ ॥ येक सद्गुरुकृपें विरहित । इतुके हि दुर्लभ पदार्थ । नानासाधनें शीणतां व्यर्थ । आयुष्यहानी ॥ ४४ ॥

श्लोकः— दुर्लभो मानुषो देहो । दुर्लभं तत्वदर्शनं ।
दुर्लभा सहजावस्था । सद्गुरोः कृपया विना ॥ १ ॥

सद्गुरूचे आज्ञेस्तव जाण । होय साक्षात्कार निर्गुण । न लगे नानासाधन । श्रमांतरें ॥ ४५ ॥

१ विद्वान्. २ (?) वेत्र–काठी. ३ प्रणव (?). प्राणावधारणा (?). ४ गुरु प्रसन्न व्हावा म्हणून. ५ मंत्रजप. ६ भीतीनें. ७ (?) बरोबरी. जगणें मरणें सारखें च मानितात. ८ ठिकाण, बैठक.

श्लोकः—ज्ञानमात्रेण मुच्यंते । नानासाधनवार्जिताः ।
साक्षात्कारः परं ब्रह्म । जायते गुर्वनुज्ञया ॥ ४६ ॥

सद्गुरूचे कृपेविहीन । जन्ही पदार्थज्ञानीं संपन्न । परोक्ष विद्यावाद-प्रवीण । महा प्रशंसेनें ॥ ४६ ॥ घरोघरीं पुस्तकांचे भार । मठोमठीं तापस अपार । गावोंगावीं महा गजर । वेद पाठक ते ॥४७॥ विद्यासाभिमानें गर्वित । नाहीं रहितें चित्त सुचितें । क्रोधदंभ मत्सरान्वित । करिती पत्रलेखनें ॥ ४८ ॥ प्रशंसिती निजयोग्यता । ग्रंथीं राहिली तत्वचिंता । छळवाद वाक्पटुता । पट्शास्त्रवेत्ते ॥ ४९ ॥

श्लोकः—गृहे गृहे पुस्तक पुंजपुंजः । मठे मठे तापसवृंदवृंदं ।
परे पुरे वेदविदो हि विप्राः । न विद्यते कस्यहि तत्वचिंता॥६०॥

येक सद्गुरूवांचुनि जनीं । अहंता निरसेना परतोनी । जन्मणें मरणें अज्ञानी । सुटिकाचि नव्हे ॥ ५० ॥ महद्भाग्य पुण्यसग्रह । कृपेनें वोळे चिदानंदविग्रह । स्वरूपावबोधसंग्रह । अनुग्रहिजे तो ॥ ५१ ॥ उपदेशक्रम अगोचर । स्वानंदघन सफळ मंदार । योगैश्वर्यें उदार । छायेसी वैसिजे ॥ ५२ ॥ सुखामृताची गुरु सरिता । त्रिविधताप-उपशम चित्ता । निजबोधजीवनें तत्वता । निववी हृदय ॥ ५३ ॥ गुरूकृपा स्वानंद गरिमा । भव निवर्तउनि उपरमा । नेंत प्रतीतीनें परघामा । उपदेशक्रमें ॥ ५४ ॥ ते श्रवणामृत अपार । घनानंदवृष्टी साचार । अवधान चातक जिव्हार । होऊनि सेविजे ॥ ५५ ॥ गुरूकृपा प्रमेय सार । अक्षोभ सुखाचे सागर । हेळावर्तील अपार । बोधभरणें ॥ ५६ ॥ आत्मप्रत्यय चंद्रोदय । भरितें दाटेल अति विस्मय । निजदृष्टी सात्विक हृदय । भोगील सुखें ॥ ५७ ॥ देशिक सांप्रदायक्रम । प्रतीतीचें निजवर्म । सद्गुरू तोचि तो परम । होय सर्वस्वें ॥ ५८ ॥ स्वानंद चंद्र मनोहर । सद्भाव सच्छिष्य चकोर । अवधाननयनीं अमृतकर । सुखें सांठवी ॥ ५९ ॥ गुरूप्रशंसा प्रसिद्दी ।

---

१ पुस्तकी ज्ञानात प्रवीण. २ आत्मज्ञानरूप कल्याणाकडे, ३ सावधान. ४ पुराणातील वार्गा पुराणात या न्यायानें ५ शुष्कवाद. ६ ज्ञानानंदस्वरूपी गुरु. ७ अनुग्रहिजे. आत्मज्ञानाचा अनुग्रह करितो. ८ उचंबळतील. ९ ज्ञानाच्या भरतीनें.

सगुण साक्षात्कार वस्तुसिद्धी । कारण सद्गुरूची उपलब्धी । सर्वप्रकारें ॥६०॥ ओट मातृकाविवर । प्रणवप्रमेयपरावर । साचाचि सद्गुरुनिर्धार । होय जयासी ॥ ६१ ॥ अवधान देउनि ग्रंथांतरीं । सद्गुरूकृपा श्रवण करी । तो चि मोक्षाचा अधिकारी । होय सच्छिष्य ॥ ६२ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । सद्गुरूची महिमा अवलिळा । ह्मणे मेरू अनंत ॥ ६३ ॥ द्वितीय रुद्रीं द्वितीय उल्लास संपूर्ण ॥

---

श्रीराम समर्थ तत्ववेत्ता । तत्वैतीत तत्व तत्वता । तत्वार्थ तत्वोपदेशिता । महावाक्य तात्पर्यें ॥ १ ॥ सत्वाचें निजसत्व निश्चयें । महत्तत्वाचे स्वामित्व हृदयें । जीवशिवाचें साक्षत्व निश्चयें । वर्मे आकळे ॥२॥ सत्ता विश्वोद्भव भाव । सत्ता विश्व निवृत्ति स्वभाव । सत्ता द्रष्टृत्वा रहीत जीव । ब्रह्मानुभवी ॥३॥ बोध विश्वंभर ज्ञान । विश्वंभर समाधान । विश्वंभरसु सुखें निधान । प्रगटे सद्गुरू ॥४॥ तेणें अपरोक्षज्ञानें पूर्ण । प्रकाशें जीव शिव हृदय पावन । वातीं लाउनीं पाहतां अज्ञान । आडळेचि ना ॥ ५ ॥ सद्गुरूकृपा सनातन । जालिया निजात्मज्ञान । विश्वीं पाहतां बंधन । कोण्हासी च नसे ॥ ६ ॥ संभवल्या सद्गुरु अवतार । संपूर्ण होय विश्वोद्धार । तो परात्पर गुरू साचार । दाशरथी राम ॥ ७ ॥ गुरू राम परंपरा । चित्सूर्यबोध अभ्यंतरा । महावाक्यश्रवणद्वारा । प्रगट होय ॥ ८ ॥ जे अनुभवशंकरें सेविली । जे महासिद्धी प्रशंसिली । जे आत्मारामापासून चालिली । आत्मपरंपरा ॥ ९ ॥ भक्तपरंपरा विख्याती । निगम निरंतर स्थिती । उपदेश बोध पद्धती ।

---

१ ॐकाराचें स्पष्टीकरण करणारा. २ ॐकाररूप ब्रह्माच्या ज्ञानांत मुरलेला. ३ तत्वातीत. पंचमहाभूतांपलीकडील. ४ परब्रह्म. ५ रामाच्या सत्तेनेंच विश्वाचा उदय अथवा निवृत्ति होते व त्याच सत्तेनें जीवाचें जीवत्व जाऊन तो शिवस्वरूप होतो. ६ संप्रदाय. सांप्रदायिक ज्ञानसूर्याचा अंतःकरणांत प्रकाश पडला ह्मणजे 'तत्वमसि' इत्यादि महावाक्यांच्या श्रवणानें रामगुरु प्रकट होतो. ७ समर्थांचा उपदेश नित्य अशा वेदांनां अनुसरणारा सरळ असून भक्तपरंपरेंत सुप्रसिद्ध आहे.

विमळ समर्थाची ॥ १० ॥ समर्थासी श्रीराम भेटी । परस्परें जाहल्या गोष्टी । दासबोध प्रसिद्धि सृष्टी । विमळ ज्ञान ॥ ११ ॥ राम स्वानंद-सदन । निजावधानें भवकंदन । समर्थ बोधकथन । उपदेश चर्चा ॥ १२ ॥ परब्रह्म दासासी बोध । स्वानुभवाचा दासबोध । पावन परंपरा प्रसिद्ध । दाशरथीची ॥ १३ ॥ श्रीरामें समर्थ पावन । समर्थें पावन बहुजन । हे परंपराआख्यान रामउपासना॥१४॥निर्दोप परंपराज्ञान निर्मळ साधनसमाधान। विमळ वैराग्य भजन।परंपरेसी ॥१५॥विमळ योग अनुष्ठान। विमळ बोध अनुसंधान। विमळ दीक्षा पावन। परंपरेसी ॥१६॥ काशी पासूनि रामेश्वर । समर्थसांप्रदाय अपार । बोधप्रसिद्धी थोर थोर । प्रस्थानें रूढली ॥ १७ ॥ तारक ब्रह्मउपदेशें । तारिले सृष्टीसी आदि-पुरुषें । परात्पर निजध्यासें । प्रत्यक्ष केलें ॥ १८ ॥ संत महंत साधु मंडळी । विख्यातीनें भूमंडळीं। समर्थ ज्ञानवंशावळीं । प्रगट सूर्य ॥१९॥ महंतामाजी महामहंत । महा विख्यात मौनी अनंत । समर्थ प्रचीतीनें अखंडित । समर्थची रूढला ॥ २० ॥ उडुगणामध्यें[3] कळाराशी[4] । अनंत समर्थपरंपरेसी । तत्वामाजी हृषीकेशी[5] । तत्वप्रकाश ॥ २१ ॥ ग्रहचक्रांत जैसा तरणी[6] । देवामाजी देवाग्रणी[7] । सिद्धामध्यें महामुनी[8] । कपिल जैसा ॥ २२ ॥ भूधरामाजी सुरालय[9] । विश्रांतीनिधि सदय-हृदय । नरेंद्रांत नरवैडूर्य[10] । जैसा श्रीराम ॥ २३ ॥ लक्ष्मीवंतांत लक्ष्मीवर[11] । समुद्रांत सुधासागर[12] । भूषणांत वैचसें[13] थोर । कौस्तुभ[14] जैसा ॥ २४ ॥ युक्तीमाजी[15] वाचस्पती[16] । बुद्धिमंतांत फणिपती[17] । शुचिष्मंतीं[18] विख्याती । वैश्वानर[19] ॥ २५ ॥ उदरातें[20] कर्पूरगौर[21] । नवरसांत शांत-

१ श्रीरामाच्या संप्रदायांत सर्व च पवित्र आहे. २ समर्थांनीं सर्व भरतखंडभर प्रवास करून रामोपदेशाची परंपरा स्थापित केली. ३ नक्षत्रांमध्यें. ४ चंद्र. ५ गीतोपदेशक भगवान् श्रीकृष्ण सर्व तत्ववेत्त्यांत श्रेष्ठ होत. ६ सूर्य. ७ इंद्र. ८ सांख्यशास्त्राचा प्रवर्तक. ९ हिमालय किंवा मेरु; देवांचें रहाण्याचें ठिकाण. १० नररत्न. ११ विष्णु. १२ क्षीरसागर. १३ तेजानें. १४ श्रीविष्णूच्या कंठांतील मणि. १५ युक्तिवंतामध्ये. १६ देवगुरु बृहस्पति. १७ शेष. १८ पवित्रवस्तूंत. १९ अग्नि. २० (?) २१ शंकर.

रस थोर । समर्थपरंपरेसी साचार । चूडारत्न वर्चसें ॥ २६ ॥ अनंत नामरूपें विशेष । अनंत प्रचीतीचा[3] परेश । अनंत स्वरूपें निर्विशेष । वर्णिला न वचे ॥ २७ ॥ सुश्यामळ रूपें परम । सौंदर्य उपमेसी श्रीराम । योगीयाचें विश्रांति धाम । मनोहर ॥ २८ ॥ स्वानंदघनें सुखें अपॅांत । ब्रह्मानुभवें महा महंत । अनंत मौनी स्वरूपें संत । विख्यात भूमंडळीं ॥ २९ ॥ अनंत मुक्तीचें माहेर[4] । अनुभवाचें अनंत घर । अनंत आनंदाचें भांडार । अक्षई भरलें॥३०॥ अनंत ज्ञानाचा कुबेर । अनंत बोधाचा ईश्वर । अनंत विवेकरत्नाकार[5] । चातुर्यनिधी ॥ ३१ ॥ अनंत समाधीचें मंदिर । अनंत गुणाढ्य गुणागर । अनंतवागेश्वरी गंभीर । अमृत वरुपे ॥ ३२ ॥ अनंत करुणामृतंजळधर । अनंत स्वसुखाचा कृपाकर । अनंत साक्षात परमेश्वर । लीला वर्तला ॥ ३३ ॥ अनंत विष्णूचें अधिष्ठान । अनंत अपरोक्ष निधान । अनंत जीवासी उद्धरण । अवतरला सुखें ॥ ३४ ॥ मेघःश्याम सुशोभित । [6]चतुर्भुज तोचि द्विभुज अनंत । पतितोद्धरण मूर्तिमंत । सुखैकघन तो ॥ ३५ ॥ अनंत कारण चित्स्वरूप । करावया स्वरूपाचें रूप । विश्वोद्धार प्रताप । चित्सूर्यवंशी ॥ ३६ ॥ सुखैकघन.दशा देही । देह विदेहासी उरी नाहीं । अवस्थेवीण सर्वदा ही । स्वसुखचर्या ॥ ३७ ॥ अखंड वृत्तीचा विसर । अवरोधना[7] समाधीपर । परमानंदाचें शरीर । सुखेंचि पोसलें॥३८॥ तुष्टि तुष्टि स्वानंदघन । महास्थितीचें अनंत.प्रस्थान । सहज स्थिती दशा विज्ञान । उन्मनी पर ॥३९॥ जे दशा स्थिति गतीसि न ये । अपरोक्षदशार्णवप्रत्ययें । स्वानंदभरण विस्मयें । मजे आप आपणांत ॥ ४० ॥ निरावबोध तृतीनें । विज्ञाना मृताचें पारणें । परमानंददर्शनें । पाराचि टाकिला ॥ ४१ ॥ अनंत अत्रिगोत्र समुत्पन्न । अनंत वेदपाठक निपुण । अनंत वर्चसें देदीप्यमान । अपर सूर्य ॥ ४२ ॥ वक्ता वेदांतशास्त्रांचा । षड्दर्शनें रूढली

---

१ भक्तिरस. २ शिरोरत्न. ३ आत्मसाक्षात्काराचा. ४ अमर्याद. ५ ज्ञानरत्नांची खाण. ६ श्रीराम. ७ (१) इंद्रियनियमनामाटीं.

वाचा । व्याकर्णसिद्ध प्रत्ययाचा । प्रबोध चाले ॥ ४३ ॥ स्वयंभू सुखाचा महासिद्ध । श्रोता वक्ता स्वयेंचि प्रसिद्ध । बोध, बृहस्पती परी शुद्ध । सभासदामध्यें ॥ ४४ ॥ सर्वदा सहस्त्रवदनअभ्यंतर । वदे येकाचि वदनें अपार । अनत श्रुतीचें सार । प्रांजळ करी ॥ ४५ ॥ प्रखर अपरोक्षज्ञानें । सभेचें मंडण सन्मानें । हरिकीर्तनीं वगतृत्वानें । तोषवी वक्तयासी ॥ ४६ ॥ दृष्टांत द्राष्टांत महासंमती । महाचातुर्य बोधविरक्ती । अमृताचा दिवस संगतीं । जें होय अनतासीं ॥ ४७ ॥ क्षणभरी सहवासीं असता । संभाषणें निववी चित्ता । स्वानदसिंधूमाजी तत्वता । मज्जन होय ॥ ४८ ॥ भव्यरूप प्रसन्न वदन । आजानुबाहो आरक्तनयन । सर्वदा आनंदावलोकन । कूर्मदृष्टीचें ॥ ४९ ॥ कंबुग्रीवा वक्षस्थळ विशाळ । स्वसुखाचें दोंद वर्तुळ । आटीव सर्वांग सुनीळ । कुळकुळीत तेजें ॥ ५० ॥ ज्यासी कृपादृष्टीनें पाहे । त्यावरि आनंदाची वृष्टी होय । तो परम सभाग्य सुखें राहे । प्रसिध सृष्टीसी ॥ ५१ ॥ ऐसा अनतमहिमा अपार । दर्शनेंचि सुख दे अगोचर । केवळ कृपेचा अवतार । जगदोद्धार करी ॥ ५२ ॥ ऐसा अनत सर्वार्थें समर्थ । समर्थ तो समर्थ विख्यात । श्रीराम समर्थाचा समर्थ । त्रिभुवनपती ॥ ५३ ॥ श्रीराम समर्थ अनत । नामें रूपें वस्तु येक संत । निर्गुण अगुण गुणातीत । अभिन्नत्रयें ॥ ५४ ॥ श्रीराम गुरू परात्पर । परमगुरू समर्थ साचार । अनत सद्गुरू उद्धार । कर्ता होय माझा ॥५५॥ अनत समर्थ रघुवीर । सद्गुरू परम परात्पर । निर्गुण ब्रह्मसाक्षात्कार । स्वयंभकर्ते ॥ ५६ ॥ सूर्य अनळ शिवनेत्राग्नी । सत्ता तेजस्वी येकपणीं । स्वरूपबोधक त्रिभुवनी । विख्यात तैसे ॥५७॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर । स्वभावसृष्टीचे कर्तार । तैसेचि गुरुत्रय ईश्वर ।

१ सहस्रशीर्ष पुरुष इत्यादि श्रुतांत वर्णिलेल्या सहस्र ह्मणजे अनत मुखें असलेल्या परमात्म्याचे रहस्य. २ स्पष्ट ३ वक्तृत्वानें. ४ सूर्य, अग्नि आणि शंकराचे तिसरे नेत्रातील अग्नि हे जसे तत्वतः एक च त्या प्रमाणें श्रीराम, समर्थ आणि अनतमौनि हे ही स्वरूपबोधक असल्यामुळे एकरूपच होत

जंग पावन करें ॥ ५८ ॥ राम परमात्मा परमेश्वर । समर्थ परेश परात्पर । अनंत ब्रह्म अगोचर । नामाची व्याख्या ॥ ५९ ॥ सद् चिद् आणि आनंद । त्रिपदार्थ भाव येकविद । तैसा गुरूत्रयसंवाद । अभिन्न स्वरूपें ॥ ६० ॥ त्वंपद तत्पद असिपद । बोधें प्रांजळ जालियां त्रिपद । येकानुभव संवाद । निज प्रचीतीचा ॥ ६१ ॥ गुरुत्रयबोध अगोचर । त्रिविधा वाक्य अभ्यंतर । स्वरूप साक्षात्कार निर्धार । प्रगट जाला ॥ ६२ ॥ श्रुति शास्त्रांचें अभ्यंतर । वचनेंची होय निजविवर । हे गुरूत्रय साचार । ब्रह्मस्वरूपी ॥ ६३ ॥ हे विज्ञानसुधेचे समुद्र । हे चिदाकाशींचे सुखचंद्र । स्वरूप वसुधेचे महींद्र । योगींद्र प्रभवें ॥ ६४ ॥ यांची हृदयसखोलता । वेद विधी पाहतां । निवांत जाले तत्वता । अगाध अैसें ॥ ६५ ॥ परम । वरदी सच्चिदानंद । प्रत्यक्ष जाले स्वसुखकंद । बोधमंदार सुखप्रद । सफळ हे ॥ ६६ ॥ स्वरूपकृपासदय । स्वयंभ मूर्तित्रय । भाग्य सृष्टीचे सूर्य । सफळ तप सृष्टींचें ॥ ६७ ॥ अभेद भुवनत्रयासी । सुखकर बोधउपेगासी । जेंवि जीवन तरुणोपायासी । आलें सर्वत्र ॥ ६८ ॥ ते हे निरामय जीवन । बोधक्रमान्वयें करीत पावन । आलें परंपरेशी ज्ञान । उपदेशद्वारा ॥ ६९ ॥ जैसें बहिरावर्ण जळ । आलें भूतळासि केवळ । बोधत्रिविक्रमें अकाळ । पदीं संभविलें ॥ ७० ॥ राम परात्पर जीवन । समर्थत्रिविक्रमें योगें पूर्ण । प्रगटलें तें सुखवन आणिलें अनंतभगीरथें ॥ ७१ ॥ प्रलयाचेनि मुखें प्रबळ । प्रसिद्धीनें गतीसी सकळ । पूनित केलें भूमंडळ । कृपाजान्हवीनें ॥ ७२ ॥ अनंत सद्गुरुबोध प्रसिध्द । कृतार्थ केले साधिक सिध्द भक्तींचें रहस्य निर्वेध । वेचिलें चित्ता ॥७३॥ समुद्रींचें निज जीवन ।

---

१ तिन्ही गुरूंचें ऐक्य. २ आत्मस्वरूपाचा बोध. ३ महाराजे ४ हृदयाची खोली, रहस्य. ५ ब्रह्मदेव. ६ बाहेरचें आवरण. ७ समर्थरूप वामनानें ८ गंगावतरणाच्या आधारें हें रूपक आहे. राम ही गंगा, समर्थरूप वामनानें प्रकट केली व अनंतरूप भगीरथानें ती सर्वांस सुलभ केली.

मेघयोगें पावे गगन । सुखें वरुषतां तेथून । पृथ्वीसि ये ॥ ७४ ॥ तें चि नदीप्रवाहेंकरूनी । जाय सागरामाजि मिळोनि । सिंधु मेघ नदी होउनी । रूढीसी आले ॥ ७५ ॥ पाहतां जीवनामाजि तत्वता । सिंधु मेघ ना सरिता । क्रमान्वयें पाहतां । रूढीसी आलें ॥७६॥ तैसें ज्ञान मुळींचें मुळी । अभिन्नयोगें अचंचळीं । स्वानंदघनाचित्कल्लोळीं । गगे अनुभवसिंधु ॥७७॥ तेथुनि प्रबोधद्वारें । आलें परंपरानिर्धारें । स्वानंदघन वृष्टी आदरें । पावलें बोधसंकेता ॥ ७८ ॥ तें चि निजानंदघन । पुढिलिये उल्लासीं अनुसंधान । स्वानंदघन वृष्टि संपूर्ण । होइल पुढें स्वसुखें ॥ ७९ ॥ निरावर्ण जीवनीं जीवन । निजबोधकर्पेकडून । निजानंद घन अनुसंधान । प्रशस्त कीजे ॥ ८० ॥ मुमुक्षताचातक-चित्ते । स्वानंदघन तृपातें । भावगगन वसवूनि ते । अपेक्षिती घन-वृष्टी ॥ ८१ ॥ निज आर्ततेच्या जिव्हारीं । चुंचु पसरूनियां वरी । लाविलें लक्ष चिदंबरीं । जीवनअपेक्षां ॥ ८२ ॥ येतां स्वानंदघनयावों । होय वदनसरोजें सांठोवा । तैसें अवधान वाढवा । ग्रंथविवरीं ॥ ८३ ॥ श्रवणवदनपुटीं । अनुभव वनवृष्टी । सांठउनि प्रचीती पोटीं । निविजे सुखे ॥ ८४ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरूकृपेचा जिव्हाळा । गुरूप्रशंसा स्वलीला । ह्मणे मेरूअनंत ॥ ८५ ॥ द्वितीय रुद्र । उल्हास ॥ ३ ॥ श्रीरामार्पणमस्तु ।

---

॥ श्रीराम ॥

श्रीराम जयराम जयजयराम ॥ श्रीरामसमर्थ आनंदघन । बोधें वरुषतसे सनातन । हृदयभूमिका संपूर्ण । निववली ॥ १ ॥ अकल्पित सुखपडिभरें । वरुषों लागला निर्धारें । नित्य उन्दोध गजरें । गंभीर गर्जे ॥ २ ॥ प्रत्ययासि पुरावा करी । विज्ञानामृत सभ्यं-तरीं । सच्चिद्रण पसरी । चिदंबर योगें ॥ ३ ॥ चिदंबर सुखसागर ।

१ आच्छादनरहित. २ पाण्यागाठीं. ३ स्वानंदरूप मेघानी प्राप्ति. ४ पुगने, भराने. ५ पुरवठा.

तेचि घनवटुनि निरंतर । सिंधूचि कृपाजलधर । वर्षे आप आपणावरी ॥ ४ ॥ स्वरूपचिदंबर स्थळ । स्वानुभवसिंधु अकाळ । स्वानंदघन तुंबळ । अभिन्नस्थिती ॥ ५ ॥ चिदंबर होय श्रीराम । अनुभवसिंधु समर्थ परम । स्वानंदघन अनुक्रम । अनंत सद्गुरू ॥ ६ ॥ आत्मप्रतीती निजजीवन । बोधशुंडा अनुभव सेऊन । चिदंबरदशा संपूर्ण । पैसघनें धरी ॥ ७ ॥ सघन त्याचि चिदंबरा । घातल्या अखंड स्थिति धारा । प्रमाण टाकुनिया सैरा । अकाळ वरुषे ॥ ८ ॥ तापत्रयें आहळले जन । नित्य तळमळिती जीवनेंवीण । मुमुक्षचातकें मुखें पसरून । करुणा करिती ॥ ९ ॥ ऐकोनि ते चातककरुणा । कृपा आली करुणाघना । अमृतधाराधर जीवना । प्रमाण टाकिलें ॥१०॥ अकाळ ज्ञानवृष्टी संपूर्ण । नेणो टाकील सृष्टी बुडवुन । अखंड दंडायमान । धारा सोडिल्या ॥ ११ ॥ कृपेचा सुशीतळ धारा । त्रिविधताप उपशम सारा । अवचट आनंदाच्या गारा । कोसळती ॥ १२ ॥ पर्वतातुल्य नभीहूनि । पडती गारा संश्यांतें धरणी । अहंतेचे वृक्ष मोडोनि । चूर्ण होती ॥ १३ ॥ भव भ्रांती महानगरें गारावृष्टीनें येकसरें । होती नव्हती विस्तारें । तळासी जाती ॥ १४ ॥ अज्ञानवस्तीचीं कुग्रामें । वायुवेगें विक्रमें । घरेंचि उडोनि जाती संभ्रमें । झंझावात ऐसा ॥१५॥ विद्यायोग्यतेचे अचळ । बोधविद्युत्पातें सकळ । भेदूनि नेले तळातळ । सुखवस्तीसी ॥१६॥ ऐसा कडकडाट बोधाचा । आवर्त ज्ञानप्रळईचा । प्रळयवायु पृथ्वीचा । पदर उडवी ॥ १७ ॥ ऐसा प्रथमबोधलक्षण । अनुताप सुखें ज्ञान । उपरि स्वानंदाचा घन । संत वरुषे ॥ १८ ॥ विश्रांतीसी अवलंबिलें । संश्यांत वृष्टीसि आदरिलें । गारा धारा उपशमविलें । उत्पात विघ्न ॥ १९ ॥ अखंड मंडळ वृष्टीनें । विपरीत दृश्यनिदानें । सात्विक उर्वरित तेणें । जालें उपेगासी ॥ २० ॥

१ व्यापकरूप (?). २ दीनवाणे होऊन याचना करितात. ३ दैन्य. ४ (?) संशांत–फार शांत. ५ लौकिक विद्वत्ता आणि मोठेपणा हेच पर्वत. ६ ज्ञानाचा पाऊस पडून व्यावहारिक अज्ञानमल वाहून गेल्यामुळें सार्‍या नित्य संवईचे नसलेले सात्विक भाग दिसूं लागले.

अभावेपर्वत[1] विखरोनि गेले । भावगिरी तैसेचि उरले । तयाच्या आश्रयें राहिले । भाविक किती ॥ २१ ॥ भक्त मयूरें प्रेमळें । [2]पिछे उभउनिया सोज्वळें । सुश्यामवर्ण सकळें । नृत्य करिती ॥ २२ ॥ स्वानंदघनतुषारें । टाहो फोडिती सुखगजरें । नाना पक्षी वनचरें । वसती आश्रयें त्या ॥ २३ ॥ गंभीर गिरा[3]कडकडाटें । वैराग्याचा कडॆक[4] फुटे । अवचिता झळक लखलखाटें । ज्ञानविद्युद्गर्भ[5] ॥ २४ ॥ रि[6]चवतसे अखंड पाणी । धारा अनुस्यूत[7] गगनीं । धरणी बुडाली जीवनीं । संपूर्णतेनें ॥ २५ ॥ बोधवृष्टीमाजी संपूर्ण । बुडोनि गेलें दिनमान । रात्रिदिवस प्रमाण । हें कांहींच नसे ॥ २६ ॥ स्वानंद वांकडी[8] नित्य पाउस । अणुही नेदी अवकाश । उमसे[9] ना नुमस विशेप । तेथ असेचिना ॥ २७ ॥ तळीं वि[10]रांली शांती धरा । वरी ठाव नसे चिदंबरा । ऐसी वृष्टी अगोचरा । माजी वरुषे ॥ २८ ॥ बोधघनवृष्टी अभिनव । सिंधुसरितांना माधॆव[11] । अवघें जालें येकार्णव । काय ह्मणावें ॥ २९ ॥ अनंत ब्रह्मांड ढिसॊळें[12] । विरोनि गेलीं अंतराळें । साळमाळ विशाळें । हारपलीं ॥ ३० ॥ ऐसा येकार्णव सखोल । त्या अनुभव सिंधुची थोळ । घेउनि अनंताचे बोल । प्रगट जाले ॥ ३१ ॥ निमिषामाजी अंतर्भाव । करूनि अनुभवें अभिनव । सखोलतेचा अंतर्भाव । पोटीं जिरविला ॥ ३२ ॥ प्रचीतीचीं अधिष्ठानें । नांदती सुखरूप वस्तीनें । सांप्रदाय स्थानमानें । अक्षई रूप ॥ ३३ ॥ अभंग अद्वय स्थिती । स्वरूप संपन्न महामती । देशोदेशीं नांदती । कुळवंत संत ॥ ३४ ॥ अखंडबोधदिनमान । स्वरूपस्वराज्यसंपन्न । आत्मस्वसुखें प्रवीण । विख्यात चक्रवर्ती ॥ ३५ ॥ बोधअधिकारें ज्ञानसंपन्न । देशाधिकारी कुलीन । प्रजा सुखरूप संपूर्ण । घनवृष्टीनें ॥ ३६ ॥ वेदपाठक महास्थिती । ब्रह्मवृंदें सुखानुवृत्ती । बोध-

---

१ नास्तिक बुद्धि. २ पिसारे. ३ टाहोच्या ध्वनीनें. ४ कडकडाट ५ ज्ञानरुपी विजेचा गाभा. ६ वाहतें. ७ अखंड. ८ ( ? ) पर्याय. ९ सांगणें, न सांगणें ( ? ). १० विरून गेली. ११ ( ? ) वैशाखमास, वसंत ऋतु. १२ मोठीं.

पुराणीक विख्याती । प्रसिद्ध तेणें ॥ ३७ ॥ वर्णाश्रम धर्मस्थिती । व्रतें दानें यज्ञ चालती । तेणें स्वर्गाचे देव होती । परम संतुष्ट ॥३८॥ स्वानंदघनवृष्टीनें । अपार पिकें पिकती तेणें । प्रबोधाचा सुकाळ सुखानें । पार टाकीजे ॥ ३९ ॥ वरुपला आनंदघन । उपेगासी आला संपूर्ण । तो अनंतमौनी सुप्रसन्न । जाला मज ॥ ४० ॥ अनंत कृपेचा प्रसाद । लाधलों बोध स्वानंद । अनंत प्रतीती संवाद । चालिला सुखें ॥ ४१ ॥ अनंताची प्रबोधशक्ती । अमृतसिद्धी-योग प्रचीती । प्रसन्न जाली भारती । अखंडबोधें ॥ ४२ ॥ प्रांजळ सूर्यप्रभेनें दृश्य । तैसे पदार्थ दिसती अदृश्य । स्वरूप दृष्टीनें सादृश्य । न्याहळी समता ॥ ४३ ॥ माया मती ज्ञान संपन्न । अपरोक्ष-ज्ञानें प्रवीण । सर्वांग द्रष्टा निपुण । द्रष्टृत्वा वेगळा ॥ ४४ ॥ माया प्रारब्धगती दैविक । अवचट लाभें कांहीं येक । युक्तिज्ञानें अध्यात्मिक । बोध जाणें ॥ ४५ ॥ जैसा सारीपाट स्वभावें । फासा देईल तोचि डाव । परी बुद्धीचें वैभव । कांहीं न चले ॥ ४६ ॥ नातरी तो प्रांजळ । बुद्धीनें चि चालिजे बुद्धिबळ । तैसा निजविवर केवळ । बुद्धी-योग परमार्थी ॥ ४७ ॥ दृश्य नानाजिनसी विस्तारें । द्रष्टा विखरला दृश्याकारें । अन्वयदृष्टीनें तत्वद्वारें । प्रांजळ व्हावा ॥ ४८ ॥ पंचतन्मात्रापर्यंत । स्थूलदेह पंचभूत । लक्ष चौऱ्यांसी शोभित । आकारला ॥ ४९ ॥ तोची परतउनी माघारा । नेला पाहिजे मुळींच्या घरा । नाना तत्वांचा पसारा । सारूनि विवेकें ॥ ५० ॥ अन्वयव्यतिरेकासि मूळ । ते माया आधीं व्हावी प्रांजळ । अचंचळ आणि चंचळ । उभयक्रमें ॥ ५१ ॥ अचंचळाश्रित माया । चचंळा-श्रित दशकाया । गुणसाम्य गुणान्वया । गुणक्षोभिणी ॥ ५२ ॥ अविद्या महालाघव । ममतेनें संग्रहिले जीव । मोहाचें महावैभव । दाऊ-नियां ॥ ५३ ॥ ते अविद्येची विख्याती । ब्रह्मादिकांसी लाविली ख्याती । अविद्या अज्ञान रातोराती । घाला घाली अकेळ ॥ ५४ ॥

१ स्पष्ट. २ न समजतां.

समूळ सत्वाचा परिवार । सद्वृत्तीचा व्याप अपार । सन्मार्ग सत्क्रिया साचार । कळों नेदितां[1] ॥ ५६ ॥ देखत देखत निजहाणी । कळत कळत बुद्धासी मोह आणी । वेढा लाविले लोक तीन्ही । जे अविद्येनें ॥ ५७ ॥ विद्यमान नसोनि कांहीं । नाहीं त्या भ्रमें सर्वही । गोऊनि पाडिलें ठाईं ठाईं । जीव अविद्येनें ॥ ५८ ॥ अविद्या अमावास्येची राती । अखंड काळोखें जीवासि भ्रांती । दृष्टीस न दिसेचि प्रचिती । दिवस कदा ॥ ५९ ॥ अविद्येचें महामैंदीवें । जन्मउनि मारी जीवें । दृष्टीसी न दिसे ठायवें । अभिनव करी ॥ ६० ॥ जीतचि मरणदुःखें भोगवी । उगवीतें महांगोवी । महाविक्षेपें आटैवी । फिरवीतसे ॥ ६१ ॥ जन्म जन्मांतरें नाना । विस्तार कांहीं गणवेना । असो हे अविद्या विवंचना । मायेची पाहा ॥ ६२ ॥ अजातशत्रुचें संहरी । विपक्षाचीं पक्षें करी । महामोहाचें भरण भरी । ते अवधारिजे पुढें ॥ ६३ ॥ सकळविद्येची होय विद्या । न चले इजपुढें कांहीं विद्या । ते मूळ मायाचि अविद्या । रूपें अवतरली ॥ ६४ ॥ ब्रह्मादिक छळिवाळें । पुरवित विपर्याचे ळळे । उभवित महा ढिसाळें । आश्चिर्याचीं ॥ ६५ ॥ ते मायेची कडोविकडी । दैवी दशा महाप्रौढी । स्वरूप विख्याती केव्हडी । रूढी हे पाहा ॥ ६६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरूकृपेचा जिव्हाळा । जैनीं आनंदघन वर्षला । ह्मणे मेरूअनंत । द्वितीयरूद्र चतुर्थ उल्लासः ॥ ४ ॥

---

श्रीराम जयराम जयजयराम ॥ श्रीरामसमर्थ मायातीत । ज्ञानें परंपरा सांभाळित । नित्यसूर्योदय अनंत । ज्ञानें वर्तवी ॥ १ ॥ अपूर्व मायेचें

---

१ आपलें नुकसान. २ आत्मस्वरूपी दिवस. ३ घातकीपण. ४ उत्पन्न करते. ५ मोठ्या अडचणी. ६ विन. ७ अरण्यात. ८ विचार. ९ स्नेहभाव दाखवून. १० शत्रूचा. ११ कैवार. १२ ढीग, राशी. १३ सुखांत. १४ ज्ञानसूर्याचा उदय.

लक्षण। लोहित कृष्ण शुक्ल वर्ण। हें गुणान्वयेंविदाण। क्षोभ दावी ॥२॥ परस्परें मिश्र होउन। सात्विक प्रिय दारुण। येक येकांत रीघोन। पालट करी ॥ ३ ॥ जे जन्मेंवीण जन्मली। जे मरणेंवीण निमाली। जे अमेंवेंचि वांचली। नाटकमायों ॥ ४ ॥ जितें अजा ऐसें बोलिजे। जे अनेक परी येकाचि सहजें। जे नित्य वंध्या परि सबीजें। विश्व प्रसवे ॥ ५ ॥ अकुळी कुळरूपका। जे अमुळी मुळमुळीका। जे अनाम नाम माईका। विस्तारीत ॥ ६ ॥ जन्मासी नाहीं आली। स्वतः असे जे ऐकली। आरक्त शुभ्र कृष्ण चांगली। मायेची बोली ऐसी असे ॥ ७ ॥ श्रुति ॥ अजामेकां लोहितशुक्लकृष्णां। जे अभाव भावप्रतिमां। जैसी नभीं आभासनिलीमा। विज्ञानपौर्णिमेंत आमों। अज्ञानरूप ॥ ८ ॥ अचंचळीं चंचळवृत्ती। ब्रह्माकारें विशाळ स्फूर्ती। उभयद्रष्टृत्वें प्रवृत्ती। मूळ विस्तारें ॥ ९ ॥ तम अज्ञान तेज ज्ञान। गुण साम्य गुण घन। गुणक्षोभ सगुण। विस्तारली ॥ १० ॥ जगत्संभवें संभवेला। निजप्रसव प्रसवली। स्वयें भ्रतारांसी व्याली। माय राणी ते ॥ ११ ॥ काय तियेचें बोलिजे नवल। जनकासी व्याली अकळ। जननीसि प्रसऊनि सकळ। विस्तारली ॥१२॥ जे ईश्वराची ईश्वर। जियेचे अनंत अवतार। जन्म मालिका विस्तार। गणील कवण ॥ १३ ॥ असो तियेच्या विस्तारीं। तियेच्या साक्षत्वें दृष्टीभरी। स्वतेज सहृदयांवरीं। पाहलें पाहा ॥ १४ ॥ स्वयंभ साक्षत्व

---

१ अजामेकां लोहितशुक्लकृष्णां बह्वीः प्रजाः सृजमानां सरूपाः। सत्वरजस्तमस् या विविध वर्णांनीं (गुणानीं) युक्त व आपल्या सारख्याच विविध गुणयुक्त प्रजा उत्पन्न करणारी, असें मायेचें लक्षण श्वेताश्वतरोपनिषदांत दिलें आहे (४,५). २. तीन गुणांचें चमत्कारिक मिश्रण. ३ मेली. ४ जी अभावरूपानेंच भासते; पहावयास जावें तों नाहींशी होते. ५ खोटी माया. ६ वर २ च्या ओवी वरील टीप पहा. ७ त्रिगुणात्मक. ८ कुळरहित. ९ मूळरहित. १० खोटी नावें. ११ भासणारा निळेपणा. १२ अमावास्या. १३ ईश्वर मायेचा पति खरा, पण तिच्या मुळें च ईश्वरत्व पावतो. १४ पिडाला.

सूर्योदई । स्वानंदघनविंबठाईं । निघोटें प्रभा पाहीं । उदयेंवीण ॥ १५ ॥ अज्ञानतमांशु शून्यघन । अगाधरूप राहो सघनें । बिंबलें, निविड विद्यमान । तें आच्छादिलें ॥ १६ ॥. संपूर्ण तो चिदंशुमांन । लोपला प्रभेसी आपण । त्या उदईंच अस्तमान । ऐसा जाला ॥ १७ ॥ तया स्वयंभी निर्बिंब । प्रतीतीज्ञानसूर्यबिंब । आच्छादुनि चिद्बिंब । दाविलें दृष्टीसी ॥ १८ ॥ अखंड तेज उदयमान । शाश्वत ज्ञान सुमान । सदोदित समान । तयावरी ॥ १९ ॥ शून्य राहूचें नित्य महण । नव्हे चित्प्रकाश मोचन । ऐसिया गर्ड्दांत दर्शन । घेती सूर्यउपासक ॥ २० ॥ चित्सूर्याचेनि प्रकाशें । सूर्यलोप प्रकाशविशेषें । दृष्टी रिघोनि सावकाशें । तम दाविला ॥ २१ ॥ तम दाटोनी पाठीं पोटीं । केली घनछिन्न दृष्टी । त्याचि दृष्टीनें सर्व सृष्टी । घनछिन्नार्क ॥ २२ ॥ असोनि चित्सूर्य स्वयंभ । होय मूढ दृष्टीसि निष्प्रभ । तेज निर्लोम क्षोभ । लोम दाविला जैसा ॥ २३ ॥ नित्यमुक्तासि बद्धभ्रांती । बंधन होय गुण प्रवृत्ती । अज्ञान दृष्टीनें दुर्गती । जाहली पाहा ॥ २४ ॥ असतां दिवस माळवला । ब्रह्मगोळीं तम भरला । अज्ञानपरंपरेला जाला । पतनयोग ॥ २५ ॥ भगतेंगर्भता पतन । ज्ञानदृष्टीसि अवरोधन । हे माया काळरात्री पूर्ण । पैसावली ॥ २६ ॥ ये मायेची करावया निवृत्ती । अज्ञानराहूची उपशांती । गुरुबोधनिधानस्थिती । चित्सूर्यग्रहणीं ॥ २७ ॥ विज्ञानकर्णधारा अंतराळ । प्रबोधवाहिनीसी अकळ । अनुभव मूर्धा केवळ । अघमर्षणीं ॥ २८ ॥ सुस्नात होउनि निश्चयें । ब्रह्म दीक्षासंपन्न हृदय । गुरूसहवासी प्रत्यय–। महापर्वणीं ॥ २९ ॥ गुरूवदनसौरसें । निजबोधसुधारसें । महावाक्यतेज सौरसें । तारक तत्व ॥ ३० ॥ निज-

१ परिपूर्ण. २ पूर्ण. ३ ज्ञानरूप सूर्य. ४ अंधारात. ५ (?) भवतमगर्तीं; संसाररूपी काळोखाच्या खाचेंत. ६ सुकाणूवाला. ७ ज्ञानरूप नदींत. ८ मस्तक. ९ पापनाशक असा मंत्रोच्चारपूर्वक करावयाचा विधि. १० कमळानें. ११ प्रसादानें.

श्रवण अवधानीं । घेउनि प्रचित्त आसनीं । जपोनि तारक निर्वाणीं । तत्पर व्हावें ॥ ३१ ॥ पुरश्चरण त्रयोदशाक्षरें । अखंडप्रवाहीं निर्धारें । संपुटीकरण सत्वरें । जपसिद्धी ॥ ३२ ॥ ब्रह्मदीक्षित महाश्रोत्री । परत्र गती सत्पात्री । प्रणवोच्चार महामंत्री । संकल्प सोडावा ॥ ३३ ॥ अंतर्भावनिजस्मरणें । गोकुळींचीं गोदानें । आत्मगोविंद विद्यमानें । सर्व समर्पण ॥ ३४ ॥ तत्वाश्रित भूदानें । संकल्पशून्य प्रतीतीनें । करावें कृतार्थ निश्चयानें । चित्सूर्यासि त्या ॥ ३५ ॥ उत्पत्ति स्थिर-रहित । ज्ञानसूर्य सदोदीत । ज्ञानदृष्टीसी अखंडित । पाहावा नित्यमुक्त ॥ ३६ ॥ ते नित्यत्वें सहजसिद्धि । आत्मसूर्यउपलब्धी । ब्रह्मात्मयोग-प्रसिद्धी । ब्रह्मसंतर्पण ॥ ३७ ॥ ब्रह्मार्पण ब्रह्म हवि । ब्रह्मज्ञानाग्नी प्रभावी । ब्रह्मानुसंधानें जीवीं । हवन करी ॥ ३८ ॥ या ब्रह्मस्थितीनें अखंडित । सदा ब्रह्मींच अनुसरत । ब्रह्मकर्म समाधिस्थ । सर्वकाळीं ॥ ३९ ॥ ऐसा ब्रह्मनिष्ठ आचरत । चित्सूर्ययोगें पुनीत । नित्यमुक्त कृतार्थ । करी सकळां ॥ ४० ॥ असतां या अनुसंधानीं । कर्माचा अंतराय जनीं । आयुष्यसूर्यअस्तमानी । कांक्षा उरली ॥ ४१ ॥ मौर्गस्थ निजेला मार्गी । जावयाचे लगबग आंगीं । असतां जागृत प्रसंगीं । वस्तिसी पावे ॥ ४२ ॥ कांहीं येक त्या संस्कारें । योग-भ्रष्ट पुन्हा अवतरे । देहासि येउनि निर्धारें । देहबुद्धी नसे ॥ ४३ ॥ जैसा पूर्ण समाधिस्त । सातवे भूमिकेचा महंत । पूजितां तोषेना नि-वृत्त ज्ञानदर्शी ॥ ४४ ॥ उत्तम मध्यम कनिष्ठ । असतां न देखेच स्पष्ट । सिंहासनीं अथवा निकृष्ट । स्मशानीं त्यां ॥ ४५ ॥ काष्ठेंसी

१ आत्मसूर्याची उपलब्धि झाली म्हणजे यज्ञ, यज्ञकरणारा, यज्ञाग्नि वगैरे सगळेंच एकरूप कसें होतें, हें ' ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतं ' इत्यादि भगवद्वाक्यान्वयें ( ४, २४ ) येथें सांगितलें आहे. २ वासना. ३ कर्म-योगाचें मर्म या ठिकाणीं प्रवाशाच्या दृष्टान्तानें स्पष्ट केलें आहे. आत्मस्वरूप उद्दिष्टस्थान, कर्मयोग मार्ग, या मार्गांत असतांना मृत्युरूप निद्रा आली तरी जागा झाल्यावरोबर म्हणजे पुढील जन्मीं कर्मयोगी उद्दिष्टाला जाऊन पोंचतो. ४ भगवद्गीता ६, ४१—४५ पद्य. ५ लांकडाला.

त्या प्रयोजनीं । योजिलें अथवा दहनीं । लोटिलें प्रवाहजीवनीं । जाय निर्हेतु ॥ ४६ ॥ तैसे योगभ्रष्ट देहाकारें । असोनि स्वरूपनिर्धारें । न होती देहसंस्कारें । निर्कलेशी ते ॥ ४७ ॥ अनुस्यूत बोध हृदइं । होय हस्तामलकदेहीं । स्वरूपीं निमग्न विदेही । दशा संपूर्ण ॥ ४८ ॥ नाही कांहींच जगद्भ्रांती । नसे तयाची भवस्फूर्ती । उपजला तैसाचि क्षिती । पडिला तटस्थ ॥ ४९ ॥ न करी मायेचें स्तनपान । नेघे भव-अन्नजीवन । सर्वदा तो स्वानंदघन । आत्मामृतपानें ॥ ५० ॥ देहीं चळ-वळ नाहीं । चाले ना बोले काहीं । आक्रंद न खेद हृदईं । असेचिना ॥ ५१ ॥ अथवा तोषें तो अद्वय । निर्विकार निराश्रय । अद्वैतासी लाभ काय । हास्य न करीत ॥ ५२ ॥ ऐसा असता पितृसदनीं । सप्तवार्षिक विद्यमानीं । प्रसिद्ध लोक ऐकोनी । पाहों जाती ॥ ५३ ॥ हा अकाळ संस्कार असता । देहासी आणिलें तत्वता । या संस्कारासी वारिता । होय सद्गुरू ॥ ५४ ॥ अमृतसंजीवनी वरील । वायु येता सुशीतळ । मूर्छित जाले ते सकळ । वानर उठिले ॥ ५५ ॥ तेंवि सद्गुरू दयेचा पवन । भवमूर्छितासि सावधान । करूनि दे स्वानंदघन । आपुली दशा ॥ ५६ ॥ तेंवि हस्तामलकाशी । कृपा अनुग्रह विशेषीं । आले आचार्य स्वामी प्रहासीं । शंकरावतार ॥ ५७ ॥ शंकराचार्य साक्षात् शंकर । जिहीं केला अद्वैतमतोद्धार । तिहीं हस्तामलकसंस्कार । दर्शनें वारिला ॥ ५८ ॥ ह्मणती शिशु रे तू कवण । कैंचा आलासी कोठून । काय तुझें अभिधान । तें सांग मज ॥ ५९ ॥ ऐसें आचार्यांनीं विचारितां । हृदईं चमत्कारिला तत्वता । स्वरूपावबोधें सांगता । होय सहज ॥ ६० ॥ ह्मणे मी मनुष्यादि नव्हे याती । नव्हे वर्णाश्रम धर्म स्थिती । यक्षपिशाच्य नाना व्यक्ती । नव्हे देवादिक

---

१ वाहत्या पाण्यांत २ कल्पनेच्या किंवा वासनेच्या पलीकडे जातात, तीत गुरफटत नाहींत ३ ओतप्रोत भरलेला ४ हा आद्य श्रीमत् शंकराचार्यांचा प्रसिद्ध शिष्य जन्मत मुक्या सारखा असून आचार्यांच्या प्रश्नाला उत्तर ह्मणून च तो प्रथम बोलू लागला ५ सात वर्षांचा ६ रावणाच्या सेनेनें मारिलेले ७ नांव

॥ ६१ ॥ माझें सत्य स्वरूप सनातन । मी अविच्छिन्न पुरातन । मी दृश्यत्रिपुटीविहीन । ब्रह्मस्वरूप ॥ ६२ ॥ त्याचे मुखींचे द्वादश श्लोक। केवळ स्वरूपबोधक । अर्थ पाहतां हस्तींचा आमलेक[1] । प्रांजळ ऐसा ॥ ६३ ॥

॥श्लोक॥ घनच्छन्नदृष्टिर्घनच्छन्नमर्कं यथा निष्प्रभं मन्यते चातिमूढः ।
तथा बद्धवद्भाति यो मूढदृष्टेः स नित्योपलब्धिस्वरूपोहमात्मा ॥

टीकाः—द्वादश प्रश्नोत्तरें । आचार्यांसि भावपुरस्कारें[2] । निवेदुनि निज अभ्यंतरें । जाला ब्रह्मरूप ॥ ६४ ॥ याकारणें दृष्टांतासी । आला स्वरूप अनुभव त्यासी । परमार्थज्ञानें निश्चयेंसी । गतीसी पाविजे ॥६५॥ परमात्मा परस्वभाव । निर्विकार निरावेव । ज्ञानाच्या अधिकरणीं भाव । जीवैरूपें ॥ ६६ ॥ आपुलें बिंब आपण । पाहोन पावला मरण । कूपोदकीं बिंबोनें । सिंव्हें जैसा ॥ ६७ ॥ भेदें होतां स्वरूपज्ञान । येतें अंतराय पतन । न कळतचि जन्ममरण । लागलें सर्वें ॥ ६८ ॥ कार्या सर्वेचि कारण । स्मरणांतरिसें विस्मरण । हें अनादि माया विंदाण । बळात्कारेंचि ॥ ६९ ॥ स्मरणविस्मरणापर । स्वभाव आस्तित्त्वैचर । तो अनुभवविवर । सद्गुरूचा ॥ ७० ॥ स्वभावयोगें नित्ययुक्त । सहजस्थिती नित्यमुक्त । अभावेंचि अयुक्त । बंधन लागे ॥ ७१ ॥ माया अभावें पाहीं । असद्व्यावृत्ति हरई । परिणमलें सर्वहीं । विकारवंत ॥ ७२ ॥ अचंचळी वृत्ती चंचळ । जाणवलें ब्रह्म अचळ । मूळ

---

१ आंवळा, हातावर आंवळा ठेविला असतां तो जसा स्पष्ट दिसतो तसा या श्लोकांवरून आत्मस्वरूपाचा स्पष्ट बोध होतो. श्रीमच्छंकराचार्यांचें हें हस्तामलकसंवाद स्तोत्र गोड असून सुप्रसिद्ध आहे. नित्य पाठासाठीं विद्यार्थ्यांनीं तें एकदां घोकून टाकिलेलें बरें. २ भक्तिपुरःसर. ३ जीवाला वस्तुतः स्वतंत्र अस्तित्वच नाही. तो केवळ ब्रह्माचें मायेंतील प्रतिबिंब होय. ४ पुहून. ५ एका कोल्ह्यानें फसवून मारिलेल्या सिंहाची ही गोष्ट पंचतंत्रांत आली आहे. ६ स्वरूपाचें ज्ञान अभेदरूप झालें पाहिजे. नाहीं तर सिंहाप्रमाणें नाश होईल. मी जीव आहें, असें ज्ञान झालें की जन्म मृत्यु आहेत च. ७ कौतुक. ८ (?) अस्तित्वरूप जें आत्मस्वरूप तें स्मरणविस्मरणाच्या पलीकडे आहे.

मायेसी चळ । जाला मुळीं ॥ ७३ ॥ मूळ वृत्तिद्वय अधोर्ध्व । भेदाभेद प्रसिद्ध । तैसाचि चालिला प्रबोध । साक्षत्वें ॥ ७४ ॥ निजबोधाचा निर्धार । सस्वरूप निरंतर । साक्षत्वरहित साक्षात्कार । गुरुकृपेचा ॥ ७५ ॥ मुळींहूनी नाही चुकला । ह्मणोनि अचुक फावला । अगोचर अनुभवाला । अनुभवी जाणे ॥ ७६ ॥ अनुभवप्रमाणीं निदान । नित्योदय अस्तमान । ज्ञानचि समसमान । अनिर्वाच्य ॥७७॥ अभावें ग्रासिला भाव । भावें गिळिला अभाव । हा अभिनव स्वभाव । बोधस्थितीचा ॥ ७८ ॥ बोधें-अजातशत्रूचे ठाईं । द्वैताद्वैत नसेचि कांहीं । तम तेजासि नाहीं । अवकाश ॥ ७९ ॥ निरंधन वन्हि स्वभाव । हा गुरुकृपेचा अनुभव । मायाकाष्ठ असंताभाव । येथ नसेचि ॥ ८० ॥ काष्ठविशेष ताटस्थता । धसे अभाव गुप्त अहंता । धरि वरि स्वरूपता । प्रगटे ज्ञानें ॥ ८१ ॥ जैसा शुक्लपक्ष चतुर्दशीचा । चंद्रमा तो पूर्णप्रभेचा । परि तोचि पूर्णमेचा । पूर्ण होय ॥ ८२ ॥ येक कळा असलिया क्षीण । होय क्षयासी कारण । तैसें माया विज्ञान । क्षयरूपी ॥ ८३ ॥ मायानिवृत्तीनें पूर्ण । होय स्वरूपदर्शन । तो सोपाधिक गौण । साक्षात्कार ॥ ८४ ॥ बोधींच पाहिजे प्रांजळ । बोधींच अनुभव निवळ । बोधींच स्वरूप केवळ । पाविजे तें ॥ ८५ ॥ ते प्रांजळ बोधलक्षण । पुढें आहे निरूपण । श्रोतीं देऊनि अवधान । श्रवण कीजे ॥ ८६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा

---

१ पूर्ण ज्ञानांत द्वैताद्वैताचा विचार नाहीं. काळोख आणि उजेड जसे परस्परांचे अभाव आहेत तसेच द्वैत आणि अद्वैताचे आहे. समाधि स्थितींत जसे काळोख व प्रकाश दोन्ही नाहींत तद्वत् द्वैताद्वैत हि नाहीं. २ अग्नि स्वभावतः इन्धनाची अपेक्षा करीत नाहीं. व्यक्तता मात्र त्याला इन्धनामुळेंच येते. तसा ब्रह्मरूपी अग्नीत स्वभावतः मायारूप काष्ठाचा पूर्ण अभाव आहे. काष्ठसंबद्ध अग्नीचें जें ज्ञान तें अर्थात् खरें नव्हे, अपूर्ण होय. ३ ज्ञान झालें असा भास होणें हा हि एक मायेचा खेळ असल्यामुळें तो आहे तों पर्यंत स्वरूपज्ञान पूर्ण झालें असें होत नाहीं. याला दृष्टांत पुढील ओव्यांत दिला आहे.

जिव्हाळा । अविद्या महिमा निरोपिला । ह्मणे मेरूअंनत । द्वितीय रूद्र । पंचमोल्लासः ॥ ५ ॥

---

श्रीराम जयरामजयजयराम । श्रीरामचंद्रायनमः॥ श्रीरामसमर्थ बोधअच्युत । ज्ञानक्रमान्वयें अखंडित । अनुभवदर्शनें अनंत । ब्रह्मरूप ॥ १ ॥ त्रिपुटीनिदान अनुभवी । क्रमरहित अंतर्भावी । बोध चालिला स्वभावी । अरूप रूपें ॥२ ॥ या स्वभावाहूनि पर । परब्रह्म निर्विकार । तें सहज अद्वैत साचार । विकाररहित॥३॥अनुभव ना अनुभविता । नसे बोधाबोधवार्ता । या बोधाची निःसंगता । सद्गुरुकृपा ॥ ४ ॥ हा स्वभावेंचि बोध होय । भावाभाव न साहे । प्रचिती ग्रासूनि जाय । प्रचीतीनें ॥ ५ ॥ अनुभवावीण निजांगे । सहज प्रतीती जगे । सिंहउत्पत्ति स्वांगें । जननी नुरे ॥ ६ ॥ प्रत्ययेंवीण तो प्रत्यय । बोध बुद्धीविना होय । तो अगाध महिमा काय । वर्णू सद्गुरूचा ॥ ७ ॥ संभवीं च असंभव । अद्वैतबोध अभिनव । गुरुपुत्रांचा अनुभव । न कळे कवणा ॥ ८ ॥ केवळ ज्ञानी अंतर्निष्ठ । बोधेंचि अनुभवीती स्पष्ट । त्याचि प्रतीतीनें उद्‌घाट । परिपाट ज्ञानें ॥ ९ ॥ जैसी पर्जन्याची वृष्टी । होय उर्वर भूमीचे पोटीं । गौरीगडदरावोहटीं । आटोनि जाय ॥ १० ॥ तैसा बोध परोक्षें जाला । तो ही परिपाटींच पडिला । प्रवाहेंची चालिला । प्रवृत्तीकडे ॥ ११ ॥ त्यास्तव ते भूमिका साधावी । साधूनि सखोलता यावी । ते बोधामृत सांठवी । वळणें बांधलिया ॥ १२ ॥ तेविं साधक बाधक बोधें । शोधूनि अंतर शोधें । त्यावरी अपरोक्षवेधें ।

---

१ आत्मप्रतीति खरी झाली ह्मणजे प्रतीतीच नष्ट होते, याला सिंहिणीचा दृष्टान्त आहे. सिंहीणीचें पोट फाडून छावा बाहेर पडतो अशी कल्पना आहे. २ ओसाड. ३ धोंडे, वांचा यांत. ४ पुस्तकी ज्ञाना सारखा अप्रत्यक्ष. ५ मायेच्या व्यवहारांत. ६ जमीन; पक्षीं, मनाची अवस्था. ७ धरण; पक्षीं, धारणा. ८ अंतःकरण.

निर्बंध व्हावें ॥१३॥ विकांतरीं पाउल वाट । सूक्ष्मचि होउनियां स्पष्ट । पीकची करी सपाट । ते वाट मोडावी ॥ १४॥ ज्ञान संरक्षण साधन । पाणंदी लावावी संपूर्ण । जीमाजी रिघतां सनातन । सेवटासी जाय ॥ १५ ॥ परि पाटबोधाची रीती । अनुभवरक्षण स्थिती । त्यास्तव ग्रंथांतरीं युक्ती । विस्तारावी लागे ॥१६॥ ब्रह्म अद्वैत अवघड । माया द्वैताद्वैत बेचौंड । उभय क्रमयोगें जाड । अनुभव घ्यावा ॥ १७॥ मूळ शून्य महानिबिड । अंधकाराची पेंटी उघड । माजी निजबोध उजेड । तो जगवावा ॥ १८ ॥ अक्षोभ गुणक्षोभ पाउस । विकल्पवारा बहुवस । त्यास्तव साधनाचे सायास । करणे लागे ॥१९॥ ज्योती गेलियां अंधकारीं । फिरत फिरत जन्मांतरीं । माया अरण्यामाझारीं । कष्टी होइजे ॥२०॥ सद्गुरू संपन्न राजेश्वर । स्वराज्यस्वरूपनिर्धार । तयाच्या सहवासीं साचार । स्वभावेंचि जावें ॥ २१ ॥ आइतीच साधनसंपत्ती । नित्यवैभवचक्रवर्ती । बैसोनिया सहज स्थिती । सुखासनीं त्या ॥ २२ ॥ पाविजे पदा अवचट । त्या बोधाची पाहा नीट वाट । परिपाट सांभाळुनि उत्कट । बोधासी पाविजे ॥ २३ ॥ कर्तव्यासी न येतां मूळीं । बोध संभवला अंतराळीं । छेदूनि भव समुळीं । निर्मूळ जाला ॥२४ ॥ तो भवबंधनहर्ता । स्वरूपासी स्वरूपकर्ता । विश्रांतिरमेचा भर्ता । बोध महाविष्णु ॥ २५ ॥ दृष्टांत दार्ष्टांत ऊणखूणें । बोध घडमोडीनें विस्तीर्ण । ग्रंथीं चालिला संपूर्ण । प्रांजळ स्वरूपा ॥ २६ ॥ प्रतीतीच्या श्रवणीं । बोधशृंगारैभरणी । उपमा नाहीं निरूपणीं । अर्थ

---

१ शेत उगवल्यावर त्यात. २ संकल्परूप. थोडाहि संकल्प राहिल्यास झालेले ज्ञान नष्ट होण्याचा संभव असतो. ३ दोन शेतामधून बाहेर जाण्याचा रस्ता. ४ परोक्ष ज्ञान झाल्यावर मनन निदिध्यासाने त्याचें रक्षण व्हावें ह्मणून ग्रंथवाचन पाहिजे. ५ (?) मिश्रण, समुदाय. ६ मायारूप. ७ स्पष्ट. ८ श्रवण, मनन, निदिध्यास वगैरेच्या साहाय्याने ज्ञान कायम ठेवावे. ९ जीवरूप. १० जन्ममरणाच्या फेऱ्यांत. ११ दृष्टांताने ज्ञेय वस्तूचा उणापुरा बोध होतो; पूर्ण होत नाही. यासाठीं ग्रंथांत अनेक विविध दृष्टांत देऊन स्वरूपबोध स्पष्ट करावा लागतो. १२ अलंकार.

चालिला ॥ २७ ॥ युक्तीचें खुंटतां मूळ । तुटोनि जाय वाग्जाळ । ऐसा बोधचि तो केवळ । अपरोक्ष होय ॥ २८ ॥ सुशब्दमांदुसेमी-तरी । भरलें अर्थनिधान परी । निःशब्द उद्घाटन करी । तववरी अप्राप्त ॥२९॥ मनासी लक्षे ना परमार्थ । तो उन्मन निजध्यासें स्वार्थ । प्रतीतीनें समर्थ । अनुभविती ॥ ३० ॥ शब्द घनवटूनी पूर्ण । असे अर्थमात्र गहन । शब्द उपपत्ति भूषण । गौरवावा ॥३१॥ शब्दांआंगीं अचिंत्य शक्ती । अर्थ अळंकारित युक्ती । शब्दनिवेदनें निजमुक्ती-। लाभ परम ॥ ३२ ॥ शब्द अर्थाचें स्तवन । वाढविलें अर्थमहिमान । ग्रंथोपग्रंथीं निरूपण । चालिलें शब्दें ॥ ३३ ॥ सुरस रसनामधुर । अर्थ कडोविकडी विचर । अनुभविती साचार । अर्थभोक्ते ॥ ३४ ॥ सुमनें गुंफुनि केले हार । अर्थ मगमगाटें मधुर । सुरसिक ते मधुकर । सुवास सेविती ॥ ३५ ॥ अर्थोपपत्तीचे शृंगार । श्रवणीं लेउनि साक्षात्कार । नित्यमुक्त दशासार । अनुभविती ॥ ३६ ॥ बोधपरवडी सदन्नें । परम रूचिकरें तृप्तानें । सेवितां श्रवणवदनें । सुखाची अवीतो ॥ ३७ ॥ सेविती जे रुची होय । तेचि तृप्तीनें प्रसये । ढेंकर येती सुधामय । स्वादिष्ट ते ॥ ३८ ॥ सदन्नें सुवासें रुचिकरें । आमाणें जाणवती विस्तारें । तृप्तीमाजि पदार्थाकारें । काय असती ॥ ३९ ॥ स्नेह वाती आणि जोती । प्रकाशांत काय असती । तैसी स्वबोध-उपपत्ती । अनुभवीं नसे ॥४०॥ शब्द बुद्धीमाजी विलसला । अलिप्तपणें अर्थ संचला । तैसा बोधामाजि कोंदला । अनुभव अलिप्त ॥४१॥ प्रबोधीं अनुभव सिद्ध । अनुभवीं बोध ना अबोध । जाणती तत्वज्ञ प्रबुद्ध । अनुभवी ॥ ४२ ॥ अनुभवें बोध स्वयंभ । बोध अनुभव निजलाभ । सद्गुरूकृपा दुर्लभ । हे बोधस्थिती ॥ ४३ ॥ ज्याची कृपा अवचट ज्ञान । ज्याच्या

---

१ पण शेवटीं पूर्ण बोधांत सर्व दृष्टांत वोख्या वगैरे हात टेंकतात. २ पेटींत. ३ जिभेला गोड लागणारा. ४ अत्यंत कठीण, दुर्गम ५ आत्मस्थिति. ६ लाभ. प्राप्ति. ७ ज्या ज्ञानपद्धतीनें स्वरूपावबोध होतो ती पद्धत बोध झाल्यावर नाहींशी होते; जसें स्मरण झाल्यावर विस्मरण कसें होतें हें सांगता येत नाहीं त्याप्रमाणें. ही गोष्ट तृप्तीच्या व प्रकाशाच्या दृष्टांतानें स्पष्ट केली आहे.

ईक्षणीं बोध पावन । ज्याचें अमृतसभापण । मोक्ष पाविजे ॥४४॥ सद्गुरू स्वामी समर्थ । परमार्थसपन्न कृतार्थ । कृपेनेंची तत्वार्थ । पावन केले ॥ ४५ ॥ बोध प्रचिती सकेत त्रय । केवळ स्वामीचें हृदय । कृपामृतसिंधु सदय । हृदयासि आला ॥ ४६ ॥ ता उंचवळोनि सुखें । चालिल्या प्रतीतीच्या मुखें । अवधानीं साठउनि हरिखें । अनुभविजे तो ॥ ४७ ॥ आपुलें स्वरूप अद्वैत । अनुभविजे जाणिवेतीत । अनुभव सिद्ध सकेत । सरला नि.शब्दें ॥ ४८ ॥ हा तत्वता वस्तुबोध । प्रतीतीसी आला आत्मा स्वत. सिद्ध । द्वितीय सकेत अगाध । अध्यात्मस्थिती ॥ ४९ ॥ जेथ शब्दबुद्धीसि अटक । जाणे अनुभवीच येक । ताचि घडमोडीनें विवेक । शब्द बुद्धीसि आला ॥५०॥ युक्तिच अभिनव वैभव । बोधें शृगारिला अनुभव । दृष्टात दार्ष्टांत स्वभाव । प्राजळ करा ॥ ५१ ॥ जैसा शर्करेचा परिपाक । केला सुगरणीनें सकौतुक । गवेंडी अधिकें अधिक । गोडिचि तें ॥ ५२ ॥ उदार हस्तें वाढनी होय । पदार्थही अमृतमय । विशेष आवडीनें हृदय । निवतसे तें ॥ ५३ ॥ बोधसूर्य सकेतप्रत्यय । दिवसरात्रीवीण उदय । प्रकाश तितुका सुधामय । विवर्चितें ॥ ५४ ॥ चराचरें सावकाश । नाहीं प्रमेसी ही अवकाश । घनानंद स्वप्रकाश । अद्वैतबोध ॥ ५५ ॥ अकळ तयाचें निजतेज । उमजनुमजेवीण सहज । द्वैतासी न येता दावी चोज । प्रलयाचें ॥ ५६ ॥ बोध अकळ हा निर्गुण । अकळ अनुभवखूण । अकळ सद्गुरूकृपा पूर्ण । साक्षात्कारी ॥ ५७ ॥ अकळ देवभक्तहृदय । अकळ गुरूशिष्य प्रत्यय । अकळ साधु सवाद स्वयें । अकळ अनुभविती ॥ ५८ ॥ अकळ अभेदभजन । अकळ स्वरूप समाधान । अकळ ग्रथनिरूपण । सद्गुरुमुखीचें ॥ ५९ ॥ याचि प्रतीतीनें पाहता । स त्मण्याची यागता । तपसाधनें

---

१ प्राप्त करून देतें २ निरनिराळे प्रकार केल्यानें ३ (?) पृथ्वी व आकाश यांत पुष्कळ जागा आहे खरी, पण अद्वैतबोधाच्या प्रकाशा पुरती नाही. तो फारच मोठा आहे

करितां । आला प्रातीसी ॥ ६० ॥ जन्मोजन्मींचा संगात । लाधली गुरूसेवा अखंडित । सद्गुरू शिव अनंत । सच्छिष्य जीव तो ॥६१॥ जीव शिव अनादी संगती । अभेदयोग जीवशिवाप्रती । येकोदर नित्य प्रतीती । अखंड सद्यत्वें[१] ॥ ६२ ॥ निजयोगींच वियोग । जीवासी अनोळखी संसर्ग । शिव जाणोनी तो प्रसंग । संरक्षीतसे ॥ ६३ ॥ अनादिवियोगेंचि आलें । त्यास्तव जीवशिवत्व रूढलें । द्वैताद्वैत लाधले[२] । विभाग तो[३] ॥ ६४ ॥ अप्रांत[४] स्वरूपभूमिकेंत । पितृधनें[५] राहिलें गुप्त । जेष्ठसुतांसि[६] तें हृद्गत । लाधलें दैवें ॥ ६५ ॥ कनिष्ठासी तें कळलेंचि नाहीं । जाला भवदरिद्र देहीं । पडिला दुस्तर प्रवाहीं । देहींतीं संस्कारें[७] ॥ ६६ ॥ जीव येकत्वें अनेक । भेदें विस्तारला माइक । नाना जन्मसंस्कार लोक । प्रवृत्ति तितुकी ॥ ६७ ॥ अग्रजें[८] त्या कितीं वेळा । देऊनि निजबोध जिव्हाळा । भवदरिद्रावेगळा । आला करीत चि ॥ ६८ ॥ ते जीवशिव दोघे सुपर्ण । भवतरुवराश्रित पूर्ण । गुरूशिष्यान्वयें करून । ऐक्यासी[९] आले ॥ ६९ ॥ तेंचि पुढें निरूपण । प्रत्ययाचें करूनि श्रवण । स्वरूपबोधाचें लक्षण । अवधारिजे श्रोतीं ॥ ७० ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरूकृपेचा जिव्हाळा । बोधस्थिती हे निवळा । ह्मणे मेरूअनंत ॥ ७१ ॥ द्वितीय रुद्र षष्ठ उल्लास ॥

---

श्रीराम जयराम जयजयराम । श्रीरामसमर्थ शिवमूर्ती । स्वरूपदानें उदारकिर्ती । जीवाची भवदुःखआर्ती । निवारित बोधें ॥१॥ परब्रह्म सनातन । त्या मूळपुरुषाचें धन । धनानुभवेंचि निधनें । दशा तयाची ॥ २ ॥ अभाव भाव संतती । माया अविद्या प्रकृती । उभययोगें प्रवृत्ती ।

---

१ सोबती. २ एकाच मायेपासून झालेले. ३ जीवाला द्वैत मिळालें, आणि शिवाला अद्वैत; अशी भावांत वांटणी झाली. ४ अमर्याद अशा आत्मस्वरूपी दोतांत. ५ आत्मज्ञान. ६ शिवाला. ७ मीं शरीरबद्ध जीव आहें या समजुतीनें. ८ वडील भावानें. ९ मूळ स्वरूपांत लय.

विस्तारली ॥ ३ ॥ गृहीं षड्गुण ऐश्वर्य । अक्षय सुखें भोगी आश्चिर्य । निर्वाणदशेनें चित्सूर्य । ब्रह्मीं आस्तावेला ॥ ४ ॥ आत्मा वै पुत्रे नामेति । तोचि जीवशिव स्थिती । विस्तारला जगतीं । अनेकविध ॥ ५ ॥ शिवासी साक्षत्व देउनी । प्रतिष्ठिलें अधिष्ठानी । मूळपुरुष होउनी । राहिला मुळीं ॥ ६ ॥ तो शिव परमपुरुष । मूळपुरुषाचा मूळपुरुष । त्याचा परपरावंश । त्रिगुण अधिष्ठानें ॥ ७ ॥ असतां सहज परेश । निर्विशेष आणि विशेष । मिळोनि होय सविशेष । प्रकृतियोगें ॥ ८ ॥ पुरुषाचेनि होय प्रकृती । प्रकृतीचेनि पुरुषस्थिती । पुरुषप्रकृतियोग निश्चिती । येणेंप्रकारें ॥ ९ ॥ प्रकृती जन्मवंध्या येक । पुरुष नित्य नपुंसक । संमधेंवीण सोयरीक । कवतुक हें ॥ १० ॥ प्रकृतिपुरुषपाणिग्रहण । जाले हें आश्चिर्य पूर्ण । सावधानींच सावधान । कवण सांगे ॥ ११ ॥ वेदां जाणवलें तें अकळ । सावधान ह्मणती सकळ । भवसंमंध इंद्रजाळ । लग्न विस्तारलें ॥ १२ ॥ नोवरी न देखे तो नोवरा । वरासी न देखे ते सुंदरा । बाह्याकार उभारा । लाविलें लग्न ॥ १३ ॥ तो निर्गुण अचतुर । हे[२] गुणवंतें चतुर । तो अथवेंण अपार । हे बोलकी परा ॥ १४ ॥ तो निश्चळ निर्विकारी । हे चंचळ लोचनविकारी । तो उदासीन सर्वांपरी । हे महालाघवी ॥ १५ ॥ तो इयेशीं विलक्षण । हे आपआपणात सुलक्षण । तयाच्या आश्रयें संपूर्ण । प्रगल्भ होय ॥ १६ ॥ हे सर्वकाळ युवती । तो अतिसूक्ष्म स्थिती । नवल उभय संगती । दिवसराती योग ॥ १७ ॥ श्यामा यौवन मध्यस्था । प्रौढा सकामयोग्यता । निर्गुणासी देखोनी सकामता । चोंटी[६] तया ॥ १८ ॥ केवढें लाघव वश्येचें । पुरुषत्व देऊनि साचें । नित्यउपभोग नपुंसकाचें । संतान वाढवी ॥ १९ ॥ शंढ ठाईंचा नपुंसक । हृदईं कवळून सकौतुकें । कामयोगें कामिक । करी तयातें ॥ २० ॥ जाणोनि पती तो निर्गुण ।

---

१ अस्तास गेला, लय पावला, (अस्त-घर). २ प्रकृति. ३ सत्व, रजस्, तमस् यानीं युक्त. ४ बहिरा, ह्मणन मुका हि. ५ सटाटोप करणारी. ६ त्याच्या अंगीं कर्तृत्व लाविते. ७ गृळचा.

होय तैसीच ते सलग्न । तयातेंचि अनुदिन । अनुभवीतसे ॥ २१ ॥ इतुकेंहि आपुलेचि ठांई । भाऊनि पडिली प्रवाहीं । निर्गुण तो निज हृदईं । कांहीच नेणें ॥ २२ ॥ नित्य येकांत दोघां असे । परि अंगसंग न दिसे । तयासीच करितसे । सार्थक जन्माचें ॥ २३ ॥ नाव रूप ना पदर । तयासीच करी संसार । धन्य पतिव्रता विस्तार । वाढवी त्याचा ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ अहं गुणवती भार्या । मम भर्ता तु निर्गुणः ।
एकांते वसते नित्यं । अंगसंगो न विद्यते ॥ १ ॥

प्रकृतीचें नाटकपण । तयास विसंबेना क्षण । अखंडित अनुसंधान । त्याचेंचि घरी ॥ २५ ॥ तो निस्संगपणें विरक्त । हे विषयेंसि अनुरक्त । तो केवळ स्वरूपें मुक्त । हे लंपट न सोडी ॥ २ ॥ कांहीं न घडे ज्या पासूनि । त्यासि रमवी हे रमणी । अकामकाम कामिणी । संभवीत कामा ॥ २७ ॥ कैसा दुरारोप करूनी । कारण करी निर्गुणीं । अक्षोभ प्रमाद कारणीं । ऐसी प्रमदा ॥ २८ ॥ अबला व्यर्थ बोलिजे । निर्बळासि बळाउनि वोजें । सबळ करी सव्याजें । ऐसी प्रबळ ॥ २९ ॥ अजन्म्यासी जन्म लावी । अकर्म्यासी कर्म भावी । अगुण्यासी गुणें गोवी । सगुण ऐसी ॥ ३१ ॥ त्याचेची पोटीं वर्धमान । त्यासी पोटा आणि संपूर्ण । जैसें आकाशासी कवळून । घटें धरिलें ॥ ३१ ॥ असीं प्रकृती पुरुषें दोघें । मायासंसारयोगें । आलीं विस्तारित अनघें । सैघें प्रपंचीं ॥ ३२ ॥ उपाधी स्थूळ विस्तार । संसार हा वृक्षाकार । याचि वृक्षीं करूनि थार । जीवशिव पक्षी ॥ ३३ ॥ नास्तिक्य संपूर्णपण । वृक्ष वाढला गगन भरून । जगत्कारण परिपूर्ण । तो फळला ॥ ३४ ॥ पुष्प हेतुचें केवळ । लागलें तया कर्मफळ । वृक्षाचें अज्ञान मूळ । सांगणें नलगे ॥ ३५ ॥ त्या वृक्षाश्रित सुपर्ण । असती वृक्ष भरूनि संपूर्ण । दोघे सखे जीव

१ यौवनावस्था. २ सर्व. ३ वासनारूपीं फूल.

प्राणें । तैसेपरि ॥ ३६ ॥ श्रुतिः । द्वा सुपर्णा सयुजा सखाया । कनिष्ठ वृक्षाचीं फळें खाय । तेणें तो मरमरोनि जाय । जन्मजन्मोनि ये पुन्हा वृक्षीं ॥ ३७ ॥ ज्येष्ठ तो वृक्षाचीं फळें न खाय । तेणें न मरेचि तो स्वयें । कल्पांतवरी राहे । वृक्षीं च तया ॥३८॥ दोघे अखंड सहोदर । दोघे अभेद अभ्यंतर । दोघे असंग अगोचर । निजरूपें ॥३९॥ दोघे असतां अजातपक्षी । पक्षा फुटले त्या स्वपक्षीं । येक निश्चळ त्या वृक्षीं । दुजा तो चंचळ ॥ ४० ॥ मुळीं असतां अभेदें । सवतिमत्सराचेनि भेदें । दोघांसि अंतराय प्रमादें । वाढविला ॥ ४१ ॥ येकीशी मायेनें पाळिलें । येकी अविद्येनें चाळविलें । अविद्यायोगें जाहलें । अनर्थासी मूळ ॥ ४२ ॥ दोघां जाली विघडाविघडी । ऐसी अविद्येची प्रौढी । वाढली मूळ कुळवाडी । जीवासी गोविलें ॥ ४३ ॥ जैसीं सेजारीचीं सरोवरें । येक होतीं परस्परें । मध्यें शीमा करूनि निर्धारें । केली वेगळीक ॥ ४४ ॥ अभेदीं भेद वाढला । अग्रीं अभेद तो राहिला । तो शिव स्वपक्षी जाला । निमग्न सुखें ॥ ४५ ॥ जीव भेदें विस्तारला । वृक्षविस्तारासि वेधला । भ्रमर होऊनि लागला । भ्रमीं तेथें ॥ ४६ ॥ लक्ष चौऱ्यांशीं फळें । संख्येसि आलीं जातिकुळें । तया जातीचीं अनेक मूळें । विस्तारलीं ॥ ४७ ॥ सुमन फळीं विहरे । मरे जन्मजन्मांतरें । क्षणभरी न राहे फेरे । करीतसे ॥ ४८ ॥ वृक्षामें तितुकीं पाहे । परत परतोनि मुळासि ये । स्वपक्ष झडोनि होय । दोघे तेव्हां ॥ ४९ ॥ पूर्वजांसी विसरे । अग्रजांसी न स्मरे । शिणशिणोनि अभ्यंतरें । मूर्छित होय ॥ ५० ॥ तेव्हां

---

१ खिस्ती धर्मातील आदिम मनुष्यानें ज्ञान ( वस्तुतःअज्ञान ) फळ खाल्यामुळें त्याला मत्यूला पात्र व्हावें लागलें ही कथा आमच्या जीव शिवपक्ष्यांच्या कथेचेंच रूपान्तर आहे. २ पंख न फुटलेले. ३ आपापल्या बाजूनें. ४ माया आणि अविद्या या दोन सवतींच्या मत्सरानें. ५ शिवाला, ईश्वराला. ६ जीवाला. ७ व्यापार, उद्दीम. ८ जन्मरूपी फळें. ९ गोळा; उडावयास असमर्थ. १० परमात्म्याला. ११ शिवाला.

हृदईंचे कळवळें । अग्रज ये तात्काळें । कुर्वाळूनि करकमळें । सावध करी ॥ ५१ ॥ अपेक्षित तें पुरवी । लळे पाळि जीवींच्या जीवीं । महासंकटीं उठवी । कृपा स्वहस्तें ॥ ५२ ॥ महा दुःखाच्या अतिशईं । अवचट सुखें लवलाहीं । प्रगटोनियां सर्वही । दुःख निवारी ॥ ५३ ॥ प्रतिज्ञा करूनि वारंवार । देऊनियां नाना अवतार । बहुतां प्रसंगीं उद्धार । करितची आला ॥ ५४ ॥ होऊनि सद्गुरू स्वयें । प्रगट करूनी हृदय । अचपेळासी जाय । घेउनियां ॥ ५५ ॥ अमृत पडिलें जैसें धरणी । घेइजे ते उपायें करूनि । असंभाव्य गगनी । जीव भरला ॥ ५६ ॥ शिवकृपेच्या निजकरें । काढितां काढितां येकसरें । सरेचिना व्योमाकारें । असंभाव्य तो ॥ ५७ ॥ महाअग्नींत सांपडलें । काढिले तेंचि हाता आलें । असंभाव्यांतुनि काढिलें । कांहीं येक त्या ॥ ५८ ॥ सद्देल पशूंची दावणी । सुटलें जाय मुक्त होउनी । तैसे या प्रपंचातूनि । जीवासि काढी ॥ ५९ ॥ तयाचे पूर्ण कृपाळुपण । दयेनें येती धांवधांवोन । स्वहस्तें गुणबंधन । मुक्त करी ॥ ६० ॥ ऐसे जीव शिव दोघे । प्रसंगें वर्तत अवघे । आले स्थूळ देहासि बोधें । अनादि संस्कारें ॥ ६१ ॥ त्या जीवेश्वर संपूर्ण । स्मरणक्षेत्र वसऊन । परस्परें ते आपण । ऐक्यासि आले ॥ ६२ ॥ देवभक्त अंतरस्थिती । गुरूशिष्य बोधरीती । सन्मुख बैसउनि प्रीती । संवाद होय ॥ ६३ ॥ स्मरणेंचि मोक्ष होय जगासी । स्मरणक्षेत्र ह्मणावें त्यासी । क्षेत्रयोगें निश्चयेंसी । लाभ जाहला ॥ ६४ ॥ विज्ञान तेज केवळ । अरूणाचल चि कल्लोळ । शिवस्वरूप अचल । त्या शिवक्षेत्रीं ॥ ६५ ॥ ब्रम्हादि देव सकळ । पर्वत वेष्टित अंतराळ । वसोनि विमानी सर्वकाळ । प्रदक्षणा करिती ॥६६॥ तो शिवस्वरूप प्रगटोनि । जाला प्रत्यक्ष अनंतमौनी । मी जीवरूप

१ फार वावऱ्या जीवाला. २ गुरांच्या मोठ्या तांड्यांतून एकाला बाहेर काढणें फार कठीण असतें, त्याप्रमाणें संसारांतून जीवाला काढणें हि कठिण असतें; पण शिव तें दुष्कर काम करतो च.

अनुसंधानीं । तेथेंचि होतों ॥ ६७ ॥ कृपार्णव सद्गुरु अनंते । माझें पूर्ण ठेवणें आईतें । देऊनि मज कृपाहस्तें । सभाग्य केलें ॥६८॥ लाधलों पूर्वजांचा ठेवा । दिल्हा मज अनंतें विसांवा । तोचि पुढपुढती सांगावा । घाटे चित्तीं ॥ ६९ ॥ त्या शिवरूप अनंतें । सांभाळिलें सदयचित्तें । बोधऊनि परतत्त्वें ते । फेरे चुकविले ॥ ७० ॥ अनंत माझी कृपाजननी । अनंत विश्रांतिसंजीवनी । अनंताची दीक्षा पावनी । परम समर्थ ॥ ७१ ॥ अनंत माझा पूर्ण विसांवा । अनंत प्रातीचा पूर्ण ठेवा । अनंत स्वसुखें नित्य नवा । विश्राम देतसे ॥ ७२ ॥ अनंत माझा जीवसखा पूर्ण । अनंत जीवाचें निजजीवन । अनंत प्राणाचा ही प्राण । कैंपक्षी माझा ॥७३॥इष्टमैत्र बंधु सकळ ।जनिता जनक तोचि केवळ । मी तयातें लडिवाळ । लळे पुरवीतसे ॥ ७४ ॥ अनंत कृपेच्या निजकरें । येकायेकी येकसरें । भंगोनि अनादिनिद्रा चेईरें । केलें स्वस्वरूपीं ॥ ७५ ॥ नित्य आत्मबोधप्रचीती । मज सांगोनि पुढतीपुढती । मज दीधली जे विश्रांती । बोलिली न वचे ॥ ७६ ॥ बैसऊनियां समीप । निज हृदईचें स्वरूप । द्रष्टा दर्शनें तद्रूप । अनुग्रह करी ॥ ७७ ॥ दृष्टिवेधें ज्ञान निर्वेध । होय अवचट ऐसा बोध । मी मज माझा शोध । आडळे चि ना ॥ ७८ ॥ अनुग्रहासी कारण । होतें तेंचि असाधारण । मुळींचें मुळींच निष्कारण । करूनि टाकिलें ॥ ७९ ॥ परा उन्मेष अवधान । घेऊनि गेला तो निर्वाण । मी कार्य कैंचा कवण । स्फूर्तीच नसे ॥ ८० ॥ मज मी नुमसोचि ज्ञान । अनुभवेंसीं निदान । अनंतमौनी निर्वाण । ऐसा पहा ॥ ८१ ॥ अवचट स्मरण घेऊनि गेला । सांगणार कोण उरला । निदान बोल्या ते मजला । काय करूं ॥८२॥ सांगणें ऐकणें तितुकें । निदानेंचि कौतुकें । प्रचितीसी येउनि विवेकें । साच लटिकें पाहा ॥ ८३ ॥ प्रवृत्ती अनोनी सरली । स्वरूपता चि भरली । असे निश्चळता उरली । सहजीं सहज

---

१ स्वतःसिद्ध. २ कैवारी. ३ माता. ४ मार्ग. ५ उत्पन्न होत नाहीं.

हृदईंचे कळवळें । अग्रज ये तात्काळें । कुर्वाळूनि करकमळें । सावध करी ॥ ५१ ॥ अपेक्षित तें पुरवी । लळे पाळि जीवींच्या जीवीं । महासंकटीं उठवी । कृपा स्वहस्तें ॥ ५२ ॥ महा दुःखाच्या अतिशई । अवचट सुखें लवलाहीं । प्रगटोनियां सर्वही । दुःख निवारी ॥ ५३ ॥ प्रतिज्ञा करूनि वारंवार । घेऊनियां नाना अवतार । बहुतां प्रसंगीं उद्धार । करितची आज्ञा ॥ ५४ ॥ होऊनि सद्गुरू स्वयें । प्रगट करूनी हृदय । अचपळासी जाय । घेउनियां ॥ ५५ ॥ अमृत पडिलें जैसें धरणी । घेइजे ते उपायें करूनि । असंभाव्य गगनी । जीव भरला ॥ ५६ ॥ शिवकृपेच्या निजकरें । काढितां काढितां येकसरें । सरेचिना व्योमाकारें । असंभाव्य तो ॥ ५७ ॥ महाअग्नींत सांपडलें । काढिले तेंचि हाता आलें । असंभाव्यांतुनि काढिलें । कांहीं येक त्या ॥ ५८ ॥ सहस्र पशूंची दावणी । सुटलें जाय मुक्त होउनी । तैसे या प्रपंचातूनि । जीवासि काढी ॥ ५९ ॥ तयाचे पूर्ण कृपाळुपण । दयेनें येती धांवधांवोन । स्वहस्तें गुणबंधन । मुक्त करी ॥ ६० ॥ ऐसे जीव शिव दोघे । प्रसंगें वर्तत अवघे । आलें स्थूळ देहासि वोघें । अनादि संस्कारें ॥ ६१ ॥ त्या जीवेश्वर संपूर्ण । स्मरणक्षेत्र वसऊन । परस्परें ते आपण । ऐक्यासि आले ॥ ६२ ॥ देवभक्त अंतरस्थिती । गुरूशिष्य बोधरीती । सन्मुख बैसउनि प्रीती । संवाद होय ॥ ६३ ॥ स्मरणेंचि मोक्ष होय जगासी । स्मरणक्षेत्र ह्मणावें त्यासी । क्षेत्रयोगें निश्चयेंसी । लाभ जाहला ॥ ६४ ॥ विज्ञान तेज केवळ । अरूणाचल चि कल्लोळ । शिवस्वरूप अचळ । त्या शिवक्षेत्रीं ॥ ६५ ॥ ब्रम्हादि देव सकळ । पर्वत वेष्ठित अंतराळ । वसोनि विमानी सर्वकाळ । प्रदक्षणा करिती ॥ ६६ ॥ तो शिवस्वरूप प्रगटोनि । जाला प्रत्यक्ष अनंतमौनी । मी जीवरूप

१ फार वावऱ्या जीवाला. २ गुरांच्या मोठ्या तांड्यांतून एकाला बाहेर काढणें फार कठीण असतें, त्याप्रमाणें संसारांतून जीवाला काढणें हि कठिण असतें; पण शिव तें दुष्कर काम करतो च.

अनुसंधानीं । तेथेंचि होतो ॥ ६७ ॥ कृपार्णव सद्गुरु अनंते । माझें पूर्ण ठेवणें आईतें । देऊनि मज कृपाहस्तें । सभाग्य केलें ॥६८॥ लाधलों पूर्वजाचा ठेवा । दिल्हा मज अनंते विसावा । तोचि पुढपुढती सागावा । घाटे चित्तीं ॥ ६९ ॥ त्या शिवरूप अनतें । साभाळिलें सदयचित्तें । बोधऊनि परतत्वें ते । फेरे चुकविले ॥ ७० ॥ अनत माझी कृपाजननी । अनंत विश्रातिसजीवनी । अनताची दीक्षा पावनी । परम समर्थ ॥ ७१ ॥ अनंत माझा पूर्ण विसावा । अनत प्राप्तीचा पूर्ण ठेवा । अनंत स्वसुखें नित्य नवा । विश्राम देतसे ॥ ७२ ॥ अनत माझा जीवसखा पूर्ण । अनंत जीवाचें निजजीवन । अनंत प्राणाचा ही प्राण । कैंपक्षी माझा ॥७३॥इष्टमैत्र बधु सकळ ।जनिता जनक तोचि केवळ । मी तयातें लडिवाळ । लळे पुरवीतसे ॥ ७४ ॥ अनंत कृपेच्या निजकरें । येकायेकी येकसरें । भंगोनि अनादिनिद्रा चेईरें । केलें सत्स्वरूपीं ॥ ७५ ॥ नित्य आत्मबोधप्रचीती । मज सांगोनि पुढतीपुढती । मज दीधली जे विश्राती । बोलिली न वचे ॥ ७६ ॥ बैसऊनियां समीप । निज हृदईचें स्वरूप । द्रष्टा दृष्टानें तद्रूप । अनुग्रह करीं ॥ ७७ ॥ दृष्टिवेधें ज्ञान निर्बंध । होय अवचट ऐसा बोध । मी मज माझा शोध । आडळे चि ना ॥ ७८ ॥ अनुग्रहासी कारण । होतें तेंचि असाधारण । मुळींचें मुळींच निष्कारण । करूनि टाकिलें ॥ ७९ ॥ परा उन्मेष अवधान । घेऊनि गेला तो निर्वाण । मी कार्य कैचा कवण । स्फूर्तीच नसे ॥ ८० ॥ मज मी नुमसेचि ज्ञान । अनुभवेंसीं निदान । अनतमौनी निर्वाण । ऐसा पहा ॥ ८१ ॥ अवचट स्मरण घेऊनि गेला । सागणार कोण उरला । निदान बोलवी ते मजला । काय करूं ॥८२॥ सागणें ऐकणें तितुकें । निदानेंचि कौतुकें । प्रचितीसी येउनि विवेकें । साच लटिकें पाहा ॥ ८३ ॥ प्रवृत्ती अमोनी सरली । स्वरूपता चि भरली । असे निश्चळता उरली । सहजीं सहज

---

१ स्वत सिद्ध. २ फेनारी. ३ माता. ४ जागे. ५ उत्पन्न होत नाही.

ज्ञानाची सत्ता अभिनव । कर्ता कार्यता होय सर्व । जीवशिव भावाभाव। नाना रूढी ॥ ३२ ॥ पुरुष असोनि अभ्यंतरी । बाह्य होय सुंदर नारी । सोंगसंपादणी वरिवरी । करी तैसी च ॥ ३३ ॥ चैतन्याची अभिनव कळा । चेतक जगज्योति जिव्हाळा । पुरुषप्रकृती चिरकाळा । विस्तारली ते ॥ ३४ ॥ समुद्रींचें शुद्धोदक । कुंभ भरिले अनेक । घट संख्येनें कांहीं येक । गणनेसी आले ॥ ३५ ॥ उदकीं नाहीं अनेकता । ऐसी ज्ञानीं अभिन्नता । घटावरणें तत्वता । घटाकारें होती ॥ ३६ ॥ आकाशासी अनेकपण । काय येईल तेणेंकडून । तैंवि भेदसंस्कारें ज्ञान । भेदेल काय ॥ ३७ ॥ अरे जीवासि नाहीं निजज्ञान । प्रत्यक्ष वर्तलें अज्ञान । त्या ज्ञानासी अज्ञान । कोठूनि आलें ॥ ३८ ॥ स्वामी ज्ञानासी अज्ञान कैचें । ज्ञान चि प्रांजळ मुळींचें । त्यावरी अज्ञानाचें । आवर्ण आलें ॥ ३९ ॥ जीवनचक्षूंतील तेज । उदकांच अवरोध सहज । जळदोषें दृष्टि निस्तेज । आभासली ते ॥ ४० ॥ जीवनाचें तेज मुक्ताफळीं । जीवनें चि विपरीत सुढाळी । होय काकणपाणी तात्काळीं । मोलासी उतरे ॥ ४१ ॥ अरे अरे ज्ञानाचा परिणाम । करूनि सांगतोसि सप्रेम । ज्ञान निर्दोष निभ्रम । दोष लाविसी त्या ॥४२॥ स्वामी दृष्टांत तितुका अपूर्ण । मुखासी ह्मणती चंद्रवदन । पाहतां मांसमय दुर्गुण । दुर्गंधीचें ॥ ४३ ॥ अरे या वित्पत्ती वाढविसी । युक्तीचा पाल्हाळ करिसी । पुसिलें तें न सांगसी । ज्ञानाचें अभ्यंतर ॥ ४४ ॥ स्वामी ज्ञानाचें अभ्यंतर । पाहतां वृत्तीसी होय विसर । त्याहि परता पारावार । अंतरस्थितीनें नळगे ॥ ४५ ॥ केवळ ज्ञान वस्तुचें । तेथ मुळींचि नाहीं अज्ञानाचें । अथवा ज्ञानरूप ज्ञानाचें । स्फुरण नसे ॥४६॥ ज्ञानस्वरूप तो ईश्वर । निजरूपें निर्विकार । जगत्कारण संसार । तयांच्या साक्षत्वीं ॥ ४७ ॥ जैसें परिशुद्ध सुवर्ण । अळंकारें ये दुजेपण । पुढीं घालितां दुर्गुण ।

१ कमी होतें. २ थोड्या पाण्याचें ( तेजाचें ). ३ उतरतें, कमी होतें.

झडोनि जाय ॥ ४८ ॥ धुवट सुवर्णासी । क्षय चि नसे निश्चयेंसीं । तेविं मायासंस्कारविशेषीं । परिशुद्ध ज्ञान ॥ ४९ ॥ मुळच्या वायोपासुनी । तेज जालें जगत्कारणी । सीतोष्ण तेज दोनी । क्रमें चालिलें ॥ ५० ॥ उष्ण तेज सूर्य वन्ही । विद्युल्लता आदिकरूनी । तेवि शीत तेजापासुनी । अमृत तारा मेयंक ॥ ५१ ॥ तैसें चि शीत तेजापासुनी । अपार निपजलें पाणी । तया उदकाची धरणी । दोनी प्रकारें ॥ ५२ ॥ नाना रत्नें हिरे परिस । सतेज पाषाण बहुवस । संभवला दुसरा जिनस । मृत्तिकारूपें ॥ ५३ ॥ पाहता अभेदपण मुळीं । भूतभेदें भूमंडळीं । विस्तारलेंसे सकळीं । नाना दृश्य ॥५४॥ अमृतामाजीं चंद्र संभवला । ज्यासंश उदकाचा जाला । परि त्या उदक आणि चंद्राला । भेद असे ॥ ५५ ॥ उदकापासूनि चंद्रकांत । चंद्र ज्यासंशें असंख्यातें । चंद्र ह्मणोनि ज्योतिमंत । अमृत नव्हेती ॥५६॥ तैसा ईश्वर तो पूर्ण चंद्र । स्वानंदसुखाचा पूर्ण समुद्र । सकळांसी होय आल्हादकर । अमृतमय ह्मणोनि ॥ ५७ ॥ जीव चंद्रकांत अनेक । चंद्र होय तयाचा द्रावक । तेविं ईश्वरकटाक्षें संकळिक । जीव द्रवती सुखें ॥ ५८ ॥ प्रत्यक्ष चंद्राच्या किरणीं । चंद्रकांत महापाषाणीं । अवघे अभ्यंतर द्रवोनि । उदक होय ॥ ५९ ॥ तेविं चंद्र कल्पांतवन्हीसी । उदक होय द्रवविशेषीं । स्नेह अग्नियोगें प्रकाशीं । आटोनि जाय ॥ ६० ॥ महाप्रळई निदान । टाकूनि भौतिक अधिष्ठान । ईश्वर होय निर्वाण । परब्रह्म ॥ ६१ ॥ उदकसंबंधें संभवजात । ज्यासंशें चंद्र चंद्रकांत । उभयता अनुबंध साद्यंत । येक लक्षणी ॥ ६२ ॥ पाहतां प्रत्यक्ष दगडें जाण । विघरोनि होय जीवन । तें उदकचि ह्मणोनि पाषाण । प्राशितां नये ॥ ६३ ॥ अद्वैतामृतनिर्झरें । गुरूचंद्रामृतकरें । तंवरी कृतार्थ नव्हे चि निर्धारें । जीवचंद्रकांत ॥ ६४ ॥ सद्गुरुचंद्र हृदयाकाशीं । उदयअस्तुवीण

१ "परिशुद्ध" असा दुसरा पाठ आहे. २ अमृतामारख्या किरणांच्या तारका आणि चंद्र ( मयंक ). ३ पाषाण ( पाठांतर ).

ज्ञानांची सत्ता अभिनव । कर्ता कार्यता होय सर्व । जीवशिव भावाभाव । नाना रूढी ॥ ३२ ॥ पुरुष असोनि अभ्यंतरी । बाह्य होय सुंदर नारी । सोंगसंपादणी वरिवरी । करी तैसी च ॥ ३३ ॥ चैतन्याची अभिनव कळा । चेतक जगज्योति जिव्हाळा । पुरुषप्रकृती चित्कळा । विस्तारली ते ॥ ३४ ॥ समुद्रींचें शुद्धोदक । कुंभ भरिले अनेक । घट संख्येनें कांहीं येक । गणनेसी आले ॥ ३५ ॥ उदकीं नाहीं अनेकता । ऐसी ज्ञानीं अभिन्नता । घटावरणें तत्वता । घटाकारें होती ॥ ३६ ॥ आकाशासी अनेकपण । काय येईल तेणेंकडून । तवि भेदसंस्कारें ज्ञान । भेदेल काय ॥ ३७ ॥ अरे जीवासि नाहीं निजज्ञान । प्रत्यक्ष वर्तलें अज्ञान । त्या ज्ञानासी अज्ञान । कोठूनि आलें ॥ ३८ ॥ स्वामी ज्ञानासी अज्ञान कैचें । ज्ञान चि प्रांजळ मुळींचें । त्यावरी अज्ञानाचें । आवर्ण आलें ॥ ३९ ॥ जीवनचक्षूंतील तेज । उदकांच अवरोध सहज । जलदोषें दृष्टि निस्तेज । आभासली ते ॥ ४० ॥ जीवनाचें तेज मुक्ताफळीं । जीवनें चि विपरीत सुढाळी । होय काकणपाणी तात्काळीं । मोलासी उतरे ॥ ४१ ॥ अरे अरे ज्ञानाचा परिणाम । करूनि सांगतोसि सप्रेम । ज्ञान निर्दोष निभ्रम । दोष लाविसी त्या ॥४२॥ स्वामी दृष्टांत तितुका अपूर्ण । मुखासी ह्मणती चंद्रवदन । पाहतां मांसमय दुर्गुण । दुर्गंधीचें ॥ ४३ ॥ अरे या वित्पची वाढविसी । युक्तीचा पाल्हाळ करिसी । पुसिलें तें न सांगसी । ज्ञानाचें अभ्यंतर ॥ ४४ ॥ स्वामी ज्ञानाचें अभ्यंतर । पाहतां वृत्तीसी होय विसर । त्याहि परता पारावार । अंतरस्थितीनें नळगे ॥ ४५ ॥ केवळ ज्ञान वस्तुचें । तेथ मुळींचि नाहीं अज्ञानाचें । अथवा ज्ञानरूप ज्ञानाचें । स्फुरण नसे ॥४६॥ ज्ञानस्वरूप तो ईश्वर । निजरूपें निर्विकार । जगत्कारण संसार । तयांच्या साक्षत्वीं ॥ ४७ ॥ जैसें परिशुद्ध सुवर्ण । अळंकारें ये दुजेपण । पुटीं घालितां दुर्गुण ।

१ कमी होतें. २ थोड्या पाण्याचें ( तेजाचें ). ३ उतरतें, कमी होतें.

झडोनि जाय ॥ ४८ ॥ धुवट सुवर्णासी । क्षय चि नसे निश्चयेंसीं । तेवि मायासंस्कारविशेषीं । परिशुद्ध ज्ञान ॥ ४९ ॥ मूळच्या वायोपासुनी । तेज जालें जगत्कारणी । सीतोष्ण तेज दोनी । क्रमें चालिलें ॥ ५० ॥ उष्ण तेज सूर्य वन्ही । विद्युल्लता आदिकरूनी । तेवि शीत तेजापासुनी । अमृत तारा मयंक ॥ ५१ ॥ तैसें चि शीत तेजापासुनी । अपार निपजलें पाणी । तया उदकाची धरणी । दोनी प्रकारें ॥ ५२ ॥ नाना रत्नें हिरे परिस । सतेज पाषाण बहुवस । संभवला दुसरा जिनस । मृत्तिकारूपें ॥ ५३ ॥ पाहतां अभेदपण मुळीं । भूतभेदें भूमंडळीं । विस्तारलेंसे सकळीं । नाना दृश्य ॥५४॥ अमृतामाजीं चंद्र संभवला । ज्यालंश उदकाचा जाला । परि त्या उदक आणि चंद्राला । भेद असे ॥ ५५ ॥ उदकापासूनि चंद्रकांत । चंद्र ज्यालंशें असंख्यात । चंद्र ह्मणोनि ज्योतिर्मंत । अमृत नव्हेती ॥५६॥ तैसा ईश्वर तो पूर्ण चंद्र । स्वानंदसुखाचा पूर्ण समुद्र । सकळांसी होय आल्हादकर । अमृतमय ह्मणोनि ॥ ५७ ॥ जीव चंद्रकांत अनेक । चंद्र होय तयाचा द्रावक । तेवि ईश्वरकटाक्षें सकळिक । जीव द्रवती सुखें ॥ ५८ ॥ प्रत्यक्ष चंद्राच्या किरणीं । चंद्रकांत महापाषाणीं । अवघे अभ्यंतर द्रवोनि । उदक होय ॥ ५९ ॥ तेवि चंद्र कल्पांतवन्हीसी । उदक होय द्रवविशेषीं । स्नेह अग्नियोगें प्रकाशीं । आटोनि जाय ॥ ६० ॥ महाप्रळईं निदान । टाकूनि भौतिक अधिष्ठान । ईश्वर होय निर्वाण । परब्रह्म ॥ ६१ ॥ उदकसंबंधें संभवजात । जालंशें चंद्र चंद्रकांत । उभयतां अनुबंध साद्यंत । येक लक्षणी ॥ ६२ ॥ पाहतां प्रत्यक्ष दगडें जाण । विवरोनि होय जीवन । तें उदकचि ह्मणोनि पाषाण । प्राशितां नये ॥ ६३ ॥ अद्वैतामृतनिर्झरें । गुरुचंद्रामृतकरें । तंवरी कृतार्थ नव्हे चि निर्धारें । जीवचंद्रकांत ॥ ६४ ॥ सद्गुरुचंद्र हृदयाकाशीं । उदयअस्तुवीण

---

१ "परिशुद्ध" असा दुसरा पाठ आहे. २ अमृतासारख्या किरणांच्या तारका आणि चंद्र ( मयंक ). ३ पाषाण ( पाठांतर ).

संवाद वेडावले । जेथें इतिहास खुंटले । सर्व कांहीं ॥ १० ॥ या कारणें स्वरूपज्ञान । कोण्हासीच नव्हे प्रमाण । वेक गुरुकृपेवीण । अकळ चि तें ॥ ११ ॥ गुरुकृपेचें सामर्थ्य प्रबळ । अकळ चि कळे तात्काळ । सद्गुरुकटाक्षें निवळ । होय सर्व हि ॥ १२ ॥ लागतां सद्गुरुचरणीं । तत्वतार्थ येती श्रवणीं । सकळ सुखाची भरणी । भरे अंतरीं ॥ १३ ॥ दयाळ सद्गुरुस्वामी । सद्भावें आठवे अंतर्यामीं । तरि विश्रांती निजठगर्मी । संगम होय ॥ १४ ॥ जें अवचट सुख अप्रांत । गुरुदर्शनें चि होय प्राप्त । अष्टभावमरण अमित । होय सहवासें ॥ १५ ॥ सकंपप्रेमाश्रुपूर्ण । देतां क्षेम स्वामीनें अभिन्न । तें चि स्वरूपदशाअवतरण । अवतरे शिष्यासी ॥ १६ ॥ सद्गुरुमहिमेची नवाई । विदेहदशेनें हृदईं । संचरे महासमाधिठाईं । अद्वैतसिद्धी ॥ १७ ॥ सद्गुरुअभयंकरें । दुर्घट भव वोसरे । सैवीजेंसीं मरण मरे । संभवे स्वरूपें ॥ १८ ॥ आपआपणातें चुकला । जीवासी निजजीव भेटला । सद्गुरु प्रत्योपकाराला । कांहीं च नसे ॥ १९ ॥ निज अधिष्ठानीं च्यवला । अज्ञानअध:पाता आला । सद्गुरुबोधें चि जाला । पदारूढ तो ॥ २० ॥ टाकूनि स्वरूपधरा अढळ । बुडतां भवजळीं तात्काळ । काढूनि स्वकरें आकळ । पदीं स्थापिला ॥ २१ ॥ स्वराज्यापासूनि भ्रष्टला । भवदरिद्री जीव जाला । पुन्हा स्वराज्यीं स्थापिला । सद्गुरुवर्यें ॥ २२ ॥ भवअरण्यवणवा । मृगकुटुंबिया जीवा । निववीलें सद्गुरूनें ॥ २३ ॥ भवतोषविष वर्पोन स्वानंदें तेव्हां । दारुण । इछ्यां सेऊनि पावे मरण । त्यासि कृपामृतकरें पूर्ण । अमर केलें ॥ २४ ॥ इछा अहंपर्वतारोहण । तैसें चि पावत होता पतन । करूनि कृपेचें ।विद्विमान । पतन वारिलें ॥ २५ ॥ काळसर्पें जीव

१ मूळस्वरूपीं. २ आश्चर्य. ३ वासना समूळ नष्ट होतात आणि पुनः स्वरूपप्राप्ति होते. ४ गुरुकृपेनें पूर्ण अद्वैत बाणलें खरें, पण त्यामुळें गुरूच्या उपकाराची फेड करावयाला कांहीं च शिल्लक राहिलें नाहीं. ५ भ्रष्ट झाला. ६ स्वस्वरूपीं स्थित. ७ वाटेल तितकें, स्वेच्छेनें. ८ आपल्या च इच्छेनें.

डंखिला । तो तत्समई ठाईं च उतरला । सद्गुरु मंत्रवादी भला । पावला तात्काळ ॥ २६ ॥ भयक्षयरोग दारुण । जीवासी जाला मुळींहून । देऊनि कृपारसायन । रक्षिला गुरुधन्वंतरीनें ॥ २७ ॥ कामक्रोधादि निशाचरीं । जीववनचर पाडिले समरीं । कृपामृतघनांबरीं । ते गुरु-बोधेंद्रें उठविले ॥ २८ ॥ ऐसे परोपरीचे सांभाळ । करीत आला गुरु कृपाळ । पतितपावन प्रणतपाळ । काय ह्मणावें तया ॥ २९ ॥ स्वानंदें अनुग्रहीत जेव्हां । सकळार्थ वोळती तेव्हां । केवळ स्वरूप-विसांवा । सद्गुरुस्वामी ॥ ३० ॥ सद्गुरुकृपेची वेळा । वाहे अमृत-नदी खळाळा । सदोदित उजाळा । सूर्यचंद्रेंवीण ॥ ३१ ॥ अखंड आश्चिर्याची पाहाट । दृश्य तेजेंवीण लखलखाट । घनानंदें वनवट । होय चिदंबर ॥ ३२ ॥ वसुधा चिद्वसू चि होय । उदक अमृतप्रवाह । परिस चिंतामणि ज्योतिर्मय । खडे होती ॥ ३३ ॥ कल्पतरुपडिपाडें । फळती आंगणींचीं झाडें । रत्नगर्भा नियाडें । रत्ने चि प्रसवे ॥ ३४ ॥ ऐसिये प्रचीतीचा काळ । होय भववृत्तीचा दुष्काळ । स्वरूपसुखाचा सुकाळ । स्वानंद वर्ते ॥ ३५ ॥ ईक्षण भाषण स्पर्शन । गुरुअनुग्रहण प्रमाण । त्रिविध दीक्षों पावन । करीत सकळां ॥ ३६ ॥ ईक्षणदीक्षालक्षण । जैसे कूर्मिणीचें पाहणें । स्तनपानेंविण संरक्षण । पिलियाचें करी ॥ ३७ ॥ स्वरूपधरांबरधारिणी । सद्गुरु हे आदिकूर्मिणी । लोकत्रयसंवर्धनी । निजकटाक्षें ॥ ३८ ॥ ईक्षणामृतपानें । सच्छिष्य वांचले स्वस्थितीनें । ईक्षणदीक्षाकृपेनें । अमर जाले ॥ ३९ ॥ इक्षणें चि भवरोगनिवृत्ति । ईक्षणें चि सत्स्वरूपप्राप्ति । सद्गुरुईक्षणें चि अनुभविती । महासमाधि-सुखें ॥ ४० ॥ आतां भाषणदीक्षामहिमान । जें निःशब्दाचें अधि-ष्ठान । तें महावाक्य सांगोन । प्रत्यक्ष करी ॥ ४१ ॥ मंत्ररहस्य बी-जाक्षरें । अनाक्षर ब्रह्म चमत्कारें । प्रत्ययासी येऊनि विस्तारें । अक्षरें

१ तात्काळ ( पा० ). २ प्रकाश. ३ पृथ्वी. ४ तीन प्रकारच्या दीक्षेनें. ५ कूर्म दृष्टीनें सांभाळी ॥ तुकाराम. ६ आत्मस्वरूपरूपी पृथ्वी व आकाश यांना आ-धार देणारी. ७ 'तत्त्वमसि' इत्यादि महावाक्यरूप मंत्राच्या उपदेशानें.

चालती ॥ ४२ ॥ करितां गुरुमुखींचा मंत्रोच्चार । पळोनि जाय भव-अपस्मार । देशिकमंत्रें भवविस्तार । निरसोनि जाय ॥ ४३ ॥ गुरु-मंत्रप्रसन्नता । कामवृश्चिक न बाधी चित्ता । क्रोधव्याघ्र सर्वथा । बाधा न करी ॥ ४४ ॥ सद्गुरुमहावाक्यश्रवणें । शोकसिंधु उतरणें । देशिकबोधगभस्तीनें । मोहतम सरे ॥ ४५ ॥ सद्गुरुवाक्यअभयें । निरसोनि जाय भवभय । मंत्रदीक्षा तरणोपाय । भवसंकटीं ॥ ४६ ॥ आतां स्पर्शदीक्षा ते ऐसी । परिस लागतां चि धातूसी । काळिमा निरसूनि प्रकाशी । सुवर्णछाया ॥ ४७ ॥ सुवर्णें नव्हे सुवर्णसिद्धी । परिसाचेनि पारिस नव्हे प्रसिद्धी । गुरुसंस्कारें भवाब्धि । शिष्य तारितां होय ॥ ४८ ॥ स्पर्शतां सद्गुरुसूर्यकर । शिष्य सूर्यकांति प्रखर । प्रगटे ज्ञानवैश्वानर । तात्काळ तो ॥ ४९ ॥ सद्गुरुचंद्रामृतकरें । शिष्य सोमकांत साक्षात्कारें । स्वानंदसुख जिव्हारें । पाझरे सर्वांगीं ॥ ५० ॥ गुरुदया मलयमारुत । निववी हृत्ताप समस्त । गुरुकृपांबर संतत । भवशीत निवारी ॥ ५१ ॥ गुरुकृपा अजरामर । बोधक राजसंस्कार । निववी निजजिव्हारें । समाधितल्पें ॥ ५२ ॥ सद्गुरु निजजननी । स्वानंदकवळ करूनि । घालित श्रवणवदनीं । संवर्धीत ॥५३॥ मस्तकीं कृपापद्मकर । कुर्वाळूनि दे सुख अपार । भवक्षुधासंस्कार । बाधी च ना तेणें ॥ ५४ ॥ सद्गुरु कपिलें सौरसें । पान्हा घालूनि सुधारसें । शिष्यवत्सासि वोरसें[15] । संवर्धन करी ॥ ५५ ॥ वोळली सुभरें वृष्टि करी । वत्सतृप्ति जालियां हि वरिवरी । कृपाक्षीराभिषेक-धारीं । परमसुखें वर्षतसे ॥ ५६ ॥ सावरे चि ना पान्हा अमोघ । चाळिले निजांगावरूनि वोघ । कृपां हुंबरोनियां दीर्घ । रसनेनें चाटी

---

१ गुरुमंत्रें ( पा० ). २ सद्गुरु ( पा० ). ३ काळा रंग. ४ सोन्याचें तेज. ५ लोहपरिसाची न साहे उपमा । सद्गुरुमहिमा अगाध चि ॥ तुकाराम. ६ इतरांना तारावयास समर्थ. ७ चंद्रकांत मणि. ८ झरे. ९ गुरुकृपारूप वस्त्र. १० आत्मस्वरूपाचें ज्ञान करून देणारा श्रेष्ठ उपाय. ११ अंतःकरण. १२ समाधिरूप शयनानें. १३ कर्णरूप मुखांत. १४ गाय. १५ प्रेमयुक्त पान्हा देऊन.

॥ ५७ ॥ सद्गुरु स्नेहाळ पक्षिणी । बोधचारा चुंचु भरूनि । शिष्यपिलियाचे वदनीं । घालूनि वर्धवी ॥ ५८ ॥ अजन्मजन्मींची क्षुधा । निरसूनि गेली भवबाधा । सद्गुरुकृपावसुधा । सर्वस्व पाळी ॥ ५९ ॥ ऐसी गुरुकृपा पाहें अनंत । सर्वकाळीं सदोदित । अक्षयसुखें सांभाळित । सर्वत्र असे ॥ ६० ॥ गुरुकृपा अजरामर । अपरोक्ष संजीवनी सार । अक्षयस्वरूपें साचार । उपचारी-तसे ॥ ६१ ॥ सर्वगत सर्वा ठाईं । असोनि असे चि ना कांहीं । जे नामेना कल्पांतीं हि । अखंडितपणें ॥ ६२ ॥ तें परब्रह्म सनातन । सद्गुरुकृपेचें महिमान । निजप्रतीतिसमाधान । दैयेनें दिधलें ॥ ६३ ॥ स्वानंदबोध ऋद्धिसिद्धी । बोळगण्या होती समाधी । नित्यानंदसमृद्धि । सद्गुरुकृपा ॥ ६४ ॥ सद्गुरुकृपा मोक्षश्री मंगळ । गुरुकृपा नित्योत्सवें श्री अखिल । सद्गुरुकृपा प्रसन्न केवळ । स्वरूपता चि ते ॥ ६५ ॥ सद्गुरुकृपा मंगळायतन । सद्गुरुकृपा विजयश्री संपूर्ण । सद्गुरुकृपेसी देऊनि श्रवण । श्रवण कीजे ॥ ६६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । अनंतगुरुदीक्षेची लीला । ह्मणे मेरूअनंत ॥ ९ ॥ द्वितीयरुद्र । नवमोल्हासः ॥९॥

---

॥ श्रीराम ॥ समर्थें कृतोपकार । केला माझा सर्वस्वें उद्धार । निजानुभवें वारंवार । उच्चार होतसे ॥ १ ॥ समर्थदीक्षा निजबोध । ब्रह्मपिसाटचर्या निर्वेध । भवावरोध मूळें शोध । सहज होय ॥ २ ॥ स्वरूपवेधें अंतर घेतलें । स्वरूपवेधें अवरोधिलें । स्वरूपवेधें वर्तविलें पिशाच्यापरी ॥ ३ ॥ स्वरूप स्वानंद उन्माद । विगतमति होय संवाद । संवादीं स्वानंदकंद । प्रकट चर्या ॥ ४ ॥ अपभ्रंशबुद्धिविहीन । बोध दृढावला गहन । जैसें पुरविलें गगन । सर्वांतरीं ॥ ५ ॥ बोध चित्कळो पवमान । पुरवला सर्वांतरीं प्राण । बोध ज्ञानाग्नि संपूर्ण । गुप्त प्रगट

---

१ कृपेनें (पा०). २ आत्मस्वरूपाच्या वेडांतील वर्तन. ३ संसाराचा निरोध. ४ आत्मस्वरूपाचा शोध. ५ ज्ञानरूप चैतन्य. ६ वायु.

असे ॥ ६ ॥ बोर्ध चित्कळा जीवन । जीवश्री सकळांसी समान । बोध
धरणी सनातन । वाहे सर्वत्रांसी ॥ ७ ॥ या बोधाब्धींत बुडविले ।
जीव घेऊनि जीवविले । मनोवाचा अपहारिले । सर्वस्वेंसीं ॥ ८ ॥
तुमसे आपपर हे स्पष्ट । सैरोट विचरे पिसाट । महामौन्यमुद्रा अव-
चट । वदों लागे ॥ ९ ॥ अकल्पित निजसंस्कारें । महाविभ्रमांत
अत्यादरें । त्या सगुणसाक्षात्कारें । सांभाळिलें ॥ १० ॥ महा अद्वैत-
दशा उन्मत । निर्विकल्पता उन्मनी अप्रांत । विदेहवेधें होतां मूर्छित ।
ठाईं ठाईं ॥ ११ ॥ नित्य स्वानंदमोजिरें । उन्माद अवस्थेच्या भरें ।
वेध मदवारण विचरे । दिशी अतिक्रांत ॥१२॥ नित्य प्रतीतिशृंखळा ।
तोडूनि विशृंखळ तो लीलीं । महा मस्तीचा रोध उन्हाळा । घेतसे
भद्रजाती ॥ १३ ॥ विगतबोधावबुद्धि पूर्ण । भरे प्रज्ञारण्यांत
दारुण । तो बोधवेध असाधारण । आवरिला जेणें ॥ १४ ॥ नित्य
सगुण प्रेमा स्वयें । सांभाळूनि आत्मत्वें स्नेह । अनुभवामृत चंद्रोदय ।
करी प्रसन्नतेचा ॥ १५ ॥ मूर्छित भाव सकळ करणीं । रिचोनि शी-
तळ अंतःकरणीं । रामचंद्रामृतकिरणीं । स्वस्थितीसी आणिलें ॥ १६ ॥
करुणामृत दयासांद्रें । सावध केलें रामचंद्रें । नित्यनेम कृपासमुद्रें ।
दिल्हें रहस्य भक्तीचें ॥ १७ ॥ विज्ञानीं आटलियां मति । कैंचें भक्तीचें
रहस्य त्यांप्रति । आपुलें ह्मणऊनि श्रीरघुपति । पावला तात्काळ ॥१८॥
त्या जगजनकाची लीला । काय वर्णूं मी वेळोवेळा । अपार दया कीं-
र्तीची कळा । चित्कळा निधीची ॥ १९ ॥ स्वरूपज्ञानें स्वभावस्थिति ।
निरसोनियां भवभ्रांती । निर्भवता विभ्रमस्थिति । उन्माद भरे ॥ २०॥
नित्यमुक्त वरांगनीं । नित्यभोगा अरोचुक असेना । सगुणभजनभा-

१ ज्ञानरूप चैतन्य. २ ज्ञानरूप पृथ्वी. ३ धारण करते. ४ अद्वातद्वा. ५ आत्मानंदाचा मद. ६ दाही दिशांपलीकडे. ७ सहज. ८ उत्तम वृत्ती. ९ या ज्ञानाभिमानाच्या योगानें मत्त झालेल्याला ताळ्यावर आणण्याविषयीं निवृत्तिरामांतील शुकाची कथा पहा. १० इंद्रियांत. ११ दयेनें भरलेल्या मेघानें (सांद्र-मेघ). १२ शुकाची अशी च स्थिति प्रथम झाली होती. पण जनकानें पुढें त्याला योग्य उपदेश करून वाटेवर आणिलें. वरील टीप (९) पहा. १३ सुंदर स्त्री. १४ आवड.

वना। विसरोनि जाय ॥ २१ ॥ सद्गुरूची उत्तीर्णता। विसरोनि जाय तत्वता। सगुण उपासना सप्रेमता। राखेल कवण ॥ २२ ॥ या कारणें भजनासी रक्षण। सगुणाचें आराधन। उपासना नित्य प्रसन्न। गुरुकृपा ॥ २३ ॥ या कारणें सद्गुरुदयाळें। संभऊनि सद्भाव जिव्हाळें। दिल्ही उपासना जे न चळे। उपासकसद्भावें ॥ २४ ॥ काम्य उपासनेनें मंत्र चळे। अन्य उपासना भ्रष्टती तात्काळें। निःष्काम राम स्वलीळें। प्रतिष्ठिला सद्गुरूनें ॥ २५ ॥ राममंत्रउपासना। रामरूप आणिजे ध्याना। राम प्रत्यक्ष ब्रह्मज्ञाना। संरक्षिता होय ॥ २६ ॥ सर्वांपरी परिशुद्ध उपासना। दुजी ब्रह्मांडांत असेना। आ-जेंवी कैलासराणा। महाभक्तिसुखें ॥ २७ ॥ नित्य नामामृतपान। करितां शिव स्वानंदघन। त्या चि तृप्तीनें आनंदवन। महास्मशानें[1] व-सवी ॥ २८ ॥ त्या सदाशिवाची प्रसन्नता। रामउपासकासी तत्वता नित्य बंधुत्वें सांभाळिता। होय निजयोगें ॥ २९ ॥ सकळार्थे[2] उपदेश मूळ। तारकब्रह्म हें केवळ। भावें जपतां सर्वकाळ। यहपरें[2] सांभाळी ॥ ३० ॥ या उपासनेचा अंतरभाव। सांभाळितो भाविकांचा राव। नित्य प्रसन्न करुणार्णव। मंत्र श्रवणीं सांगे ॥ ३१ ॥ श्री शब्दबीज पुरस्कर[3]। सकळ सिद्धींचें जिव्हार। त्यावरी जय बीज निर्धार। भव-जयाचा[4] ॥ ३२ ॥ त्याहिवरी जयजय बीज। स्वरूपविजयाचें तेज। त्रिकर्णशुद्धीनें[5] मंत्रराजें। उच्चार तीनी वेळां ॥ ३३ ॥ त्रिपदांचें[6] तत्व-जिव्हार। त्रिगुणाचें[7] अभ्यंतर। त्रिमूर्तीचें[8] साचार। हृदय प्रगटलें ॥ ३४ ॥ साक्षत्व सुखाचेंळशिखरीं[9]। निरंतर सहजासनावरी। आसन घालूनि रामाक्षरीं। उच्चार होय ॥ ३५ ॥ वेध अन्वय ना कांहीं संगति। रामाक्षरें चि पुडती पुडती। प्रेमसमुद्रीच्या लहऱ्या येती। जयजय-

१ स्मशानांत. २ इहपरलोकीं. ३ पूजार्थक, सन्मानार्थक. ४ संसार जिंकि-ल्याची खूण. ५ 'श्रीराम जयराम जयजयराम' हा श्रेष्ठ मंत्र. ६ 'अहं ब्रह्मास्मि, तत्त्वमसि, ब्रह्मविद्ब्रह्मैव भवति' इत्यादि तीन शब्दांच्या महावाक्याचें. ७ सत्वर-जस्तमस् हें ज्याचें रूप आहे अशा मायेचें. ८ ब्रह्मा, विष्णु, महेश रूपी मूर्तीचें. ९ सुखरूप पर्वताच्या माथ्यावर.

जगीं ॥ ७० ॥ मज काय तुजवीण चाड । तुवां चि लाऊनि आपुलें वेड । शेखीं उपेक्षिसी निवाड । कळों येईल तुझा ॥ ७१ ॥ रसलासी न बोलसी कां रे । विश्वश्रवणीं अैकतोसि कीं रे । नभा येवढा कान बा रे[1] । झांकशील कैसा ॥ ७२ ॥ टाकूनि निर्गुणाची सोय । दृष्टि उघडूनि मजला पाहें । सर्वदा ध्यानस्थ काय । बैससी आतां ॥ ७३ ॥ तुजला ध्याताती योगी । आणि ध्यान कोणाचें तुजलागीं । ऊठ सांभाळीं मजलागीं । आत्मया रामा ॥ ७४ ॥ प्रगटोन अष्टभावभरें । आंगासि येई रघुवीरे । शंका टाकूनि अवतरें । सप्रेममुखें ॥ ७५ ॥ स्वभावस्थितीनें अभिराम । आंगीं भरला रघोत्तम । निद्रा टाकूनि जयराम । जागवा कीर्तनीं ॥ ७६ ॥ फुटली पाहाट दिशा सोज्वळ । रामसंकीर्तनीं प्रेमळ । रामचरित्रें निवळ । राम सर्वत्रांसी ॥ ७७ ॥ रामकीर्ति मी गाईन । रामरूप मी पाहीन । रामपदीं मी राहीन । निश्चळ आतां ॥ ७८ ॥ बुडालों रामार्णवीं आतां । कोण काढील मज तत्वता । ब्रह्मानुभवसमता । विराली रामीं ॥ ७९ ॥ संपूर्ण सज्जनाचे मेळ । गेले रामार्णवीं सकळ । राम राम म्हणतां तात्काळ । राम चि जाले ॥८०॥ राम जाले सकळ श्रोते । राम जाले सर्व हि वक्ते । राम जाले अनुभविते । अनुभवेंसीं तात्काळ ॥ ८१ ॥ रामरूप रामसोहळा । रामस्थिति रामजिव्हाळा । रामानुभव रामलीला । संपूर्णतेच[1] ॥ ८२ ॥ श्रीरामें वेधली वृत्ति । श्रीरामें रोधली प्रवृत्ति । श्रीरामें बोधली निंवृत्ति । उच्चार होतसे ॥ ८३ ॥ पिसें[2] सादें[3] घालूनि वरळे । तयाचें तयासी न कळे । मां इतरासी काय कळे । तयाचें हृद्गत ॥८४॥ अर्थ ना अर्थउत्पत्ति । ग्रंथ ना ग्रंथाची संगति । राम राम या चि छंदस्थितीं । वळिली माळा ॥ ८५ ॥ अैसें भावेल अंतःकरणीं । तरी हे विपरीत करणी । पाणी वाहेल धरणीं । परि आकाशीं न चढे ॥८६॥

---

१ सर्व विश्व हा च तुझा कान त्यानें. २ वेडा मनुष्य. ३ शब्द, हाक. ४ मग.

उर्ध्व चालिलें जीवन । जगासी वाटेल विपरीत पूर्ण । कितीयेक भविष्यें दुश्चिन्ह । विपरीत भाविती ॥ ८७ ॥ वित्पत्तिजाणिवेच्या बळें । सहसा प्रेम हें ना कळे । केवळ सात्विकें प्रेमळें । निवतील येथें ॥८८॥ जगज्जीवन राम केवळ । तेणेंवीण तयासी तळमळ । जेसें जळातूनि काढिता तात्काळ । प्राण सोडिती मच्छ ॥ ८९ ॥ तेवि श्रीरामेंवीण तळमळ । न रुचे वित्पत्तीचें वाक्‌जाळ । रामप्रेमामृत निवळ । पान करिती ते ॥ ९० ॥ भक्तिरहस्य अभ्यतर । केवळ भाविकाचें जिव्हार । रामस्मरणें चि अगोचर । सुखें दाटती ॥ ९१ ॥ न लगे तत्वविचारणा । न करणें समाधिधारणा । राम येता चि श्रवणा । निर्विकार होती ॥ ९२ ॥ मिटले भववित्पात्तिउपचारा । ह्मणती श्रीरामासी पाचारा । त्या जिवलगासी विचारा । केवळ प्रेम ते ॥ ९३ ॥ पडता भ्रांतीचे भुरेंरें[1] । मग काहीं च चित्त नावरे । तत्व आडरानीं भरे । येक रामेंवीण ॥ ९४ ॥ रामेंवीण निवळ नव्हे ज्ञान । रामेंवीण कायसें समाधान । रामेंवीण सर्व साधन । बंधन चि होय ॥ ९५ ॥ श्रीराम कैंवारी करा रे । जयराम ह्रुदईं धरा रे । जयजयरामें तरा रे । भवसिंधूसी ॥ ९६ ॥ राम परेवरी गिरा रे । राम अभ्यंतरीं भरा रे । अभिरामें धरा रे[2] । चिद्गगनासी ॥ ९७ ॥ रामें संसार विसरा रे । येथूनि अवघे चि सरा रे । सत्यसकल्पीं पुरा रे[3] । रामावाचूनि ॥९८॥ आत्माराम आवरा रे । रामें मन सावरा रे । काम कुमित्र बावरा रे । नातळा[3] तयासी ॥ ९९ ॥ रामें सवेग धरारा । सद्गदित अंग गरारा । भोवंडीनें रोमांच्य भरारा । थरकती प्रेमें ॥ १०० ॥ सप्रेम डोळां वाहे जीवन । रामें अवधारिलें पूर्ण । सर्व हि राम चि होऊन । बिस्तारला ॥ १०१ ॥ विचक्षण जाले प्रेमळ । पालटले देहभाव सकळ । रामरूप चि अखिल । दिसों लागलें ॥ २ ॥ रामनिजध्यासें उन्मनें[4] । चालिलें हें निरूपण । ग्रंथसगति टाकून । भरलों रानीं ॥ ३ ॥ जैसें हिरवाळलें रान । देखोनि पशु भरें भरीं जाण । मागें न पाहता परतोन ।

१ भुरळ, मोह. २ (२) परावाचेच्या पलिकडाल वाणीनें ह्मणा. ३ शिवू नका. ४ उत्सुकतेचे

जाय सवेग ॥ ४ ॥ तैसा चारा वैखरीसी । सांपडला राम सुखेंसीं । तेणें आरामें निश्चयेंसीं । भरीं भरलों ॥५॥ भक्त ध्यानीं विगुंतला । तन्मय होऊनि राहिला । कवणें आणावें तयाला । देहबुद्धीसी ॥६॥ जेविं सुस्वर रागोद्गारीं । लोधैती मृगें अभ्यंतरीं । चारा विसरोनि मधुरस्वरीं । वेधती संपूर्ण ॥ ७ ॥ पक्षी वायोच्या धारेसे । धावेसीं पडिलें आकाशें । तें परते चि ना जैसें । तैसें हें अवधान ॥ ८ ॥ सर्व साहित्याच्या सृष्टि । कुर्वाळिल्या परिहारदृष्टीं । रामघनानंदवृष्टि । स्वानंदें होतसे ॥ ९ ॥ अखिल सुखाचें सुख गाळीव । पाहतां श्रीराम चि वरव । लावण्यासी अभिनव । दृष्टि आली ॥११०॥ आनंदसिंधुमथित सोमें । चिद्गगनस्थ अभिराम । विश्रांतीचें निजधाम । रूपें प्रगटला ॥ ११ ॥ अेक साधनजीवें । मुमुक्षता हे चि सद्भावें । हा चि उपदेश स्वानुभवें । प्रत्यक्ष जाला ॥१२॥ भविष्येंचि राम प्रगटला । तयाउपरि अवतरला । तैसें हे मुमुक्षतेला । रामें प्रेरिलें ॥ १३ ॥ जंवरी हें प्रेम नाहीं । तंवरी उपदेश करितां हि । कृतार्थता कांहीं हि । घडे चि ना ॥ १४ ॥ माझें मज बोधविलें । श्रीरामें अभिनव केलें । अवचट वाटेसी आलें । काय करूं ॥ १५ ॥ श्रवणीं घ्याल तरी घ्याल सुखें । न घेतां कोण शिणेल दुःखें । श्रीरामें निजमुखें । सांगितलें मज ॥ १६ ॥ तुसती वित्पत्ति शब्द जाड । उगीं च न करी मी बडबड । श्रीरामाचें प्रेम गोड । लागलें जीवीं ॥ १७ ॥ ग्रंथसाहित्य प्रबंध पर्वाड । त्रासासी त्रास अवघड । घडघडासी घडघड । मेळविती ते ॥ १८ ॥ धडधडासी धडधड । भडभडासी भडभड । फडफडासी फडफड । सिणविती वाचा ॥ १९ ॥ ह्मणाल भोळसरसा भोळा । वेष हि दिसतो बावळा । शब्दचातुर्य जिव्हाळा । पाहतां जाणीव ॥१२०॥ तरी अभाविक अविश्वासी । जाणीवें वसे तयापासीं । मी गुरुकृपेचा विश्वासी । तुह्मी

---

१ भक्ष्य. २ ( माझ्या ) वाणीला. ३ लुब्ध होतात. ४ प्रवाहांत. ५ चंद्र. ६ थोरी. ७ शब्दाला शब्द जुळवून ग्रंथ लिहिणाराच्या मनांत शंका, अविश्वास हीं असतात.

आराध्य माझे ॥ २१ ॥ क्षमा करूनि संपूर्ण । द्यावें कृपेचें अवधान । ऐकावें पुढें निरोपण । सप्रेमभरें ॥ २२ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । स्वछंदप्रेमें आगळा । ह्मणे मेरूअनंत ॥ १२३ ॥ द्वितीय रुद्र ॥ ॥ उल्लास दहावा समाप्त ॥

---

॥ श्रीरामजयरामजयजयराम ॥ श्रीराम समर्थ भीमशंकर । अनुग्रह अभयंकर । विरक्तिरूपें भयंकर । चित्तापहारी ॥ १ ॥ बोधीं वेधें प्रगटेना । तो बोध चि नव्हे पैं जाणा । वेध निर्वेध अंतर्खुणा । सद्गुरुपासीं ॥ २ ॥ चित्तचैतन्यचमत्कारें । आनंदसिंधूसी भरण भरे । नित्य उन्मनीच्या जागरें । जागर होय ॥ ३ ॥ अवधान शिरोभूषणा[1] । होसी कैवल्याचा राणा । राम परत्रींचा पाहुणा । त्यासी उपचारी ॥ ४ ॥ तुजला जाला जो अनुग्रह । तुझें स्वरूप अपरिग्रहें । तेथ कांहीं येक परिग्रहें । होतां बाधक ते ॥ ५ ॥ केवळ सूक्ष्म अनुभव । विश्रांतीचा निज ठाव । तो हि परिग्रहसंभव । भवबुद्धियोगें ॥६॥ नित्य निजानंदघन । विज्ञानसुखें गळित उन्मन । उमसें तरी संपूर्ण । तो चि परिग्रह ॥ ७ ॥ प्रांजळ त्रिपुटीरहित ज्ञान । सिद्धसंकेतें निर्वाण । भावलें तरी तें अज्ञान । परिग्रह चि तो ॥ ८ ॥ या परिग्रहाची विख्याती । विस्तारली सर्व जगतीं । सिद्ध साधक महास्थिती । नांमाथिले परिग्रहें ॥ ९ ॥ परिग्रह त्यागूनि किती । उदास वन वसविती । परिग्रहें तयाप्रति । अवरोधिलें तेथ ॥ १० ॥ मठ माठिका निवासस्थान । आसन गडवा मृगाजिन । वायु धारणा करून । सिद्धीच्या उपयोगें ॥ ११ ॥ वनचरां पाळिती । सलोभ ममता संगति । वास-

---

१ आत्मस्वरूपाचा छंद. २ निर्विकल्प, निःसंग. ३ विकल्प, कोणत्या हि वस्तूचा स्वीकार, संग. ४ अनुभवाचा अंश हा भवचक्रात च घालितो. कारण, विकल्पाची उत्पत्ति तेथें होत च असते. ५ (?). ६ नामरूपाप्रत प्राप्त झाले.

नेनें आठविती[1] पूर्व तितुकें ॥ १२ ॥ पदार्थत्यागें नव्हे त्याग । पाहिजे तो अंतर्त्याग । अखंडित वीतराग । स्वरूपयोगें ॥१३॥ वासनापरिग्रह प्रौढी । सिद्धीची थोरावितो रूढी । मठ बांधोन परवेही । वाढविती विस्तार ॥ १४ ॥ वृक्ष परिग्रहसंपन्न । पत्रपुष्पफळें करून । तोषविती सकळां सहिष्ण । शीतोष्ण साहोनि ॥ १५ ॥ त्या वृक्षाचें पत्र तोडितां । डोई फोडिती सकोपता । वसनरहित[2][3] वसे माथां। जटांचा भार ॥ १६ ॥ पाहतां सर्वस्वें उदासीन । दिगंबर तनु कुंभ घेऊन । झाडासी अनुदिन । पाणी घाली ॥ १७ ॥ जो संकल्पापासूनि सुटला । उदासीन भवभोग त्यागिला। तो हि परिग्रहानें व्यापिला । पाणी वाहावया ॥ १८ ॥ तिळभरी स्थळ जातां आपुलें । प्राण देती तेणें मुळें । संसारीं परिग्रहावेगळें । बंधन नसे ॥ १९ ॥ परिग्रहापासूनि सुटिजे । ऐसा कवण असे सहजें । तापसासी छळणें वोजें । परिग्रहानें ॥ २० ॥ जीवींचा जाय परिग्रह । ऐसा सद्गुरूचा अनुग्रह । तयावांचून हे नवग्रह । परिग्रह न सोडी ॥ २१ ॥ येका पक्षियासी सहज । आमिषें[4] सांपडलें समाज । मिळोनि पक्षियांनीं अचोजें । वेष्टिलें तया ॥ २२ ॥ चुंचुस पांखे झडझडां । विदारिती तया फडफडां । नख पांपरा[5] झडाडा । कासावीस करिती ॥ २३ ॥ विचारित पक्षिया तो चित्तीं । म्हणे हे तरी माझे स्वजाती । मी काय चुकलों जे मजप्रति । मारिती कां हे ॥२४॥ आमिषाचा मुखीं कवळ । शब्द करितां न ये विकळ । चित्तीं दुःख होऊनि प्रबळ । त्रासला तेणें॥२५॥ भावी मी इतुकियांचे हातीं। सांपडलों मी मरेन निश्चितीं। समजोन त्या आमिषाप्रति । त्यागिता होय ॥२६॥ टाकितां चि आमिषाचा गोळा । झेंपावले ते विहंगम मेळा । परस्परें पक्षि सकळां । विदारिती ॥ २७ ॥ जेणें आमिष त्यागिलें । तें तयाचें साक्षि जालें । मग सुखरूप बैसलें । निवांत स्वस्थानीं ॥ २८ ॥ लोभ आमिष अज्ञान ।

१ वाढविती ( पा० ) २ वरती, आणखी. ३ वस्त्रहीन. ४ मांस. ५ (?) ६ पामर (?). ७ पांख. ८ मनांत म्हणे.

त्यागूनि निःसंग जाले सज्ञान। भवचित्त दायादीजन। नित्य कलहीं करिती ॥ २९ ॥ अवधूतें यदूप्रति। धरूनि टिटव्याची संगति। परिग्रहत्यागस्थिति। सांगितली निरोपम। ॥ ३० ॥ निपरूढो विषय। दूषण। त्यागस्थितीचें लक्षण। सत्यानुग्रह सत्वपूर्ण। चिन्हें यावीं। ॥ ३१ ॥ एवंप्रकारें चोवीस गुण। घेतले गुरुत्वें आपण। तें साझे चतुर्विंशति जाण। गुरु होती राया ॥ ३२ ॥ ऐसे चि जगतीवरी। असती उत्तम गुण शरीरीं। तितुके घेऊनि सर्वोपरी। भवमुक्त व्हावें ॥ ३३ ॥ भवबंध अनिवार। किती सांगावा विस्तार। मूळ दुराशेचा संसार। विस्तारला हा ॥ ३४ ॥ दुराशा त्यागी ऐसे जगीं। उपमेसी नाहीं वीतरागी। स्वरूपयोगें अतर्यागी। नित्यमुक्त निस्संग तो ॥ ३५ ॥ सर्वदा हि सर्वत्र। वाढविला अखंड श्रोत्र। विश्वरूप गुरु वक्त्र। वाक्यें विवरे ॥ ३६ ॥ सर्वकाळीं समसमान। सर्वगत चैतन्यघन। विज्ञानत्वचेनें संपूर्ण। देवासी आलंगी ॥ ३७ ॥ अखंडित निजनयन। विश्वरूपाचें दर्शन। घेतसे सम संपन्न ज्ञान। हृद्गत तो ॥ ३८ ॥ अखंड दंडायमान रसना। स्वरूपानुभव संभावना। अखडैकरसखुणा। अनुभवीतसे ॥ ३९ ॥ निजसुवास अगोचर। घ्राण करूनि चिदंबर। विश्रांति पावे सुखकर। आघ्राणिता ॥ ४० ॥ विश्वरूपें या प्रौढी। निजसजन चढोवढी। दिवसरात्रीं सुरवाडीं। पडला भजनाच्या ॥ ४१ ॥ सर्वकाळीं अनुसंधान। उपासनेचे निजभजन। न जाय येक क्षण। उपासनेपरता ॥ ४२ ॥ जो अंतःकरणीं निवळला। तो पावला मुळींच्या मुळा। भवविकल्पकाउळा। न सिवे तयासी ॥ ४३ ॥ नाना युक्तीचें देव्हारें। नातडती त्या भवपमारें। संकल्प सारूनि येक-

---

१ माऊवद्की सागणारे २ भागवत स्कंद ११ अध्याय ७ श्लोक २४–२५ पहा. ३ लक्षणें (पा०) ४ पृथिवीवायुराकाशमापोऽग्निश्चंद्रमा रवि॰ । कपोतोऽजगर सिंधु पतगोमधुकृद्गज । मधुहा हरिणो मीन- पिंगला कुररोऽर्भक । कुमारी शरकृत्सर्प ऊर्णनाभि सुपेशकृत् ॥ भा. ११,७, ३३–३४. या चोवीस जणांच्या आचरणावरून अवधूतानें उपदेश घेतल्याचें यदूला सांगितलें. ५ विज्ञानरूप स्पर्शेंद्रियानें. ६ चढाओढीत. ७ सुखाल.

सिंहासनीं । अर्चीन तुज अनंतमौनी । महावाक्य पुडती श्रवणीं । घेईन अर्थ प्रांजळ ॥७९॥ माझी इच्छा हे पुरवीं । प्रसन्नतेची प्रगट पदवी । स्वामीपासूनि नित्य नवी । लाभेन दीक्षा॥८०॥ नित्यानुभवप्रसाद । अपेक्षित सुखसंवाद । स्वानंदसुखकंदा स्वछंद । अखंडित बोधीं ॥ ८१ ॥ आतां परतें न करीं सर्वथा । पुन्हःपुन्हा प्रार्थना समर्था । प्रगट करित परमार्था । अंतरीं वसें ॥ ८२ ॥ या चि अर्थे सर्वकाळ । तुज अभिवंदन अकळ । पदीं अर्पिलें शिरकमळ । तें तैसें चि राहो ॥ ८३ ॥ मीपणासी उरी नसे । पूर्वी च प्रांजळ केलें ऐसें । आतां मी प्रार्थनामिसें । कासया उर्णे ॥ ८४ ॥ हें यथार्थवादें पाहतां । परि प्रेम न सुटे श्रीअनंता । ऐसें बोलतां चि माथां । हस्तक ठेविला स्वामीनें ॥ ८५ ॥ अरे तूं माझें चि अभ्यंतर । पुरवीन मनोरथ साचार । भाकेसी देऊनि रूंपाकर । प्रसन्न जाला ॥ ८६ ॥ तें चि पुढें अनुसंधान । तृतीयरुद्रनिरोपण । सद्गुरुअर्चनीं अवधान । देऊनियां अवधारा ॥ ८७ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । अनंतसद्गुरुप्रसन्नवेळा । ह्मणे मेरुअनंत ॥८८॥ द्वितीय रुद्र । उल्हास अकरावा । द्वितीय रुद्र संपूर्ण ।

॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

## रुद्र ३ उल्हास १



॥ श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः ॥

*श्रीराम परमानंदमुपदेष्टारमीश्वरम् ।*
*व्यापकं सर्वलोकानां कारणं तं नमाम्यहम् ॥*

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥

श्रीराम सद्गुरु अनंत । स्वानंदभद्रीं सुशोभित । स्वरूपावबोधें उदित । प्रासं करी शिष्यांसी ॥ १ ॥ सद्भावशिष्य ते प्रेमळ । जैसे निष्कंप दीप सोज्वळ । कीं ते उन्मेषचक्षु प्रांजळ । निर्मळस्वरूपदृष्टे

---

१ हाकेसरसा. २ उदय ( ज्ञानाचा ). ३ ज्ञानानें उघडले आहेत नेत्र ज्यांचे असे.

॥ २ ॥ परिशुद्ध भक्तीचें प्रेम । आत्मा करूनि सद्गुरुराम । अचिंती प्रतीतीनें विश्राम- । धाम कैवल्याचे ॥ ३ ॥ सद्गुरु अमरेंद्र[1] वेष्टितें[2] । शिष्य सुरवर तोषयुक्त । कृपामृतपानें संतृप्त । स्वरूप अनुभविती ॥४॥ सद्गुरु स्वयंभू[3] सत्यलोकीं[4] । सेविजे शिष्यसनकादिकीं । समाधिसुख अमनस्कीं । जो कां आर्जविला ॥ ५ ॥ ज्ञानकैलासीं धूर्जटी[5] । आर्जविला शिष्यकोटी । महामौन ग्रासूनि पोटीं । अनुभविला स्वयें ॥ ६ ॥ सद्गुरुबोध वैकुंठपती[6] । सेविला ब्रह्मादिकीं प्रतीती । कैवल्यावरील निजभक्ती । घनानंद मूर्त ॥ ७ ॥ स्वरूपाश्रम[7] अगोचर । वसवी गुरूपदेश निर्विकार । अखंडानुभवप्राकार[8] । अनंतबोधरचना[9] ॥ ८ ॥ माजि अनुभवसद्में[10] मनोहरें । आनंदचंदनें कामांधेलीं थोरें[11] । चिद्रत्नमय सुनागरें[12] । चामीकर[13] सुधारस[14] निर्मित ॥ ९ ॥ अनंतवस्तीचीं सुखालयें । सुखावला अनुभव तेथें राहे । पाहातेंपण विरोनि जाय । अकल्पित जेथ ॥ १० ॥ विज्ञानसौध[15]रचना । लक्षितां निर्धार[16] ज्ञाननयना । चर्मचक्षु बुधि कल्पना । कांहीं च न चले ॥ ११ ॥ कुंठित विश्वकर्म्याची बुधि । नाहीं उपमा तेथें त्रिशुधी[17] । अभिनव शोभा निरवधी । स्वयंभ सदना ॥ १२ ॥ अनंताचें निवासस्थळ । रात्रिदिवसेवीण सोज्वळ । स्वप्रकाशभानूचें मंडळ । अमृतकर[18] पोहेंलें ॥ १३ ॥ गाळीव गगनतेज निर्मळ । फांकती ज्ञानरश्मी सुख अखिळ । वृत्तिचक्षूमाजि अंतराळ । प्रभेनें दाटिले ॥ १४ ॥ पदार्थेवीण घर भरी । सदोदित अनंत निर्विकारी । तेणेंविना दुसरेपरीं[19] । असे चि ना सदनीं ॥ १५ ॥ दैवी प्रकृति अगोचर । जे का ज्ञानशक्ति विश्वंभर । आत्मस्वरूप साक्षात्कार । सेवेसी तत्पर असे ॥ १६ ॥ अंतर्बाह्य समाधानें । परात्परज्ञानप्रतीतीने । सेऊ जाता अनंतासी प्रीतीनें । ऊभी च विरे ॥ १७ ॥ अखंड जियेची व्यापकता । महावाक्य प्रतीति तत्वता । ते हि न सरे तया

१ इंद्र. २ देवानीं वेष्टिलेला ३ ब्रह्मदेव ४ ब्रह्मदेवाच्या दरबारात. ५ शंकर. ६ विष्णु ७ आत्मज्ञानरूप स्थान. ८ तट, भिंती. ९ अनंतमौनीच्या उपदेशाची सुंदर बांधणी १० अनुभवरूपी घरें. ११ बांधला. १२ फार भव्य. १३ सोनें १४ चुना. १५ राजवाडा. १६ केवळ. १७ निश्चयेंकरून १८ चंद्र १९ प्रकारा.

॥ ३ ॥ ह्मणे मी अनाथ शरणागत । तुझे पायीं मज ठाव दे शाश्वत । कृपेनें करूनि मज सनाथ । आपुलें ह्मणवीं ॥ ४ ॥ अनन्यभावें करुणा भाकित । उदेलें महद्भाग्य पूर्वार्जित । कृपेनें मस्तकीं ठेऊनि हात । अभय दीधलें ॥ ५ ॥ ह्मणे तूं माझा आत्मा होसी । तुजलागीं चिंता ते कायसी । आतां कळिकाळासी नाटोपसी । राहें शाश्वतस्वरूपें ॥ ६ ॥ तूं निर्जर¹ अज अमर । तूं अभंग असंग अगोचर । तूं अलक्ष अमनस्क अपार । वेदहृदयवेद्या² ॥ ७ ॥ तूं परब्रह्म चि निश्चयें । तुज मायेसी संबंध काय । आतां भय न धरीं प्रत्ययें । अजरामर होयीं ॥ ८ ॥ एवं माझा अभयंकर । अक्षयी कृपेचा वज्रपंजरें³ । असे स्वरूपानुभव निरंतर । तुजपासीं स्नेहाळा ॥ ९ ॥ देखोनि तुझी अनन्यता । द्रवलें निजज्ञान तत्वता । सप्रेमळा वत्सा तूं आतां । लाहे निवांतपदवी ॥ १० ॥ अनन्यप्रतीतीचें हृदये⁴ । आतां तुजपासीं च मी स्वयें । राहेन निरंतर प्रत्ययें⁵ । हे भोंक घे⁶ माझी ॥ ११ ॥ एवं बोलला सद्गुरु दाता । तुंबळला स्वानंद प्रबोधितां । उंचबळला कृपार्णव आतां । वचनें प्रमाण केवि करूं ॥ १२ ॥ संतःपूजासमारंभ । सद्भाव केवळ अर्चन स्वयंभ । प्रमाण टाकूनि शोभा सुप्रभ । सदन शृंगारिलें ॥१३॥ परम सादर निजावधानें । सर्वांग प्रज्ञापूर्णप्रीतीनें । निजानंदघनसुमनें । भाव गुरुअर्चनीं बैसे ॥ १४ ॥ अभिनव अभिवंदनीं जालें । पूर्वापूर्व येकसरें गेलें । स्मरण विस्मरणेंसीं ठेलें । चमत्कारलें चित्त ॥ १५ ॥ सर्वांगीं सत्वाभरण । अष्टभाव चालिले वोसंडोनी⁷ । ज्ञानबळें चि तें सावरून । पूजेसी प्रवर्तला ॥ १६ ॥ अमोदक स्वच्छ प्रेमळें । पदद्वय पाणियुगळें । प्रक्षाळूनि निजनिर्डळें । आणिलें पद नयनासी ॥ १७ ॥ ज्ञाननयनीं च निजहृदयीं । आणिलें पद महावाक्यप्रवाहीं । सद्गुरुपाउलें तीर्थराज पाहीं । अभिनव महिमा ॥ १८ ॥ अभंग प्रज्ञावरण मूर्धनीं । पदसंभवज्ञान-

---

१ वृद्धावस्थेच्या पलीकडचा. २ ॐकार ज्याचें ज्ञान व्हावें ह्मणून झटतो असा. ३ वज्राचें कवच, चिलखत. ४ रहस्य. ५ शपथ. ६ वाहून. ७ आपल्या मनमानें.

तरंगिणी । स्वरूपसिंधूसीं समरसोनि । राहिली त्रिपथगा ॥ १९ ॥ सित्वसनकादि ब्रह्मादिकीं । वंदिली पदतीर्थगंगा अमनस्कीं । पावना परंपरा पुण्यश्लोकीं । प्रशंसिजेत डोळां ॥ २० ॥ गुरुपदतीर्थ तें परम । सायुज्यतेचें निजधाम । तारकगतीनें उत्तम । पोडशोपचारीं पूजिलें ॥ २१ ॥ सुस्नात होऊनि तीर्थांतरीं । सेविलें गुरुपदतीर्थ अभ्यंतरीं । क्षाळिला वृत्तिमळ निर्धारीं । शुध्द जालें अंतर ॥ २२ ॥ तो गुरुपदतीर्थमहिमा । वर्णूं न सके वेद विधि ब्रह्मा । तें अकल्पित फावलें आह्मां । गुरुपदतीर्थ सुखें ॥ २३ ॥ पावन हरिहरसुरपंक्ती । पावन विश्वरूपगुरुभक्ति । पावन ऋषिविख्यात विरक्ति । देशिकनिष्ठेनें पूर्ण ॥ २४ ॥ तें गुरुपदकमळें कोमलें । भावांबरें पुसूनि केवळें । पुन्हा निडळीं लाऊनि निश्चळें । आणिलें हृदयासी ॥ २५ ॥ प्रणाम करूनि देशिकपदांबुजा । केली पोडशोपचारें पूजा । नयनीं निरखूनि सद्गुरुराजा । धरिला निरंतर जीवीं ॥ २६ ॥ जें आराध्य ईश्वराचें । तें मी अर्चितसे निजाचें । ब्रह्मात्मभावनावृत्तीचें । संपूर्ण समर्पण ॥ २७ ॥ ज्या सुवासें दाटलें गगन । तें मुळींचें साजुक सुमन । दृष्टिपरिहारासी वोवाळून । टाकिलें सर्वस्वें ॥ २८ ॥ केवळ सत्वचंदन गाळीव । विज्ञानकेशरमिश्रभाव । कपाळीं टिळक अभिनव । रेखिला सुवर्णमय ॥२९॥ ज्ञानत्रिपुटीरहित शुध्द । कस्तुरीची त्रिपुटी निर्वेध । सुंदर वक्षस्छळीं सुगंध । उटी दिधली भावें ॥ ३० ॥ निघोंटपणें मृदु सुंदर । उदर स्वानंदाचें बिढार । दिव्यचंदनचर्चिताकार । निवती स्वसुखें ॥ ३१ ॥ व्यंजन जाणविला विश्रांतिपटीं । विस्मयसुवास दाटला दिक्पटीं । तेणें समारंभें सुखकोटि । भोगिती संतसमाज ॥ ३२ ॥ चमत्काराचा सूक्ष्म । धूशेर उधळिला परम । तेणें आच्छादलें व्योम । मगमगाट उठे ॥ ३३ ॥ विस्मयापन्न वेळोवेळां । घालीत स्वसुखचंपकमाळा । नित्यमुक्ताहार जिव्हाळा । अमनसुमनें वाहे ॥ ३४ ॥ गुणेंवीर्ण गुंफिलीं

१ पायांपासून निघालेली ज्ञानाची नदी. २ एकरूप होऊन. ३ गंगा. ४ भावरूपी वस्त्रानें. ५ पंखा. ६ बुका. ७ समाधिरूप फुलें. ८ दोन्याशिवाय; पक्षीं, सत्वरजतमादि गुणांशिवाय.

सुमनें. । स्थळजळसंभवविहीनें । अभिनव धृतिमाजि गगनें । विरोनि जायिजे ॥ ३५ ॥ प्रणवासि चेतक प्रचुर । तो सुगंधवह परात्पर । गाळीव दशांग साचार । प्रज्वलित ज्ञानाग्नि ॥ ३६ ॥ चिद्रत्नमय धूपारती । सुयत्नव्यजनें पुढती । घालितसे चमत्काराचे हातीं । महापरिमळ उठे ॥ ३७ ॥ सोहंभावेंवीण स्वभाव । जाळी येकारती अभिनव । कैवल्यक्षेत्रपति गुरुराव । तोषला अपार तेणें ॥३८॥ सत्राची जीवनकळा आर्जित । स्वात्मसुखाचें फळ सुशोभित । अंतरीं निजोदक भरित । समर्पिलें गुरुपदीं ॥ ३९ ॥ स्वसुखानंदकंदपरवडी । अमृताची फिकी गोडी । महानैवेद्य तो प्रौढी । विस्तारला सुवर्णताटीं ॥ ४० ॥ तो महानैवेद्य समर्पिला । तेणें नित्यतृप्त धाला । स्वानुभवें ढेंकर दिधला । पूर्ण स्वानंदें ॥४१॥ प्रतीतीच्या निजनिश्चयें । संकल्पासी सोडिलें तोय । भोक्ता होऊनियां भोग्य स्वयें । भोजन केलें गुरुदेवें ॥ ४२ ॥ ज्ञानाज्ञानसर्वार्जित । पाकपरवडीनें सुशोभित । जेऊनि प्रतीतीनें समस्त । कृतार्थ केलें शिष्यासी ॥ ४३ ॥ पंचप्राणाची पंचारती । करूनि सद्गुरु सेविला प्रतीती । ध्यानासि आणूनि पुढतपुढती । नमन केलें तद्रूप ॥ ४४ ॥ प्रवृत्तिरहित प्रदक्षिणा । शब्द मौनातीत स्तवना । केलें गुरुअर्चन सुमना । समर्पूनि सर्वस्वें ॥ ४५ ॥ सहज विलोकूनि श्रीअनंत । सहज धरिला हृदयांत । सहज राहिला सदोदित । सोहं नुमसतां[1] ॥ ४६ ॥ तेणें विस्मयाच्या पोटीं । दाटिली निढाराची निजदृष्टि । विकळ सद्भावसुखें सकळ सृष्टि । पडिली तनु दंडवत ॥ ४७ ॥ कवळूनि निजहृदयीं समर्थ । कुर्वाळूनि स्वनिजकरें पदवाक्यार्थ । कवळिला हृदयीं शिष्य परमार्थ । श्रवणीं घातला ॥ ४८ ॥ तो महावाक्याचा विवर । मुख्य स्वरूपसाक्षात्कार । सद्गुरुमुखें निरंतर । अवधारिजे श्रोतीं ॥ ४९ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । गुरुपूजा पाहा डोळां । ह्मणे मेरूअनंत ॥ ५० ॥ तृतीय छंद ॥ द्वितीय उल्लासः संपूर्ण ॥

---

1 न समजतां.

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम ब्रह्मउपदेश स्वयें । श्रीराम गुरुशिष्यहृदय । श्रीराम अपरोक्ष प्रत्यय । महावाक्यविवरें ॥ १ ॥ अनंतहृदयींची केवळ करुणा । बोळला समर्थ ज्या विद्यमाना । प्रत्यक्ष ते चिन्मयवचना । प्रगटितसे ॥ २ ॥ हे स्वरूपसुप्रसन्नवेळ । अमृतवाहिनी चित्कल्लोळ । विज्ञानसुधारस गळाळ । वदनीं कृपाकरें घालितसे ॥ ३ ॥ केवळ सद्भावें सद्गदित । शिष्य तो अष्टभावें उदित । अनादिप्रेमा मूर्तिमंत । द्रवला स्वानंदें ॥ ४ ॥ प्रतिसंबोधनें करुणाकर । मस्तकीं ठेऊनि अभयकर । विचारितसे प्रीति अभ्यंतर । दयार्द्र हृदयीं ॥ ५ ॥ जैशा चंद्राच्या षोडशकळा । निघती बिंबापासूनि स्वलीळा । तुष्टिपुष्टिविती सकळा । अमृतरसें ॥ ६ ॥ तेवि सद्गुरु कटाक्षतोयें । कृपामृतपूर्णवोरसें । बोळला स्वरूपावबोधसौरसें । आपेंआप सहज ॥ ७ ॥ जेवि अनंतरश्मीं भानुमंडळ । धवळितसे[3] सृष्टि अखिळ । तेवि सच्छिष्यहृदय सोज्वळ । प्रकाशिलें ज्ञानें ॥ ८ ॥ अमृततरुवर अपाडें । फळला स्वानंद तेणें पाडें । वोसरलें भवदरिद्र सुखेंवाडें । दाटलें ज्ञानऐश्वर्य ॥ ९ ॥ कृपारसकरसारसें । कुर्वाळूनि अनन्यासि वोरसें । बोळली गुरुमाउली दयारसें । घनानंदभरित ॥ १० ॥ अनंत संपूर्णतेचा प्रसाद । स्वानंदउदधी संवाद । सामावितां श्रवणीं विद्वद । अवधान न पुरे ॥ ११ ॥ तेथ प्रश्नोत्तरअवकाश नुरे । लवण सागरीं जेवि विरे । तेवि सद्भाव अष्टभावद्वारें । द्रवला निःशेष ॥ १२ ॥ जेवि गारेचें निर्मळपण । विघरोनि होतसे जीवन । तेवि सद्भाविक तो संपूर्ण । द्रवतसे सप्रेमें ॥ १३ ॥ त्रुटितस्वर विकळवाणी । ह्मणे ठाव दे तुझे चरणीं । आणीक मज या वांचूनि । कांहीं आस्था असेना ॥ १४ ॥ नाहीं मज मुक्तीची चाड । न लगे मज ज्ञानाचा पवाड । न लगे मला स्वानंदसुरवाड । समाधिअवस्था ॥ १५ ॥ न लगे स्वरूप प्रतिष्ठा सद्गति । तुझे पायीं

१ विज्ञानरूप अमृताची गोड धार. २ अनंत किरणांचे. ३ प्रकाशित करतें. ४ स्वाधीनपणामुळें; आत्मस्वरूप हातीं आल्यामुळें. ५ करकमलानें. ६ एकनिष्ठ भक्ताला. ७ मान्हा फुटून. ८ महत्व.

राहो माझी मति । सर्वदां तुझा आठव विश्रांति । हे चि माझी निरूपम ॥ १६ ॥ ऐसें प्रार्थितां श्रीअनंत । हृदयासी आला सदोदित । बोधें प्राप्ति व्हावें तें अखंडित । आपण शिष्यासी दीधलें ॥ १७ ॥ जेवि चंद्रोदयीं सहज । भरितें अर्णवासी व्यापे चोज । तेवि अनन्यासि देखोनि गुरुराज । कृपाभरणें दाटला ॥१८॥ ब्रह्मानंदतनू श्रीअनंत । बोधसमर्थी विस्मयाकुळित । हृदया आला समर्थ अकल्पित । स्वरूपप्राप्तीस तेणें ॥१९॥ स्वानंदें नयन पुंजाळले । आनंदाश्रु लोटती सुढाळें । रोमांचित वपु मुक्ताफळें । स्वेदकण डवडवित ॥२०॥ स्वरवित प्रज्ञागुंगि आंगीं । निरवधिसुखें अंतरंगीं । गंभीरघोषें कृपाप्रसंगीं । गोप्य तें प्रगटतसे ॥ २१ ॥ निर्वाणीची अवस्था प्रत्यक्ष । साक्ष्यत्व घोटूनि अलक्ष । शिष्यहृदयीं असाक्ष । साक्षीस आणिलें ॥ २२ ॥ त्या बोधसमयींचें अभिनव । न वर्णवे कोणासी वैभव । स्वरूपासी स्वरूपानुभव । वर्त्तविला दयाळें ॥ २३ ॥ आनंदाविर्भूत सुप्रसन्न । ह्मणे मी ब्रह्म तूं सनातन । या वाक्यश्रवणें निर्वाण । मजमाजी तुझें ॥ २४ ॥ ह्मणऊनि तुजमाजीं मी अनंत । ऐसा तुज मज निजयेकांत । वाच्य लक्षासि न येतां निवांत । राहें संतें उगला चि ॥ २५ ॥ अरे आइकतोसि सांगेन मी । जेणें परिसतोसि तें काय उगमीं । तें तुज मज अंतर्यामीं । अधिष्ठान समर्थरूप ॥ २६ ॥ देशिकपरंपरा शिष्य तेथूनि । ब्रह्मा ब्रह्मत्वदीक्षादानी । समर्थप्रस्थान तें चि तूं मानीं । मूळ गुरुरूपें ॥ २७ ॥ आकारसंभव परात्पर । परात्परार्थ वेदसार । समर्थहृदय निरंतर । ज्ञानपरंपरेसी ॥ २८ ॥ समर्थवचनें दासबोध । दाशरथीराम गुरु प्रसिद्ध । वाक्य घेऊनियां समर्थ शुद्धबुध । स्वरूपें अनुग्रहिलें ॥२९॥

॥ ३१ ॥ समर्थ राम असिपद । महावाक्य तो मी अनुवाद । तें चि तुज बोधिलें विशद । प्रतीति पाहें ॥ ३२ ॥ हे अनुक्रम समर्थांचा । अभेदभक्ति श्रीरामाची । दाशरथीभजनासि परंपरेची । समर्पिली माळा ॥३३॥ उपासना अर्जनासाठीं । समर्थें अनुग्रहिली सृष्टि । निश्चयेंसीं अनुभवदृष्टीं । पाहतां सद्गुरु श्रीराम ॥ ३४ ॥ रहस्य हें बरवें समजोनि । सद्गुरु रामासी वोळखोनि । अनन्यप्रतीतीनें अंतःकरणीं । हृदयस्थ भजिजे ॥ ३५ ॥ आइकोनि स्वामीचें हृद्गत । विचारिलें रुडिवाळें इत्थंभूत । जे हृदयस्थ वोळखणें सप्रतीत । जेथूनि प्रगटली ॥ ३६ ॥ तें कैवल्याचें माहेरवर । सच्चिदानंदस्वरूपशरीर । जयाचे कृपादृष्टीनें साचार । परब्रह्म केलें ॥ ३७ ॥ जयाच्या वचनें करूनि प्रमाण । देहीं देहातीत निरंजन । पदवी दिल्ही सनातन । तें चि गुरु आराध्य आमुचें ॥ ३८ ॥ स्वरूप नामरूपातीत । असतां प्रगट नव्हे तें शाश्वत । तें चि या नामसंकेतें अनंत । प्रत्यक्ष जाहलें आह्मां ॥ ३९ ॥ नामसंबोधें आळविलें । रूप दृष्टी भरूनि पाहिलें । उत्तरप्रत्योत्तरें वर्तविलें । अंतरीचें समाधान ॥ ४० ॥ प्रथम बोधीं हे प्रतीती । आइकोनि संभाषण गुरुमूर्ति । ह्मणे अनुग्रह फळला तुजप्रति । हाचि साक्षात्कार ॥ ४१ ॥ स्वरूपअंतर्भाव उमजे । प्रीतीच्या नामें करूनि भजे । अनुवादलासि गुज तें समजे । राम समर्थ ह्मणे तूं ॥ ४२ ॥ पाहातां तें चि अनंत होय । त्यावीण दुजें काय आहे । एवं स्वरूपासि तूं निश्चयें । वोळखोनि आराधीं ॥४३॥ हे माझी निजप्रतीती । तें चि तूं जाण पैं निश्चिती । एवं महावाक्य अंतरस्थिती । होयी स्वानुभवमेरू तूं ॥ ४४ ॥ नामाथिला[1] अनुभवमेरू । वोळला रामसमर्थ सद्गुरु । अनंतस्वरूपें निजनिर्धारु । रहस्य अनुवादें ॥ ४५ ॥ तो उपदेशक्रम संपूर्ण । पुढें प्रांजळ निरूपण । प्रतीतीच्या श्रवणीं घेऊन । अर्थरूप होयिजे ॥ ४६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा ।

---

१ नामास आला, नांव प्राप्त झालें.

धान ॥ २८ ॥ याहिवरी स्वभावस्थिति । संभाषणीं निवळील मति । ह्मणती अपेक्षित तुजप्रति । काय तें अनुवादें ॥ २९ ॥ अंतरींचा इष्टासंकल्प । न होतां तो निर्विकल्प । तंवरि बोधाचा साक्षेप । वाउगा चि कीं ॥ ३० ॥ महारोगनिवृत्ति व्हावया । दिव्य मात्रा देणें जया । तयाची वांछा पुरऊनियां । निरपेक्षें कीजे ॥ ३१ ॥ तीक्ष्ण शस्त्र जालिया । काय छेदील गगना यया । तेविं निरपेक्षासी माया । केविं बाधूं सकेल ॥ ३२ ॥ वोळंबा न लागे अग्निप्रति । खद्योत गिळी केविं दिवस्पति । प्रभा तम दिवो राती । करितां नभ न लिंपे ॥ ३३ ॥ ऐसें तुझें अभ्यंतर । अक्षय अनुपेक्ष साचार । प्रसन्न करूनियां सार । अनुभवीं सुखें ॥ ३४ ॥ चहूं देहाचा आवेर । साक्ष्यत्वाचा धरूनि धेर । साक्ष्यत्वातीत निरंतर । उत्तर दे मजप्रति ॥ ३५ ॥ तूं कवणाचा रे कवण । कैंचा पुरातन कीं नूतन । येथ आलासी विचारून । सांग सर्व तुझें ॥ ३६ ॥ ऐसें विचारितां अभ्यंतर । विवरोन पाहे निरंतर । आदि पश्चात् न दिसे विवर । कुंठित होऊनि जाय ॥ ३७ ॥ ह्मणे मी माझें उमजेना । कोठूनि आलों हें कळेना । पुढें गत्यंतर अनुमाना । कांहीं च न ये ॥ ३८ ॥ ह्मणती आइक रे सज्ञाना । जाणोनि नेणसी विवंचना । न कळलें ऐसें कळलें अज्ञाना । तो तूं ज्ञानी निवळ ॥ ३९ ॥ मुळापासूनि शेवट । विवंचीं अविवेचा पट । ब्रह्मांडरचनाटद्दाट । तुझिया उल्लेखीं ॥ ४० ॥ अनंत ब्रह्म विष्णु ईश । प्रत्यगात्मत्वें होती परेश । सृष्टिपरंपरा सावकाश । तुझ्या हृदयाकाशीं ॥ ४१ ॥ वोंकारवेदउत्पत्तिस्थिति । उपनिषदें बोध बोधक राहती । तुझीं च महावाक्यें तुजप्रति । अनुग्रह होतसे ॥ ४२ ॥ समुद्राचें अर्घ्य समुद्रातें देती ।

---

१ प्रयत्न, श्रम. २ रोग्याला मात्रा च दिली पाहिजे; त्याला वाटेल तो पदार्थ देऊन चालणार नाहीं. कीजे हा प्रश्न समजावा. ३ याळवी, उभय. ४ अनपेक्ष, उपाधिरहित. ५ आवरण. ६ आधार. ७ तुझें स्वरूप तुला समजलें ह्मणजे सगळ्या ब्रह्मांडाचा तुला उलगडा होणार आहे; कारण, तुझ्या पिंडांत आहे तें च ब्रह्मांडांत हि आहे.

तेजें अर्चिजेत तेजाधिपति । कांजेत गुळाच्या देवाप्रति । गुळाचा चि नैवेद्य ॥४३॥ तैसा तूं मुळीचें स्वरूप । तुजवरी विश्वाभासआरोप । पुडती समरसोनि तद्रूप । होय तुजमाझारीं ॥ ४४ ॥ ज्ञानसिंधूचे चिरकल्लोळ । तरंग हे नोहे विश्वाखिल । पुढेंत सामरस्यें तें निखिळ । जीवन चि कीं ॥४५॥ जाण तैसे परीं भवभान । अज्ञाना जालें प्रमाण । ज्ञानियांसी स्वानंदघन । उपासनारूप ॥ ४६ ॥ आत्मरूप गुरुउपासना । ब्रह्मानुभव अधिकार ज्ञाना । ज्ञान समरसोनि उरेना । निर्गुणापरीं ॥ ४७ ॥ उमें न ठाकतां अभिन्नब्रह्मीं । ज्ञानें बोधिला जीव ब्रह्म मी । जाण त्या सूर्याच्या रश्मी । धरूनि देती सूर्यातें ॥ ४८ ॥ गाढ तमें शेर्वरी । कीं अवकाशें आकाश वरी । तेवि ब्रह्मानुसंधान अंतरीं । ब्रह्मत्व आहे ॥ ४९ ॥ असो तें चि पुढें निरूपण तुज । स्वरूपाप्रति स्वरूप उमज । प्रतीतिवाक्यीं सहजीं सहज । आइकें सर्वांगश्रवणें ॥ ५० ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । शिष्यचित्तशोधन अंतर्कळा । ह्मणे मेरू अनत ॥ ५१ ॥ तृतीय रुद्रे ॥ चतुर्थ उल्लासः संपूर्ण ॥ श्रीराम ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीराम समर्थ अनंतसद्गुरु । जो कां भवाब्धीचा परपारु । पाववितां स्वरूपवस्तीचा साचारु । स्वानुभवज्ञानें ॥ १ ॥ बैसऊनि स्वच्छासनीं स्वयें । तत्वता निजात्मप्रत्ययें । शिष्यासी अनुग्रहनिश्चयें । हृदयस्थ होऊनि ॥ २ ॥ अरे प्रपंचाचें मूळ कवण । कवण कारणें सृष्टि उत्पन्न । बरवें तुजप्रति तूं आपण । विचारीं आतां ॥ ३ ॥ तुझ्या हृदयीं तूं तो कैसा । जाणे स्थिरावोनि मानसा । संकल्प उठतां स्मरणासरिसा । पैसें घेऊनि पाहें ॥ ४ ॥ अरे काहींयेक स्मरण । तें हि पाहतां जाय हारपोन । परि कितीयेक तें गहन । स्मृतीचि ठाईं पडे ॥ ५ ॥ त्या स्मरणें चि स्मरणा पाहावें । तेव्हा विस्मरण चि संभवे ।

---

१ एकरूप होऊन. २ अखिल विश्व, सर्व सृष्टि. ३ शेवटीं. ४ रात्र. ५ सगळे अवयव कर्णाप्रमाणे ऐकण्याला उत्सुक झाले आहेत ज्याचे असा शिष्या. ६ विचार.

ऐसें आत्मतत्व स्वभावें । अप्रांत तें असे ॥ ६ ॥ हें अप्रांतदृष्टीचें पाहणें । तुज घडलें कारणें जेणें । तें जाणणें चि जगत्कारणें । पंचक घेऊनि उठिलें ॥ ७ ॥ बीज बीजत्वासि मुकलें । तें चि वृक्षाकारें विरूढलें । सेवटीं फळद्रूप जालें । अपार बीज ॥ ८ ॥ तैसें सूक्ष्म स्मरण । सोहंभाव जगत्कारण । तें तूं स्वयें चि पैं जाण । दुजें नसे सर्वथा ॥ ९ ॥ तुजवरी घनावलें अज्ञान । दाटलें तैसें चि तें ज्ञानघन । आतां तूं तो कैसा कवण । पाहें पाहणें नव्हेसि सर्वथा ॥ १० ॥ तूं जाणता ना नेणता होसी । आतां पाहणें कैंचें रे तुजपासीं । शुद्धबुद्ध निःप्रपंचासी । प्रपंच कोठून येयील ॥ ११ ॥ गगनें देखिला नाहीं घट । परि गगनी च संभवला निकृष्ट । त्या कुंभयोगें हृदयस्फोट । गगनाचा केला ॥ १२ ॥ वांयां चि गगनापोटीं रिघोन । रूढविलें घटाकाश जाण । तैसें ज्ञानाज्ञानांत संपूर्ण । तुझें आस्तिक्य आलें ॥ १३ ॥ तया जाणण्यानेणण्याची संधी[^2] । पाहतां तूंचि स्वयें निरवधी । तुज जाणणें नेणणें त्रिशुद्धी । संधि कांहीं च नसे ॥ १४ ॥ तुझें प्रतिबिंब जाणीवजळीं । तेथ कार्यकर्तृत्व हें समुळीं । वृत्तिरूपतत्वें न्याहळी । द्रष्टा होऊनि तेथिचा ॥ १५ ॥ तूं अहंपणें[^3] उभारलासी । ह्मणोनि मुळींचें नेणसी । प्रपंचरूपें विस्तारलासी । तुझें स्वरूप बापा ॥ १६ ॥ प्रपंचाच्या अग्रीं[^4] टांगलासी । तेणें आपणा विसरलासी । बोधें तुजप्रति त्या मुळासी । आणिलें पाहिजे ॥ १७ ॥ त्यास्तव प्रांजळ पंचभूतें । पिंडीं वोळखें तूं समस्तें । पिंडब्रह्मांडापरतें । स्वरूप जाणावया ॥ १८ ॥ आतां तूं प्रस्तुत पाहें । कैसे तुझे पिंडीं च्यारी देह । पाहोनि टाकी निजप्रत्ययें । सांडिलेंपणेंसीं ॥ १९ ॥ मी देहं ऐसें देहा न फळे च । निद्रा मरण काय तयासी सुचे । जन्म दुःख सुख कर्माचें । कर्तव्य नसे चि त्या ॥ २० ॥ अस्थिशिरामांस-

[^1]: पांच ज्ञानेंद्रियें. पहा गीता $\frac{१५}{७}$ ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः । मनःषष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥
[^2]: सांधा.
[^3]: अहंकार किंवा मायारूप पाप्यांत.
[^4]: संसाररूपवृक्षाच्या शेंड्याशीं जीव असतो आणि मुळाशीं आत्मस्वरूप असतें.

मय । जड काष्ठ स्थूळ पाहें । षड्विकारीं हें होय । कार्ये कर्मजें ॥२१॥ अचेतन पडे क्षिती । ना॥शिवंता॥प्रति नसे चि स्फूर्ति । नाना बाधा होतां प्रतीति । जडदेहासी नसे ॥ २२ ॥ स्थूळभूतात्मक तत्वता । तूं चि देह कीं देहाचा जाणता । तूं जाग्रतिरूप कीं प्रकाशितां । जागरणासी पाहें ॥२३॥ शिष्य विवंचून पाहतां । ह्मणे मी काष्टवत नव्हे सर्वथा । द्रष्टा साक्षी स्वभावता । ज्ञानरूप होय ॥ २४ ॥ स्वामी ह्मणती हें यथार्थ । परि वासनात्मकाचा कर्तव्यार्थ । जाणिजेत सर्व पदार्थ । जाणीव शरीरीं ॥ २५ ॥ लिंगशरीरावांचूनि । स्थूळ देहीं नसे करणी । निद्राकाळीं स्थूळ सांडूनि । वासनात्मक परिभ्रमे ॥ २६ ॥ भोगी स्वप्नाची अवस्था । स्थूळासी नसे चि ते आस्था । पुन्हा स्थूळ शरीर आश्रितां । स्थूळदेह उडे ॥ २७ ॥ जें निद्रिस्थासी उठवी । उठविल्यासी जागवी । प्रबोधूनि वागवी । नाना व्यवसायीं ॥ २८ ॥ तें सूक्ष्म वासनात्मक । सर्वस्वें स्थूळासी चाळक । तें जाणीवरूप निश्चयात्मक । तूं कैसा होसी ॥२९॥ तत्वविलक्षण ज्ञान । जाणसी तूं परमात्मा पूर्ण । जाणिवेचे देह सनातन । त्यावरी कांहीं नसे ॥ ३० ॥ तत्वत्रिपुटी कार्यकारण । जाणिवेचा अध्यास जगद्भान । अध्यारोप तुजवरी संपूर्ण । मिथ्या मायामय ॥३१॥ असो जाणिवेचा साक्षी तूं । आणि विश्वरूपाचा तंतु । आभासासि द्रष्टा परंतु । निवळोनि पाहें ॥ ३२ ॥ जाणिवेच्या योगें द्रष्टृत्व तुज । असो त्या द्रष्टृत्वें जाणीव उमज । ज्ञेय ज्ञाता ज्ञान गुज । गुणकर्तेपणें ॥ ३३ ॥ ज्ञेय तमोगुण विषयरूप । ज्ञानेंद्रियें कर्मेंद्रियें संकल्प । रजोगुणें अध्यारोप । प्राणपंचकेंसीं ॥ ३४ ॥ अंतःकरण प्राणपंचक पूर्ण । तयाचा कर्ता तो सत्वगुण । एवं तुजमाजीं त्रिगुण । जाणिवेंत अहंकर्तृत्वें ॥ ३५ ॥ येक चि असतां अहंकरण । जालें त्रिगुणें भिन्न भिन्न । तत्वें पंचवीस उत्पन्न । तयापासूनि जालीं

१ अस्ति, जायते, वर्धते, विपरिणते, अपक्षीयते, आणि विनश्यति ह्मणजे, अस्तित्व, उत्पत्ति, वाढ, पूर्णता, ऱ्हास आणि नाश हे सहा विकार होत. श्रीशंकराचार्यकृत तत्वबोध पहा. २ शरीर. ३ पूर्वकर्मामुळें उत्पन्न झालेले.

॥ ३६ ॥ तया मूळ अहंकारासी । तूं आत्मत्वें साक्षी होसी । उपरी कोणाचा कांहीं नव्हेसी । निर्विकारपणें ॥ ३७ ॥ जंवरी संसर्ग मायादेहीं । तंव चि साक्ष्यत्व तुझ्या ठायीं । प्रकृतिअभावें तुज कांहीं । साक्ष्यत्व नुरे ॥ ३८ ॥ तया साक्षत्वाचेनि गुणें । तूं मिरविसी सर्वज्ञपणें । जाणसी विषयासी ज्ञानें । परि शब्दादिक तुज नेणती ॥ ३९ ॥ स्वच्छ जळीं स्वछ गगन । तैसें निर्मळ हृदयीं सनातन । हें शुध्दसत्वदशा उन्मन । तुज निर्गुणत्वें दावी ॥ ४० ॥ असतां वस्ति तुझी तुर्येसीं । स्वप्रकाशमय आभाससी । ज्ञानें आश्रयूनि विषयांसी । भोगिसी प्रपंचासी त्या ॥ ४१ ॥ असो विषयांचा भोक्ता होसी । परि विषय तूं नव्हेसी । विषय ते पांच तूं असती । येकत्वें येकळा ॥ ४२ ॥ जाणसी शब्दातें तूं चि । स्पर्श रूप रस तैसें चि । विषय हे जड नेणतां चि । असती सर्वदां ॥ ४३ ॥ तूं वाचा कीं वक्ता होसी । तूं कर कीं देता घेता निश्चयेंसीं । तूं चरण कीं चालता आपणासी । पांहें विवरोनियां ॥ ४४ ॥ तूं श्रोत्र कीं श्रोता जाण । तूं त्वचा कीं स्पर्श पाहें पूर्ण । तूं नाना रूप कीं नयन । रसना कीं रस वोळखें ॥ ४५ ॥ रूपें धर्में करूनि जाण । वर्ते पंचविध अहंकरण । यास्तव येकाचा धर्म संपूर्ण । येकासी न लगे ॥ ४६ ॥ श्रवण न देखे रूपातें । नेत्र नायिके शब्दातें । त्वचा नेघे सुगंधातें । येकदेशी तें ॥ ४७ ॥ जिव्हेसी पदार्थ उचलेना । घ्राण गांवासी जायीना । चरण सुस्वर गायना । आहें नव्हती ॥ ४८ ॥ समस्त करणांचें ज्ञान । तुज कळे कर्तव्य पूर्ण । तूं इंद्रियें होतासी तरी स्फुरण । अनेकविध नसतें ॥ ४९ ॥ ज्ञानेंकरणपंचक नव्हेसी । तें पांच तूं येक असती । एवं स्वभावें साक्षी होसी । सकळांचा तूं ॥ ५० ॥ स्फुरे जें कर्तृत्वस्फुरण । अंतःकरणादि अहंकरण । त्यासी तूं जाणसी विलक्षण । कैसा आहेसि पाहें ॥ ५१ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । देहशुधि स्वरूप निवळा । म्हणे मेरू अनंत ॥५२॥ तृतीय रुद्रे ॥ पंचम उल्लासः संपूर्ण ॥

---

१ पांच ज्ञानेंद्रियें.

श्रीरामचंद्रायनमः ।श्रीराम समर्थ अनंतकृपा । प्रांजळ तत्वश्रुतिस्वरूपा। पाववीत सच्छिष्यासी निर्विकल्पा । अकल्प परिहारें ॥१॥ जाणतोसि जे बुद्धीनें तत्वें । ते तूं समस्त साक्षित्वें । वेगळाचि असती आत्मत्वें । देखें निवळ दृष्टीं ॥ २ ॥ आइकोनि स्वामीचें वचन । शिष्यहृदयीं रिघोनि सनातन । पाहतां पाहतां अहंस्फुरण । निवुजोनि गेलें ॥ ३ ॥ मूळस्फुरणअभावें । पडिला शून्यांतरीं स्वभावें । तें चि कारण देहप्रभवें । अनादि मायावीं ॥ ४ ॥ निर्विकल्प स्फूर्ति केवळ । अभावरूप माया अखिळ । अविद्याकल्पित सकळ । नेणीव जाणीव रूपें ॥ ५ ॥ विषयोन्मुख स्फुरण । स्ववेदक नव्हे आपण । अवेदकपणें अज्ञान । तात्काळ बाणे ॥ ६ ॥ अज्ञानें आपणा जाणावें । सर्वथैव न संभवे । तैसें चि मी मातें नेणवे । ज्ञानप्रभावें ॥ ७ ॥ एवं शिष्यवाक्य आइकोनि । स्वामी ह्मणती विद्यमानी । तुझें अज्ञान अह्मा लागोनि । कळों सरलें ॥ ८ ॥ नवल तुज द्रष्ट्याचें देखणें । अज्ञानासि विस्तारूनि आपणें । त्यामाजीं हारपसी तेणें । तुह्मा तुज चि लोप ॥९॥ कोशकीटकें गृह केलें । स्वयें अंतरीं राहोन वहिलें । द्वार बुजूनि कोंडिलें । घातक आपआपणा ॥ १० ॥ दृष्टीनें भय देखोनि अनिवार । परिहार करितां निर्विचार । डोळा झांकुनियां संहार । केला देखतदेखतां ॥ ११ ॥ आतां बरें बोळखें अज्ञान । टाकीं सर्व वृत्तीचें स्फुरण । वेगळा उरसी तो तूं कवण । नेणसी अविद्या हे चि ॥ १२ ॥ हें ज्ञातात्रयाची नव्हे खूण । जाणों जातां ठाकतें अज्ञान । तुझ्या ज्ञाना अवरोधून । गर्भांध करितें ॥१३॥ चक्षूसी मळ जळाचेनि । दृष्टीसी आभास करूनि । प्रकाशयोगें पीतवर्णी । धरांबर दावी ॥ १४ ॥ जाणतोसी नेणोनि जाणणें । कवळलें जाय नेणपणें । तें नेणपण तुझ्या ज्ञानें । प्रकाशिलें असे ॥ १५ ॥ नेणे ह्मणसी आपण । हें नव्हे चि जाणणेंवीण । ज्ञानें अवलंबूनि अज्ञान । अविद्यात्मक कां होसी ॥ १६ ॥ अज्ञान नेणे अज्ञानासी । द्रष्टा तूं ज्ञानरूप होसी । आतां धरिलिया अज्ञानासी । दाखवीं बरवें ॥ १७ ॥ ऐश्या प्रतीतीच्या प्रत्योत्तरीं । पुसतां शिष्यासी निर्धारीं ।

तो पाहूं प्रवर्तला अभ्यंतरीं । अज्ञानातें ॥ १८ ॥ प्रत्येकपणें पाहतां अज्ञान । नव्हे चि कांहीं दृश्यमान । जैसें सूर्यें रात्रीचें दर्शन । घेऊं इच्छिलें ॥१९॥ लक्ष्मीसी दरिद्रवार्ता नसे। ज्ञानासी अज्ञान न भासे। अमृतासी त्या सायासें । विषबाधा नव्हे चि ॥२०॥ चिंतामणीच्या भवनीं । नांदतां चिंता नुरे मनीं । कल्पतरूच्या उद्यानीं । काय कल्पना उरे ॥२१॥ नित्य पारिस आंगें असे । त्यासी सुवर्णइच्छा चि नसे । स्वभावज्ञानविशेषें । अज्ञान कैंचें ॥ २२ ॥ एवं ज्ञानप्रभवहृदयीं । अविद्या नुमसे चि कांहीं । अज्ञानशुद्धि लवलाहीं । अणु हि नाडळे ॥२३॥ आतां अज्ञानासी बरवें । ज्ञानाची वाति लाऊनि स्वभावें । तम नाडळे चि दीपप्रभावें । तैसें येथ जाहलें ॥ २४ ॥ आतां ज्ञान तें काय कैसें । ज्ञानासी जाणावया कायसें । भवांतकस्वप्रकाशें । विचारिलें शिष्यांसी ॥ २५ ॥ अज्ञान न भासतां कांहीं । ज्ञानासी हि ठाव चि नाहीं । पाहातां ज्ञानाज्ञान सर्वहि । शून्यत्वडोहीं बुडालें ॥ २६ ॥ हें चि हें केवळ अज्ञान । स्वरूपासी विन्मुख अदृश्य भान । अनादि देह तुझें कारण । गाढमूढ अवस्था ॥ २७ ॥ हें अभावरूप अज्ञान । याचें चि कार्य जगद्भान । स्थूळ सूक्ष्म देह जाण । ते हि तैसे चि ॥ २८ ॥ अभाव वंध्या तिची संतती । दिवस नसतां कैची राती । दृष्टीवीण सर्पाकृती । रज्जूवरी नुठे ॥ २९ ॥ ऐसा अज्ञानदेह तत्वता । रूप न करितां आलें पाहातां । जैसें सुषुप्तीचें सुख जाणतां । भोगी निद्रेमाजी ॥ ३० ॥ तैसा साक्षत्वें सर्वातीत । असती इत्थंभूत । तो तूं अज्ञान कीं प्रादुर्भूत । ज्ञाता होसी ॥ ३१ ॥ आइकोनि स्वामीचा प्रबोध । वाक्यसुधारस निर्वेध । चमत्कारूनि वेधें प्रमोद-। निमग्न जाला सुखें ॥३२॥ आंगोंआंगीं निद्राभरण । दाटोनि आणीत विस्मरण । तैसें सूक्ष्मतर स्फुरण । निराश्रय होय ॥ ३३ ॥ वेधला जाणोनि सज्ञान । सावरूनि करी सावधान । मग विचारीं संपूर्ण । पुसे प्रवर्त्तऊनि ॥ ३४ ॥ तेथें

१ उद्धवत नाहीं.

गाढमूढ अचेता । प्रबोधऊनि शिष्य तत्वता । ह्मणती उमज तूं अरे भ्रांता । तटस्थता हे वृत्ति ॥ ३५ ॥ उमजोनि जाणपणें पाहे । प्रत्योत्तर दे अवस्थाविस्मयें । ह्मणे देहत्रय अवस्थात्रय । जाणतों मी ज्ञानें ॥ ३६ ॥ अवस्था या ज्ञानरूप जया । तो मी आत्मा गुरुवर्या । वाटतें युक्तीच्या योगें सखया । उपरि कांहीं न कळे ॥ ३७ ॥ तुझें अज्ञान तुला कळे । ज्ञान हि तुझें तुज निवळे । आतां ज्ञानाज्ञानानिराळें । तुझें आस्तिक्य उमजें ॥ ३८ ॥ ज्ञानाचें परिज्ञान केवळ । दाखवी निजास्तिक्य प्रांजळ । तें हि वृत्तिरूप ज्ञान निवळ । आतां त्या परता तूं ॥ ३९ ॥ बरवें आतां इतुकें जालें । अज्ञानाचें वोझें सरलें । जाग्रतीनें जेवि वारिलें । स्वप्नींचें दुस्तरें ॥ ४० ॥ आतां अज्ञानाचें जावळें । वृत्तिरूप ज्ञान उफाळे[3] । ज्ञान ह्मणऊनि अविकळे । स्वरूपासी नेणे ॥ ४१ ॥ दीपाचेनि पदार्थ न दिसे । त्यासी दीप ह्मणावें कैसें । ज्ञान परि स्वरूप न प्रकाशे । ज्ञान काय बोलावें तया ॥ ४२ ॥ चित्रींच्या हुताशना । वाति लावितां ज्योति उठेना । ज्ञान ह्मणऊनि जाणेना । स्वरूप स्वयें ॥ ४३ ॥ ज्ञानाचें हि परिज्ञान । तुजवेगळें नसावें जाण । जरि स्फुरलें तरि संपूर्ण । तें चि अज्ञान जाणावें ॥ ४४ ॥ ज्ञान कैसें अज्ञान होय । ह्मणसी तरी आइक निश्चयें । डोळस ह्मणवी निरामय । द्रष्टा न होनियां ॥ ४५ ॥ डोळा पदार्थासी देखे । परि आपआपणा न देखे । तो आत्मविपयीं वोळखें । आंधळा चि कीं ॥ ४६ ॥ द्रष्टा देखे डोळ्याचेनि । डोळा नसे चि तो अंतःकरणीं । त्यास्तव जाण परतोनि । न पाहे आपणा ॥ ४७ ॥ अतःकरण हि तैसें चि । आस्तिक्यता न देखे आत्मयाची । जाणीववृत्तिरूप ज्ञानें तें चि । स्वरूपीं विन्मुख ॥ ४८ ॥ आतां स्वरूपासी सन्मुख । वोळखों जाय ज्ञानउल्लेख । सूर्यबिंबासी पैं देख । भानुबिंब पाहे ॥ ४९ ॥ सूर्याचेनि प्रकाशें । प्रभाकरा प्रभाकर दिसे । तरि तो हि तमाच्या चि लेशें । कवळिला जाय ॥ ५० ॥ तेविं आत्मा आत्मत्वें दिसे । तरि तो अज्ञान

१ संकट. २ सदरें भावंड. ३ उसळतें, उत्पन्न होतें. ४ अमीला.

जाला तदोदेशें । आतां आत्मज्ञान तें कैसें । निवळ अभ्यंतरीं ॥५१॥ एवं सद्गुरुवचनीं । पाहे आत्मज्ञान विवंचूनि । तेणें तूर्येची वस्ति त्यागूनि । उन्मनी सेविली ॥ ५२ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । ज्ञानाज्ञानपरिशोधकळा । ह्मणे मेरूअनंत ॥ ५३ ॥ तृतीयें रुद्रे ॥ षष्ठ उल्लासः ॥ संपूर्ण ॥ ६ ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीराम समर्थ अनंतस्वामी । प्रगटोनि माझिया अंतर्यामीं । ब्रह्माहमस्मि उपशम ऊर्मी । ज्ञप्तिसुख मज द्यावें ॥ १ ॥ बोधचिदानंदमंदार । फळला अनुभवामृतसार । त्या सुधारसाचे निरंतर । गळोळ घोंटवी ॥ २ ॥ प्रज्ञेची रसना विरे । हृदयतृप्तीनें अवतरे । सहजस्थितिसुखभरें । उन्मनि रूढवी ॥ ३ ॥ सुखावलें निजसुखें अपार । चिदाकाशमंदिरीं विहार । नित्योपभोगाचे वारंवार । सोहळे देयी ॥ ४ ॥ महाआनंदउद्यानीं । साक्षात्कार वसंतभरणीं । कृपामाधवी निजसुमनीं । वर्षो दे अभिनव ॥ ५ ॥ परिपक्क अभ्यंतरसुखें । सनातन होऊनि सन्मुखें । निजवीं निजसेजेसी हरिखें । पांघरवी दयांबर ॥ ६ ॥ ध्यानदृष्टीचें कोड पुरवी । गाळींव निजतेजाची पदवी । विभूषित सर्वांवेवीं । दावीं सुश्याम ठसा ॥ ७ ॥ रामीं नयनारविंदघनवर्ण । सुरेख रघोत्तम विराजमान । सीता मनोरम सुवर्ण । रसें रेखी दृष्टीसी ॥८॥ रामसीता रामसीता । जागृति छंद लागो तत्वता । अथवा जागरणरूप असतां । वर्तवी केवळ सुषुप्ति ॥ ९ ॥ ऐसें प्रार्थितां प्रार्थितां । प्रज्ञा घेऊनि गेला अवचिता । तया चोरामार्गे जातां । जीवित्वासी मुकलों ॥ १० ॥ कोणही विचारीना मज ऐसें । जे मरोनि बोलतोसि हें कैसें । तरि अवधानि या रे याचि मिसें । आइकावयासी ॥ ११ ॥ तुह्मासी ऐसें जाडियां । माझें सांगणें चि जायील वायां । मरण अनुभवी गुरुपायां । शिवोनि बोलतसे ॥१२॥ आहा रे

---

१ तदुद्देशें, त्याच्या उद्देशानें. २ घुटके. ३ वसंतऋतूच्या बहारांत. ४ मोगऱ्याची वेल.

आश्चिर्य जालें न कळे । मरण चि हे पिसाळलें । माझे आगीं भरोनि ईसाळें । बोलों लागे अभिनव ॥ १३ ॥ मी मी मज नसे कांहीं । मज मारूनि माझ्या आशयीं । मृत्यु नादतसे पाहीं । स्वानंदघनसुखें ॥ १४ ॥ अभिनव वाचें अभिनव जालें । सकळाचें निदान सुखावलें । आनंदामृतघन बोळले । निजजीवनें ॥ १५ ॥ तत्त्वतां जिणें ना मरणें । मृत्यु अवगमलें येणें । अवधान तुमचें होणें । असेल तरि ऐसें हो ॥ १६ ॥ आता श्रोतृत्व वगत्तृत्व पूर्ण । अनुसधान आणि अवधान । सद्गुरुपदीं निवेदन । निवेदितेनसीं ॥ १७ ॥ सुखासनीं आरूढला । जीवलगेंसीं बोलत आला । बोलत बोलत तटस्छ जाला । निद्रेच्या पडिभरें ॥ १८ ॥ तऱ्ही तो मार्ग क्रमिला । स्वराज्यवस्तीसि आला । अवचट चि आरूढला । स्वानंदसिंहासनीं ॥ १९ ॥ तेवि अवस्छा व्यतिरिक्त सहजा । उन्मनीतीत वोजा । बोधानुक्रम समाजा । चाळवीत प्रारब्ध ॥ २० ॥ स्वानंदमदीं[1] विराजमान । स्वस्वरूपजागृति ते विद्यमान । तुर्याबोध सनातन । महाकारणीं ॥ २१ ॥ महाकारणीं अज्ञानपरिहार । महाकारणीं ज्ञाननिर्धार । महाकारणीं साक्षात्कार । महाआनंद वर्ते ॥ २२ ॥ अनुत्पन्न ज्ञानरवि पाहिला । अभिनव अमृतरश्मीनें बोळला । स्वसुखाचा सुकाळ जाला । द्रष्टेनवीण ॥ २३ ॥ हे प्रतीतीची प्रतीती । अंतरी गुप्त आत्मस्छिति । आता गुरुशिष्य बोधमती । सवाद तोषें ॥ २४ ॥ स्वानंदेसीं पूर्ण विनोद । सशयेंवीण अनुवाद । प्रतीतीचा उद्घाट एवविद । पूर्वानुक्रमें ॥ २५ ॥ स्वामी ह्मणती देयीं रे अवधान । महाकारण जें ज्ञानघन । तें चि केवळ जाण [2]अज्ञान । ब्रह्माहमस्मि हा उमसे ॥ २६ ॥ तुज वाटलें आत्मदर्शन । तें चि सोलींव भेदभान । जाणिजे महाकारण । या चि अर्थे ॥ २७ ॥ कारण अज्ञानघन । यास हि जालें जें कारण । ह्मणिजे ज्ञानाचें जें परिज्ञान । उन्मेषरूप ॥ २८ ॥ पाहलें उन्मेषगगन । ज्ञानलोचन सरोवरीं पूर्ण । चिदामृतसारजीवन । भरण भरलें ॥ २९ ॥ निजज्ञानाग्रधानसारसीं । महावाक्यार्थ सुधारसीं । निजानुभवजीवनसम-

---

१ भूतबाधा, २ अस्थल,

रसीं । विराले गगन ॥ ३० ॥ सद्विद्यात्वचातडाग । स्वरूपप्राप्ती स्पर्शे अंतरंग । स्वानुभवें निस्तरंग । डबाविलें जीवन ॥ ३१ ॥ निजनयन[1] सरोजीं सार । निवृत्तिआमोद अपार । अवधान द्विरेफ[2] करूनि थार । निमग्न जाला ॥३२॥ निरुपम अरूपरूपें । दाटलें अनुभवपय स्वरूपें । तेथें आत्माविष्णु आपआपें । सुखें रहिवासला ॥ ३३ ॥ अनुपम्य अनुभवरसना । स्वरूप अनुभवजिव्हार सुलीना । अवस्थातीत पात्र उन्मना । रसें चि सुस्वादित ॥ ३४ ॥ सुलीन प्रज्ञा सनातन । सुवासाचें अवग्रहण । सनातनीं सनातन । ज्ञान विसांवलें ॥ ३५ ॥ हेंचि आत्मप्राप्तीचें ज्ञान । परि इछितां होय प्रमाण । अपेक्षा तितुकी अज्ञान । महाकारणीं पडे ॥ ३६ ॥ दीपासी दीप लाऊनि जैसें । पाहणें त्या ज्ञानातें तैसें । याकारणें वृत्तिरूप सावकाशें । सांडीं परतें अज्ञान ॥ ३७ ॥ ज्यापरीं अज्ञान सांडिलें । तेवि चि ज्ञान वोळवितां भलें । मानूनि मुळीचें आपुलें । महाकारणदेह ॥३८॥ देहचि नव्हे कीं आपण । महाकारणवृत्तिरूप ज्ञान । नसतें चि वाळंट अप्रमाण । नाणी प्रमाणासी ॥३९॥ तया ब्रह्मस्फुरणसंगतीं । अवस्थात्रय तुजप्रति । तेणें कारणें बत्धता मुक्ति । भोगिसी द्रष्टेपण ॥ ४० ॥ ब्रह्मस्फूर्तिसंग सोडितां । सरिसी जाय चतुर्थ अवस्था । देहत्रय अवस्था आतां । दृश्य कैची तूतें ॥ ४१ ॥ त्वां निस्संग अवस्थातीत । नव्होसि द्रष्टा ना साक्षीभूत । उपरी कैसा तूं निवांत । निवळोनि सांगें ॥ ४२ ॥ हें मज तुमजे चि स्वामी । ज्ञानाचा आश्रय कैसा मी । स्फूर्तिरूपें ज्ञानधर्मी । सुटिका हि नव्हे ॥ ४३ ॥ मजवीण माझें ज्ञान । मी जाणे युक्ति च करून । आणि ज्ञानासी हि टाकून । मला असतां नये ॥ ४४ ॥ स्वामी ह्मणती तुज स्वभावें । ज्ञानेंवीण असतां न फावे । आतां अवलंबिलें ज्ञान जीवें । तो तूं कैसा आहेसी ॥ ४५ ॥ तूं ज्ञानासारिखा अससी । किंवा ज्ञानासी विलक्षण होसी । आतां तूं जैसा आहेसी । तैसा चि

---

१ सुगंध, २ भुंगा. ३ कुमांड.

प्रगटीं ॥ ४६ ॥ पाहतां आहेनाहींपण । गेलें जाणतेपणेंसीं पूर्ण । अनिर्वाच्य समाधान । स्वस्थितीसी आला ॥ ४७ ॥ बोलवितां न बोले चि । आस्था नाही ऐक्यतेपणाची । विश्रांतिमार्जी विश्रांतीची । अवलंबिली निद्रा ॥ ४८ ॥ हेचि गाळींन[1] निर्विकल्पता । सूक्ष्मवृत्तिरूप अवस्था । त्यागऊनि ज्ञेतिसुखें तत्वता । येथील सहजस्थिती ॥ ४९ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । उन्मनीं उन्मेष विराला । ह्मणे मेरूअनंत ॥ ५० ॥ तृतीय रुद्रे। सप्तम उल्लासःसपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः॥ श्रीराम समर्थ अनंत ज्ञान । ज्ञेय ज्ञाता ज्ञातृत्वविहीन । अकळ उन्मनीं विज्ञान । दर्शनें अभिषिंचिला ॥ १ ॥ गेला सुलीनतेसीं सुलीन । स्वसुखाब्धीचा तळ घेऊन । राहिला आस्तिक्यसनातन । प्रश्नेरहित ॥ २ ॥ सुलीनता धरेची धरा । स्वानंदजीवनाचें जीवन सारा । स्वप्रकाशाचा प्रकाश बरा । पाहला सदोदित ॥ ३ ॥ चमत्कारपवनाचा पवन । सदोदित गगनाचें गगन । होतां न होतां निरावरण । जाला न होनि काहीं ॥ ४ ॥ अनुभवामृतसिंधूसीं । जाला हा अगस्तिऋषी । किंचिद्वातुर्विबासी । निवासस्थान जाहला ॥ ५ ॥ केवळ कैवल्यासी गती । स्वबोधराष्ट्रछत्रपति । निर्विकल्पसमाधिसंपत्ति । चक्रवर्ती होय ॥ ६ ॥ अजरामरदशेचा वल्लभ । स्वरूपाचा अनुभव स्वयंभ । आतां हा निर्विकल्प ऐसा क्षोभ । यासी तों असे चि ना ॥ ७ ॥ या चि प्रतीतीं सहजस्थिति । कैंचा अवरोध तयाप्रति । हे ताटस्थता अवचितीं वरिली प्रारब्धें ॥ ८ ॥ अरे अरे तूं समाधिस्था । निद्रेंचि सारिखी हे अवस्था । काय दर्शेत राहून आता । निर्बुजेलासी ॥ ९ ॥ हा अतिशय सात्विकाचा । येथें तुज अवकाश कैंचा । अवस्थातीत तूं मुळींचा । अवस्था का धरिसी ॥ १० ॥ घटीं मठीं सनातन । न रिघोनि प्रवेशलें गगन । तेथ कोणत्या घटाचा अभिमान । धरूनि बैसेल तें ॥ ११ ॥ आधीं

---

[1] अज्ञानांत गुरफटलास.

तर मार्गी कवळिलें । स्वानंदासी पाहिजे सेविलें । त्यास्तव तृतीचें अवधारिलें । पाहिजे अवधान तुवां ॥ २८ ॥ एवं सद्गुरुहृदय पूर्ण । उन्मनी अवस्थेसी रिघोन । केलें सर्वांग अवधान । सच्छिष्यासी ॥ २९ ॥ ऐसें अनताचें कृपाळुपण । मिठी अद्वैताची उखळोन । पुन्हा बोधामृताचें पान । करवीतसे ॥ ३० ॥ ह्मणे महावाक्याचें अभ्यंतर । महानुभाव अनुभवसार । ब्रह्मदानंद साचार । भोगिती महाकारणीं ॥ ३१ ॥ उपमन्यें[1] क्षीराब्धि आर्जिला । तैसा चि परिवारेंसीं सेविला । तेवि बोधक्षीरार्णव तुजला । प्राप्त जाला अनुभवीं ॥ ३२ ॥ दैवें कल्पतरु प्राप्त जाला । आणि अभीष्टपूर्तीचा आळस केला । अमृताब्धि तृषिता लाभला । तेणें चि जाला तटस्थ ॥ ३३ ॥ क्षुधिता परमान्नसिध्धी । होता निद्रा घेत कुबुध्धी । तेवि तुजला हे समाधी । अवरोधितसे ॥ ३४ ॥ जागा जाला सर्वांगलोचन । उन्मेष हारपला सुखघन । द्रष्टा ज्ञानप्रतीती पूर्ण । पूर्वे तूर्येसी ये ॥ ३५ ॥ निर्विकल्पसमाधि अंतःपुर । त्यागूनि आला परात्पर । सहजस्थिती सभा साचार । प्रबोधपदीं बैसला ॥ ३६ ॥ स्वरूपाचा सार्वभौम । अवस्थातीत आत्माराम । ब्रह्मानुभव विश्राम । निजऐश्वर्यविलासीं ॥ ३७ ॥ बोधविवेक सत्वस्थिति । महाकारण देश निगुती । ज्ञान प्रधान सूत्रें संपत्ती । भाग्यवंत करी सकळा ॥ ३८ ॥ स्वरूपानंद भद्रजाति । स्वरूपावधान अश्वस्थिती । स्वरूपपाळक सेनापती । भेदनिवृत्तिकर्ते ॥ ३९ ॥ सद्भाविक देव द्विज । स्वात्मसुखे अर्चूनि सहज । विख्यात तो सच्छिष्यराज । गुरुकृपें प्राप्त जाला ॥ ४० ॥ सद्गुरुपदीं स्थिरकमळ । वाहिलें तयाचें फळ । जीत मरोनि सुख[2] अखिळ । गुरुभक्तीनें भोगी ॥ ४१ ॥ मुक्ती वरील गुरुभक्ती । आर्जविली सायुज्यस्थिति । निवेदितसे सप्रतीती । कुवंडी करूनि मोक्षाची ॥ ४२ ॥ अनंतग्रंथींचें अभ्यंतर । तुज आकळलें निरंतर । येका चि वाक्यें निरुत्तर । होऊनि ठेलासि ॥ ४३ ॥ उरला बोध हा कवणापासीं । सांगावा जाण निश्चयेंसीं । तुजवीण या प्रबोधासी । कोण

---

१ उपमन्यूनें. २ उत्तम स्थिती.

पात्र असे ॥ ४४ ॥ अगा ये अवधानचिदंबरा । अनंतब्रह्मांडबोध-रभारा । असों दे तुझे हृदयीं सैरा । विज्ञानसंपत्ती ॥ ४५ ॥ अनुभव तो विवरें । ज्ञानाज्ञान उपसंव्हरें । तूं सिध्द कीं साधक निर्धारें । निर्णय करीं स्वरूपासी ॥ ४६ ॥ आतां कांहीं मी नेणे ह्मणसी । तरि तें चि अज्ञान तुजपासीं । निवळलें हृदय सुखासी । येऊं दे सहज ॥ ४७ ॥ ज्ञानाज्ञानविलक्षण । तो तूं आहेसि विलक्षण । ऐसा पूर्वीं-ल भाव उमजोन । प्रत्युत्तर देयीं ॥ ४८ ॥ ज्ञान सांडितां उरे अज्ञान । अज्ञानत्यागें लागे ज्ञान । या उभयसंकटीं मी रिघोन । तटस्थ जालों स्वामी ॥ ४९ ॥ आतां नेणे कैसें ह्मणावें । अज्ञान नसे चि स्वभावें । जाणतों ऐसें जरी बोलावें । तरि ज्ञानही नुरे ॥ ५० ॥ ज्ञानाज्ञानरहित । माझें हृदय सदोदित । स्वामी अवधारिजे इत्थंभूत । निवेदीन स्वभावें ॥ ५१ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । तूर्यस्थ सहज-स्थिती आणिला । ह्मणे मेरूअनंत ॥ ५२ ॥ तृतीये रुद्रे ॥ अष्टम उल्लासः ॥ संपूर्ण ॥ श्रीराम ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीराम समर्थ अनंत सुखें । नित्यात्मप्रतीतीच्या मुखें । निजउल्लेखीं बोधहरिखें । भवनिवर्तक जाहला ॥ १ ॥ प्रवृत्तिसूर्यासी प्रकाशमय । जयाचा नित्य सूर्योदय । कल्पतरूचा कल्पवृक्ष स्वयें । अमृताचें अमृत ॥ २ ॥ आनंदाचा आनंद निखिळ । स्वरूपाचें स्वरूप केवळ । अनुभवाचा अनुभव प्रांजळ । गाळींव सुख सुखाचें ॥ ३ ॥ उन्मनीची निजउन्मनी । ऐसी जयाची कृपासंजीवनी । अनिर्वाच्यदीक्षा महामौनी । अनंतस्वरूपें ॥ ४ ॥ ऐसा माझा अनंतमौनी । बैसला हृदयसिंहासनीं । ध्येयध्यानेंवीण ध्यानीं । अर्चिला अभिन्नसुखें ॥ ५ ॥ आतां मी मज उपदेश । सद्गुरुकृपेनें निर्विशेष । प्रबोधून अंतरींचा परेश । परात्पर जालों ॥ ६ ॥ सरली ज्ञानत्रिपुटी सहज । परि सद्गुरुभजनाचा उमज । भेदाभेद गिळूनि प्रीतिचीज ।

वेधलें अभ्यंतर ॥ ७ ॥ साक्षत्वाचा न धरिता फुज । टाकूनि अद्वैतें-
सोस निस्तेज । स्वानंदगुरुभजनें मज । मी गोरवीन ॥ ८ ॥ त्यागूनि
अविनाशमुक्ती । प्रगट करीन गुरुभक्ती । आनंदवीन मज मी भुक्ती ।
गुरुप्रसादें पूर्ण ॥ ९ ॥ नयन निववीन न्याहळीन मुख । स्वकरें अलं-
करीन निजसुख । नित्य अभिवदन सन्मुख । उभा राहूनि पुढें ॥१०॥
कर जोडूनि पुढतपुढतों । स्तवीन वाचेरहित गुरुमूर्ती । ऐसेसे नवस
मनाप्रति । पुरवीन मनोरथ ॥ ११ ॥ गुरुरूप प्रत्यक्षाकारें । दृष्टी भ-
रूनि पाहीन आदरें । ब्रह्म शून्य त्या निर्धारें । न प्रवर्तितां मना
॥ १२ ॥ एवं स्वरूपसाक्षात्कारें । सद्गुरुरूप अभ्यंतरें । उमसतैंमस
गिळूनि निर्धारें । साक्षत्वासि आलों ॥ १३ ॥ ऐसें मनोमय स्वराज्य
करी । थापटूनिया करें पाठीवरी । करूनि सावधान उत्तरीं । प्रबोधीन
सुखें ॥ १४ ॥ सद्गुरुसन्मुख निजमुखें । दृष्टादृष्टीनें बोळखें । लोचन
चमत्कारसुखें । आनंदाश्रु टाकिती ॥ १५ ॥ स्वेदैकंपरोमांचित । गद-
गदां अमे अग कापत । निर्वेधउमजें विस्मित । पडे बोबडी वाचेसी
॥ १६ ॥ हृदय दाटलें स्वानंदातिशयें । बोलासी न फावे करूं मी
काय । नुसधा चि आठव निरामय । मात्र सद्गुरुचरणीं ॥ १७ ॥ जेवि
रत्नाकराचा निजगर्भ । तैसा हृदयीं वेध स्वयंभ । जळार्णवाचा प्रांत नि-
स्तंभ । मौनें स्तंभ वाचेसी ॥१८॥ गगन स्वतः सिद्ध बोलिकें । परि स्वयें चि
बोलों न सके । देह ही अचेतन कौतुकें । सूत्रेंवीण न चळे ॥ १९ ॥
देहचाळक ज्ञानस्वरूप । समर्पूनि स्वस्वरूपीं तद्रूप । अचेतदेहयंत्रें आपें-

१ अद्वैताची मोठी आवड भक्तीपुढें अद्वैताची मातब्बरी नाहीं, असें अद्वैतवादी मुकुटमणी श्रीमच्छंकराचार्यांनीं हि आपल्या षट्पदींत सुचविलें आहे. 'सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम् । सामुद्रो हि तरंग: क्वचन समुद्रो न तारंग: ' । अद्वैतसिद्धि झाली तरी, परमेश्वरा, मी तुझा (अंशभूत) आहें समुद्र आणि लाट एक असली तरी समुद्राची लाट असाच वाग्व्यवहार होतो. २ गुरुभक्तीचा उपभोग घेऊन आनंद करीन. त्या पुढें मला नित्यमुक्ति हि तुच्छ वाटते. ३ प्रवृत्ति, निवृत्ति, ज्ञान, अज्ञान ४ आठ सात्विक भाव उत्पन्न होतात. ५ केवळ. ६ निर्वासनात्मक, एकान्तिक.

आप । बोलों न सकती ॥ २० ॥ आतां स्वामीच्या सत्यसंकल्पें । बोलाविलें चित्कळाआत्मस्वरूपें । विचारिलें मजप्रति निजकृपें । तें मी निवेदीन ॥ २१ ॥ ज्ञानाज्ञानरहित कैसा मी । मजमार्जी पाहातां स्वरूपें स्वामी । जेथें वाच्य लक्ष नसे ऊर्मी । दृश्यादृश्य कांहीं ॥ २२ ॥ मी त्रिपुटीरहित सनातन । मी अतींद्रिय पुरातन । मी सत्यसंकल्पविहीन । तत्वता वस्तु ॥ २३ ॥ मज माझा बोध ना अबोध । मी प्रसित्ध ना स्वतःसित्ध । मी वेधें ना निर्वेधें । आस्तिक्यें पाहातां ॥ २४ ॥ मीमार्जी माझें आस्तिक्य । मी ऐक्य ना अनैक्य । मी वाक्यार्थ न वाक्य । उपदेशक्रमें ॥ २५ ॥ मी उपदेश ना उपदेशिता । मी भूत ना अभूत तत्वता । मी द्वैत ना अद्वैत आतां । प्रत्यक्षतेनें ॥ २६ ॥ ऐसें माझें अभ्यंतर । उमजलों स्वामीकृपेनें अपार । परि मी अहंकृतीनें साचार । उरलों नसे कांहीं ॥ २७ ॥ माझ्या साक्षपत्वीं प्रारब्ध । प्रांजळ पवाडला स्वामीचा बोध । तेथें भेदरहित मी स्वतःसित्ध । असें अवस्थातीत स्वयें ॥ २८ ॥ स्वरूपानुसंधानबोधें । वेधलों निर्वेध वेधें । संकल्पशून्य आत्मशोधें । मनोधर्म उडाला ॥ २९ ॥ अवचट वेधलें चित्तासी । बुडाली दृश्य धारणा सरिसी । स्वानंदसमुद्रीं सुखविशेषीं । निमग्न जालों ॥ ३० ॥ स्वामी अभिनव मजमार्जी । विरत चालिलों निजउमर्जी । नव्हे निद्रा नव्हे जागर हें जी । सहज चमत्कारलें ॥ ३१ ॥ पदार्थावीण अमृताची गोडी । सर्वांगीं तृप्तीची परवडी । विषयरसना अभिन्न निरवैडी । चाखवीतसे सुखें ॥ ३२ ॥ ब्रह्मादिकांसी हि हें सुख नसेल । वदों जातां विरोनि जाय बोल । आठवे चि अति सखोल । स्मृति कांहीं नुरे ॥ ३३ ॥ ऐसें हें अभिनव सुख । स्वामीच्या कटाक्षें जालें सन्मुख । प्रतिक्षणीं निपजतसे उल्लेख । घनअमृताचा ॥ ३४ ॥ मजमार्जी विरालें चिदंबर । ऐसें माझें मज सुख अपार । मी मज उमजेवीण थार । माझी मज जोडली ॥ ३५ ॥ मज माझा चि साक्षात्कार । मज माझा निलोपचार । मी मज कृपासागर । सुखें चि अनुभवीतसे ॥ ३६ ॥ हें

१ सोपाधिक किंवा निरुपाधिक. २ मजमध्यें. ३ (?)

अभिनव अनुग्रहाचे । अकल्पित देणें स्वामीचें । स्वरूप सभाग्य दैवाचें । आलें ज्ञानसूर्यमंडळ ॥ ३७ ॥ अंतरदृष्टीनें निरंतर । विसांवलों स्वामींचे हृदयीं अपार । देशिकाच्या ईक्षणींच साचार । निवालों सुखें ॥ ३८ ॥ स्वामीच्या संभाषणीं अवचट । लाधलों स्वरूपसायुज्यपट्ट । फळलें भाग्य माझें उत्कट । लाभलों सद्गुरुसहवास ॥ ३९॥ आतां जीवें न सोडी सर्वथा । विसांवा जोडलासी श्री अनंता । पूजीन सायुज्यतेच्या माथां । न विसबे तुज ॥ ४० ॥ विलोकीन प्रातीचें सुखार्जित । अखंड वैखरीसी नामें अनंत । अंतरदृष्टीसी सदोदित । न्याहाळीन तूतें ॥ ४१ ॥ माझा निश्चयाचा हा चि प्रलय । आठवीन स्वामीचें पदद्वय । अर्चीन निजमस्तकें चित्सूर्य । समर्पीन तेणें ॥४२॥ एवं अनन्यप्रतीतिस्वभावें । स्वामीचे हृदयें च स्वानुभवें । देखोन अनन्य प्रीति अभिनवें । आलिंगिलें वत्सासी ॥ ४३ ॥ सर्वस्वें देऊनि निजरूप । आलिंगनमिसें अभेदरूप । द्यावयाचा हि दिल्हा संकल्प । कांहीं च न ठेवितां ॥ ४४ ॥ ब्रह्मा इतुकें देऊं न सके । शिवाचे हि देणें यासी न तुके । अपार गुरुदेणें न शके । वेद हि वाखाणूं ॥ ४५ ॥ त्रिगुणातीत अधिष्ठान । प्रतिष्ठा परमात्मा नामाभिधान । तो हि गुरूच्या देण्यामाजीं संपूर्ण । मोक्षेरमेसीं आला ॥ ४६ ॥ जेवि लडिवाळ शिशूसी स्वयें । निजजनकें सुखहृदयें । बोलवितां बोलत विस्मयें । प्रीतीचीं आगळीक ॥ ४७ ॥ छंदें छंदें आवडीच्या डोलें । लाडें लाडें बोवडें बोले । आईकोन सुखार्णव सखोलें । उचंबळला सद्गुरुप्रेमा ॥ ४८ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । स्वामीसंभाषण स्वसुखाचलीला । ह्मणे मेरूअनंत ॥ ४९ ॥ तृतीय रुद्रे ॥ नवम उल्लासः ॥ संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीराम समर्थ अनंत लीळा । बोधामृतकरजाळ उजाळा । अपरोक्षसुखें निजजिव्हाळा । दीधला सच्छिष्यासी ॥ १ ॥

---

१ गुरूच्या प्रेमपूर्ण दर्शनें. २ ब्रह्मदेव. ३ तुलना होणार नाहीं. ४ ( ? ). ५ सुखसमुद्राच्या लाटांप्रमाणें. ६ किरणसमूहाचा प्रकाश.

दिधलें स्वरूपज्ञान स्वयें। अनुभवावयासी निजनिश्चयें। पुढती आशीर्वाद निजविजय। जयजय प्रतिष्टेनें ॥ २ ॥ तें प्रशंसितां न ये वाचेसी। अथवा तर्कितां न ये तर्कासी। स्वभावसिध्द सच्छिष्यासी। लाधलें गुरुप्रसादें ॥ ३ ॥ तें स्वरूप अंतरस्थिति। सद्गुरूची दयासंपत्ति। दीक्षा निरुपम विश्रांति। जगदुध्दार दशा ॥४॥ जे कां सनकादिकांची स्थिती। सदाशिवविभूषित विभूती। जे दीक्षेनें कपिलयोग विख्याति। समाधि आस्तिक्यतेनें ॥ ५ ॥ चहुं मुद्रेचें अभ्यंतर। अनंतमुद्रा अगोचर। अखंडसुखाचा द्राव अंबर। अमृतें वरुपे ॥ ६ ॥ षोडश चंद्राच्या पूर्ण कळा। तेविं अपरोक्षमुद्रेची चित्कळा। अखंड वरुषतसे जिव्हाळा। प्रगटीत लक्षणें ॥ ७ ॥ ईश्वरवामदेवसंवादोक्ति। षोडशमुद्रारूप मुक्ति। सच्छिष्यें धराव्या सद्भक्ती। निरंतर आंगीं ॥ ८ ॥ राजयोगलयखंडीं गहन। निरूपिल्या षोडश मुद्रा संपूर्ण। स्वानंदजीवनीं सनातन। बुडी दीधली जिहीं ॥ ९ ॥ अखंड लयाभ्यास उन्मनी। मृकुंड्यादि महाज्ञानी। बुडाले लयानंदजीवनीं। स्फूर्ति विसरोनि सर्व ॥ १० ॥ बाह्यवृत्तीसीं लक्षणें। अंतरस्थिती समाधानें। या षोडशमुद्रा निजावधानें। व्हावें विभूषित ॥ ११ ॥ क्षौर कौपीन भस्मोत्धारण। योगपट्टावेष्टित गहन। शैलशृंगीं मुद्रा निर्वाण। कंठमाळा पादुका ॥ १२ ॥ कंथा टोप आधारी। दंड पात्र मृगाजिन धरी। ययांच्या अंतरस्थिती क्षणभरी। अवधारिजेत सुखें ॥ १३ ॥ हंस परमहंस अवधूत। सिध्द महाऋषी स्वसुखोन्मत्त। षोडश मुद्रा विभूषित। धरिती शरीरीं ॥ १४ ॥ कामक्रोधादि वैरी दारुण। करिती स्वरूपावरोधन। त्यांचें विवेकें करणें मुंडण। तें चि मुंडण योगियां ॥ १५ ॥ भवसंसर्ग अघोर। कल्पनारोमावळी अपार। निरसूनि सुमद्र करी थार। परिशुध्द हे दीक्षा ॥ १६ ॥ दुर्धर जे जे दुराभिमान। देहसंबंधें मानापमान। कीजे तयांचें उपशमन। तें निर्मळपण दीक्षेचें ॥ १७ ॥ बाह्य भादरिलें दिसे। अंतरीं कुटिळ मळ असे।

१ मृकंडु आदिकरून ऋषि. २ मुंडिलेलें.

कामसंकल्पें वाढतसे । वरि वरि कल्पना ॥ १८ ॥ तैशा मुंडणें काय होतें । निवर्तजनि संकल्पातें । निष्कामरूप अतींद्रिय तें । लाहिजे मुद्रामंडण ॥ १९ ॥ अनुतापें इंद्रियें निग्रहून। नित्य स्वरूपीं ठेवावें मन। मूळवृत्तिलज्जाआछादन । दशाकौपीन धरी॥२० शब्दादि पंच विषय । जाले निवर्तबोधें निर्विषय । भवकारणनिग्रह स्वयें। ब्रह्मचर्य दीक्षा ॥२१॥ ऐसा जो कौपीनवंत। तो स्वरूपसुखें भाग्यवंत। ज्ञानकौपीनविभूषित । अखंड उघडा ॥ २२ ॥ ज्ञानाग्नि स्वप्रकाशमान। प्रलयें जाळिले गुणागुण । निवृत्तिदशा भस्म गाळून । अभिन्नागीं चर्चिलें ॥ २३ ॥ ते निजविभूति स्वछता। झळाळित निजागीं तत्त्वता। अपरोक्ष शिवदशा योग्यता । मुद्रा गुरुकृपेची ॥ २४ ॥ अखंडमंडळाकार विचित्र। भावें आद्यंतरहित सूत्र। स्वरूपान्वयें वेष्टित पवित्र। योगपट्ट धरिला ॥ २५ ॥ स्वरूपज्ञानें समाधिस्छ । चिदंबरवेष्टित सदोदित । गुरुदयाबर अवधूत। नित्य प्रावर्ण केलें ॥ २६ ॥ विगताहंकार सुलीन। अविनाशसुखैकघन । मनोनिवृत्तिमृगाजिन । तळीं घालूनि बैसला ॥ २७ ॥ निर्विकार निराश्रय। शुद्धबुद्ध योगिया स्वयें। निष्प्रपंच निर्धूत हृदय । अखंड वीतरागी॥ २८ ॥ अलिप्त गगनासी वर्ते। उदासीन दीक्षा प्रवर्ते। निरंतर खेचरी वरुतें। आसन जयाचें ॥ २९ ॥ अनाक्षर अक्षरीं। प्रबंध रची वागेश्वरी। तेचि सेहेली अगोचरी। बाणली निजमुद्रा॥ ३० ॥ निर्वेध धवळीत संवळीत। विज्ञानशृंग उद्बोधित । अनुहातध्वनीनें शून्याश्रित। *नादें आनंद उटाशी ॥ ३१ ॥ अनिर्वचनीय संकेतें। उन्मनी* रत सा परौतें। चिदबरभरि त सुख तें। अनुभवीत योगिया ॥ ३२ ॥ अमनस्कमुद्रा अमृत। स्वानुभवसुखें द्रवत। गुरुमहावाक्य विभूषित। धरिजेत श्रवणीं ॥ ३३ ॥ सच्छिष्य मुद्राधिकारी। अखंड चिन्ह हृदयीं धरी। तो चि स्वरूपसाक्षात्कारीं। सार्वभौम होय॥३४॥

---

१ *कमरेचें वस्त्र ( योग्याच्या )*  २ ( ? )

ऋषिप्रोक्त वेदगर्भ । वचनें सन्मणी सुप्रभ । अर्थमाळा स्वयंभ । नित्य कंधरीं धरी ॥३५॥ हंसवृक्षाचें निजमूळ । तयाच्या पादुका सोज्वळ । अलक्षगतीनें केवळ । पदीं लेतसे ॥ ३६ ॥ कल्पनाकार्पास चाळिला । अनुभवचिदंबररूपा आला । तो सद्गुरुप्रसाद धरिला । कंथास्वरूप विदेहें ॥ ३७ ॥ अनुभव नित्य शोभवी । प्राप्तीचा मस्तक वसवी । तो कैवल्याचा टोप पदवी । महाप्रसाद स्वामीचा ॥ ३८ ॥ विज्ञानतरु अष्टावक्र । स्वरूपान्वयें अवक्र । तयाचि आधारी गुरुशक्र । प्रसादें धरिली ॥ ३९ ॥ गुरुबोध दंडायमान । अखंड दंडिला अभिमान । तेणें दंडधारी सन्मान । भवनिवर्तक जाहला ॥ ४० ॥ ज्ञानामृतें परिपूर्ण । उचंबळे हृदयकमंडळजीवन । परमामृततृप्ती पावन । संतोषग्रामीं वसे ॥ ४१ ॥ सेऊनि प्राप्तिपरमान्न । करी स्वानंदघृतपान । नित्यतृप्ति सुप्रसन्नवदन । अखंडित पुष्टि तुष्टी ॥ ४२ ॥ एवं षोडशमुद्राधारण । सहजस्थिति विराजमान । परंपरेनें सनातन । प्राप्तीसि आलीयां ॥ ४३ ॥ शब्दासरिसा अर्थ होय । हे गुरुकृपेची मुद्रा स्वयें । चिंतना धारणा हृदय । प्रवर्तविखें नसतां ॥ ४४ ॥ श्रवण न करितां श्रवण । हें चि सद्गुरुकृपेचें महिमान । अखंड उन्मनीं मनन । पाठीं च लागे ॥ ४५ ॥ अभ्यासविना निजध्यास । सामरस्यें वीण सौरस । सद्गुरुकृपा बहुवस । विज्ञानदशा ॥ ४६ ॥ श्रीरामें सप्तमावतारीं । वशिष्ठकृपा अगोचरी । स्वरूपज्ञानमुद्रा शरीरीं । धरिली निरंतर ॥ ४७ ॥ तो महाप्रसाद रामकृपा । आला समर्थांच्या स्वरूपा । अवधान देऊनि निर्विकल्पा । श्रवणें चि पाविजे तेणें ॥ ४८ ॥ तें चि पुढें निरूपण । विरक्तिवनीं विचरतां गुणसंपन्न । समर्थासी प्राप्ति जाली पूर्ण । दशा ते अवधारिजे ॥ ४९ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । निरोपिल्या ज्ञानमुद्रा षोडशकळा । ह्मणे मेरूअनंत ॥ ५० ॥ तृतीय रुद्रे ॥ दशम उल्लासः ॥ संपूर्ण ॥

---

१ कंठांत. २ कायम. ३ श्रेष्ठगुरु. ४ आत्मप्राप्तिरूप उत्तम पक्वान्न.

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ अनंत सिद्ध । परमहंसबोधे प्रसिद्ध । अनुभवासि दीक्षा निर्वेध । निर्गुणस्वरूपें ॥ १ ॥ जे निजाची नित्यमुक्तता । अनुभवसंजीवनी तत्त्वता । ते योगदीक्षा स्वभावता । समर्थनिभूषणें ॥ २ ॥ अविनाशयोगी दशास्पद । ब्रह्मानुभवज्ञानें संवाद । ज्ञाननिर्वाणास्थिति विद्वदें । दर्शनें वेधी ॥ ३ ॥ ब्रम्हसंकल्पेवीण स्वतःसिद्ध । परमपुरुष शुद्ध बुद्ध । स्वानंदघन उद्बोध । सदोदय सुखें ॥ ४ ॥ चिद्गगनगभस्ती भरीव । जो निर्भेव स्वयंभानुभव । स्वराज्य-स्वरमण सदैव । आधि हें सत् सौम्य असतें झालें ॥ ५ ॥ जो निर्दोष अप्राकृतशरीर । सच्चिदानंद घनसाकार । तो सद्गुरु सप्तमावतार । विश्वोत्धारभानु ॥ ६ ॥ संस्कारविहीन सृष्टी । सुखैकघन सुखाच्या कोटि । देत निजभक्तासि भेटी । अभेदबोधसुखें ॥ ७ ॥ जो येका-की येकपणेंवीण । हृदयींच भेटे अवतरोन । देशकाळवर्तमान । नसे तेथें उग्र असे ॥ ८ ॥ तो चि द्विलास राजीवनयन । सुश्याम तनु रघुनंदन । विकारशून्य स्वानदघन । विचरे विज्ञानघनांतरीं ॥ ९ ॥ चतुर्युग निमिषप्रमाण । त्यावरि रूढलें वर्तमान । तया अवकाळीं सनातन । अखड भेटतसे ॥ १० ॥ दृश्य द्रष्टा दर्शनेंवीण । निराभास देश सपूर्ण । तया स्वदेशीं स्वानदघन । नादतसे सुखें ॥ ११ ॥ तो योगिराज निरंजन । समर्थस्वरूपें विराजमान । नित्यविरक्तीचें का-नन । वसवी उदासदीक्षा ॥ १२ ॥ नसे चि स्वरूपसग्रह ज्ञान । सह-जदीक्षेनें उदासीन । उपाधित्रयचर्याविहीन । ब्रह्मचर्य जयाचें ॥ १३ ॥ सहजदीक्षा उपदेश होय । सहज निवृत्तिवेध प्रमेय । सहज साक्ष्यत्व अतींद्रिय । अबोध मुळिंचा ॥ १४ ॥ नाहीं पाठांतर बोधपटुता । नाही कर्तव्य खटाटोपता । नाहीं नित्य स्वरूपअहता । परमहंस योगी ॥ १५ ॥ न दिसे दीक्षा दीक्षास्वरूप । अज्ञान ना सज्ञान निष्पाप । पिशाच खेचरीचर्यारूप । वायुवत् विचरे ॥ १६ ॥ स्वरूपसमाधान अतरीं । प्राप्तीचीं चिन्हें हीं न धरी । तो समर्थस्वामि वनातरीं । विच-

---

१ (?). २ सदेव सोम्येदमग्र आसीत् । छा. उ ६, १

मती सुलीन। सहजस्थिती॥ नाहीं देहाची आठव चित्तीं। निरावरण सुखव्यक्ति। उभयविहीन-दशा॥ ३५ ॥ वृत्तिक्षोभ ऊष्ण तपत। ते ही नाठवे सुखें उदित। वृत्तिअभावें सीत, कडकडीत। लागतां आंगीं स्पर्शेना ॥ ३६ ॥ निलपदगति आचरणें। अबाधित कंटकवृत्तीनें। कांक्षाफलमूळभक्षणें। हे हीं न घडे ॥ ३७ ॥ अनादि स्वरूप वांछित। स्वानंदजीवन नापेक्षित। स्वरूपदशा बुभुक्षित। मुक्ति भुक्ति इछा नसे ॥ ३८ ॥ एवं अंतरस्थिति उदासीन। परब्रह्म सनातन। सप्रतीती-समाधान। प्रगट समर्थरूपें ॥ ३९ ॥ समर्थ निर्वाण तनुलीला। दाश-रथीनें देखोनियां डोळां। निजकृपांबर मेखळा। दासाचे गळां घातली ॥ ४० ॥ स्वभावस्थिति आठव देहीं। पाहातां मेखळा हृदयीं। विस्मय पाहोनि लवलाहीं। काढूं पाहती सवेग ॥ ४१ ॥ तेव्हां प्रत्यक्ष होऊनि रघुवीर। समर्थासि हृदयीं धरूनि साचार। ह्मणती हें कृपांबर। धरीं सर्वदां आतां ॥ ४२ ॥ ते रामप्रसादमेखळा। सुरंग ज्ञान चित्कळा। शोभली समर्थाचे गळा। दाशरथीकृपेनें ॥ ४३ ॥ शून्यसंकल्प निर्विकल्प। नाहीं विक्षेपाचा विकल्प। तेणें रामप्रसादरूप। मेखळा घ्यावी ॥ ४४ ॥ हें वोंकाररूप स्वयें। औटमात्रा ज्योतिर्मय। स्वरूपता चि निरामय। गुरुकृपा अखिळ ॥ ४५ ॥ स्वानंदघनप्रतीती। रंध्र तें मूळशून्यस्वस्थिती। अकार पूर्वे विश्रांति। उकार अभाव वेष्टित ॥ ४६ ॥ मकार विस्मय पश्चात। शून्य अंतर्बाह्य सदोदित। अर्धमात्रा अखंडीत। अनुभवदशा ॥ ४७ ॥

श्लोकः— ॐकाररूपा वरमेखलेयं रध्राद्यकारः पुरतो दधांतात्।
उकाररमात्परतो मकारः सधैरयातर्बहिरर्धमात्रा ॥ १ ॥

शून्यांतर षोडशांगुळी। रुंदी कोपरयुक्त आगळी। वांबी चरणकमळीं स्पर्शोनि रुळे ॥ ४८ ॥ भागवतधर्मी चित्तप्रसन्न। ब्रह्मानंदें परिपूर्ण। तेणें सहजस्थिति हे विभूषण। मेखळा धरावी ॥ ४९ ॥

श्लोकः— व्यष्टांगुलायाममितांतरालां स्वच्छा कर्पोणिद्वितयां महत्वात् ॥
जघाद्वयाधः प्रविलंबमाना सुमेखलां भागवतोऽपिदध्यात् ॥

१ कोंपर.

टत असतां ॥ १७ ॥ स्वभावें परिभ्रमण होतां । ज्ञानदृष्टीसि येणें समर्था । जाहलें उपदेशासि कारण तत्वता । बोधसृष्टिच्या मार्गे ॥ १८ ॥ नसे वितंडवाद वित्पत्ति । नसे चमत्कार बोधमती । नसे घातमात वेधकवृत्ती । जटील कुटिलावबोध ॥ १९ ॥ नसे पुस्तकसंग्रह पोथी । ना साहित्य संगति संपत्ति । ना वस्त्राभरण वेधकस्थिति । उपकर्णादिक ॥ २० ॥ सामर्थ्यबोध ना प्रशंसिता । मृदु वाग्विलास ना कठोरता । शांत ना उदासीन सहिष्णुता । ध्यानधारणादिक ॥ २१ ॥ वैराग्य तरि मूर्तिमंत स्थिति । परि नसे विरक्तीची उत्पत्ती । योगिराज समर्थविभूति । महाआस्तिक्येनें विचरत ॥ २२ ॥ संसर्गमात्रें कृतार्थ जन । सज्जनकृतचर्यापावन । ईक्षणात्रबोध निरंजन । दीक्षा तयाची ॥ २३ ॥ सहजस्वरूपें चिदंबर । अखंड उघडा दिगंबर । बाघांबर ना नागांबर । कल्पनांबर असे चि ना ॥ २४ ॥ काया सुसोळ मठ बागवी । माया कांहीं नसे जीवीं । जाया सायुज्यता बरवी । मुळींहूनि नाहीं तया ॥ २५ ॥ निर्विकल्प तरुतळीं बैसे । वृत्तिशून्यागारीं वसे । महास्मशानीं क्रीडतसे । निरंकुश तो ॥ २६ ॥ लाभालाभ लोभ नसे । धर्माधर्म पंथ न दिसे । निस्त्रैगुण्य विचरतसे । स्वछंदरत तो ॥ २७ ॥ समलोष्टाश्मकांचन । चातुर्वर्ण्य तितिक्षाचरण । अखंड उन्मनीनिर्वाण । आपपररहित ॥२८॥ जैसा कां वृक्ष कीं पाषाण । संज्ञानविहीन सनातन । योगिराज विभूषण । समर्थविभूति स्वयें ॥२९॥ त्रिगुणयज्ञोपवीत आश्रमी । धर्मरहित समर्थस्वामी । शुद्धबुद्ध स्वयें अंतर्यामी । परात्परस्वरूप ॥३०॥ नाहीं अपेक्षा भुक्ति मुक्ती । नाहीं अभेदयुक्ति भक्ती । नाहीं शक्तता स्थिती व्यक्ति । अव्यक्त व्यक्तता ॥ ३१ ॥ अगोचरदीक्षा परम । श्रीसमर्थ आत्माराम । जगदुद्धार परंधाम । बोधसृष्टीसि नांदे ॥ ३२ ॥ साधुसिद्ध दीक्षाचूडारत्न । पवित्र ज्ञानियाचें मंडण । समर्थगुरुवर्य विभूषण । ज्ञानसूर्य वर्चसें ॥ ३३ ॥ विचरतां विरक्तीनें वनीं । स्वामीसंरक्षणाछागूनि । मनोहर कार्मुक[3]पाणि । पुढें मार्गे तिष्ठती ॥ ३४ ॥

१ उपकरण, साहित्य. २ उद्धटपणा. ३ हातांत धनुष्यबाण घेतलेले रामलक्ष्मण.

मती सुलीन। सहजस्थिती। नाहीं देहाची आठव चित्तीं। निरावरण सुखव्यक्ति। वस्त्रविहीन दशा॥ ३५ ॥ वृत्तिक्षोभ ऊष्ण तपत। ते ही नाठवे सुखें उदित। वृत्तिअभावें सीत कडकडीत। लागतां आंगीं स्पर्शेना ॥ ३६ ॥ निलपदगति आचरणें। अबाधित कंटकवृत्तीनें। कांक्षाफळमूळभक्षणें। हे हीं न घडे ॥ ३७ ॥ अनादि स्वरूप वांछित। स्वानंदजीवन नापेक्षित। स्वरूपदशा बुभुक्षित। मुक्ति भुक्ति इच्छा नसे ॥ ३८ ॥ एवं अंतरस्थिति उदासीन। परब्रह्म सनातन। सप्रतीती-समाधान। प्रगट समर्थरूपें ॥ ३९ ॥ समर्थ निर्वाण तनुलीला। दाशरथीनें देखोनिया डोळां। निजकृपांबर मेखळा। दासाचे गळां घातली ॥ ४० ॥ स्वभावस्थिति आठव देहीं। पाहातां मेखळा हृदयीं। विस्मय पाहोनि लवलाहीं। काढूं पाहती सवेग ॥ ४१ ॥ तेव्हां प्रत्यक्ष होऊनि रघुवीर। समर्थासि हृदयीं धरूनि साचार। ह्मणती हें कृपांबर। धरीं सर्वदा आतां ॥ ४२ ॥ ते रामप्रसादमेखळा। सुरंग ज्ञान चित्कळा। शोभली समर्थाचे गळां। दाशरथीकृपेनें ॥४३॥ शून्यसंकल्प निर्विकल्प। नाहीं विक्षेपाचा विकल्प। तेणें रामप्रसादरूप। मेखळा धारी ॥४४॥ हें ओंकाररूप स्वयें। औटमात्रा ज्योतिर्मय। स्वरूपता चि निरामय। गुरुकृपा अखिळ ॥४५॥ स्वानंदघनप्रतीती। रंध्र तें मूळ शून्यस्वस्थिती। अकार पूर्व विश्रांति। उकार अभाव वेष्टित ॥४६॥ मकार विस्मय पश्चात। शून्य अंतर्बाह्य सदोदित। अर्धमात्रा अखंडीत। अनुभवदशा ॥ ४७ ॥

श्लोक:— ॐकाररूपा वरमेखलेयं रध्राधकारः पुरतो दशांतात्।
उकारसंप्राप्तपरतो मकारः संधेरथातर्बहिरर्धमात्रा ॥ १ ॥

शून्यांतर षोडशांगुळी। रुंदी कोंपरयुक्त आगळी। लांबी चरणकमळीं स्पर्शोनि रुळे ॥ ४८ ॥ भागवतधर्मी चित्तप्रसन्न। ब्रह्मानंदें परिपूर्ण। तेणें सहजस्थिति हे विभूषण। मेखळा धरावी ॥ ४९ ॥

श्लोक:— व्यष्टांगुलायाममितांतरालां स्वच्छां कर्पोणिद्वितयां महत्वात् ॥
जंघाद्वयाधः प्रविलंबमाना सुमेखलां भागवतोऽपिदध्यात् ॥

---

१ कोंपर.

जो वीतरागी उदासीन । जो समाधिस्थ निजनिर्वाण । निंदा स्तुती समसमान । तो ज्ञानकैवल्यपदाधिकारी ॥ ५० ॥ सर्वशास्त्रीं अभिज्ञमती । भगवद्भजनें सुलीनवृत्ती । भूतमात्रीं देवप्रतीती । मेखळा धरावी तेणें ॥ ५१ ॥

श्लोकः— यो वीतरागी विदितार्थशास्त्रः समाननिंदास्तुतिमौन मुद्रः ॥
भिन्दन्सदा यस्तु विपक्षपक्षं जितेंद्रियो यस्तु स मेखलावान् ॥

परात्पर सद्गुरु मेखळा । बोधारुण ज्ञान उखाळिला । जे परमगुरूसि अवलीला । बाणली प्रतीती ॥ ५२ ॥ ते सद्गुरु अनंतमौनीसी । ब्रह्मदीक्षा चित्प्रकाशी । समर्थकृपांबरदशा ऐशी । लाधली अंकल्पित ॥ ५३ ॥ परिस धातूचें सुवर्ण करी । तयासि लोहत्व नाणि माघारीं । तैसी देशिककृपा शिष्यावरी । गुरुत्वें विभूषित ॥ ५४ ॥ ब्रह्मानंदघनदशा पूर्ण । चिदंबरमेखळा विज्ञान । स्वरूपानुभव सनातन । प्रतीती कफनी ॥ ५५ ॥ सद्गुरु श्रीअनंतें । सुखैकघन प्रसन्नचित्तें । निजांगींची दशा कृपाहस्तें । पांघरविली मज ॥ ५६ ॥ स्वराज्यछत्रपति केलें । स्वरूपासि स्वरूप दिधलें । बोध सिंहासनीं स्थापिलें । अपरोक्षसुखें ॥ ५७ ॥ हें निजवात्सल्य स्वामीचे । उत्तीर्ण न होयें चि मी साचें । कृतोपकारी प्रत्योपकाराचें । मावळलें मीपण ॥ ५८ ॥ परि मनोधर्म स्वामिसेवा । विश्रांतीचा निज विसांवा । अनंत प्रतीतीनें अर्चावा । येणें मन ऋणी जालें ॥ ५९ ॥ अनंतमौनी या चि प्रत्ययें । स्तविजेत हा मनोदय । स्वास्तव वाचारुण[1] हा निरामय । वाक्पुष्पें समर्पीन ॥ ६० ॥ अनुभवसदनीं निरंजन । उजळला चिदर्कदीप सुभान[2] । अनंतरश्मी सुखैकघन । प्रकाशित आरत ॥ ६१ ॥ अखंड गुरुपूजा अनुसंधान । अखंड देशिकस्वरूप न्याहळीन । अखंड सन्मुख बैसोन । आईकेन कृपावचनें ॥ ६२ ॥ दिवस रात्रीवीण अवकाळीं । उपदेशक्रम अवधान मुळीं । प्रज्ञारहित हृदयकमळीं । करीन नित्य श्रवण ॥ ६३ ॥ मी चि होयीन स्वयें वक्ता । मी चि होयीन माझा श्रोता । मी चि

१ वाणी हा च अरुणोदय. २ शोभन.

स्वरूपार्थ तत्वता । अनुभवीन अनंत ॥ ६४ ॥ या परीं ,श्रीअनंता । हृदयसिंहासनीं सप्रेमता । जिवें कुर्वंडी करूनि, तत्वता । अर्चीन सुखें ॥ ६५ ॥ तें चिद्भानूचें अखंडमंडळ । पाहलें हृदयाकाशीं सोज्वळ । अवधाननयनें प्रभाकल्लोळ । दीपमात्र पाहा ॥ ६६ ॥ जेंहीं दीपासि अवलोकिलें । तयासि अनंत दर्शन जालें । मग त्यासी च अर्चन घडलें । सद्गुरु अनंताचें ॥६७॥ हें सद्गुरुअनंतआख्यान । तृतीयरुद्रीं निरूपण । अनुग्रह अपरोक्षज्ञानें । संपूर्ण रुद्र हा ॥६८॥ वामनेत्र प्रवृत्तिज्ञान । दक्षिणनेत्र ज्ञानाचें विज्ञान । अनिर्वाच्य समाधान । त्रिनयन रुद्र हा ॥ ६९ ॥ निवर्तविली शिष्याची प्रवृत्ति । प्रवर्तविली अतरीं निवृत्ति । निटसिल्यां संकल्पआवृत्ति । या तृतीय महारुद्रें ॥ ७० ॥ या तृतीयरुद्राचें श्रवण । साच आत्मत्रिंबकदर्शन । अनंतकृपेनें स्वानंदघन । तिसरा रुद्र सेविला ॥ ७१ ॥ आतां चतुर्थरुद्रपीठिका । त्रिंबकदया चिदबिका । चिदर्ककोटि निजांगिका । तेजासि तेज पाहले ॥ ७२ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । समर्थकृपा चित्कळा मेखळा । ह्मणे मेरूअनंत ॥ ७३ ॥ तृतीयरुद्रे ॥ एकादश उल्हासः ॥ संपूर्ण ॥

रुद्र तृतीय सपूर्ण ॥ येकूण उल्हास ॥ ११ ॥ श्लोक ॥ ३ ॥ वोव्या ॥ ५७३ ॥

---

## ॥ श्रीराम समर्थ ॥

श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः ॥

श्रीरामं परमानंदमुपदेष्टारमीश्वरं ।
*व्यापकं सर्वलोकानां कारणं तं नमाम्यहं ॥ १ ॥*

श्रीराम समर्थ अनंत सूर्य । स्वप्रकाशाचा प्रकाश स्वयें । नित्यानुभवसूर्योदयें । होय ज्ञान सूर्यासी ॥ १ ॥ स्वयंभ प्रचितीची शिष्यमती । धवळीत आस्तीक्यता जगती । स्वबोध अभिनव गभस्ती । अखंडित उदेला ॥२॥ तेजाचा डोह सनातन । प्रभेमाजी मरींव चिद्गगन । *आंगीचा आंगीं प्रकाशघन । प्रगटोनि विरे ॥ ३ ॥* आत्मरवि रत्न-

---

१ प्रकाशाचा ( पा. )

ज्योतिर्मय। उळथत भ्रांतीचा। आंगीं तेजप्रत्यय। हेळावत स्वानंद-जलहृदय। भानुमंडळ जैसें॥ ४॥ स्वयंभ दिशा उजळीत। अभिन्न वस्तु दृष्टीसि दावित। अद्वय चिन्मात्र सदोदित। अखंड मार्तंड उदेला॥ ५॥ सगळा चि दिवस पाहला। उदयअस्तुवीण घनवटला। स्वरूपचक्षु स्वयें जाला। अवघा चि दिवसपति॥ ५६॥ स्फूर्तिसह दिवस विभावेरी। अवकाशासी नसे उरी। स्वयंभ ज्ञान अभ्यंतरीं। अखंड लखलखाट॥ ७॥ स्वयंम तेजें चि तेजिष्ठ। ब्रह्मवर्चसें ब्रह्मनिष्ठ। स्वरूपपांथिक योगभ्रष्ट। ज्ञानरविउदयें निघाले॥ ८॥ ज्ञानगंगा जळकल्लोळीं। अघमर्षण प्रत्यय मौळी। अप्रांत सुखें विश्रांति मौळी। मज्जती नित्य प्रातस्नाई॥ ९॥ अनंतांशु[3] चंडकिरणीं। मुमुक्षहृत्कमळें तरणी। ज्ञानोदयअरुणभरणीं। विकासलीं कमळें॥ १०॥ नित्योदय अनंतांशुकरें। जाले खग योगकुटीं चेईरें[4]। स्वप्रकाशगति निर्भरें। भरले चिद्गगनीं॥ ११॥ स्वबोधविश्वसूर्योदयीं। सोहं चक्रवाकें विदेही। निर्द्वंद्व ऐक्यसुखें पाही। पावलीं विश्रांतीसी॥ १२॥ ज्ञानप्रभेचा अखंडोदय। साधूनि ज्ञानाग्निहोत्र स्वयें। हवीती साधन स्फूर्तिमय। हिरण्यगर्भदर्शनें॥ १३॥ नित्यत्रिलोचनप्रतिष्ठा। त्रिकाळीं अकाळ द्रष्टा। अखंड वेदांगतनिष्ठा। प्राची उजळी॥ १४॥ आत्मभाव वसुधा। अखंडैकरससिंधु सुधा। धरापूर्णजीवनें नुसधा। स्वानंद सफळित॥ १५॥ विश्रांतिपट्टणे अनंतवस्ति। अनुभवचक्रवर्ती नांदती। अबोधसुविरोचन कांतीं। विधिकुलाळ वर्तवी॥ १६॥ अचलस्थितीचे गिरिवर। शांतीवनंस्तिप्रभाकर। स्वयंभु वेद अभ्यंतर। प्रकाशिले त्रिकांड॥ १७॥ ऐसा स्वप्रकाशअनंतांशु। न पाहती ते गर्भांध पशु। प्रकाशें मनमेंयंक[5] पुनर्वसु। निस्तेज सहनक्षत्रें॥ १८॥ आत्मविद संवित्प्रभवें। चित्सवितान्वित जीवें। सर्वांगलोचन स्वानुभवें। स्वप्रकाश संत॥ १९॥ प्रज्ञानब्रह्म आत्मवेत्ता।

१ सूर्य. २ रात्र. ३ अनंतभौनी हा च सूर्य त्याच्या किरणांमुळें ४ जागे. ५ मनरूप चंद्र.

दीप सद्गुरु सन्मुख तत्वता । दीपे चि प्रकाशिले अनंता । जालें अनंत दर्शनें ॥२०॥ या निजप्रकाशाची संपत्ति । सिध्द साधक अनुभविती । कृतार्थ करावया जगती । वर्तती स्वछंदे ॥२१॥ बालोन्मत पिशाचवत् । दिगंबरदीक्षा अवधूत । ससर्गे जनकल्मशें निर्धून । पावन चर्या जयाची ॥ २२ ॥ निःसंगब्रह्मचर्ये विभूषित । मुळींहूनि वीतरागी अनत । परमहंसदीक्षा विख्यात । केवळ उदासीन ॥ २३ ॥ परमात्मा पुरुषोत्तम । विष्णुस्वरूपें चि निष्काम । तैसा चि शिव सर्वोत्तम । गुरुसदन सेविती ॥ २४ ॥ सत्यलोकींचा निवासी । ब्रह्माणीवर सेवी गुरुसी । सिध्द त्रिभूवण योगरासी । दक्षिणामूर्ति स्वयें ॥ २५ ॥ अनुभवसुरतरुंआश्रित । कृपामृतपानें गुरुभक्त । महायोगी समाधिस्त । सेविती देशिकातें ॥२६॥ नव सिध्द सनकादिक । योगी स्वप्रकाश ज्ञानार्क । तदैकरूप निश्चयात्मक । तत्पर गुरुसेवेसी ॥ २७ ॥ कपिलादि महामुनी । समाधिस्त सिद्धासनीं । देवऋषिब्रह्मज्ञानी । तन्निष्ठ सद्गुरुपदीं ॥ २८ ॥ जो महायोगियाचा अग्रणी । दत्तात्रय महामुनी । अवधूत स्वयें निर्वाणी । तो हि गुरुभजनीं तत्पर ॥ २९ ॥ जडभरतादि दुर्वास । श्वेतकेतु परमहस । ऋषभादि स्वप्रकाश । सिध्द गुरुभजनेसि ॥ ३० ॥ व्यासादिक महाऋषी । प्रल्हादआदिकरुनि विशेषी । विरक्त शुक तपोराशी । प्रकाशले गुरुभजने ॥ ३१ ॥ नारद हनुमंत भक्तराज । गुप्त प्रगट ते सहज । समाधिशय्येसि निज चोज । चर्या गुरुभजनें ॥३२॥ अगोचरस्वरूपें अपार । प्रकाशले ज्ञानप्रभाकर । ते चि गुरुमंदिरीं मनोहर । दीपावळी साजिरी ॥ ३३ ॥ नित्यस्वरूपभूमिकेसी । ज्ञानसुरंग स्वप्रकाशी । नित्यमुक्त प्रकाशरासी । रंगमाळा साजिऱ्या ॥ ३४ ॥ क्षेत्ररहित ज्ञानउजाळा । शोभा गुरुसभेसी नक्षत्रमाळा । स्वप्रकाशमय चित्कळा । सभावरें अचिळी ॥ ३५ ॥ अनंतज्ञानरत्नें उज्वळीत । तत्वचामीकरें समा धौत । स्वानदसिंहासनीं श्रीअनंत । अळकृत बैसला ॥३६॥

१ लाकाचीं पातकें २ ब्रह्मदेव. ३ शकर ४ कल्पवृक्ष. ५ आत्मस्वरूप रूपी जमिनीवर. ६ रांगोळ्या

आठवविहीन निजआठव । पदीं जडलों स्वानुभवें । अभयंकर घेऊनि जीवें । उभा ठाकलों सन्मुख ॥ ३८ ॥ जय जय निजविजय स्वामी । जय जय भवनिर्जित अंतर्यामी । जय जय निरंजन निजधामी । ठेविलें मज ॥ ३८ ॥ जय जय अनंगजित अपारा । जय जय मनोहर माहेरा । जय जय स्वसुखाब्धी अंतरा । माजि मज्जविलें तुवां ॥ ३९ ॥ जय जय शरणागतवज्रपंजरा । जय जय अप्राकृत सुखशरीरा । जय जय निगमअभ्यंतरा । सद्गुरुस्वामी ॥ ४० ॥ आतां प्रवृत्ति ना निवृत्ति मज । माझें चि वाटतें निजचोज । मी मज माजी सहज । कांहीं च उमसेना ॥ ४१ ॥ परि स्वभावक्षेत्रस्थितिनें । त्रिगुणात्मकलोकदृष्टीनें । त्या त्या अवस्थेचेनि गुणें । मी कैसें कसा दिसेन ॥ ४२ ॥ चिदंबरें केवि कीजे परिधान । तेवि माझें मज नसे ज्ञान । ऐसा उघडाचि निर्वाण । मी न लक्षे चि तयासी ॥४३॥ असो हें कैवल्य माझी गती । प्रारब्धीं राहावें कैसी स्थिति । अवरोधितां गुणांची गती । अवरोधेना ॥ ४४ ॥ आकाशीं चळचळाट वारा । तो गगनें केवी पाठिमोरा । किजेति तेवि संस्कारा । निवृत्ति न घडे ॥ ४५ ॥ पर्जन्याच्या विखुरल्या धारा । रिचवेती धरणीवरी सैरा । त्या परतोनि न्याव्या अंबरा । कवण्या प्रकारें ॥ ४६ ॥ प्रबोधीं बैसले साक्षी स्वयें । त्याचें हृदय निरामयें । परि त्या चि हृदयीं गुणातिशयें । गुणक्षोभ उठे ॥ ४७ ॥ वृत्ति साक्षत्वाची दोहीकडे । मागें आंधार पुढें उजेडे । सर्वांगद्रष्टा चहूंकडे । पाहे दृष्टीविहीन ॥ ४८ ॥ नेत्रेंवीण नयना पाहववी । श्रवणेंवीण श्रवणा ऐकववी । स्वयें स्वरूपगोसावी । स्वरूपाचा द्रष्टा ॥ ४९ ॥ स्वरूप संदर्शनें सुलीन । जेवि गगनाचे वास्तव्यपण । अभावभावविहीन । स्वतःसिद्ध तैसा चि ॥ ५० ॥ त्याचि गगनपैसारे । लोकविस्तारले विकारें । तेवि माझ्या आश्रयसंस्कारें । वर्धले त्रिगुण ॥५१॥

१ मूळमाया. २ आत्मसाक्षात्कार. ३ मदनाला जिंकिलें आहे ज्यानें असा. ४ सत्व,रजस्,तमांची. ५ वाहतात. ६ आत्मस्वरूप. ७ निर्विकल्प. ८ मूळस्फुरण. ९ आकाशाच्या विस्ताराप्रमाणें.

निर्मळ गगनीं दृश्य केरें । तेवि मजमाजि प्रारब्धी विकार । आतां ज्ञानाग्निप्रळयकर । देवा कल्पांत करी ॥ ५२ ॥ देहप्रारब्धें सहित । मळय गंधर्वाहातीं गुप्त । तैसें असाध्य जीवित । करीं सर्वस्वें ॥५३॥ अथवा विलक्षणवर्जित । राजस तामसा रहित । सात्विकी क्रियाजात । प्रारब्धीं रूढवी ॥ ५४ ॥ भक्ति विरक्ति दया शांती । अक्षोभ वृत्ति सहज स्थिती । सुखैक घन इंद्रियाप्रती । अवतरवी सत्व ॥ ५५ ॥ अखंड तुझिया नामाची माळा । कंठभूषण जिव्हाळा । अंतरीं स्वप्रकाशउजाळा । सदोदय करी ॥ ५६ ॥ सर्वावधानी अभ्यंतर । वसवी तव ध्यानी निरंतर । कां सर्वोत्तम रघुवीर । प्रत्यक्ष करी ॥ ५७ ॥ अखंड वागेश्वरी वदवी । कां श्रवणसुखातें बैसवी । ना तरि हरिकीर्तनीं लावी । स्वयंभ निजमुद्रा ॥ ५८ ॥ एवं श्रीअनंत प्रार्थना । ऐकोनि बोलला गुरुराणा । करुनि सर्वांग अवधाना । परिसा प्रत्योत्तर पुढें ॥ ५९ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरु कृपेचा जिव्हाळा । देशिकस्तवन सुमनमाळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ६० ॥ इतिचतुर्थे रुद्रे प्रथमोल्लास संपूर्ण ॥

---

श्रीराम समर्थ । श्रीराम समर्थ अनंत कृपाकर । बोलला निज करुणेनें अपार । श्रवणावधानीं निरंतर । बैसविलें सुखें ॥ १ ॥ ह्मणती अवधानमंडळेवरती । परमार्थी वाड तुझी मती । मननपुष्कर-निगुर्ती । वसवी निजहंसा ॥ २ ॥ स्वानंद सरोवरजीवना । मधुरामृत तुझी रसना । अक्षर ब्रह्मविवंचना । वसें निजध्यासीं ॥ ३ ॥ स्वरुपाचा साक्षात्कार । घेई क्षेत्रसंन्यास साचार । तुझें तुज अभ्यंतर । भिवळों सुखें ॥ ४ ॥ त्रिगुण प्रारब्धाची स्थिती । तुजमाजि असे प्रवृत्ती । तेथें ईश्वरस्वरूपी सद्वृती । प्रसन्नता तुज ॥ ५ ॥ अहंरावणनिवर्तविता । ईश्वराचा ईश्वर तत्वता । गुणत्रयीं त्याची सत्ता । वर्ततसे पूर्ण

---

१ धुळीचे कण. २ अवधान ( लक्ष ) रूप। मंडलावर रहाणारी ( वर्ति )
३ मोठी.

॥ ६ ॥ सर्व ही करूनि ब्रह्मार्पण । वाचेसहित अर्पिलें मन । तया मौन्यामाजि राहोन । बोलवी रघुवीर ॥ ७ ॥ सकळांतरीं द्रष्टा राम । त्यासीं सख्य करी परम । उपासना प्रत्यक्षें विश्राम । शुत्ध सात्विक होसी ॥ ८ ॥ विशुत्वसत्वें शांति प्रबळ । विशुद्धसत्वें ज्ञान प्रांजळ । विशुद्धसत्वें केवळ । समाधान पावसी ॥ ९ ॥ विशुद्धसत्वें सहजस्थिति । विशुत्धसत्वें अगाध कीर्ति । विशुद्धसत्वें रघुराजमूर्ति । धाउनि ये हृदयासी ॥ १० ॥ विशुद्धसत्वें प्रत्यक्ष राम । विशुत्धसत्वें चि परम धाम । विशुत्धसत्वें अंतर्याम । जाणोनि निजजिवीं ॥ ११ ॥ सर्वभूतिं आत्माराम[1] स्वयें । विश्वात्मा चि होउनि निश्चयें । स्वरूपप्रचीतिनें हृदय । दाशरथी करूनि भजिजे ॥ १२ ॥ राम सर्व साक्षी सनातन । राम सर्वातीत पुरातन । राम विद्यमानीं विद्यमान । प्रत्यक्ष पाहा ॥ १३ ॥ शरीररक्षणीं जेवि प्राण । तैसा भूतमानीं सुखैकघन । स्वरूपसाक्षात्कारनिर्वाण । निवळे अंतःकरणीं ॥ १४ ॥ हें विश्व चि जयाचें शरीर । किंबहुना विश्वरुप रघुवीर । निजप्रचितीनें अभ्यंतर । रामरूप करीं ॥ १५ ॥ या प्रत्ययाच्या निश्चयें । द्वेष मछर सहसा न ये । इच्छातिरस्कार भयाभय । राम होय संपूर्ण ॥ १६ ॥ पदार्थद्रष्टा अभिन्न । अतर्क्य हें चि समाधान । द्वैताद्वैत भेदमान । कांहीं च नुरेनों[2] ॥१७॥ या अनन्यभावें करूनि । विश्रांतिरूपश्रवणीं । स्वरूपसाक्षात्कार उन्मनी । सुखें अनुभवी ॥ १८ ॥ रामस्मरणें अखंडित । भावें देहपुलकांकित । लोचनानंद द्रवत । पूर्णाश्रुधारा ॥ १९॥ या प्रचितीनें वर्तमान । स्वरूपार्थे अवधान । प्रारब्ध अतिक्रांत उन्मन । आश्रय न सोडीं ॥ २० ॥ स्वरूपांबरनिवासी । सोहं स्वभावें मानसी । उन्मेष गिळुनी निरवकाशीं । राहें अप्रांत तूं ॥ २१ ॥ ज्ञानसंरक्षणीं साचार । उपासनेचा आश्रय थोर । रामभजन साक्षात्कार । ब्रह्मप्राप्तीचा ॥ २२ ॥ रामभजनें निरंतर । गुणाचा क्षोभ उपसंहार । भक्ति विरक्ति निर्धार । गुण उपेगासि

---

१ आत्माराम. २ उरेना.

येतील ॥ २३ ॥ अतिशयेंसीं लोभ रजोगुण । होईल सर्व रामार्पण । तमातिशयें [१]दारुण । बाणेल विरक्ती ॥ २४ ॥ दाशरथी भजनाचा महिमा । संसार आणील परंधामा । आता निःसंशय श्रीरामा । जवळि करीं ॥ २५ ॥ वोधीं प्रवोधविजे अंतर । ब्रह्म चि होउनि निरंतर । अध्यात्म ग्रंथविवर । दीक्षा चळों नेदिता ॥ २६ ॥ उपदेशाचें रहस्य पूर्ण । सत्स्वरूपविवरण । आपुल्या स्वरुपासि आपण । जवळि करावें ॥ २७ ॥ शीतबाधेस्तव स्वयें । अग्नीसि समीप करणे होय । तेवि भवनिवृत्तीसि होये । परमार्थचर्चा ॥२८॥ अखंड सज्जनसहवासीं । असता काय भय तयासी । जेवि दीपाच्या प्रकाशी । तमसंकट न पडे ॥ २९ ॥ रोगनिवृत्तीसि रसायन । अमर व्हावया अमृतपान । तैसा सत्समागम पूर्ण । विश्रातिकारि ॥ ३० ॥ आधी स्वये संत व्हावें । तेव्हां संतस्वरुप पडे ठावे । जन्हि [२]चित्त स्वस्थ स्वयें नव्हे । तन्ही सत्समागमें विश्राति ॥ ३१ ॥ निजजीवन संतसेवा । साधु विश्रातिचा विसावा । साधु स्वरुप चि जाणावा । आपुला प्रत्यय ॥ ३२ ॥ सर्वांगीं शांति वोसंडत । प्रातिचिन्हें प्रगटत । चमत्कारें चि बुझाविंत । सत्ता प्रबोधी ॥ ३३ ॥ अनावरासी आवरिती । अहंकृतीसि आटोपिती । अवचट ते नाहंकृती [३] । देती स्वयंभसुखें ॥३४॥ ऐसें हे संतमहिमान । मूर्तिमत अपरोक्ष ज्ञान । साधु सच्चिदानदघन । देवाधिदेव स्वयें ॥३५॥ साधुदर्शनीं चमत्कार । होय सगुणसाक्षात्कार । प्रगटे आनंद अगोचर । वोळे अभ्यंतर ज्ञानें ॥ ३६ ॥ चित्तचैतन्य [४] समसाटी । होता साधुची सुखें भेटी । ऐकतां तयाच्या गुजगोष्टी । समाधिसुख प्रगटे ॥ ३७ ॥ नित्यमुक्तीचे सुखसोहळे । भोगावया भाव

---

१ भरून जाई. २ मनाला. 'चचलं हि मन कृष्ण प्रमाथि बलवद्दृढं । तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ।' मन व त्याचीं उपकरणें याचें निवारण करणें कठीण परतु सत्समागमानें विरक्ति बाणून त्याचा निग्रह होतो.' ३ अहंकारापासून मुक्तता. ४ बरोबरी. साधूची भेट झाली ह्मणजे चित्त हें चैतन्य च होतें. चिद्रूपात आणि चित्तात भेद रहात नाहीं

प्रबळे । कां ते उन्मनी च अवलिळे । भाळ घाली स्वभावें ॥ ३८ ॥ अवचट सुखें विरक्ती वरी । भक्ति अखंड अंगिकारी । दया शांती शरीरीं । निवास करिती ॥ ३९ ॥ या कारणें निरंतर । सत्संगतीनें संसार । निवर्तवी निजसंस्कार । रहस्य हें चि जाणा ॥ ४० ॥ अरे प्रबोधासि कारण । जाण येक अंतःकरण । स्वरूप साक्षात्कारज्ञान । तें चि तें होये ॥ ४१ ॥ स्वरूपाचें दृढ अभ्यंतर । स्वरूपवस्ती निरंतर । निर्गुण स्वयें निर्विकार । प्रतिष्ठा अंतःकरणी ॥ ४२ ॥ निर्मळ निश्चळ निराकार । येक-जिनसी अपरंपार । नाहीं जयासि पारावर । आधि ते चि पाहावें ॥ ४३ ॥ अंतरात्मा ज्ञानघन । तयाचें रहिवासस्थान । दशदिशा संपूर्ण । व्यापक-पणें ॥ ४४ ॥ हे स्वरूपधारणा जीवीं । ज्ञानखेचेरी प्रतिष्ठावी । ब्रह्मारण्यीं वसवावी । अनुभव गुंफा ॥ ४५ ॥ चिद्गगन सरोवरजीवन । निजदृष्टी वदनें किजे पान । अभिनव सञ्जीवीचें दोहन । घोटिजेत सुखें ॥ ४६ ॥ स्वरूपार्णवीं मनैमीन । स्वानंदाचा तळ घेऊन । राहावें स्वसुखीं निमग्न । सर्वदा ऐसें ॥ ४७ ॥ हे चि स्वानुभवाची निज खुण । माझा अंतर्भाव चि जाण । तुज प्रबोधासी कारण । येणे चि जाहलें ॥ ४८ ॥ अमळ तुझें हृदय । जाणोनि द्रवला बोध स्वयें । मज नाटोपतां माझें प्रमेय । तुज आधीन जालें ॥ ४९ ॥ निजाचें आक्षयी धन । त्यासी अधिकारी जालासी पूर्ण । वसवीं चिदाकाश संपूर्ण । अनुग्रहें माझिया ॥ ५० ॥ तें चि पुढें निरूपण । प्रबोधशक्तिसंबोधन । चित्तासी प्रसन्न करून । अवधारिजे श्रोतीं ॥ ५१ ॥ इति श्रीराम-सोहळा । सद्गुरुकृपेचा जिन्हाळा । प्रारब्धीं गुरु कृपा कवळला । ह्मणे मेरुअनंत ॥ ५२ ॥ इति चतुर्थरुद्रे । द्वितीय उल्लास समाप्तः ॥

---

श्रीराम समर्थ धन्वंतरी । स्मरण मात्रें भवरोग हरी । अपमृत्युतें निवारी । नामामृतकटाक्षें ॥ १ ॥ यथार्थ मृत्यूसी स्वभावें । अमर

---

१ विश्वव्यापी दृष्टि, अन्तर्दृष्टि. २ जीवनकलेचें. ३ मनरूपी मासा.

करी स्वानुभवें । प्रसादरसायनविभवें । निजपुष्टीतें पाववी ॥ २ ॥ कटाक्ष जयाचा चिरंजीव । बोधपद्महस्त यशस्वी । आदि वैद्यराज पदवी । अजरामरकर्ता ॥ ३ ॥ जयाच्या औषधें पूर्ण । ब्रह्मादिक जाले पावन । जरामरणविहीन । धाले कृपामृतें ॥ ४ ॥ कृपाकरें धरूनी स्वयें । गुणत्रयधातुहृदय । भक्तिविरक्तिज्ञानप्रत्यय । प्रयोगें करूं जाणें ॥ ५ ॥ बोधप्रतापमार्तंडमात्रा । विरोचनें झाडूनि क्षेत्रा । कल्मशपरिहारें परत्रा । ज्ञानासि पात्र करी ॥ ६ ॥ अनादिसिद्ध गुरुआर्जित । एकैक मात्रा अपरमित । जे सेवितां चि रोगरहित । तात्काळ करी ॥ ७ ॥ मात्रा अनुपानें सुखकर । देत सर्वांगीं चमत्कार । स्वानंदउन्मनीचे जिव्हार । द्रववित सुखें ॥ ८ ॥ काम मदमस्तीचा कुंजर । नांवरे विरहविषयज्वर । बोधज्वरांकुशें परिहार । तयाचा केला ॥ ९ ॥ उपशांतीसी सुखोद्भव । निजपुष्टीसी स्वानुभव । देउनियां आनंदभैरव । ठेवि स्वानंदघन ॥ १० ॥ स्वभावस्थिति निरामय । स्वानंदवृद्धि निजविस्मय । देत अमृतपूर्णचंद्रोदयें । माहामात्रा कृपेची ॥ ११ ॥ कृपा वसंत कुसुमाकर । परम सुवर्णभस्मसार । त्रैलोक्यचिंतामणी साचार । देत भवरोगहर्ता ॥ १२ ॥ निजसुवर्ण भूपती सिद्ध चमत्कारसूर्य ज्योती । सौभाग्यसुधा स्वस्थिती । आत्म सौभाग्य कारण ॥ १३ ॥ कृपामृतरसायन । देउनी करवी स्वरूपवर्धन । नामसंजीवनी पाजून । अखंड आरोग्य करी ॥ १४ ॥ ऐसा सद्गुरु वैद्यराणा । आरोग्य करीतसे जाणा । तयावीण उपाय नाना । निरर्थक होती ॥ १५ ॥

---

१ प्रसन्नतारूप दिव्य औषधाच्या जोरावर. २ उपदेशरूप हस्त. ३ तृप्ति पावले. ४ धातु, प्रत्यय, प्रयोग हे व्याकरणांतील शब्द रूपकासाठीं योजिले आहेत. सत्व, रजस्, तमस् हे गुण मूळधातु, त्यांना भक्ति विरक्ति ज्ञान हे प्रत्यय लाविले ह्मणजे आत्मनिष्ठत्व हा प्रयोग सिद्ध होतो. ५ हें वैद्यकांतील शब्दांवरून रूपक केलें आहे. उपदेशरूपी प्रतापमार्तंडाची मात्रा शरीराला पापरूप मलापासून मुक्त करिते व खऱ्या ज्ञानाची क्षुधा प्रदीप्त करिते. ६ तापावरचें औषध. ७ एक पुष्टिकारक औषध. ८ रोगरहित. ९ एक पुष्टिवर्धक मात्रा. १० सुवर्ण मालिनीवसत ११ एक मात्रा.

नेणोनि रोगांचें अभ्यंतर । धातुपोषणें वाटे उपचार । ते वैद्य मोंदू अपस्मार । घातकी होती ॥ १६ ॥ भव रोग क्षयादिकारी । जिते चि मरण संस्कारी । त्यातें सद्गुरु धन्वंतरी । वाचूनि कोण्हीं असेना ॥ १७ ॥ पोटीं दुश्चर्या कुटिळ । मुखीं अरुचि मळमळ । उद्बोध अमृत केवळ । सदन्नें विष होति त्या ॥ १८ ॥ भगवद्भजन क्षीर गोड । तें विषतुल्य वाटे निर्वाड । ब्रह्माहमस्मी अभ्यंतर सुरवाड । प्रातिबोध रुचेना ॥ १९ ॥ भक्तिविरक्तिक्षुधा नसे । बोध सदन्नावरी वासना नसे । सेवितां विपरीत तैसें । अमृतपान राहुसी ॥ २० ॥ ऐसिया अनाधिकारी अपात्रीं । बोध करणें जो पवित्री । तो होय जैसा मद्यपानीं । गोरससंग्रह ॥ २१ ॥ जे आत्मघातकी अधःपाती । स्वयें नष्ट परांतें नासिती । जेवी मक्षिका अपघाती । इतरांसी विकृती दे ॥२२॥ ना ते लवण क्षिरीं मिळतां । नासोनि टाकी मधुरता । तेवी बोधासि होय तत्वता । पात्रशुद्धी वाचुनी ॥ २३ ॥ ब्रह्मउपदेश योग्यतेवीण । होय पर्वतारोहणपतन । परस्परें दुःखकारण । सुख न होय अनुग्रहें ॥ २४ ॥ मुळ मोक्षासि कारण । तें चि होय निष्कारण । मग तयासी तारिल कवण । सद्भावें वीण वेर्थ चि ॥ २५ ॥ अभाव उपजोनि अज्ञान । होय गुरुदीक्षेसि हेळेण । मति पालटे तो पाषाण । तरेल सागरीं कैसा ॥ २६ ॥ अभाविकांप्रति आत्मउपदेश । करणें चि हा बुद्धिभ्रंश । तारकदीक्षेसी विशेष । मारक दीक्षा रुढे ॥२७॥ ईभसैरभसे दुर्मत । तयां नीति सांगणें सभ्रांत । मूर्खत्वें पढत मूर्ख होत । दीक्षा परस्परें ॥ २८ ॥ पिशाच्यासि हित सांगणें जैसें । मतिमंदासि ज्ञान तैसें । होय घृतक्षीरपायसें । भस्मकूप भरिला ॥२९॥ मार्वलेणें मोळामगिरी । पयोमुख विष अभ्यंतरी । तयाचा सहवासंचि करी । अंप्राप्ति सर्वस्वें ॥ ३० ॥ दृष्टीसि न पडावे ते खळ ।

---

१ खचित. २ मासी. ३ ज्याला बोध करावयाचा त्या शिष्याची चित्तशुद्धि नसेल तर. ४ भक्तिशून्यता. ५ अवहेलना. ६ दीक्षेहून. ७ हत्ती; प्रमाणें उन्मत्त. ८ मुलाम्याचा दागिना. ९ आत्मप्राप्तीचा अभाव.

कुटिल अंतःकरणी पापशील। अविश्वासी ते अमंगळ। निरक्षय सुतकी ॥३१॥ अचुक त्यां अधःपतन। येक विरक्ती वाचून। पावन व्हावया-सि साधन। दुसरें न दिसे ॥३२॥ अक्षोभनिर्यी पचंती। अग्निस्तंभे अहेळति। दारुण होये यातायाती। यमहस्तें तयांसी ॥३३॥

श्लोकः—गुरुत्यागी भवेद्रोगी मंत्रत्यागी दरिद्रितः।
गुरुमंत्रोभयत्यागी रौरवं नरकं व्रजेत् ॥

ऐसी हे उपदेशचर्या। पतनासि कारण होय तया। ज्ञान प्रभातसूर्या। गर्भांधें दूषिजे ॥३४॥ कां प्रसन्नरूप प्रभाकरें। अंधासि दृष्टी देऊनि त्वरें। स्वतेज न पाहवि करे। ते प्रसन्नता कैची ॥३५॥ ऐसिया भवयुक्तीपुढें। दैविक बोध तो चि रुढे। जो अज्ञाननिवृत्ति निवाडे। गुरु सत्तारूप होय ॥३६॥ निजसामर्थ्यावीण हें न घडे। एणें परोपकार ही न जोडे। विशेष परपीडा आतुडे। अनार्जित कल्मष ॥३७॥ सकळधर्माचें तात्पर्य। बोलती श्रुतिशास्त्रवेत्ते वैर्य। परोपकार पुण्याय। पापाय परपीडनम् ॥३८॥ हितोपकरणीं उचित। अयोग्यतेनें अनहित। होय तो बोध विपरित। पापसंग्रह पूर्ण ॥३९॥ वैद्यें रोगचिन्ह[1] जाणावें। मग दिव्य रसायन द्यावें। लक्षण न जाणतां स्वभावें। औषध मृत्युसि कारण ॥४०॥ ज्यासि न टैंके हे उठाठेवी। तेणें वैदिकी न करावी। त्रैलोक्यपावन पदवी। पाविजे केवि आत्मा तो ॥४१॥ आतां भवासक्ति टाकी। ऐसा सद्गुरुबोध विलोकीं। अनुताप ये येकाकीं। कळवळोनि हृदया ॥४२॥ जेवि परमान्नपरवडी। म-क्षिकायुक्त क्रिया रोकडी। विकृतेसि आणि ते चि गोडी। पूर्व आठवे ॥४३॥ विटोन संसारसुखासी। अनुताप ये निश्चयेंसी। भवांतक कृपा ऐसी। करी गुरु ईश्वर ॥४४॥ प्रपंच दुःखातिशयें पूर्ण। रिघे सद्गुरुशी शरण। तेणे सत्शास्त्रश्रवण। करूं आवडे ॥४५॥ तपाचरण अनुष्ठानें। ध्यान धारणा नाना साधनें। देहात्मबुधि त्यागूनि तेणें। दृढाविली निजात्मधी ॥४६॥ साधावया गुप्त निधान। ज्ञिसि यावा

१ दुःख पावतात. २ होरपळतात. ३ श्रेष्ठ. ४ खपत नाही.

लागतो प्राण । आंतुडे तेणें अक्षयीं धन । हे अपरोक्ष स्थिती ॥ ४७ ॥ मुमुक्षु तपार्ढ्य पापक्षीण । परम शांत उदासीन । तयासि गुरुदीक्षा निर्वाण । फळे साक्षात्कारें ॥ ४८ ॥ परम शांत गुरुभक्त । भाविक चित्तशुद्ध विरक्त । बोधासि आर्ह नित्य मुक्त । तन्निष्ठ वचनीं ॥४९॥ येकनिष्ट येकवचनीं । आवडी जयाची गुरुभजनीं । सर्व संकल्पूनि अंतःकरणी । शुद्ध बुद्ध जाहला ॥ ५० ॥ योगभ्रष्ट तो केवळ । जालीं पूर्व सुकृतें सफळ । विश्रांतीचें निजमूळ । पाहत चालिला ॥ ५१ ॥ बोध प्रस्तावीक वचनें । अर्थांतर वेत मनें । श्रोता होउनि तेणें श्रवणें । मोक्षाधिकारी होय ॥ ५२ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । बोध अनुताप अवलिळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ५३ ॥ इति चतुर्थ रुद्रे । तृतीयोल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामसमर्थ तपोरासी । स्मरणें चि वैराग्य ये आंगासी । अखंड विरक्त वनवासी । पावन चर्या ॥ १ ॥ दढावे सद्गुरुभक्ति जया । निष्ठा चळेना कल्प जालिया । हे अकल्पित दया । सद्गुरुरायाची ॥ २ ॥ सत्व शांती विशुत्धचित्त । मुमुक्ष आत्मबोध अपेक्षीत । अखंड चिंती भगवंत । राहिला निजनिष्ठेनें ॥ ३ ॥ अपरोक्षतत्ववेत्ते सज्जन । भेटतां संतोष होय पूर्ण । तयाची आवडीसी प्रमाण । कांहीं च असेना ॥ ४ ॥ ऐसे महानुभाव साधुसंत । नित्यानुक्रमें आर्जवीत । चुकों नेदितां सायंप्रात । नमस्कारीत भावें ॥ ५ ॥ धिक्कारितां देहबुद्धी । तेणें नचले धी त्रिशुद्धी । अधिक भाव उदधी । उचंबळे सप्रेम ॥ ६ ॥ जाणें प्रबोधअभ्यंतर । पाहला ज्ञानप्रभाकर । मुमुक्षाचे हृदयांबर । उजळले प्रभेनें ॥ ७ ॥ ग्रंथानुक्रम निजप्रमेये । जाणें विवेकसंपत्तीनें स्वयें । परत्वें त्याचें हृदय । होउनि तत्व विवरे ॥ ८ ॥ नेशी पाहले सनातन । त्या निजदृष्टी बैसोन । सर्वदा विश्रांति अनु-

१ तपानें पूर्ण. २ परतत्वें ( ? )

संधान । जागऊ जाणें ॥ ९ ॥ तो प्रबोधशिखरीं बैसला । का अद्वैतदरकुटींत रिघाला । निजउमर्जे उमजला । सर्वांग सुलोचन ॥ १० ॥ अद्भुतवेधें वेधला । अप्रातबोधें बोधला । ठाईंचाठाईं, अवरोधला । तटस्थ सुखें ॥ ११ ॥ हृदयाकाशीं अगोचर । रहिवासला परात्पर । सकल्पशून्य निरतर । जाला आत्मक्षेत्रवासी ॥ १२ ॥ निजप्रज्ञेच्या मुळें । मुळासी च आला तात्काळें । अतरीं आनदघन सगळें । स्वरूपसुख लाधला ॥ १३ ॥ निजवृत्तीची, व्यापकता ।, सरली महावाक्य तत्वता । परब्रह्म वस्तुता । आगे चि जाहला ॥ १४ ॥ निरजनाचें निजाजन ।, लेउनि जाला, निर्विकार गगन । स्वरूपवस्तीनें सज्जन । महास्थितिसी आला ॥ १५ ॥, अपरोक्षतत्व निज हृदय । अगोचरज्ञानें निरामय । असग अनुभवें अद्वय ।, होय तत्ववेत्ता ॥ १६ ॥ सुलीनवसुमतीचा नृपती । सर्व शास्त्राचा वाचस्पति । निजऐक्य बोध सुमति । प्रकाशक, होय ॥ १७ ॥ कैवल्यक्षेत्रींचा मिरासी । स्वानद सपदा जयासी । गुरुकृपेनें निश्चयेसी । वसवी स्वरूपपट्टण ॥ १७ ॥ मिजऐक्याचा अधिष्ठित । निलउन्मनीचा होय एकात । निजएकांताचा एकात । स्वयें चि जाला ॥ १९ ॥ सद्गुरुकृपा बोधघन । सेवी भावचातक होउन । कीं गुरुबोध चद्र पूर्ण । अनुभवी चकोर भुवनी ॥ २० ॥ गुरुबोध परमामृत । सुरेंद्र, होउनि प्राशित । गुरुवाक्य रस अद्भुत । सेवी श्रवणमुखें ॥ २१ ॥ परत्रासी पावन गती । लाधला सद्गुरुची भक्ति । तेणें विश्रातीसि विश्राति । होतसे अभिनव ॥ २२ ॥ जे निजद्रष्टेपण अखिळ । शातिसुधारसमडळ । निखिल सुखें चि प्राजळ । निजगोडी घेतसे, ॥ २३ ॥ अमृत सरोवरीचा मीन । तैसा स्वरूपार्णवीं सुलीन ।, सत्‌चित्‌सुखानुभवज्ञान । विचरतसे सुखें ॥ २४ ॥ तन्मयतेच्या कळसावरी । राहिला ध्रुव तेवि चिंदबरी । समाधिसुख अभ्यतरीं । दाटलें उत्कट ॥ २५ ॥ नाहकृतीचा माजिघरीं । बोधें प्रवर्तविली वैखरी । परात्पर सुख बोवरी । निजसेजें चि पहुडला ॥ २६ ॥ तत्वमाळा साक्षात्र सूत्र । विसरला सर्वस्व तो परत्र । समाधिनिद्रिस्थेसि स्वतत्र । अनुभविता होय ॥ २७ ॥ आणीं निद्रा ना जागर । निरा-

श्रय अगोचर । उन्मेष हारपला निर्धार । अवचट ब्रह्माहमस्मिचा ॥२८॥ हृदयसरोजीं साचार । प्रवर्तला जीवभ्रमर । स्वानंद आमोदें तदाकार । निर्विकार ठेला ॥ २९ ॥ स्वसुखमानससरोवरीं । हंस होउनि विहार करी । नित्यमुक्ते सेवि परी । मुक्तता कांहीं नसे ॥ ३० ॥ एवं अद्वैतवेत्ता सात्विक । सायोज्यमुक्तीचा नायक । जयाचे घरींचा पायीक[1] । बोध जाला सर्वत्वें ॥३१॥ स्वरूपसाक्षत्वें अतीत । वस्तू चि वस्तु न संभावीत । स्वसुखसंभावना चित्त । संस्थापित केलें ॥३२॥ चित्कळा चैतन्याची । शोभा प्रबोधशक्तिची । परि त्या बोध कर्तव्याची । अहंकृती न धरी ॥ ३३ ॥ ऐसे हीनदीनापरी । स्वरूप बोधाचें राज्य करी । अंतर्सुख अभ्यंतरीं । सांठविलें गहन ॥ ३४ ॥ समाधिसुख अंतर्लेणें । लेईला सद्गुरुकृपनें । ज्ञानप्रकाश सूर्यमानें । धवळलें हृदय ॥ ३५ ॥ विसंवेना सत्राविंयेसी । गिळुनि चिदमृत[2] विशेषीं । होये चित्प्रकाशाची राशी । निजानंदें घनवटं ॥ ३६ ॥ दृश्य त्रिपुटीरहित । सारुनि अदृश्य उर्वरित । निर्विकारी निज अखंडीत । बैसका धरुनि बैसे ॥ ३७ ॥ हालेना डोलेना कांहीं । उठणें बैसणें तयासि नाहीं । हिंडणें वागणें अणुही । मुळींहुनी असे चि ना ॥ ३८ ॥ आकाशाचा अवकाश होउनि । गगनसुखें घनावोनी । घनवरला सघनी । सघन स्वरूप ॥ ३९ ॥ नसे चि कांहीं ज्ञानत्रिपुटीं । उन्मेश विराला जया पोटीं । साळमाळ विशाळ दृष्टी । हा ही उमस न दिसे ॥ ४० ॥ एकजिनसी निराभास । प्रतिसाम्यता नसे जयास । निःप्रपंच निरावकाश । निगुर्ण चि स्वयें ॥ ४१ ॥ गगन नापेक्षी कांहीं एक । तैसा हा स्वरूपज्ञानार्क । सत्शिष्याचा नायक । उद्बोध स्वयें ॥ ४२ ॥ गगने आळंगिलें गगन । कीं जीवनें अपंगिलें जीवन । निरंजनें निरंजन । आकळिलें जैसें ॥ ४३ ॥ भेदबुद्धी बोधा न येतां । मुळिचे मुळीं च आस्तिक्यता । तैसा हा स्वरूपतत्ववेत्ता । सत्शिष्यशिरोमणी ॥ ४४ ॥

---

१ चाकर. २ ज्ञानामृत.

हृदयींचें गुज निजचोज । पाहलें स्वयंभ ज्ञान सहज । तयापोटीं रिघो-
निया उमज । विराला सुखें ॥ ४५ ॥ जाणतयांचे चि परी । मननें
अर्थांतर विवरी । स्वरुपदशा अभ्यंतरीं । पाहे बुरी परतोनी ॥ ४६ ॥
ऐसा अनुग्रह अनादिसिद्ध । करीत आले गुरु प्रबुद्ध । सत्शिष्यबोधें
निर्वेध । पावले स्वरुपासी ॥ ४७ ॥ अखंड समाधि या चि ज्ञानें ।
शिवसनकादिसन्मान । स्वरुपप्रतिष्ठा जेणें । ते चि संवित् अवधारी
॥ ४८ ॥ श्रवणीं वसोन विवरीं । श्रवणासी न येता अभ्यंतरी । अर्थ-
रुप मनन करी । अर्थावबोधें ॥ ४९ ॥ श्रवणाचें सार मनन । मन-
नाचे गाप्य निजध्यासन । निजध्यासें हृदय गहन । स्वयें चि साक्षात्कार
॥ ५० ॥ आता तुझें तुज प्रसन्न चित्त । होय तरी हेतु कृतार्थ । उप-
रमला भावरूप अर्थ । त्यातें परमार्थ बोलिजे ॥ ५१ ॥ गुरुकृपा पर-
मार्थ स्थिती । धरूनिया सत्संगती । अवधारीं ग्रंथोपग्रंथीं । सत्शिष्य
वरिष्ठा ॥ ५२ ॥ अन्योपदेश हितोपवचनें । प्रबोधिला सत्शिष्य
कृपेनें । हे सद्गुरुकृपेचें देणें । प्रत्यक्षता पाहा ॥ ५३ ॥ प्रत्यक्षतेसि
काय प्रमाण । जैसें तव्हातिंचे दिसे रत्न । तैसें प्रांजळ निरूपण ।
अवधारिजे श्रोतीं ॥ ५४ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा ।
उपसाक्षीप्रबोध अवलीळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ५५ ॥ चतुर्थ रुद्रे चतुर्थ
उल्लास संपूर्ण ॥

---

श्रीराम समर्थ गुरुवरा । निगमवनकुसुमाकरा । सुमनकळी सा-
क्षात्कारा । रूढविसी सुखें ॥ १ ॥ शांतिवनसुमन धृती । तेणें
अळंकृत अमूर्तमूर्ति । स्वरूपदशा तुजप्रति । अपरोक्ष तैसी ॥ २ ॥
ज्ञानसमुद्र तुझिये हृदयीं । कृपापवमानें लवलाही । अक्षरब्रह्म उरवीं
पाही । कल्लोळाकृतीसि ये ॥ ३ ॥ बोधकल्लोळकल्हारें । मुकुळितवि-
कास अमोद सारे । निरानंद या चि प्रकारें । रुढविसी आनंद ॥ ४ ॥

---

१ ज्ञानी पुरुषाप्रमाणें २ ज्ञान त ( पा ) ३ कृपारूप वायूच्या योगानें ४ (?)

जलकमळें सुवासिकें । साक्षीसी न ठाके तें चि निकें । अभिनव वसतां कौतुकें । तीं चि म्यां आघ्राणिलीं ॥ ५ ॥ गगनसरोवरींचें जीवन । वदनेंवीण केलें पान । निखवस्ती अवलंबेविण । सुखें चि वर्तविलें ॥६॥ दृष्टीवीण अरूप ठेवी । दाखविली तुवा बरवी । स्वबोधकर ज्ञानरवी । हातीं दिधला माझिया ॥ ७ ॥ निजनयनासि नयन दिधलें । निराकृतीनें वागविलें । चरणेंवीण चालविलें । चळों न दिता ढाईं ॥ ८ ॥ ऐसी तुझी अतर्क्य स्थिती । ब्रह्मादिकांसी न कळे मती । अभ्यंतरीं च बोधप्रचीति । देसी अपरोक्षसुखें ॥ ९ ॥ स्वप्रकाशबिंब पाहलें । अमृतांबिर सुखें दोहिलें । उपशांतीसि जाहलें । पारणें अनायासें ॥ १० ॥ गगनें गगन परिधान । सुखें सुख आलिंगन । सन्मई चिदानंदघन । येद तन्मय जाला ॥ ११ ॥ दृष्टीवीण डोळा भरीव । नित्य प्रभात अभिनव । प्रभाबिंबेवीण घटाव । जाला हृदयाकाशीं ॥ १२ ॥ पक्षेंवीण स्वपक्ष लाहिलों । गतीवीण विश्रांतिसी आलों । पदार्थेंवीण सुखी जालों । काय बोलों मी आतां ॥ १३ ॥ माझें च मला वाटतें चोज । मी निजानंदघन निज । हा ही उमस कांहीं मज । असे चि ना आतां ॥ १४ ॥ अघटित सद्गुरुदया । अघटित निरसली माझी माया । अघटित बोलिलें सखया । गुज तुझिये हृदयींचें ॥ १५ ॥ माझें मी च लाधलों स्वयें । चुकलों होतों मायाविस्मयें । तें तुझिया दयार्कउदयें । आतुडलें माझें मज ॥ १६ ॥ अगाध गुरुदीक्षेची चर्या । अगाध उन्मनी वरि वर्ते तूर्या । अगाध चित्सूर्याच्या सूर्या । उदेलासि हृदयांबरीं ॥१७॥ अनादिसिद्ध तुझें स्वरूप । त्या चि बोधें मज केलें तद्रूप । किंबहुना ते चि मी संकल्प । हा हि नसे चि मज ॥१८॥ घटाकाशाचें अभ्यंतर । काय आकाश नव्हे साचार । तैसें तुझें मी निर्विकार । रूप न होतां चि मीं असें ॥१९॥ ज्ञानसाक्षत्वविहीन । तुझा अनुग्रह सनातन । उत्पत्तिस्थितिनि-

---

१ आत्मज्ञान हें च ज्याचें किरण असा. २ अमृतरूप आकाशाचें दोहन झालें म्हणजे अमृताचा मेघ वर्षला. ३ सन्+मयी, अस्तित्व रूपांत. ४ सांपडलें,

दान। नेलें वर्तमानेसी ॥२०॥ नाहीं प्राकृतपूर्वकथा। आश्चर्य बोधविलें परमार्था। मी मज तुमजे चि समर्था। सद्गुरुस्वामी ॥२१॥ मी उभा न ठाकोनि चिंती। तुझे उपकार आठविती। देहेंवीण पुढत पुढती। येत लोटांगणीं तुतें॥२२॥ अवेवेविण सर्वदा। अभिवंदीत तव पदा। साक्षत्वेंवीण संपदा। अनुभवीं तुझिये कृपे॥२३॥ कृपापियूषेंकर देवा। माझ्या जिवींचा तूं निसावा। बोळलासि जिवीच्या जीवा। बोधामृतसारें ॥२४॥ दिलें समाधान अक्षय। सर्वस्वें निवळलें हृदय। ज्ञानसारस्वत स्वयें। वैखरीसि आणिसी॥२५॥ चहुं वाचेचें अभ्यंतर। माझें चि स्वरुप निरंतर। मर्म स्तवन अगोचर। कर्तेनवीण जालें॥२६॥ मुळींहूनि संस्कार नसता। अभिनव अनुग्रहिलें अनंता। मी ध्येय ध्यान ना ध्याता। ऐसा चि ध्यानासि येसी ॥ २७ ॥ मी स्मृतीसी न येतां अनंत। स्मरण करितसे अखंडित। जीवित्वासि न देखता समर्पीत। सर्वस्व तुतें ॥२८॥ मी मनेंवीण मानसपूजा। कारितों तुझी सद्गुरुराजा। हृदयेंवीण पदांबुजा। हृदयीं च ठेवितसें ॥ २९ ॥ तुझ्या अचरण चरणीं। ज्ञानविज्ञानपादुका दोन्ही। निजनयनाची वैसणी। करुनि अर्चित असें ॥ ३० ॥ माझा अनुभवस्वानंदघन। तुझे पदीं सर्वस्वें ठेउन। सर्वस्व आवडी करून। उपचारीन तुतें ॥ ३१ ॥ ज्ञानत्रिपुटीसि न येता। दीप होईन मी तत्वता। निजसमाधी आसनी स्वस्थता। चिदंबर होईन ॥ ३२ ॥ तुझें स्वरूप सनातन। तें मी माझें हृदय चि करीन। तुझ्या लोचनीं रिघोन। अवलोकीन मी मातें ॥ ३३ ॥ तुझें हृदय चि होउन। मी मज वरि दया करीन। होईन अपरोक्ष सिंहासन। वैसवीन तुज येथे ॥ ३४ ॥ होईन मी सुमनाची शेज। स्वानंदमंदिरीं सतेज। चरणसेवेनें तुज। मी सेवीन तेथें ॥ ३५ ॥ संकल्पासि न येतां संपूर्ण। होईन उपकर्णें प्रकाशघन। उपचारासि सनातन। ते ते समयसूचना ॥ ३६ ॥ तुझे अतरींची स्वसुखनिद्रा। ते मी च होईन सुखसमुद्रा। तुझें आगीची सुभद्रा। जागृति होईन

---

१ अमृत.

स्वयें ॥ ३७ ॥ निजउन्मेषें सनातन । तव नयनांबुज पाहवीन । मग मी चि सर्वस्वें होईन । अपेक्षीत तुझें ॥ ३८ ॥ जें जें ज्या अवसरें । पाहिजे तें तें निजनिर्धारें । होईन सर्वस्वें चमत्कारें । लागेन तव कारणी ॥ ३९ ॥ अमळजळकल्लोळीं । मज्जनासि सुखसमेळीं । पवित्रजीवनें आंघोळि । करवीन तुज वल्लभा ॥ ४० ॥ अपेक्षित ज्ञानाचें मन । वाहेन सन्मुख जीवनें पूर्ण । सुरेखटिळक विराजमान । होईन दीक्षासर्वस्वें ॥ ४१ ॥ होउनि भावकर्नकांबर । कटी वेष्टण निरंतर । कासेसि लागोनि साचार । कृतार्थ होईन स्वामी ॥ ४२ ॥ ज्ञानचंद्रा ऐसें सोज्वळ । क्षीराब्धी सिंधुवट निर्मळ । तो क्षीरोदक सोज्वळ । परिधान होईन ॥ ४३ ॥ होईन दिव्य पटीर । समर्पेन हृदयीं साचार । सुवासिक सुमनहार । होउन रुळेन कंठीं ॥ ४४ ॥ अनेक कंठाभरणें मुक्तमाळा । सच्चिदानंद पदकें उजाळा । प्रकाशमंत तुझ्या गळां । होईन कौस्तुभ उज्वळ ॥ ४५ ॥ तुझे श्रवणींचीं मनोहरें । अर्चित ज्ञानप्रभाकरें । कुंडलें होउनि साचारें । मिरवेन भूषणरूप ॥ ४६ ॥ तुझे मस्तकींचा मुकुट । मी च होईन लखलखाट । नाना अळंकार उत्कट । करभूषणें होइन ॥ ४७ ॥ नित्य तव विहारासी । समसमान चित्रप्रकाशी । भूमिका होईन असोपासी । अनंत धवळावे ॥ ४८ ॥ विलास रहिवासासि । दिव्यसौधें तेजोराशी । मि चि होइन सर्वस्वेसी । पदार्थ तेथिचे ॥ ४९ ॥ सुवर्णताट सदन्नपरवडी । होउनि वाढीन मी चि प्रौढी । विविधप्रकारें गोडी । मुंजवीन तूंतें ॥ ५० ॥ परिशुद्ध व्हावया पात्र । मी च होइन गा स्वतंत्र । सुवास शीतळ पवित्र । जळ होईन प्राशना ॥ ५१ ॥ नाना दिव्यांबरें भूषणें । पुढती अर्चीन प्रीतिनें । उजळीन माहा आरत गजरानें । भक्तसमुदायेंनसीं ॥ ५२ ॥ नित्य वोळगे चि पायकी । मी चि करीन सकौतुकीं । सेवक होउनि अनेकी । परिवेष्टीन तुज ॥ ५३ ॥ होइन गज वाजी वाहनें । सिबिका छत्र्या सुकासनें । त्या त्या

१ भक्तिरूप सुवर्णाचें किंवा जरीचें वस्त्र. २ चंदन. ३ कानांतील. ४ वाडा. ५ भोगवीन, भरवीन.

प्रसंगीं तुज कारणें । मिरवीन गजरें ॥५४॥ नाना देश देशाधिपति। होऊनि समर्पेन तुजप्रति । आज्ञे वाचुनि पाउल क्षिति । घालूं नेंदी सर्वथा ॥५५॥ द्वैतदृष्टीचा वारा । लागों नेदी स्वसुख माहेरा । तुजपासीच मी दयाकरा । उभा ठाकेन सर्वस्वें ॥ ५६ ॥ ऐसें माझें मनोगत । जे जें आठवेल अकल्पित । तें तें मी चं होउनि अखंडित । समर्पेन ऐसें करीं ॥ ५७ ॥ ऐसें प्रार्थितां सुखाचलें । गुरु प्रसन्न झाला तात्काळें । मस्तकीं कर ठेउनि दयाळें । पुरविलें अभिष्ट माझें ॥ ५८ ॥ वाचासिध्दी मनोसिध्दी । लाधलों गुरुपूजाभावसिध्दी । विज्ञानामृत निरवधि । मनोरथ सिध्द जाहले ॥ ५९ ॥ कैवल्यसद्गुरुपदाची जोडी । जीव गेलिया ही न सोडी । अभिनव सुखें आवडी । समर्पेन सद्गुरुपदीं ॥ ६० ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । देशिकमानसपूजाचिरंकळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ६१ ॥ इति श्रीचतुर्थरुद्रे । पंचमोल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामसमर्थ वेदमूर्ति । शिष्ये वेदार्थवेदांती । स्वानुभव वैदिकस्थिति । विज्ञानसंपन्न ॥ १ ॥ अखंड स्वरित वेदाध्ययन । प्रणव अनुस्वरित पूर्ण । चहुवाचेसि उद्घाटण । वेदव्याख्यानक्रमें ॥ २ ॥ अखंड दंडायमान स्वरें । स्वरुपान्वयें वेदाक्षरें । पदपदार्थ विवरे । अपरोक्ष ज्ञान ॥ ३ ॥ खड रहित संतेने पाठगती । अखंड पाठक साधकस्थिती । वेदात्माऐक्य आत्मप्रचीती । ब्रह्मप्राप्ति प्रसिद्ध ॥ ४ ॥ हा आत्मा साधुनि संगमीं । अपरोक्ष संहिताउगमीं । स्वरुपार्थ निजसंगमीं । उपनिषदार्थ मिळाले ॥ ५ ॥ अंतर्यामी वेदशीक्षा । ज्ञान वैदिकी हे दीक्षा । वेद अंतर्भावपरीक्षा । प्रचीतीनसी ॥ ६ ॥ चुकवाक्या मायारण्य । नैमिल्य सेविजे ब्रह्मारण्य । अनुभवपाठ आचरण । अपरोक्ष आरणकें ॥ ७ ॥ गुंफित अनुभवाक्षरें । दशावधान अनुसरें । कुंठितविवर जटास्वरें । साक्षरोसे उद्घाट ॥ ८ ॥ हे अनुभवजटांतविद ।

---

१ (?).

विज्ञानसाक्षात्कारें निर्द्वंद्व । ब्रह्मवेत्ते वैदिक स्वानंद । पवित्र दीक्षाधर्ते ॥ ९ ॥ सर्वज्ञ दशाधर्मी पाहीं । उन्मनीपर विदेही । पावन जालें निजहृदयीं । गुरुवेदपठणें ॥ १० ॥ तो सद्गुरु वेदपुरुष । योग्य करी शिष्यवैदिकास । ज्ञान विज्ञान निजध्यास । वेदसाक्षात्कारें ॥ ११ ॥ ज्ञान पावन सूर्योदय । अज्ञानतमनिवृत्ती होय । तेवि वेद हृदयज्ञानप्रलय । साध्य साधन संपत्ती ॥ १२ ॥ फरितां प्रकाशाचें बंबाळ । निशा निरसेना तात्काळ । होतां माहातेजाचा उजाळ । रात्री कांहीं च उठेना ॥ १३ ॥ तैसें ज्ञानेंवीण उपाय । करणें तितुकें हि अपाय । सद्गुरुकृपासूर्योदय । तमभ्रांति नुरघी ॥ १४ ॥ याकारणें ज्ञान वरिष्ट । ज्ञानदृष्टीस्वरूप उत्कट । वस्तु चि स्वयें निकट । ज्ञानाची प्रतीति ॥ १५ ॥ ज्ञानें प्रवृत्ती न दिसे डोळा । ज्ञाने बोळे निवृत्तिजिन्हाळा । पावन न्हावयासि सकळा । ज्ञान चि होय प्रमाण ॥ १६ ॥ साध्य साधनें मोक्षप्रदें । सद्गुरु कृपेवीण अप्रसिद्धें । संत ब्रह्मविदसंवादें । स्वरुप चि करिती ॥ १७ ॥ सद्गुरुप्रसादें ज्ञानपूर्ण । आत्मनिवेदनें स्वयंभ ज्ञान । कैवल्याचें अधिष्ठान । हृदय सच्छिष्याचें ॥ १८ ॥

श्लोकः—बोधोऽन्यसाधनेभ्यो हि साक्षान्मोक्षैकसाधनम् ।
पाकस्य वह्निवद्ज्ञानं विना मोक्षो न सिध्यति ॥ १ ॥

साधनसंपन्नता कुलीन । वधु भ्रष्ट न होतां सुलग्न । तेवि मुमुक्षुतेसी न होतां ज्ञान । मोक्षमंगळसूत्र नसे ॥ १९ ॥ "ज्ञानादेव हि कैवल्य" असे । अपरोक्ष श्रुतिवाक्य असें । अैतेव ज्ञानावाचुनि नसे । कृतार्थता जगीं ॥ २० ॥ ज्ञानें चि ब्रह्म ये अनुभवा । ज्ञाने निस्तरिजे

१ दिव्यांच्या उजेडाचें. २ सूर्यप्रकाशाचा. ३ इतर साधनांपेक्षां ज्ञान हें च मोक्षाचें प्रत्यक्ष साधन आहे. इतर साधनें असून हि अग्नीवांचून जशी पाकनिष्पत्ति होत नाहीं; त्याप्रमाणें शेवटीं ज्ञानावांचून मोक्ष हि सिद्ध होत नाहीं श्रीशंकराचार्यकृत स्वात्मबोध २. ४ विधिपूर्वक विवाह झाला नाहींतों वधूला भार्यात्व येत नाही. ५ ज्ञानापासून च मोक्ष प्राप्त होतो. ५ अत एव, ह्मणून च.

मरणार्णवा । श्रुतिवाक्य " तमेवं विदित्वा । अतिमृत्युं तरति " ॥२१॥ एवं ज्ञानेर्वण सर्वथा । नसे मोक्षमार्ग तत्त्वता । श्रुतिस्पष्टार्थे "नान्यःपथा । अयनाय विद्यते "॥२२॥ ज्ञानें होय ब्रह्मप्राप्ती । ज्ञानें चि शुद्ध ब्रह्मप्रतीति । " ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति " । मुख्यार्थ श्रुतिवाक्यें ॥ २३ ॥ येथ कर्मवादि ह्मणति । कर्मे चि करोनि मोक्षप्राप्ती । विज्ञानब्रह्मप्रती । जाणणें हें कर्म चि ॥२४॥ क्रियेनें जेव्हां ब्रह्म व्हावें । तेव्हां क्रियेनें केवीं उरावें । अक्रिय ब्रह्म स्वभावें । वेदांती ह्मणती ॥२५॥ ' कर्म ब्रह्मप्रतिष्ठितं ' ऐसें । पूर्वमीमांसक बोलत असे । साङ्ख्य त्यासि ' उत्तर देत असे । " नं कर्मणा " अवलोकीं ॥ २६ ॥ विज्ञानसाक्षात्कारीं कर्म । चमत्कार कर्माचें चि सुवर्म । जन्हीं रूढलें तें निष्कर्म । ते हि कर्मांची च प्रशंसा ॥ २७ ॥ अकर्म श्रोत्री ब्रह्मपर । ह्मणे कर्मनिष्ठासि विवर । सत्कर्मे आचरोनि उत्तरोत्तर । फळत्याग कीजे ॥ २८ ॥ सत्कर्मे अनुताप परम । सत्कर्मशीळ तो निष्काम । सत्कर्मनिष्ठ पवित्र परम । प्रवृत्ति सत्कर्मी ॥२९॥ सत्कर्मे प्रतिष्ठित नीतिन्याय । सत्कर्मे मन प्रांजळ होय । सत्कर्मे चि परपराचर्य । सुशीळ दक्ष ॥३०॥ प्रथम पीठिका सत्कर्म । सत्कर्मार्जित सुकृत परम । तेणें सुकृतें निरुपम । प्रति ये भगवंतीं ॥३१॥ भगवद्भजनें विरक्ती । वीरक्तीनें संभवे गुरुभक्ती । गुरुभक्तीनें नित्यमुक्ती । माळ घाली मुमुक्षा ॥३२॥ गुरुकृपा मूळ क्रमज्ञान । गुरुकृपा अखंडित अनुसंधान । गुरुकृपा पूर्ण समाधान । अपरोक्षज्ञानें ॥ ३३ ॥ अपरोक्षज्ञानें कृतार्थता । अपरोक्षज्ञानें मोक्ष तत्त्वता । त्या अपरोक्षज्ञानास्तव वस्तुता । साधनसिद्धि ॥ ३४ ॥ अपरोक्षज्ञानास्तव श्रवण । अपरोक्षज्ञानास्तव संसेवन । अतैव सत्कर्माचरण । अपरोक्षज्ञानासाठीं ॥ ३५ ॥ कर्मवादी

---

१ त्या ब्रह्माला याप्रमाणे जाणिले असता (पुरुष) जन्म मृत्यु तरून जातो. २ श्रुतीचा या विपर्यां अर्थता । भाव निश्चित जाणावा ॥ पाठांतर ३ मोक्षाला दुसरा मार्ग च नाहीं ४ ब्रह्म जाणणारा ब्रह्म च होतो ५ कर्मांची स्थिति ब्रह्मातच आहे. ६ ज्ञानवादी. ७ कर्मानें मोक्षप्राप्ति होत नाहीं ८ पुण्यें-पाठांतर. ९ मुमुक्षूला. १० संतांची सेवा.

हाणे निपुणा । मानसपूजेनें पोट भरेना । प्रत्यक्ष न होतां देव ध्यानी । आणिजे तया युक्ति–॥ ३६ ॥ भूमिशुद्धी करुनि श्रमावें । साक्षेपेंसि बीज पेरावें । तरीच तें फळेल बरवें । तैसीच हे कर्मसिद्धी ॥ ३७ ॥ आधीं यत्नें चि तो पाक कीजे । मग सुखें पोटभरि जेविजे । केलीं सत्कर्में सहजें । चहु पुरुषार्थ फळती ॥ ३८ ॥ कर्मावांचून कैंची मुक्ति । निष्कर्म ऐसें भ्रष्टस्थिति । सत्कर्मे करूनि तरती । दुष्कर्मे बुडती हे प्रसिद्धी ॥ ३९ ॥ भगवद्गीतेसी कृपाब्धी । बोलिला सत्कर्मस्थिति त्रिशुद्धी । जें " कर्मणैव हि संसिद्धि । मास्थिता जनकादयः " ॥ ४० ॥ हें ऐकोनि सांख्यज्ञानी । ज्ञानाग्नि कर्मनिदानी । कर्मवनदाहक वचनीं । प्रवर्तले शासनरूप ॥ ४१ ॥ अरे ऐक रे कर्मनिष्ठा । कर्मे भोगितोसि प्रतिष्ठा । परि कर्मबंधन कनिष्ठा । तुज न कळे ॥ ४२ ॥ तूं कर्मी विचक्षण होसी । परि कर्माचें रूप नेणसी । आणि तूं आपणा न जाणसी । होसी अज्ञान तेणें ॥ ४३ ॥ कर्म निपजतें तुजपासून । तो तूं आहेसि तरी कवण । तुजप्रति तूं उमजोन । प्रत्योत्तर देईं ॥ ४४ ॥ एवं कुंठित करुनि कर्मवादी । स्वस्वरूपावबोधसंवादीं । कर्मासि प्रशंसीत निजपदीं । न्यावयासि मार्गें ॥ ४५ ॥ पायाशुद्धि विना निश्चिति । कळसासि न ये इमारति । या कारणें सत्कर्मप्रवृत्ती । चित्तशुद्धि व्हावया ॥ ४६ ॥

श्लोकः—आदौ कर्मविचारज्ञः । पश्चाद्ब्रह्मविचारवान् ।
वेदोक्तं कर्म कर्तव्यं । विधिना प्रीतिपूर्वकम् ॥ १ ॥

वेदोक्त कर्मे करितां प्रीति । नव्हे चि अज्ञानाची निवृत्ती । ज्ञानावांचुनि निजमुक्ती । संभवेना सर्वथा ॥ ४७ ॥ तें चि पुढें निरूपण । मायाशुद्धीनें ब्रह्मज्ञान । अनुभवाचें विवरण । अवधारिजे श्रोतीं ॥ ४८ ॥

---

१ श्रीकृष्णभगवान्. २ जनक आदिकरून तत्वज्ञ कर्मानें च मोक्षनिष्ठ झाले. ३ आधीं ( मुमुक्षु स्थितींत ) कर्मांत रंगून आणि मग ( सिद्धस्थितींत ) ब्रह्मांत रंगून वेदविहित कर्मे विधिपूर्वक प्रेमानें करावें. याविषयीं लोकमान्यांच्या गीतारहस्यांतील " आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते । योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते " या ६/३ गीताश्लोकावरील व्याख्यान पहा.

इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । वेदगर्भकर्मनिर्वाळा । ह्मणे मेरु अनंत ॥ ४९ ॥ इति श्रीचतुर्थरुद्रे उल्लास साहवा ॥

---

श्रीरामसमर्थगुरु श्रेष्ठ । कर्मनिष्ठासि ब्रह्मनिष्ठ । करिती तो बोध उत्कट । प्रांजळ ज्ञानें ॥ १ ॥ कर्म तें अविद्यात्मक । अज्ञान अविवेचें कौतुक । जीव अज्ञानी अविवेक । जीव प्रतिष्ठला ॥ २ ॥ खापरें निवारेना तम । काजळें नव्हे तमनिर्गम । तमनिवृत्तीसि उत्तम । तो दीप चि पाहिजे ॥ ३ ॥ तेवि अज्ञाननिवृत्तीसि । संपादिजेत ज्ञानासि । ज्ञान कैवल्यमिरासी । ब्रह्मसाक्षात्कार ॥ ४ ॥ अविद्या ज्ञान अवरोधी । विद्या नासी अविद्या त्रिशुद्धी । तस्मात् ज्ञानाचुनि स्वसिद्धी । सर्वथा न होय ॥ ५ ॥

श्लोकः—अविरोधितया कर्म नाविद्यां विनिवर्तयेत् ॥
विद्याविद्यां निहंत्येव तेजस्तिमिरसंघवत् ॥ १ ॥

धनिकासि जेवि उदारता । धनवितरणें चि ये तत्वता । तेवि सत्कर्में चि निष्कर्मता । ये कर्मफळत्यागें ॥ ६ ॥ ऐसी कर्माची निजस्थिति । आणि चित्तशुद्धीसि निश्चिती । चित्तशुद्धिद्वारें विख्याति । होय प्राप्ती ज्ञानाची ॥ ७ ॥ ऐसें न होतां सत्कर्माचरण । फळप्रवाहीं घालुनि जाण । अचुक अधःपतन । होय कर्मसंस्कारें ॥ ८ ॥ सत्कर्में ईश्वरभजन । तेणें पाविजे कैलासस्थान । प्रत्यक्ष होईल ईशान । परि प्रवृत्ती न चुके ॥ ९ ॥ सत्कर्मफळ ईश्वरार्पण । तेणें ज्ञान होय सनातन । मं क्षस्वरूपसोपान । तत्वता होय ॥ १० ॥ बंधन ते विषयासक्ति । निर्विषयता ते चि मुक्ति । प्रमाण वाक्यार्थ श्रुतिस्मृति । समर्थ बोलिले ॥ ११ ॥ संसार तो चि विषय । परब्रह्म तें निर्विषय ।

---

१ निवाडा. २ कर्म आणि अविद्या हीं विरोधी नाहींत ह्मणजे सजातीय आहेत ह्मणून कर्माच्या योगानें अविद्येचा निरास होणार नाहीं. अंधकाराचा नाश होण्यास जसा प्रकाश च पाहिजे तसा अविद्येचा नाश व्हावयास विद्या च पाहिजे. श्रीशंकराचार्यकृत आत्मबोध ३.

'बन्धाय विपयासक्तिः स्वयें । मुक्ति निर्विषयता स्मृता ॥ १२ ॥ मोक्षाशा असे जयासी । तेणें नातळावें विषयासी । स्पृहा टाकुनिया ऐशी । निस्पृह व्हावें स्वतंत्र ॥ १३ ॥ करूनि भगवंतस्मरण । व्हावें विषयीं उदासिन । विषयो विषासमान । मानावे तेणें ॥ १४ ॥ हें साधनपंचायतन । सांगिजेल सुखैकघन । सेविजे अमृतरसायन । भवरोग निवृत्तिसी ॥ १५ ॥ अक्षोभ क्षमा त्रिशुध्दी । अगर्व तो निरोपाधि । अनंत दयाकृपासिध्दि । शौच्यविधी अंतर्बाह्य ॥ १६ ॥ हे चान्ही साधनें चान्ही स्तंभ । वरि पांचवें साधन स्वयंभ । तें सत्य जाणावें सुप्रभ । ज्ञानप्रभे आगळें ॥ १७ ॥

श्लोक ॥ अष्टावक्र ॥ मोक्षमिच्छसि चेत्तात । विषयान् विषवत् त्यज । क्षमार्जवदयाशौचं । सत्यं पीयूषवद्भज ॥

हें भगवत्कृपेविना न घडे । वर्णाश्रमधर्म हि नातुडे । येक विश्वासेवीण निवाडे । रिघ नसे स्वरूपीं ॥ १८ ॥ भावना आत्मप्राप्तीचा मंत्र । सद्भाव कैवल्याचें क्षेत्र । यादृशी भावना यत्र । सिध्धिर्भवति तादृशी ॥ १९ ॥ सद्भावार्थें जो संपन्न । त्यासि घडे भगवत आराधन । होय तो परम पावन । भगवद्भक्तीनें ॥ २० ॥ अंतरीं दृढ भगवद्भक्ति । वरी सत्कर्माचरण विरक्ती । तयासि स्वयें चि निजमुक्ती । वश्य जाली सर्वस्वें ॥ २१ ॥ तयासि संसार बाधिना । अनुताप मळों देईना । अज्ञान तें हि अवरोधिना । हृदयींचें ज्ञान ॥ २२ ॥ मुक्तिसुख तें भोगावया । ज्ञान चेईरें[४] करि तया । विरक्ति सखी बोधुनियां । उन्मनीसि आणि ॥ २३ ॥ सद्गुरुकृपा त्रितापहरण । सद्गुरुकृपा विश्रांतिघन । सद्गुरुकृपा विरक्तीउन्मन । विश्रांतिकारी ॥ २४ ॥ सद्गुरुकृपा स्वरूपज्ञान । सद्गुरुकृपा अनुभव पूर्ण । सद्गुरुकृपा सनातन । स्वरूप स्वयें ॥ २५ ॥ शोधें स्वधर्म ऐसा । साधक स्वरूपानुसंधाना

---

१ विषयांची आवड जन्ममृत्यूला कारण होते; व त्याविषयीं वैराग्य हीच मुक्ति. २ स्पर्श करूं नये. ३ जेथें जशी श्रद्धा असेल तेथें तशा प्रकारची फलनिष्पत्ति होते. ४ जागृत.

सरिसा । अथातो धर्मजिज्ञासा । विवरला बरी ॥ २६ ॥ तो अधिगतदेहात्मबुद्धि । शिवेना कर्मफळ त्रिशुद्धी । संततभवआधिव्याधी । अध्यात्म तापें ॥ २७ ॥ भौतिकाचेनि सहवाससिद्धें । क्षोभली कारण विरुद्धें । तो आधिभूतिकसमंधें । विरक्तीनें विरीला ॥ २८ ॥ मरणांतिक दुःखें कठिण । यमादियातना दारुण । आधिदैविकें क्षोभोन । आला जन्मनिवृत्तीसी ॥ २९ ॥ तापत्रयें या आहळोनी । गुरुकृपाशीतळजीवनीं । निवाला स्वानंदीं मज्जोनि । सुखी जाला मुमुक्षु ॥ ३० ॥ फळलें दैविक सुकृतें । पातला स्वानंदउदधीतें । अनन्यताप्रसन्नचित्तें । प्रश्न करुं बैसला ॥ ३१ ॥ पार्थुनियां स्वामीप्रति । ह्मणे केवि होय भवनिवृत्ती । उद्विग्नचित्तें सद्गती । व्हावया तत्पर ॥ ३२ ॥

श्लोक ॥ तापत्रयार्कसंतप्तः कश्चिदुद्विग्नमानसः ।
शमादिसाधनैर्युक्तः सद्गुरु परिपृच्छति ॥ १ ॥

तया मुमुक्षासि आदरें । स्थितिवेधचमत्कारें । भवनिवृत्तिपर उत्तरें । सांगति सद्गुरु ॥ ३३ ॥ मोक्षाधिकारी निश्चयेंसि । जो विटला संसारासि । अभिमानत्यागें स्वरुपासी । मिळाला स्वयें ॥ ३४ ॥ विवेकमथित सारबुद्धी । विश्रांतिरूपसमाधी । सेवि सर्वदा उपलब्धी । महावाक्यद्वार ॥ ३५ ॥ भवसिंधु अज्ञानजळ । ज्ञाननौका सुख आखिळ । तरोनि भवाब्धि प्रांजळ । सुखिया होई ॥ ३६ ॥ प्रपंचातील परमार्थ । ईश्वर स्वरुपें समर्थ । भूतमात्रीं तो ऐक्यार्थ । जाणोनि भजे ॥ ३७ ॥ तिळीं तेल व्यापक जैसें । तेवि आत्मा विश्वीं वसे । दश्य बाकस टाकुनि तैसें । कीजे सारग्रहण ॥ ३८ ॥ इक्षु दंडीं संपूर्ण । ध्यावा तो बाकसासि मर्दून । आत्मा देहीं स्वानंदघन । त्यागोत्यागें संग्रहीजे ॥ ३९ ॥

---

१ आतां येथून धर्म काय आहे हें जाणण्याची इच्छा ( सुरू झाली ). स्वरूपशोधनाच्या मार्गांत स्वधर्मच याची अत्यंत अवश्यकता असते ह्मणून तें साधण्यासाठीं मोक्षार्थीची पहिली पायरी या न त्यानें जैमिनी मुनींनीं वैदिकविधि निषेधात्मक वाक्यांची एकवाक्यता करून तद्द्वारा धर्मस्वरूपाचें आविष्करण करण्यासाठीं पूर्वमीमांसा नांवाचें अप्रतिम दर्शन रचिलें त्यांतील ' अथातो धर्म जिज्ञासा ' हें आरंभीचें सूत्र होय. २ श्रीशंकराचार्यकृत वाक्यवृत्ति श्लोक ३. ३ आत्मस्वरूपाचें वैभव. ४ ऊसाचें चिपाड. ५ कांहीं टाकून कांहीं घेऊन.

नामरूपसंकेतपर । अवस्थाविवर्जित परात्पर । स्वयें चि तो निरंतर । अगोचर रूपें ॥ ४० ॥ तोय विसर्जून निवाडें । क्षीर सेविजत रोकडें । तेवि हंसाचेनि वाडेकडे । सारासार निवडीजे ॥ ४१ ॥ साळीं माजि शुध्द कण । तैसा आत्मा ज्ञानघन । देह चत्वार निरसून । ध्यावा महावाक्यशोधें ॥ ४२ ॥ एवं नित्यानित्यविचारें । स्वरुप निश्चयें धीवरें । तरी संसारार्णवीं बा रे । अचुक तरसी ॥ ४३ ॥ नित्यानित्यविचारणा । करीं स्वरुपाची धारणा । यसवी कारणाच्या कारणा । समाधीसुखें ॥ ४४ ॥

श्लोकः—नित्यानित्यविचारेण स्वस्वरूपस्य निश्चयः ।
तेन कृत्वा भवेन्मोक्षो प्रज्ञावान् सुखआत्मनि ॥ १ ॥

साधनचतुष्टयसंपत्ती । असें पुण्यार्जित आइती । स्वरूपज्ञानविश्रांति । पावलासी सुखें ॥ ४५ ॥ गुरुकृपों विष्णु चि होसीं । मोक्षरैमे वरला जासी । सद्गुरुप्रसाद तुजपासी । माहासिद्ध वर्तत ॥ ४६ ॥ आश्रमी च आश्रमातीत । पावलासि स्वरूप शाश्वत । गुरुकृपा निजहस्त । राहिला मस्तकीं ॥ ४७ ॥ अकल्पित स्वरूपार्थ । बोधानुभव परमार्थ । गुरुप्रसादें फलितार्थ । बोळल्या सिध्दी ॥ ४८ ॥ आतां तुझें तुज उमजलें । तें स्वरूपज्ञान सुखें बोलें । प्रवृत्तिबोधासी आर्जिलें । पाहिजे प्रस्ताविक ॥ ४९ ॥ मूळ कर्माची विवंचना । कर्मी विकर्मरचना । कर्मी अकर्मसिध्दी ज्ञाना । कर्माचरण हेतु ॥ ५० ॥ निवळलें कर्माचरण जेणें । तें कर्म शास्त्रअवलोकनें । पवित्र ते चि द्वजा सन्मानें । उमजुनि वर्ते ॥ ५१ ॥ कर्म उपासना ज्ञान । त्रिकांड वेद प्रमाण । या कारणें प्रथम जाण । कर्मकांडासी ॥ ५२ ॥ हे शास्त्रदृष्टी वांचून । निवळे चि ना अंतःकरण । सिध्दांत पूर्वपक्ष संपूर्ण । होय करतळीमलक ॥ ५३ ॥ वेदांतश्रवणरूढीनें । वाक्यसंगतिअन्वयानें । आत्मानात्मववचनें । प्रांजळ कळती ॥ ५४ ॥ आत्मा निजधर्म देहीं कैसा । अनात्मधर्म केवि मानसा ।

१ स्थिर होईल. २ कृपेनें. ३ रमेकडून. ४ तळहातावरील आंवळ्यासारखा.

स्वजाति विजाति सरिसा । भेद स्वगत निवळे ॥ ५५ ॥ विरक्तीपट्टणींचा वास । होतां चातुर्य बहुरस । भूप सहवासें विलास । लाहिजेत नृपतीचे ॥५६॥ सकळ वृत्तींची निजवृत्ती । अखंडैकधारणा चित्तीं । तेणें अनुसंधानें ग्रंथीं । अवधान दे चतुरा ॥५७॥ कर्मविपाकींचा विस्तार । श्रवणावधानें सादर । अवधारीं विरोत्तर । अवधानशिळा ॥ ५८ ॥ अवधानपरात्परजळीं । अर्थरूपचित्कल्लोळीं । मीन होऊनिया कवळीं । अभ्रांत जीवन ॥ ५९ ॥ इति श्रीरामदोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । विरक्तीनें मुमुक्ष वरिला । म्हणे मेरु अनंत ॥ ६० ॥ इति श्रीचतुर्थ रुद्रे सप्तमोल्लासः समाप्तः ॥

---

श्रीरामसमर्थ स्वामी । स्वरूपें विमुक्तवर्णाश्रमी । ज्ञान तनु आश्रम धर्मी । सुशीळ आचरणें ॥ १ ॥ नित्य सुचीत स्वभावता । नित्य स्वरूपाश्रम तत्वता । नित्यान्वयें पारि शुध्दता । स्वसुखायतन ॥ २ ॥ हृदयस्थानदासिंधु अगाध । उद्बोधकल्लोळबोध निर्वेध । सज्जन स्वानुभवी स्वतःसिध्द । मज्जती सुखें ॥ ३ ॥ नित्योदय ज्ञान वेदरूप । वर्णाश्रमासी आचरण तप । जेणें विश्रांती निर्विकल्प । पाविजेत तो क्रम ऐका ॥ ४ ॥ स्थिर प्रज्ञा प्रशांत स्वयें । सहज निर्विकार हृदय । अभ्रांत सुखेनिरामय । निजगतीस पाविजे ॥ ५ ॥ ते तत्वता स्वरूप ज्ञान । तेथें चि सर्वत्राचें अनुसंधान । तेथें आश्रम जाती वर्ण । कांहीं च नसे ॥ ६ ॥ ऐसा ब्रह्मनिष्ठ तो स्वतंत्र । परम पुरुष नित्य पवित्र । तयापासुन हें ब्रह्म सूत्र । आश्रमधर्मासी आलें ॥ ७ ॥ ज्याच्या ब्रह्मचर्यैश्चर्यें । स्वधर्म गमीसि पावतसें । तो सद्गुरु राम वर्ततसे । लोकसंग्रहा कारणें ॥ ८ ॥ जो अभ्रांत ज्ञानदर्शी स्वयें । जयाचा संकल्प ज्ञानोदय । वेदशास्त्राचें प्रमेय । प्रकाशिलें तेणें ॥ ९ ॥ सदा कल्पतरु सफळ । तेवि आश्रम फळद्रुप प्रांजळ । सद्गुरुकृपेनें निवळ । आश्रमासि आलें ॥ १० ॥ अभिनयाचें अभिनव जालें । दीपें चक्षुसी विलोकिलें ।

---

१ (?) २ वाक्यीनें, तेजानें.

आश्रमधर्में चि नेलें । परंधामासी ॥ ११ ॥ इंद्रियें मना प्रवर्तविती । बुद्धी जाणे आत्मयाप्रती । सर्व विलक्षण ब्रह्मस्थिति । वर्णाश्रमा आली ॥ १२ ॥ आश्रमज्ञान दोहीं कडे । प्रवृत्ति निवर्तउनी निवृत्ति रूढे । तमनिरसीं प्रकाश पडे । सूर्योदयें त्या ॥ १३ ॥ प्रकाशतनु ज्ञानघन । सर्वांग श्रोता सनातन । जाणे गोचर दृष्टी संपूर्ण । सत्वशुद्धीनें रूढला ॥ १४ ॥ नादें केलें नाद श्रवण । रूपासी जालें रूपदर्शन । तैसा रामांगलोचन । देखे आप आपणा ॥ १५ ॥ आत्मा आत्मरूप अखंडित । बोध होतां हि शाश्वत । अनुभव ज्ञानें अद्वैत । तत्ववेत्ता स्वयें ॥ १६ ॥ सहज आनंद अनुभवस्थिती । अखंडैकरसें जाली तृप्ति । त्या स्वसुखाचे ढेंकर येति । माहावाक्यउद्‌गार ॥ १७ ॥ अद्वैतमतोद्धारकर्ते । माहा अद्वैत सुखें अकर्ते । महानुभाव तत्ववेत्ते । प्रत्यक्ष शंकररूपी ॥१८॥ अयोनिसंभव सृष्टीवरी । ब्रह्मानंद तनुधारी । लोकोद्धार अवतारीं । मूर्तिमंत ज्ञानें ॥ १९ ॥ आपुला अनुभव आपण । बोलिले ग्रंथकोटीप्रमाण । तयांच्या वचनाचा संपूर्ण । अनुभव घ्यावा ॥ २० ॥

श्लोक ॥ नै वर्णा न वर्णाश्रमाचारधर्मा न मे धारणाध्यानयोगादयोऽपि ।
अनात्माश्रयोऽहं निदिध्यासहीनस्तदेकोवशिष्टः शिवः केवलोहम् ॥ १ ॥

असे माहानुभाव महंत । सर्वक्रियेमाजी क्रियातीत । नित्य स्वरुपें शाश्वत । अक्रिय बोधें ॥ २१ ॥ ब्रह्म क्षत्री वैश्य शूद्र । हे च्यारही वर्ण गती सुभद्र । वेदहृदय बोधसमुद्र । रूपकर्ता यथा ॥ २२ ॥ वर्णत्रयासी उद्धार । ब्राह्मण वर्णपरात्पर । " वर्णानां ब्राह्मणो गुरुः " थोर । महिमा प्रतिष्ठला ॥ २३ ॥ तया ब्राह्मणवर्णाआंत । च्यारि आश्रम परम पुनीत । ब्रह्मचर्य आणि ग्रहस्थ । वानप्रस्थ आणि संन्यास

१ श्रीमच्छंकराचार्य. २ मी कोणत्या हि वर्णाचा नाहीं; मला कोणत्या हि वर्णाचे किंवा आश्रमाचे धर्म किंवा आचार लागू नाहींत. मला ध्यानधारणादिक योगाची हि गरज नाहीं. प्रकृतीला हि आश्रयभूत आणि निदिध्यासाच्या पलीकडचा असा मीं केवळ शिवस्वरूप आहे. श्रीशंकराचार्यकृत निर्वाण दशक २.

॥ २४ ॥ त्यात ब्रह्मचर्यलक्षण । व्रतदीक्षायुक्ताचरण । स्नान संध्या जप ध्यान । उदासीन अष्टभोगीं ॥ २५ ॥ सुगंध वनिता वसन । गीत तांबोळ भोजन । शयन आणि भूषण । ऐसे हे अष्टभोग ॥ २६ ॥

श्लोकः—सुगंधो वनिता वस्त्रं गीतं तांबूल भोजनं । ०१ ।
शयनं भूषणं चैव अष्टभोगाः प्रकीर्तिताः ॥ १ ॥

या अष्टभोगीं उदासीन । गायत्रीहृदय अनुसंधान । महाब्रह्मचर्यआचरण । ब्रह्मदीक्षा ॥ २७ ॥ मधुकरवृत्ती उदरपूर्ती । आचार्यसेवा पठण स्थिति । सांगें स्वशाखे प्रीती । अध्ययन करणें ॥ २८ ॥ न होतां स्वशाखाअध्ययन । न कीजे अन्यशाखापठण । स्वशाखा जालियां संपूर्ण । अन्यशाखा पढिजे ॥ २९ ॥ त्यान्ही वेद पढलियावरी । शास्त्रअभ्यास कीजे निर्धारीं । शास्त्रविदपत्तीने वेदांतरीं । रीघ करावा ॥ ३० ॥ करितां वेदांत श्रवण । होय विषयदोषदर्शन । तेणें विरक्तीनें उदासीन । उपजे मोक्षइच्छा ॥ ३१ ॥ पूर्वपुण्यसंस्कारें मनीं । तीव्र वैराग्य उपजोनि । मुमुक्षु ब्रह्मचर्या त्यागुनी । करी संन्यासग्रहण ॥ ३२ ॥ ऐसें मंद वैराग्य जया । सन्यास तो अयोग्य तया । ग्रहस्थाश्रमें करूनियां । भव निस्तरिजे ॥ ३३ ॥ ग्रहस्थाश्रमीं विधी न्यायकें । बोळिलें कर्म द्वयषट्क । आणि आस्तिक्य कर्माष्टक । आचारिजे ग्रहस्थें ॥ ३४ ॥ नित्य नैमित्यक उपासन । काम प्रायश्चित निषेधन । यजन याजन अध्येयन । अध्यापन दान प्रतिग्रह ॥ ३५ ॥ शम दम तपाचरण । शौच क्षमा आर्जव पूर्ण । ज्ञान विज्ञान मिळोन । विंशति कर्मे ॥ ३६ ॥ पृथकत्वें नित्य षट्कर्म । स्नान संध्या जप होम । देवतार्चन परम । आतिथ्य साहावें ॥ ३७ ॥ नित्य विधियुक्त प्रातःस्नान । काळत्रय संध्यावंदन । सहस्त्रगायत्री उच्चारोन । आराध्यमंत्र जपिजे ॥ ३८ ॥

---

१ भिक्षावृत्ति २ पोट भरण्यासाठीं. ३ अंग( शिक्षाव्याकरणादि ) सहित. ४ आपली वेदशाखा, आश्वलायन, तैत्तिरीय इ. ५ न्याय, वेदांत इत्यादि, तशी च व्याकरण, ज्योतिष् वगैरे. ६ नियामक. ७ बारा प्रकारचीं कर्मे. ८ शास्त्रांनीं गितल्याप्रमाणें. ९ इष्टदेवतेच्या आराधनेचा

गायित्रीमंत्रजप न होतां । अन्य मंत्र जपों जातां । गायित्री त्या मंत्रासी तत्वता । भक्षूनि जाय ॥ ३९ ॥ तेणें गायित्रीची क्षोभता । देवतही क्षोभे तत्वता । त्यास्तव गायित्री संतोषतां । दैवत जपें तोषवीजे ॥ ४० ॥ होम औपासन वैश्वदेव । पंचसूनादोषास्तव । करणें धरूनि सद्भाव । आन्हिकोक्तप्रकारें ॥ ४१ ॥ विहित पदार्थ खंडण । करितां होय जंतुहनन । तो खंडणी दोष संपूर्ण । बोलिला शास्त्रीं ॥ ४२ ॥ चुलीकडुनी तिर्यक । मृत्यु पावती कित्तेक । दोष जाणिजे निश्चयात्मक । चुलीनी ऐसा ॥ ४३ ॥ ओर्द्रवस्त्र पिळितां । उदकसंबंधीं जीव घाता । पावती तो पेशणी तत्वता । दोष बोलिजे ॥४४॥ उदकपानें जीव मरती । उदकुंभीं निर्दोषस्थिती । मज्जनमार्जनें निमेती । तो मार्जनी दोष ॥ ४५ ॥ या दोषनिवृत्तीकारणें । प्रहर्थें वैश्वदेव करणें । वैश्वदेवेंवीण भक्षणें । तें अन्न क्रिमीरूपें ॥ ४६ ॥

श्लोकः—कंडनी चुल्हिनी पेषी उदकुंभश्च मार्जनी ।
पंचसूना गृहस्थस्य ताभिः स्वर्गं न विंदति ॥ १ ॥

आतां तें देवतार्चन । हरि हर सूर्य गजानन । आणि अंबिका तें जाण । पंचायतन अर्चना ॥ ४७ ॥

श्लोकः—आदित्यमंबिकां विष्णुं गणनाथं महेश्वरं ।
गृहस्थः पूजयेत्पंच भुक्तिमुक्त्यर्थं सिद्धये ॥ १ ॥

---

१ पांच पातकांचे दोष जावे ह्मणून. सूना=हत्या, वध. २ आन्हिक+उक्त प्रकारें. ३ जीवांची हत्या. ४ जीवजंतु. ५ मरतात. ६ क्रमीप्रमाणें. ७ कंडनी ह्मणजे उखळ मुसळ, चुल्हिनी ह्मणजे चूल, पेषी किंवा पेषणी ह्मणजे पाटा वरवंटा, उदकुंभ ह्मणजे पाण्याचीं भांडीं, आणि मार्जनी ह्मणजे केरसुणी, इतक्या पांच ठिकाणीं गृहस्थाच्या घरीं जीवहत्या होण्याचा संभव असतो. या हत्या झाल्या असतां स्वर्गप्राप्ति होणें शक्य नाहीं. ह्मणून त्यांच्या निरसनार्थ वैश्वदेवांतर्गत पंच महायज्ञ स्मृतिकारांनीं सांगितले आहेत. याविषयीं मनुस्मृति ३, ६८-६९ पहा. पंच सूना गृहस्थस्य चुल्ली पेषण्युपस्करः ( केरसुणी वगैरे ) ॥ कंडणीचोदकुंभश्च बध्यते यास्तु वाहमन् ॥ तासां क्रमेण सर्वासां निष्कृत्यर्थं महर्षिभिः । पंचक्लृप्ता महायज्ञाः प्रसहं गृहमेधिनाम् ॥

भुक्तीमुक्तिसी हरिहर । रोगनिवृत्ति प्रभाकर । विघ्नहरणा विघ्नहरें । ऐश्वर्यप्रद अंबिका ॥ ४८ ॥ बंधु सुत भृत्य वहन । वस्तु दासी धान्य धन । अष्टऐश्वर्यसंपन्न । यातें बोलिजे ॥ ४९ ॥

श्लोकः—दासीभृत्यःसुतोबंधुर्वस्तुवाहनमेवच ।
धनधान्यमिदप्रोक्तमष्टैश्वर्यं प्रकीर्तितम् ॥ १ ॥

सात्विक सद्भावें पूर्ण । जो ऐश्वर्य करी रामार्पण । तो भगवद्भक्त अनन्य । भजननिष्ठेनें असे ॥ ५० ॥ असो ज्यासी ज्या ज्या दैवतीं । निष्कामभजनें प्रीति । ते ही समर्थें भगवंतीं । अविधिकरूनी ॥ ५१ ॥

श्लोकः—येऽप्यन्यदेवता भक्ता यजते श्रद्धयान्विताः ।
तेऽपि मामेव कौंतेय यजत्यविधिपूर्वकम् ॥ १ ॥

श्रीवासुदेवासी टाकुनी । भजे इतर देवता जनीं । जान्हवीतें दृष्टीसी देखोनी । तृषेला कूप खोणें ॥ ५२ ॥

श्लोकः—वासुदेव परित्यज्य योऽन्यदेवमुपाश्रितः ।
तृषितो जान्हवीतीरे कूप खनति दुर्मतिः ॥ १ ॥

ह्मणउनी मुख्य भजन । घडता परमेश्वरीं पावन । त्यात काम्यनिष्काम्य-लक्षण । कळलें पाहिजे ॥ ५३ ॥ निष्कामभजनें सद्गति । काम्य-भजनें फळप्राप्ति । ह्मणोनि निष्काम भगवतीं । भजिजे हें उत्तम ॥ ५४ ॥

श्लोकः—भजन द्विविध प्रोक्त शुद्ध चाशुद्धमेव च ।
अशुद्ध कामसकल्प शुद्ध कामविवर्जितम् ॥ १ ॥

त्या निष्कामभजना आंत । असती चतुर्विध भक्त । बद्ध मुमुक्ष विख्यात । साधक आणि सिद्ध ॥ ५५ ॥

श्लोकः—चतुर्विधा भजते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।
आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १ ॥

आतां पुढील निरोपण । अवधारिजे सावधान । कर्म प्रांजळें संपूर्ण ।

---

१ सूर्य. २ गणपति. ३ समर्पे (?). ४ गीता ९/२३. ५ तहान भागवि-ण्यासाठीं ६ खणणो. ७ गीता ७/१६

हृदईं ब्रह्म निवळे ॥५६॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । सत्कर्में प्रांजळ चित्कळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ५७ ॥ इति श्रीचतुर्थ रुद्रे अष्टमोल्लास समाप्तः ॥

---

श्रीराम समर्थ कर्मनिष्ठ । पावन दीक्षा आंगीं वरिष्ठ । स्वयें आचरोनि गति उत्कट । करविती जना ॥ १ ॥ जन भाविक सात्विक । नेणें शास्त्रमथित विवेक । त्यांसी प्राकृतबोधें तारक । दीक्षेसि आर्ह करिती ॥ २ ॥ अनिवार प्रेमा भगवंतीं । परि नेणती देवाप्रती । तयांसी निजउमजेस्थिती[१] । आणिती उपदेशें ॥३॥ तया भाविकां सत्कर्माचरण । स्नान संध्या जप हवन । मार्गे निरोपिलें उमजोन । पुढें आतिथ्य आइका ॥ ४ ॥ देव ऋषी तपोनिष्ठ । सात्विक सज्जन कर्मनिष्ठ । भगवद्भक्त येकनिष्ठ । आतिथ्यें तोषवीजे ॥ ५ ॥ समईं आश्रमासी जे आले । त्यांतें आतिथ्य पाहिजे केलें । परदेशी स्वदेशी भले । तोषविजेत सदनें ॥ ६ ॥ तडीतापडी परदेसी । रंजले गंजले उपवासी । शोध न घेतां तयांसी । अन्न दिधलें पाहिजे ॥ ७ ॥ कीजे मातृपितृसेवा । भावें भजिजेत भूदेवां[२] । सद्गुरुस्वामी माहानुभावा । नित्य आतिथ्य करावें ॥ ८ ॥ ऐसें करावें आतिथ्यपूजन । यथानशक्त्या ब्रह्मसंतर्पण । पंक्तिभेद न होतां येकान्न । सर्वत्रांसी व्हावें ॥ ९ ॥ आकर्णीं प्रत्यवाय घडे । निरोपिलें नित्यकर्म निवाडें । पूर्वमीमांसावाक्यउजेडें । आचरण करावें ॥ १० ॥

श्लोकः—स्नानं संध्या जपो होमो देवतानां च पूजनम् ।
आतिथ्यं च षट्कर्माणि नित्यानीत्युच्यते श्रुतौ ॥ २॥

आतां नैमित्यिकें[४] कार्लांतरें । कर्म आलें विविध प्रकारें । केलें पाहिजे अत्यादरें । सद्भावनिष्ठेनें ॥ ११ ॥ ज्यातककर्म नामकरण । तदनंतरें अन्नप्राशन । चौल चूडा उपानयन । स्नातककर्म[५] बोलिलें ॥ १२ ॥

---

१ आत्मज्ञानाची स्थिति. २ ब्राह्मणांना. ३ अकरणे प्रत्यवाय न केल्यानें पाप. ४ नैमित्तिक. ५ ब्रह्मचर्याश्रम पुरा झाल्यावर गृहस्थ होण्यापूर्वीच्या स्थितीला स्नातकावस्था ह्मणतात.

व्रतचतुष्टय आचरण । सोमव्रत प्रजोत्पत्तिकारण । शाक्षेयमत उद्धरण । चतुर्थ वैश्वदेवाख्य ॥ १३ ॥ विवाह आणि गर्भाधान । सीमंत तथा पुंसवन । पितृमेधिककर्म जाण । ऐसीं हे शोडश कर्मे ॥ १४ ॥

श्लोकः— गर्भाधानं पुंसवनं सीमंतो जातिकर्म च ।
नामान्नप्राशनं चैव विवाहः पितृमेधिकम् ॥ १ ॥

पितृतिथी परागोदीवासर । जयंत्या ग्रहणकाळ थोर । नक्षत्र तिथि प्रसंगानुसार । नैमित्यकर्म करावे ॥ १५ ॥ आतां ऐक सावधान । उपासनाकर्मविधान । मंत्र विधि दीक्षाग्रहण । आचार्यमुखें ॥ १६ ॥ उपासना कल्प निष्कळंक । वैदिक आणि मांत्रिक । मूर्ति यंत्र विधिपूर्वक । मंत्रशास्त्ररूढीनें ॥ १७ ॥ वैदिक पुरुषसूक्तेंकरून । कीजे शोडश-उपचारपूजन । मांत्रिक ते अनुसंधान । उभय प्रकारें ॥ १८ ॥ वैखानस पांचरात्रीय । अथर्वणीय दीक्षाहृदय । आगमोक्त महा प्रमेय । मंत्रकळापविस्तारें ॥ १९ ॥ पाहतां बहु देव बहु मंत्र । मंत्रोद्धार दीक्षा विचित्र । समग्र मंत्रशास्त्र सूत्रें । निरोपिलें देवें ॥ २० ॥ अथर्वणवेदीं संपूर्ण । निरोपिलें उपासनाकांडप्रमाण । तें मंत्ररहस्य कथन । दोनी प्रकारें असे ॥ २१ ॥ यांत दक्षिण मार्गद्वय । दक्षिण मार्ग चितारक होय । वाममार्ग पतन कार्य । भाष्यकार बोलिले ॥२२॥ शाक्त कौळें कुत्सित पंथें । जातां पाविजे पतनातें । अनुसरोन तया तारकातें । राम तारक आर्जिजे ॥ २३ ॥ सीता चित्शक्ति पावन । परमपुरुष रघुनंदन । राम परतत्व सनातन । वैदेही स्वरूपता ॥ २४॥ भरत प्राज्ञ सुखैकघन । तेजस शत्रुघ्न निर्वाण । विश्व आत्मा लक्ष्मण ।

---

१ (?). २ श्राद्धदिवस, अमावास्या, संक्रांत वगैरे. ३ ग्रहणादि पर्वांचे दिवस. ४ अर्धोदयासारखी विशिष्ट नक्षत्र, तिथि, महिने इत्यादिकांचे योगानें होणारीं पर्वे. ५ तंत्रशास्त्रांत सांगितलेले. ६ अघोरपंथ ७ शाक्तासारखा एक वाम मार्ग. ८ हीं जीवाच्या निरनिराळ्या अवस्थांचीं नांवें आहेत. कारण-शरीराचा सुषुप्तींतील अभिमानी जीव ह्या० प्राज्ञ, स्वप्नावस्थेंतील सूक्ष्मशरीराभिमानी जीव ह्या० तैजस, आणि जागृदवस्थेंतील स्थूलदेहाभिमानी जीव ह्या० प्राज्ञ; अशी वेदांतशास्त्रांतील परिभाषा आहे.

पूर्णान्वयें पाहतां ॥ २५ ॥ रामतापिनीकल्पोक्त हें । रामार्चनचंद्रिकाप्रमेय । माहाउपासक राम स्वयें । अर्चिती राम आत्मत्वें ॥ २६ ॥ निरोपिलें उपासनाकर्म । अवधारिजे कामीक[1] कर्माचें वर्म । ज्योतिष्टोमादि वासनाधर्म । स्वर्गकामफळाख्य[2] ॥ २७ ॥ वासना धरूनि चित्तीं । व्रतदानादि आचरती । कृच्छ्र चांद्रायणें करिती । काम्यकर्म बोलिजे ॥ २८ ॥ हें चि निष्काम्यतेनें निपजे । तरि ऋणत्रयमुक्त[3] होईजे । आतां प्रायश्चितकर्म जाणिजे । एवं प्रकारें ॥ २९ ॥ नाना पश्चातापें विरक्ती । परत्र साधन करिजेती । तपतीर्थाटणें फिरती । प्रायश्चित कर्में ॥ ३० ॥ नाना भोगीं उदासीन । निष्ठा भगवन्नामस्मरण । होय सकळ पापक्षाळण । प्रायश्चितकर्म बोलिजे ॥ ३१ ॥ नाममहिमा अत्यद्भुत । भागवतीं व्यासकथित । माहातृणरासी दग्ध होत । पावकें जैश्या ॥ ३२ ॥ तैश्या पापाचिया रासी । नामस्मरणें जळती विशेषीं । पुण्य प्रगटोनि चिदाकाशीं । नामसुखें घनवटे ॥ ३३ ॥

श्लोकः—हरिर्हरति पापानि दुष्टचित्तैरपिस्मृतः[4] ।
अनिच्छयाऽपि संस्पृष्टे दहत्येव हि पावकः ॥ १ ॥

वाल्मिकाचें प्रसिद्ध आख्यान । पतित नामें चि जाला पावन । नामें उद्धरले भक्तजन । नाम पावन सर्वार्थी ॥ ३४ ॥ नामें उद्धरली शिळा[5] । नाम पावन करी सकळा । नाम मोक्षाचा जिव्हाळा । सद्गतीसी होय ॥ ३५ ॥

श्लोकः—नारायणो नाम नरो नराणां प्रसिद्धचौरः[6] कथितः पृथिव्यां ।
अनेकजन्मार्जितपापसंचयं हरत्यशेषं स्मृतिमात्रयैव ॥ १ ॥

नामसंजीवनीस्मरणें । भक्त पावन संकीर्तनें । नामें जगोद्धार होणें । नाम तारक प्रसिद्धी ॥ ३६ ॥

---

१ काम्य; फळाच्या इच्छेनें केलेलें. २ स्वर्गप्राप्ति हें आहे फळ ज्याचें ३ ऋषींचें, देवांचें आणि पितरांचें असे तीन प्रकारचें ऋण. ४ हरीचें स्मरण जरी दुष्टचित्तानें केलें, तथापि तो त्याच्या पापाचा नाश करतो च. उदा० इच्छा नसतां हि जरी अग्नीला पाय लागला तरी तो जाळतो च. ५ अहिल्यारूप. ६ नारायण (परमेश्वर) नांवाचा पुरुष जगांतील सर्व चोरांत अट्टल चोर म्हणून प्रसिद्ध आहे. कारण अनेक जन्मीं सांठविलेलें जीवाचें पाप तो केवळ स्मरणमात्रें-करून पळवून नेतो.

श्लोकः—नाम्नोऽस्तियावतीशक्तिः पापनिर्हरणे हरेः ।
तावत्कर्तुं न शक्नोति पातक पातकी जन. ॥ १ ॥

जालें प्रायश्चित्तकर्मकथन । आता निषेधकर्मलक्षण । कर्मविपाकीं अवलोकुन । निषेध केला पाहिजे ॥ ३७ ॥ स्वर्णस्तेयें सुरापान । गोब्राह्मणवध मांसभक्षण । गुरुतल्पअगम्यागमन । माहा पंच पातकें ॥ ३८ ॥ वर्जेदिनीं स्वस्त्रियेसीं रमण । तेविं च तें दिवामैथुन । ज्यारण मारण उच्चाटण । निषेधकर्म बोलिलें ॥ ३९ ॥ स्तंभन मोहन वशीकरण । शाक्तवामक्रियाआचरण । निषेधकर्मे हें संपूर्ण । बोलिलीं शास्त्रीं ॥ ४० ॥

श्रुति.—न कलंज भक्षयेत् न सुरा पिवेत् ।
न परां गच्छेत् ॥

करू नये मोहकद्रव्यभक्षण । तेसें चि मद्याचें पान । जाऊ नये परयुवतीसी जाण । श्रुतिशास्त्रशासन ऐसें असे ॥ ४१ ॥ एव जीं जीं कर्मे करावीं । तीं तीं अवश्य भोगावीं । कर्मापासुनी कर्मांची पदवी । पुन्हः पुन्हा प्रवर्ते ॥ ४२ ॥

श्लोकः—कपिलवाक्य ॥ अवश्यमनुभोक्तव्य कृतं कर्म शुभाशुभम् ।
नाभुक्त क्रियते कर्म कल्पकोटिशतैरपि ॥ १ ॥

जेविं सहस्र गाईंच्या कळपीं । धऊं जाउनी मातेसी टिपी । तेविं पूर्वकृतकर्म संकल्पीं । आकळी कर्तव्यांतें ॥ ४३ ॥

श्लोक.—यथा धेनुसहस्रेषु वत्सो विंदति मातरम् ।
तथा पूर्वकृत पाप कर्तारमनुगच्छति ॥ १ ॥

शुभाशुभ न विचारितां । मना आलीं कर्मे करितां । तेणें अघ पतन तत्वता । निरयींसी जाइजे ॥ ४४ ॥ ह्मणोनी दोषदर्शनें । निषेध

१ हरीच्या नांवांत पापनाशनाची जेवढी शक्ति आहे, तेवढें पाप कांहीं पातकी माणसाला करतां येत नाहीं २ सोन्याची चोरी. ३ निषिद्ध दिवसीं, अ० अमावास्यादि पर्वें, श्राद्धादि दिवस वगैरे. ४ विषारी बाणानें मारलेल्या हरिणाचें मांस. ५ परस्त्री कडे. ६ जें ज शुभ किंवा अशुभ कर्म करावें ते तें अवश्य भोगलें पाहिजे. जें पुढें भोगावयास नको असे कर्म कल्पांतीं हि करता येत नाहीं ७ धावत. ८ ओळखून धाडितें. ९ फळ, वासनेच्या योगानें १० करणाऱ्याला. ११ नरकाला १२ दोष दिसत असल्यामुळे

कर्मासी वर्जणें । प्रीति[1] सत्कर्माचरणें । गतीसी पाविजे ॥ ९५ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । गृहस्थाश्रम कर्म आगळा । ह्मणेमेरूअनंत ॥ ९६ ॥ इति श्री चतुर्थस्कंदे नवमोल्लासः समाप्तः ॥

---

श्रीराम समर्थ कर्मशीळ । विश्वात्मा परम कृपाळ । जगोद्धार-हेतु प्रांजळ । पवित्र दीक्षाचरण ॥ १ ॥ यजनें याजन अध्ययन । अध्यापन आणि दान । प्रतिग्रहकरण पावन । षट्कर्मे ब्राह्मणीं ॥ २ ॥ स्वयें चि यजिये तें यजनें । यजविजे तें याजनें । करावें स्वयें वेदाध्ययन अध्यापन करविजे ॥३॥ सत्पात्रीं जें देइजे । त्यातें चि दान बोलिजे । दुष्ट दान वर्जूनि घेइजे । उत्तम तो प्रतिग्रह ॥ ४ ॥ आतां आस्तिक्य-कर्मजिव्हाळा । दुर्वासनात्याग स्वलीळा । भगवत्पर अंतर्कळा । ध्यान-परायण ॥ ५ ॥ अनन्यें भावें करूनि । नित्यानित्यविचार श्रवणीं । हृदयशुद्धीनें मननीं । चित्तशोध कीजे ॥ ६ ॥ दुर्वासनात्याग शम । इंद्रियनिग्रह तो चि दम । स्वधर्माचरण परम । तप तें चि जाणिजे ॥ ७ ॥ षड्रिपूसीं अलिप्तपण । हें चि शुचित्व गहन । सुखदुःखीं सम-समान । उत्तम क्षमा बोलिजे ॥ ८ ॥ कोणातें निष्ठुर न करी । न धरी द्वेष ना अनादरी । परमात्मा जगदांतरीं । निश्चयेंसीं भजे ॥ ९ ॥ नैराश्य सकळा आर्जवी । गौरवीतां कंटाळे जीवीं । सहिष्णुता बरवी । दीक्षा आस्तिक्याची ॥ १० ॥ निष्कारणता प्रीति । कायाक्लेश दृढ शक्ति । सर्वस्वें वेंचे परि चित्तीं । कुंज असे चि ना ॥ ११ ॥ आस्ता नाहीं त्रैलोक्याची । निस्पृहता हे मुळींची । उदरपूर्ति भिक्षेची । प्रतिष्ठा-पूर्व ॥ १२ ॥ विषयव्यसनीं न पडे । नैराश्यबोधें जगीं रूढे । पावन देशीं पर्वाडे । विमळ दीक्षा ॥ १३ ॥ नैराश्यशिखरीं वसे । भक्तीचा

---

१ प्रीतीनें. २ पहा मनुस्मृति १०/७५. अध्यापनमध्ययनं यजनं याजनं तथा । दानं प्रतिग्रहश्चैव षट्कर्माण्यग्रजन्मनः ॥ ३ यज्ञ करणें. ४ यज्ञ करविणें. ५ पर्वा- ६ प्रवेश करी.

देश विचरतसे । परम पवित्र मानसें । ज्ञानाध्यक्ष तो ॥ १४ ॥ श्रुतिशास्त्रअभिज्ञता । ज्ञान प्रांजळ श्रोता वक्ता । विज्ञानानुभव तत्वता । आस्तिक्य कर्मे ॥ १५ ॥

श्लोकः– शमो दमस्तपः शौचं । क्षांतिरार्जवमेव च ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं । ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ १ ॥

या विंशती कर्मी ग्रहस्थ । संसारी च होय कृतार्थ । आतां ऐका वानप्रस्थ । तृतियाश्रम तो ॥ १६ ॥ अभिनव विरक्ती जयासी । विटला मनापासुनी विषयांसी । येक शय्या वर्जिलें स्त्रियेसी । कठीण तपें आचरे ॥ १७ ॥ वसउनीया माहावन । नित्य करी अनुष्ठान । देहलोभ क्षोभ टाकुन । भगवंतीं विनटे ॥ १८ ॥ वृक्षाचीं गळित पक्क फळें । शुष्कविस्तार वल्लीमुळें । भक्षुनी सुशीतळ जळें । क्षुधा परिहारी ॥१९॥ वृक्षाचें पल्लव परिधान । कीजे पाषाणावरी शयन । केवळ मुसळवत् स्नान । सर्वांग धारण मृत्तिका ॥ २० ॥ उष्णकाळीं पंचाग्नीतपनें । शीतकाळीं जळवास पूर्ण । पर्जन्यकाळीं माळा करून । तपश्चर्या किजे ॥२१॥ उर्ष्ण वेष्टण । शीत परिधान । क्षुधातृष्णासंपूर्ण । सहवासें ॥ २२ ॥ सोडुनि देह वासनारूप । तपिजे तप निर्विकल्प । तपारूढ हा संकल्प । आतळों चि नये ॥२३॥ भगवद्भक्तीनें अतिविरक्त । शांतिसद्बुद्धीनें कृतार्थ । व्हावयासि जीवन्मुक्त । संन्यास घ्यावा ॥ २४ ॥ ईश्वरकृपा जयासी । अद्वैत वासना होय त्यासी । अवधूतें गोरक्षासी । निरोपिलें वाक्यहें ॥ २५ ॥

श्लोकः— ईश्वरानुग्रहादेव पुंसामद्वैत वासना ।
महाभयपरित्राणं द्विप्राणामुपजायते ॥ १ ॥

सहस्र शूरांत दोनि तीनि । मिळती असिलुता मिळणीं । तेवि मुमुक्षु कोटी मधुनी । स्वरूपमिळणीं मिळती ॥ २६ ॥ वानप्रस्थें स्त्रियेसी विचारून । सुखें कीजे संन्यासग्रहण । करपात्रीं क्षुद्बाधा-

१ भगवद्गीता १८/४२. २ या ओवींत एक चरण कमी असावा असें वाटतें. इतर ओव्यांच्या प्रमाणानें ही फार लहान दिसते. ३ भुकेचें निवारण.

शमन । करिजे प्रणवाचा जप ॥ २७ ॥ सहस्रप्रणव आत्मानुसंधान । महावाक्यविवरण । समाधिसुख उन्मन । यति निर्विकार तो ॥२८॥ सहजस्वरूपधारण । सहजस्थितीज्ञानसंपन्न । सहजवस्तुसंभावन । निर्विकल्प संन्यास ॥ २९ ॥ हे स्थिती नाहीं जयासी । कीजे वेदांतश्रवण नेमेंसी । चरमावस्था निश्चयेंसी । नित्यस्वरूपलक्षणें ॥३०॥

> श्लोकः– ब्रह्मैवाहं न संसारी मुक्तोऽहमिति भावयेत् ।
> अशक्नुवन् भावयितुं वाक्यमेतत्सदाभ्यसेत् ॥ १ ॥

आचार्योक्त वेदांतसार । पाहावें शंकर भाष्य अपार । दृढ कीजे अंतरीं निर्धार । निजध्यासबळें ॥ ३१ ॥ ते संन्यासविधि प्रांजळ । कुटीर भिक्षु केवळ । हंस परमहंस निवळ । च्यारी आश्रम ॥ ३२ ॥ गौतमभारद्वाजादि ऋषि । ग्रामीं अष्ट गृहें भिक्षेषी । सेवुनें ब्रह्मभावनेसी । दृढ कीजे कुटीरें ॥ ३३ ॥ त्रिदंड कमंडळ पात्रीं । भिक्षु तो कापायवस्त्री । ब्रह्मरूपी वास क्षेत्रीं । भिक्षान्न पंचगृहीं ॥ ३४ ॥ ब्रह्मैक्य मन उन्मन । स्वरूपदशा निरंजन । सोहंभावना निर्वाण । भिक्षूसी बोलिजे ॥ ३५ ॥ हंस कापायवस्त्रधारी । त्रिदंडकमंडलधारी । ग्रामैकरात्री तो नगरीं । वसे पंचरात्री ॥३६॥ तीर्थी सप्तरात्रि प्रमाण । स्वरूपांबरीं विहरे पूर्ण । सोहंभावना गहन । हंस संन्यास तो ॥ ३७ ॥ नित्य चांद्रायण

---

१ मी ब्रह्म आहें, संसारी नाहीं, मी मुक्त आहें, बद्ध नाहीं अशी भावना ठेवावी. अशी भावना न च होईल तर निदान असें तोंडानें तरी नित्य ह्मणावें. २ सदानन्द स्वामींचा हा एक वेदान्तशास्त्राचीं मूलतत्वें सांगणारा लहानसा ग्रंथ आहे. ३ श्री व्यासांनीं रचिलेल्या वेदांत सूत्रांवरील *श्रीमच्छंकराचार्यांचें* भाष्य. ४ कुटुंबासह रहाणारा त्रिदंडी संन्यासी; कुटीचक किंवा कुटीचर असें पाहिजे. भिक्षूंचे चार प्रकार महाभारतांत असे दिले आहेत. " चतुर्विधा भिक्षवस्ते कुटीचक बहूदकौ ॥ हंसःपरमहंसश्च यो यः पश्चात् स उत्तमः ॥ " ५ लहान गावांत एक रात्र. ६ *महिनाभर करावयाचें एक व्रत. त्याचा विधि पौर्णिमेस पंधरा घांस खाणें*, नंतर प्रति दिवशीं एक कमी करणें व शुक्लपक्षांत पुनः एक एक वाढवून पौर्णिमेला १५ करणें. यांत घांसांची संख्या चंद्राच्या कलांप्रमाणें कमी अधिक होते, ह्मणून त्यास चांद्रायण ह्मणतात.

 

आचरे । नित्य तृप्तीनें विचरे । नित्य परमानंदभरें । हंस राहे सर्वदा ॥ ३८ ॥ परमहंस दिगंबर । वृक्षैकमूळीं निर्विकार । वसे शून्यागारीं तत्पर । अथवा स्मशानीं ॥ ३९ ॥ भेदाभेद गळित पूर्ण । पापपुण्यतनु विशीर्ण । मोहमायाचित्तसंकीर्ण । नष्टसंदेहवृत्ती ॥ ४० ॥ शब्दातीत निस्त्रैगुण । प्राप्ति तत्वार्थ गहन । निस्त्रैगुण्यविचरण । परमहंस तो ॥ ४१ ॥ जो निर्भर परमशुद्ध । जो सस्वरूप स्वतःसिद्ध । जयाशीं वोध ना अबोध । परमहंस तो ॥ ४२ ॥ जो स्वतःसिद्ध परब्रह्म । नसे विधि निषेध धर्माधर्म । नाहीं कर्माकर्म स्वधर्म । स्वरूपावबोधें ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ भेदाभेदौ सपदि गलितौ पुण्यपापे विशीर्णे ।
मायामोहौ क्षयमधिगतौ नष्टसंदेहवृत्तिः ।
शब्दातीतं त्रिगुणरहितं प्राप्य तत्वार्थबोधं ।
निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥१॥

एवं संक्षेपें संन्यासधर्म । स्वरूपविश्रांतीनें परम । पूर्वानुक्रमें च्यान्ही आश्रम । बोलिले ब्रह्मवर्णीं ॥ ४४ ॥ स्वरूपअनुभव स्वयें । हा चि मुख्य संन्यास होय । आत्मानुभवेंवीण पाहें । कायाविटंबना ॥ ४५ ॥ पुढें शूद्रादि वर्णत्रय । निरोपिजेल यथान्वयें । नित्यावधानें स्वयें । अवधारिजे श्रोतीं ॥ ४६ ॥ श्रवणाचें नित्य मनन । ह्मणावें तें सार श्रवण । मननें निजध्यास पूर्ण । नित्य साक्षात्कार ॥ ४७ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । आश्रमधर्म संन्यासलीला । ह्मणे मेरुअनंत ॥ ४८ ॥ इति श्री चतुर्थरुद्रे दशमोल्लासः संपूर्ण ।

---

श्रीराम समर्थ क्षेत्री स्वयें । क्षेत्रज्ञ द्रष्टा निरामय । देवब्राह्मणसमुदाय । प्रतिष्ठाकर्ता ॥ १ ॥ पाळी वसुमती स्वधर्में । दयासंपन्न सत्कर्मे । विज्ञानवोधक सुवर्में । विश्वोद्धरी[1] ॥ २ ॥ सत्कर्में प्रजापाळण । स्वधर्में लोकसंग्रहण । कृतोपकारें संपूर्ण । सृष्टि भरली ॥ ३ ॥ नित्य

१ विश्व+उद्धरी.

अनुष्टाता सुशीळ । आत्मपरायण दयाशीळ । परम सुंदर सोज्वळ । पवित्र दीक्षा देतसे ॥ ४ ॥ नित्यवर्चसें प्रभाकर । पवित्रपणें वैश्वानर । कृपाहृदय अमृतकर । स्वानंदसिंधु ॥ ५ ॥ रिपुनिवर्तक अंतकरूपी । विजयप्रताप स्वरूपी । येकवचनी सत्यसंकल्पी । सप्तमावतार ॥ ६ ॥ क्षेत्रीयवंशविवर्धन । संरक्षी वर्णत्रय पूर्ण । अवतार वंशविभूषण । राजा पवित्रीचा ॥ ७ ॥ शौर्ये शस्त्रास्त्रीं निपुण । रिपुसंहरणीं विराजमान । अद्भुत रोपतेजें सुभान । उदेला सूर्यीसी ॥ ८ ॥ चपळगती प्रभंजन मूर्तिमंत रणनिर्वाण । वीर राघवविभूषण । कार्मुकपाणी ॥ ९ ॥ वीज कडाडी अंबरीं । तेवि सिंहनादें भरे समरीं । स्फुराणें उसळे नभांतरीं । महाबाहो वीरोत्तम ॥ १० ॥ अतुर्बळें बळीवंत । अहंकारादि राक्षस जिंतिले । परि अजितशत्रु विख्यात । क्षत्रियचूडामणी ॥ ११ ॥ रणरंगीं वज्रठाणें । मुक्ति देत शत्रु कारणें । दानोदकें त्रिभुवनें । संपूर्ण केलीं ॥ १२ ॥ धैर्ये रणीं अचळ जैसा । प्राणांतीं पलायन नसे मानसा । शत्रुनिवर्तक रामा ऐसा । नाहीं क्षेत्री परम ॥ १३ ॥ परसेनो गजथाटें । विभांडीतें कंठीरवें उठे । कां शार्दूलरूपी लोटे । शत्रूभंजामंडळीं ॥ १४ ॥ हरिणावरी उठावें चित्तौं । तेवि विभांडीत रिपुचळैंथा । रणश्रियेनें विजयार्था । विभूषित जो ॥ १५ ॥ शाहबाजें पक्षियावरी । झेपावला जाय अंबरीं । तैसा शत्रूचिया समभारीं । लोटे निजांगबळें ॥ १६ ॥ शौर्यतेजें माहा विक्रम । क्षेत्रीराज स्वधर्म । भगवद्गीतेसि पुरुषोत्तम । बोलिला कपीध्वजेसी ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युध्ये चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ १ ॥

शत्रुपराभवें चिरंजीवी । विजयलक्ष्मी ज्यामें उपजवी । कां धारा-

१. सूर्य. २ अग्नि. ३ चंद्र. ४ यम. ५ श्रीरामचंद्र. ६ वायु. ७ चापपाणि. ८ जिंकलेले. ९ परसेना, शत्रुसैन्य. १० युद्ध करीत ११ सिंह. १२ मेंढ्यांच्या कळपांत. १३ चित्त्यानें. १४ शत्रुसमूह( ? ). १५ ससाण्यासारखा एक शिकारी पक्षी. १६ अर्जुनाला. १७ भ. गी.

तीर्थी अनुभवी । परतत्व स्वयें ॥ १८ ॥ मोक्षीं स्वर्गांगना भोगी । क्षेत्रीं-विभूषणयोगी । कृतार्थ दीक्षीनें जगीं । अवतरला श्रीराम ॥ १९ ॥ काया क्षणविध्वंसिनी । ज्याची दिक्षा चि बोधी जनीं । काय चिंता मरतां रणीं । इहपरमार्थ लाभे ॥ २० ॥

॥ श्लोक ॥ जिते च लभ्यते लक्ष्मीर्मृते चापि सुरांगना ।
क्षणविध्वंसिनी काया का चिंता मरणे रणे ॥ १ ॥

ऐसा क्षत्रियाचा स्वधर्म । ऐकीजे राजधर्म उत्तम । विश्वीं दृष्टांतासी परम । रामराज्य बोलिजे ॥ २१ ॥ न प्रवर्ते अन्याय जनीं । वेदरूप शासनवचनीं । तपाढ्य प्रजा सन्मानी । दैनिक सफळ ॥ २२ ॥ अतिवृष्टि अनावृष्टि नसे । मेघ काळावसरें वरुषतसे । सदा कृतरूप फळतसे । वनस्पतीजात ॥ २३ ॥ रसाळ सस्यवती जगती । अपाडें पड्स पिकती । धन धान्य सपत्ती । रत्नें संभवती अनर्घ्य ॥ २४ ॥ वृक्ष कल्पतरूच्या पाडें । फळती रानींचीं निखरें झाडें । अमृतसम सुरवाडें । सरिता पुष्करिणी वाहती ॥ २५ ॥ कामधेनुसम क्षीरें । दुभती गाईंचीं खिल्लारें । हिरे परीस वसती विस्तारें । मुक्ताफळें संभवती ॥ २६ ॥ आपुलाल्या कार्यमार्गीं । व्यवसायें प्रवर्तती जगीं । सावधान ते ते प्रसंगीं । असती मंत्री सेवक ॥ २७ ॥ सेनापती निजनिधडे । माहाझुझार वीर रोकडे । सेना अतुर्बळी निवाडे । माहाविख्यात ॥ २८ ॥ अष्टांगपुष्ट भद्रजाती । अश्वोत्तम पवनगती । रथ सोज्वळ सुवर्णस्थिती । रत्नमयनिर्मित ॥ २९ ॥ नाना संग्रह वस्तुजात । सभाग्य प्रजा देश समस्त । देशोदेशीचे विख्यात । सभाग्य नृपती ॥ ३० ॥ वाहनें निर्मळ मणिमय । निविध संपदा येक हृदय । सर्वत्र येक जिव स्वयें । नृपवर्धन तो ॥ ३१ ॥ सहोदर सखे परिवार । येक जिव्हाळा जगदातर । नाना उपवनें वि-

---

१ आत्मस्वरूप. २ योग्यकाळीं. ३ धान्यानीं युक्त. ४ विपुलतेनें, उपमा देतां येत नाहीं अशा रीतीनें. ५ वांझी, नापीक. ६ महा बलवान्.

स्तार । देवालयें रमणीयें ॥ ३२ ॥ सुमनवनें आम्रवनें । नाना विश्रांतीचीं स्थानें । ठाईं ठाईं अग्रसंतर्पणें । राजाज्ञा प्रबळ ॥ ३३ ॥ रमणीय द्विजाचीं अग्रारें । शिवालयें निर्मिलीं चामीकरें । पुण्यश्लोकवस्ति विस्तारें । माहाप्रसिद्ध भूदेवें ॥ ३४ ॥ सकळांचें हृदय घेउनि । समग्र चित्त चि होउनी । विश्वपरिपालन मनीं । वाहे तो नृप चक्रवर्ती ॥३५॥ स्वराष्ट्रीं अन्याय वर्तों नये । शोध न करितां दोष प्रभूति ये । प्रजांचें मातृपितृस्थान स्वयें । स्वधर्में सृष्टि प्रतिपाळी ॥ ३६ ॥ अइकतां अन्याई जन । कीजे यथोक्त त्यां शासन । धर्मप्रतिष्ठाविभूषण । अधिष्ठान विष्णूचें ॥ ३७ ॥ वैश्य वाणिज्यव्यवसाय । पाळण करी प्रजाचें उपाय । कृशिवळांसि यथान्यायें । विभागें रक्षीतसे ॥ ३८ ॥ सर्वकाळ देवतार्चन । पर्वकाळ विधि विधान । माहादानें प्रौढ ब्राह्मण । प्रतिष्ठेनें पाळी ॥ ३९ ॥ गोब्राह्मणप्रतिपाळक । राजा मूर्तिमंत विवेक । कृतार्थ इहपरलोक । आचरणें केला ॥ ४० ॥ ऐसा राजधर्म विख्यात । क्षेत्री विभूषण जातिवंत । क्षेत्रीयधर्में विभूषित । लोकोत्तरीं ॥ ४१ ॥ आतां वैश्यवर्ण वर्तणुक । कवण उपजीविका परलोक । कृपि वाणिज्य निश्चयात्मक । न्यायें द्रव्य आर्जवी ॥ ४२ ॥ गोरज्यविक्रय करी । नाना व्यवसाय व्यवहारी । द्रव्याढ्य होउनी नानापरी । धर्म करी विनयें ॥ ४३ ॥ देवद्विजांचें परिपालन । सरोवरें वापी निर्मून । नाना उपवनें संतर्पण । धर्मशाळा बांधे ॥ ४४ ॥ भगवंतीं निष्ठा धरून । आदरें करी पुराणश्रवण । कृतार्थबुद्धीनें कीजे दान । निष्काम संतर्पणें ॥४५॥ अन्नछेत्रें नाना अग्रारें । निर्मुनी रमणीय मंदिरें । नदीतटाकीं मनोहरें । पाटांगणें बांधे ॥ ४६ ॥ माहातीर्थ अन्नछेत्रें घाली । भगवंताची पुजा नित्यावळी । वैश्यवृत्ति सेवा आगळी । परम पावन तेणें ॥ ४७ ॥ शूद्रवर्णउपजीविकागति । वर्णत्रयाची सेवा निश्चिती । कृषि करूनियां यथानिगुती । स्वभावें संतुष्ट

१ अग्रहारे, राजानें ब्राह्मणांना निर्वाहा साठीं दिलेली जमीन. २ सुवर्णानें. ३ ब्राह्मण. ४ कृषीवलाला, शेतकऱ्यांना. ५ मिळवी.

॥ ४८ ॥ जें जें आर्जीत सेवेनुसार । तेणें विनियोगें संसार । ब्राह्मणसेवा निरंतर । गाहा नम्रभावें ॥ ४९ ॥ येणें चि धर्में शूद्रासि गति । हरिस्मरणें पावन जगतीं । लोमं प्रतिलोमें तरती । नामें चि भवसागरीं ॥ ५० ॥ ब्राह्मणवीर्यें वर्णत्रईं । उत्पत्ति ते लोम निश्चईं । वर्णत्रय जें जन्म पाहीं । विप्रीं तो प्रतिलोम ॥ ५१ ॥ कुलघ्न वर्णत्रयसंकर । पावे नरकद्वार । नामें चि तयाचा उद्धार । होतसे निश्चयेंसीं ॥५२॥ विज्यातिवर्ण वर्णातीत । चांडाळरूपी महापतित । ते ही नामें जाले पुनीत । भगवद्भक्तिप्रौढीनें ॥ ५३ ॥ अच्युतीं निष्ठा जयासी । सर्वथा पतन नव्हे तयासी । नाहीं वर्णप्रमाण गतीसी । भगवद्भक्तिनिश्चयें ॥ ५४ ॥ श्वपच वरिष्ठ हरिभक्तीनें । एवं नामस्मरणरीतीनें । चारी वर्ण गतिकारणें । नामें योग्य केलें ॥ ५५ ॥ जो जयाचा वर्णाश्रम । तेणें तो वर्तावा स्वधर्म । अन्यवर्णाश्रमकर्म । दुखासी होय कारण ॥५६॥ कर्मसंचय अतिगहन । कर्मविपाक अति दारुण । पूर्वमीमांसा पूर्ण । पाहावी जयमुनीकृत ॥५७॥ सिद्धांतकौस्तुभ निर्णयसार । कर्म आचरावें तदनुसार । आश्रमउचित संस्कार । स्वधर्में सद्गति ॥ ५८ ॥ स्वधर्माचरणें श्रेय । परधर्में प्राप्त भय । मधुसूदनें निज हृदय । बोधिलें किरिटीप्रती ॥ ५९ ॥

श्लोकः— स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ।
श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ॥ १ ॥

एवं विश्व व्यक्तीसी आलें । तें वेदहृदय बोलिलें । आम्नीं त्रिकांड विस्तारलें । प्रमेय गहन ॥ ६० ॥ ह्मणोनी वेदहृदय अकळ । आम्नीं न चले विप्रत्तिबळ । त्रिकांड जालें पाहिजे प्रांजळ । एकान्वयें क्रमें ॥ ६१ ॥ वेदीं पूर्वपक्ष सिद्धांत । वाक्यसंगति लावणें उचित । अखंड वाक्यार्थे अन्वित । अर्थ होय तेणें ॥ ६२ ॥ या कारणें वेदहृदय । सद्गुरुकृपेनें प्रांजळ होय । कां जे त्रिकांडीचें प्रमेय ।

---

१ वें २ यांचा अर्थ पुढील ओवींत दिला आहे. ३ अढळ. ४ चांडाळ. ५ जैमिनीकृत. ६ व ७ हे ग्रंथ आहेत. ८ भ. गी. ३/३५. ९ भ. गी. ३/३५ व १८/४७. १० वेदांनीं; आम्नाय ह्म० वेद.

येक प्रचितीनि आले ॥ ६३ ॥ आत्मदर्शीविरळा होती । सद्गुरुनें देऊनी संपत्ती । विख्यात केले त्रिजगती । स्वरूपनिष्ठ ॥ ६४ ॥ त्रिगुण अन्वय कांडत्रय । निवडूनि केले निरामय । ज्ञान विज्ञान संपन्न स्वयें । निर्गुण वस्तु तत्वता ॥ ६५ ॥ श्रुति शास्त्र बहुसंमती । पाहोनि जे जे अर्थ करिती । ते ते शब्दज्ञानी होती । आत्मा दुर्लभ ॥ ६६ ॥ वेदशास्त्रींचें अक्षर । श्रवणें पाहावें निज अभ्यंतर । अर्थ होय तदनुसार । हें महानिष्ठ प्रसिद्ध ॥ ६७ ॥ सकळांसी कारण सद्गुरु । देशिककृपा भवतारु । ज्याच्या कटाक्षमात्रें चि पारु । त्रिविधा मायेचा ॥ ६८ ॥ बहुता जन्मांतरींचें सुकृत । परिपाक होऊनि शुद्धचित्तें । सद्गुरुसी शरण भावार्थें । रिघती ते कृतार्थ ॥ ६९ ॥ तेहीं च सकळ ही स्वधर्म केले । व्रतें तपें ते चि आचरले । जे सद्गुरुसी शरण रिघाले । ते परम पावन ॥ ७० ॥ योगश्रेष्ठ मुमुक्षजन । जाले गुरुकृपेनें पावन । चौथी भक्तीनें संपूर्ण । भक्त ते आर्ह जाले ॥ ७१ ॥ परमपवित्र ते गुरुभक्त । निर्विषय नित्यविरक्त । आचार्यकृपेनें निरंतर मुक्त । वर्तती पवित्र दीक्षा ॥ ७२ ॥ अक्षोभ जयाच्या आंगीं शांती । साधनचतुष्टय क्रिया स्थिती । पूर्वसंस्कारें देहीं वर्तती । स्वधर्म सन्मार्गें ॥ ७३ ॥ हें साधनचतुष्टय संपूर्ण । धरूनि पंचमरुद्राचें अनुसंधान । निरोपिलें तत्वनिरूपण । तें आवधारिजे श्रोतीं ॥ ७४ ॥

॥ श्लोक ॥ ब्रह्मादिस्थावरान्तेषु वैराग्यं विषयस्य नु ।
यथैव काकविष्टायां वैराग्यं तद्धि निर्मलम् ॥ १ ॥

वैराग्यअनुतापानळीं । करी पूर्वपापाची होळी । विरक्त तो चि अतुं- वेळी पावे परंधामासि ॥ ४७ ॥ नित्य सुसील सदाचरणें । पापसंकल्प न धरी मनें । सद्गुरुकृपास्वस्थितीनें । वसे स्वरूपांबरीं ॥ ४८ ॥ पूर्वकषायसंकल्पानें । मनक्षोभ उठे विषयानें । नित्यविरक्तज्ञानशस्त्रानें । छेदी मनोमस्तक ॥ ४९ ॥ दुराराध्यें विषय मनीं । विषयध्यासें जाय मरोनि । त्याप्रति विरक्तिसंजीवनी । देतसे गुरुदयाळ ॥ ५० ॥ महा- वैराग्य मुमुक्षाप्रति । यावें ईश्वरकृपेनें अवचिती । कैसी ते विरक्तीची स्थिती । कांहींयेक आईका ॥ ५१ ॥ विखार झोंबलियां देहीं । नावडे सुखचंदन वनिता हीं । शिरछेदासि नेतां पाहीं । काय ते विषयोपचार ॥ ५२ ॥ भेदलें मृत्यूनें जिव्हार । नावडे तयासि कांहीं संस्कार । तेविं विरक्तांसि संसार । विश्रांति रुचेना ॥५३॥ दृढवैराग्य अभ्यंतरीं । सद्गुरु- भजनीं आस्था धरी । नामस्मरण निरंतरी । रक्षी अनुसंधान ॥५४॥ हरि- कथानिरूपण । अध्यात्मचर्चा अवधान । भगवद्भजनीं संपूर्ण । प्रीति जया- सी ॥ ५५ ॥ सर्वस्वत्यागें निराभिमान । तें चि विरक्तीचें अधिष्ठान । सद्भा- वसंपत्तीनें पूर्ण । आर्जवी सद्गुरूसी ॥ ५६ ॥ गुरुभक्ति अवंचकता । जीवें सर्वस्वें आर्जवी हितार्था । प्रळय जालियां हि सर्वथा । धारिष्ट ढळेना ॥५७॥ पूर्वसुकृतें धैर्य न चळे । त्रैलोक्यनिंदेनीं धृति प्रबळे । भोगी स्वानंद- सुखसोहळे । सद्गुरुकृपेनें ॥ ५८ ॥ कल्पांतवायु सुटोनि । पृथ्वी जावो कां उडोनि । ना ते द्वादशादित्यकिरणीं । हो कां विश्व दग्ध ॥ ५९ ॥ स्वरूप अभ्यंतरींचें चळेना । तेवि विरक्तिवृत्ति सुलीना । उन्मनीची अंतर्भावना । निराश्रय नैराशवळें ॥ ६० ॥ स्वरूपावधान सगळें । सद्गुरुकृपेनें निवळलें । कृपांबर कवळलें । विस्तीर्ण गुरुकृपेचें ॥ ६१ ॥ एवं निर्वाणविरक्ति । तेणें दृढावली गुरुभक्ती । तेथें बोळगण्या जाल्या

१ महासमर्थ. २ पूर्वसंकल्पाच्या मोहामुळें, कषाय-गुंगी. ३ आत्मस्वरूप- रूपी कठीण विषय. ४ निष्कपटपणें. ५ अंतसमयीं. ६ ओवाळून टाकावयाच्या वस्तु.

मुक्ती । सर्वत्रें पाहतां ॥ ६२ ॥ मुमुक्ष विरक्तीनें अगाध । शांति वृत्ति अक्षोभ वेध । याहिवरि सद्गुरूचा बोध । अभिनव होतसे ॥ ६३ ॥ होऊनि विश्वाचें निजहृदय । सदय चिदंबरीं सुधामय । ज्ञान षोडशकळा चंद्रोदय । गुरुकृपार्णव कटाक्षेंचा ॥ ६४ ॥ मुमुक्ष हृदयांभोज विकसित । नेत्रांबुजदळें प्रेम द्रवत । स्वानंदमकरंदीं झेंपावत । अवधानमधुकर ॥६५॥ अनादि अविद्येचीं मांदुसें[1] । माजि शून्यवेष्टणें बहुवस । कृपाकारुण्यैव-सायें स्वप्रकाशें[3] । देखिला डोळां ॥ ६६ ॥ निजप्रतीतीचें ज्योतिर्लिंग स्वयंभ अनुभवें निःसंग । पूजा अपरोक्षदशा अभंग । पावले निगुती ॥ ६७ ॥ उन्मेषबिल्व अगरेंडे । सुमनें चैतन्य विरुढे । परात्पर-प्रतिष्ठाउजियेडें । ते ब्राह्मी निवळली ॥ ६८ ॥ सदोदित सन्मुख स्वयें । आपआपणासी भेटों लाहे । परतैले दृष्टीनें होय । आश्चिर्य येन्हडें ॥ ६९ ॥ तें निरूपम निरूपण । बोळला गुरु स्वानंदघन । तेणें सुरवाडें संपूर्ण । पिकली हृदयभूमि ॥ ७० ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । विरक्त निजवैभवें आगळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ७१ ॥ पंचम रुद्रे ॥ प्रथम उल्लासः संपूर्ण ॥

---

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ तपोधन । तापस परम-शांतीनें गहन । स्वरूपद्रष्टा विराजमान । ज्ञानसूर्य हृदयस्थ ॥ १ ॥ जेथें समर्थदीक्षा विराजे । तेथें विरक्ति प्रतिष्ठे सहजें । विरक्त अभ्यंतर जाणिजे । महाविरक्ताचें ॥ २ ॥ पृथ्वी[6] कर्पुराऐसी विरतारें । पळोनि जातां वैश्वानरें । तऱ्ही विरक्त अभ्यंतरें । गजबजीजेना ॥ ३ ॥ जेविं वाहाटळींत भ्रमे तृण । तेविं ब्रह्मांड उडवो कां पवन । तऱ्हीं विरक्ताचें अंतःकरण । खंति न मनी ॥ ४ ॥ आकाश तुटोनियां पडे । परि विरक्ताचें धारिष्ट न मोडे । स्वरूपशांतीनें रुढे । अधिक विरक्ति ॥५॥

---

१ पेटी. २ कृपाळु गुरूच्या उद्योगानें. ३ आत्मप्रकाश. ४ ( ? ). ५ दृष्टि मागें वळवून आत्मस्वरूपाकडे लाविल्यानें. ६ कापूर जळून गेल्यावर कांहीं च अवशिष्ट रहात नाहीं, त्या प्रमाणें पृथ्वीची स्थिति झाली तरी.

॥ श्लोक ॥ कल्पांतवायवो यान्तु यान्तु चैकत्र वार्णवाः ।
तपन्तु द्वादशादित्या नास्ति निर्मनसः क्षतिः ॥ १ ॥

एवं वैराग्य हृदई स्वयंभ । स्वरूपांबरीं द्दावला स्तंभ । विश्रांतिमंडपीं अक्षोभ । विरक्त पव्हाडला ॥ ६ ॥ हा आत्मस्थितीचा वीतराग । सस्वरूपाचा निजयोग । जैसा गगनगर्भ अभंग । तैसा चि तो ॥ ७ ॥ स्वरूपज्ञानतपोनिधी । जो ब्रह्मानंदउदधि । अभंगानुभवसिद्धि । प्रगटली अवचट ॥ ८ ॥ निजध्यास अंतरींचा । उद्घाट करी परा वाचा । नित्यानुसंधान स्वरूपाचा । साक्षात्कार ॥ ९ ॥ करोनि गगनाची चाळणी । गाळींव सुख अंतःकरणीं । स्वरूपप्राप्तिरमा सदनीं । राहिवासली सुखें ॥ १० ॥ नित्यशांति हृदया आली । विश्रांतिविलासिनी गौरविली । स्वरूपांबरदशा पाहाली । दिवसरात्रीवीण ॥ ११ ॥ अभिनव सुखाचा नित्योदय । हृदयसिंहासनीं गुरुवर्य । अनन्य प्रतीतीनें स्वयें । अळंकारला ॥ १२ ॥ जनीं वनीं सनातन । अनंत सद्गुरु विराजमान । द्दश्य त्रिपुटी संपूर्ण । अनंत जाली ॥ १३ ॥ निर्मळ निश्चळ निर्विकार । सद्गुरु अनंत अपरंपार । पाहतें पाहणें अभ्यंतर । गिळोनि ठेला ॥ १४ ॥ कैचें दिसेल त्या भवभान । नसे चि उरलें कांहीं अनुसंधान । नित्यतपें विज्ञानवन । राहिला गुरुपदीं ॥ १५ ॥ त्यासि न दिसे मृगतृष्णाजळ । देखे विश्वात्मा सुखें अखिल । स्वरूप अभ्यंतर निखिळ । ब्रह्म निर्विकारी ॥ १६ ॥ अनंत ब्रह्मांडाचे गोळ । होती जाती स्वभावें अखिळ । निराभास वस्तु अचळ । हृदया आली ॥ १७ ॥ ऐसिया निज अभ्यंतरें । अखंड वस्तूच्या विवरें । आत्मसाक्षात्कारचेंवरें । वसविलें सुखें ॥ १८ ॥ नित्यमुक्ततेच्या कळसीं । फळोसिलें निज विवेकासी । ब्रह्मप्राप्तीचें मानसीं । लागलें पिसें ॥ १९ ॥ वाचा वरळे

१ प्रळयकाळचे वायू वाहोत, अथवा सगळे महासागर (पृथ्वी बुडविण्याला) एकत्र जमोत, किंवा बारा हि सूर्य एका वेळीं तपोत, तरी विरक्त पुरुषाला त्याचें कांहीं च वाटत नाहीं. २ आकाशाचा गाभा. ३ मुक्तावस्था. ४ देव्हारा (?) ५ घट वसविले (?)

प्रज्ञा विसरे । परि तें स्वरूपीं करी चेइरें । नित्यसमाधीच्या विवरें । विवेक दढाविला ॥ २० ॥

॥ श्लोक ॥ नित्यमात्मस्वरूप हि दृश्य तद्विपरीतकम् ।
एवं यो निश्चयः सम्यग् विवेको वस्तुतः स वै ॥ १ ॥

पांचभूतअवस्था शरीरीं । गुणसाक्षकत्वें निवारी । नित्यात्मानुसंधान करी । तो[2] मी ह्या वाक्यअभ्यंतरें ॥ २१ ॥ विश्वीं विश्वात्मा विद्यमान । द्रष्टा साक्षी पुरातन । तेथें स्फुरलें अंतःकरण । कवण्याकारणे ॥२२॥ मी कवण जन्मलों कैसा । गुणभूत मनासरिसा । वृत्तित्यागें उरे अपैसा । तो मी कवण ॥ २३ ॥ प्रत्यगात्मा सर्वां निराळा । नित्यस्वरूपे नातळे जन्ममुळा । तो मी मज माझा जिव्हाळा । कां पां प्रकटे चि ना ॥ २४ ॥ रज्जूचें आस्तिक्यपण । आभासे सर्पत्वें संपूर्ण । तेवि निर्विकल्पीं अहंस्फुरण । स्फुरलें वाटे ॥२५॥ येथें रूढलों मी कर्तेपणें । हें माझें चि मायेचें करणें । मज माझे चि इछेनें । नाडिलें कैसें पाहा ॥ २६ ॥ माझें स्वरूप मज ना कळे । ऐसी माझी मार्या मज प्रबळे । क्षोभोनि[3] जन्ममरणमूळें । विस्तारलीसे ॥ २७ ॥ आपुल्या चक्षूसी नेणतां । आपण चि नखें अवचिता । खोंचोनि केलें सदुःखता । चक्षुविहीन ॥ २८ ॥ निराभिमान स्वरूपीं दुर्हेत । मी अनर्थासी मूळ समस्त । ब्रह्मीं कांहीं नसतां अद्भुत । मीपण खवळलें ॥ २९ ॥ तत्वता स्वरूपीं पाहतां । नसे कार्य ना कर्तव्यता । तेथें कर्तेपणाची अहंता । क्षोभली अक्षोभ ॥ ३० ॥ सर्वद्रष्टा परमेश्वर । स्वानुभवें सुखें निर्विकार । नेणोनि त्या ईश्वरासी संसार । वाढविला मीपणें ॥३१॥ ऋषिवर ब्रह्मादि निर्जर[4] । माझ्या उन्मेषांतील निर्धार । त्या स्वरूपासी चुकोनि थार । केली अज्ञानी मीपणें ॥३२॥ देवत्रया न कळे

१ आत्मस्वरूप हें मात्र नित्य आहे, आणि दृश्य जग त्याच्या उलट ह्मणजे अनित्य आहे, असा ठाम निश्चय होणें याला च 'सदसद्वस्तुविवेक' म्हणतात. २ 'सोऽहं' या मंत्राच्या रहस्यानें. ३ सत्व, रजस्, तमस्, या गुणाच्या रूपानें विस्तारून. ४ देव.

माझी माया । मी आत्मरूप असोनियां । धरूनि मोक्षाची इछा वांया । भेदें त्रास पावलों ॥ ३३ ॥ निजसत्य टाकूनि सर्वस्वें । शत्रु आपआपणासि जालों जीवें । जो मी स्वबोधविभवें । सेविजेत सर्वदां ॥ ३४ ॥ माझ्या उमजें सनकादिक । समजले स्वरूपीं सित्य अनेक । तो मी मीपणें होऊनि रंक । नाना यातना भोगी ॥ ३५ ॥ मी जरारहित निर्द्वंद्व । ह्मणोनि निर्जर ह्मणती मज देव । तो मी मीपणें बुध्दिमंद । होऊनि ठेलों ॥ ३६ ॥ मी अच्युत परि च्यवलों । मी अनंत परि आकळलों । मी अद्वय परि आतुडलों । द्वैतबुध्धीसी मीपणें ॥ ३७ ॥ मज अनावरासि आवरिलें । मज अतर्क्यासि तर्किलें । मज अगुणासि आणिलें । गुणबंधन मीपणें ॥ ३८ ॥ स्वानंदघन माझी दशा । त्या मज लागली हे दुराशा । संसार विपर्यैपिपासा– । माजि सांपडलों ॥ ३९ ॥ मी परब्रह्म साचार । मी श्रुतिशास्त्रांसि अगोचर । तो मी औटहातसंस्कार । धरूनि बैसलों ॥ ४० ॥ मी निर्मळ निर्विकारी । तो या देहबुध्धीच्या कोठारीं । नाना विपत्ति मातृजठरीं । पावलों व्यथा ॥ ४१ ॥ या चि प्रकारें निज विचार । मुमुक्ष विवरी वारंवार । निवळला स्वरूपीं निर्धार । विवेकबळें ॥ ४२ ॥

पिली विचारें ॥ ४७ ॥ मननयुक्त जें कां ज्ञान । तें चि विचाराचें लक्षण । विचारीं आतुडे आत्मज्ञान । ज्ञानीं विचार चि नुरे ॥ ४८ ॥ जेविं तें सुवर्णमृत्तिका । पैाकें कनककोटि दे अनेका । तेवि कैडसूनि विवेका । ज्ञाननवनीत ध्यावें ॥ ४९ ॥ जेविं सिंधुमाजी अमृत होतें । तें मथनेंवीण घेतां न ये हातें । तेविं स्वरूपज्ञान निःसंग तें । विचारेंवीण न लभे ॥ ५० ॥ जन्ही कां जाली संजीवनी । तन्ही ते शवातें जीव नाणी । तैसा विचार आत्मज्ञानी । ज्ञानेंवीण निर्फळ ॥ ५१ ॥ ज्ञान गुरुकृपा परमामृत । ज्ञान प्रभाकर सदोदित । ज्ञान स्वरूप अखंडीत । अभिन्नानुभवें ॥ ५२ ॥ अरे अरे मुमुक्षा प्रेमळा । ज्ञान तुझे हृदईचा जिव्हाळा । ज्ञानें पाहिली अमृतवेळा । ते अनुभवीं सुखें ॥५३॥ न कळतां परिस हातां चढे । तरि सुवर्णसिद्धीचें काय सांकडें । उपवनीं कल्पद्रुम आतुडे । तरि तो कां न सेवावा ॥ ५४ ॥ केवळ स्वरूपाची सुखवृत्ति । तुज आतुडली मुख्य निवृत्ती । वाचा विंत्पत्तीची प्रवृत्ती । कासयासि आतां ॥ ५५ ॥ तेणें हृदईं निवळे आकळें । तें हृदय घेउनि केवळ । प्रवळ स्वरूपावरि निवळ । सुलीन चित्तें ॥५६॥ ज्ञानअधिष्ठाननिवासी । विचार तेथिंचा मार्गदर्शी । पंथें चि तो त्या पदासी । ज्ञानेंसहित पावला ॥ ५७ ॥ निजात्मयोगें प्रतियोग्यता । विवरणाची वस्ति तत्वता । प्रभु ज्ञानघन सर्वसत्ता । विचारमंत्रियाची ॥५८॥ अंतःकरण राष्ट्र संपूर्ण । विवेकें वर्तलें वर्तमान । त्या विचाराचें अधिष्ठान । ज्ञान अपरोक्ष ॥ ५९ ॥ ज्ञानअपरोक्षविचारें । जे पावले स्वरूपथांरे । जगीं वर्तले साक्षात्कारें । ज्वाळावन्हिस्वरूप ॥ ६० ॥ जेविं अमृतामाजि गोडी । तेविं विचारीं ज्ञानप्रौढी । सूर्यबिंबीं प्रभा गाढी । तेवि ते अभेददशा ॥ ६१ ॥ ज्ञानीं प्रतिउल्लेख नसे । परि ज्ञान कारण त्यासी असे । विचारीं उल्लेखासरिसें । निवळावें ज्ञान

---

१ सुवर्णमिश्रित माती. २ उष्णता लाविल्यानें. ३ घोंवशी करून. ४ अकळ, कळण्यास कठीण असें आत्मस्वरूप. ५ अपरोक्ष (साक्षात्काररूपी) ज्ञानाच्या योगानें. ६ आत्मस्वरूपरूपीस्थिर जाग्यावर.

॥ ६२ ॥ जे जे संस्कार मनीं । ते ते विचारें विवंचूनि । लावावे अज्ञानुसंधानीं । साधनबळें ॥ ६३ ॥ तम निरसूनि तात्काळें । प्रकाशमंत उदयाचळें । भोगिजेत प्रभा तेथ मंडळ । कायसें अघटित ॥ ६४ ॥ स्वरूपदशा स्वरूपासि । काय वेगळिक अनुभवासि । अमृतसिंधुचे चवीसि । घेईजे काय पियूष तें ॥६५॥ वन्हीचा प्रकाशउमाळा । काय लक्षूनि पाहे तो डोळा । तेविं अपरोक्षज्ञानजिन्हाळा । राहिला निःशब्द ॥ ६६ ॥ ज्ञान स्वयंभ प्रभाकर । प्रकाशी गुणात्मक संसार । विचारचक्षूनें वारंवार । विवंचूनि वर्तावें ॥ ६७ ॥ दुस्तरीं न घालितां उडी । मार्गें पाविजे पदप्रौढी । विचारसाधनाची रूढी । परमार्थासि साह्य ॥ ६८ ॥ वैराग्य तें साधन प्रथम । द्वितीय साधन विवेक परम । हे दोन्ही नयन निरुपम । स्वबोधतनूसि ॥ ६९ ॥ चक्षु जालियां प्रांजळें । पदार्थ दिसती केवळ । परि हातपायेंवीण सकळ । अप्राप्ती ठाके ॥ ७० ॥ तेवि पुढें तृतीय साधन । शमादिषट्कनिरूपण । श्रोतीं देऊनियां अवधान । अवधारिजे ॥ ७१ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिन्हाळा । विचारअंतर्भाव निवळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ७२ ॥ पंचम रुद्रे । द्वितीय उल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ निजयोगी । योगसृष्टीचा सूर्य जगीं । प्रगटला पूर्ण वीतरागी । सिध्द सुमार्गी लाविले ॥ १ ॥ श्रीरामाचें आचरितें । पावन केलें सृष्टीतें । हरूनि विपत्ति दुरितें । सुकृतें सुखें विस्तारिलीं ॥ २ ॥ श्रीरामाचें नामस्मरण । करितां पात्रे निवृत्ति संपूर्ण । जेविं तृणराशि हुताशन । जाळूनि भस्म करी ॥ ३ ॥ जैसें जान्हवीचें जळ । सेवितां निवारी पापमळ । विचारसंपन्न सुसीळ । रामभक्त विभवें ॥ ४ ॥ गगनगर्भ जेवि निर्मळ । न धरी संस्कार पापमळ । तेविं हृदय जयाचें सोज्वळ । जेविं मंडळ भानूचें ॥ ५ ॥ प्रत्यक्ष

---

१ आत्मज्ञानरूपी शरीराचें. २ स्वच्छ. ३ प्राप्त होत नाहींत. ४ आचरणानें. ५ अग्नि.

आत्मसाक्षात्कारें । प्रगट होइजे रामावतारें । स्वबोधरूप निर्धारें । स्वानंद सुसावलों ॥ ६ ॥ ब्रह्मात्मऐक्य रामरूप । स्वानुभव शंकराचा जप । कीं तें स्वसुखाचें तप । प्रत्यक्ष जाहलें ॥ ७ ॥ राम विवेकनिधी स्वयें । राम स्वरूपाचा निजप्रत्यय । राम योगेश्वराचें हृदय । जालें मूर्तिमंत ॥८॥ जेहीं ब्रह्मानंद अनुभविजे । तेहीं श्रीरामासि आठविजे । पुराणीं स्तविलें ध्यायिजे । रूप निरुपम डोळां ॥ ९ ॥ जागृतीचा निजध्यास । स्वप्नीं ठसावे रूपैस । तेथि तो चिद्विलास । प्रत्यक्ष होय भक्तां ॥ १० ॥ राजीवाक्ष सुनीळतनु । रूपावरूनि कुर्वंडिजे कोटि भानु । लावण्यासि विभूषण वानूं । सकेळ कोण तया ॥ ११ ॥ हे मनोहर राममूर्ति । अखंड वैसली ज्याचे चित्तीं । त्याच तयाचे पायींकें होती । चतुर्विध पुरुषार्थ ॥ १२ ॥ रामस्मरणें दृढ विरक्ति । रामध्यानें प्रबळ भक्ति । रामविवरणें नित्यमुक्ति । पावती भक्त अनयासें ॥ १३ ॥ हा चि जाणोनि निजविचार । गुरुमुखें चहुंदेहांचा विवर । घेऊनि श्रवणाचें अभ्यंतर । भिन्नपणें नुरिजे ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ नित्यमात्मस्वरूपं हि दृश्यं तद्विपरीतकम् ।
एवं यो निश्चयः सम्यग् विवेको वस्तुनः स वै ॥ १ ॥

निरोपिलें विवेकलक्षण । आतां शमादि षट्क जाण । शम दम तितिक्षा समाधान । उपरति श्रद्धा ॥ १५ ॥ सत्वरछा आत्मानुसंधानीं । उन्मेषें उपजों नेदी मनीं । तैसा जपसीळ अनुष्ठानीं । निद्रा परिहरी ॥ १६ ॥ ध्यानीं राखे सर्वदां चित्त । अखंड अनुसंधानीं अद्वैत । स्वरूपांबरीं विसांवत । सुलीन चित्तें ॥ १७ ॥ शब्द गगनीं निर्माण होय । तैसा चि तेथें लया जाय । दीप हारपला नाना उपायें । हातासि न चढे ॥ १८ ॥ तैसें विरक्ताचें अंतःकरण । परतोनि स्वरूपीं जालें लीन । मागुती व्हावयासि उत्पन्न । कांहीं कारण असेना ॥ १९ ॥ गगनीं सतत पर्जन्य वर्षे । परि तें न भिजे तया लेशें । मँ तें अंकुरलें ऐसें ।

१ जोमास आला. २ आत्मसाक्षात्कार. ३ ज्यांनी. ४ हुबेहुब. ५ सेवक. ६ वासनांचा विस्तार. ७ मग.

॥ ६२ ॥ जे जे संस्कार मनीं । ते ते विचारें विवंचूनि । लावावे ब्रह्मानुसंधानीं । साधनबळें ॥ ६३ ॥ तम निरसूनि तात्काळें । प्रकाशमंत उदयाचळें । भोगिजेत प्रभा तेथ मंडळ । कायसें अघटित ॥ ६४ ॥ स्वरूपदशा स्वरूपासि । काय वेगळिक अनुभवासि । अमृतसिंधुचे चवीसि । घेईजे काय पियूष तें ॥६५॥ वन्हीचा प्रकाशउमाळा । काय लक्षूनि पाहे तो डोळा । तेवि अपरोक्षज्ञानजिव्हाळा । राहिला निःशब्द ॥ ६६ ॥ ज्ञान स्वयंभ प्रभाकर । प्रकाशी गुणात्मक संसार। विचारचक्षूनें वारंवार । विवंचूनि वर्तावें ॥ ६७ ॥ दुस्तरीं न घालितां उडी । मार्गे पाविजे पदप्रौढी । विचारसाधनाची रूढी । परमार्थासि साह्य ॥ ६८ ॥ वैराग्य तें साधन प्रथम । द्वितीय साधन विवेक परम । हे दोन्ही नयन निरुपम । स्वबोधतनूसि ॥ ६९ ॥ चक्षु जालियां प्रांजळें । पदार्थ दिसती केवळ । परि हातपायेंवीण सकळ । अप्राप्ती ठाके ॥ ७० ॥ तेवि पुढें तृतीय साधन । शमादिषट्कानिरूपण । श्रोतीं देऊनियां अवधान । अवधारिजे ॥ ७१ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । विचारअंतर्भाव निवळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ७२ ॥ पंचम रुद्रे । द्वितीय उल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ निजयोगी । योगसृष्टीचा सूर्य जगीं । प्रगटला पूर्ण वीतरागी । सिद्ध सुमार्गी लाविले ॥ १ ॥ श्रीरामाचें आचरितें । पावन केलें सृष्टीतें । हरूनि विपत्ति दुरितें । सुकृतें सुखें विस्तारिलीं ॥ २ ॥ श्रीरामाचें नामस्मरण । करितां पावे निवृत्ति संपूर्ण । जेविं तृणराशि हुताशन । जाळूनि भस्म करी ॥ ३ ॥ जैसें जान्हवीचें जळ । सेवितां निवारी पापमळ । विचारसंपन्न सुसीळ । रामभक्त विभवें ॥ ४ ॥ गगनगर्भ जेवि निर्मळ । न धरी संस्कार पापमळ । तेवि हृदय जयाचें सोज्वळ । जेविं मंडळ भानूचें ॥ ५ ॥ प्रत्यक्ष

---

१ आत्मज्ञानरूपी शरीराचें. २ स्वच्छ. ३ प्राप्त होत नाहींत. ४ आचरणानें. ५ अग्नि.

आत्मसाक्षात्कारें । प्रगट होइजे रामावतारें । स्वबोधरूप निर्धारें । स्वानंद मुसावलों ॥ ६ ॥ ब्रह्मात्मऐक्य रामरूप । स्वानुभव शंकराचा जप । कीं तें स्वसुखाचें तप । प्रत्यक्ष जाहलें ॥ ७ ॥ राम विवेकनिधी स्वयें । राम स्वरूपाचा निजप्रत्यय । राम योगेश्वराचें हृदय । जालें मूर्तिमंत ॥ ८ ॥ जेंहीं ब्रह्मानंद अनुभविजे । तेंहीं श्रीरामासि आठविजे । पुराणीं स्तविलें ध्यायिजे । रूप निरुपम डोळां ॥ ९ ॥ जागृतीचा निजध्यास । स्वप्नीं ठसावे रूपस । तेथिं तो चिद्विलास । प्रत्यक्ष होय भक्तां ॥ १० ॥ राजीवाक्ष सुनीळतनु । रूपावरूनि कुर्वंडिजे कोटि भानु । लावण्यासि विभूषण यानूं । संकेत कोण तया ॥ ११ ॥ हे मनोहर राममूर्ति । अखंड बैसली ज्याचे चित्तीं । साच तयाचे पायीकें होती । चतुर्विध पुरुषार्थ ॥ १२ ॥ रामस्मरणें दृढ विरक्ति । रामध्यानें प्रवळ भक्ति । रामविवरणें नित्यमुक्ति । पावती भक्त अनयासें ॥ १३ ॥ हा चि जाणोनि निजविचार । गुरुमुखें षड्वेदेहांचा विवर । घेऊनि श्रवणाचें अभ्यंतर । भिन्नपणें नुरिजे ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ नित्यमात्मस्वरूपं हि दृश्य तद्विपरीतकम्
एवं यो निश्चयः सम्यग् विवेको वस्तुनः स वै ॥ १ ॥

निरोपिलें विवेकलक्षण । आतां शमादि षट्क जाण । शम दम तितिक्षा समाधान । उपरति श्रद्धा ॥ १५ ॥ सत्वस्छा आत्मानुसंधानीं । उन्मेषें उपजों नेदी मनीं । तैसा जपसीळ अनुष्ठानीं । निद्रा परिहरी ॥ १६ ॥ ध्यानीं राखे सर्वदां चित्त । अखंड अनुसंधानीं अद्वैत । स्वरूपांबरीं विसांवत । सुलीन चित्तें ॥ १७ ॥ शब्द गगनीं निर्माण होय । तैसा चि तेथें लया जाय । दीप हारपला नाना उपायें । हातासि न चढे ॥ १८ ॥ तैसें विरक्तांचें अंतःकरण । परतोनि स्वरूपीं जालें लीन । मागुती व्हावयासि उत्पन्न । कांहीं कारण असेना ॥ १९ ॥ गगनीं सतत पर्जन्य वर्षे । परि तें न भिजे तया लेशें । मां तें अंकुरलें ऐसें ।

---

१ जोमास आला. २ आत्मसाक्षात्कार. ३ ज्यांनीं. ४ हुबेहुब. ५ सेवक. ६ वासनांचा विस्तार. ७ मग.

॥ ६२ ॥ जे जे संस्कार मनीं । ते ते विचारें विवंचूनि । त्यागावे ब्रह्मानुसंधानीं । साधनबळें ॥ ६३ ॥ तम निरसूनि तात्काळें । प्रकाशमंत उदयाचळें । भोगिजेत प्रभा तेथ मंडळ । कायसें अघटित ॥ ६४ ॥ स्वरूपदशा स्वरूपासि । काय वेगळिक अनुभवासि । अमृतसिंधुचे चवीसि । घेईजे काय पियूष तें ॥६५॥ वन्हीचा प्रकाशउमाळा । काय टक्षूनि पाहे तो डोळा । तेविं अपरोक्षज्ञानजिव्हाळा । राहिला निःशब्द ॥ ६६ ॥ ज्ञान स्वयंभ प्रभाकर । प्रकाशी गुणात्मक संसार । विचारचक्षूनें वारंवार । विवंचूनि वर्तावें ॥ ६७ ॥ दुस्तरीं न घालितां उडी । मार्गें पाविजे पदप्रौढी । विचारसाधनाची रूढी । परमार्थासि साह्य ॥ ६८ ॥ वैराग्य तें साधन प्रथम । द्वितीय साधन विवेक परम । हे दोन्ही नयन निरुपम । स्वबोधतनूसि ॥ ६९ ॥ चक्षु जालियां प्रांजळें । पदार्थ दिसती केवळ । परि हातपायेंवीण सकळ । अप्राप्ती ठाके ॥ ७० ॥ तेवि पुढें तृतीय साधन । शमादिपट्कानिरूपण । श्रोतीं देऊनियां अवधान । अवधारिजे ॥ ७१ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । विचारअंतर्भाव निवळा । ह्मणे मेरु-अनंत ॥ ७२ ॥ पंचम रुद्रे । द्वितीय उल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ निजयोगी । योगसृष्टीचा सूर्य जगीं । प्रगटला पूर्ण वीतरागी । सित्य सुमार्गी लाविले ॥ १ ॥ श्रीरामाचें आचरितें । पावन केलें सृष्टीतें । हरूनि विपत्ति दुरितें । सुकृतें सुखें विस्तारिलीं ॥ २ ॥ श्रीरामाचें नामस्मरण । करितां पावे निवृत्ति संपूर्ण । जेविं तृणराशि हुताशन । जाळूनि भस्म करी ॥ ३ ॥ जैसें जान्हवीचें जळ । सेवितां निवारी पापमळ । विचारसंपन्न सुसीळ । रामभक्त विभवें ॥ ४ ॥ गगनगर्भ जेवि निर्मळ । न धरी संस्कार पापमळ । तेविं हृदय जयाचें सोज्वळ । जेविं मंडळ भानूचें ॥ ५ ॥ प्रत्यक्ष

---

१ आत्मज्ञानरूपी शरीराचें. २ स्वच्छ. ३ प्राप्त होत नाहींत. ४ आचरणानें. ५ अग्नि.

आत्मसाक्षात्कारें। प्रगट होइजे रामावतारें। स्वबोधरूप निर्धारें। स्वानंद मुसावलों॥ ६॥ ब्रह्मात्मऐक्य रामरूप। स्वानुभव शंकराचा जप। कीं तें स्वसुखाचें तप। प्रत्यक्ष जाहलें॥ ७॥ राम विवेकनिधी स्वयें। राम स्वरूपाचा निजप्रत्यय। राम योगेश्वराचें हृदय। जालें मूर्तिमंत॥ ८॥ जेहीं ब्रह्मानंद अनुभविजे। तेहीं श्रीरामासि आठविजे। पुराणीं स्तविलें ध्यागिजे। रूप निरुपम डोळां॥ ९॥ जागृतीचा निजध्यास। स्वप्नीं ठसावे रूपस। तेविं तो चिद्विलास। प्रत्यक्ष होय भक्तां॥ १०॥ राजीवाक्ष सुनीळतनु। रूपावरूनि कुर्वंडिजे कोटि भानु। लावण्यासि विभूषण वानूं। सकेळ कोण तया॥ ११॥ हे मनोहर राममूर्ति। अखंड बैसली ज्याचे चित्तीं। त्याच तयाचे पाश्रीकें होती। चतुर्विध पुरुपार्थ॥ १२॥ रामस्मरणें दृढ विरक्ति। रामध्यानें प्रबळ भक्ति। रामविवरणें नित्यमुक्ति। पावती भक्त अनयासें॥ १३॥ हा चि जाणोनि निजविचार। गुरुमुखें चहुंदेहांचा विवर। घेऊनि श्रवणाचें अभ्यंतर। भिन्नपणें नुरिजे॥ १४॥

॥ श्लोक ॥ नित्यमात्मस्वरूपं हि दृश्यं तद्विपरीतकम्
एवं यो निश्चयः सम्यग् विवेको वस्तुनः स वै॥ १॥

निरोपिलें विवेकलक्षण। आतां शमादि षट्क जाण। शम दम तितिक्षा समाधान। उपरति श्रद्धा॥ १५॥ सत्वस्था आत्मानुसंधानीं। उन्मेषें उपजों नेदी गनीं। तैसा जपसीळ अनुष्ठानीं। निद्रा परिहरी॥ १६॥ ध्यानीं राखे सर्वदा चित्त। अखंड अनुसंधानीं अद्वैत। स्वरूपांवरी विसांवत। सुलीन चित्तें॥ १७॥ शब्द गगनीं निर्माण होय। तैसा चि तेथें ल्या जाय। दीप हारपला नाना उपायें। हातासि न चढे॥ १८॥ तैसें विरक्तांचें अंतःकरण। परतोनि स्वरूपीं जालें लीन। मागुती व्हावयासि उत्पन्न। कांहीं कारण असेना॥ १९॥ गगनीं सतत पर्जन्य वर्षे। परि तें न भिजे तया लेशें। भौं तें अंकुरलें ऐसें।

---

१ जोमास आला. २ आत्मसाक्षात्कार. ३ ज्यांनी. ४ हुबेहुब. ५ सेवक. ६ वासनांचा विस्तार. ७ मग.

कल्पिजे कवणें ॥ २० ॥ पर्वतशिखरपाषाणीं । विरूढेल केविं कमळणी । तैसा निर्दोष अंतःकरणीं । उन्मेष न फांके ॥ २१ ॥ धडधडीत वैश्वानरीं । कर्पूरकर्दळी जातीळ विस्तारीं । हा संकल्प चि अभ्यंतरीं । धरणें खोटें ॥ २२ ॥ जेविं तीव्र सूर्यकिरणीं । हिमेवंत तापेना अंतःकरणीं । तेविं विरक्तहृदयधरणी । न धरी प्रवृत्तिविक्षेपौं ॥ २३ ॥ कडुंवट न रिघे अमृतीं । चिदाकाश हृदयस्थितीं । विषमायामयवृत्ती । न धरी चि कांहीं ॥ २४ ॥ स्वसुखाचा उदधी पूर्ण । अक्षोभ शांतीचें जीवन । स्वरूपानुभवें गहन । नित्यतृप्त तो ॥ २५ ॥ तयासि अपेक्षा कांहीं नसे । उन्मेष त्याला केविं असे । जो आपणें चि परि नुमसे । आपुलेपणें ॥ २६ ॥ तम न धरी दीपकळिका । न सांरवे गगनाचा अवाकौ । तेविं विरक्ताची बैसका । निश्चळ स्वरूपीं ॥ २७ ॥ समानपैसें घनवटला । विज्ञानसुखें आंतुवटला । परात्परबोधें लोटला । स्वभावस्थिती ॥ २८ ॥ निजसत्वाची सत्यमूर्धनी । विसांवली तेथें उन्मनी । अपरोक्षज्ञान अनुभवोनि । विलासला अवचट ॥ २९ ॥ यापरीं प्रवृत्ति उपशम । साधनपङ्क्तीचा प्रथम शम । आतां अवधारिजे दम । जो निग्रहवृत्तीचा ॥ ३० ॥ शास्त्रदृष्टीपापभय । इंद्रियांसि निग्रही स्वयें । जेवि क्षयरोगी मृत्युभयें । कुपथ्य न करी ॥ ३१ ॥ चक्षू मनप्रकाशमेळें । स्वभावें चि रूप न्याहळें । तेथें अभिलाप उठे बळें । ते विषयवासना ॥ ३२ ॥ कामक्षोभें पूर्वसंस्कारें । इंद्रियांचेनि तो अनुसरें । नाना पदार्थी विचरे । मत्त वारण जैसा ॥ ३३ ॥ विरक्तीचेनि अंकुशें ठाईं । ठेविला साधननिग्रहीं । प्रबोधशृंखळा पायीं । गोऊनि आकर्षिला ॥ ३४ ॥ तऱ्ही तो उन्माद नावरे । विचरे विषयवनांतरें । त्यासि निगृहिजेत निर्धारें । दम यातें बोलिजे ॥ ३५ ॥ पाहातां अनावर विषधर । परि गारुडियानें केला किंकर । तेविं विरक्तानें पंचशरें । आकळिला सर्वें ॥ ३६ ॥ नाना उपायाचेनि योगें । शत्रु निर्दाळिजे प्रसंगें । तेविं

---

१ अग्नींत. २ हिमालय पर्वत. ३ चंचलपणा. ४ कडूपणा. ५ आकाश हालवितां येत नाही. (?). ६ सर्प. ७ कामवासना.

विरक्त निजअंतरंगें । कामसंकल्प वारी ॥ ३७॥ नाना औषधिप्रयोगें । व्याधि निरसिजेत वेगें । तेविं विरक्त तो निजांगें । निगृही सर्व वृत्तींसी ॥ ३८ ॥ शत्रूमाजि मुख्य मदन । जेणें ब्रह्मादिकांसि केलें दीन । कामना वनिता आधीन । जळवाहक होतो ॥ ३९ ॥ अक्षोभ कामसागरीं । बुडलीयाची कोण शुध्दी करी । कामकर्दमा माझारीं । रुतले लोळती ॥ ४० ॥ प्रदीप्तकामानळकुंडीं । पडली तापसांची मुरकुंडीं । महा थोर थोर ऋषी धेंडीं । लोळविलीं कामें ॥ ४१ ॥ प्रतिसृष्टिकर्ते ऋषेश्वर । कामें केले अति जर्जर । भिल्लीनें भुलविला शंकर । कामक्षोभें करूनियां ॥ ४२ ॥ वृंदेचिये अभिलापवशें । विष्णूसि लागलें कामपिसें । तेथें इतरांसि कोण पुसे । बुडाले रतिकर्दमीं ॥ ४३ ॥ कन्या अभिलाषी पद्मयोनी । इंद्रें भोगिली गौतमपत्नी । चंद्र गुरुस्त्री लागूनि । अपेक्षिता होय ॥ ४४ ॥ कामासि जिती ऐसा बळी । कोणी च न दिसे तिन्ही ताळीं । महाबळींयामाजि अतुर्बळी । काम ऐसा विख्यात ॥ ४५ ॥ कामपाशीं गुंतले निर्जरें । कामें सकळ केले जर्जर । ऐसें चि ह्मणावें तरि अपार । आहेति कामनिवर्तक ॥ ४६ ॥ काम रुळे जयाचे तोडरीं । महा विरक्त कामाचे वैरी । जयाचें नाम आइकतां शंबरारी । उभ्यां च प्राण सोडिला ॥ ४७ ॥ कामें केलें जयासि विकळ । त्या शिवें नेत्राग्नीनें तात्काळ । काम जाळूनि विश्वमूळ । कामांतक जाला ॥ ४८ ॥ कामवनदाहक स्वयें । भर्गनेत्रींचा पावक पाहे । मूर्तिमंत प्रगटोनि होय । अति विरक्त कपींद्र ॥ ४९ ॥ काम रुळे पदतोडरीं । परि उदासीन अंतरीं । रामभजनें लोकोत्तरीं । महा विख्यात हनुमंत ॥ ५० ॥ शुक विरक्त नृपचक्रवर्ती । कामासि सिक्षिलें विरक्तिहातीं । भीष्मदेवें पुडतपुडतीं । निर्भर्छिलें कामातें ॥ ५१ ॥ नारदें निजविरक्तिबळें । केलें कामाचें वाटोळें । नैंवसित्थीं समाधिमेळें । काम निर्मूळ

---

१ विश्वामित्र. २ जालंधर दैत्याची पत्नी. ३ ब्रह्मदेव. ४ देव. ५ कामाचा नाश करणारे. ६ पायांखालीं (?). ७ मदन. ८ शंकराच्या तृतीय नेत्रांतील. ९ मारुति. १० रवि, हरि, अंतरिक्ष इत्यादि नऊ योग्यांनीं.

फेडा॥५२॥ कपिल समाधिस्थ सदां। तेणें निर्दळिलें कामद्वंदा। दत्तात्रेय महामुनि प्रमदा-। प्रमादीं न पडे चि ॥५३॥ जे नित्यतृप्त अनुभवामृतें। ते नापेक्षिती विषयकांजीतें।[१] स्वरूपानंदसिंधूचि ते। कामज्वरें तापे चि ना ॥ ५४ ॥ स्वरूपस्वसुखाब्धीचा। उन्मेष तरंग मुळींचा। त्या लहऱ्यांतीळ विकृतीचा। विषय आभास ॥ ५५ ॥ या चि विचारें जे उमजले[२]। ते परतोनि मुळासि गेले। जैसे थिल्लेरींचे[३] रिघाले। मीन समुद्रजळीं ॥ ५६ ॥ जिहीं स्वानंदासिंधूचा तळ। घेतला येकसरें निवळ। सर्वही टाकूनि चळवळ। निश्चळ राहिले ॥ ५७ ॥ तुटे कामक्षोभलहरी। अक्षोभसुखें अभ्यंतरीं। राहिले स्वरूपांबरीं। सुनिश्चळ स्वयें ॥ ५८ ॥ आकृतीनें दिसती जनीं। पारे ते वसती निरंजनीं। स्वरूपानुभवें जनींवनीं। देखती निजअद्वैत ॥ ५९ ॥ बाह्य व्यापारीं चेष्टे शरीर। पारे निजांगें ते निर्विकार। कां बालोन्मत्त अवस्थेपर। पिशाचवत् भ्रमती ॥ ६० ॥ मृगजळें सूर्य विरे। तैं त्या बाधिजे कामज्वरें। उन्मनीपरसाक्षात्कारें[४]। असिजे जिहीं ॥ ६१ ॥ मननसीळ महामुनि। सेविती स्वसुखसंजीवनी। ते काममृत्यूचे व्यसनीं। न पडती कदां ॥ ६२ ॥ जे अजरामर शरीरीं। घायें न तुटती तिळभरी। तयासी तृणशिखा[५] काय करी। तेवि निर्विषयां काम ॥ ६३ ॥ केवळ जैसी बाळदृष्टी। दीपैंली[६] पदार्थ अनुवेष्टी। पारे अभिलाप तिया पोटीं। कांहीं च नसे ॥ ६४ ॥ सुवर्ण मुक्तरत्नें विशेष। मृत्तिकापाषाणादि अशेष। काष्ठ लोष्ट स्थाणुपुरुष। दृश्यमान समत्वें ॥ ६५ ॥ भिंतींमाजि मूषकबिळें। तैसीं अवेवांतरें[८] सकळ। निजानंदघनलीळे। स्वभावीं निमग्न ॥ ६६ ॥ कामतिमिरें न रुंधे दृष्टी। सदोदित सूर्य पाठीं पोटीं। सुखैकघन समावेष्टी। विभूषण तो ॥ ६७ ॥ प्रवृत्तीच्या उपचारें। घेतलें जीवीं विकल्पाचें सारें। स्वरूपानंदमांजिरें[९]। माजले

---

१ विषयरूप कांजीची इच्छा करीत नाहींत. २ ज्ञानी झाले. ३ आत्मस्वरूपाप्रत. ४ डबक्यांतील. ५ सहजसमाधिरूप. ६ गवताची पात. ७ (?) पाही. ८ निरनिराळे अवयव. ९ आत्मानंदाच्या मदानें.

संपूर्ण ॥ ६८ ॥ चंदनें चर्चिलें शरीर । ह्मणे पंकीळ करितां मजसी वैर । कंठीं घालितां सुमनहार । वाटती विखारापरी ॥ ६९ ॥ मी काय असे अपस्मार । काय शवरूप करिता हे उपचार । कुहिजेलें मांसमय विकार । काय गौरव ययासी ॥ ७० ॥ रंभा तिलोत्तमा उर्वशी । सेजे आलियां प्रेतें जैसीं । निर्विकार स्वरूपें मानसीं । निश्चळ दृढावला ॥ ७१ ॥ बाह्यवृत्तीचा निग्रह दम । कर्ता देहअयोध्येचा विश्राम । भवदुःखप्रवृत्ती विषम । जेणें निवर्तविली ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ सदैव वासनात्यागः शमोयमिति कीर्तितः ।
निग्रहो बाह्यवृत्तीनां दम इत्यभिधीयते ॥ १ ॥

आतां विषयत्यागवृत्ति । ते चि बोलिजे उपरति । जालियां भोजनीं तृप्ती । सरे भोजनक्रिया ॥ ७३ ॥ स्वरूपीं पाऊनि विश्रांती । सहज वोसरे प्रवृत्ति । तया नांव उपरति । यथार्थ वादें ॥ ७४ ॥ निजसायुज्य-रमणीं । नित्यानुभवविलासिनीं । चिदानंदसंवर्धनीं । नित्यानुसरें ॥ ७५ ॥ परममंगळस्वरूपीं रत । उपरमेसीं उपरमत । ते चि उपरति विख्यात । स्वानुभवदशा ॥ ७६ ॥ च्याऱ्ही पुरुषार्थ स्वयें । भोगूनि उपरम लाहे । ते हे उपरति निश्चयें । निजवेधकता ॥ ७७ ॥ जैसा विषयीं होता रतला । स्वसुखें तेथें परतला । विषयविगत उपरमला । उपरती या चि अर्थें ॥ ७८ ॥ विषयरति अमंगळ । विटला तेथूनि तो तात्काळ । मुक्त नित्यमुक्तता केवळ । उपरतीयोगें ॥ ७९ ॥ विषयासक्त विटे विषयीं । अभुक्त विषयांसि न कळे कांहीं । येथें विचारांचें चि पाहीं । प्रयोजन असे ॥ ८० ॥ अभुक्त विषय नित्य स्वरूप । त्यासी नसे विषयसंकल्प । पंचविषय माया अरूप । ते हि अप्रयोजनीक ॥ ८१ ॥ शब्दासि नसे शब्दज्ञान । अर्थासि नसे अर्थावधान । शब्दअर्थांचें रक्षिलें अनुसंधान । तें चि कारण सकळां ॥ ८२ ॥

---

१ चिखलांत माखलेलें. २ कुजलेलें. ३ संपूर्ण वासनांचा कायमचा त्याग ह्मणजे शम, आणि बाह्यवृत्तींना आवरणें ह्मणजे दम; असें ह्मणतात. ४ उपरति ह्मणजे थांबणें, कंटाळा येणें.

येथें अभिनव जालें मोठें । जयापासूनि कार्य प्रगटे । तयाचें तयासि उफराटें । गोंवी हें आश्चिर्य ॥ ८३ ॥ येकां नेणत गोंविलें । येकां जाणत अवरोधिलें । ईश्वरमायेचें वर्तलें । अघटित ऐसें ॥ ८४ ॥ अभि- नव ईश्वराची परी । अमृताचें विष करी । ना तें विष पाजूनि उपचारी । परमामृतें ॥ ८५ ॥ जगन्मूळ सांपडे जया । मोह न पडे कांहीं तया । भुक्तविषय निर्विषया । पाविजे उपरतीनें ॥ ८६ ॥ परतोनि सरिता न वाहे । तैसा विषय तो नव जाय । परंतु उपरतीनें स्वयें । जाय निवर्तविला ॥ ८७ ॥ उँप समीपें आत्मस्थिती । स्वरूपानुभव नित्य रैंती । ते चि जाणावी उपरती । सुमंगळ दशा ॥ ८८ ॥ स्वरूप उपरति केवळ । केली कांहीं येक निवळ । आतां तितिक्षाँ ते अकळ । आईका सहजस्थिती ॥ ८९ ॥ परक्षोभवृत्ती साहे । अक्षोभ शांतीचें हृदय । जो स्वरूपानंद- सिंधु स्वयें । तेथें तितिक्षा वसे ॥ ९० ॥ अखंड स्वरूपांबरीं सुलीन । न देखे जगाचे गुणागुण । जेवि पदार्थमात्रीं गगन । तेवि च अक्षो- भता ॥ ९१ ॥ अद्वैतसंपत्तीचें कारण । तितिक्षा हे असाधारण । देणें ईश्वराचें संपूर्ण । तितिक्षारूपें ॥ ९२ ॥ जेवि हिमकराचा गाभा । तापें न धरी कांहीं क्षोभा । स्वयंभ स्वरूपाची शोभा । ते हे तितिक्षा ॥ ९३ ॥ ज्ञानी विख्यात तितिक्षेनें । संत तितिक्षावंत सन्मानें । साधु शिरोरत्न शांतीनें । जो अक्षोभ असे ॥ ९४ ॥ जो धैर्याचळाचा गाभारा । कीं गगनगर्भ उभारा । तितिक्षावैरागरींचा हिरा । शोभला निजवर्चसें ॥ ९५ ॥ जो सहिष्णुतागंगेचें मूळ । जो शांतीचें उप- वन केवळ । तितिक्षाधरामंडळ । नृपाँचळचक्रवर्ती ॥ ९६ ॥ निज आस्तिक्यस्थितीनें पूर्ण । पालटेना कल्पांतीं आपण । तें हें तिति- क्षावंतांचें लक्षण । प्रसिध्द जगीं ॥ ९७ ॥ जो प्रपंचासि विटला मनीं । भरला निरंजनवनीं । तेथवरि परीक्षार्थ क्षोभोनि । प्रवर्तलीं आदिभूतें ॥ ९८ ॥ नाना देहदुःखाच्या विपत्ती । नाना दैविकी याता-

---

१ उप ह्मणजे जवळ, समीप. २ रति ह्मणजे आनंद. ३ सहनशीलपणा. ४ खाणींतील. ५ स्थिर पदार्थांचा राजा.

याती । नाना विक्षेप परोत्पत्ती । साहे तो तितिक्षोत्तंत ॥ ९९ ॥ वृश्चिकसेजेसि सुपुती । तेवि विक्षेप भवसंगाती । खदिरांगार प्रसुमंती । विहार तेवि भवयोगें ॥ १०० ॥ जेवि । अजगराची उशी । करूनि निजणें निश्चयेंसीं । तेवि सेहवास प्रपंचेसीं । सुखवांतां असेना ॥ १०१ ॥ एवं भवदुःखक्षोभरीति । विक्षेप तुठे जयाच्या चित्तीं । तेथें तितिक्षा पूर्ण स्थिती । स्वभावें चि असे ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ विषयाभिपराङ्वृत्तिः परमोपरतिर्हि सा ।
सततं सर्वदुःखानां तितिक्षा सा शुभा मता ॥ १ ॥

जालें तितिक्षेचें लक्षण । आतां श्रद्धा ते कैसी कवण । जे गुरुवेद-वाक्यीं प्रमाण । निष्ठेनें भजे ॥ ३ ॥ नानाव्यवसायीं विटे मन । निष्ठा भगवंतीं परिपूर्ण । देवार्चन विधिविधानें । मनापासूनि भजे ॥ ४ ॥ नित्यनेमा मन न विटे । भगवद्भजनीं प्रेमा लोटे । संतदर्शनीं प्रगटे । परमानंद जया ॥ ५ ॥ आवडे हरिकथाश्रवण । नित्य अध्यात्मचर्चा निरूपण । देवब्राह्मणीं निष्ठा गहन । हे चि भक्ति पैं जाणिजे ॥ ६ ॥ न देखे स्वरूपीं विभक्ती । भोगी स्वानुभवसुखभुक्ती । या नांवें जाणिजे भक्ती । श्रुत्यर्थनिश्चयें ॥ ७ ॥ आतां कैसें तें समाधान । अक्षयस्वरूपें सुख पूर्ण । चित्तैकाग्र अनुसंधान । अखंडाकारें ॥ ८ ॥ निजात्मसुखें सनातन । आत्मप्रत्ययाचें समाधान । काळत्रयीं गगन । पालट न धरी ॥ ९ ॥ स्वरूपामृतसागरीं । विरोनि गेली चित्तलहरी । स्वरूपसुखें अभ्यंतरीं । समाधान बोलिजे ॥ ११० ॥ स्वानुभव आनंद अभंग । कल्पांत जालियां नव्हे भंग । समाधानाचा अंतरंग । एवंप्रकारें ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ निगमाचार्यवाक्येषु भक्तिः श्रद्धेति विश्रुता ।
चित्तैकाग्र्य ततस्तेभ्य समाधानमितिस्मृत ॥ १ ॥

---

१ विषयसेवनाचा कटाळा येणें ह्मणजे उपरति, आणि सर्व दुःखें सहन करणें ह्मणजे तितिक्षा असें समजावें. २ भेद. ३ वेद आणि गुरु याच्या, सांगण्यावर पूर्ण विश्वास याचें नाव श्रद्धा, आणि चित्त एकाग्र करणें याला समाधि ह्मणतात. ४ ततस्सम्यक् ( ? ).

येथें अभिनव जालें मोठें । जयापासूनि कार्य प्रगटे । तयाचें तयासि उफराटें । गोंवी हें आश्चर्य ॥ ८३ ॥ येकां नेणत गोंविलें । येकां जाणत अवरोधिलें । ईश्वरमायेचें वर्तलें । अघटित ऐसें ॥ ८४ ॥ अभिनव ईश्वराची परी । अमृताचें विष करी । ना तें विष पाजूनि उपचारी । परमामृतें ॥ ८५ ॥ जगन्मूळ सांपडे जया । मोह न पडे कांहीं तया । भुक्तविषय निर्विषया । पाविजे उपरतीनें ॥८६॥ परतोनि सरिता न वाहे । तैसा विषय तो नव जाय । परंतु उपरतीनें स्वयें । जाय निवर्तविला ॥८७॥ उंप समीपें आत्मस्थिती । स्वरूपानुभव नित्य रेती । ते चि जाणावी उपरती । सुमंगळ दशा ॥ ८८ ॥ स्वरूप उपरति केवळ । केली कांहीं येक निवळ । आतां तितिक्षा ते अकळ । आईका सहजस्थिती ॥ ८९ ॥ परक्षोभवृत्ती साहे । अक्षोभ शांतीचें हृदय । जो स्वरूपानंदसिंधु स्वयें । तेथें तितिक्षा वसे ॥ ९० ॥ अखंड स्वरूपांबरीं सुलीन । न देखे जगाचे गुणागुण । जेविं पदार्थमात्रीं गगन । तेविं च अक्षोभता ॥ ९१ ॥ अद्वैतसंपत्तीचें कारण । तितिक्षा हे असाधारण । देणें ईश्वराचें संपूर्ण । तितिक्षारूपें ॥ ९२ ॥ जेविं हिमकराचा गाभा । तापें न धरी कांहीं क्षोभा । स्वयंभ स्वरूपाची शोभा । ते हे तितिक्षा ॥ ९३ ॥ ज्ञानी विख्यात तितिक्षेनें । संत तितिक्षावंत सन्मानें । साधु शिरोरत्न शांतीनें । जो अक्षोभ असे ॥ ९४ ॥ जो धैर्याचळाचा गाभारा । कीं गगनगर्भ उभारा । तितिक्षावैरागरींचा हिरा । शोभला निजवर्चसें ॥ ९५ ॥ जो सहिष्णुतागंगेचें मूळ । जो शांतीचें उपवन केवळ । तितिक्षाधरामंडळ । नृपाचळचक्रवर्ती ॥ ९६ ॥ निज आस्तिक्यस्थितीनें पूर्ण । पालटेना कल्पांतीं आपण । तें हें तितिक्षावंतांचें लक्षण । प्रसिध्द जगीं ॥ ९७ ॥ जो प्रपंचासि विटला मनीं । भरला निरंजनवनीं । तेथवरि परीक्षार्थ क्षोभोनि । प्रवर्तलीं आदिभूतें ॥ ९८ ॥ नाना देहदुःखाच्या विपत्ती । नाना दैविकी याता-

---

१ उप ह्मणजे जवळ, समीप. २ रति ह्मणजे आनंद. ३ सहनशीलपणा. ४ खाणींतील. ५ स्थिर पदार्थांचा राजा.

कामादिकानीं । विमांडूनि गेला ॥ २९ ॥ देशविदेश महास्थानें । विचरे निजविरक्तीनें । देव दयार्णव त्या कारणें । रक्षितसे सबाह्य ॥ ३० ॥ जैसें शिशु नेणत मायेसी । भरे क्रीडेच्या विलासीं । तयाची दृष्टी चुकऊनि सरसी । माता संरक्षी कृपेनें ॥ ३१ ॥ देव तैसा कृपेचा कोंवळा । भाविकांसि रक्षित अवलीला । तया दयार्णवाची लीला । अकळ ब्रह्मादिकांसी ॥ ३२ ॥ भक्ति रिघतां कठिणांतरीं । पुढें मार्ग सोपारा करी । त्रितापहर छाया धरी । परिधानांबरें ॥ ३३ ॥ वेंचि मार्गींचे कंटक । निवारी विघ्न भयानक । धरूनियां शरकार्मुक । पुढें मार्गे उभा चि असे ॥ ३४ ॥ विसरोनि थोरपण आपुलें । भक्तसेवेसि आदरिलें । कारुण्याचें बिंब उदेलें । कृपांबरीं संपूर्ण ॥ ३५ ॥ जो चिंतामणीची चिंता हरी । कल्पतरूची कल्पना वारी । तो भक्तजनकाजकैवारी । घोळला कृपेनें ॥ ३६ ॥ कामधेनूची इच्छा पुरवी । पीयूषांसि गोडी चाखवी । अनुभवासि अनुभव ठेवी । जीवा जीवनकळा ॥ ३७ ॥ भक्त निमग्न परमानंदीं । सैरा विचरती स्वछंदीं । निर्द्वंद्वसुखें बोधसंवादीं । विश्रांति प्रत्यक्ष दे ॥ ३८ ॥ क्षुधातृषादिक आपदा । भक्तांसि होऊं नेदी कदा । कृपामृतें चि सर्वदां । परिपालन करी ॥३९॥ तृषेनें सेवितां गंगाजळ । तव ते पीयूर होय केवळ । क्षुधेनें भक्षितां फळमूळ । दे पंचामृतगोडी ॥ ४० ॥ ऐसा कृपाळु आत्माराम । भक्तकामकल्पद्रुम । विश्रांतीचा निजविश्राम । शरणागतवत्सल ॥ ४१ ॥ श्रीरामें अंगिले जे भक्त । ते जाणावे नित्य विरक्त । सर्वक्रियेसी जीवन्मुक्त । ते चि पैं वोळखावे ॥ ४२ ॥ देवदर्शनें कृतार्थ जाले । अनपेक्ष थोरेसि लागले । अनन्यभावें अनुसरले । तत्वता आत्मारामीं ॥ ४३ ॥ भविष्य ही स्वरूपदशा । मुमुक्षांसि आली विशेषा । विगतवृत्ती चिदाकाशा । पावले रामकृपेनें ॥ ४४ ॥ ऐसे जाणिजेत मुमुक्ष । जयांसि वश्य जाला निजमोक्ष । उघडूनि निज-

१ जवळ. २ बाण आणि धनुष्य. ३ अमृताला. ४ आपलेसे झाले. ५ ज्यांच्या चित्तवृत्तींचा लय झाला आहे असे.

विवेक चि अक्ष । देव असाक्ष पाहिजे ॥ ४५ ॥ नित्य नमितो सादर । नित्य चराचरी रघुवीर । चांडाळादि गो खर तत्पर । भावि अभिवंदनी ॥ ४६ ॥ ऐसा भक्त विगतअहंकार[१] । ते चि भक्तराज अक्रूर । जयांची प्रसिद्धी अपार । वंदन भक्तीची ॥ ४७ ॥ देवेंवीण स्थळ तें कवण । रिता ठाव नाहीं देवें वीण । विश्वरूपासि अभिवंदन । वदिती सद्भावें ॥ ४८ ॥ या नमस्कारें सुलीन वृत्ती । या नमस्कारें सरे प्रवृत्ती । या नमस्कारें चि ये निवृत्ती । अकल्पित जे आंगा ॥ ४९ ॥ आब्रह्मस्तंबपरियंत । पाहातां अवघा चि भगवंत । तयासि वंदन अखंडित । घडे साच चि निष्ठेनें ॥५०॥ जगन्मय तारकब्रह्म । अभिवंदनीं बोळे परम । कृपावसरें परंधाम । दे निजभक्तांसी ॥ ५१ ॥ नद्या पर्वत द्रुम विस्तार । स्थावर जंगम विश्वाकार । पुराणें कल्पांचा निर्धार । ऐसा चि असे ॥ ५२ ॥ विश्व विष्णुमय निर्धारें । अभिवंदनी बोळे येकसरें । प्रत्यक्ष होऊनियां साक्षात्कारें । उत्धार करी ॥ ५३ ॥ वंदनें आराध्य[२] आभारेलें[३] । मुक्तिदानें उदार जालें । सगुण साक्षात्कारें आलें । भक्तांसि भेटावया ॥ ५४ ॥ मुमुक्षु सर्वभावें संपन्न । सर्व मंदी दंडायमान । अनन्यभावें लोटांगण । सज्जनासि घाली ॥ ५५ ॥ ह्मणे माझा उत्धार कीजे । दृढ धरी संतपदांबुजें । सर्वस्व निवडूनि सहजें । सेवी सर्वार्थे ॥ ५६ ॥ बाष्पें दाटोनिया कंठीं[४] । घाली संतपदांबुजीं मिठी । पदरज लावी ल्हेहाटीं[५] । सद्भावें पूर्ण ॥ ५७ ॥ त्यागूनि जाति कुळाभिमान । सांडूनि विद्यावित्पत्तिज्ञानें । संतपदीं निरभिमान । वस्ति करी सुखें ॥ ५८ ॥ असोनि संपत्ति अगर्व । भजे निष्काम भूतीं सर्व । येणें साधनें होय अर्ह[६] । गुरुभक्तीसी ॥ ५९ ॥ घडेल ईश्वरीं सकळा भक्ति । परि दुर्लभ ते गुरुभक्ति । रामकृपेनें नित्य विरक्ती । देशिकप्राप्तीसी कारण ॥ ६० ॥ मुमुक्ष अंतरीं अनुसंधान । अखंड लागलें देवाचें ध्यान । मानिव तेथें च बैसोन । देवासि पाचारी ॥ ६१ ॥ जेवि धन लोभिया

---

१ अहंकाररहित. २ आराध्य दैवत. ३ आभार झाले असें ह्मणतें. ४ उमाळा. ५ कपाळाला. ६ सद्गुरूचा लाभ होण्यास.

कामादिकांनीं । विभांडूनि गेला ॥ २९ ॥ देशविदेश महास्थानें । विचरे निजविरक्तीनें । देव दयार्णव त्या कारणें । रक्षितसे सबाह्य ॥ ३० ॥ जैसें शिशु नेणत मायेसी । भरे क्रीडेच्या विलासीं । तयाची दृष्टी चुकऊनि सरसी । माता संरक्षी कृपेनें ॥ ३१ ॥ देव तैसा कृपेचा कोंवळा । भाविकांसि रक्षित अवंचीला । तथा दयार्णवाची लीला । अकळ ब्रह्मादिकांसी ॥ ३२ ॥ भक्त रिघतां कठिणांतरीं । पुढें मार्ग सोपारा करी । त्रितापहर छाया धरी । परिधानांबरें ॥ ३३ ॥ वेंचि मार्गीचे कंटक । निवारी विघ्न भयानक । धरूनियां शरकार्मुक । पुढें मार्गे उभा चि असे ॥ ३४ ॥ विसरोनि थोरपण आपुलें । भक्तसेवेसि आदरिलें । कारुण्याचें बिंब उदेलें । कृपांबरीं संपूर्ण ॥ ३५ ॥ जो चिंतामणीची चिंता हरी । कल्पतरूची कल्पना वारी । तो भक्तजनकाजकैवारी । वोळला कृपेनें ॥ ३६ ॥ कामधेनूची इच्छा पुरवी । पीयूषासि गोडी चाखवी । अनुभवासि अनुभव ठेवी । जीवा जीवनकळा ॥ ३७ ॥ भक्त निमग्न परमानंदीं । सैरा विचरती स्वछंदीं । निर्द्वंद्वसुखें बोधसंवादीं । विश्रांति प्रत्यक्ष दे ॥ ३८ ॥ क्षुधातृषादिक आपदा । भक्तांसि होऊं नेदी कदां । कृपामृतें चि सर्वदां । परिपाळन करी ॥३९॥ तृषेनें सेवितां गंगाजळ । तव ते पीयूष होय केवळ । क्षुधेनें भक्षितां फळमूळ । दे पंचामृतगोडी ॥ ४० ॥ ऐसा कृपाळु आत्माराम । भक्तकामकल्पद्रुम । विश्रांतीचा निजविश्राम । शरणागतवत्सल ॥ ४१ ॥ श्रीरामें अंगिकिले जे भक्त । ते जाणावे नित्य विरक्त । सर्वक्रियेसी जीवन्मुक्त । ते चि पैं वोळखावे ॥ ४२ ॥ देवदर्शनें कृतार्थ जाले । अनपेक्ष थोरेसि लागले । अनन्यभावें अनुसरले । तत्वता आत्मारामीं ॥ ४३ ॥ भविष्य ही स्वरूपदशा । मुमुक्षांसि आली विशेषा । विगतवृत्ती चिदाकाशा । पावले रामकृपेनें ॥ ४४ ॥ ऐसे जाणिजेत मुमुक्ष । जयांसि वश्य जाला निजमोक्ष । उघटूनि निज-

---

१ जवळ. २ बाण आणि धनुष्य. ३ अमृताला. ४ आपलेसे मानले. ५ ज्यांच्या चित्तवृत्तींचा लय झाला आहे असे.

विवेक चि अक्ष । देव असाक्ष पाहिले ॥ ४५ ॥ नित्य नमितो सादर । नित्य चराचरी रघुवीर । चांडाळादि गो खर तत्पर । भावि अभिवंदनी ॥ ४६ ॥ ऐसे भक्त विगतअहंकार[1] । ते चि भक्तराज अक्रूर । जयांची प्रसिद्धी अपार । वंदन भक्तीची ॥ ४७ ॥ देवेंवीण स्थळ तें कवण । रिता ठाव नाहीं देवें वीण । विश्वरूपासि अभिवंदन । वदिती सद्भावें ॥ ४८ ॥ या नमस्कारें सुलीन वृत्ती । या नमस्कारें सरे प्रवृत्ती । या नमस्कारें चि ये निवृत्ती । अकल्पित जे आंगा ॥ ४९ ॥ आब्रह्मस्तंबपरियंत । पाहातां अवघा चि भगवंत । तयासि वंदन अखंडित । घडे ऐसाच चि निष्ठेनें ॥५०॥ जगन्मय तारकब्रह्म । अभिवंदनीं बोळे परम । कृपावसरें परंधाम । दे निजभक्तांसी ॥ ५१ ॥ नगा पर्वत द्रुम विस्तार । स्थावर जंगम विश्वाकार । पुराणें कल्पांचा निर्धार । ऐसा चि असे ॥ ५२ ॥ विश्व विष्णुमय निर्धारें । अभिवंदनी बोळे येकसरें । प्रत्यक्ष होऊनियां साक्षात्कारें । उद्धार करी ॥ ५३ ॥ वंदनें आराध्य[2] आभारेलें[3] । मुक्तिदानें उदार जाळें । सगुण साक्षात्कारें आलें । भक्तांसि भेटावया ॥ ५४ ॥ मुमुक्षु सर्वभावें संपन्न । सर्व वंदी दंडायमान । अनन्यभावें लोटांगण । सज्जनासि घाली ॥ ५५ ॥ ह्मणे माझा उद्धार कीजे । दृढ धरी संतपदांबुजें । सर्वस्व निवडूनि सहजें । सेवी सर्वार्थे ॥ ५६ ॥ बाष्पें दाटोनिया कंठीं । घाली संतपदांबुजीं मिठी । पदरज वाही उत्तरहाटीं[4] । सद्भावें पूर्ण ॥ ५७ ॥ त्यागूनि जाति कुळाभिमान । सांडूनि विद्यावित्तपत्तिज्ञानें । संतपदीं निरभिमान । वर्तित करी सुखें ॥ ५८ ॥ असोनि संपत्ति अगर्व । भजे निष्काम भूतीं सर्व । येणें साधनें होये अर्द्ध । गुरुभक्तीसी ॥ ५९ ॥ घडेल ईश्वरीं सकळा भक्ति । परि दुर्लभ ते गुरुभक्ति । रामकृपेनें नित्य विरक्ती । देशिकप्राप्तीसी[6] कारण ॥ ६० ॥ मुमुक्षु अंतरीं अनुसंधान । अखंड लागलें देवाचें ध्यान । मानेल तेथें च बैसोन । देवासि पाचारी ॥ ६१ ॥ जेवि धन लोभिया

---

१ अहंकाररहित. २ आराध्य दैवत. ३ आभार झाले असें ह्मणतें. ४ उमाळा. ५ कपाळाला. ६ सद्गुरूचा लाभ होण्यास.

नाहीं निजदृष्टीचा । तरीच चुकोनि भ्रमाचा । आवर्त करिती ॥ ९ ॥ गृहीं च असोनि निधान । श्रमती उदरार्थ अज्ञान । नयनीं घालूनि अंजन । द्रव्य काढूं न सकती ॥ १० ॥ कंठीं असोनि मंगळसूत्र । विभ्रम होय अपवित्र । स्वयें चि गतीसी परत्र । ते नाठवी कैसा॥११॥ हारवीं पार्पे वेदवचन । ह्मणिजे हृदयपापविहीन । पाप तें अज्ञान संपूर्ण । पुण्य परब्रह्म ॥ १२ ॥ हृत्पुंडरीकें जें कमळ । अष्टतत्वें अष्टदळ । तयासीच पुरवी विश्वमूळ । विश्वविद्यातीतें ॥ १३ ॥ ह्मणती तेथें तो पुरुष । या आकाशीं केउता पैस । संपूर्णासि काय विशेष । प्रमाणा आणिजे ॥ १४ ॥ सुधासिंधूंत पाहतां । सेविजे तेथें मधुरता । रविबिंबासि लक्षितां । मुख्य कवणेकडे ॥ १५ ॥ चंद्रमंडळ अमृतें पूर्ण । तेथें निवडील काय कवण । तेविं स्वरूपासि[1] संस्थान[2] । केविं करावें ॥ १६ ॥ हें असो यथार्थापरी । नभ जैसें सर्वांतरीं । दृष्टिवांचूनि अणुभरी । ठायीं न पडे ॥ १७ ॥ पाषाणी असोनि न दिसे । स्फटिकांत तें निर्मळ दिसे । तें वि ज्ञानेंवीण न प्रकाशे । सदोदीत स्वरूप ॥ १८ ॥ निजमुख दिसे दर्पणीं । तेविं स्वरूप तें अंतःकरणीं । स्वयें चि परब्रह्म असोनि । सद्गुरुवीण नुमजे ॥ १९ ॥ जिहीं होईजे सुवर्णसिद्धी । सर्वत्र असती त्या औषधी । परि वोळखीवीण । त्रिशुद्धी । अप्राप्ति वसे ॥ २० ॥ सर्वत्र रूप असोन । डोळां चि होय दर्शन । शब्दें रुधिलें गगन[3] । श्रवणीं च उमटे ॥ २१ ॥ गगन गाळींव हृदय । ज्ञानरवी अखंडोदय । अपरोक्ष प्रमेंत शशिसूर्य । कोट्री हारपल्या ॥ २२ ॥ हृदय विशोक शोकातीत । स्वरूपज्ञानें अखंडीत । तदुपासितव्य[4] शाश्वत । परमेश्वरासि ॥ २३ ॥ पद्मकोशसन्निभें[5] जें । मांसमयकोश सहजें । तेथें भूताकाश जाणिजे । त्रिगुणात्मक ॥ २४ ॥ तें वर्जूनि शून्यगगन । पाविजे चिदाकाश गहन । परब्रह्मीं

---

१ आत्मस्वरूपास. २ विशिष्ट जागा. ३ शब्द हा आकाशाचा गुण च आहे, पण तो कर्णेंद्रिया शिवाय प्रकट होत नाहीं. ४ उपासना करावयास योग्य. ५ कमळाच्या गाभ्यासारखें.

उपलब्धि स्थान । सर्वगत जिवीं ॥ २५ ॥ देहबुधिविहीन स्वयें । तें हृदय अतींद्रिय । अवस्थातीत निरामय । अंतराळरूपीं ॥ २६ ॥ क्षुत्पिपासातिक्रांत । निराश्रय निरावृत्त । निर्मळ निश्चळ निवांत । व्योमाकारें आभासे ॥ २७ ॥ तेथें अवकाशें भेदबुधि । निरावकाश तें निरवधी । मी ब्रह्म हें वाक्य त्रिशुधी । प्रतीति पाहावी ॥ २८ ॥ हा आत्मा त्यातें ह्मणिजे । सिधसाधकीं अनुभविजे । गुरुकृपा अवलोकिजे । हृदयास्थित या ॥ २९ ॥ आत्माराम निर्विकार । जैसें घटमठीं अंबर । हृदयाकाशीं निरंतर । वसे निजव्याप्तीनें ॥ ३० ॥ हृदयशुधी परिज्ञान । तें चि पूर्ण समाधान । आळसें चि पाविजे बंधन । अज्ञानद्वारा ॥ ३१ ॥ हृदयीं स्वभावत्रय । येक निर्गुण निराश्रय । येक निर्विकार स्फूर्तिमय । द्योतक सकळां ॥ ३२ ॥ येक भ्रमव्यामोहक । त्याचा कीजे निजविवेक । भ्रमनिवृत्ति कांहीं येक । विश्रांति आतुडे ॥ ३३ ॥ जंववरि विश्रांति उमस । तंववरि वृत्तीचा चि लेश । स्वभावीं निर्विशेष । स्वसुखें आतुडे ॥ ३४ ॥ वेदांत विज्ञान सुनिश्चितार्थ । जीव स्वानुभवें चि कृतार्थ । प्रतीतीचीण पदार्थ । विवर्तस्वभावीं ॥ ३५ ॥ गुणक्षोभें जाला अभाव । तेथें वासनाविस्तार सर्व । चुकोनियां अंतर्भाव । जीव यातना पावे ॥ ३६ ॥ तेणें संसारें दुखवोनि । सद्गुरुसी शरण रिघोनि । स्वरूपज्ञानें निजउन्मनी । सेवीतसे सुखें ॥ ३७ ॥ गुरुबोधें वेध गाढा । परि प्रपंचाचा मनीं वोढा । तेणे प्रवृत्तीनें वेडा । लाविलें तया ॥ ३८ ॥ विषवल्लीचे रानीं । लाविली अमृतसंजीवनी । समर्पपरिपाळणें सुमनीं । आलीं फळें अपार ॥ ३९ ॥ तें दोनी फळें सेवितां । सुखदुःख हेतु अवस्था । स्वस्थता नसे चित्ता । द्वैताद्वैतटमसें ॥ ४० ॥ वोवळें टाकूनि विकल्प । व्हावें सोवळें निर्विकल्प । तेथें धरूनि उभय संकल्प । कोविं असिजे ॥ ४१ ॥ आत्माराम मनेंद्रहारा । कामकर्मी वर्तें सैरा । विश्पत्ती कोकशास्त्रीं पुरा । शास्त्रज्ञ होय ॥ ४२ ॥ क-

---

१ चांगली जोपासना केल्यामुळे.

रामरहस्य अकळ । श्रुतिशास्त्रहृदय ॥ ५ ॥ रामीं सहज निष्कामता । पावोनि स्वयें ऊर्ध्वरेता । होय कंदर्पदर्पहंता । रामस्मरणें चि ॥ ६ ॥ जगन्मोहन विश्वपिता । जो विख्यात रतीचा भर्ता । त्या मनमीन-केतुचा जनिता । सुंदरनभनाभीं ॥ ७ ॥ नभ अवकाशें संपूर्ण । ह्मण-ऊनि होय जगत्कारण । त्या कारणासि अभिधान । हिरण्य ऐसें ॥ ८ ॥ तेणें हिरण्यनाभीं अच्युत । हिरण्यगर्भातें प्रसवत । त्या विधात्यापासून निर्मित । प्रपंच ब्रह्मांडकोटी ॥ ९ ॥ हिरण्यनाभीसि तया ध्यातां । हिरण्यलिंग शांभवीभर्ता । सुवर्ण अंबिकाही तत्वता । हिरण्यरूप विष्णु-स्मरणें ॥ १० ॥ एवं हिरण्यनाभीस्मरणें । साक्षात्कारस्वरूपतेनें । काम_ जनकत्व जगा येणें । स्वभावें चि आलें ॥ ११ ॥ तनुंज जनकासि न बाधी । हे रामस्मरणें जाली सिद्धी । सोहंभावना प्रसिद्धी । फळली कल्पलता ॥ १२ ॥ स्वरूपयोगसंजीवनी । जे कां विश्वानंदकारिणी । स्वभाव चित्कळा अंतर्भावनीं । विश्रांति भागीरथी ॥ १३ ॥ स्वयं-भानुभवभूधरें । मस्तकीं धरिली सुखशंकरें । त्रिगुण त्रैलोक्य विस्तारें । पावन करित रिघे ॥ १४ ॥ वैराग्यवैरागरीचा हिरा । विश्रांतिजान्हवीचा झरा । प्रतीतिच्या अभ्यंतरा- । माजि सुप्रसन्न ॥ १५ ॥ तो मुक्तिरमेचें विभूषण । जो स्वराज्यनृपचूडावर्धन । तो स्वरूपऐश्वर्यसंपन्न । भक्तांसि बोळला ॥ १६ ॥ जो स्वसुखाचें अभ्यंतर । जो योगियांचा ईश्वर । जो चिदाकाश पर-मेश्वर । प्रगट रामरूपें ॥ १७ ॥ जो जीवमात्रांच्या हृदईं । वसे व्याप-कपणें चि पाहीं । तो सद्गुरुकृपेनें उवलाहीं । ठायीं पाडावा ॥ १८ ॥ निराश्रय ब्रह्मनिर्वाण । तदाकारें स्फुरलें स्फुरण । निजविचारगर्भी रिघोन । तत्वता कवणें शोधावें ॥ १९ ॥ शोधितां साक्षत्ववृत्तीवरी । अवस्थामात्र नाहीं दुसरी । दीपकर्पूर चिदंबरीं । निवांत जाहला ॥२०॥ एवं निजानुसंधान विवरें । होय स्वरूपज्ञान चेयिरें । स्वभावसिद्ध-साक्षात्कारें । आळिंगिजेत मुमुक्षा ॥ २१ ॥ विवेकप्रबोध राहटे । स्वा-

१ मनरूप मदनाचा. २ ब्रह्मदेवाला. ३ पुत्र. ( मदन ). ४ पित्याला, ५ ( कृष्णाला ).

नंदीव्यापकी घनवटे । समाधीसि स्वसुख दाटे । अवचट गुरुकृपा ॥ २२ ॥ देऊनि प्रवृत्तीचीं कपाटें । उन्मेष परतोनि उद्घाटे । अप्रांत महाशून्य घनवटे । मार्ग उजू चालिला ॥ २३ ॥ भाऊनि तन्मयतेची पायरी । वेघला प्रणवाचे शिखरीं । उन्मनीयोगें चिदंबरीं । पुंजाळली[१] निजदृष्टी ॥ २४ ॥ तूर्येच्या निजलक्षांबरें । अतिऊर्ध्वं त्या निराधारें । पवाडतां[२] योगपैसारें[३] । कोसळे वृत्ति लक्षाची ॥ २५ ॥ निजप्रज्ञा पाउल न थिरे[४] । जेथें उभा च विचार विरे । ऐसा अवघड कडा निर्धारें । वेधेल तोचि साधक ॥ २६ ॥ निसरडा मार्ग अतिसूक्ष्म । अंतराळें होय निर्गम । ते ही तळीं घाळूनि निरुपम । परधामासि पाविजे ॥ २७ ॥ न संभवे समाधीसोपान । उन्मेषेंसीं कोसळलें गगन । ऐसिया निसरडीयावरून । पावे स्वरूपीं तो निधडा ॥ २८ ॥ अकळ मार्ग त्या विशाळें । लक्षितां तें मन मावळे । अरितक्य मात्र निवळे । सहज अंतरीं ॥ २९ ॥ सहज तन्मयतेच्या कळशीं । निरावकाश लक्षेसीं । विरालें मीपण निश्चयेसीं । अंतर्खेचरीनें ॥ ३० ॥ निर्विकल्प सहज चमत्कारें । कल्पनाशून्य अभ्यतरें । सद्गुरुकृपा निजनिर्धारें । साधक मननीं स्थिरे ॥ ३१ ॥ तन्मयाची सुखमूर्धनीं । स्वानंद समुद्रीं बुडऊनि । गुरुकृपेच्या अनुसंधानीं । पवाडला पुढें ॥ ३२ ॥ अखंड अद्वय कडा । निर्सणीचा[६] मार्ग निसरडा । विचाराचे पाय पुढा । निरसोनि जाती ॥ ३३ ॥ अंतराळाचें अभ्यंतर । परेमाजि पद विवर । खोऊनि पाउल निरंतर । गुरुदैविकीकृपेनें ॥ ३४ ॥ चढतां अवचट पाठारीं । अगोचर शिखर त्यावरी । जावया मार्ग निरंतरीं । सडा घनदाट ॥ ३५ ॥ माया दैविक अति निकट । अनादि वायूचा झडझडाट । चालतां कर्मवेशें अवचट । उडवी तेथूनियां ॥ ३६ ॥ स्वरूपसाक्षात्कार सहज । अनुभवशिखरीं वृक्षराजें[७] । मुक्तिसुरभि[८]समाज । ज्ञान-

१ पुंजका झाली, बिंबाकार झाली, प्रकाशित झाली. २ आत्मस्वरूपी आक्रांत. ३ प्रवेश करतां. ४ योगाच्या साहाय्यानें. ५ स्थिर होत नाहीं. ६ शिडीचा. ७ कल्पवृक्ष. ८ कामधेनु.

दुरुकृपा साक्षात्कारीं । आतुडली निज अभ्यंतरीं । परि तियेचा उपयोग निर्धारी । सांपडला पाहिजे ॥४॥ सित्थी बोळलीयां अकाल्पित । गर्वें चि जो होय उत्थत । तेणें पतन होय निश्चित । विपरीत फळे ॥ ५ ॥ तेविं सद्गुरुकृपा अकल्पित । स्वरूपदशा सदोदित । तेथें विषयसंस्कारें निश्चित । विकल्प बळाविला ॥ ६ ॥ स्वरूपीं विकल्पासि कारण । भेदमुळें निजअज्ञान । तया भेदाचें संवर्धन । वनिताअर्थरूपें ॥ ७ ॥ स्वरूपसमाधानी विक्षेप । प्रवर्तविला कामादिकीं साक्षेप। संकल्प वाढऊनि आपेंआप । प्रमादीं घाली ॥ ८ ॥ तें हें अनादि अविद्यारूप । पंचविषय गुणविक्षेप । पुरुष वनिता संकल्प । मुळीहूनि आणिला ॥ ९ ॥ जे अनर्थपर्वतींची दरी । जे विकल्पतरुवराची मंजिरी । जे कल्पनापट्टणीची सुंदरी । प्रमादरूपें ॥ १० ॥ जे अविद्यावनींची संजीवनी । जे विषलता फुलली सुमनीं । जे मीनकेतूची स्वामिणी । भ्रातिसरितीं ॥ ११ ॥ जे व्यामोहक स्मशान देवी । जे विक्रतिलाघवें लाघवी । जे मृत्युरूपपदवी । सकळांसि देती ॥ १२ ॥ जे अनादिभ्रांतीची मांदुसें । जे दरिद्रपिंठीची रूपसें । जे अघातसत्रीची बहुवस । संपदा होय ॥१३॥ जे निर्जरादिकांची दीनदशा । जे काळसर्पिणी दुराशा । जे महामोहकपरेशा । लांछन लाविलें ॥ १४ ॥ जे विसराचें माजवणें । जे भुलीचें भुलवणें । जे लोभाचें संभवणें। प्रत्यक्षाकारें ॥१५॥ जे स्वरूप समाधानातें विघडी । जे कामकल्पांतीची धाडी। जे योपिताररूपपरवडी । संभवली विषरूप ॥ १६ ॥ जे दुःखसमुद्रीची लहरी । दुरितांची मूर्ति साजिरी । जे विघ्नरूप नाना विकारी । साधी जीवासि प्राणें ॥ १७ ॥ ऐसी हे प्रमादप्रमदा । अनादि हेतुरूप द्वंद्वा । स्वरूपावरोध सर्वदां । प्रवर्तली होय ॥ १८ ॥ हे मानस्वर्गीची स्वर्गांगना । दुराशा वाढऊनि आणी पतना । जे नाशरूप नागांगनां । लहरी विषाची ॥ १९ ॥ साच चि स्त्रियेचेनि संगें ।

---

१ स्त्री आणि धन या रूपानें. २ मदनाची. ३ भ्रांतिरूप नदी. ४ पेटी. ५ ( ? ). ६ पातकाची. ७ नागीण.

नाडले प्राणी संसर्गें । देखतां अनर्थ अंतरंगें । उडि घालिती बळें ॥२०॥ जे अनिच्छासि इच्छा आणी । निष्कामा घाली कामव्यसनीं । उन्मनीरतांसि दर्शनी । वेधी कटाक्षईक्षणें ॥ २१ ॥ आत्मा अमृताहूनि गोड । तेथें न करूनि बुधीचा पवाड । प्रमदायोगाची चाड । लावी तापसांसि वनीं ॥ २२ ॥ दिव्य कस्तुरी केशर अगर । कर्दंव अंबर रससार । वर्जूनियां तो पापचर । काकविष्टेसि सेवी ॥ २३ ॥ स्त्रीसंबंधें अनर्थ नाना । जीवघात नाना यातना । प्रीतीचें वंधन कामना । वनितासंसर्गें ॥ २४ ॥ तेथें निपजोनि उपजे । पुन्हा तेथें चि करी बीजें । स्त्रीसंसर्गदोषें पाविजे । अपभ्रंश तो ॥ २५ ॥ कश्मळमळ प्रवृत्तिमूळ । अमंगळ ते अति कुश्चळ । त्या दुर्गंधिस्थळीं सकळ । प्रवृत्ति जडली ॥ २६ ॥ मनोवाचाकायाकर्मणा । अर्जित जगीं मृगनयना । स्नेहसंबंधें अधःपतना । पात्र करी ॥ २७ ॥ अपभ्रंश स्त्रीसंसर्ग । क्षयरोग जीवासि स्त्रीयोगें । उन्मादपूर्ण अष्टांगें । मूर्तिमंत मृत्यु ॥२८॥ कुबुधि कुटिळ कामना । अमेध्यकूपिकांगना । स्नेहपाशें चि मृत्युसदना । नेतसे नानाविकारी ॥ २९ ॥ हे अनेकवशीकरणकारणी । हें सकळांसि मोहक मोहिनी । हे संभवल्यासि परतोनि । वेधी कामातिशयें ॥ ३० ॥ दुर्गंधी मूत्र शोणित । कुश्चित वडवामुखी व्रणे द्रवत । ऐसिये स्थळीं होती जे रत । ते विषयकर्दमीचे क्रिमी ॥ ३१ ॥ मांसमय रुधिरविकारी । अस्थिपंजरें कीजे साजिरी । हें प्रत्यक्ष जाणोनि अभ्यंतरीं । स्त्रीमोहें चि नाडिले ॥ ३२ ॥ स्त्रियेच्या निश्वासीं जाले लीन । जे स्त्रियेचे आज्ञापायीक दीन । पाहा हर्णीपदमात्रेण । चर्मणा जग मोहितं॥३३॥ स्त्रीजित नरकवासी नर । स्त्रीजित कामाचे किंकर । स्त्रीजित लोभें अपस्मार । सैरा चि भ्रमती ॥ ३४ ॥ वनितावशक्रित जे पिसे । स्वधर्म टाकूनि लोभवशें । बुडाले अपायीं सोसें । स्त्रीरूप

१ चंदन. २ एक सुगंधि द्रव्य. ३ कापूर. ४ घाणीची विहीर च अशी स्त्री. ५ जन्मास आलेल्याला. ६ कृमी, किडे. ७ आज्ञाधारक सेवक. ८ मोहक ( हरणी ) या केवळ शब्दावरून ( स्त्री रूप ) चर्मानें जगाला वेड लाविलें आहे. ९ हौशीनें.

निरयीं ॥ ३५ ॥ स्वरूपानंद सुखरति । सांडूनि शवरूपातें रमती । हे अद्भुत भ्रांति चित्तीं । स्त्रियेचेनि संसर्गें ॥ ३६ ॥ मुख्य अनर्थासि कारण । वनितायोगसंभाषण । क्षोभलें चित्त उठे दारुण । काम-ईक्षणें स्त्रियेच्या ॥ ३७ ॥ स्त्री काळकूटसहोदरी । जगद्विलासें विकार करी । पुरुषोत्तमासि संस्कारी । देहधारी केलें ॥ ३८ ॥ त्रैलोक्यसंभवधरणी । विश्वपित्याची कुटुंबिनी । ते सर्वक्षेत्रीं वसोनि । विस्तारिली वनितारूपें ॥ ३९ ॥ अहो हा भ्रम अति दुस्तर । अनादि कामक्षोभविस्तार । इयेचेनि भवसिंधु अपार । तरला नव जाये ॥ ४० ॥ मायराणी नामाची महिमा । पुरुषासि इच्छारूपें अंधतमा । जन्मजन्मांतरीची सीमा । नास्ति क्षय मिरोशि करी ॥ ४१ ॥ अपभ्रंश भ्रमातिशयें । कठिणांतर दुःखासि देत स्वयें । संसारऊर्मि कारण होय । पुनरावृत्तीसि ॥ ४२ ॥ वनितारूप महाविखार । झोंबोनि केला जया संस्कार । तयासि विष चढोनि दुस्तर । दुःखासि आणिलें ॥ ४३ ॥ सर्वांतरीं सर्वात्मा । जेंवि वास सर्वांघटीं व्योमा । असोनि स्त्रीलोमें पुरुषोत्तमा । पुरुष अंतरले ॥४४॥ निजस्वरूपानें चुकले । प्रमदापाशीं विगुंतले । ते कामिणीकाळिकेसि आले । बसैत होऊनि शरण ॥ ४५ ॥ पुरुषहैसासुरमर्दिनी । अर्चिली जीहीं देवतार्चनीं । प्रसन्नतेसि शिरकमळानी । वाहिली पूजा ॥ ४६ ॥ तें चि पुढें निरूपण । कामनिवृत्तीसि कारण । सद्गुरुकृपा निरंजन- । दशा पातली ॥ ४७ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । स्त्रीमहिमा हेळणलीळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ४८ ॥ पंचमरुद्रे सप्तमउल्लास संपूर्ण ॥ ॥ ॥ ॥ छ ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम भक्तासी सुखकारी । अक्षयकृपा वरदानकरी । काम जयाचे अभ्यंतरीं । बोधें निष्काम करी तया ॥ १ ॥

---

१ नरकांत. २ काळकूट विषाची सख्खी बहीण. ३ हक्कदार. ४ स्त्रीरूप वाळीदेवीला. ५ बोकड.

नाना दुःखाचे संसर्ग । नाना भवताप नाना रोग । आदिभूतिक वीत[1]राग योग । देतसे प्रसंगें ॥ २ ॥ नाना शास्त्र पुराणांतरीं । प्रस्तावीक ग्रंथ विस्तारी । साधुमहाजनवचनांतरीं । प्रस्तवा घाली ॥ ३ ॥ ह्मणे काळ घातला मापारी । व्यर्थ होते आयुष्याची वोहेरी । वेचलें वय या संसारीं । पुढें गती कायसी ॥ ४ ॥ काय भुललेती विकारीं । कामीं[2]न विटा चि अद्यापिवरी । उगें चि व्यर्थ कां रानभरी । जालेती विकर्में ॥ ५ ॥ त्यजूनि भ्रमजनित अवाला । क्षणयेक श्रवणीं मन घाला । काळ जपतो घालील घाला । मग कांहीं च न चले ॥ ६ ॥ सहसा उदास करूं नका । अहंतेनें पावला धका । विवेक करणें चि निका । हा चि साक्षेपें करावा ॥ ७[4] ॥ न्याय अन्याय स्वयें जाणतां । सत्य असत्य बरें निवडितां । तुह्मी शाहाणे चि ह्मणवितां । तत्वतार्थ नेणोनि ॥ ८ ॥ नसे ज्या सार्थकाचें ज्ञान । जळोनि जावो तें शहाणपण । नाना कुतर्कांचें भ्रमण । वाउगें चि करी ॥ ९ ॥ मी कोण हें मुदल न कळे । नाना तत्वार्थ नाकळे । अनेक जन्म या चि मुळें । गेले स्वहिताचे ॥ १० ॥ अभिनव मायेचें लाघव । वेढा लाविले सकळ जीव । नेणोनि आपुला चि अंतर्भाव । अंतरले स्वरूपा ॥ ११ ॥ स्वराज्य सांडूनि भ्रांतीनें । संसारभीक मागतां अज्ञानें । चुकोनि अढळ निजठेवणें । मरतां जन्मतां किती ॥ १२ ॥ प्रार्थुनियां सद्गुरूसी । काढावी संपदा अविनाशी अनुभव स्वसुखाच्या राशी । लाभ घ्यावा नरेंद्र हो ॥ १३ ॥ पांचापंचकाचें निमित । शोधावें तत्वें तत्व समस्त । सांडोनि तत्वसंमोह नियांत । स्वस्वरूपमार्गी लागावें ॥ १४ ॥ तुह्मीं स्वरूपें चि शाश्वत । देहबुद्धीनें होतां नाशिवंत । च्यान्ही पुरुषार्थ अंतर्गत । सत्ता आपणापासीं असे ॥ १५ ॥ कामादि पड्वैरि वधूनि । बैसा स्वरूपभद्रासनीं । मग तया स्वराज्यापासूनि । नव्हे च्यव सर्वथा ॥ १६ ॥ पाहाता निजविवेकदृष्टी । येक अंतःकरणाची सर्वसृष्टी । तुह्मी तया-

१ आधिभौतिक. २ (?) लाभ. ३ कामाचा त्याप तुह्माला कंटाळा आला नाहीं. ४ उद्योग.

निराळें या परिपाटीं । वरें निवळा ॥ १७ ॥ ऐसें सामर्थ्य समर्थाचें। भोगिजे सुख स्वरूपाचें । विश्रांतीरूप विश्रांतीचें । वसवा माहेरघर ॥ १८ ॥ दृढ सद्गुरूचे पदीं जडा । कैवल्याचें कपाट उघडा । स्वानंद समुद्रीं बुडा । सहज स्थितीनें ॥ १९ ॥ जे कां पंचम अवस्था । जे उन्मनीरूप तत्वता । ते तुमची च वृत्ति पाहतां । तुह्मासि अकळ ॥ २० ॥ स्वभावज्ञानें हृदयांत । निवळोनि तुर्येचा प्रांत । गुरुकृपेचा निजयेकांत । अखंड अनुभविजे ॥ २१ ॥ ऐसें निवळलियां स्वभावें । स्वहित मग सहज चि फावे । चंचळ चक्रीनें फिरावें । वृत्तीच्या संस्कारें ॥२२॥ जंववरि स्वस्थ नसे निज मन । तंववरि कांहिं च नव्हे साधन । ध्यान धारणाआसन । प्राणायाम दृढावेना ॥२३॥ मन अनुभवीं विलासलें । निवांत विश्रांतीनें सोंकलें[1] । तरि मग त्या स्वरूपींच लांचावलें । रिघेल आपेआप ॥२४॥ त्यावरि त्या सुखार्णवांत बुडेल । तळ धरूनि विसांवेल । मग तेणें चि सुखभरें विरेल । जळीं लवणा ऐसें ॥ २५ ॥ तेव्हां साधन तें कवणा करील । मनासि मनपण गिळोनि जाइल । एवं ऐसें जेव्हां होईल । तेव्हां साध्य साधन फळलें ॥ २६ ॥ मग न करितां साधन अवलीळे । सहज स्वरूपांवरीं उन्मन खेळे । व्यापक न करितां निवळे । स्वछपणें सघन ॥२७॥ घनवट स्वरूपीं घनता । आटे गगन उन्मनेसीं तत्वता । निर्विकल्प निरावाणे अखंड स्वरूपता । पूर्ण सद्गुरुकृपेनें ॥ २८ ॥ निर्विकल्प. निरावेव । अद्वैतवस्तु स्वयमेव । अनुभवें चि अनुभवाचा ठाव । पुसोन टाकिला ॥ २९ ॥ एवं अखंड वस्तूच्या ठाईं । मायावृत्ती नसे चि कांहीं । तेथें अनुभवाचें ही कांहीं । प्रयोजन नसे ॥ ३० ॥ दुजेवीण अनुभव । हें बोलणें चि जालें वाव । अभिनव श्रुतीचें लाघव । रहस्य विवरावें ॥ ३१ ॥ श्रुतीचें सार गुरुकृपे आतुडे । हृदईंचे रहस्य हृदईं च सांपडे । निरंजन डोळां घालूनि निवाडें । पाहावें आस्तिक्य आपणा ॥ ३२ ॥ ज्ञानविज्ञान अस्तिक्यता वरी । तेव्हां गती ते होय निर्विकारी । अनुभव सुखाची वोहेरी[2] । साक्षिस नसे चि कोण्ही ॥ ३३॥

---

1 संवकलें, संवय लागली. २ (?) लाभ.

वर्मे हें प्रतीतीचें गहन । काय कथुनि उगें चि ज्ञान । केवळ अनुभवाची खूण । अनुभवी जाणती ॥ ३४ ॥

॥ श्लोक वेदांत ॥ तूष्णीं तिष्ठ[1]विसंज्ञयैव जडवत्पक्षोयमाद्यः सतां ।
नो चेत्तिष्ठ तटस्थतामुपगतःसोयं द्वितीयो विधिः ।
एतावत्यपि चेत्प्रभुर्नहि भवान्वेदांतचर्चा वृथा ।
मार्गे मोहमये गतानुगतिकन्यायेन भूयो भ्रम ॥ १ ॥

वेदवेदांतविव्युत्पत्ति । नाहीं अनुभव सुखप्राप्ती । नेणे समाधि सहजस्थिति । ते चर्चा निरार्थक ॥ ३५ ॥ स्थिति लाधली पैं जयासि । दिसती प्रतिलक्षणें अंपेसि । जैंवि गर्भ राहिलियां कुसीं । डोहळे होती सलक्षणीक ॥ ३६ ॥ सर्वांगीं तुष्टिपुष्टि विशेष । आच्छादेना तो गर्भ निर्विशेष । रुतुंभरें[2]प्रत्ययेंसि पूर्ण परेश । प्रगटला तैसा चि ॥ ३७ ॥ चिन्हें दिसती दिवसें दिवस । ज्ञानी विरक्त तो उदास । विवेक नैराश्य निर्दोष । नातळे विषयांसि त्या ॥ ३८ ॥ नेणे आपपरभावना । मन कांहीं च अपेक्षीना । श्रवण राहिलें पाहेना । जाणेना नेणे तो ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ अत्र संमतिवेदांतः—नाना[3]विचारसुश्रांतो धीरो विश्रांतिमागतः ।
न कल्पते न जानाति न शृणोति न पश्यति ॥ १ ॥

तो संगी च निःसंग असे । उपाधीमध्यें परि न गवसे । आश्रमीं असोनि वसे । आश्रमातीत तो ॥ ४० ॥ सर्व अवलंब त्यागूनि । निरावलंब अवलंबोनि । जनीं असोनि निरंजनीं । राहिला सहज तो

---

१ जड पाषाणाप्रमाणें अचेतन होऊन स्वस्थ रहाणें हा एक सिद्धांचा मार्ग, नाहीं तर सुखदुःखादि द्वंद्वांशीं समवृत्तीनें वागत रहाणें हा दुसरा मार्ग. यां पैकीं कांहीं च जुळत नसेल तर नुसता वेदांताचा कोरडा वाद फुकट आहे. मग या मोहमय संसारांत गतानुगतिक न्यायानें रहा फिरत. २ ऋतंभरा प्रज्ञा. ३ नानाप्रकारचा विचार करून थकल्यावर ज्ञानी विश्रांति घेतो, आणि तेव्हां तो कांहीं कल्पना करीत नाहीं, कांहीं जाणत नाहीं, ऐकत नाहीं आणि पहात हि नाहीं.

॥ ४१ ॥ एवं जीवन्मुक्त आत्मज्ञानी । देह धरूनि वर्तती जनीं । हे कृपाळुदीक्षा तरोनि । तारिती सकळां ॥ ४२ ॥

॥ श्लोक ॥ अत्र संमतिवेदांतः—उपाधिस्थो निरोपाधिःसंगवान् संगवर्जितः।
आश्रम्यपि निरालंबी लोकसंग्रहकारकः ॥ १ ॥

अंतर्निष्ठ कृपाळु योगी । ब्रह्मानुभवी वीतरागी । ते चि तारकपंथ या- जगीं । देह प्रावरण आथिले ॥ ४३ ॥ दीक्षा वर्तोनिया आंगें । सकळासि लाविती सन्मार्गें । सहजस्थिति सानुरागें । स्वानंदसिंधू ते ॥ ४४ ॥ तया अंतरींचें अनुसंधान । आत्माराम उपासन । कैवल्य अतर्क्यज्ञान । आइका पुढिलिये उल्लासीं ॥४५॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । बोध प्रस्ताविकस्वलीळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ४६ ॥ पंचमरुद्रे अष्टमउल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामविज्ञानअभ्यंतर । प्रतीती अनुभवी गंगाधेर[1] । संत अनुभवसागर । साधक आर्जविती ॥ १ ॥ तत्वज्ञ राम-उपासक । निजउपासनाविवेक । बोधपरंपरा निश्चयात्मक । अन्वयव्यतिरेकें ॥ २॥ अन्वय पुरुष ज्ञानघन । व्यतिरेक प्रकृतिसत्ता पूर्ण । उभय-योगें समरसोन । होय अखंडैकरस ॥ ३ ॥ पाहतेपणाचें अधिष्ठान । पाहणें होय सनातन । पाहतेंपाहणें निर्वाण[3] । पाहलें उभययोगीं ॥ ४ ॥ सत्ता ज्ञानदशा गहन । हे निजप्रकृति संपूर्ण । जियेचेनि स्वानंदघन । पुरुष अनुभवी ॥ ५ ॥ प्रकृति ज्ञानचक्षुजिव्हाळा । पुरुष डोळियाचा डोळा । धन्य उभययोगलीळा । अवतरलें विश्व ॥ ६ ॥ राम परात्पर परेश । सीता चिद्विलासी निर्विशेष । निजात्मयोगें निर्विशेष । परस्परें अनुभविती ॥ ७ ॥ जियेविना कांहीं च ना होय । त्यावीण ते रूपासी च न ये । धन्य धन्य उभयतासि उभय । रूपकें[4] होती

---

१ ज्ञानी पुरुष उपाधींत राहून हि निरुपाधिक असतो, विषयांत राहून निर्विषयी असतो, आश्रमांत असून स्वतंत्र असतो आणि लोकसंग्रह करतो.
२ शंकर. ३ शेवट, लय. ४ रूप प्राप्त करून देणारीं.

॥ ८ ॥ दर्पण होऊनि स्वानंदघन । डोळा जाहली निरावरण । पाहिला निजदृष्टीसि निर्वाण । राम चिच्छक्तिसीतेनें ॥ ९ ॥ नामरूपगुणेंवीण । देशकाळप्रमाणविहीन । तो प्राणप्रियेस्तव जाण । सर्वकर्ता होय ॥ १० ॥ नवल पढियंतेपण प्रीती । येकेंवीण येक असों नेणती । अणुमाजि सामावती । संपूर्णपणें ॥ ११ ॥ वल्लभ अखंड निद्रायुक्त । तयासि निरंतर जागवित । जागा जालियां अकल्पित । निद्राजागर तुरी ॥ १२ ॥ भर्तार संपूर्णपणें पाहातां । प्रिया संकोचली तुरे तत्वता । का पति भ्रतार कांहीं पणें नेणतां । प्रियाचि आचवी होय ॥ १३ ॥ प्राणपढियंती प्राणेश्वरी । सच्चिदानंद घरभरी । तियेवीण तो कांहीं न करी । आर्ळका प्रियेचा ॥ १४ ॥ जयाचें रूपनाम अभिनव । ते प्रियाचि होय सर्व । तया वांचूनि अपूर्व । कांहीं च न होय ॥ १५ ॥ अभिनव प्रीतीचा नवलाव । परस्परें निदोंनसंभव । आवडीचेनि नवनव । सेविती परस्परां ॥ १६ ॥ प्रभा घन सूर्यमंडळीं । तैसी प्रिया त्यातें कवळी । कीं प्रभाकराचि अनंतकळीं । अपंगी प्रियेसी ॥ १७ ॥ समुद्र भरितें जीवन । तैसी प्रिया पुरुषें जाण । कीं प्रियेवांचूनि तो निर्वाण । सागर जीवन विना ॥ १८ ॥ दीपकाची प्रभा संपूर्ण । ध्यावी दीपकासी प्रतिघून । तैसी साक्षात्कारें गहन । ध्यावी निजू आस्तिक्यता ॥ १९ ॥ गोडी वरून शर्करा घ्यावी । शर्करेमाजि गोडी स्वभावी । गोडी शर्करा स्वानुभवी । द्वैत असेना ॥ २० ॥ चिदानंदघन वैदेही । निरंजन रामहृदयीं । उभयसामरस्यें पाहीं । तें चि अपरोक्ष ॥ २१ ॥ द्वैताद्वैत हारपलें । महाअद्वैत संभवलें । तेंहीं प्रकृतीचें केलें । गौरवार्थ पुरुषीं ॥ २२ ॥ पुरुषीं देऊनि पुरुषता । सभाग्य जाली वनिता । प्रतीतीसी कारण तत्वता । उभयांची मिळणी ॥ २३ ॥ पुरुष व्यापकत्वें उदार । प्रकृती व्याप्य धरी पैसार । व्याप्य व्यापकता साचार । तुरे तें येकपण ॥ २४ ॥ निजात्मदशेनें गहन । राम सीता

१ उपड़ा. २ प्रेम. ३ भर्त्याच्या स्वरूपांत लय पावली. ४(?) वेड (प्रेमानें) ५. लय, आणि उत्पत्ति.

सनातन । फुटों नेदितां येकपण । ऐक्यासि आलों ॥ २५ ॥ गोचररूप चराचरीं । प्रकृतिपुरुषाची बोधपरि । क्रमासि येऊनि विस्तारीं । अनुभविती निजयोग ॥ २६ ॥ सीता व्याप्याची काष्ठस्थिती । प्रकटे व्यापकें रामचित्तीं । उभययोग निर्वाणरीती । तें चि आलिंगन ॥२७॥ ज्ञेयज्ञाताज्ञानेंवीण । सीता चक्षू सनातन । राम अरूप निरंजन । हें चि दर्शन जाणिजे ॥ २८ ॥ परा मौनावळी तत्वता । हे चि वाचक होय सीता । राम निःशब्द स्वभावता । हें चि संभाषण ॥ २९ ॥ परोक्षापरोक्ष वाल्हेनि । केवळ दशा विदेहनंदिनी । राम आस्तिक्य कांहीं न होनि । असती स्वभावें ॥ ३० ॥ हें चि भक्तांचें अभ्यंतर । रामसीता मनोहर । बोधें निजात्मसाक्षात्कार । प्रगट रामउपासना ॥३१॥ श्रीरामाची दीक्षा पावन । अनुभविती संतसज्जन । हे चि गुरुकृपीं सनातन । आनंदवृध्दि ॥ ३२ ॥ संत चिद्घनअमृतें वोळले । अखंडबोधें धरुपों लागले । अनुभवतरु सफळ जाले । भक्तहृदयभूमिसी ॥ ३३ ॥ संतीं आर्जविला श्रीराम । श्रीराम संतांचें अंतर्याम । विश्रांतीचा निजविश्राम । फावला अवचट ॥ ३४ ॥ राम होऊनियां स्वयें । रामासि आर्जविती रामान्वयें । समुद्रासि मिळूनि प्रवाहें । गंगा वरिवरि मिळतसे ॥ ३५ ॥ सुवर्णपण न सोडित । अळंकार हेमीं मिळत । तैसें विश्वरूपें अखंडित । ज्ञानासि अनुसरिजे ॥ ३६ ॥ जडकाठिण्यविहीन । जैं डोळा पांघुरला घन । तेथींचें विलोकन अधिष्ठान । सिरकलें तेव्हां ॥३७॥ कां अखंडगगन श्रवण । निरावकाशें निःशब्द घन । तैं तेथींचें जेविं श्रवण । तैसी आस्तिक्यता आतुडे ॥ ३८ ॥ ऐसा राम परात्पर । संत स्वयें निर्विकार । ब्रह्म प्रतीतीप्रभाकर । संभवला कुळीं ॥ ३९ ॥ एवं राम संत परस्परें । प्रगटलें विश्वाकारें । धवळित सृष्टिप्रभाकरें । रूपासि आणिलें ॥ ४० ॥ संताचा कैपक्षी राम । राम प्रगट करिती विश्राम । साधु ते चि निरूपम । स्वरूप अवतारी ॥ ४१ ॥ रामब्रह्मांडनायक । संत तयाचे उपासक । रामप्रतीती निश्चयात्मक । हे रामउपासना ॥ ४२ ॥ संपयात्मक वोल्रतां ज्ञान । प्रभूसि लागेल दूषण ।

येकवचनी येकबाण । येकपत्नी जया ॥ ४३ ॥ रामचरित्र निर्दोप । त्रिभुवनामाजि विशेप । प्रतापकीर्तीचा चंडांश । ज्ञानप्रभेनें तपे ॥ ४४ ॥ हें रामकृपेचें ज्ञान । प्रगटलें समर्थापासून । अपरोक्षसाक्षात्कारीं जन । कृतार्थ जाहले ॥ ४५ ॥ परमपावन मंदाकिनी । संभवली श्रीरामचरणीं । शून्याकाश भेदूनि । मिळाली जेथिच्या तेथें ॥ ४६ ॥ स्वसुखसुखापासूनि जाली । चैतन्यशिवें हृदयासि आणिली । हृदयकमंडलीं भरिली । आत्मबोधविधीनें ॥ ४७ ॥ हें अनुभवसरिता जीवन । सेवितां होय शिवासमान । अखंड उन्मनीरूप विज्ञान । समाधिसमुद्रीं बुडालें ॥ ४८ ॥ हे स्वसुखोद्भवपदगंगा । आत्मशिवसेव्य भवभंगा । सच्चित्पदत्रिपथगा । पदत्रय उत्धरी ॥ ४९ ॥ प्रत्यक्षबोधें पद दे अभंग । हे स्वानंदउदधीं निस्तरंग । आत्मारामाचा अंतरंग- । दशा प्रगटली ॥ ५० ॥ अभेदावर्ण भंगोनि । उर्ध्वगती ज्ञानवाहिनी । प्रवाहें मूळासि परतोनी । अभिन्न जाली ॥ ५१ ॥ स्वरूपसागरीं स्वसुखें । सरिता मिळाली अनंतमुखें । पावन उदक तिये सारिखें । जगीं असे चि ना ॥ ५२ ॥ गंगासागरसंगमांत । स्वामीकृपेनें जालों सुस्नात । अनुभवनिष्कर्में गल्यर्थ । संकल्प सोडिला ॥ ५३ ॥ केलें मोक्षाचें तर्पण । निवांत राहिलों निरंजन । गंगेसहीत पावन । रामपदीं स्थिरावलों ॥ ५४ ॥ हे अभिनव सद्गुरुकृपा । कांहीं उरों नेदी संकल्पा । चिदानंदसुखें स्वरूपा । सरतें केलें ॥ ५५ ॥ आटलें स्वानुभवजळ । उरलें स्वरूप चि केवळ । तीर्थफळ निर्मळ निश्चळ । प्रतीतीनें ॥ ५६ ॥ हें तीर्थस्वरूप पावन । रामपदतीर्थमहिमान । हृदयीं रिघतां सनातन । स्वरूपसुख दे ॥ ५७ ॥ गुरुरामपदतीर्थ सेवी । तो बुडेना भवार्णवीं । देत स्वरूपाची पदवी । प्रगटित जनी ॥ ५८ ॥ संकल्पशून्य निजविचारें । निजप्रतीतीच्या विवरें । रामपदप्राप्ति निर्धारें । राहिली वाचा ॥ ५९ ॥ उपमेसि नाहीं प्रमाण । साक्षी साक्षत्वाविहीन । अन्वयव्यतिरेक निर्वाण । पक्ष दोनी ॥ ६० ॥ हें सीतारामाचें अभ्यंतर । भक्त पाऊनि साचार । उपासना साक्षा-

त्कार । चालविती सुखें ॥ ६१ ॥ पदार्थप्राप्तीसि सुवर्ण । कीं जगत्प्रवृत्तीसि कारण । तेविं आत्मप्राप्तिअधिष्ठान । दैवत सद्गुरु ॥ ६२ ॥ अमृतसंभवीं चंद्रमंडळ । अमृत सेऊनि तात्काळ । अमृताधिष्ठान केवळ । केविं उपेक्षावें ॥ ६३ ॥ जेथूनि स्वरूपसाक्षात्कार । जेथूनि स्वानंद अगोचर । ते चि पदप्राप्ति निरंतर । सेविजे उपासना ॥ ६४ ॥ अन्वयक्रमव्यतिरेकें । प्रकृतिपुरुष सुखात्मकें । अभिवंदिली गतिदायकें । परात्पर बोहरें ॥ ६५ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । रामउपासना अंतर्कळा । ह्मणे मेरूअनंत ॥ ६६ ॥ पंचमरुद्रे नवमउल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीराम अन्वयव्यतिरेक । व्याप्य व्यापकता येक । बिंब बिंबानुमापक । आणि अविछिन्न ॥ १ ॥ तुर्या सहज उन्मनी । व्यतिरेकें आली अधिष्ठानीं । पाहतां अविछिन्न निर्गुणी । कांहीं च नसे ॥ २ ॥ स्वानुभवस्वानंदस्थिती । गुरुकृपा निजप्रतीती । अखंडैकरस विश्रांति । समाधितुळिका ॥ ३ ॥ निघाली सुमनाची दैती । मेळवितां नये मुक्तीच्या हातीं । तेवीं निवृत्तिरूप विश्रांति । मिळाली स्वरूपीं ॥ ४ ॥ स्वानुभवाचे दीप उजळले । चिदाकाशीं विसांवले । सुलोचन जन्हीं तेथ जाले । तन्ही परतोनि नाणिती ॥ ५ ॥ हा व्यतिरेकक्रम अनुपम । सद्गुरुकृपेचा परम । अविछिन्नपरंपरेसि संगम । जाला ह्मणोनि ॥ ६ ॥ कल्पांत सूर्यदृष्टी उघडली । अक्षयसुधाकारीं वृष्टी केली । दृष्टीची दृष्टी झांकोळली । तेज पाहिलें ते ॥ ७ ॥ हे हंसतुळिकेसि बैसोनी । कारणाच्या निजनिदानीं । अंगीच्या अंगीं विसावोनी । डोल येती सुखाचे ॥ ८ ॥ जे उपशांतीची शांती । जे विदेहस्थितीची स्थिती । जे अखंडैकरसविश्रांती । झेंप घालित सखें ॥ ९ ॥ जे निजा-

यांची युति । जे परावरसुखें आइति । भेटों आली स्वमानता ॥ ११ ॥ सहज सुमन अरुवारी । सहज सुखाचा डोल धरी । सहजावबोध अ-गोचरी । दृढावली दशा ॥ १२ ॥ तें स्वरूपदशेचें अनुसंधान । अव-धानकल्पतरूचें आख्याम । श्रवणपदार्था दिनमान । केलें ज्ञानप्रभाकरें ॥ १३ ॥ ब्रह्म सदोदित आपण । ब्रह्मप्रतीति सनातन । ब्रह्म गुरुकृपा अवधान । अपरोक्षसुखें ॥ १४ ॥ ब्रह्म प्रतीतीचें जिव्हार । ब्रह्म स्वसु-खाचें अभ्यंतर । ब्रह्म गगनाचें निरंतर । आकाश स्वयें ॥ १५ ॥ ब्रह्म श्रवणार्थी प्रगटे । ब्रह्म मननीं आतुरटे । ब्रह्म निदिध्यासें निकटें । प्रत्यक्ष साक्षात्कारी ॥ १६ ॥ हा ब्रह्मप्राप्तीचा निदिध्यास । ब्रह्मस्फूर्ती-चा सर्वांगन्यास । हा ब्रह्म स्वरूपाचा संन्यास । सद्गुरुकृपेचा ॥ १७ ॥ जाणें ना येणें जया देशीं । करणें ना धरणें जयासि । स्वरूपक्षेत्रस-न्यासी बोलिजे यातें ॥ १८ ॥ विलंब न करिता सर्वथा । प्राथिलें अन-तस्वरूप तीर्था । लागुनि शिखासूत्र कृतार्था । पात्र जालों कृपेसी ॥ १९ ॥ लागिलें काया काषायवस्त्र । फोडिलें हृदयकमंडळपात्र । नाही योगदंड परत्र । परमहंसदिक्षा ॥ २० ॥ लाधलों देशिकप्रसाद स्वानंद । सद्गुरु सुखप्रद निर्द्वंद्व । पदानुवेधदीक्षात्रिपद-। व्याख्या कवण करी ॥ २१ ॥ ब्रह्मसुखाचा अनर्भाव । स्वयमात्मा स्वानुभव । ब्रह्मानंद गुरु-देव । सन्यासग्रहण ॥ २२ ॥ राम ब्रह्मप्रतीति पूर्ण । दोनी दशा स-मसमान । का जे ज्ञानेंवीण निर्गुण । अनुभवासि न ये ॥ २३ ॥ ब्रह्मेंवीण ज्ञान कायसें । ब्रह्मज्ञानसमरसें । सायुज्य सामरस्यरसें । प्रतीतीसी आलें ॥ २४ ॥ ब्रह्म सहज निर्विकार । ज्ञानें केला जगदुद्धार । स्वरूप अखड निर्धार । [1]अवघड फडा ॥ २५ ॥ तेथें नसोनिया अवभास । अखडाकारें चिद्वि-लास । तो मा रेखारूप पैस । तेथ उमटला ॥ २६ ॥ त्याचि सुमोरें ऊर्ध्वे चढे । अलक्ष अतर्खेचरीं रूढे । स्वरुपावरी दशा विरूढे । साक्षात्कारें ॥ २७ ॥ पाठथें उलथोनि पाठिमोरें । गगन तुटोनि पडे पैसारें । चढणीचें लक्ष येकसरें । घसरोनि जाय ॥ २८ ॥ पडे अर-

1 (?) तक्ष, चीर, भेग,

चट विस्मयार्णवीं । जेथें निदानासी अनुभवी । कारण स्वरूपीं कवी । आदिविधाता ॥ २९ ॥ प्रसवलें ज्ञान जेथुनि । प्रवेशले प्रतीतीसि तेथूनि । स्वयंप्रभेची धरणी । निदानासि आली ॥ ३० ॥ तळीं हारपली धरा । वरता ठाव नाहीं अंबरा । हा स्वसंपादीचा सोपारा । मार्ग सांपडला ॥ ३१ ॥ चरणेंविण जेथें चालणें । आकृतिवीण पदा येणें । वेगेंवीण विजेवेघणें । स्वरूपपर्वतासी ॥ ३२ ॥ ब्रह्मगिरीवरील मध्यस्थ । अनुभवशृंग अतिउन्नत । गुरुकृपेनीं आधिष्ठित । तो वसें तया शृंगीं ॥ ३३ ॥ या अनुसंधानस्थिती । गुरूबोध सत्ता निगुती । गुरुभक्तिबळें प्रतीती–। ब्रह्माचळीं पाविजे ॥ ३४ ॥ मुळीं च नसोनी मीपण । जालें अकल्पित भवभान । तयामाजीं ब्रह्मानुसंधान । चिद्‍रत्न सांपडलें ॥ ३५ ॥ अनंतसद्गुरुकृपारत्नें । रत्नसानु सुखसन्मानें । येकैकरत्न स्वप्रभेनें । प्रकासी चित्सूर्यासी ॥ ३६ ॥ अद्भुत गुरूकृपासुरतरु । विभूषित सद्भावमेरु । मौळीसि ऐश्वर्याचा धुरु । ध्रुव केला जेणें ॥ ३७ ॥ गुरुकृपामृतसरोवरें । स्वरुपानुभवीं जळचरें । अपरोक्षसुरभीचीं खिल्लारें । परिपाळीत निजांगीं ॥ ३८ ॥ ब्रह्मप्रतीतीचे सुरवर । ब्रह्मस्थितीचे ऋपेश्वर । ब्रह्मदशा अगोचर । वसती सिध त्या पर्वतीं ॥ ३९ ॥ खेचर भूचर वनचर । ब्रह्मानुभवीं निरंतर । यक्ष पिशाच्य विद्याधर । आश्रित सुवर्णाचली ॥ ४० ॥ निजात्मयोग प्रभाकर । ब्रह्मा विष्णु महेश्वर । ब्रह्मानुभवें साचार । वसविती ब्रह्माचल ॥ ४१ ॥ सकळ स्थितीची निजस्थिती । ब्रह्मावबोध वसुमती । ब्रह्मबोधकटाहउत्पती । अप्रांत शिखरें ॥ ४२ ॥ भूर्लोक भूवर्लोक प्रलयें । अनुभवस्वर्गें प्रकाशमय । तळातळ उर्ध्व निश्चयें । शोभविली आत्मभूधरें ॥ ४३ ॥ अपरोक्ष गुरुकृपा ऐश्वर्य । नित्यप्रदक्षणा करी चित्सूर्य । स्वानंदामृतकर आश्चिर्य । चंद्र परिवेष्टीत ॥ ४४ ॥ स्वबोधगतीचीं सुक्षेत्रें । नित्य प्रदक्षणा करिती नक्षत्रें । ब्रह्मदीक्षा ब्रह्मांडसूत्रें । वसे अखंडाचळ तो ॥ ४५ ॥ स्वर्ग मृत्यू पाताळें । हे त्रिगुणात्मक

१ चढून जाणें. २ मेरुपर्वत. ३ शिखरावर, ४ अमेसर. ५ पृथ्वी.

त्रिकाळें । आश्रय करूनि ब्रह्माचलें । रुढीसि आलों ॥ ४६ ॥ हा गुरुकृपेचा ब्रह्माचल । वसविला गुरुभक्तांनीं केवळ । ब्रह्मामृतप्राप्ति अकळ । सिध्दि बोळली तयां ॥ ४७ ॥ अक्षोभसागराचा झरा । आटेना उष्णकाळीं विवरा । निर्झर गुरुकृपाजिव्हारा । पासुनि वाहतसे ॥ ४८ ॥ हा ब्रह्माचल गंगाधर । सद्गुरुप्रसाद अगोचर । ब्रह्मानुभव साचार । हृदयीं धरावा ॥ ४९ ॥ ब्रह्मार्थदानीं परमेश्वर । हा ब्रह्मार्थाचा होय कुबेर । जगाचा जनक साचार । सेवीजे सज्जनीं ॥ ५० ॥ येणें जगाचें अंतर घेतलें । स्वरूप आपणचि अनुभविलें । स्वास्तव यासि च जवळ केलें । पाहिजे सर्वदा ॥ ५१ ॥ हा स्वभावसिध्दीनें फळला । तरी स्वरूपयोग निवळला । ज्ञानामृतघन बोळला । तरी काय येक न करी ॥ ५२ ॥ स्वरूपप्राप्ति अवचट । ऐसे याचें दर्शन उत्कट । स्वरूपज्ञानाचा लखलखाट । तेजोनिधी पर्वत ॥ ५३ ॥ निवांळले दृष्टीस निजतेज । दर्शन ब्रह्मगिरीचें सहज । निजगोप्याचें ही गुज । अनंतगुहांपर्वतीं ॥ ५४ ॥ सिध्दिदेशिककृपा सुप्रसन्न । तरी च ब्रह्माचल अवलोकन । गुरुदक्षणामूर्तिईक्षण । इतुकें करी ॥ ५५ ॥ जन्मजन्मांतरींचीं साधनें । सुकृतें असतील असाधारणें । तरी च या ब्रह्माचळदर्शनें । कृतार्थ होईजे ॥ ५६ ॥ जें जें जयाचें साधन । ते तें त्या प्राप्तीसि कारण । कांहीं नव्हे साधनावीण । हें प्रसिध्दि पहा ॥ ५७ ॥ जेथें प्रयोजन परिदृश्य । तेथें चि प्रयत्न होय विशेषें । प्रयोजनमनुद्देशें[१] । न मंदोपि प्रवर्त्तते ॥ ५८ ॥ अनंतप्रयोजन सिध्दी जाय । अनंतप्राप्ति होय स्वयें । तो हा अनंत सद्गुरु होय । स्वयंभ सुखाद्री ॥ ५९ ॥ तें चि पुढें निरूपण । सद्ज्ञानाचें दृढीकरण । ज्ञानगंगाधार भाषण । अवधारिजे श्रोतीं ॥ ६० ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । स्वरूपाचळ देखिला डोळां । ह्मणे मेरुअनंत ॥ ६१ ॥ पंचमरुद्रे दशम उल्हास संपूर्ण ।

---

१ प्रयोजनमनुद्दिश्य न मंदोऽपि प्रवर्तते । कांहीं उद्देश असल्याशिवाय अगदीं अप्रबुद्ध मनुष्य देखील कांहीं करावयास तयार होत नाहीं.

श्रीरामचंद्रायनमः। श्रीरामीं पूर्ण प्रसन्नता। भक्तपरिपाळणसत्ता। मनोरथसिध्दी तत्वता। अघटीत घडे ॥ १ ॥ रामकृपा यत्न निजप्राप्ति। अकल्पित योग फळती। असंभाव्य दशा वोळती। इहपराविभवें ॥ २ ॥ यत्नें असाध्य साध्य होय। यत्नें अकाळ फळों लाहे। यत्नें आपआपणासि पाहे। दशा ते परम ॥ ३ ॥ यत्नावाचूनि अल्प ही न घडे। यत्नेंकरूनि श्लाघ्यता घडे। यत्नें स्वसायुज्य आतुडे। यत्नें गुरुवंदन करावें ॥ ४ ॥ हे काय ब्रह्मविद्या ह्मणती। तस्मात कठीण आहे प्रतीती। वोळटिया गुरुमूर्ति। यत्नें चि फळे परमार्थ ॥ ५ ॥ चित्रीं लिहिला हुताशन[1]। न करी पाकसिध्दी जाण। तो प्रत्यक्ष जाळियावीण। समाधान नव्हे ॥ ६ ॥ चित्रतरुचे छायेसी। विश्रांति पाविजेल कैसी। कां दर्पणींच्या मुक्तराशी[2]। काय भोगा येतील ॥ ७ ॥ कीं स्वप्नींचे नाना पदार्थ। जाग्रतीसी येतील कार्यार्थ। तेविं केलीया वाचोनी व्यर्थ। इहपर होय ॥ ८ ॥ दिव्य तरूचीं रसाळ फळें। जळीं बिंबलीं प्रांजळें। तीं घेऊनियां करतळें। काय भक्षी जनीं ॥ ९ ॥ मनें कल्पिला पदार्थ। तितुकां ही होय व्यर्थ। परंतु ईश्वरसत्तेचा समर्थ। योग सर्व ही पुरवी ॥ १० ॥ सोपें नव्हे ब्रह्मज्ञान। सिकोनि भोगिजेत भूषण। निरसली पाहिजे दारुण। कल्पना अंतरींची ॥ ११ ॥ जैसे पोलादाचे चणे। दातेंविण लागे खाणें। तैसे परोत्कृष्टत्वें[3] साहणे। नाना अघाती ॥ १२ ॥ मनें करुनिया पायवाट। पाहावा लागे निजशेवट। जेविं अवघड कडाचि नीट। वेधिजे पांगुळें ॥ १३ ॥ ऐसें न होतां निश्चयात्मक। अनुतापें घ्यावें लागे मस्तक। प्राण समर्पूनि सम्यक। देव प्रसन्न करावा ॥ १४ ॥ ऐसें हें यत्नाचें साधन। आठवितां कांपो लागे मन। थरारूं लागेल आसन। निजविवेकाचें ॥ १५ ॥ ह्मणोन साधनें साध्य न होय। कृपेनें वोळला गुरुराय। कैवल्यसिध्दीचा प्रत्यय। तरि च पावे ॥ १६ ॥ लोभ निर्लोभ करावा।

---

१ अग्नि. २ मोत्यांच्या राशी. ३ (?) मोठे कष्ट.

विश्वासि बोध दृढ व्हावा । शोकसिंधु निस्तरावा । सद्गुरुभजनें ॥ १७ ॥ नित्य गुरुबोधामृतपानें । न बाधी त्या विकल्पाचें मरण । अक्षय आत्मदर्शन । होय देशिककृपेनें जया ॥ १८ ॥ ज्या प्रणवा ऐसा तरंग । उमटे अंतरीं निस्तरंग । सद्गुरुकृपेचा अंतरंग । उपशमें आतुडे ॥ १९ ॥ निवांत आस्तिक्यस्वभाव । चित्कल्लोळ तो प्रणव । जगत्प्रवृत्ती दुर्भव । उकळ्या टाकी ॥ २० ॥ चतुर्विध अष्टविध । पाचीकयोग पंचविध । प्रमाण रहित अनेकविध । आभास इतुका ॥ २१ ॥ ह्यान्ही शून्यें पूर्ण ओंकार । मुळींचें शून्य निर्विकार । महाशून्य निराकार । सद्गुरुकृपा ॥ २२ ॥ प्रणव जाणिजे षडाक्षर । घोमित्येकाक्षर विस्तार । बिंदु नाद आणि चत्वार । मातृका तेथिच्या ॥२३॥ स्थूळासरिसें विराट । निरसूनि करावें सपाट । हिरण्यगर्भयोगें अवचट । साह्न्या अक्षरीं जावें ॥ २४ ॥ प्रणवाचें सहावें अक्षर । जाणिजे चित्कळा अगोचर । प्रत्ययज्ञानें निरंतर । दृढीकरण किजे ॥ २५ ॥ परिपक्व उन्मनी । सेव्य अनुभवसमाधानीं । सहज आस्तिक्यासि पावोनी[1] । साक्ष्यत्वीं स्फुरे ॥ २६ ॥ ऐसें स्वाभाविक असता । साधन सिध्दी तत्वतां । सद्गुरुकृपा परमार्था । पाववी अवचट ॥ २७ ॥ ना तरि दुस्तर हा भवसागर । जीव भवजळींचे जळचर । मायाजंजाळ जाळे घोर । काळढीवर ग्रासीतसे ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ संसारः सिंधुरूपेण मीनरूपेण मानवाः ॥
जंजालो जालरूपेण कालरूपेण धीवरः ॥ १ ॥

येक मरमरोनी जाती । येक ते शाश्वत मानिती । हे अभिनव स्थिती गती । नवनव मायेची ॥ २९ ॥ प्रातःकाळीं जें देखिलें । तें माध्यानीं नाहींसें जालें । माध्यानीं होतें तें वारलें । सायंकाळीं पाहतां ॥ ३० ॥ एवं मृत्युलोक हा ऐसा । काळासी काळ ग्रासी कैसा । शरीराची वयसा । प्रमाणी नुरे ॥ ३१ ॥ वैरणीं घातले कढती । म्हणोनि पात्रांतील हंसती । परि तयासि हि ते चि गती । प्राजळ कळलें पाहिजे ॥ ३२ ॥

---

1 विर्प्र. २ (1)

दिवसरात्रीं सर्व भूतें । पावती ते यमालयातें । शाश्वत मानिती उरले ते । आश्चिर्य ऐसें ॥ ३३ ॥

॥ श्लोक ॥ अहन्यहनि भूतानि गच्छंति हि यमालयं ।
शेषास्थावरमिच्छंति किमाश्चर्यमतःपरं ॥ १ ॥

काळमुखीं पडले जन । तऱ्ही न करि स्वहितस्मरण । भवदुःखें सिणोन । वीट न मनीं प्रवृत्तीचा ॥ ३४ ॥ मोहमदिरापान केलें । तेणें गुणें उन्मत्त जाले । निजशुध्दी विसरले । प्रवर्तले विषयीं ॥ ३५ ॥ दिवस उगवे रात्री होय । प्रपंचसुखें मानीं विसये । व्यर्थ आयुपाचा क्षय । प्राणहाणि हें नेणे ॥ ३६ ॥ प्रवर्तला नाना व्यवसायीं । प्राणी यासि उसंतें चि नाहीं । ह्मणे मज मरावयासि ही । अवकाश असे ना ॥३७॥

॥ श्लोक ॥ आदित्यस्य गतागतैरहरहः संक्षीयते जीवितं ।
व्यापारैर्बहुभारकार्यगुरुभिः कालो न विज्ञायते ॥
दृष्ट्वा जन्मजराविपत्ति मरणं त्रासोऽस्य नोत्पद्यते ।
पीत्वा मोहमयीं प्रमादमदिरामुन्मत्तभूतं जगत् ॥ १ ॥

आपुलिया वासनापासीं । सांपडोनि पात्रे मरणासी । ऐसा शत्रु आपआपणासि । होऊनि ठेला ॥ ३८ ॥ कांहीं विवेकाचा मार्ग धरा । गुरुकृपा भवसिंधु तरा । स्वरूपस्थितीचा करा । दृढाव अंतरीं ॥ ३९ ॥ मरणेंवीण मरतो जीव । धावाधावी करा सदैव । सद्गुरूसि अर्पूनि सद्भाव । सार्थक करावा ॥४०॥ वर्तमान ऐसें चि असेलसा । मानूं नका सत्य भरवंसा । काळसंसर्गें मृत्यु सरिसा । भोगावा भ्रम दुस्तर ॥४१॥ संग धरुनी साधूचा । लाभ घ्यावा भजनाचा । विश्रांतियोग सद्गुरूचा । सेवीजे सहवास ॥ ४२ ॥ बाप हो मुदल वेचूं नका । अवचिता पडेल काळधका । साधनसिध्दीनें विवेका । जागवा अंतरीं ॥ ४३ ॥ जागवा हृदयमहिंद्रीं । लागलीयासि दीर्घ निद्रा । प्रसन्न करूनि गुरुबोधचंद्रा । अजरामर व्हावें ॥ ४४ ॥ स्वरूपामृतकर सत्वर । मौळीं ठेवूनि जाला अमर । स्वरुपसिध्दी चंद्रशेखरें । रामचंद्रयोगें ॥ ४५ ॥

---

१ महाभारत वनप. यक्षप्रश्न. २ विश्रांति. ३ भर्तृहरि. वै० श०. ४ (१). महेन्द्रा, ईश्वराला. ५ शंकर.

अनुग्रहो ज्ञानगंगाधर । सकळांसि होय सुखकर । परि निजांगें चि अगोचर । नित्यसुखानुभवी ॥ ४६ ॥ तो अविनाशसुखाची राशि । जीवें सोडूं नका तयासी । प्रसन्न करूनि विश्वेशासी । ठेवणे घ्या आपुलें ॥ ४७ ॥ भावें सरसावोनि निकट । सप्रेम व्हावें एकनिष्ट । धुरेसीचें घाला विस्पष्ट । गाठी निश्चयाची ॥ ४८ ॥ दृढनिश्चयाचेनि बळें । कास घालावी अर्थसळें । महावाक्यादि वाक्यमेळें । वेव्हार करावा ॥ ४९ ॥ धुरें जिंतूनि येक वेळे । निजयी व्हावें स्वळीळे । भोगावें स्वानंदसोहळे । दृढोत्तरभक्तीनें ॥ ५० ॥ धुरेसी अतिसबंध आहे । जितावयाची चिंता काय । साधुसज्जनसमुदाय । पाचारा सकळ ॥ ५१ ॥ धुरेचा निजनिवाडा । करितील हा साधूचा पवाडा । आत्मसाक्षात्कार रोकडा । देऊनि बुझवितीं ॥ ५२ ॥ ऐसे यथार्थ असता । विचार काय येथें पवाडता । सद्भक्तीनें धुरेसीं भीडता । धुरेचि ते होयीजे ॥ ५३ ॥ आता माघारे सरणें । होतें जीतचि मरणें । मरोनि कीर्ति उरवणें । हे चि श्लाघ्यता ॥ ५४ ॥ धुरेसीं गाठी घालूंचि नये । घातली तरि ते सोडूं नये । जीवें जावोनि तरी स्वयें । यशस्वी च व्हावें ॥ ५५ ॥ पाहा रावणें निश्चयो केला । धाडस धरून त्रिभूसी भिडला । पुत्रपौत्रेंसीं आटला । ढळला नाही सत्वासी ॥ ५६ ॥ वीरवृत्तीच्या वैभवें । अंतीं रामरूप स्वभावें । राम चि जाला स्वानुभवें । महापुरुषार्थी ॥ ५७ ॥ तेवि सर्वस्वें समर्पिजे । परि गतीसी कारण होयिजे । नाना सायासें अनुभविजे । निजठेवणें मुळींचें ॥ ५८ ॥ जीवाचें निजठेवणें । ईश्वरापासीं विद्यमानें । असोनि भवदरिद्रानें । पीडले जीव ॥ ५९ ॥ विभाग न देता कांहीं । आपण चि अनुभवतो पाहीं । श्रुतिशास्त्रें घालुनि प्रवाहीं । सीक्षितो जना ॥ ६० ॥ आज्ञासी दडितां न्यायें । स्वयें करितो अन्याये । मुळींहूनि प्रपंचकर्त्ता हाये । थोर लाघवी हा ॥ ६१ ॥ अविद्येच्या हातीं देऊनि । कोंडी भोगवी दुःखाच्या जनीं । जन्मांतर आवर्त घालूनि । तमासा पाहतो ॥ ६२ ॥

१ अघाटीवर २ ( ? )

जगाचा मायबाप ह्मणवी । आणि अनर्थासी कारण करवी । विश्वाच्या आस्तिक्यें गोसावी । होय कांहीं नेणसा ॥ ६३ ॥ संतति दवडूनि दूरि । येकटा राहे निजमंदिरीं । आळंगिली निजांतरींची अंतरी । पोटपोसा ऐसा ॥ ६४ ॥ आपण ह्यातारा निर्गुण । इच्छा प्रिया तरुण । [1]उभययोगें संपूर्ण । सुखी होतसे ॥ ६५ ॥ जो जो पुरुषार्थी जाहला । तो तो विभाग घेऊनि गेला । उमें चि केलें बैसावयाला । आज्ञा न देत ॥ ६६ ॥ ठेव्यासी घातलें खाण । आईका तयाचें वचन । ईश्वरासी उमे करून । वेतलें निजआस्तिक्य ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ [1]भुंक्षे गुप्तं बत सुखनिधिं तात साधारणं त्वं।
भिक्षावृत्तिं परमभिनयन्मायया मा विभज्य ।
मर्यादायाः सकलजगतां नायक स्थापकस्त्वं ।
युक्तं किंतद्धि भजनमिदं योजयस्वात्मजानु ॥ १ ॥

सद्गुरु शिवापासीं । लाहोनि निज विभागासीं । स्वसुखचिद्विलासी । जाहले सज्जन ॥ ६८ ॥ आत्मउपासनानुसंधान । पुढें षष्ठ रुद्रीं आहे संपूर्ण । पंचम रुद्रीं विरक्तिआख्यान । जाहलें क्रमें करूनि ॥ ६९ ॥ पांचवा हा अनुतापरुद्र । केवळ स्वसुखसमुद्र । परमानंद सांद्रें । साक्षात्कारीं ॥ ७० ॥ ज्याच्या विलोकनविवरें । पाविजे विश्रांति थोर । अवधान देऊनि हृदयांबरें । सांठविजे परमार्थ ॥ ७१ ॥ तुह्मा संतांसी तोषविजे । ऐसें निरूपण नाहीं सहजें । जेथें उल्लेख चि न निपजे । तें हृदय तुमचें ॥ ७२ ॥ जेथें अनुत्पन्न संसार । तेथें केवि कीजे विपत्तिविस्तार । असोत या लाघवकळा निर्धार । मज तुमचे ठायीं ॥ ७३ ॥ मी याचा ना याचक । हें तुमचें चि स्मरणें निश्चयात्मक । परमामृत ब्रह्मात्मक । प्रमेय आपुले कृपेचें ॥ ७४ ॥ जेथूनि वाचेसी आलें । तें चि आइकवी जगन्मूळें । हें अवधान सगळें ।

---

१ हे तात, समाईक असा गुप्त सुखाच्या ठेव्याचा तूं एकटाच उपयोग घेतोस आणि आह्मां तुझ्या मुलांना मात्र लबाडीनें वेगळें काढून भिक्षा मागावयास लावतोस. पण सर्व विश्वाला मर्यादा नियम घालून देणाऱ्या तुला हें शोभतें काय ? तरी आतां आमचा वांटा आह्माला दे. २ भरपूर.

धावें पुढीलिये निरूपणीं ॥ ७५ ॥ अवधान तें अमृतपान । तेणें प्रमेय चाले निरूपण । पष्ठ रुद्रीं परंधाम । प्रगटेल हृदयींचें ॥ ७६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । भावें ईश्वर प्रसन्न केला । ह्मणे मेरुअनंत ॥ ७७ ॥ पंचम रुद्रे येकादश उल्लास संपूर्ण ॥

---

## रुद्र ६ उल्लास १

॥ श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः ।

श्रीरामं परमानंदमुपदेष्टारमीश्वरं ।
व्यापकं सर्वलोकानां कारणं तं नमाम्यहम् ॥

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ निजप्रत्ययें । स्वरूपसिद्धसांप्रदायें । तत्व जीवीं धरूनि स्वयें । एवं अनुष्ठिजे ॥ १ ॥ टाकूनि मनोमय उपाधी । होइजे वस्तुरूपें निरुपाधी । स्वरूपउपलब्धीची शुद्धि । गुरुप्रसन्नता ॥ २ ॥ अनुतापें धडधडीत । सत्वें उपरमलें चित्त । स्वरूपदशा अखंडीत । दृढावीत ज्ञानें ॥ ३ ॥ निरसूनि बाह्यवृत्तिसंसर्ग । लागों नेदी मानसोपसर्ग । विकळसाधनविघ्नविसर्ग । येऊं चि नेदी तो ॥ ४ ॥ अहंस्फूर्तीचें विसर्जनें । प्रबोधें करवी भवतर्जन । देहात्मबुद्धिबीजभर्जन । ज्ञानाग्निप्रभवें ॥ ५ ॥ निजयेकांत सेऊनि । निजविश्रांतिनिरंजनीं । प्रसन्न चित्तासीं प्रार्थूनि । आसनजयो कीजे ॥ ६ ॥ समवृदासनीं दृढाव । घनावे निर्विकल्प स्वभाव । आठव विसर ना अभिनव । ते दशा रूढवावी ॥ ७ ॥ प्रथमाभ्यास खेचरी । अखंड स्वरूपाची अगोचरी । दशा ते चि निर्विकारी । जे अवस्थेविहीन ॥ ८ ॥ यो दशेचें अंतर्याम । त्यातें बोलिजेल पैं यम । आता नियम तो परम । प्रतीतीनें ध्यावा ॥ ९ ॥ ज्ञानकुबेरसदनीं निधानें । प्रबोधविवेक त्यासीं संरक्षण । विरक्तिअभ्याससाधन । नाना प्रकारें ॥ १० ॥ तेवि स्वरू-

---

१ साधनाला व्यर्थ करणाऱ्या विघ्नाची उत्पत्ति. २ त्याग. ३ संसारनाश. ४ दडपणा. ५ आत्मज्ञानरूपी ठेवा. ६ अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते भ. गी. ६–३५.

पार्थ स्वानुभवें । रक्षिजेति जीवींच्या जीवें । नियम जाणिजे सद्भावें । स्वरूपदृढीकरण ॥ ११ ॥ ऐसा नियम दृढावला । स्वरूपअवधानीं स्थिरावला । नित्य प्राणायाम साधिला । पाहिजे निजसाधकें ॥ १२ ॥ त्राहटक तो श्वासनिष्कासन । सुषुम्नायोगें अवग्रहण । गगन भरूनि प्रभंजन । जिरऊनि सोडिजे ॥ १३ ॥ अखंड रेचावा तो रेचक । निरंतर वोढावा कुंभक । विस्मयाची घेऊनि बैसक । निवांत व्हावें ॥ १४ ॥ उपक्रमें ब्रह्मस्फूर्ति । उपसंव्हारें निजप्रतीति । अकाळकाळीं योगस्थिति । प्राणायामदशा ॥ १५ ॥ देहवैकल्याचा वारा । लागों नेदावा तया सकुमारा । सोऽहस्वानंदें अंतरा- । माजि हा अभ्यास ॥१६॥ चिन्हें बोलिला प्राणायाम । आतां प्रत्याहार निरुपम । जगदांतरींचा विश्राम । वदिजेला बहुतां ठाईं ॥ १७ ॥ जेविं धुरेनें निजांगें करूनि । शत्रु निवटिजेत रणांगणीं । तेविं मायाबोधें संव्हरूनि । निजविजयश्री लाहिजे ॥ १८ ॥ जें अगोचर समाधान । तें चि प्रत्याहारलक्षण । सगुण आणि निर्गुणध्यान । जीवीं प्रत्यक्ष व्हावें ॥ १९ ॥ गुणागुणविसर्जन । स्वामींचें रूपनिरीक्षण । रात्रींदिवस सनातन । हृदयासी आलें ॥ २० ॥ नित्य चमत्काराची दृष्टि । अनंत सद्गुरु जगजेठी । सुरेख लावण्याची पेटी । निरुपम सौंदर्य ॥ २१ ॥ सद्भावपरममूर्धनीं । परमाकाशअधिष्ठानीं । स्वप्रकाशस्फटिकधरणीं । परम सुंदर ॥ २२ ॥ नित्यमुक्तता मुक्तमंडप । स्वरूपांबरें शोभा अमूप । रत्नें चिद्रवीरूप । शोभती कळसाग्रीं ॥ २३ ॥ अवचट प्राप्ति सिंहासन । समाधि अंबर अस्तरण । अनंतसद्गुरु विराजमान । बैसलासे तेथें ॥ २४ ॥ भव्यस्वरूप मनोहर । वरूनि वोवाळिजे कोटि दिवाकर । स्वरूपविश्रांतीचें माहेर । उदार स्वरूपदानें ॥ २५ ॥ अमळ सुनीळ सतेज । कमनीयरूपें द्विभुज । विशालाक्ष सहज । कूर्मदृष्टीचें

१ एकाग्या पदार्थावर निश्चल दृष्टि ठेवणें. २ श्वास बाहेर टाकणें. ३ एक नाडी. ४ आंत घेणें. ५ संक्षेपानें, खुणेनें. ६ अघाडीच्या सैन्यानें. ७ रम्यस्वरूपी. ८ ज्या केवळ पहाण्यानें च पोषणादि कार्य होतात असें पहाणें. कांसवाची मादी आपल्या पिलांचें पोषण केवळ दृष्टीनें च करते असा कविसांप्रदाय आहे.

पाहणें ॥ २६ ॥ भजनें निजमानस अर्पे । प्रतीतीनें प्रगटे स्वरूपें । अंतर्भाव विश्रांतिरूपें । प्रत्यक्ष जाला दृष्टीसी ॥ २७ ॥ विमळ स्वच्छांबरपरिधान । दिव्यकनकांबर वेष्टण । मुक्ताहार विभूषण । प्रकाशघनवर्चसें ॥ २८ ॥ पडदे मंडप चांदवे । ज्ञानचंद्रगर्भ संभवे । दिव्यस्फटिक स्वभावें । मनोहर रचना ॥ २९ ॥ प्रातर्माध्यान्हसायन्हीं । आदिमध्यांत ध्यानीं । अखंडपूजा अनुसंधानीं । अंतर्निष्ठ गुरुभक्त ॥ ३० ॥ सायुज्यप्राप्तीचें निधान । प्रत्यक्ष हें सगुण ध्यान । आत निर्गुण अनुसंधान । ध्यान अपरोक्षज्ञानें ॥ ३१ ॥ महावाक्याचें अभ्यंतर । स्वरूपगत नित्य विवर । सारूनि आठव विसर । गुरुध्यान करावें ॥३२॥ ज्ञानअंतर्भाव सनातन । ध्येय ध्यात्यावीण ध्यान । विराला उन्मेष अनुसंधान । गुरुध्यानप्रकाशें ॥ ३३ ॥ नित्यमुक्तता स्वभाव । प्रगटला सद्गुरुराव । स्वानुभवें अभिनव । पूजा बाणली ॥३४॥ ध्यानत्रिपुटी वोसरली । जेथें विश्रांति विसांवली । सहज प्रतीती संचली । हे गुरुप्रसन्नता ॥ ३५ ॥ सगुण निर्गुण ध्यान परी । निखिल विचानेंउजरी । शर्करा शर्करेंचि कुसरी । गोडी अभिन्न तिये ॥ ३६ ॥ सद्गुरुभजनाचा निर्धार । हा चि ब्रह्मसाक्षात्कार । प्राणेंसीं गेलियां साचार । देशिकभक्ति दृढावे ॥ ३७ ॥ गुरुभक्ति निजनिधानीं । निष्ठा स्वसुखसंजीवनी । चिदाकाशविद्यमानीं । धारणें चि दशा ॥ ३८ ॥ धृति निश्चळीं चळेना । जेवि गगन वायूनें ढळेना । स्वरूपधारणा टळेना । निजसत्वें ॥ ३९ ॥ तये धृतीचा निश्चय । स्वरुपीं बैसला मनोजय । न चळे न ढळे निरामय । हे वस्तुधारणा ॥ ४० ॥ स्वरूपता आसनसिद्धि । सद्गुरुरूपा समाधि । आसनजय उपलब्धी । आपआपणासी ॥४१॥ आतां मुद्रा ते अगोचर । ब्रह्मसुख द्रावक साचार । नित्य परेचें अभ्यंतर । वोळलें अमृतें ॥ ४२ ॥ मुद्रा सुधाबिंब चिद्गगन । वोळला अमृताचा घन । प्रबोधवृष्टि सनातन । अभिनव हें चिन्ह ॥ ४३ ॥ कार्यकारणेंवीण

---

१ आत्मस्वरूपाचा विचार. २ विज्ञानाचा प्रकाश. ३ आत्मरूप वस्तूचा साक्षात्कार.

केवळ । स्वसुखें द्रावलें अखिल । स्वयंभ हृदय अकळ । घोळलें आपआपणा ॥ ४४ ॥ गुरुकरराजित राजमुद्रा । स्वराज्यपद्विजय सुभद्रा । स्वरूपभद्रासनीं योगेंद्रा । योगपट्ट देतसे ॥ ४५ ॥ अनंतमुद्रा अकळस्थिति । अनंतमौनि विख्याति । अनंत श्रुति वर्णिती । मुद्रेचें आख्यान ॥ ४६ ॥ अनंतमुद्रा हे वरवी । कांहीं द्वैताद्वैत नुरवी । अपरोक्ष अनुभवरवी । अखंडमंडलवर्ती ॥ ४७ ॥ जपोनि बीजें किळिकिळी । गुरुवाक्यें ममता विकिळी । द्वैतकपाटोद्घाटण किळी । प्राप्त निजमुद्रा ॥ ४८ ॥ आतां समाधीचें निजलक्षण । स्वभावस्थितीनें गहन । मनेंविण अधिष्ठान । दशा ते समाधि ॥ ४९ ॥ हेतुपूर्तीनें शमली आधि । म्हणोनि म्हणिजेत समाधि । सहजस्वरूपाची सिद्धि । समाधि या अर्थे ॥ ५० ॥ यम नियम प्राणायाम । प्रत्याहार निरुपम । ध्यान धारणा परम । आसन मुद्रा समाधि ॥ ५१ ॥ ऐसिया प्रतीतीनें निकट । अनुष्ठानसीळ उत्कट । गुरुभक्तीनें प्रगट । उदेला सूर्य जगीं ॥ ५२ ॥ अखंडजप अखंडतप । अखंडसुखें अखंडरूप । अखंडसमाधि निर्विकल्प । गुरुभक्तीनें आगळा ॥ ५३ ॥ तो बोले तें अद्वैतशास्त्र । वचनमाळा महामंत्र । तो वसला तें सत्क्षेत्र । ब्रह्मादिकीं सेविजे ॥ ५४ ॥ तयाचें पद प्रत्यक्षपण । यंत्रोत्धारा अधिष्ठान । सायुज्यासी सोपान । मुमुक्षा आदिदैवत ॥ ५५ ॥ त्याची ज्याप्रेति तें शुद्धज्ञान । त्याचें स्वप्न मानसपूजन । त्याची सुषुप्ति सनातन । केवळ समाधि ॥ ५६ ॥ त्याची तुर्या स्वरूपता । त्याची चैर्या मोक्षसत्ता । त्याची अंतर्प्रभा तत्वता । स्वप्रकाशघन ॥ ५७ ॥ तो गुरुभक्तामार्जी श्रेष्ठ । त्याचेनि वसे वैकुंठपीठ । त्याच्या प्रसादें उत्कट । शिव कैलासीं वसे ॥ ५८ ॥ सत्य त्याचेनि महिमानें । सत्यलोकीं चतुरानन । सत्य प्रतिष्टासन्मानें । सनकादि बोधिले ॥ ५९ ॥ सत्य सत्छिष्यासी निष्ठा । सत्य सद्गुरुस्वरूपें प्रतिष्ठा । देशिक अनंत वरिष्ठा । श्रेष्ठ करितसे

१ विराजित. २ ( ? ). ३ किल्ली. ४ हेतु अथवा वासना नाहींशी झाल्यामुळें ज्या स्थितीत मन निश्चल झालें अशी स्थिति. ५ जागृतावस्था. ५ नित्य जागृत.

॥ ६० ॥ सद्गुरु अनंत प्रसन्न । तोषोन कारित संभाषण। अंतरींची दशा· गहन । आपेआप प्रगटी ॥ ६१ ॥ एवं नेदितां बुद्धीचा भाव । अतींद्रिय तो चि स्वभाव । महामौनासी मौन अभिनव । वाचेनें वदवी ॥ ६२ ॥ हें अनंतव्याकरण सुखें । विस्तारलें अनंतमुखें । स्वसुखाचेनि हरिखें । अनंत बोलिला ॥ ६३ ॥ अनतगिरा गोप्य गजर । वाचेनें वाचेचा विस्तार । काय तरी दोनि वाचा सत्कार । होय तिया ॥ ६४ ॥ तैसें आस्तिक्यें निज आस्तिक्य । स्वसुखें स्वसुखऐक्य । धन्य सच्छिष्य सद्गुरुसख्य । येकात्मतेचें ॥ ६५ ॥ ना तें सद्गुरुकृपेवीण । व्यवहारिलें जगद्ज्ञान । त्याचें करूं जातां प्रमाण । काहीं च नव्हे ॥ ६६ ॥ स्वर्गींच्या· चित्रांतील मूर्ति । नानारगें आभासती । कवण। चित्रकारें लिहिल्या मिती । कवण्या रसें ॥ ६७ ॥ या चि पत्रिकेचीं अक्षरें । पाहता अर्थान्वय विस्तारें । परि त्या निजार्थविवरें । अक्षरें नुमजती ॥ ३८ ॥ अक्षराभ्यंतर परेचा । अस्तिक्य परेश मुळींचा । तो हि अपरोक्ष परि स्वरूपाचा । अर्थज्ञ न होय ॥ ६९ ॥ अर्थासी मी अर्थ हें न कळे । अकळप्रवृत्ति निवृत्तिमुळें । हा अपरोक्षार्थ दयाळें । अनतें प्रगटिला ॥ ७० ॥ या अर्थाचे अधिकारी । सज्जनस्वरूप साक्षात्कारी । अर्थस्वरूप अर्थांतरीं । विवरों जाणती ॥ ७१ ॥ तें चि पुढील निरूपण । प्रमेय सुधा ज्ञानघन । स्वरूपउपासना प्रसन्न । निजप्रत्ययानें ॥७२॥ अवधान देऊनि निरंतर । ग्रंथामृतअभ्यंतर । होऊनि सेविजे अगोचर । ज्ञानवृंदारक श्रोते हो ॥ ७३ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । अपरोक्षसाधनअवलीळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ७४ ॥ षष्ठरुद्रे प्रथमउल्लास सपूर्ण ॥ ॥ ॥

---

॥ श्रीरामचद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ योग स्वयें । परमार्थसृष्टीचा सूर्योदय । स्वानुभवसुधामय । अखंडित बिंबे ॥ १ ॥ निजयोगविभव स्वयें । स्वरूपास्तिक्य निजहृदय । आत्मप्रसन्नताऐश्वर्य । आत्मानुभवी ॥ २ ॥ अभिनवाची दशा पाहली । समर्थदीक्षा वि-

राजली । उपासना प्रगटली । नित्यस्वरूपता ॥ ३ ॥ दिव्यचंदनीं सुवास । पाषाणघर्षणीं प्रगटे विशेष । तेविं स्वरूपाचा निजध्यास । स्वानंदयोगें ॥ ४ ॥ उपासना अपरोक्षज्ञान । आपणासी पाहावें आपण । अनुभवत्रिपुटीविहीन । नित्यात्मउपास्ति ॥ ५ ॥ सहजस्थिति सनातन । स्वामिकृपेची दशा गहन । स्वरूपाची अनुभव खूण [१]। अपरोक्ष उपासना ॥ ६ ॥ अगोचरप्रतीतींत ठाव । घेतला स्वसुखें अभिनव । सदोदित अंतर्भाव । रामउपासना ॥ ७ ॥ स्वामीसमर्थकृपेनें । अमूर्तरूपदर्शनें । करुणामृतसुखवचनें । गूज आपुलें सांगती ॥ ८ ॥ केवळ माधुर्याची मधुरता । अमृताची गोडि तत्वता । स्वानंदसुख अपरोक्षता । वचनमाळा ॥ ९ ॥ चिद्रत्नें प्रसवे रत्नाकर । कीं स्वानंदगारा जळधर । वचनामृतवृष्टिसार । निरंतर होतसे ॥ १० ॥ परिसणीं उपरमलें गर्गन । तें स्वयंभ दढावलें अवधान । स्वामीचे हृदयीं रिघोन । समरसलें प्रमेयीं ॥ ११ ॥ परा प्रमेयाची परवडी । केवळ ज्ञानपीयूषाची गोडी । आत्मानुभवदशा गाढी । प्रसन्नता परिपूर्ण ॥ १२ ॥ स्वामी ह्मणती दे अवधान । तूं तों येथें पां कवण । शब्दासरिसा प्रगटोन । श्रवणासी येसी ॥ १३ ॥ सर्वांग जाणिवेचा गुंडाळा । दृश्य द्रष्टा सकळकळा । परा अंतर्भूत जिव्हाळा । पवाडसी तेथें ॥ १४ ॥ प्रत्यक्ष आइकतोसि आईक । तुझ्या मत्यासि बोधक । तूं चि होसी निश्चयात्मक । बुध्दिसंपन्न ॥ १५ ॥ तुजमध्यें चि तुजपणें तुज । वेढा लाविलें चोज उमज । गूज तें प्रत्ययाचें निज । तूं चि होसी आगें ॥ १६ ॥ तूं चि निर्वाताचें निजधर्म । तूं चि तुजमध्यें परम । तूं च तुझें अंतर्याम । परंधामप्रत्ययें ॥ १७ ॥ तुझी निष्कर्मतादशा गहन । तूं चि महानुभव सनातन । निवळोनि अंतरीं निर्वाण—। दशेनें पाहा ॥ १८ ॥ परंतु पाहाणें यांत आश्चर्य । चमत्कारप्रमेचा चित्सूर्य । तुझ्या हृदयांबरीं कर्ता कार्य-। प्रभवें उदेला

१ घांसल्यानें. २ उपासना. ३ श्रवणानें. ४ हृदयाकाश. ५ एकरूप झालें. ६ महास्वरूपांत.

॥ १९ ॥ तुज तुझी अखंड भेटि । तुझे नि तुज स्वानंदपुष्टि । स्वयंभसुखाची परिपाटि । तुझी माहादशा ॥ २० ॥ या स्वबोधामाजि राहें । आपहृदय आपण पाहें । ऐसें अज्ञापितां गुरुत्वयें । अवधान रिघालें हृदयीं ॥ २१ ॥ समर्थकृपेचा बोध सहज । सोहंज्ञानरवि सतेज । घनवटित प्रभाचोज । पाहिली अखंड दृष्टी ॥ २२ ॥ अलभ्याचा लाभ स्वयें । स्वभावसिद्ध निजप्रत्ययें । द्रष्टाचि उडाला सदोदय । ज्ञानप्रभेमाजि ॥ २३ ॥ सद्वृत्तीचें निर्वाण । स्वभावसिद्ध बोधघन । नित्यप्राप्ति अनुसंधान । पैसावलें सुखें ॥ २४ ॥ अवचट स्वामीची खूण । अवचट बाणलें समाधान । अवचट योग हा निर्वाण । देशिककृपेचा ॥ २५ ॥ वाढलें परामूळअवधान । पाहिलें स्वानुभवसोपान । परमार्थप्रासादीं वेघोन । जाणिली दशा ते ॥ २६ ॥ जेथें वाचा ना अनुसंधान । जेथें पदार्थ ना पदार्थज्ञान । जेथें द्रष्टा ना दृश्यदर्शन । कांहीं च असेना ॥ २७ ॥ जेथ ज्ञाता चि अडळेना । जेथ ऊरि असे चि ना ज्ञाना । तेथ ज्ञेयरूप संभावना । कवणें कीजे ॥ २८ ॥ जेथ आश्चिर्यदशा मावळली । जेथ स्वभावता हि शमली । अवधानभ्रमी निवळली । निराश्रयें चि त्या ॥ २९ ॥ न स्फुरे ब्रह्मार्थसंपन्नता । स्फूर्ति प्रगटे ना तत्व ना तत्ववेत्ता । ब्रह्मानंद आश्चिर्यता । दशा अगोचर ॥ ३० ॥ ब्रह्मवेत्ता नव्हे निर्गुण । कां जे ब्रह्मत्वकल्पनाविहीन । ब्रह्म काय ब्रह्मज्ञान । अपेक्षील तें ॥ ३१ ॥ ब्रह्मवेत्ता ब्रह्म चि स्वयें । प्रतीतीच्या अंतरीं राहे । कांहीं च न होनि स्वयें आहे । अस्तिक्यता सहजें ॥ ३२ ॥ न लगे प्रवृत्तीसि प्रवर्तावें । न लगे दृश्य निवर्तवावें । न लगे निवृत्तीसि आणावें । आत्मानुभवार्थ ॥ ३३ ॥ न लगे अहंकार उपशमन । न लगे ध्यान धारणा आसन । न लगे सर्वदा अनुसंधान । ब्रह्माहमस्मीचें ॥ ३४ ॥ न लगे आत्मप्रतिष्ठा करावी । न लगे स्वरूपता विचरावी । न लगे विश्रांति धरावी । सन्मार्गचर्या ॥ ३५ ॥ नुमसे हिता-

१ विस्तारलें. २ ठाव, ठिकाण. ३ ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति । तै. उ. ४ उत्पन्न होत नाहीं.

हितस्मरण । तुमसे माझें मी हें कवण । तुमसे वेगळीकेचें भान । ऐक्यपरत्वें ॥ ३६ ॥ ऐसा आस्तिक्य अपरोक्ष । कैसेनि तया बंधमोक्ष । साक्षी नव्हे ना तो असाक्ष । कांहीं च नव्हे ॥३७॥ सर्वदा वृत्तिविहीन । नव्हे स्वजाति स्वगत भिन्न । सच्छिष्य अभ्यंतरीं रिघोन । निवळला निजउमजें ॥३८॥ ऐसा उमजला तो कवण । श्रोता पुसों बैसे सज्ञान । दृढ घेऊनि मीपण । आंगावरी ॥ ३९ ॥ जाणोनि अभ्यंतरींचा अक्षेप । वृत्तीसि न येतां साक्षेप । आक्षेपनिवृत्ति संक्षेप । सहज प्रश्नोत्तर ॥ ४० ॥ श्रवणाचें उघडूनि श्रवण । श्रवणपंक्तीसि सनातन । पुसों आलासी तरि, निर्वाण । पवाडा अर्थी बरा ॥ ४१ ॥ स्वरूपअनुभवेंवीण । युक्तिचर्चेनें होय सीण । संवादसुखामृतीं बुडोन । बुडी थावी मननें ॥ ४२ ॥ अरे मार्गें चालिल्यावीण । वस्तीसि पावला कवण । ना तरि केलियांवीण भोजन । कवण तृप्तीसि पावला ॥ ४३ ॥ प्रत्ययाचें कीजे श्रवण । प्रत्ययाचें व्हावें मनन । प्रत्ययाचें समाधान । तरी च बाणे ॥ ४४ ॥ हें अघटित चि घडे । अकळ ईश्वरीं सत्ता रूढे । प्रवृत्ति निवृत्ति पवाडे । अघटित चि पाहा ॥ ४५ ॥ अघटित विश्वसंभव । अघटित जीव शिव । अघटित अंतर्भाव । पाहा अंतःकरणीचा ॥ ४६ ॥ अघटित तें स्वरूप स्वयें । त्या अघटिताघरि घटित होये । तयाचा साक्षी प्रत्यक्ष पाहे । आप आपण चि ॥ ४७ ॥ निज जिवाचें जिव्हार । स्वानंदजीवनाची गार । नित्यात्मविवरें साचार । विघरे जीवनीं ॥ ४८ ॥ तुझा प्रत्यय तूं चि होई । येथें युक्तीचें काज नाहीं । पडों नको वायां प्रवाहीं । वित्पत्तिबळें ॥ ४९ ॥ जाणिवेनें धरिलें मीपण । भुलोनि आपणासि आपण । सज्ञान जालें अज्ञान । हे काय वित्पत्ति ॥ ५० ॥ जाणीव सांडूनि परती । अवधान देईं सुमती । स्वरूपांतरीं करी वसति । निरूपणमुखें ॥ ५१ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । उपासनयोगनिवळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ५२ ॥ पष्ठदृढे द्वितीय उल्लासः संपूर्णः ॥

१ विरघळते.

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ दयाब्धी । तुझी कृपा मज निरवधी । स्वरूपदीक्षाप्रसिद्धि । केली तुवां ॥ १ ॥ प्रत्ययाच्या श्रवणीं । कृपेनें मज बैसऊनि । हृदय वचना आणूनि । देसी मज सुखें ॥ २ ॥ रँक बैसविया सिंहासनीं । सेविजेत ना कवणीं । तेवि निजसत्ता देऊनि । प्रतिष्ठिलें मातें ॥ ३ ॥ कैवल्यकाशीक्षेत्र वसविसी । स्वानंदवनीं विलाससी । परंधामासि आणिसी । सद्गुरुशंकरा ॥४॥ ब्रह्मानंददानी उदार । ब्रह्मानंद साचार । ब्रह्मानंद शरीर । सद्गुरुवर्या ॥ ५ ॥ संभापणें निववि सी सुखें । अमृतद्राव वोळसी मुखें । निजचक्षू तव सन्मुखें । लक्षिती सुखावले ॥ ६ ॥ नाही निजप्रत्ययाची चाड । स्वामी संभापणाचें सुख वाँड । नसे उपमेसि पवाँड । गोड रहस्य वदसी ॥ ७ ॥ आइकतां निवाले निजश्रवण । विवरतां विरोनि गेलें मन । ऐसें अभिनव निरूपण । विश्रांतिजनका ॥ ८ ॥ निजप्रतीतीचा संवाद । उभवावधानीं स्वानंद । वाचा श्रवण निर्द्वंद्व । हे स्वामीची दया ॥ ९ ॥ सद्गुरुकृपा परिपूर्ण । शरण आलें ब्रह्मज्ञान । नित्यसेवेचें आंगण । आनंद वोळगे ॥ १० ॥ पायिकीं करी निजविचार । राजआज्ञा दुर्धर । सद्गुरुअनंता साचार । सत्तेनें स्थापिलें ॥ ११ ॥ आतां माझें मनोगत । जें जें होय अपेक्षित । तें तें साक्षात्कारी शाश्वत । योगप्रद करीं ॥ १२ ॥ माझी अपेक्षा तुझें स्वरूप । माझी चर्या तूं चि निर्विकल्प । माझी कृतार्थता आपेंआप । तूं चि होईं समर्था ॥ १३ ॥ माझें श्रवणार्थी मनन । होईं तूं चि माझें समाधान । प्रतीतीचे उघडूनि कान । आईकवीं रहस्य तुझें ॥ १४ ॥ तुझे सत्तेनें अगोचर । उदय करी ज्ञानप्रभाकर । तव समाधानें साचार- । धृतिधरा राहिली ॥१५॥ तुझे सत्तेचा ज्ञानसहस्रशिर । धरी स्वरूपधरा अगोचर । तव समाधानें चिद्घन सांर । वर्पे अंतरिक्षीं॥१६॥ प्रत्ययाचें ज्ञान केवळ । अनुभव समाधानं निवळ । तें तुझें हृदय अकळ । ऐसें मज कळलें ॥ १७ ॥ परंतु काहीं येक उमस । साक्षी-

१ पुष्कळ. २ पाड, बरोबरी, प्रवेश. ३ चाकरी. ४ शेष. ५ आत्मस्वरूप रूपी पृथ्वी. ६ ब्रह्मस्वरूप हें च उत्तम पाणी, ७ हृदयरूप आकाशात.

माजि सुखलेश । कोण्ही येकवेळे उमस । रूढीसि येतसे ॥ १८ ॥ तो ब्रह्माहमस्मीचा निजपुंज । विझऊनि निवांत करी मज । निजवीं निजांकीं सहज । करांगुळें थापटुनि ॥ १९ ॥ अनुभवामृतलहरी । विराली अमृतसागरीं । दाखवीं मज ते चि परी । उन्मेषासि नाणितां ॥ २० ॥ सहज सुखार्णवा स्वामी । राहें मज अंतर्यामीं । माझें हृदय परंधामीं । प्रतिष्ठीं आतां ॥ २१ ॥ गगनीं गगन वसे । हें करणें न लगे अनयासें । अवचट मज तैसें । स्वरूप करीं ॥ २२ ॥ ऐसें न होता समाधान । क्षोभासि पावे मीपण । कांहीं केलियानें अज्ञान । सरे चि ना तें ॥ २३ ॥ क्षोभलियां अनादि स्वयें । मग अवातासि उणें काय । आकाश कोसळतां होय । निवारण कैंचि त्या ॥ २४ ॥ याकारणें दयार्णवा । कृपाक्षेत्रींच्या सदैवा । दैवें जोडलासि देवादिदेवा । येणें सभाग्य आह्मी ॥ २५ ॥ हंस ते मानससरोवरीं । वसतां क्षुधा त्यासि उपचारी । तरि त्या सरोवराची थोरी । कायसी देवा ॥ २६ ॥ अमृत न करी अमरसिध्दी । तरि सेविल्यास ह्मणावें दुर्बुध्दी । प्रकाशघन सूर्यसिद्धी । याचा प्रत्यय तो चि ॥ २७ ॥ चक्षूसि दाखवी गोचर । तरि त्या ह्मणिजेत प्रभाकर । अनुभवीं दिसेना साचार । ते प्रभा चि नव्हे ॥ २८ ॥ सूर्य उदेला सृष्टी । वर्तायो अपेक्षीत दिवटी । न घालितां त्या परिपाटी । साच चि बोळें देवा ॥ २९ ॥ स्वयें चि विश्रांति सागर । तृपेनें फुटलें जिव्हार । या ज्ञानगौरवें साचार । उणीव कवणा ॥ ३० ॥ ज्ञानामृतपान करी । मरे विकल्पें वरि वरि । ज्ञान प्रशंसेची थोरी । तुझी तुज समर्था ॥ ३१ ॥ आंगें निवांत करकैर करी । अमर परि मरे माझारी । हे माझी मज अंतरीं । लज्या वाटे देवा ॥ ३२ ॥ स्वामीवचनें मी निर्विकार । स्वामीकृपेनें ब्रह्म साचार । या अनुग्रहाचा निर्धार । स्वामी करितीं ॥ ३३ ॥ जेंवि सुवर्णाद्रीसि सुवर्ण । करूनि घालणें न लगे आन । कीं प्रभाक-

---

१ माया. २ भाग्यवंता. ३ प्रयोग करते, बाधा करते. ४ विषय, पदार्थ. ५ सूर्य उगवलेला पहावयास दिवटीची गरज असते काय ?. ६ कुरकुर, कण्हेण,

रासि आणून । प्रभा देणें लागे ॥ ३४ ॥ तैसें निजास्तिक्य जिवीं । जीवाचा जीव अनुभवीं । हे तुझे दयेची पदवी । सद्गुरुराया ॥ ३५ ॥ अमृत केलियां प्राशन । होय तृप्तीचें समाधान । उपचारासि कारण[१] । मग काय असे ॥ ३६ ॥ निजप्रतीतीचें अभ्यंतर । वसे स्वरूपें चि निरंतर । त्या स्वरूपासि विवर । काय दुजा असे ॥ ३७ ॥ चक्षूसि आणि दर्शन । गगनीं न लगे व्यापकपण । स्वतःसिद्धासि प्रमाण । सांकडें न पडे ॥ ३८ ॥ स्वयें जातिवंत हिरा । त्यासी रंग न लगे दुसरा । अपरोक्ष आत्मजिव्हारा । माजि सहजें ॥ ३९ ॥ चक्षू चक्षूसि प्रत्यक्ष । पाहणें न लगे उघडूनि अक्ष । अलक्षासि अलक्ष लक्ष । दुसरें नसे ॥ ४० ॥ दृश्यद्रष्टादर्शन । अपरोक्ष ज्ञान निरंजन । चक्षुरूप विलोकन । अद्वैतदृष्टि ॥ ४१ ॥ डोळियानें देखिला डोळा । हा चि कळावा निजजिव्हाळा । पाहणें चि नुमसे अंतर्कळा । उभय दृष्टी ॥ ४२ ॥ पाहणें हारपलें पाहे । पाहतें चि न पाहतें होय । अद्वैतज्ञानासि निश्चयें । झांपडि पडली ॥ ४३ ॥ अनुभवेंवीण निजांग । हें हीं अनुभवाचें चि आंग । पारे याचि अनुभवीं निःसंग । वस्तु आकळली ॥ ४४ ॥ निरावकाशहृदयीं । विसांवलें ज्ञान लवलाहीं । तप्त धरेवरी प्रवाहि । आटलें जीवन ॥ ४५ ॥ तें माघारें न ये घेतां । द्रष्टा ना साक्षी तत्वता । तेथें ज्ञेय ज्ञान ज्ञाता । अवासीसीं[१] आला ॥ ४६ ॥ जेंवि अमृतार्णवींचा मीन । पियूषमुखें चि कडून । क्रीडला स्वइच्छा सुलीन । तेथें चि जाला ॥ ४७ ॥ नाना तेजाचा विस्तार । घेऊनि प्रळयवैश्वानर । धरी गगनाचो धारें । उपाधिहरीसें[३] ॥ ४८ ॥ जें कल्पांतीं नासे ना । त्यासी कांहीं च हें असेना । निराश्रय धरीना । कांहीं आश्रयासी[२] ॥ ४९ ॥ निराधार निर्विकार । निराभास अगोचर । निरंजन निरंतर । हें सद्गुरूचें देणें ॥ ५० ॥ दिल्हें स्वरूप साक्षात्कारें । केलें वस्तुज्ञान चेइरें । अनुभवासि आणूनि

१ प्रासीस, एकरूपता. २ आश्रय. ३ उपाधि दूर झाल्यानें.

चमत्कारें । प्रतीति घेतली ॥ ५१ ॥ आतां ते मी ना माझें । अवघें स्वरूप चि तुझें । अनादि भ्रांतीचें वोझें । उतरिलें तुवां ॥ ५२ ॥ विसावलों तुझे पायीं । आतां विकल्पासि ठाव नाहीं । मीपणाचा मौळी निश्चई । रुळतसे तव चरणीं ॥ ५३ ॥ संकल्पशून्य अभ्यंतरें । आस्तिक्यबोधविवरें । तुवां चि केलें ज्ञान चेईरें[1] । प्रवर्तलें स्वरूपीं ॥ ५४ ॥ ज्ञानघडमोडी प्रांजळ । स्वरूपामृतज्ञानें निवळ । हृदय सिंधूचे चित्कल्लोळ । येती प्रमेयाक्षरें ॥ ५५ ॥ सहजस्थितीचें लक्षण । आत्मउपासनाअनुसंधान । देऊनि सज्जनीं अवधान । अवधारिजे पुढें ॥ ५६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । स्वामिसंभापणस्वलीळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ५७ ॥ पष्ठरुद्रे तृतीय उल्लासः संपूर्णः ॥

---

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थउपासना । प्रतीतीचिया निजखूणा । गगनअवधानश्रवणा । सावध कीजे ॥ १ ॥ प्रतीतीचें अभ्यंतर । परब्रह्म निरंतर । आस्तिक्यउपासना निर्धार । गुज अंतरीचें ॥ २ ॥ निवळलें जें कां ज्ञान स्वयें । आपआपणातें पाहे । व्यापकपणासि होये । व्यापकता ज्याची ॥ ३ ॥ निवळ निजवोळखण । निवळ तुजमाजि परतोन । निवळ अवस्थातीत संपूर्ण । जाणिवेसी न येतां ॥ ४ ॥ जाणिव हे विश्व स्वतंत्र । जाणीव नावें रूपें. मूळसूत्र । आश्रय आश्रित सर्वत्र । परत्र जाणीव हे ॥ ५ ॥ जाणिवेचेनि आश्रित, निवळे । निरावरण जाणिवे वेगळें । अकळ वर्म तें आकळे । जाणीव सरतां ॥ ६ ॥ भासक भास्य भासकता । जाणीवरूप तत्वता । जाणिवेचेनि देहअहंता । कर्तव्यता सर्वही ॥ ७ ॥ त्या जाणिवेचें हृदय । निरसतां जाणीव कळों ये । तया हृदयासि अखंडोदये । केला तुझिया ज्ञानें ॥ ८ ॥ तें ज्ञान तुजमाजि नसे । ऐसें निवळलें ज्यासि दिसे ।

---

१ मस्तक. २ जागृत. ३ मूळमाया, हरिसंकल्प, ' तदैक्षत बहुस्यांप्रजायेय ' इत्यादि प्रकारचें स्फुरण. ४ परब्रह्म.

ज्ञानस्वरूपसमावेशें । निर्वाण जालें ॥ ९ ॥ रूप ज्ञानाचें निजवर्म । ज्ञानें निर्वाळलें व्योम । अगुण अद्वैत निरुपम । अपरोक्ष स्वयें ॥१०॥ ज्ञानीं त्रिपुटी जें आभासे । तें तें चि अवरोधलें असे । डोळां पदर येऊनि जैसें तिमिरें आणिलें ॥ ११ ॥ हा अनादीचा स्वभाव स्वयें । ज्ञानाचि अज्ञान होये । अज्ञान ज्ञानप्रत्ययें । निवळे गुरुकृपेनें ॥ १२ ॥ लोहाचें होय सुवर्ण । तैसें अज्ञानाचें ज्ञान । हे गुरुकृपामहिमान । अभिनव पाहतां ॥ १३ ॥ वृत्तीची जाली निवृत्ति । देहीं च ये विदेहस्थिती । प्रसन्न जालिया गुरुमूर्ति । जीव ब्रह्मत्वें अवतरे ॥ १४ ॥ स्वरूपयोगसिद्धीचा ईश्वर । जीव परब्रह्म परात्पर । हा सद्गुरुकृपेचा विचार । हृदयासि आला ॥१५॥ गुरुकृपा निजअभ्यंतर । स्वरूपयोग परात्पर । आत्माराम अगोचर । प्रत्ययासि आला ॥ १६ ॥ बाहेरी न येतां वृत्तीसी । पावलें ज्ञान चिदाकाशीं । हें तू ब्रह्माहमस्मि च मानसीं । निवळला योग ॥१७॥ काष्ठानें भक्षिलें अग्नीसी । कीं अन्नें सेविलें मुखासी । निरुपाधि आत्मयासी । मनें अवलोकिलें ॥१८॥ नाना संस्कार ज्ञानाचे । ज्ञानासि पुटीं घाढूनि मुळींचें । स्वरूपानुसंधानभावाचें । निवळलें स्वभाव ॥१९॥ घटें मृत्तिका निर्मिली । तैसीं कार्यें कारणें केलीं । बुद्धिमाजि पैसावली । प्रमेयें मुळिंचीं ॥ २० ॥ न जाणतां जाणवलें । तेंहीं जाणिवेसीचि आलें । जाणतां जाणतां विरालें । जाणीवतत्व ॥ २१ ॥ अग्नीनें जाळिला कर्पूर । तुरे परिमळ प्रकाश धूर । ज्ञानें जाणिवेचा विचार । तैसा केला ॥ २२ ॥ पाहातां सर्पाचे वेढे । येकचि परि मोजणें पडे । तेवि जाणिवेचे अँगरडे । जाणीवचि आवघी ॥ २३ ॥ जाणीव ज्याचेनि निवळे । तें आपँ जयासि आकळे । भोगिती स्वानंदसोहळे । आत्मउपासक ॥ २४ ॥ वृत्तीसि येत न येतां । स्वरूपें अस्तित्व तत्वता । प्रतीतिज्ञानाची पाहाता । त्रिपुटी तुरे ॥ २५ ॥ सिंधू-

---

१ मुक्ति. २ जों पर्यंत ज्ञानाला त्रिपुटी भासते आहे, तों पर्यंत तें ज्ञान च अज्ञानमय होय. ३ काष्ठेस. ४ मायेचा. ५ विस्तारली. ६ (?) रोळ, चाळे. ७ आत्मतत्व.



माजि सैंधवकण । रिघाले चि जाले समुद्रजीवन । तैवि चिदार्णवीं संपूर्ण । उन्मेषं हारपलें ॥ २६ ॥ ना त्या प्रळयाग्नीभीतरी । प्रळयांबु शुंडाधारीं । रिचवलें तितुकें अंतरीं । आटोनि जाय ॥ २७ ॥ किंवा प्रळयप्रभंजेनीं । विझाला जाय प्रळयाग्नि । तेवि प्रळयवायु गगनीं । निवांत होय ॥ २८ ॥ उपक्रमींच उपसंहार । अन्वय-व्यतिरेकविचार । कार्यकारणा येत संहार । न करितां होय ॥ २९ ॥ या दैविक क्षोभें करूनि । हेतुरूप अंतःकरणीं । कार्य प्रगटोनि कारणों । सामावतसे ॥ ३० ॥ नाना वसुंधरेसि बीजें । पर्जन्यें अंकुरती सहजें । अवकाशसुरवाड समाजे । सफळित होती ॥ ३१ ॥ आतपें पुन्हा झडोनि । मिळती संभवकारणीं । हे प्रवृत्तीसी धरणी । अतिक्य जाली ॥ ३२ ॥ तैसी अज्ञानधरा मुळी । विरूढली विश्वरूपफळीं । आसन घालूनि मनमुळीं । प्रवृत्ती आकळिजे ॥ ३३ ॥ प्रवृत्तीसी मूळ अज्ञान । अज्ञानासि मूळ ज्ञान । ज्ञानाग्निमूळ अधिष्ठान । अतिक्यता स्वयें ॥ ३४ ॥ निपजला पांचिक योग । ज्ञानासि अज्ञानभोग । अज्ञानीच पारि असंग । स्फुरों लागला साक्ष्यत्वें ॥ ३५ ॥ ध्यान्हीं अवस्था अंतर्गत । ज्ञानें अनुसंधान अखंडित । खंडरहित हृदयाचें सदोदित । अधिष्ठान स्वयें ॥ ३६ ॥ तृषा प्राशन केली जीवनें । क्षुधा भक्षिली सदन्नें । स्वप्रकाश लेणीयानें । मिरविलें निजांग ॥ ३७ ॥ हें हृदयस्थाचें अभिनव । नानापदार्थ रूप नाव । व्यवहारिला परि स्वभाव । पालटोंचि नेणे ॥ ३८ ॥ वृत्ति साक्ष्यत्व वुझावणी । हेतुसंस्कार न धरूनि । प्रगटला सद्गुरूअनुसंधानीं । क्षेपसहित ॥ ३९ ॥ जें जें तत्व अकाळ । तें तें निवळलें सकाळ । ज्ञानजीवनाचा खळमळ । जाऊनि निर्मळ जालें ॥ ४० ॥ ज्ञानें ज्ञान प्रक्षाळिलें । स्वरूपा ऐसें निर्मळ जालें । अभिनप्रतीतीनें वेढिलें । शोभे सोज्वळ निजांगीं ॥ ४१ ॥ चहुं अवस्थेचें अभ्यंतर । परब्रह्म निर्विकार । पूर्वापूर्वसं-

१ संकल्प. २ प्रळयकाळची वृष्टि. ३ हत्तींच्या सोंडेएवढ्या धारेनें. ४ वाहले. ५ वायूंत. ६ (?). ७ स्वयंप्रकाशित.

स्कार । सोडिला ज्ञानें ॥ ४२ ॥ सद्गुरुकरसंस्कारें संस्कारविहीन येकसरें । ज्ञेयीं समरसलें निर्धारें । ज्ञान अपरोक्ष ॥ ४३ ॥ ज्ञानासि ज्ञानें आर्जविलें । हें उपासनेचें रूप जालें । भजनभावें वोळलें । कृपाळूपण तेथींचें ॥ ४४ ॥ ज्ञानीं सद्भाव होता । तोचि योळला तत्वता । हृदयस्थ तो सप्रेमता । द्रवला परस्परें ॥ ४५ ॥ देवभक्तपणें उदार । कीं गुरुशिष्यत्वें साचार । स्वरूपाचेंचि अभ्यंतर । ज्ञान प्रमेयासि आलें ॥ ४६ ॥ स्वरूपज्ञान उपासना । अभिन्न प्रतीतीच्या खुणा । शिष्यावधानश्रवणा । विभूषण जालियां ॥ ४७ ॥ द्र्व्यें द्रव्य व्यवहारिलें । कर्तेनवीण अपार जालें । ऐसें सभाग्यपण वोळलें । ज्ञान गुरुकृपेचें ॥ ४८ ॥ कैवल्यसुवर्णाचिया राशी । दाटलिया गगनमांदुसी । तो अर्थ चि होय अर्थासी । भोगितां हें अभिनव ॥ ४९ ॥ आहे नाहीं द्वैताद्वैत । ज्ञान जालें संकल्पातीत । हे संकल्पशून्य प्रतीत । सद्गुरुकृपेची ॥ ५० ॥ वृत्ति न येतां अनुभव । होय निजप्राप्तीचा गौरव । व्यापक निरावकाश सर्व । आटोन गेलें ॥ ५१ ॥ स्वभाव अस्तिक्यता असे । व्याप्यव्यापकता तेथें नसे । निर्मळ निश्चळ अपैसें । गगना सारिखें ॥ ५२ ॥ गगनासि नाहीं गगनज्ञान । सज्ञाना अंतरीं घेते वळखण । साक्षी न होतां तूं चि गगन । हे अभिन्न खूण सांभाळीं ॥ ५३ ॥ जन्मलें नाहीं कवणे काळीं । वर्तलें नाहीं नाना मेळीं । जें भेदलें नाहीं शस्त्रजोळीं । निःसंग तत्व तें तूं ॥ ५४ ॥ जें उदककल्लोळीं भिजेना । जे अग्निज्वाळीं जळेना । जें वायुसंगीं चळेना । शाश्वत सहजें ॥ ५५ ॥ जाणिवेसि अवभासलें । त्यास्तव अवकाश गमलें । तें स्वछ निवांत संचलें । अप्रांतपणें ॥ ५६ ॥ केंचें दुजें त्या समान । रूप रेखा ना वर्ण । निराभास संपूर्ण । निर्विकारी ॥ ५७ ॥ येकपणेंवीण[3] येकलें । सहज आस्तिक्यें संचलें । तें सद्गुरुकृपेनें आलें । निजहृदयासी ॥ ५८ ॥ घट संभवतां ये गगन । तैसें सद्गुरुकृपेंत सनातन । घेणें देणें नाडळे संपूर्ण । तेपणें

१ हृदयाकाशरूपी पेटीत. २ शास्त्रसमूहानें, ३ एकमेवाद्वितीयम्।

माजि सैंधवकण । रिघाले चि जाले समुद्रजीवन । तेंवि चिदार्णवीं संपूर्ण । उन्मेषें हारपलें ॥ २६ ॥ ना त्या प्रळयाग्नीभीतरी । प्रळयांबु शुंडाधारीं । रिचवलें तितुकें अंतरीं । आटोनि जाय ॥ २७ ॥ किंवा प्रळयप्रभंजेनीं । विशाला जाय प्रळयाग्नि । तेवि प्रळयवायु गगनीं । निवांत होय ॥ २८ ॥ उपक्रमींच उपसंहार । अन्वय-व्यतिरेकविचार । कार्यकारणा येत संहार । न करितां होय ॥ २९ ॥ या दैविक क्षोभें करूनि । हेतुरूप अंतःकरणीं । कार्य प्रगटोनि कारणीं । सामावतसे ॥ ३० ॥ नाना वसुंधरेसि बीजें । पर्जन्यें अंकुरती सहजें । अवकाशसुरवाड समाजे । सफळित होती ॥ ३१ ॥ आतपें पुन्हा झडोनि । मिळती संभवकारणीं । हे प्रवृत्तीसी धरणी । अस्तिक्य जाली ॥ ३२ ॥ तैसी अज्ञानधरा मुळी । विरूढली विश्व-रूपफळीं । आसन घालूनि मनमुळीं । प्रवृत्ती आकळिजे ॥ ३३ ॥ प्रवृत्तीसी मूळ अज्ञान । अज्ञानासि मूळ ज्ञान । ज्ञानाग्निमूळ अधि-ष्ठान । अस्तिक्यता स्वयें ॥ ३४ ॥ निपजला पांचिक योग । ज्ञानासि अज्ञानभोग । अज्ञानीच परि असंग । स्फुरों लागला साक्ष्यत्वें ॥ ३५ ॥ च्यान्हीं अवस्था अंतर्गत । ज्ञानें अनुसंधान अखंडित । खंडरहित हृदयाचें सदोदित । अधिष्ठान स्वयें ॥ ३६ ॥ तृषा प्राशन केली जीवनें । क्षुधा भक्षिली सदन्नें । स्वप्रकाश लेणीयानें । मिरविलें निजांग ॥ ३७ ॥ हें हृदयस्थाचें अभिनव । नानापदार्थ रूप नाव । व्यवहारिंटा परि स्वभाव । पालटोंचि नेणे ॥ ३८ ॥ वृत्ति साक्ष्यत्व बुझावणी । हेतुसंस्कार न धरूनि । प्रगटला सद्गुरूअनुसंधानी । कृपेसहित ॥ ३९ ॥ जें जें तत्व अकळ । तें तें निवळलें सकळ । ज्ञानजीवनाचा खळमळ । जाऊनि निर्मळ जालें ॥ ४० ॥ ज्ञानें ज्ञान प्रक्षाळिलें । स्वरूपा ऐसें निर्मळ जालें । अभिन्नप्रतीतीनें वेढिलें । शोभे सोज्वळ निजांगीं ॥ ४१ ॥ चहुं अवस्थेंचें अभ्यंतर । परब्रह्म निर्विकार । पूर्वापूर्वसं-

१ संकल्प. २ प्रळयकाळची वृष्टि. ३ हत्तीच्या सोंडेएवढ्या धारेनें. ४ वाहलें. ५ वायूंत. ६ (?). ७ स्वयंप्रकाशित.

स्कार । सोडिला ज्ञानें ॥ ४२ ॥ सद्गुरुकरसंस्कारें संस्कारविहीन येकसरें । ज्ञेयीं समरसलें निर्घारें । ज्ञान अपरोक्ष ॥ ४३ ॥ ज्ञानासि ज्ञानें आर्जविलें । हें उपासनेचें रूप जालें । भजनभावें बोळलें । कृपाळूपण तेथींचें ॥ ४४ ॥ ज्ञानीं सद्भाव होता । तोचि बोळला तत्वता । हृदयस्छ तो सप्रेमता । द्रवला परस्परें ॥ ४५ ॥ देवभक्तपणें उदार । कीं गुरुशिष्यत्वें साचार । स्वरूपाचेंचि अभ्यंतर । ज्ञान प्रमेयासि आलें ॥ ४६ ॥ स्वरूपज्ञान उपासना । अभिन्न प्रतीतीच्या खुणा । शिष्यावधानश्रवणा । विभूपण जालियां ॥ ४७ ॥ द्रव्यें द्रव्य व्यवहारिलें । कर्तेनवीण अपार जालें । ऐसें सभाग्यपण बोळलें । ज्ञान गुरुकृपेचें ॥ ४८ ॥ कैवल्यसुवर्णाचिया राशी । दाटलिया गगनमांदुसी[1] । तो अर्थ चि होय अर्थासी । भोगितां हें अभिनव ॥ ४९ ॥ आहे नाहीं द्वैताद्वैत । ज्ञान जालें संकल्पातीत । हे संकल्पशून्य प्रतीत । सद्गुरुकृपेची ॥ ५० ॥ वृत्ति न येतां अनुभव । होय निजप्राप्तीचा गौरव । व्यापक निरावकाश सर्व । आटोन गेलें ॥ ५१ ॥ स्वभाव अस्तिक्यता असे । व्याप्यव्यापकता तेथें नसे । निर्मळ निश्चळ अपैसें । गगना सारिखें ॥ ५२ ॥ गगनासि नाहीं गगनज्ञान । सज्ञाना अंतरीं घेते वळखण । साक्षी न होतां तूं चि गगन । हे अभिन्न खूण सांभाळीं ॥ ५३ ॥ जन्मलें नाहीं कवणे काळीं । वर्तलें नाहीं नाना मेळीं । जें भेदलें नाहीं शस्त्रजाळीं[2] । निःसंग तत्व तें तूं ॥ ५४ ॥ जें उदककल्लोळीं भिजेना । जे अग्निज्वाळीं जळेना । जें वायुसंगीं चळेना । शाश्वत सहजें ॥ ५५ ॥ जाणिवेसि अवभासलें । त्यास्तव अवकाश गमलें । तें स्छळ निवांत संचले । अप्रांतपणें ॥ ५६ ॥ कैचें दुजें त्या समान । रूप रेखा ना वर्ण । निराभास संपूर्ण । निर्विकारी ॥ ५७ ॥ येकपणेंवीण[3] येकलें । सहज आस्तिक्यें संचलें । तें सद्गुरुकृपेनें आलें । निजहृदयासी ॥ ५८ ॥ घट संभवतां ये गगन । तैसें सद्गुरुकृपेंत सनातन । घेणें देणें नाडळे संपूर्ण । तेपणें

१ हृदयाकाशरूपी पेटींत. २ शास्त्रसमूहानें, ३ एकमेवाद्वितीयम्।

होसी अनुमान होसी निश्चयें । होसी पदार्थ होसी प्रमेयें । होसी आठविता स्वयें । अर्थज्ञ तूं चि ॥ ४५ ॥ तूं चि अवघा होसी ज्ञान । तया ज्ञानाचें होसी अधिष्ठान । तया अधिष्ठानाचें समाधान । होसी अपरोक्ष तूं ॥ ४६ ॥ तूं प्रमेयफळाचा कल्पतरु । नाना विश्रांतीचा होसी मेरू । प्रमेयअभ्यंतरविस्तारु । अपार ग्रंथांतरें ॥ ४७ ॥ अनंतग्रंथ अनंत प्रमेयें । अनंतानुभव मेरु स्वयें । अनंतगुरुकृपाप्रलयें । जाली याचासिद्धी ॥ ४८ ॥ अनंतकृपा- वागेश्वरी । करी अर्थान्वय भरोवरी । तें चि प्रमेय अर्थविवरी । वचन वचनार्थे ॥४९ ॥ चंपकतरुवरापोटीं । नसे चि ते पुष्पाची पेटी । वृक्षाचिपासूनि सेवटीं । पुष्पें येती अभिनवें ॥ ५० ॥ तैसा बोधामाजि अभिनव । गुरुसत्ता स्वानुभव । प्रगटला सद्गुरुराव । सिष्यासि परमार्थे ॥ ५१ ॥ दिव्य_ चंदनाचें रोप । परि सुवास नेदी अल्प । काळांतरीं आपेंआप । सुवा_ स चि पिके ॥ ५२ ॥ तेंवि श्रवणावधानीं । असतां अद्वैतअनुसंधानीं । अफळ गुरुकृपा निधानीं । प्रगटे साक्षात्कारें ॥ ५३ ॥ आर्जवितां आर्जवितां दैवत । होय प्रसन्नतेसि उदित । तेंवि गुरुकृपा सदोदित । साक्षात्कारासि ये ॥ ५४ ॥ वृध्दिक्षयेंवीण अखंडीत । कळाविबेवीण चंद्रामृत । अवधानचकोर होऊनि निवांत । सेविजे ज्ञानचक्षुमुखें ॥ ५५ ॥ दृष्टि जाये चंद्रमंडळीं । चकोर राहे भूमंडळीं । ह्मणोनि हे उपमेची नव्हाळीं । न सरे तेथें ॥ ५६ ॥ चमत्कारासि चेतक । लाभे दृष्टांतीं कांहीं येक । चक्षू विघरोनि सुधात्मक । रश्मीनें बिंबचि होये ॥ ५७ ॥ तैसा बोधीं वेध निर्वेध । स्वरूपाचि स्वयें तो बोध । सकळ सित्यांचा सित्थ । बोळला तें अवधारा ॥ ५८ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । रामउपासकांची लीला । ह्मणे मेरूअनंत ॥ ५९ ॥ पष्ठरुद्रे पंचमउल्लासःसंपूर्णः॥

---

१ ( ? ) नवीनपणा. २ ( ? ) चेतना, स्फुरण आणणारा.

राम दृष्टीं । देखिला ऐसा ॥ ३५ ॥ अभिन्न योग श्रीरामासीं । नाहीं वियोग उपासकांसी । गगन परतोनि गगनासी । जेवि आलिंगिलें ॥ ३६ ॥ गगन गगनासि पुसों आलें । जें न होय तूं मज वेगळें । अभिन्न भेटोनि दिधलें । अभय तयाप्रति ॥ ३७ ॥ तेंवि रामभक्तदर्शन । रामभक्तसंभाषण । रामभक्तअनुसंधान । रामसायुज्याचें ॥ ३८ ॥ दाशरथी अपरोक्षता सहज । हें चि रामभक्ताचें गूज । जैसें रविबिंबीं तेज । वेगळेपणें नसे ॥ ३९ ॥ स्यानंदीं स्वसुखता । तेंवि श्रीरामीं भक्त पाहातां । अमृतफळ माधुर्यता । अभिन्न स्थितीनें ॥ ४० ॥ निरावरण रामरूप । भक्त दाशरथी तद्रूप । अभिन्नप्रत्ययें आपेंआप । पावले सायुज्यता ॥ ४१ ॥ राम सायुज्यसाक्षात्कारीं । प्रगटला भक्तांचे अभ्यंतरीं । निर्मळ निश्चळ निर्विकारी । दाशरथीभक्त स्वभावें ॥ ४२ ॥ जयासि त्याग ना योग । ऐसा मुळींहूनि वीतराग । रामभक्तांचा अंतरंग । राम चि सर्वस्वें ॥ ४३॥ अनुभव स्वरूपाचा आदि । कीं हे स्वभावता अनादि । रामउपासकांची सिध्दी । प्रगट रामरूप ॥ ४४ ॥ अनंतयोगसिध्दी बोलली । अनंतरामरूपासि आली । हे अनंतें प्रत्यक्ष केली । रामउपासना ॥ ४५ ॥ रामउपासक समर्थ । रामउपासक अनंत[1] । रामउपासक संत । या चि प्रतीतीनें ॥ ४६ ॥ जेथें हे प्रतीती नाहीं । पडिले उपासनाप्रवाहीं । ज्यासी अर्जवावें हृदयीं । तो चि मुळीं कळेना ॥४७॥ ज्याचे सेवक ह्मणावें । त्यासि नोळखिलें जावें । परिचारकें संतुष्ट करावें । सेवेनें कवणासी ॥ ४८ ॥ वल्लभ न पडतां डोळां । प्रियेनें केवि लावावा जिव्हाळा । येक हृदयस्थेवीण सकळा । फळा येर्थीचे जाल्या ॥४९॥ नाना मंत्रयंत्रविधानें । नाना खटाटोप ज्याकारणें । तो ठायीं न पडतां करणें । तितुकें व्यर्थ चि होये ॥ ५० ॥ वेदशास्त्रें पुराणें । प्रयत्नेंलीं जयाकारणें । तो नाडळतां भजन । हे दांभिक भक्ती ॥ ५१ ॥ पावोनि अंतरीचा जिव्हाळा । वरि सुखें

[1] अनंत मौनी.

झाले भजनलीला । वरेंवीण लग्नाचा सोहळा। करणें हें अडंबर ॥५२॥ योगी सिध सनकादिक । घोळवोनि अंतरींचा निष्कळंक । हृदयस्थासि त्या निश्चयात्मक । विनटोनि गेले ॥ ५३ ॥ संपूर्णासि कोठें पाहावें । अंतरीं बुडी देऊनि स्वभावें । निजअतिक्यस्वानुभवें । योगसिध्दी अवतरे ॥ ५४ ॥ मुनी मननशीळ सर्वदा । निर्द्वंद्व होऊनि वेदविदा । नित्य अनुभविती संपदा । अंतर्निष्ठ ते ॥ ५५ ॥ महातापसी अनुष्ठातें । आसनीं वैसले दृढावचित्तें । स्वरूपयोगें शाश्वत ते । चळेनाति कल्पांतीं ॥ ५६ ॥ महाऋषी प्रसिध्दतेनें । हृदयीं रिघोनि योगसिध्दीनें । थोरप्रस्थानें सुखें तेणें । ऐश्वर्यवंत जाहले ॥ ५७ ॥ सकळांसि अंतर्निष्ट पाहिजे । स्वरूपासि अनुभविजे । आत्मउपासना सहजें । परमसुखकारी ॥ ५८ ॥ पाहा चित्तासारिखें न मिळे । हृदय फुटे विक्षेपमुळें । कां जे का येकासि येक आगळें । पडिलें ह्मणोनियां ॥ ५९ ॥ स्त्रीपुरुषांचें येकचित्त । तेथ सुख असे अमित । वेगळीकेनें अकल्पित । विक्षेपासि येती ॥ ६० ॥ येकचित्त मंत्रिनृपाळ । त्या राज्यांत सुखचि अखिळ । तैंवि देवभक्त केवळ । येकचित्तें गोडी ॥ ६१ ॥ जे चि देवभक्त स्वयें । ते चि गुरुसिष्य निश्चयें । सस्वरूप येकहृदय । भिन्नता कैंची ॥ ६२ ॥ तस्मात् वेगळीक होतां । स्वरूपीं माया होय अनर्था । भेदअज्ञानें ममता । मरणासि हेतु ॥ ६३ ॥ असो ते वेगळीक अज्ञान । आठउं सद्गुरूचे चरण । नाहीं भेदवार्ता सनातन । स्वरूपीं ठेविलें ॥ ६४ ॥ तेथें विसावले श्रुत्यर्थ । तेथें चि मी जालों कृतार्थ । गुरुपदपरमार्थ । उपासना हे ॥ ६५ ॥ हे श्रीरामकृपा समर्थ । अनंतकृपा परमार्थ । परमार्थउपासना स्वार्थ । मनोरथसिध्दीचा ॥ ६६ ॥ हा स्वरूपअमृतसिध्दियोग । रामउपासना अभंग । प्रतीतीचा अंतरंग । ध्यावा श्रवणें ॥ ६७ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । स्वरूपउपासनास्वलीळा । ह्मणे मे[illegible]अनंत ॥ ६८ ॥ पष्ठदर्द्रे पष्ट उल्लास संपूर्ण ॥ ६ ॥

---

१ अवडंबर, व्यर्थ राठपट. २ शरण. ३ चंचलतेमुळे.

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थदीक्षा । अहंसृष्टीसि बोधदीक्षा । प्रतीतिअभ्यंतरें प्रत्यक्षा । प्रमाण जाली ॥ १ ॥ ज्ञानहृदयकमळासी । प्रकाश चित्सूर्यप्रभा जैसी । विकासित अविनाशी । दशासौरभ्य दे ॥ २ ॥ स्वानंदमकरंदीं पूर्ण । जीवनभृंग सनातन । निमग्न होऊनि चिद्गगन । घेत निघाला ॥ ३ ॥ सुवासाचा संपूर्ण ठेवा । ब्रह्मतन्मयतेचा विसावा । घेऊनि निजठाव जिवा- । माजि निमग्न तो ॥ ४ ॥ स्वरूपसुखसरोवरीं । विसांवला चि विहार करी । सोहं-अनुस्वरअभ्यंतरी । प्रतीतीनें झुंकेरें ॥ ५ ॥ सद्गुरुपदपंकजीं । विसांवला चि राहे सहजीं । प्रमेयांतरसुमनैजी । झेंपावोनी येतसे ॥ ६ ॥ सोडूनि साक्षात्कारविहार । गुरुपदर्जीवीं केली थार । स्वानुभवसुवाससार । नित्य वृत्तीनें सेवी ॥ ७ ॥ गुरुकृपाउद्यानसुमनीं । प्रतीतीधृतिअनुसंधानीं । अवधानद्विरेफ मननीं । कृपाविपिनी विहरे ॥ ८ ॥ स्वरूपज्ञानप्रमेयवनीं । तो ब्रह्माहमस्मीअनुसंधानीं । ब्रह्मतन्मयता चित्गगनी । पैसावला पूर्ण ॥ ९ ॥ द्रवें आलिंगिलें जीवन । फों माधुर्ये सेविलें पीयूष पूर्ण । ब्रह्माहमस्मीचें अनुसरण । प्रवेशलें ब्रह्मीं ॥ १० ॥ ज्ञानजागृतीची व्याप्ती । पावली अपरोक्षसुषुप्ति । चिदाग्नीनें अवाप्ति । द्वतिभाव कर्पूराची ॥ ११ ॥ सोज्वळ सत्व निर्वाळलें । चंद्रमंडळें अमृत पाहलें । परतोनि पुन्हा पान केलें । ज्ञानकळामृत ॥ १२ ॥ सूर्ये पैसावला प्रकाश । अवाप्तीसि आणिला विशेष । निदानग्रहणीं निर्विशेष । हारपला बिंबीं ॥ १३ ॥ निजहृदईंची व्यापकता । निरावकाशें चि तत्वता । अवाप्तीसी आणिली स्वरूपता । स्वरूपानें ॥ १४ ॥ ज्ञानचक्षूचा दर्शनपैसं । जाला परतोनी समरस । चिद्रत्नप्रभा अशेष । रत्नानें गिळिली ॥ १५ ॥ उगमें गिळिला गंगाघोघ । निज आत्मारामें बोध अनघ । सत्यसंकल्पाचे सैघ । हेतु संकल्पीं वारले ॥ १६ ॥ साक्षत्वज्ञानीं वि-

१ सुवास. २ गुंजारव करितो. ३ सुमन ( मा )जी ( ? ). ४ गुरुपद (रा) जीवीं. ५ ( ? ). ६ दर्शनाचा पसारा.

स्तार । होता तो चमत्कारे चि साचार । ज्ञात्यानें अपरोक्ष अवसर। साक्ष्यत्वेंसीं घोटला ॥ १७ ॥ स्वरूपें स्वरूपज्ञानीं । स्वरूपसमावेशें निदानीं । गिळिला ज्ञाताचि विद्यमानीं । हारपलें विद्यमान ॥ १८ ॥ निजप्रणवें अपार । मातृकामय विस्तार । घेऊनि स्वरूपअभ्यंतर । निजप्रसव गिळीला ॥ १९ ॥ परेचें परापर ज्ञान । पराअभ्यंतरें सनातन । ग्रासिलें आपणासी आपण । हे बोधअवाप्ती ॥२०॥ दशेंद्रियअंतःकरणें । सुषुप्ति समाधि अनुसंधान । आपणासहित वर्त्तमान । खग्रास केला ॥ २१ ॥ काष्ठ भक्षूनियां वन्ही । ग्रासी आपआपणा निदानीं । तेंवि ज्ञानें ज्ञानाची आटणी। हा स्वरूपसमावेश ॥ २२ ॥ सरिता मिळली सिंधुजळा। परतोनी न ये जन्ममुळा । तैसा ज्ञानाचा जिव्हाळा । स्वरूपसमावेश ॥ २३ ॥ जेथ प्रवृत्तिसाक्ष्यत्व नुरे । ना स्वरूपज्ञान न थारे । तें निजअवसान निर्धारें । सेविलें प्रतीतीनें ॥ २४ ॥ ज्याचेनि साक्ष्यत्वज्ञान आलें । त्याचें मुळ तेणें शोधिलें । पाहातां निर्मूळ प्रकाशलें । ज्ञानाचें अभ्यंतर ॥२५॥ अवचट ज्ञप्तिसुखअभ्यंतर । पाहतां स्वरूप निरंतर । स्वरूप चि स्वरूपसाक्षात्कार । गिळुनि सोडिला ॥ २६ ॥ पैसावलें ज्ञान अभ्यंतरीं । त्याचि व्याप्तीनें चमत्कारी । व्याप्यव्यापकता पसरी । ज्ञान चि गिळिलें ॥ २७ ॥ सकळाचें निदान स्थळ । तें शुध ज्ञान केवळ । तया चिदासही अकळ । कारण अधिष्ठान असे ॥ २८ ॥ स्वयंभ ज्योतिर्मय ज्ञान । स्वयंभ स्वरूप सनातन । स्वयंभ अनुभवघन । निवळला निदानीं ॥ २९ ॥ ज्ञानविज्ञाननिदानीं । निदानरूपसमाधानीं । ब्रह्म चि तो ब्रह्मज्ञानी । निदानासीं आला ॥ ३० ॥ स्वरूपशाश्वतमिरासी । निदान सोसू निश्चयेसीं । ज्ञाननिदानें अपैसीं । साधिली सहज ॥ ३१ ॥ क्षेत्रज्ञशिवें सर्वकाळ । संकल्पसिसाळें देऊनि विशाळ । साधिली मिरासि ते अढळ । निजनिदानीं ॥ ३२ ॥ भक्त अभेदभक्ताचे । स्वकीयें वंशज

---

१ अक्षरांचा. २ कारण. ३ (?) आत्मस्वरूपांत लय. ४ शिरकमळ. ५ दक.

गिरासिचे । निजे अधिकारी प्राप्तीचे । निधानीं फळ जाहातीं ॥ ३३ ॥ अहंरावणे दश शिसाळें । समर्पिलीं किती वेळां लोटे । परि उठतचि गेलीं ईसाळें । अहंस्फूर्तीच्या ॥ ३४ ॥ त्यासी नाहंकृतिसी आणावया । गुरुराम वीर बळिया । निदानज्ञानशरें छेदूनियां । निजकारणासि आणिला ॥ ३५ ॥ तेवि हा स्वरूपअहंकार । मुख्य ब्रह्म मी निर्धार । गुरुकृपाअवसरें थार । पावला निदानाचि ॥ ३६ ॥ श्रवणें श्रवणार्थ गिळिला । जैसा काष्टें अग्नि भक्षिला । परतोनि तेंचि तयाला । निदान जालें ॥ ३७ ॥ सोहंभाव उपरमे । निजनिवांतअंतर्यामें । प्रतीतीच्या परंधामें । परंधाम सेविलें ॥ ३८ ॥ अद्वैतें सेविलें अद्वैत । अखंडीतासि अखंडीत । सेविलें अनंतासि अनंत । निदानप्रतीतीनें ॥ ३९ ॥ द्वैताद्वैत कांहीं नाहीं । तुमसे निदानप्रतीती ही । आतां बोलणें तितुकें ही । जाल्यांत नसे ॥ ४० ॥ वक्ता वक्तेपणें तुरे । वक्तृत्वीं निदान अवतरे । श्रोता श्रोतेपणे न थरे । कारणार्थी रूढला ॥ ४१ ॥ आतां श्रोता वक्ता प्रमाण । निदानासि आलें निदान । अनिर्वाच्य समाधान । या कारणें बोलिजे ॥ ४२ ॥ नित्य अखंडीत स्वरूपासी । संधी चि असे ना जैसी । तेवि गुरुकृपा अपैसी । नसे निदान संधि हीं ॥ ४३ ॥ ज्ञानउपक्रमउपसंव्हार । स्वरूपसमावेश साचार । परि भेदसंस्कारें निर्धार । ह्मणोनि निदानासि आला ॥ ४४ ॥ स्वरूपासि प्रवर्तलें निदान । कैंचा अन्वयव्यतिरेक मान । त्याचि कारणें ते अधिष्टान । कारणासि नये ॥ ४५ ॥ आप न देखे आपपणें । परदृष्टी नाहीं चि येणें । नित्य आपपरज्ञानेंवीणें । सहजाचि असे ॥ ४६ ॥ अनुभवाची कडसणी । ज्ञान अनुसरलें निदानीं । स्वानंदाची आटेणी । स्वानंदीचि जाली ॥ ४७ ॥ आतां अनुभव ना अनुभाविता । अनुभवासि निदान तत्वता । सद्गुरुकृपेनें ऐक्यता । निजसिद्धि दिधली ॥ ४८ ॥ बोल ग्रासूनि बोलणें । श्रवण गिळूनि

१ आत्मस्वरूपलाभाचे अधिकारी. २ पिशाचबाधेनें. ३ सांधा, जोड, खंड. ४ मंथन करून काढलेलें सार, विचार. ५ विरून जाणें.

श्रवणें । त्रिपुटीसी न येतां होणें । होतसे अर्थज्ञान ॥ ४९ ॥ अर्थे अर्थाचा उपदेश । निजसंभव निजप्रवेश । निजसामरस्यें विशेष । लाभ अनुभविला ॥ ५० ॥ स्वरूपीं दुजें नसता कांहीं । योगवियोगा ठाव नसतांही । अखंड निजयोगहृदयीं । लाभ जाला अभिनव ॥ ५१ ॥ अनंतकृपा हे अभिनव । बोलतां वाचेसि न ये नवलाव । तो हा अपरोक्ष अनुभव । करतळामलक केला ॥ ५२ ॥ अपरोक्ष हिरा निजमंदिरीं । मिरवला आत्मविभूच्यो करीं । तो दुर्बळवाचेच्या पदरीं । दिधला उपेगासी ॥ ५३ ॥ सपन्नासि संपन्न करिती । धनिक[1] धनिका उपचारिती । हे तरी आहे च आहे प्रवृत्ति । चाळली सर्वत्र ॥ ५४ ॥ परि सद्गुरूचें अभिनव । दुर्बळासि देउनि निजवैभव । स्वरूपज्ञानस्वानुभव- । संपन्न केलें ॥ ५५ ॥ निजस्वरूपयोगइंदिरा । वसों आली दुर्बळाच्या मंदिरा । ऐश्वर्यविष्णूची सुंदरी । दरिद्रामि उरो नेंदी ॥ ५६ ॥ तैसें भवदरिद्र नाशिलें । स्वरूपवैभव प्रकाशिलें । गुरुदयारवीनें पाहलें । निजहृदयांबर ॥ ५७ ॥ ज्ञानरविप्रभामंडळ । निरावकाशें सुख अखिल । अढळ अक्षयी अकळ । गुरुकृपाज्ञान हे ॥ ५८ ॥ अकळ गुरुकृपेचें ज्ञान । अकळ गुरुदया समाधान । अकळ आकळलें निदान । ज्ञानाचें हृदय ज्ञात्यासी ॥ ५९ ॥ हें निदानस्वरूपाचें ज्ञान । अनंतकृपेचें अनुसंधान । अनंत करूनि अवधान । सादर अवधारिजे ॥ ६० ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । निदानानुभवलीळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ६१ ॥ षष्ठरुद्रे सप्तमउल्लासः संपूर्णः ।

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ सुप्रसन्न । बोधबृहस्पतीचें जीवन[2] । मोक्षअमरावतीपाळण । दशाइंद्राणीवल्लभ ॥ १ ॥ नित्यनिगम-

---

१ आत्मज्ञानरूपी हिरा आत्मस्वरूपी राजा जडे होता तो दुबळ्या वाचेला मिळाला. वाणी दुर्बळ खरी पण गुरु प्रसादानें तिला आत्मस्वरूपबोध करण्याचें सामर्थ्य आलें. २ स्त्री.

तरुवरकाननीं । गुरु वसंत विरमानी । स्वानंदफळसुमनी । घोळलें मन ॥ २ ॥ प्रणवाचा अग्रभाग । जो ब्रह्मानुभव निजांग । उन्मेषशिखरींचा उत्तंग । शिरोभाग सहजें ॥ ३ ॥ तो वसविला प्रतीतीनें । उपासनायोगें ज्ञानें । ज्ञानत्रिपुटी रहित खुणें । पावलें अभ्यंतर ॥ ४ ॥ चक्षूनें आर्जविलें मन । मनें अर्जविला स्वानंदघन । किंवा काय कैसें लक्षण । आर्जवाचें ॥ ५ ॥ सेवकें आर्जवाया स्वामी । तरी हा उभयता भाव अंतर्यामी । उपासना अद्वैतनिष्कामी । आर्जव तें कैसें ॥ ६ ॥ तरि ऐक गा सुताकिंका । तुझा भाव आहे निका । उपासनायोग सात्विका । अद्वैतअनुभव ॥ ७ ॥ भिन्न होऊनि आर्जविशी । तरि तूं भिन्न फळ पावसी । भवभेद निस्तरसी । हे केवीं घडे ॥ ८ ॥ सत्ता ज्ञानें प्रतिष्ठिली । तुझेनि क्रिया सर्व चालिली । मनादिकासी प्रकाशिली । अवस्था अंतरचर्या ॥ ९ ॥ बुध्यादिकें सकळें । तुझेनि वर्तती विषयमुळें । तैसींच इंद्रियें स्वछिळे । चालती सदा ॥ १० ॥ चक्षुरादि सह मन । तुजवीण तें अज्ञान । तें स्वतां ज्ञानघन होऊन । पाहों न सकती ॥ ११ ॥ उभी न ठाकतां तुजपासीं । वोसांवर्ते यति प्रवृत्तीसी । ते तुज अर्जवावयासी । समर्थ नव्हेती ॥ १२ ॥ सहज तुझें ज्ञान तुज । आर्जवाचा न धरी उमज । आतां तुझीये आर्जवाचा नुमज । सर्वत्र आहे ॥ १३ ॥ जरि तुझें तुज आर्जव । तरि तूं अद्वयस्वभाव । कवण आराध्य स्वयमेव । कवण आराधिता ॥ १४ ॥ तूं वरिष्ठासि पूर्ण वरिष्ठ । तूं नित्यमुक्तीचें भद्रपीठ । तेथें कैचें भवअरिष्ट । भेदें बाधावया ॥ १५ ॥ आतां उपासना तुझी तुज । अघटीत गुरुकृपा‑चोज । निजस्वरूपाचें सहज । आर्जव हें ॥ १६ ॥ तुझें हृदयद्योतक भाव । तोचि परमात्मा आदिदेव । अभिन्नयोगस्वानुभव । निजआर्जव हें ॥१७॥ जो अविद्यानिशाचरहर्ता । अहंरावणनिर्मूळकर्ता । विजयश्रीवैदेहीभर्ता । भावसुरमोचन ॥ १८ ॥ तयाचा अनुताप सेवक । ज्ञान-

---

१ वेदरूप वृक्षांच्या वनांत. २ वहात. ३ सिंहासन. ४ अविद्यारूपी राक्षसाचा वध करणारा. ५ भक्तिरूप देवांना मोकळें करणारा.

पावक कर्णबोधार्क । अज्ञानार्णव मायीक । उडाला येकाचि उड्डाणें ॥१९॥ होडा घालुनि कृतांतासि । जिंती ऐसा प्रतापवेशी । पातला चिच्छक्तिशुध्धीसी । मायात्रिकूटाचळीं ॥ २० ॥ दृश्यत्रिपुटी लंकापुरी । जाळिली निर्वाणवैश्वानरीं । शोध घेत अशोकांतरीं । लाविली शुध्दि तत्वता ॥ २१ ॥ जो रामकृपेनें तनुअक्षय । भवअक्षयाचा केला क्षय । अक्षयस्वरूपें ऐश्वर्य । लाधला निजाचें ॥ २२ ॥ स्वरूपप्राप्ति विदेहजा । अभिवंदिली दशा सहजा । सद्गुरुरामपदांबुजा । स्मरोनि शुध्धीसि आला ॥ २३ ॥ अप्रांतीचा प्रांत लावुनि । जयबोधें उध्वेंपाणी । मूर्धा ठेऊनि रामचरणीं । शुध्दि सांगितली सीतेची ॥ २४ ॥ सद्गुरुरामें ईक्षणगती । सुचविला बोधकिष्किधापती । निजसंभारें अष्टजुत्पंती । लंकेप्रति चालि केली ॥ २५ ॥ सद्गुरु रामचंद्र स्वयें । भक्तउधारास्तव सदय । पदगतीनें येता होय । लंकानगरासी ॥ २६ ॥ मोहार्णवीं ज्ञानसेतु । पवाडला सुवेळे मोक्षकेतु । अविद्यानिशाचरहेतु । वारिले ज्ञानशरें ॥ २७ ॥ परम सात्विक बिभीषण । कृपें लंकेसि अधिष्टान । भावत्रिदशें अधिष्ठान । स्वस्थानासि पाठविले ॥ २८ ॥ चिच्छक्ति विदेहनंदिनी । विलोकिली कृपाईक्षणीं । कृतार्थ करूनि हंसविमानीं । मुक्तिअयोध्येसि आला ॥ २९ ॥ ब्रह्मसाम्राज्यें सुखघन.। परमात्मा रघुनंदन । पट्टीं बैसला स्वानंदघन । सेविला भक्तिप्रतीतीनें ॥ ३० ॥ आत्मा रघुराजभूषण । भक्तवत्सल कृपाघन । उपासना हे सगुण । निर्गुणप्रलयाची ॥ ३१ ॥ सकळासि संकटीं सोडविता । बोधें वारी मायाममता । ध्यानीं मनीं अखंडता । निष्ठा जागिजे भक्ताची ॥ ३२ ॥ उपासना सकेतज्ञान । भूतमात्रीं रघुनंदन । भक्तें रिघोनि अनन्यशरण । सद्भावेसी भजिजे ॥ ३३ ॥ सर्वसाक्षी

---

१ ( ? ) खळगा. २ मोक्ष, ज्ञान. ३ अक्षयतनु घफ्रेही. ४ एक राक्षस. ५ सीता. ६ अनताचा ७ अंत. ८ वर हातकरून, वैराग्यपूर्ण होऊन. ९ कृपाकटाक्षानें. १० सुग्रीव. ११ मल्ल वानर. १२ एक पर्वत. १३ कृपेनें. १४ देव. १५ 'सोहं, हंसः' मंत्ररूपी विमनातून. १६ सिंहासनीं.

अभ्यंतरीं । देहधारक चराचरीं । रामावांचूनि अणुभरी । दुसरें नसे ॥ ३४ ॥ अंतर्निष्ठा सज्ञाना । जाण ऐसी उपासना । प्रतीतीसि येतां अनुमाना । उरी चि नसे ॥ ३५ ॥ हृदयभूमि निर्वाळली । साधनें विशेषा आली । जे अखंडीत देखिली । मूर्ति आत्मारामाची ॥३६॥ सद्भावाचें दैव सफळ । अखंड रामप्राप्ति पीक अखिल । स्वानंदघन घननीळ । बैसला डोळां ॥ ३७ ॥ अखंड अवलोकनें ध्यान । खंडरहित अवधान । श्रवणाचांडां रिघोन । पात्र जाला कृपेसी ॥ ३८ ॥ अष्टभावें सद्गदीत । सप्रेमचिन्हें वोसंडत । सद्गुरुपदीं अखंडीत । मस्तक टेविलें ॥ ३९ ॥ माथां टेवुनि अभयंकर । श्रवणीं घातलें वेदसार । व्यापक होतां चि ते अपार । बीज सुखें अंकुरलें ॥४०॥ स्वानंदबोल घेत स्वयें । लसलसीत भावप्रत्ययें । विरूढलें सुखें चि हृदय । निर्वंड जाले तेणें ॥ ४१ ॥ पैसावलें निरुपम । विमळ सुश्याम व्योम । साक्षात्कारासी निःसीम । आलें अवचट ॥ ४२ ॥ अभिरामरूप अनंत । सद्गुरुकृपा सदोदित । पीक जालें अप्रांत । सीमा नहे चि त्या ॥ ४३ ॥ निजविवेकसंवगणी । केली प्रमाणासि टाकूनि । अर्थान्वयकेंडसणी । प्रतीतिखळा आणिले ॥ ४४ ॥ अष्टसात्विक जुंपोनि । केली तयाचि मळणी । तें[6] तूं असी वांवडी करूनी । उपणिले प्रमेय ॥ ४५ ॥ प्रतीतीचा झडझडाट । उडविले फोल फळकट । उरला कण तो घनवट । जाली गुरुकृपाराशी ॥ ४६ ॥ अकल्पित गुरुकृपा होरो । केला संतोष डाहोरों । सांजे औली तो गाभारा । उतटला गगनीचा ॥ ४७ ॥ प्रातीचें प्रमाण टाकिले । गुरुकृपेचें पीक लाधलें । सुखैकघन अनुभविलें । सिद्धसाधकीं ॥ ४८ ॥ हें तत्व आपुलें आपण । अनुभविजे स्वानंदघन । आत्मउपासनालक्षण । याचि प्रत्ययानें ॥४९॥ आप आपुली उगवी । जाणोनि मायेची गोवी[13] । आत्मउपासनाअनु-

१ ( ? ) शब्द लागत नाहीं. २ जोमदार. ३ कापणी, पीक गोळा करणें. ४ मंथन, मळणी करण्याकरितां. ५ आत्मप्रत्ययाच्या खळ्यावर. ६ 'तत्वमसि' या महावाक्याच्या उपदेशानें. ७ सुपाच्या वाऱ्यानें झडपणी. ८ बाहेर काढिलें. ९ ( ? ) १० डहुरा, डवरा, डबकें. ( ? ). ११ उलगडी. १२ गुंतागुंत.

भयीं । तरले भक्त ॥ ५० ॥ उपसनेचें अभ्यंतर । जाणे स्वानुभव-श्रीशंकर । सद्गुरुकृपा अभयंकर । प्रगटी उपासित ॥ ५१ ॥ स्वप्नीच्या विपें मारिले । ते जागरामृतें वांचविले । म्हणून विस्मयासि जाले । अ-वस्थेच्या योगें ॥ ५२ ॥ येथें सशयासि कारण । चुकावयासि नसे स्थान । आपणा आपण हरपोन । भेटला हें आश्चर्य ॥ ५३ ॥ अव-स्थेचा भास ह्मणावें । तरी अवस्थातीत स्वभावें । आतां अवस्था धरिली ज्या जीवें । तो जीव कैसा ॥ ५४ ॥ जीवाचा जीव स्वयें । उमज पाहिजे प्रत्ययें । आपुलें पूर्व चुकोनि पाहे । जीव अज्ञान होती ॥ ५५ ॥ ज्ञानस्वरूपाचें रूप । तो चि जीव निर्विकल्प । ज्ञानीं ब्रह्मा-हंमस्मिसंकल्प । विस्तारला ॥ ५६ ॥ सारूनिया अभ्रपडळें । गगनें उघडोनिया डोळे । आपआपणा येकवेळे । पाहणें कैसें ॥ ५७ ॥ ज्ञाना आंगीं सावकाश । तैसा चि तो निरवकाश । चित्‌दृष्टि माजि वि-शेष । तूटि लाभ आभासे ॥ ५८ ॥ जेणें स्वप्नीं विषें मारिले । तेणें जागरसुधेनें वाचविले । कवण करी तुजवेगळें । दुजें नसें चि कीं ॥ ५९ ॥ तो तूं जीव अवस्थातीत । तुझेनि अवस्थारूप होत । अव-स्थेसि आभासत । भ्रमसी अवस्थांतरें ॥ ६० ॥ जेणें भयें भेडसाविलें । त्याचि भयें निर्भय केलें । भयनिर्भय आपुलें । आपण चि पाहतां ॥ ६१ ॥ ज्या स्थळीं इतुकें होय । तो ठाव जेथें पावे लय । सहज सेचलें स्वयें । तुमसे आपपर तया ॥ ६२ ॥ त्या समसाम्यसेजेसी । जरि तूं अकल्पित येसी । विसावला विश्रांतीसि । लागे तन्मय डोळा ॥ ६३ ॥ निद्रासुषुप्तीच्या ठोहीं । सुटली शुध्दी चि नाहीं । देखिष प्रतीतीच्या प्रवाहीं । वाहे निजजाग्रती ॥ ६४ ॥ राहोचें शरीरचि वदन । आत्मा वस्तु ज्ञानघन । अपरोक्ष उपासना जाण । ऐसी असे ॥ ६५ ॥ चक्षुःश्रवा ह्मणिजेत । चक्षुनें उभय हेतें । चालवी परी अखंडीत । चक्षु ना श्रवण तो ॥ ६६ ॥ परब्रह्म सनातम । परमात्मा ज्ञानघन । सामरस्यें समाधान । जालें हे उपासना ॥ ६७ ॥ प्रवृत्तीची

१ चक्षु ह्म० डोळा हेंच ज्याचें श्रवणेंद्रिय हि आहे असा ( सर्प ). २ कानें.

जाणीव । काकदृष्टी ते अभिनय । सास्तव साक्षत्वी स्वभाव । उमसे द्वैत ॥ ६८ ॥ प्रवृत्ति ते अंतःकरण । नाना भास नाना वर्ण । निरसूनिया ज्ञानाज्ञान । स्वयेंचि उपासना ॥६९॥ स्वामीकृपा अभिनव । उपासना अंतर्भाव । प्रबोधकैलासींचा राव । होय विस्तारिता ॥७०॥ रामउपासना गहन । ब्रह्मादिकांसी अकळ पूर्ण । हे सद्गुरुकृपेवीण । प्राप्ती नव्हे सर्वथा ॥७१॥ सद्गुरुकैलासनाथें । प्रगट केली श्रवणपंथें । रामउपासना सर्वार्थें । सेविजे सिद्धादिकीं ॥७२॥ सद्गुरुपदकमळकोशीं । केली जीवभ्रमरमिरासी । राहिला उन्मेषें सुखेंसी । लीन जाला स्वभावें ॥७३॥ कमळअकोचनिद्रा । जाली महामौनाची मुद्रा । रामरूपें योगींद्रा । चिन्ह बाणली ॥ ७४ ॥ अभंगासि कैचा अभंग । अनंतमौनी हा अभंग । रामउपासना निःसंग । योगदशा ॥ ७५ ॥ अवधान देऊनि स्वयें । रामउपासना ब्रह्मप्रत्ययें । अवधारिजे हें प्रमेय । अमृतमय सहजें ॥७६॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । तारकउपासनेची लीळा । ह्मणे मेरुअनंत ॥७७॥ षष्ठरुद्रे अष्टम उल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थउपासना । आर्जवी ज्ञानकैलासराणा । पावोनि समाधिसदना । उपास्तीसि तत्पर ॥ १ ॥ जीव ब्रह्मांश तत्वता । मुळींहूनि अभिन्नता । हे सद्गुरुकृपेची ऐक्यता । प्रतीतीपूर्वक ॥ २ ॥ निजउपासनायोगरिघी । कृपा तुझी कृपेच्या उदधी । रामीं तन्मयतासमाधि । ते चि ते अभंग ॥ ३ ॥ रामभक्तीनें परात्पर । तरले भक्त भवसागर । दाशरथीभक्तीनें अगोचर । विश्रांति घेती ॥ ४ ॥ रामभक्तीनें अभ्यंतर । प्रगट ब्रह्मसाक्षात्कार । जानकीजीवनध्यानीं निरंतर । ते चि निजकृतार्थता ॥ ५ ॥ रामरूपीं वसल्या मनें । ते चि उन्मन समाधान । दाशरथीचरित्र अनुसंधान । केवळ ते ब्रह्मचर्चा ॥ ६ ॥ रामाक्षरें चिन्हित रसना । ते तरि दशा परम सुलीना । ब्रह्मानुभवरचना । स्वानंदघन ॥ ७ ॥ राम रेखिला निज-

१ मंद पडला. २ संकल्पाचा विस्तार. ३ संकोच, मिटणें. ४ ब्रह्माची उपासना.

दृष्टीसी । समाधि होय तियेची दासी । रामछंद असे जयासी । स्थिति त्याची चळेना ॥ ८ ॥ रामभजनें बोध अढळ । रामभजनें ब्रह्मस्थित प्रांजळ । रामभजनें योग अकळ । सिद्धि बोळगती ॥ ९ ॥ रामयोगें बुद्धियोग । अंतरीं प्रगटे अंतरंग । धीमाजि तो निजांग । स्वानुभवद्रष्टा ॥ १० ॥ बुद्धीसी बोधक स्वभावें । बोधबुद्धि न होति वास्तवें । बोधविधीसि वैभवें । ज्ञानसंपत्तीच्या ॥ ११ ॥ ज्ञानसंपत्तीचा ईश्वर । बुद्धिअंतरीं निरंतर । जेविं घटअभ्यंतरीं अंबर । अखंडीत असे ॥ १२ ॥ तेणें अवकाशें घट चळे । संभ्रमेनासे अवटोळे । परि तें व्यापक न चळे । भांडासरिसें ॥ १३ ॥ बुद्धीची दृष्टी न होतां । तो चि व्यापकपण असतां । बुद्धीसि कळल्यावांचि तत्वता । वस्तुता अकळ तो ॥ १४ ॥ बुद्धीच्या बळें बुद्धीसी । पैसे होय व्यापकेंसीं । तेणें बुद्धीचें निदान निश्चयेसी । बुद्धियोग हा ॥ १५ ॥ आतां कर्मयोग तो प्रांजळ । कर्मीच कर्माचें मूळ । निवळे ऐसेंचि निवळ । कर्म फळासि यावें ॥ १६ ॥ सत्कर्मीं सुकृताचीं फळें । निष्कर्मयोगें सकळें । ईश्वरीं अर्पिती कां समूळें । तरि कर्मयोगसिद्धि ॥ १७ ॥ या कर्मयोगावरी । चालिला सांख्ययोग निर्धारीं । तत्वें तत्व अभ्यंतरीं । बोळखोनि त्यागिजे ॥ १८ ॥ त्यातें चि बोलिजे संन्यासयोग । जो संकल्पसहित त्याग । केवळ उर्वरीत अत्याग । अनुभव सांख्ययोगें ॥ १९ ॥ पावावया त्यागस्थिती । प्रवर्तले हटयोग किती । नाना साधनें निश्चिती । योगस्थिति व्हावया ॥ २० ॥ चित्त महाप्रसन्न स्थळीं । आसन घालूनियां मनमूळीं । दृढाव धरूनियां अंतराळीं । वायूसि साधावें ॥ २१ ॥ करूनि इंद्रियां अवरोध । द्यावा उड्डियाणें मूळबंध । नाभीतळीं वायुनिरोध । कीजे पवनधारणा ॥ २२ ॥ पवन साधलीयां मूर्धनीं । ऊर्ध्वमुखीं होय कुंडलिणी । प्रवेशतां हृद्गगनीं । आश्चर्य प्रसवे ॥ २३ ॥

---

१ विस्तार. २ हटयोगांतील शरीरबंध. कुंभक केल्यावर पोट फुगवून आणि हनुवटी छातीला टेंकेल इतकी मान वांकवून बसणें याला उड्डियान बंध म्हणतात. मूळ बंध म्हणजे गुदद्वाराचा संकोच करून अपान वायूला वर खेंचून धरणें. हे दोन्ही बंध एकदम केल्यानें पोटाला फार च कडकपणा येतो.

दिव्यज्ञान होऊनि चेयिरें । चिदंबर गर्जवी गजरें । प्रणवाचेनि चमत्कारें । प्राण उभा विरे ॥ २४ ॥ प्राणेंवीण गती तया । मूर्धनींसि पावे योगिया । तेथील अभिनव पाहावया । दृष्टी न पुरे ॥ २५ ॥ अमृतरवीनें पाहालें गगन । कीं पीयूषसिद्धि वोळला घन । प्रकाशमय धारा संपूर्ण । वरुषों लागलें नभ ॥ २६ ॥ अघटित महायोगसिद्धी । वोळल्या चमत्काराच्या रिद्धी । परि हे अहंकार प्रसिद्धी । मूळहेतुसि कारण ॥ २७ ॥ सर्वस्वें अहंकार निर्मूळ । होय तरीच ज्ञान निर्वळ । नामरूपसत्ता सकळ । निरसलें पाहिजे ॥२८॥ या कारणें राजयोग । प्रांजळ विचाराचा मार्ग । अहंउपशम वीतराग । सिद्धी राजयोगाची ॥२९॥ सारासारविचारें । महाप्रतीति अभ्यंतरें । अपरोक्षसिद्धि चमत्कारें । वोळली गुरुकृपा ॥ ३० ॥ तरीच राजयोग सिद्धी जाय । कां जें प्रतीतीचें स्वरूप स्वयें । अपरोक्षदशा निश्चयें । राजयोगउपासना ॥ ३१ ॥ निजसाम्ययोग निर्धार । आपआपणांत निरंतर । समरसोनि अभ्यंतर । निवळलें साम्ययोगें ॥ ३२ ॥ सकळयोगांचा योग ईश्वर । जेथें गुरुभक्तीचा निर्धार । देशिकपदयोग साक्षात्कार । हे महायोगस्थिती ॥३३॥ अखंडीत स्वरूपयोग । नसे चि त्या योग ना वियोग । गुरुकृपायोग अभंग । आत्मउपासनायोगें ॥ ३४ ॥ परेहूनि परात्पर । नसे प्रकृतिपुरुष निर्धार । अगोचर योग साचार । योगींद्र अनुभविती ॥ ३५ ॥ योग वास्तव्य अधिकारी । योगअनुभव अभ्यंतरीं । योग वस्तुता निर्विकारी । साम्यसेजेसि रिघाला ॥३६॥ निजयोग परम समर्थ । स्वामीचा योग परमार्थ । हा चि उपासनायोग कृतार्थ । गुरुकृपाविशेषें ॥ ३७ ॥ विरक्तियोग हा ज्ञानसंपन्न । जे देशिकवचनीं अवधान । वेचला सर्वस्वें आपण । गुरुकृपा योगसिद्धी ॥ ३८ ॥ निजप्रतीतीच्या उद्देशें । नित्यावधानींच तो वैसे । पाउलभरी न चले जैसें । बिंब पाषाणरूप ॥ ३९ ॥ परि तें असे अचेतन । हा स्वरूपज्ञानी सचेतन । सर्वा-

१ समतायोग, सहजस्थिति.

गाचा येक श्रवण । केला गुरुवाक्यासी ॥ ४० ॥ तेथें आकळ तें आकळलें । निजानुसंधान तें निवळलें । ब्रह्मचि अन्वयासि आलें । प्रतीतिद्वारा ॥ ४१ ॥ जैसी शर्करेमाजि गोडी । रसनाचि ते निवडूनि काढी । सेवितां गोडीची परवडी । साखरा भिन्न नुरे ॥ ४२ ॥ तेंवि ब्रह्मरूप ज्ञानान्वय । परमात्मा चि जगन्मय । विचारिता तयाचें हृदय । सनातन असे ॥ ४३ ॥ साक्षेपेंवीण आवडी । केवळ जोडीचीही निजजोडी । हे कैवल्यरिघी रोकडी । बोळली गुरुकृपा ॥ ४४ ॥ आतां यापरी जें का बोलणें । तें सद्गुरुकृपेचें देणें । निजयोगसिधि होणें । दैवत आर्जविलें ॥ ४५ ॥ निजयोगसिधि सकळा । जालिया स्वभावें सफळा । का जे गुरुपदकमळा । पावलें प्रारब्ध हें ॥ ४६ ॥ गुरुपदसरोजयुगळीं । ठेविला भावार्थाचा मौळी । हेतुनिर्हेतुसमूळीं । समर्पिलें तेथें ॥ ४७ ॥ आतां गुरुपदयोग तो अभंग । साधिली मिरासी निस्सग । नित्यप्राप्ती निजाग । प्रगटलें प्रत्ययें ॥ ४८ ॥ ते निरूपण रसाळ । अनुभवसिंधूचे चित्कल्लोळ । निजगजरें स्वानदजळ । गर्जना करी ॥ ४९ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । निजात्मयोग निवळला । ह्मणे मेरू अनत ॥ ५० ॥ षष्ठरुद्रे नवम उल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थदर्शन । योगसिध्दींचें संभाषण । गुरुकृपेनें योग संपूर्ण । बोळला सुखें ॥ १ ॥ श्रीरामसमर्थशिवा । योगें कृतार्थ केलें जीवा । योगसृष्टीच्या आदिदेवा । जालासि सुप्रसन्न ॥ २ ॥ राम शिवरूप केवळ । शिव रामरूप निर्मळ । शिवरामसुख अकळ । शिवराम रहस्य हें ॥ ३ ॥ रामशिवसायुज्य स्वयें । शिवराम निजप्रत्ययें । शिवराम ज्ञानप्रमेय । प्रगटे जगीं ॥ ४ ॥ तो शिवरामअतर्भाव । ब्रह्मानुभवी महादेव । शुध्दसत्वकैलासीं अनुभव । घेत बैसला सुखें ॥ ५ ॥ तें शिवसायुज्यसदन । पाहावया मुकेले ज्ञानलोचन । ते भावकैलास होऊन । पाहाती सर्वदा शिवासी ॥ ६ ॥ सहजसमाधि बैसका । महासिध्दाच्या सिध्दपीठिका । समाधिसुखें भू-

धकाशगती उत्कट । फावे पैस प्राप्तीचा ॥ २५ ॥ प्रभेंधीण प्रभा निबिड । ज्ञानप्रभाकरउघड । तोचि मार्ग अवघड । पाविजे पर्वतासी ॥ २६ ॥ शिवप्राप्तीचे ज्ञानमंडप । मनोहरस्थळें शिवरूप । पाहातें पाहाणें तद्रूप । होय तयासि पाहातां ॥ २७ ॥ शिवनिवासउपवनें । रमणीय सुरतरुउद्यानें । विहंगमवस्तीगायनें । घुमघुमीत नभ ॥ २८ ॥ परमसुवासिकनाभी । विहरती कस्तुरीमृगें उभीं । तेणें सुवासें नभीं । दाटी जाहाली ॥ २९ ॥ शिवाभिषेक सुरभि । अमृतक्षीरें शिवस्वयंभीं । अनुसरल्या सिद्धी सौरभीं । धनस्पती अवचट ॥ ३० ॥ परमआश्चिर्य कनकसभा । शोभेनें सांवरिलें शृंगारनभा । स्वप्रकाश सुवर्णगाभा । सदस्य शिवरायाचें ॥ ३१ ॥ लावण्याशि लाउनि लोचन । पाहावें कनकसभेचें महिमान । सौंदर्यसृष्टीसी कुर्वाळून । टाकिलें शिवसभेवरूनि ॥ ३२ ॥ स्वप्रकाशवज्राचे अनंत । स्तंभ उभारले गगनचुंबित । संपूर्णपणें अखंडित । पाठार जाहाला ॥ ३३ ॥ त्यावरी मुक्तखचित उन्नत । चिद्रत्नमय लखलखीत । शोभले कळस सुशोभित । निरुपम ते ॥ ३४ ॥ धरा घोटींव सुवर्ण । रौप्यगर्भ राजांगण । बाह्य प्राकार सनातन । शुद्ध स्फटिकाचा ॥ ३५ ॥ प्रकाशाचें गाळींव तेज । पांचि वैडूर्य पेरोजें । अखंड शिवराजागणें सहज । तेजकल्लोळ सारें ॥ ३६ ॥ अपरोक्ष गोपुरें तेजोमय । कळसाग्रीं बिंबले चित्सूर्य । प्राकारअंतरस्थें प्रभाह्रदय । शिवअंतर्भवनीं ॥ ३७ ॥ भूमिकाज्ञान वोसरे । निरावलंब तें ही नुरे । शिवअंतर्भुवन येकसरें । पावले महादेवभक्त ॥ ३८ ॥ सद्गुरुशिवाचा आश्रम । पाहातां दृष्टि निवाली परम । शिवप्रसन्नता निरुपम । स्थानें देखिलीं डोळां ॥ ३९ ॥ त्यान्ही अवस्था क्रमूनि । पाहातां शिवाचे सदनीं । शिवचि अवघा नयनीं । बैसला सुनिश्चळ ॥ ४० ॥ व्योमकेश तो महाभीम । परि सौम्य शांतीनें परम । प्रत्यक्ष जाला सर्वोत्तम । आत्मा शिवराजा ॥ ४१ ॥ नवभक्तीच्या अभिनव । पायिरिया प्रतीति नवनव । येघोनि

१ या नांवाचीं रत्नें.

देव दानव मानव । भावें शिवसदना येती ॥ ४२ ॥ चहुंकडूनि येक निर्धार । प्रदक्षणा सदा विवर । मुक्तिद्वारें चत्वार । द्वारपाळ असती ॥ ४३ ॥ महाभयंकर स्वरूपें । कीं प्रगट जालीं शिवाची तपें । काळ-दमन प्रतापें । जय विजय उभे असती ॥ ४४ ॥ चत्वारद्वारीं अष्ट वीर । त्रिकाळरूपी वैश्वानर । दृष्टीसि पडतां ते अघोर । वासनात्मक विदारिती ॥ ४५ ॥ सन्मुख प्रवेशतां निर्विकार । ज्ञेयगर्भीचा अगोचर । मंडप स्वरूपज्ञाति साचार । उभारला ॥ ४६ ॥ माजिअंतर्सुख ओवरी । विज्ञानघन सिंहासनावरी । परमसुंदर साजिरी । शिवमूर्ति बैसली ॥ ४७ ॥ स्वरूपता शिवशक्ती । शांभवी स्वरूपस्थिती । विघ्न-हर गणपती । बैसलासे तेथें ॥ ४८ ॥ विवेकषण्मुख समर्थ । भावनंदी पुढें परमार्थ । शिववाहन तें सर्वार्थे । सिधीप्रद होय ॥ ४९ ॥ सद्भावें नंदीचा वृषण । स्पर्शतां तोयं पावे पूर्ण । शिवभक्तांसि कृपा करून । शिवयोग करी तो ॥ ५० ॥ तयाच्या सव्यें शिवप्रत्यये । द्वैताद्वैतशृं-गांतूनि स्वयें । पाहातां शिवलिंग निरामय । दृष्टीसी न्याहळे ॥ ५१ ॥ शिव आत्मेश्वर पिसा । पिसें करी दर्शना सरिसा । शिवं पिसाट दीक्षा ऐसा । वेध दे अवचट ॥ ५२ ॥ अखंड उघडा निर्धूत । निःसंग योगी अवधूत । निवांतमुद्रा ध्यानस्थ । डुल्लतसे सदां ॥ ५३ ॥ नि-जांचें जनक जननी । आत्माचि होय प्रत्यक्ष नयनीं । सद्गुरुदेव भक्त-ध्यानी । प्रगट जाहला ॥ ५४ ॥ तात माता नाथ गुरु । सोयरा नि-जांचा तो भवतारु । तारक भवाब्धीसि निर्धारु । सर्वस्वें माझा ॥५५॥ आजि आठवला अकल्पित । त्याचा झळंबें जाला अद्भुत । संचरलें जिवीं मद्भूत । कर्पूरगौर पांढरें ॥ ५६ ॥ पिंगट जटा अरुणवर्ण । ज्वाळा वरुपती चंद्रसूर्यनयन । भावींचा गुताक्षदहन । कल्पांतकारी ॥ ५७ ॥ तेणें लाविला मज चाळा । तो मज आठवतो वेळोवेळां । विज्ञानविभूति उधळा । बाणला निर्मळांगीं ॥५८॥ सुप्रसन्न वदन सुंदर ।

---

१ लिंगदेह. २ (१) ओवरी, पडवी. ३ कार्तिकेय. ४ भक्तांचा. ५ आवेश. ६ मिटलेल्या तिसऱ्या डोळ्यांतील अग्नि.

दयासंपन्न मनोहर। शर्वाणीवल्लभ अगोचर। शिवराव सिद्धांचा ॥ ५९॥ नित्य विरक्त वीतरागी। तत्वनिर्वाण निजयोगी। जयाच्या दर्शनप्रसंगीं। निराळे योगेश्वर ॥ ६० ॥ परम शांत परम उदार। परम धीर परम गंभीर। परम साक्षात्कारी वीर। निघडा मायानिवर्तक ॥ ६१ ॥ अज्ञान सृष्टीचा कल्पांत। करी नेत्राग्नीनें तो कृतांत। निर्मळ निश्चळ निवात। पद दे कृपेनें ॥ ६२ ॥ त्याच्या स्मरणें चि गती। पावन जाली सर्व जगती। तयाच्या दर्शनें पुढती। जन्मांतर नसे ॥ ६३ ॥ ऐसा योगीश कपाळी। करी वासनाव्यसनहोळी। अद्भुत स्थितीचा पाळी। भूतपाळ ॥ ६४ ॥ बैसोनियां मनमुळीं। भ्रांति चोरूनि ने अकाळीं। पाहातां दुरी ना जवळी। पळे भेटे अवचट ॥ ६५ ॥ देखतां सळोनि जाय मन। चाकाटलें करी भ्रमण। भयाभीत निर्वाण। हरहरशब्दें उकावे ॥ ६६ ॥ पिनाकपाणि कपर्दी शर्व। त्रियंबका धूर्जटी तूं अपूर्व। विसरोनियां पूर्वापूर्व। वैखरीसि थदवी ॥ ६७ ॥ स्थाणु रुद्र उमापती। भर्ग भूतेश भीमाकृती। काळदमन तुझी कीर्ती। आईकिली देवा ॥६८॥ त्रिगुणत्रिपुरहर देवा। विज्ञानचंद्रमौळी शिवा। तमांधकारासुरहंत्र सेवा। दे मज अखंडीत ॥ ६९ ॥ भवगजासुर संहरूनि। गजचर्मांबरधर शिवमुनी। ज्ञानगंगाधर ध्यानीं। प्रगटला ऐसा ॥ ७० ॥ सिद्धादिसिद्धप्रसिद्धा। स्वानंदउदधी नित्यशुद्धा। आगाधअनुभवप्रबुद्धा। विबुधपाळका ॥ ७१ ॥ विज्ञानवटतरूचे मुळीं। स्वरूपसिद्धी आसन सोज्वळीं। निजानुसंधानध्यानमेळीं। बैसलासि दक्षिणामूर्ति ॥ ७२ ॥ अखंड समाधिस्थ शंकरा। कृपा करीं गा कृपाकरा। शिवा अनाथमाहेरा। तुजवीण गती मज नसे ॥ ७३ ॥ स्वरूपानुभव अखंडीत। मौन व्याख्याते प्रगटित। वस्तुप्राप्तीनें अनंत। ज्ञानवृध तुज सेविती ॥ ७४ ॥ सनकादि सिद्धकोटि। जोडल्या करसंपुटीं। उभे ठाकले निकटानिकटीं। तुझा अनुग्रह व्हावया ॥७५॥ मौन व्याख्याते सहज। पावोनि निजरहस्यगुज। स्वानंदें सेविती तुज। शिव सद्गुरुवर्या ॥७६॥

---

१ शंकर. २ (?) उकले, उघडे.

सर्वार्थे तुज शरण । सर्वभावें माझें भजन । करीन तुज आत्मार्पण । अभिवंदनयोगें ॥ ७७ ॥ ज्ञानसंकल्पविना मुळीं । अंतर्भावहृदयकमळीं । शिव अर्चिला पुष्पांजुळीं । पूजिलीं वाग्पुष्पांची ॥ ७८ ॥ मज तूं सद्गुरु बोलविता । कृपा प्रतिष्ठिली वाग्देवता । विष्णु सर्वोत्तम आतां । वर्णिजेल अवधारा ॥ ७९ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरूकृपेचा जिव्हाळा । शिवरामरहस्यअंतर्कळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ८० ॥ पष्ठदे दशम उल्लास संपूर्ण : ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ विष्णुमूर्ति । बैसली प्रत्ययानें चित्तीं । व्यापकस्वरूपें आचंतीं । जे अखंडीत ॥ १ ॥ वैखरी कुंठित वैकुंठीं । विज्ञान विभु जगजेठी । परमानंदसुखकोटी । योगलक्ष्मीसहित ॥ २ ॥ सायुज्यक्षीराब्धितनया । अपरोक्षसुखें करुनियां । विज्ञान वैकुंठीं समाधिशय्या । योगनिद्रा अनुभवी ॥ ३ ॥ स्वरूपज्ञानसंपत्ती । नांदे वैकुंठीं रमापति । ज्याच्या दर्शनाची स्थिति । साक्षात्कार स्वयें ॥ ४ ॥ विष्णुवास्तव्यस्थळ पाहतां । निंदारले ज्ञानचक्षु तत्वतां । पाहतें पाहणें पाहता । आटोनि गेलें ॥ ५ ॥ त्या विकुंठींची रचना । वर्णवेल पां कवणा । कुंठीत वेदांची भावना । अपरोक्षसुखें ॥ ६ ॥ केवळ कैवल्यसुख गाळींव । तयासि ह्मणती वैकुंठ नाव । स्वरूपाच चि अनुभव । विष्णु आत्मा तेथिचा ॥ ७ ॥ ब्रह्मांडकोटीचा विस्तार । जयाचे स्फूर्तींत अपार । तया आदिपुरुषाचा पार । पाविजे कवण ॥ ८ ॥ शुध्द बुध्द तत्व केवळ । तें चि विष्णुस्वरूप निर्मळ । गगन गाळींव सुनीळ । निजप्रभेनें आगळीं ॥ ९ ॥ उपरमल्या श्रुति स्मृति । ऐसी निरुपम विष्णुकीर्ति । शेष विरिंची वाचस्पति । समर्थ नव्हेति वर्णावया ॥ १० ॥ वास्तव्य विष्णु चिदाकाश । परमात्मा परम पुरुष । आदिविरंचीचा निर्विशेष । जननीजनक तो ॥ ११ ॥ तया विष्णूचें निजमंदिर । पाहावें निजदृष्टीसि मनोहर । तरि सद्गुरुकृपेनें साचार ।

---

१ (?) तृप्त झाले. २ ब्रह्मदेव. ३ बृहस्पति.

श्रवणीं च वसावें ॥ १२ ॥ विष्णुवसें तें परंधाम । स्वरूपसाक्षात्कारी सद्य । जेथें विशाळपणाचें व्योम । हारपोनि गेलें. ॥ १३ ॥ तेथें प्रमाणरहित रचना । शृंगारलें ज्ञानसुवर्ण नाना । चिद्रत्नस्तंभ गगना । भेदित चालिले ॥ १४ ॥ आत्मानुभवविस्तारें । मंडप पडशाळा गोपुरें । मेगज कामावला मनोहरें । रुपडीं सुरेखीत ॥ १५ ॥ प्राकर तोरणांकित सुंदरें । मनोहर मुक्तद्वारें । सुवर्णपाटांगणें विस्तारें । प्रतिमा प्राकारीं ॥ १६ ॥ ज्ञेयसुनीळैंपाचिनीळ । विष्णुराजांगणें सुनीळ । प्रभाकरमंडळें कीळें । सुरेखचक्रें साजिरीं ॥ १७ ॥ द्वादश कळा षोडशकळा । विष्णुसदनीं अनंत कळा । नव प्राकार चित्कळा । दशाचर्याविराजित ॥ १८ ॥ अभेदभेद निरशन । करावयासी पुरुषार्थी पूर्ण । वैकुंठीचे वास्तव्यजन । चतुर्भुज स्वरूपें ॥ १९ ॥ चहुं पुरुषार्थे संपन्न । सुनीळतनु राजीवनयन । पीतांबरधारी विभूषण । शंखचक्रधर्ते ॥ २० ॥ दुस्तर भवभेदहर्ते । प्रबोधासि प्रबोधकर्ते । जयविजय यशस्वी पुर्ते । विजयश्रीबळें ॥ २१ ॥ नारदादि वैष्णवथाटें । ब्रह्मानंद निजउत्कटें । वर्णिती चरित्र अमर्टें । कीर्तनगजरीं ॥ २२ ॥ सनकादिक योगी मुनी । महासिद्ध ब्रह्मज्ञानी । विष्णूचें अंतरंग होऊनि । सेविती भक्तीच्या सुखें ॥ २३ ॥ ध्रुव प्रल्हाद अंबऋषी । रुक्मांगदादि भक्त विशेषीं । सन्मुख उभे ठाकोनि सेवेसी । तत्पर असती ॥ २४ ॥ निजसद्भावें च्यान्ही मुक्ती । सेविती विष्णुसदनाप्रति । नवविधा नव भक्ति । दास्य करिती तेथींचें ॥ २५ ॥ तेतीस कोटी सुरवर । पुढें तिष्ठति जोडूनि कर । सहस्त्राक्ष आज्ञाधर । किंकर सेवेचा ॥ २६ ॥ वेदशास्त्रें पुराणें । जोडल्या करीं करिती स्तवन । अंतर्निष्ट अंतर्निष्ठेनें । आर्जविती विष्णूसि ॥ २७ ॥ बोधचतुराननंदनें । सद्भावें करूनि अभिवंदन । अहंमन्यभयभेदकदन— । कर्ता होय कृपेनें ॥ २८ ॥ त्या वैकुंठासि जावया ।

१ (?) तंबू-(पटशाला); धर्मशाळा. २ (?). ३ पाच नांवाचें रत्न. ४ तेज. ५ तार स्वरानें. ६ इंद्र. ७ नारद.

सद्वृत्तीनें निष्ठा जया । तेणें सद्गुरूची दया । आर्जवीजे सुखें ॥ २९ ॥ सद्गुरुकृपेनें अवचट । पाविजे निजकैवल्यवैकुंठ । जेथें नांदतसे वरिष्ठ । विष्णु निज आत्मा ॥ ३० ॥ महाविष्णूचें सिंहासन । पाहातां निवाले निजनयन । ज्ञानइंद्रनीळसुवर्ण । शोभलें सिंहाकृतीनें ॥ ३१ ॥ इंद्रनीळ घोंटीव आंगण । मुक्तमंडप अतिविस्तीर्ण । नवविध चिद्रत्नकुंदनें । चित्र चि सजीव तें ॥ ३२ ॥ नवभक्ति नव पवळीयां । विराजमान क्षमा दया । शांतिसोपानें तया । निलबैसकेसी ॥ ३३ ॥ कैवल्याकृति विमान । चैतन्यघन शोभायमान । चतुर्भुज विराजमान । विष्णुदूत असती तेथें ॥ ३४ ॥ धन्य ते विष्णुभक्त सुकृती । नित्य सेविती विष्णुप्रती । मगमगीत सुमनयाती । शृंगारिलें विमान ॥ ३५ ॥ दिव्य धुशरांचा उघळा । दीपकांचा परिमळ आगळा । दशांग प्रज्वळलें ज्ञेय जिव्हाळा । नभगाभारा घुमघुमित ॥ ३६ ॥ विज्ञानगभस्ती अभ्यंतर । स्वानंद भरींव अगोचर । त्या अंतर्विमानीं निरंतर । वसे आत्मा निजविष्णु ॥ ३७ ॥ दिव्य सिंहासनावरी । दिव्य सुमनसेजवरी । विशाळहृदय निर्विकारी । शोभला सुनिश्चळ ॥ ३८ ॥ ज्ञानविज्ञान सोज्वळ । उभयभागीं चित्कल्लोळ । प्रकाशले दीप निर्मळ । दाविती विष्णुरूपासि ॥ ३९ ॥ ज्ञानदृष्टीसि निर्धार । दिसे निजात्मा लक्ष्मीवर । जयाच्या स्वरूपें साचार । प्राप्ती वस्तूची ॥ ४० ॥ तयांचीं निजआयुधें प्रख्यात । भवभेददानवनिपात । करिती अभिमानाचा घात । देती सद्गती ॥ ४१ ॥ चक्रें भवनक्र विदारिला । चक्रें भ्रमचक्राचा नाश केला । चक्र तें सुदर्शन स्वलीळा । करीं धरी भगवान तो ॥ ४२ ॥ ज्ञानगदा प्रचंड करीं । तेणें अज्ञानमधु संव्हरी । भेदहर भवकैटभारी । अरिसूदन स्वयें ॥ ४३ ॥ प्रणव अखंड अनुस्वरित । शंख वेदासी अखंडीत । विज्ञानदीक्षेनें परिहरित । भवतापचर्या ॥ ४४ ॥ आश्चर्यासी विभूषित । लीला करीं

---

१ (?) २ पोवळी, तटाच्या भिंती, ३ भद्राची. ४ जन्म मरण रूप संसाराच्या फेऱ्याचा. ५ एक दैत्य. ६ संसाररूपी कैटभ दैत्याचा शत्रु.

सद्भक्तीनें निष्ठा जया । तेणें सद्गुरूची दया । आर्जवीजे सुखें ॥ २९ ॥ सद्गुरुकृपेनें अवचट । पाविजे निजकैवल्यवैकुंठ । जेथें नांदतसे घरिष्ट । विष्णु निज आत्मा ॥ ३० ॥ महाविष्णूचें सिंहासन । पाहातां निवाले निजनयन । ज्ञानइंद्रनीळसुवर्ण । शोभलें सिंहाकृतीनें ॥ ३१ ॥ इंद्रनीळ घोंटीव आंगण । मुक्तमंडप अतिविस्तीर्ण । नवविध चिद्रत्नकुंदनें । चित्र चि सजीव ते ॥३२॥ नवभक्ति नव पवळीयां । विराजमान क्षमा दया । शांतिसोपानें तया। नित्यवैसकेसी ॥३३॥ कैवल्याकृति विमान। चैतन्यवन शोभायमान। चतुर्भुज विराजमान । विष्णुदूत असती तेथें ॥३४॥ धन्य ते विष्णुभक्त सुकृती । नित्य सेविती विष्णुप्रती । मगमगीत सुमनयाती । शृंगारिलें विमान ॥ ३५ ॥ दिव्य धुशरांचा उधळा । दीपकांचा परिमळ आगळा । दशांग प्रज्वळलें ज्ञेय जिव्हाळा । नभगाभारा धुम्धुमित ॥ ३६ ॥ विज्ञानगभस्ती अभ्यंतर । स्वानंद भरींव अगोचर । त्या अंतर्विमानीं निरंतर । वसे आत्मा निजविष्णु ॥ ३७ ॥ दिव्य सिंहासनावरी । दिव्य सुमनसेजवरी । विशाळहृदय निर्विकारी । शोभला सुनिश्चळ ॥ ३८ ॥ ज्ञानविज्ञान सोज्वळ । उभयभागीं चित्कल्लोळ । प्रकाशले दीप निर्मळ । दाविती विष्णुरूपासि ॥ ३९ ॥ ज्ञानदृष्टीसि निर्धार । दिसे निजात्मा लक्ष्मीवर । जयाच्या स्वरूपें साचार । प्राप्ती वस्तूची ॥ ४० ॥ तयांचीं निजआयुधें प्रख्यात । भवभेददानवनिपात । करिती अभिमानाचा घात । देती सद्गती ॥ ४१ ॥ चक्रें भव-[illegible]दारिला । चक्रें भ्रमचक्राचा नाश केला । चक्र तें सुदर्शन स्व-[illegible] करीं धरी भगवान तो ॥ ४२ ॥ ज्ञानगदा प्रचंड करीं । तेणें [illegible]धु संव्हरी । भेदहर भवकैटभारी । अरिसूदन स्वयें ॥ ४३ ॥ अखंड अनुस्वरित । शंख वेदासी अखंडीत । विज्ञानदीक्षेनें पारि- [illegible] । भवतापचर्या ॥ ४४ ॥ आश्रियांसी विभूषित । लीला करीं

१ (?) २ पोवळी, तटाच्या भिंती, ३ मज्ञाची. [illegible] जन्म मरण रूप संसाराच्या फेऱ्याचा. ५ एक दैत्य. ६ संसाररूपी कैटभ शत्रु.

विष्णुपदेंसीभांदीती । ध्वजवज्रांकितगती । ऊर्ध्वरेखा विराजे ॥ ६१ ॥ स्वानंदआयतन पूर्ण । पदीं पद्म विराजमान । सामुद्रिक लक्षणें संपूर्ण । पदराजीवयुगळीं ॥ ६२ ॥ ज्ञानसुनीळगुल्फपदीं । विष्णुपदबोध अनादी । स्वसुखप्रद स्वानंदीं । सेविजे बोध विधीनें ॥ ६३ ॥ पदीं पदप्राप्तीचीं भूपणें । अंदु आनंदघन स्थितीनें । वांकी खळाळती गजरानें । चेइरें करिती निजबोधा ॥ ६४ ॥ नित्यप्राप्तीचीं ज्ञाननुपुरें । अखंडबोधमधुरस्वरें । तोडर आत्मसाक्षात्कारें । गर्जतसे चरणीं ॥ ६५ ॥ गगननीळ रंभागर्भ । पदावारे जानु स्वयंभ । पोटरिया शोभा सुप्रभ । प्रकाशती सुखें ॥ ६६ ॥ ज्ञानरवीचीं प्रभामंडळें । तेज तळपत जानुचक्रढाळें । जंघ विस्तीर्ण अवलीळे । शोभिवंत कटिप्रदेश ॥ ६७ ॥ सावकाशीं निरावकाश । पीतांबर तो स्वप्रकाश । आत्मा प्रतीतीनें कास । कासिली असो ॥ ६८ ॥ आपाद रुळे पीतांबर । कटीं कटिसूत्र मनोहर । ज्ञानज्वाळमाळाविस्तार । क्षुद्रघंटिकागजरें ॥ ६९ ॥ स्वानंदघन दोंद शोभे । नाभीं विराजमान निजप्रभे । प्रसव विधीसी लाभे । निजतत्वविवरें ॥ ७० ॥ त्रिशुद्धीनें गतिनिर्धारीं । त्याची त्रिवळीचिन्हें उदरीं । विशाल वक्षस्थळावरी । शोभे श्रीवत्सलांछन ॥ ७१ ॥ आत्मप्रतीतिविरागर । कौस्तुभ कंधरीं चित्प्रभाकर । तें तुजसींचें अभ्यंतर । वैजयंती गळां ॥ ७२ ॥ नित्यप्राप्तीच्या वनमाळा । मुक्ताहार शोभती गळां । पदकें स्वानंदघननीळा । सेविती श्रीविष्णूसि ॥ ७३ ॥ नभईभशुंडा सरळ । तैसे अजानुबाहु विशाळ । बाहुभूपणें तेजकल्लोळ । पाहातां दृष्टी झांकोळे ॥ ७४ ॥ ज्ञानसत्तासाक्षात्कारीं । मिरवलीं करकंकणें करीं । निजप्राप्तिमुद्रा निर्धारीं । विभूषित आंगोळियाँ ॥ ७५ ॥ अर्धोन्मीलित आकर्ण नयन । प्रसन्नवदन सुखैकघन । मंदहास्य श्रीभगवान । कृपाईक्षणें विलोकी ॥ ७६ ॥ नासापुट सुरेख सरळ । भ्रू-

१ (?) कांहीं लागत नाहीं. ' विष्णुपदेंसी भालदीप्ति ' असे असावें काय? २ सांखळ्या. ३ केळीचा गाभा. ४ तुळसीचें असावें काय? ५ काळा हत्ती. ६ दिपून जाते. ७ अंगठ्या.

लता घ्यापाकृति विशाळ । भाळीं केशराचा रसाळ । रेखिला टिळक ॥ ७७ ॥ श्रवणीं कुंडलें दीप्तिवंत । ज्ञानरवीसी तेज देत । मुखचंद्रीं त्या अमित । अर्पिल्या चंद्रकोटी ॥ ७८ ॥ सद्भावचंदन चर्चिला । शोभेचा गौरव गौरवा आला । कस्तुरीचा परिमळ प्रबळला । मिश्रित सुगंधीं ॥ ७९ ॥ सकळ शोभेचा मुकुट । माथा मिरवला तेजें उत्कट । नक्षत्रें घेरटी घनवट । तेज किरिटाचें ॥ ८० ॥ पाहातां पाहातां निरे अंतर । सर्वांग रम्य[1] मनोहर । वैकुंठनिवासी सुंदर । पाहिला डोळां ॥८१॥ प्रतिष्ठा आत्मप्रतीती । पूजा अनुभवस्थिति । धूपदीपनैवेद्य मति । अर्चिला श्रीविष्णु ॥८२॥ अनंतस्फूर्ति ब्रह्मगोळ । कर्पूरज्ञानाग्नि भंबाळ । उजळलें आरत जन्ममूळ । प्रकाशलें तेणें ॥८३॥ संकल्पशून्य अखंडित । घातलें सद्भावें दंडवत । वाचा गिळूनि निर्हेतें[2] । स्तवन केलें ॥ ८४ ॥ जो ज्ञानाचें अधिष्ठान । जो उपदेशविधीचें जन्मस्थान । अवतारपरंपरा ज्ञान- । जिव्हार उपासकांचें ॥ ८५ ॥ मुक्त व्हावयासि पाहीं । विष्णुवांचूनि दैवत नाहीं । भवनिवृत्तीसी लवलाहीं । ब्रह्मास्त्र चि हें ॥ ८६॥ विष्णु च होय आत्माराम । उपासकांचें अंतर्याम । करुणाकीर्तनें निजविश्राम । जागवावा भक्तीं ॥ ८७ ॥ ब्रह्मप्राप्ति जालियावरी । कर्तव्यास नसे चि उरी । परि ब्रह्मप्राप्ति निर्धारी । अनुभविजे सुखें ॥ ८८ ॥ तें हें दाशरथी कीर्तनसुखें । चरित्रकथन निजमुखें । करुणाकीर्तनीं हरिखें । प्रगट होईजे श्रीरामें ॥ ८९ ॥ उपासनेचें अभ्यंतर । राम वस्तु निर्विकार । षष्ठ रुद्र हा साचार । उपास्तिविधीचा ॥ ९० ॥ आतां [3]सप्तमरुद्रांतरीं । करुणेची च भरोवैरी । माझी आवडी अभ्यंतरीं । ते चि प्रगटेल ॥९१ अद्वैत फोडूनि जिव्हार । आत्मप्रत्ययाचा रघुवीर । तो चि सगुण साक्षात्कार । अवधारिजे पुढें ॥ ९२ ॥ तें सप्तमरुद्रनिरूपण । बोळला अमृतकरुणाघन । सेवा अवधानश्रवण । चातकवृत्तीनें ॥ ९३ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । विष्णु सायुज्य प्रगटला । ह्मणे मेरुअनंत ॥ ९४ ॥ षष्ठरुद्रे एकादश उल्लास संपूर्णः ॥

१ वाटोळीं, सभोंवार. २ निष्काम. ३ भरती, पूर.

## रुद्र ७ उल्लास १

॥ श्रीगणेशायनमः श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः ।

श्रीरामं परमानंदमुपदेष्टारमीश्वरं ।

व्यापकं सर्वलोकानां कारणं तं नमाम्यहम् ॥

श्रीरामचंद्रायनमः । श्रीरामसमर्थ गणपति । बोधप्रसन्न आत्मस्थिती । नित्यप्राप्तीची प्राप्ती । मंगळमूर्तिवंदनें ॥ १ ॥ विद्यावसंतकुसुमाकर । निजप्राप्तीइंदुकळाधर । स्वरूप ऐश्वर्ययोगसार । प्रमेय आधिदैवत ॥ २ ॥ सौजन्यरत्नाचा वैरागर । दशागगनदिवाकर । निगमकल्पतरु अपार । फळप्राप्तीनें वोळला ॥ ३ ॥ आत्मरिद्धिसिद्धीचा वल्लभ । होय कृपेनें अतिसुलभ । पाहातां ब्रह्मादिकांसि दुर्लभ । ध्यानीं मनीं नातुडे ॥ ४ ॥ स्वरूपार्थ योगसिद्धिदाता । भवदुर्घटविघ्नहर्ता । ज्ञानप्रभाकर वपुभर्ता । सहजस्थितीचा ॥ ५ ॥ शांतिसरितेचा उगम । स्वरूपविश्रांतीचा संगम । सायुज्यसुखनिधी परम । अगाध ज्ञानें ॥ ६ ॥ ज्ञेयअवाप्तीसुखविसांवा । जो विद्येनें बुझावी जिवशिवा । भवांमज देवदानवां । वंद्य सर्वार्थे ॥ ७ ॥ सकळ सित्धांचा आदि सित्ध । बोधचिंतामणि प्रसित्ध । जयाच्या ईक्षणें स्वतःसित्ध । स्वरूपप्राप्ती ॥ ८ ॥ जो विश्वात्मक हृदयींचा प्राण । जो समाधिशांभवीनंदन । सद्गुरुस्वरूपी भवकंदन । अभिवंदन तया ॥ ९ ॥ तयाची कृपा ब्रह्माणी । ब्रह्मात्मा अनुभव खाणी । विद्यासंपदेची स्वामिणी । कविकुळदेवता ॥ १० ॥ अनंतनिजगुणगायका । अनंतसुखप्राप्तीची नायका । अनंतअनुभवदायका । अभिवंदन तियेसी ॥ ११ ॥ जे वाचासिद्धींची कल्पवल्ली । सुमनेंसुवासिकें फुलली । निजप्राप्तीफळें लिगडेली । वोळली गुरुकृपा ॥ १२ ॥ स्वरूपार्थसित्धीची गरिमा । जे अनुभवदशेची महिमा । जे मोक्षरमेची रमा । गुरुकृपा

१ वांकला. २ शरीराला आधार. ३ शंकराचा पुत्र. ४ सुवासिक फुलांनीं ५ ओथंबली. ६ मोठेपण.

सरस्वती ॥ १३ ॥ जे निजऐश्वर्यविलासिनी । जे स्वरुपावबोधविधिनंदिनि । निगमागमविस्तारिणी । विज्ञानशक्ति ॥ १४ ॥ निजउन्मनीची अंतर्कळा । जिचेनि चित्कळेसी जिव्हाळा । ते गुरुकृपा ब्रह्मबाळा । हृदयासि आली ॥ १५ ॥ विज्ञानरामसोहळा । सहजवाग्विलास अर्थावलीला । ते अपरोक्षदशा सरळा । वाग्देवी वदतसे ॥ १६ ॥ परा गाळूनियां पुरती । परा अभ्यंतर वसविती । ब्रह्मानुभव सरस्वती । गातसे अभिनव ॥ १७ ॥ जिच्या वाग्विलासछंदें । प्रगटला परमार्थ स्वानंदें । अद्वयपदबोधेविशदें । अर्थ प्रांजळ होतसे ॥ १८ ॥ उद्घाटवाचेसि वेळोवेळा । तत्वप्रमेयांतरींचा जिव्हाळा । स्वरूपयोगें रामसोहळा । होतसे अखंडित ॥ १९ ॥ नित्यश्रवणार्थी मन । प्रगटलें आत्मनिदान । परम गोड निरूपण । होतसे सहज ॥ २० ॥ तो आठवरूप अवचट । चाले अद्वैतबोध उत्कट । सायुज्यमुक्तीचें मूळपीठ । बोळली गुरुकृपा ॥ २१ ॥ निःशब्दसुखें सखोल । अनुभवामृताची वोल । बोलांबोलासि देऊनि डोल । सुखार्थ वदे ॥ २२ ॥ उभी अक्षरमातृकाठाईं । प्रणवशिखरींची रामाई । ते चि रामवरदायिनी पाहीं । बोळली जगदंबा ॥ २३ ॥ अर्थअन्वयग्रंथसंगति । आली गुरुकृपा प्रतीति । वाचा त्रिपुटीतीत स्थिति । प्रगटी अर्थे ॥ २४ ॥ वाचेवीण वाचेसि आणी । मुक्यातें वदवी वाणी । जे बहिऱ्याप्रति श्रवणीं । अर्थविवरें दे ॥ २५ ॥ ऐसी कृपा जयापासुनी । तो सद्गुरु मोक्षपाणी । नमन तयाचे चरणीं । निजऐक्यभावें ॥ २६ ॥ ज्याच्या ईक्षणें भवविघ्न हरे । ज्याच्या स्मरणें भ्रांति ज़ुरे । ज्याच्या दर्शनें स्वसुख भरे । आंगो आंगीं उत्कट ॥ २७ ॥ सद्गुरु कृपेनें स्वलीला । कळले अकळ अर्थ हेळ्रा । थकित चमत्कारजिव्हाळा । विस्मयेसीं ॥ २८ ॥ समाधिसि ही चमत्कार । कृपेनें बोळला गुरु उदार । स्वानंदसुखघन गंभीर । बोधगर्जना करितसे

---

१ सरस्वती. २ अद्वैतवाक्यांतील स्पष्ट शब्दांमुळें. ३ वाचेच्या उद्घाटनाला. ४ (?) ओली, आर्द्रता. ५ प्रत्येक वाक्याला. ६ (?) रामाची आई, रामाचें रक्षण करणारी. ७ अर्थबोध. ८ सहज, लीलेनें.

॥ २९ ॥ सद्गुरुसि अभिवंदितां । बोळली योगसिधि हे, तत्वता । झेतिसुख अवचट हातां । आलें अभिसवेनसी ॥ ३० ॥ हें च देशिकासि नमन । सद्गुरुपद सनातन । नमस्कारीं च उन्मन । विरालें सुखें ॥ ३१ ॥ अवधान अनुसंधान । अर्थरूप निरूपण । प्रत्ययाचें श्रवण । करावें सुखें ॥ ३२ ॥ करणंपंचकाहूनि वरी । प्रज्ञाअष्टदळ अंतरीं । अँकोची पाऊनि अक्षरीं । प्रगटे अभिनव ॥ ३३ ॥ ज्ञान चिवस्तु वस्तुता । अद्वैतअनुभव तत्वता । निलउन्मेषा परता । निर्वाण जीवभृंग ॥ ३४ ॥ आश्रयाचें अधिष्ठान । त्रिपुटी विहीन ज्ञान । सगुण ऐसें अभिधान । प्रवर्तलें गुणयोग ॥ ३५ ॥ स्वानंदघन सुख योतवी । ज्यातें वर्णिती वेदादि कवी । तो हृदयस्छ गोसावीं । निजप्राप्तिकर ॥ ३६ ॥ ब्रह्म मी च चळवळ । घनघटची सुखें अखिल । साळमाळ विशाळ । हाहीं अवकाश नेंदी ॥ ३७ ॥ ऐसें सद्गुरूचें स्मरण । याहीवरि देशिक बोधेंविवरण । प्रवर्तलें उर्ध्वस्फुरण । परतोनि अभ्यंतरीं ॥ ३८ ॥ प्रथम ब्रह्माकारस्फुरण । पैसावलें ज्ञानघनस्मरण । अर्थावबोधवितरण । होतसे उदारहस्तें ॥ ३९ ॥ स्मरणांतरीं द्विविध । पैसावले भेदाभेद । भेदें अंतःकरणवेध । हा अविद्येचा ॥ ४० ॥ मूळ ऊर्धी योग अभेद । गुरुकृपा निजानंद । हा ब्रह्मविद्येचा सुखप्रद । प्रवाह चालिला ॥ ४१ ॥ भेद परोक्ष सरला । अभेद बोध विराला । द्वैताद्वैत वोसरला । वृत्तीचा उमस ॥ ४२ ॥ आस्तिक्यासि सांगणें न घडे । मौन्यासि महामौन्य पडे । ऐसिये स्थितीसी सांकडे । विरालें उपदेशें ॥ ४३ ॥ वस्तूसि वस्तु प्राप्ति । मुक्तीसि सायुज्य मुक्ति । स्वसुखासि सुखभुक्ति । वेदरहस्यबोधें ॥ ४४ ॥ जेथें निःशब्द ना संवाद । तेथें उपदेश हा स्वानंद । अनंतसद्गुरुप्रसाद । पावलों ऐसा ॥ ४५ ॥ निर्विकल्प परि प्रतीतीसि ये । निःसंग परि भेटे प्रत्यये । निर्द्वंद्व परि तें सदय । अनुवाद करी

---

१ पांच इंद्रियांहून. २ बुद्धिरूप आठ पाकळ्यांचें कमळ. ३ विकास. ४ गुरूच्या उपदेशाचें देणें. ५ उर्ध्वी (?) ऊर्मी (?). ६ मौन.

॥ ४६ ॥ दोन्हीं नयनीं समान दृष्टी । युग्मश्रवणीं येक गोष्टि । उभयचरणपरिपाटि । येक चि चालणें ॥ ४७ ॥ हे गुरुशिष्याची ऐक्यता । येक स्वरूपें चि तत्वता । नामें सिंधु आणि सरिता । परि जीवन येक ॥ ४८ ॥ सूर्य आणि वन्हि । येक तेजाची फडसणी । जीवशिवाचे विचमानीं । बोधें येक हृदय ॥ ४९ ॥ प्रत्ययेंवीण प्रत्यय । घेती निर्मन योगीय । जे अनंतमौनीनें स्वयें । अनुग्रहिलें मज ॥ ५० ॥ त्या अनुग्रहाचें अभ्यंतर । अनंतमौनी च साचार । केला प्रतीतीचा उद्धार । काय मी तें बोलों ॥ ५१ ॥ अनंतमौनीप्रसाद । लाधलों हा सुखसंवाद । अवधान देऊनि स्वानंद । घेइजे निरूपणीं ॥ ५२ ॥ तुम्ही अवधानसृष्टीचे ईश्वर । कीं कृपाअर्थसिद्धीचे कुबेर । कीं प्रबोधाचे जलधर । वोळलेती मजवरी ॥ ५३ ॥ कीं निजमोक्षाचें जनक । अद्वैतसंपत्तीचे नायक । हृत्कमळविकासक । ज्ञानार्क उदेलेती ॥ ५४ ॥ परम कृपेचे कृपाकर । परमार्थदानीं उदार । विश्रांतिगगनसुधाकर । प्रकाशलेती दैवें ॥ ५५ ॥ आपुलें कृपेचा प्रकाश । अभिवंदिला मूळपुरुष । तुमची प्रतीति निर्विशेष । सरस्वती वंदिली ॥ ५६ ॥ तुमचा जो अंतर्भाव । तो चि माझा सद्गुरुराव । अभिवंदनीं नवलाव । जाहला इतुका ॥ ५७ ॥ आत्मज्ञानप्रभवें । सूर्यासि सूर्य प्रभेनें अर्चावें । तवि अद्वैतबोधस्वभावें । वस्तूसि भजिजे ॥ ५८ ॥ निजात्मदृष्टिविलोकनें । ब्रह्मज्ञान अनुत्पन्न । आदिमध्यान्तस्फूर्तिविहीन । समाधान केवळ ॥ ५९ ॥ तें चि पुढें निरूपण । साक्षात्काराचा दशा गहन । सद्गुरुकृपा अमृतघन । वृष्टि होइल सुखें ॥ ६० ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । आत्मानुभव अतर्क्यलीला । ह्मणे मेरुअनंत ॥ ६१ ॥ सप्तमरुद्रे प्रथम उल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः॥ श्रीरामसमर्थ मुक्तस्थिति । अभिनवनीलमुक्तदीप्ति ।

---

१ दोन्ही कानांत; श्रवणयुग्मीं. २ सरिता, नदी. ३ विचार. ४ चंद्र. ५ नवीन काळ्या मोत्याचें तेज धारण करणारा.

ज्ञानदियाकर व्यापि । सुनीळेंग नभीं ॥ १ ॥ चिदादित्यान्वयान्यींत । बोध दशरथमेघ अद्भुत । वर्षला स्वातियोग विख्यात । कौसल्याशुक्तिजठरीं ॥ २ ॥ रामनीळमुक्तांचा संभव । हृदयीं विभूषित शिव । अभिनवदशा वैभव । देणें[1] ईश्वराचें ॥ ३ ॥ शेषचिदंबरसरोवरीं । मुक्तें होती अपाडापरीं । परि या सुनीळ मुक्ताची सरि । कोण्ही न पवे ॥ ४ ॥ नवळ परमहंस-हृदयीं । कोंदाटलीं मुक्तें चि पाहीं । परि या रघोत्तमरूपासि कांहीं । उपमा चि असेनां ॥ ५ ॥ विशुद्धसत्वविग्रहीं । याचा सद्भाव तो विदेही । तयाची अंतरनिष्ठा वैदेही । अनुभवी मुक्तभूषणें ॥ ६ ॥ साच चि तियेच्या उदरा आले । ते राममुक्त अनुभवी जाले । भक्तशिरोभूषण पाहले । प्रेमगगनीचे सुचंद्र ॥ ७ ॥ ऐसा मुक्तस्वरूपी श्रीराम । भक्त-वत्सल पूर्णकाम । प्रसन्न चित्तें निरूपम । ध्यानासि आणावा ॥ ८ ॥ भाविका प्रत्यक्ष रघुनंदन । होतसे तेणें भवकंदन । भक्तराजमुक्तभूषण । महादेव तो ॥ ९ ॥ रामसायुज्य सुधासार । सेऊनि समाधीचें मंदिर । परमशांत मनोहर । डोल देतसे सुखें ॥ १० ॥ प्राणपंचक कुर्वाळूनि । नाम स्मरे पंचवदनीं । पंचम अवस्था उन्मनी । जागवीतसे सदां ॥ ११ ॥ ऐसा तो शिव योगींद्र । हृदयांबरीं रामचंद्र । स्वानंदपुष्टीनें सुखसमुद्र । भरण भरीतसे ॥ १२ ॥ रामभजनीं भडसें न पुरे । ह्मणोनि कपिरूपें अवतरे । करसंपुटीं प्रेमनिर्भरें । सन्मुख राम सेवी ॥ १३ ॥ अखंड शिव रामीं वसे । श्रीराघवीं चि समर्पला असे । शिव आराध्य संतोषें । प्रत्यक्ष प्रसन्न तया ॥ १४ ॥ शिवासि करूनिया अभिवंदन । सद्भावें गिरिजा करि प्रश्न । ह्मणे तुह्मी सर्वदां निमग्न । ध्यानीं कवणा अर्जे-वितां ॥ १५ ॥ त्रैलोक्याचा तूं ईश्वर । तुज सेविती ब्रह्मादि सुरवर । तो तूं होऊनि सर्वदां तत्पर । ध्यासी कवणा ॥ १६ ॥ वेदें तुझें स्तवन कीजे । शास्त्रीं पुराणीं तूतें चि वर्णिजे । सनकादिसिद्धीं अनुभविजे । दक्षणामूर्ति देवा ॥ १७ ॥ तुझें हृदईचें गुज । कृपा करूनियां मज ।

---

१ ज्ञानसूर्य भरुन राहिला आहे. २ नील अंगरूपी आकाशांत. ३ देणें (?) ४ अपरंपार. ५ तृप्ति. ६ शंकराचें स्वरूप.

सांग दयाळा मी तुज । सहज शरण चि असें ॥ १८ ॥ तूं सर्वदां प्रसन्नरूप । कृपाकल्पद्रुम फळद्रूप । मजवरि कटाक्ष करूनि स्वरूप । दीक्षा दे दयाळा ॥ १९ ॥ तूं सकळांसि सुखकर । ह्मणोनि तुतें ह्मणिजेत शंकर[१] । स्वसुख अनुमविसी निरंतर । विख्यात शंभु[२]नामप्रशंसा ॥२०॥ सद्भाव जाणोनि स्वामी । कृपार्णवा अंतर्यामी । कृपेनें उचंबळोनि सुखर्मी । प्रगटवीं अभ्यंतर ॥ २१ ॥ बोधसुधाचित्कल्लोळ । घनवटोनि सुखअंतराळ । पर्वतवर्धनीसि तात्काळ । वृष्टीनें निववी ॥ २२ ॥ कृपासत्ता विश्रांतिसमीर । परशक्तीचें अभ्यंतर । चेतऊनि सुखें निरंतर । सुखांत मज्जविलें ॥ २३ ॥ मस्तकीं ठेऊनि अभयंकर । श्रवणीं गुज सांगे श्रीशंकर । योगविश्रांतिसुधाकर । प्रगटला दहराकाशीं[४] ॥ २४ ॥ शांभवी सर्वांगें निवाली । बोधामृतसिंधूंत विराली । अंतरें[५]प्रतीत ही उपशमली । जेंवि सागरीं लहरी ॥२५॥ पुढती येऊनि पूर्वस्थिति । अकळ वदे निजप्रतीती । तेणें समाधिस्थ शिवमूर्ति । डोल देत सुखाचे ॥ २६ ॥ परस्परें पार्वती शंकर । रामतत्व अगोचर । अनुभऊनि सुखें साचार । अनुवादती ॥ २७ ॥ तो शिवशर्वाणीस्वानंद । अद्वैतबोध संवाद । नारदें श्रवण करूनि निर्द्वंद्व । निवाला अभ्यंतरीं ॥ २८ ॥ स्वानंदें द्रवोनि विधिसुतें । स्वछंदें गात नाचत । चाळिला त्रैलोकीं विख्यात । विस्तारीत इतिहास तो ॥ २९ ॥ प्रमेय पद्मपुराणांतरीं । विस्तारिलें व्यासमती निर्धारीं । तें चि नैमिष्यारण्यामाझारीं । ऋषेश्वरांप्रति सूत सांगे ॥३०॥ विरक्तिभक्तिमुक्ति हृदय । प्रत्यक्ष प्राप्ती उभी राहे । निरुपमसौंदर्य स्वयें । प्रगटे रामरूपें ॥ ३१ ॥ श्रवण निष्ठा भक्ति । बैसल्या ऋषेश्वराच्या पंक्ती । वेदहृदय तत्वयुक्ती । चर्चा करिती सुखें ॥ ३२ ॥ भक्तीचें रहस्य संपूर्ण । प्रत्यक्ष होय मूर्ति सगुण । सगुणसाक्षात्कारें निर्गुण । प्रतीतीसि ये ॥ ३३ ॥ अपर सूर्य ऋषेश्वर । तापसदीक्षेनें वैश्वानर ।

---

१ शं ह्मणजे सुख तें करणारा तो शंकर. २ श ह्मणजे सुख अनुभवितो तो शंभु. ३ पार्वती. ४ हृदयाकाशीं, दहर–हृदय, ५ हृदयांत साक्षी होऊन. ६ नारद

तप सृष्टीचे ईश्वर । तत्पर श्रवणीं ॥ ३४ ॥ येक तत्व येक निष्ठा । येक वाक्यस्वरूपप्रतिष्ठा । अद्वैतबोधवरिष्ठा । वरिष्टज्ञाना ॥ ३५ ॥ अपेक्षीत सुखसल्लाप । जें कां परतत्व अरूप । जाणोनि भ्रमांचा आक्षेप । सूत तें चि निरोपी ॥ ३६ ॥ सूतसंहिता अपरोक्षज्ञान । उपनिषदभाग संपूर्ण । वाक्यमालिकासुमन । अर्थसुवासें ॥ ३७ ॥ वैशंपायन मुखरसुखिचें[1] । वेदहृदय त्रिकांडीचें । पायनतत्व त्रिभुवनीचें । अभ्यंतर ॥ ३८ ॥ वेदव्यास तत्वज्ञानी । ज्ञानप्रमेचा दिनमणि । सर्वार्थसंग्रहणी । परतत्व प्रगटी ॥ ३९ ॥ सकळ सित्धांचा सित्धांत । अनुभवरूप वेदांत । तारक तत्व विख्यात । रामरहस्यअक्षरें ॥ ४० ॥ व्यास वर्चसें प्रभाकर । बोधें प्रकाशलें चराचर । या चि प्रशंसेनें साचार । म्हणिजेत व्यासो नारायण ॥ ४१ ॥ तया व्यासोनारायणाप्रति । प्रसन्नचित्त उदार कीर्ति । सद्भावें कर जोडूनि सुमति । प्रश्न केला युधिष्ठिरें ॥ ४२ ॥ अष्ट हि भावें उदित । पुढती पुढती नमस्कारित । जो सत्वशांतीनें विभूषित । धर्मराज स्वयें ॥ ४३ ॥ तपें व्रतें अनुष्ठानें । सत्कर्में विधिविधानें । आचरोनि सद्भावें तेणें । धर्म प्रशंसेसी आला ॥ ४४ ॥ विविध आश्रमधर्म जाणोनि । स्वधर्म विस्तारी जनीं । स्वकीयकर्मअनुसंधानीं । प्रवीण धर्मविमर्षे ॥ ४५ ॥ ऐसें निरुपम धर्म जगतीं । तया धर्म नृपांचा चक्रवर्ती । विनयीत भावें व्यासाप्रति । विचारित आदितत्व ॥ ४६ ॥ सर्वशास्त्रविशारद मुनी । षड्गुण ऐश्वर्य विद्यमानी । परतत्व तें मज लागुनि । कवण तें सांगिजे ॥ ४७ ॥ परतत्व तें किंलक्षण । परमजाप्य तें कवण । परात्पर अधिष्ठान । सांग आधिदैवत ॥ ४८ ॥ धर्मराजप्रश्नवचनीं । तोषला सुखें महामुनि । ह्मणे या प्राप्तीस तुज वांचूनि । कवण भाग्याचा असे ॥ ४९ ॥ सकळ तत्वांचीं प्रमेयें । अकळती[2] सात्विकासि स्वयें । तो तूं परम सात्विक हृदयें । प्रश्न करिसी यथोक्त ॥ ५० ॥ सकळ धर्म स्वधर्मस्थिति । फळली तपें

१ वैशंपायनाच्या वक्तृत्वपूर्ण मुखांतील. २ समजतात, आकलन होतात.

माना जगती । धर्मा तुझी आइकोनि कीर्ति । शरण येती तुज ॥५१॥ सकळ हि धर्म आचरला । असे श्लाघ्यतेचा गर्व त्याला । परिक्षूनि पाहातां हि तुजला । लेश नसे अहंतेचा ॥५२॥ सकळ इतिहासश्रवणें । बहुश्रुत होसी ज्ञानें । परि केवळ तू निराभिमानें । पैरत्रिक पूससि ॥५३॥ तरि तूं जाण गा प्रसिद्धि । परतत्व तें निरुपाधि । श्रीरामावाचूनि त्रिशुद्धी । इतर असे चि ना ॥ ५४ ॥ इहपर चरित्रें निर्मळ । जेंवि अतर्बाह्य रविमंडळ । प्राप्तीचें फळद्रूप केवळ । अधिदैवत ॥ ५५ ॥ चंद्रोदयीं आह्लाद सकळां । तेंवि हा त्रिभुवनजिव्हाळा । सुखकर अवतारलीळा । सर्वोत्तम रामाची ॥ ५६ ॥ पृथ्वीच्या जळांमाजि । पवित्रता असे सहजीं । परि त्या जान्हवीजलसुतेजीं । समान न होती॥५७॥ तैसा पवित्रामाजि परम । दाशरथी श्रीराम । जेणें सकळही स्वधर्म । सिद्धीतें नेले ॥ ५८ ॥ पितृवाक्यपरिपालन । जगदोद्धारासी कारण । निर्दोष तत्वता पावन । रामतत्व अवधारी ॥ ५९ ॥ राघव तत्वाचें अभ्यंतर । पाहता तें चि तें वेद्सार । परब्रह्म निरंतर । रामतत्व व्याख्या हे ॥ ६०॥ राम त्रैलोक्याचा आत्मा । परत्रप्राप्तीचा परमात्मा । प्रगटोनि गुरुरूपें परंधामा । नेतसे निजआचरणें ॥ ६१ ॥ पवित्र दीक्षा श्रीरामाची । मूर्ति प्रगटली विरक्तीची । त्रैलोक्यसुखवस्तूची । विश्राति होय श्रीराघव ॥६२॥ त्रिगुणात्मक तत्वजिव्हाळा । गुणघन राम सावळा । तो चि तत्वता गुणावेगळा । पाहावा प्रतीतीनें ॥ ६३ ॥ ज्ञानरामचंद्रीं घनघट । सुधामय सीता उत्कट । निजतेजबिंब लखलखाट । ज्योतिर्मय कळा ॥६४॥ विज्ञानप्रभाकरीं सतेज । चित्छक्तिसीता सहज । निजप्रतीतीनें उमज । अभ्यंतरीं प्रबुध ॥ ६५ ॥ रामसुखघनीं स्वभावें । सीता चिद्विद्युत्प्रादुर्भावें । वोज प्रकाशोनि अस्तवे । घनीं घनरूप ॥ ६६ ॥ जेंवि दुग्ध समुद्रींची लहरी । उपशमें क्षीरार्णव वरी । तेंवि रामचंद्रअभ्यंतरीं । सीता अभिनव ॥ ६७ ॥ रामसीता अभिन्न स्थिति । तत्व अभ्यतरीं

१ परमार्थ. २ अस्तास जाई, अदृश्य होई.

अनुष्ठिती । ते तत्वज्ञसृष्टीचे गभस्ती । रामपरतत्ववेत्ते ॥ ६८ ॥ ऐसा परमपावन श्रीराम । साच चि जगाचा विश्राम । ब्रह्महत्यादिपापघ्न नाम । विख्याती श्रीराघवाचें ॥ ६९ ॥ रामपरात्पर ध्यान स्वयें । राम परात्पर ज्ञानहृदय । राम अगोचरप्रत्यय । जगीं प्रत्यक्षाकारें ॥ ७० ॥ या रामतत्वाचें आख्यान । श्रवणें तापत्रयअग्निशमन । स्वरूपानुभव सनातन । सुखार्णवीं मज्जवी ॥ ७१ ॥ आईक अनन्य चित्तें सत्य सन्निधी । मी जे निजगुज त्रिशुद्धी । तुज सांगेन कृतार्थबुद्धि । तरि येकाग्र होईं तूं ॥ ७२ ॥ तो व्यासधर्मराजअनुवाद । केवळ स्वसुखाचा संवाद । अवधान देऊनि निजानंद । अवधारिजे श्रोतीं ॥७३॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । परतत्वसंवादस्वलीळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ७४ ॥ सप्तमरुद्रे द्वितीयउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ ध्यानी । शोभला सद्भावासिंहासनीं । राजीवनयन लावण्यखाणी । रूपरत्नाकर ॥ १ ॥ सौंदर्यवसुमतीचा ईश्वर । मनोहर ज्ञानप्रभाकर । कुर्वंडी करूनि मदनसुधाकर । टाकिजे परिहारें ॥ २ ॥ ध्यानीं निरखितां रामरूप । जाली ज्ञानदृष्टी तद्रूप । विश्रांति अयोध्यानृप । प्रत्यक्ष जाला धर्मासी ॥ ३ ॥ स्वरूपप्राप्तीचें सुवर्म । प्रत्यक्षाकारें मनोरम । श्रीरामरूप निरूपम । प्रगटलें व्यासकृपेनें ॥ ४ ॥ चमत्कारला तेणें धर्मराज । नमस्कारीत व्यासासि सहज । ह्मणे सद्गुरुवर्य तूं सतेज । प्रत्यक्ष केलें परतत्व ॥ ५ ॥ माझे अभ्यंतर सुखैकघन । प्रगट परतत्वें रघुनंदन । स्वसुखाचें निजनिधान । प्रत्यक्ष देखिलें डोळां ॥ ६ ॥ ज्ञेय नीळोत्पलदळवर्णा । चिद्गगन गाळींव घन । निजरामरूप सनातन । बैसलें हृदयीं ॥ ७ ॥ प्रत्यक्ष दृष्टीसी श्रीराम । पाहातां विश्रांतीचा विश्राम । मी माझा संकल्पभ्रम । उडाला अवचट ॥ ८ ॥ स्वानंदसुधासमुद्रांत । बुडकळया देत तोषाचें चित्त । अद्भुतवेध अनुभवित । अनुभवेंसीं विरे ॥ ९ ॥ परमशांत

---

१ मग.

कुंतीचा नंदन । व्यासकृपा स्वानंदवर्धन । सगुणसाक्षात्कार उन्मन । बेधदर्शनें ॥ १० ॥ ब्रह्मसाक्षात्कारेंसीं सगुण । ऐसें व्यासकृपेचें महिमान । चहूं पुरुषार्थांचें आयतन । प्रत्यक्ष केलें ॥ ११ ॥ महाभाग विशाळहृदया । अवधान देयीं धर्मराया । माझे हृदयींचे गूज सखया । पुढती तुज सांगेन ॥ १२ ॥ मज जे दया केली श्री नारदें । जें उपदेशिलें परतत्व स्वानंदें । ज्याचे प्राप्तीनेंसी अनुवादें । रहस्य पुराणांतरीं ॥ १३ ॥ सप्त भूमिका प्राकार । मकरतोरणांकित महाद्वार । अभिनव अयोध्यानगर । रचलें मोक्षस्थितीनें ॥ १४ ॥ अमृत गोठुनि अवचट । सुधामडळ सुखें प्रगट । अयोध्यानगर उत्कट । तेजविमर्वे ॥ १५ ॥ मोक्षनिधी रिद्धिसिद्धी । स्वरूपप्रसन्नता उपलब्धी । निरवधि सुखउदधि । नांदतसे आत्माराम ॥ १६ ॥ मध्यप्रदेशीं मनोहर । अयोध्येचें हृदय निरंतर । साक्षात्कार अगोचर । कल्पतरुतळवटीं ॥ १७ ॥ चिद्रत्नविमान साजिरें । स्वानंदकर्णिका आकारें । मुसावलें विज्ञानभास्करें । दिव्य सिंहासन ॥ १८ ॥ सुवास दाटला चिदंबरीं । सुमन अरैळ तयावरी । ज्ञानाकाशाची साजिरी । शोभे गरिमा ॥१९॥ तेथें सर्वोत्तम श्रीराम । मनोहर द्विजविश्राम । कोटिलावण्याचें परम । लावण्य स्वयें ॥ २० ॥ भुवनसुंदर साजिरा । ध्यानमनोहर हृदयींचा हिरा । विज्ञानगगनगाभारा । निजतेजविमर्वे ॥ २१ ॥ जयाच्या शोभेसि नाहीं उपमा । सौंदर्यसृष्टीचा आत्मा । दृष्टीसि पाहातां पाहातां उपरमा । पावल्या ध्यानसृष्टी ॥ २२ ॥ प्रसन्नतेची प्रसन्नता । होय मदनेंदूंसि पाहातां । विशाळाक्ष सुनीळता । वपूं दृष्टीसि बैसली ॥२३॥ स्वानंदचंद्रवदनामृतें । मंदहास्य प्रसन्नचित्तें । अमृतोपम भाषण तें । होतसे अंतरंगेंसी ॥ २४ ॥ वसिष्ठादि महामुनी । सनकादि सिद्ध समास्थानीं । निवाले श्रीरामदर्शनीं । संभाषणीं तत्पर [1]॥ २५ ॥ रामवदनसुधाकर । अवलोकिती नयनचकोर । हृदयस्वसुखसागर ।

---

१ घर. २ कमळाचा कोश. ३ ( ? ) ४ मूर्ति.

हेलावतसे तेणें ॥ २६ ॥ परम विश्रांती संभापणीं । संभा सुलीन ह्रांनंदजीवनीं । श्रीरामाचें रूप अंतःकरणीं । चमत्कारीं त्या प्रगटे ॥२७॥ दिव्यरत्नांक हेमभूषणें । सर्वांग सुशोभित तेणें । मुक्ताहार नक्षत्रप्रभेनें । झळकती कंठीं ॥ २८ ॥ राम नररूपवैडूर्य । गाळींव तेज विग्रह चित्सूर्य । सहस्त्रचंद्रप्रभा औदार्य । वदनीं प्रकाशल्या ॥ २९ ॥ बोधप्रभाकर कुळदीप । दिव्यतेजसंकाशस्वरूप । अभिनव शोभा अमूप । सौंदर्यवर्चसें ॥ ३० ॥ दृष्टीच्या सुखासि लांचाविलें । मेघकविश्रांतीसी बोधिलें । तद्रूपतेसि निववीलें । डोळस केलें दृष्टीसि ॥ ३१ ॥ जित-अरुण[1] किरणकुंडलें । ज्ञानरवीचीं सोज्वळ मंडळें । तेणें प्रकाशलीं गंड-स्थळें । तेजनिधी हेलावती ॥ ३२ ॥ मनोहर चंपक कळिकेपरी । दिव्य नासापुटी साजिरी । सुरेख स्रूलता[2] गोजिरी । अंजनरेखा[3] ॥३३॥ कुटिल कुंतळ वळूनि । जुडा बांधला सुमनीं । केशराचा टिळक ठेऊ-नि । कस्तुरी रेखिली मध्यें ॥ ३४ ॥ मुकुटीं उपरमल्या तेजकोटी । प्रभाकरसमान किरीटी । रुळत मुक्ताफळघरटी । रत्नखचित सुवर्णें ॥३५॥ चिद्गगनगजशुंडादंड । तैंवि ज्ञानशक्तिकर दोर्दंड । भवध्यापशमन प्रचंड । वीरश्रिया मंडित ॥ ३६ ॥ दिव्य रत्नखचित करकंकणें । कर-पल्लवामीं मुद्रिकाभरणें । कौस्तुभ कंठेंरी[4] प्रभेनें । प्रभाकर सृष्टीसि प्रकाशा ॥ ३७ ॥ श्रीवाछलांछन हृदयीं । मुक्तीचें अधिष्ठान विजयी । कंठभूषण प्रवाही । जैंवि मुक्तसरिता ॥ ३८ ॥ चिदंबरतनु घननीळ । चिदाकाशगंगा हृदयीं केवळ । मिरवली मुक्तहारें सोज्वळ । स्वप्रकाश-घन ॥ ३९ ॥ स्थिरचिद्विद्युतनिभांबर । कास कासिली मनोहर । किं-किणीज्वाळमाळा सुंदर । पदीं तोडर श्रीदांचा ॥ ४० ॥ कोमळ रातो-त्पलदळें[5] । तैंवि पातळ रामपदतळें । शोभेवरूनि सूर्यमंडळें । कुर्वंडूनि टाकिजे ॥ ४१ ॥ पदपल्लवामीं चंद्रकळा । गौरवासी पात्र जाल्या सकळा । विधिहरादिकांच्या कपाळा । लागोनी वर देती ॥ ४२ ॥

---

१ जिंकिला आहे अरुण ज्यांनीं अर्सीं. २ भ्रूलता. ३ काजळाची रेघ. ४ गळ्यांत, कंधरेंत. ५ तांबड्या कमळाच्या पाकळ्या.

दिव्यचंदनागर कस्तुरी । केशर अंबर सुवासपरी । ज्यातीमंदार, पुष्पसंभारी । सभा डौरलीसे ॥ ४३ ॥ तुळसी कुंद मल्ली मालती । बकुळ चप्क पुष्पयाती । सीतेसहित रघुपति । अर्चिला भक्तानीं ॥ ४४ ॥ परमपावन श्रीरघुवीर । सेविती सुरवर नर वानर । पृथ्वीचे नृप नारी नर । सभा घनवटली ॥४५॥ श्रीरामाच्या साक्षात्कारें । भक्त गर्जती नामगजरें । पृथ्वीसहित मेरुशिखरें । तेणें स्वरें दाटलीं ॥ ४६ ॥ कैलास वैकुंठ नानास्थळें । नामें घनवटलीं सकळें । पृथ्वी गिरी तेजमडळें । नामस्मरणें घुमती ॥४७॥ भक्तभाग्य हें अगोचर । गगन भेदूनि चालिला स्वर । हा चित्स्वरूप साक्षात्कार । रामनामस्मरणें ॥ ४८ ॥ धन्य भक्ताची दृष्टि उदार । प्रसवे विश्वरूप रघुवीर । जें जें दृश्य दिसे साचार । तें तें रघुपतिरूपें ॥ ४९ ॥ भरत शत्रुघ्न सुमित्रें[1] । सेवेनें सेविती तो परत्र । येकछत्री राजा स्वतंत्र । सांकेतपुरीचा[2] ॥ ५० ॥ सिद्ध किन्नर विद्याधर । गण गंधर्व ऋषेश्वर । भाटीवें[3] करिती अपार । रविवंशभूषणाची ॥ ५१ ॥ शार्ङ्गाणौ[4] कुळींचे नृपवर्धन । वसु रुद्रादित्य मरुद्गण । महानुभाव संत सज्जन । राम जीवन सर्वांचें ॥ ५२ ॥ राम सुखाचें सुख गहन । राम कौसल्याचें निदान । हे देवऋषीचें[5] वरदान । राम विश्वरूप ॥५३॥ त्रैलोक्याच्या स्वहितासी । कारण कृपाळु देवऋषी । तेणें मज अनुग्रहिलें निश्चयेसीं । राम परतत्व ऐसें ॥ ५४ ॥ त्या ब्रह्मनंदनें[6] सद्भावें । श्रीरामासि आर्जऊनि स्वभावें । ध्यानीं प्रत्यक्ष करूनि अभिनवें । लाधला ऐश्वर्य ॥ ५५ ॥ तो नारदरामअनुवाद[7] । भक्तीचें रहस्य सुखप्रद । प्रसन्न होऊनि स्वानंदकंद । नारदासि वर दे ॥ ५६ ॥ श्रीराम ह्मणे मुनिश्रेष्ठा । प्रसन्न जालों तुझिया निष्ठा । तरि मागणें असेल ते प्रतिष्ठा । पात्र मम अनुग्रहें ॥ ५७ ॥ अभिवंदुनि श्रीरामासि । वरदान मागे देवऋषी । ह्मणे प्रसन्न होउनि अहर्निशीं । दे तव कीर्तनीं वेध ॥५८॥ दे तुझी भक्ति सप्रेमयुक्त । निष्कपटभावें अविमुक्त । देईं नित्यविरक्ती

१ सौमित्र, लक्ष्मण २ अयोध्येचा ३ भाटपण, स्तुति. ४ प्राणव. ५ नारद. ६ नारदानें. ७ संवाद.

अनुरक्त । अंतःकरण तुजसी ॥ ५९ ॥ कीर्तनीं प्रत्यक्ष होऊनि । भेटि देईं करुणाखाणी । तुजवांचूनि माझिये मनीं । अन्य इच्छा नसों दे ॥ ६० ॥ ध्यानीं प्रत्यक्ष होऊनि तुझी मूर्ति । मज विश्रांती दे दाशरथी । तव रूपनिरीक्षणें पुढती । आनंदाश्रु लोटवीं ॥ ६१ ॥ तुझिया स्वरूपेंवीण । माझे दृष्टीसी न पडो आन । तूं व्योममायानिरंजन । प्रगटे रामरूप ॥ ६२ ॥ पुराणपुरुषोत्तमा रामा । नेईं तव पदपरंधामा । तुझा निजध्यास लागो महिमा । आइकोनि पुढती पुढती ॥६३॥ तूं आदिनारायण अच्युत । तूं आदिविरंची हर समर्थ । जानकीवल्लभ पुरुषार्थ । वंशउत्धरणा देवा ॥ ६४ ॥ आदित्य ईशान वाचस्पति । सुमित्रपूजित तोषमूर्ति । जामदग्नीजितक्रोधस्थिति[१] । विबुधोत्धरणा[२] ॥६५॥ हे विष्णु श्रीपती जगदीशा । जगदाद्य तूं परेशा । मछ कछप वाराहविशेषा । धृतदशावतारा ॥ ६६ ॥ ब्रह्म इंद्र चंद्रादि अमर । तुझ्या चि स्वरूपें विश्वाकार । वर्णाश्रमधर्मविस्तार । सर्वरूपें तूं चि देवा ॥६७॥ व्रतें तपें आणि दानें तीर्थे । हे निखिल तुझींच रूपें समस्तें । या चि प्रसंगें तूं परमार्थे । प्रत्यक्ष होसी ॥ ६८ ॥ विश्वरूप तुझें ध्यान । पाहें मी विश्वरूप होऊन । विश्वाचें अभ्यंतरनयन । दे मज सर्वांगचक्षु ॥ ६९ ॥ अनंतनयनीं अनंतरूपासी । पाहीन मी भक्तिविशेषीं । अनंतकरें अनंतव्यक्तीसी । अर्चावया वर दे ॥ ७० ॥ कारुण्यमूर्ति तुझें हृदय । दे मज प्रसन्नतेसि सदय । विश्वरूप नामाची होय । माळा मम कंधरीं ॥ ७१ ॥ नाग यक्ष दिशा दिग्गज । वसुधा सलील सतेज । सप्ताब्धी सप्तद्वीज द्विभुज । प्रगटे रामरूपें ॥ ७२ ॥ स्थावर जंगम नाना विस्तार । नाना नद्या[३] द्रुमे[४] अपार । सर्व तुझें चि स्वरूप साचार । वसतीं माझे दृष्टीसी ॥ ७३ ॥ ऐसें श्रीरामासि मागतां । जाली विश्वरूपें प्रसन्नता । नारदें चरणीं ठेऊनि माथां । होय सुलीन राघवीं ॥ ७४ ॥ नारदमुनि अवस्थेतीत । श्रीराम तयासी आलिंगीत ।

---

१ परशुरामाच्या क्रोधाला जिंकणारा. २ देवांचा उद्धार करणाऱ्या. ३ नद्या. ४ वृक्ष, द्रुम.

श्रवणीं गुह्य सांगोनि समस्त । भक्तपरायण केला ॥ ७५ ॥ जो चि चमत्कार नारदासी । तो चि चमत्कार होय व्यासासी । त्या चि चमत्कारें धर्मासी । विश्वरूपदर्शन ॥ ७६ ॥ धर्म ह्मणे आजि कृतार्थता । धन्य धन्य तुझी बोधसत्ता । विश्वरूप प्रत्यक्षता । जाली रामरूपें ॥७७॥ आजि माझें सफळ ज्ञान । जालें विश्वरूप रामदर्शन । हें चि परंपरेसि वरदान । देईं रामप्रसन्नतेसी ॥ ७८ ॥ एवं धर्मराज अपेक्षित । व्यासें मस्तकीं ठेविला हात । श्रीराम वंशउत्धरणार्थ । आशिर्वचन व्यांसाचें ॥ ७९ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । परतत्व प्रगटलें अवलीळा । ह्मणे मेरुअनत ॥ ८० ॥ सप्तमरुद्रे तृतीय उल्लासः संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ आदिकवी । बोधें भक्तासि दे पदवी । मूळपरंपरेसि लावी । श्रीरामभजन ॥ १ ॥ राम वरद निजभक्तासी । अखंडित वसे भाविकापासी । श्रीराघवेवीण भक्तांसी । अन्यथा गति नसे ॥ २ ॥ राम स्वभाव भक्त सद्भाव । सामरस्यें येक अनुभव । देवभक्तपणनवलाव । संभाषणीं घडे ॥ ३ ॥ भक्त पुसे भावें प्रेमळ । देवा सांग तुझें कर्तव्य सकळ । तुजहूनि माया प्रबळ । किंवा सबळ तियेहूनि तूं ॥ ४ ॥ तूं स्वतंत्र माया स्वतंत्र । तूं परत्र कीं माया परत्र । तूं कीं माया उभयविचित्र । साक्षत्वसूत्र कैसें ॥ ५ ॥ देवी[1] ह्येषा गुणमई । मम माया दुरत्यई । ह्मणोनिया आह्मां प्रवाहीं । घालिसी कैसा ॥ ६ ॥ मामेव[3] ये प्रपद्यंते । मायामेतां तरंति ते । ऐसें ह्मणोनिया मायेतें । तूंचि विस्तारिसी ॥ ७ ॥ तुझी तुज जे अनावर । ते आह्मांसि केवि देयील निर्धार । कृपाळुपणें उभऊनि कर । गर्जोन सांगसी ॥ ८ ॥ कैसें मायेसि निस्तरावें । कैसें तुज शरण यावें । आह्मांसि कळेना स्वभावें । लाघव तुझें चि देवा ॥ ९ ॥ देऊनि भुलीचें माज-

---

१ कौतुक. २ दैवीह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ॥ भ. गी. ७–१४. ३ भ. गी ७–१४.

वेणें । अरे सावध न्हा हें काय ह्मणणें । लाघव श्लाघ्यंता तुजकारणें । काय वरी वाटे ॥ १० ॥ विष होऊनि मारिसी । अमृत होऊनि तारिसी । सर्प होऊनि दंश करिसी । आणि उतरिसी विष त्याचें ॥ ११ ॥ अज्ञानी प्रवर्तऊनि जन । सांगों प्रवर्तसी तया ज्ञान । तुज न गमे हें विंदाण । करिसी तेणें ॥ १२ ॥ दोरीचा सर्प करिसी । भयाभीतांसि मेडसाविसी । भीषणरूपें दुर्भव हरिसी । स्थापिसी बिभीषणातें ॥ १३ ॥ कैंची ते अनादि अनावर । तुझी तुजपासीं माया अघोर । ते असोळिनें आह्मासि थोर । अघातीं छळिलें ॥ १४ ॥ हे तुझी तूंचि आवरी । करुणासिंधु कृपा करी । प्रतिष्ठावंत तूं न करीं । लाघव आतां ॥ १५ ॥ कैंची माया कवण जाणें । हें तुझेचि सर्व करणें । प्रकृति ह्मणोनि विलोवणें । हें ही येक कौतुक ॥ १६ ॥ त्रिभुवनैकलाघवविया । लाविली अकळ तुवां माया । ते तुझी तूं चि देवराया । गुंति उगवीं ॥ १७ ॥ ब्रह्मादिकांसि ठकविलें । महामोहपाशीं गोविलें । त्या वृत्तिसि विश्व आणिलें । मुळीं च महाठक होसी ॥ १८ ॥ मज कळलें तुझें लाघव । मोहपाशीं गोविले जीव । तूं साक्षी होऊनि अभिनव । तमाशा पाहासी ॥ १९ ॥ जें मुळींच नसे तें काय गोवी । नाहीं तें मायेनें तूं लाववी । ते चि मायेच्या निरासें पदवी । भोगिसी प्रतिष्ठा ॥ २० ॥ मी तुझें लडिवाळ देवा । माझी माया तूं कृपार्णवा । तूं चि जननी जनक विसावा । आतां धांवा कवणासि करूं ॥ २१ ॥ गर्भीं प्रतिपाळ केला । तेथें काण होतें रक्षावयाला । उपजतांचि स्तनीं पान्हा फुटला । बाळकाचे उपजीविकेसी ॥ २२ ॥ जन्मांतरासी कारण । नाना दुःख विपत्ति मरण । हें आह्मीं काय जाणों संपूर्ण । तुझें चि करणें हें ॥ २३ ॥ निराश्रये स्फूर्तिमय । केला विस्तारासि आश्रय । पाहातां तें तें तुझें आश्चिर्य । सामर्थ्य देवा ॥ २४ ॥ निष्कंप शुध्द गगन । निरावकाश पाहातां घन । तेथें चि चळवळेचा पवन । कोठुनि जाला न कळे । ॥ २५ ॥ असो त्या प्रभंजनाआंत । तेज संभवलें अद्भुत । तया प्रका-

१ अमली पदार्थ, २ कौतुक. ३ ( ? ). ४ निकालांत काढणें.

शांत अघटित । तोय निपजलें ॥ २६ ॥ तया उदकाची हे धरणी । जाली अभिनव तुझी करणी । विवरतां विंचरतां अंतःकरणीं । पार चि न लगे ॥ २७ ॥ सप्तकंचुकीं महाप्रचंड । अंतरिक्षीं च राहिलें ब्रह्मांड । ऐसें तुझें करणें वितंड । अद्भुत सामर्थ्याचें ॥ २८ ॥ धुंकटें जळ वाहती । काळानुसारें तीं वर्षती । अद्भुत पिकें पिकती । हे उपजीविका थोर ॥ २९ ॥ सूर्यचंद्रासारिखे दीप । प्रकाशें वर्तविती संकल्प । ऐसा अघटित प्रताप । पवाडा दाखविसी ॥ ३० ॥ सिंधूचीं अपार जळें । लोटलियां धरा चि बुडविती तात्काळें । त्यासी मर्यादा करूनि अवलीळे । सृष्टीसी नांदविसी ॥ ३१ ॥ ब्रह्मांडखर्परांतील जळीं । बुडोनि जातां महीतळीं । होसी शेष कूर्म अतुर्बळी । धरा धरिसी वाराह तूं ॥ ३२ ॥ उदकें बीजें अंकुरतीं । सफळ होती वनस्पती । उपजीविका स्वभावस्थिती । चालिली सर्वत्र ॥ ३३ ॥ घडोनि पंचभूतांची मूस । येकीं जाल्या बहुवस । शरीरोत्पत्तीचा सौरसें । अघटित घडे ॥ ३४ ॥ उदकीं च धातुसंभव । रक्त रेतें देह अभिनव । तया शरीरासि नाना अवेव । अनेक कळा ॥ ३५ ॥ ऐसें अघटित तुझें करणें । इंद्रजाळें झणीवें या कारणें । क्षणामाजि पालट धरणें । तुझ्या कर्तव्यासी ॥ ३६ ॥ तुझी तुज भेटी गरिमा । परि प्राणसंकट आह्मां । आमुचा हृदयस्थ तूं आत्मा । हें काय करितोसी ॥ ३७ ॥ आणीक आश्चिर्यासि कारण । तूं नव्हेस कीं साधारण । पाहों जातां तूं चि निष्कारण । तुज काहीं च न लगे ॥ ३८ ॥ तूं अकर्ता निर्विकार । नाहीं कर्तव्याचा वेव्हार । तूं आत्मा परात्पर । परब्रह्म स्वयें ॥ ३९ ॥ त्या तुजप्रति भेद लाविजे । हें हि न घडे काय कीजे । आमुचें चि अदृष्ट लाविजे । येथें बोल कवणा ॥ ४० ॥ दांतातळीं जिव्हा रगडली । ह्मणोनि पाडावी काय दंतकवळी । तैसें तुझें तुजचिजवळी । कारण सर्व हि ॥ ४१ ॥ ब्रह्मादिकांसि आवर्ती घातलें । तेथें कवणाचें केलें

---

१ सात आवरणांत. २ धुकीं, ढग. ३ निरानिराळे जीव, व्यक्ति. ४ सुंदरपणा. ५ शरीराचीं घटक द्रव्यें जीं अस्थि वगैरे, त्यांची उत्पत्ति. ६ जादू. ७ दैव. ८ जन्ममरणाच्या फेऱ्यांत.

चाले । धन्य सद्गुरूनें उमजविलें । या आव्हीटचक्रीं ॥ ४२ ॥ गर्भा-धासी देऊनि दृष्टि । दाखविली तुझी कर्तव्यसृष्टि । पाहातां गारुडाचे परीं परिपाटीं । दृष्टिबंधन केलें ॥ ४३ ॥ ज्ञानें बोध होऊनि आह्मां । प्रतीतीच्या परंधामा । भक्तियोगें सत्य श्रीरामा । तुज निरविलें ॥ ४४ ॥ तूं त्रिभुवनींचा ईश्वर । सर्व कांहीं तुझा चि विस्तार । योगमायालाघव थोर । आह्मांसी न करीं ॥ ४५ ॥ सकल प्रसन्न उदार । कर्ता होसी तूं सत्यावतार । माया असत्याचा संस्कार । तो आह्मांसी कां लाविसी ॥४६॥ भवनिवर्तक तुझी दया । करुणामूर्ति सदयहृदया । ते लाऊनि आह्मासी माया । काय चेढा लाविसी ॥४७॥ मोहसंव्हरणीं तूं महावीर । बोधऐश्वर्यधनुर्धर । भेद भयंकर अहंकार । निवर्तविता तूं ॥४८॥ आतां ते उपेक्षा करिसी । तरि मग तुझी प्रशंसा कायसी । बोल लागेल बिरु-दासी । पतितपावन देवा ॥४९॥ बहुतां यत्नें कीर्ति जोडली । ते मज उपेक्षितां जायील भली । मग कोण पुसे बिरुदावळी । जायील तुझी दयाळा ॥५०॥ मज जाळियां अन्यथा गति । त्याची मज नाहींच खंती । त्रि-भुवनीं निर्दोष तुझी कीर्ति । लागेल[3] तियेसी ॥५१॥ तुझे कीर्तीस लावितां दूषण । देवा मज वाटे यावा प्राण । कां जे तुझें अगाध महिमान । वेदादिकीं वर्णिलें ॥ ५२ ॥ तुजसीं यथार्थ बोलतां । देवा कोपासी न यावें सर्वथा । या बिरुदाची कोण अवस्था । कासयासी धरिसी ॥५३॥ ऐश्वर्यासी नाहीं उणें । सुखें भोगयुक्त गृहीं असणें । या बिरुदासाठीं वाहणें । येथें काय चिंता ॥ ५४ ॥ कासयासी धनुर्बाण धरिसी । त्रैलोक्यांत तूं समाग्य होसी । समर्थ कोण द्वेष तुजसीं । करूं पाहेल तो ॥ ५५ ॥ नृपवरें निज अंतःपुरीं । भोगाव्या स्वसुखाच्या परी । काय वर्ततें राष्ट्रांतरीं । तें सुखें चि न वर्ते कां ॥ ५६ ॥ त्यावीण आपणा काय न सरे । सुखाच्या प्राप्तिअवसरें । सुख चि भोगिजे नृपेश्वरें । हें चि बरवें पाहातां ॥ ५७॥ कोणें प्रचंड चाप हातीं घ्यावें । कोणें शरसंधान तें सोडावें । दुष्ट संव्हरूनि करावें । शिष्टपरिपाळण का

१ आडमार्गाच्या चक्रांत. २ जन्ममरणाचा फेरा. ३ (दोष) लागेल तियेसी.

॥५८॥ निर्द्वंद्व निजस्वरूप । तेथें कैंचा हा सत्यसंकल्प । कृपाघन भयो- ध्यानृप । दयेनें चि पुरता ॥ ५९ ॥ जीवहत्या न करी तो दयाळ । सात्वि- कशातीनें चि केवळ । असणें हें उचित निवळ । हृदयाचें तुझें ॥६०॥ कोण्ही अपराध केला । त्याचा क्षोम नाहीं तुजला । तुझा स्वभाव सं- चला । विसरेंचि संपूर्ण ॥ ६१ ॥ भक्तासि अढळ पद देसी । त्याचा आठव नसे तुजपासीं । ऐसा विसर स्वभावेंसीं । असे तव हृदयीं ॥६२॥ सर्वांच्या विसरेसीं । तूं आपुले चिं ठायीं असती । आतां या अज्ञान जीवासी । कवणें सोडवावें ॥ ६३ ॥ ऐसें पाहातां अघटीत । हृदय माझें उतटत । बुडाली प्रवृत्ति भवाब्धींत । आतां तारील कवण ॥६४॥ अर्भकें बडिलांसि न्याये । बोधाविजे हाचि अन्याये । क्षमा करूनि रा- घवे माये । प्रत्योत्तर देयीं ॥ ६५ ॥ वेद वर्णिती पुरुषार्थ । प्रतीतीसि न येतां वाटे मज व्यर्थ । कीं ते दुरादृष्टचि समर्थ । माझें न कळे ॥ ६६ ॥ किंवा धारिष्ट चि पाहासी । कांहीं न कळे निश्चयेंसी । ता- रकजननी तूं होती । आणि करणें हें अनुचित ॥ ६७ ॥ तुज ऐसा निष्ठुर नाडळे । तुम साठींच तया स्त्रियेंळें । पुत्र वधिला तेणें काळें । पुढती क्षोमलासि त्यावरी ॥ ६८ ॥ निपुत्रिकाचें न ध्यावें अन्न । ह्म- णोनि चालिलासि उपेक्षून । तेंव्हा तुज काकुळती येऊन । अवरोधिलें देवा ॥ ६९ ॥ मग तां चिळयासि पाचारिलें । तेंव्हां बाळक तें चालत आलें । न कळे काढुनि आणिलें । चिळयासी तया ॥ ७० ॥ प्रत्यक्ष शिवरूपें तयासी । नेलें स्वानंदें कैलासासि । इतुकें धारिष्ट पाहसी । मग पावसी तेंव्हा ॥ ७१ ॥ व्याघ्र होऊनि वनीं स्वयें । द्विजासि भक्षुं धावसी पाहे । तेणें तुज भाकिसि देऊनि निश्चयें । नगरासि आला ॥ ७२ ॥ प्रभूसि जाणविली ते मात । जे जात असतां तुझ्या राष्ट्रांत । व्याघ्र करूं आला मज घात । त्यासि भाक देऊनि मी आलों ॥ ७३ ॥ क्षणभंगुर देहलोभ धरूनि । आलों त्यापासूनि चुकउनि । हा विकल्प न धरीं तूं मनीं । आईक वृत्तांत तो ॥ ७४ ॥ अति वृद्ध माता पिता

१ उचंबळून येतें. २ शिवलीलामृत पहा. ३ शपथ, वचन.

सदनीं । त्यासि निरउनि आयीन तुज लागूनि । त्यास्तव आलों धांवोनि । सूचनार्थ तुजपासीं ॥ ७५ ॥ तरि माझी माता पिता अखमें । परिपाळी राया तूं सप्रेमें । आज्ञा देयीं मज या नेमें । वनीं तिष्ठत असेल व्याघ्र ॥ ७६ ॥ आईकोनि द्विजमुखींची वार्ता । वाटलें आश्चिर्य तें समस्तां । राजा ह्मणे माझे नगरीं असतां । तुज उपेक्षणें अनुचित ॥७७॥ जाऊनि तया व्याघ्रापासीं । पूस तुझीये सोडवणेसी । तुझ्या प्रीतीस निजदेहासी । समर्पीन मी तया ॥७८॥ ब्राह्मण ह्मणे हें काय उचित । व्याघ्रासि विचारीन निश्चित । जैसें घडेल तें चि सप्रतीत । घडो त्यां वर्तमानासी ॥ ७९ ॥ ह्मणोनि विप्र तो निघाला । लागवेगें व्याघ्रापासीं आला । नगरींचा लोक चालिला । पाहावयासि आश्चिर्य ॥८०॥ त्या ब्राह्मणाची मातापिता । आक्रंदत आलीं सवेगता । तंव तेथें आश्चिर्य तत्वता । व्याघ्र होय मनुष्य ॥ ८१ ॥ आश्चिर्येंसी नगरांत । जाणवली प्रभूसि मात । आणविलें तया द्विजासि त्वरित । पाहावया भूपाळें ॥ ८२ ॥ मयूरध्वज राजा सिंहासनीं । व्याघ्ररूप द्विज तेथें येऊनि । ह्मणे राया तुझी कीर्ति आईकोनि । आलों पाहावयासी ॥८३॥ तरि तूं मजला आनंदविसी । तरी तुझें दक्षिणांग दे मज निश्चयेंसीं । रायें बरवें ह्मणऊनि संतोषीं । संकल्प सोडिला ॥ ८४ ॥ मस्तकीं कर्वत घातला । रायें निज प्राणायाम केला । सर्वोत्तमीं समर्पिला । प्राणसंकल्प तेणें ॥ ८५ ॥ येके भागीं राजस्त्रियेनें । कर्वत धरावा सोपवृत्तीनें । येकभागीं राजपुत्रानें । धरूनि ओढावा कर्वत ॥ ८६ ॥ ऐसा ओढितां कर्वत । आला हृदय परियंत । आसुंव आलें वामनेत्रांत । पश्चात्तापें चि त्या ॥ ८७ ॥ दक्षिणांग द्विजें अपेक्षिलें । तयाचें सार्थक चि जालें । वामांगासि आन्हेरिलें । त्यास्तव खंति वाटली ॥ ८८ ॥ ईश्वरें हें अभिनव केलें । येकांगीं उंचनींच कल्पिलें । पावन तें अंगिकारिलें । अपवित्र वर्जिलें वामांग ॥ ८९ ॥ याचि अनुतापें डोळां । आंसुवें आलीं तात्काळा । तो अपराध टेउनि स्वलीळा । चालिला ब्राह्मण

१ (?) अक्षमें, असमर्थ, वृद्ध.

॥ ९० ॥ तेव्हां सत्व धरूनि रायें । दोन्ही शकलें सावरूनि स्वयें । बोळिला तुजसी त्या निश्चयें । प्रसन्न जाहलासि देवा ॥ ९१ ॥ तैसेंचि शिबीचें सत्व पाहिलें । त्याचें मांस त्या हस्तीं खडिलें । समान नये ह्मणोनि वर्जिलें । महासंकटीं ॥ ९२ ॥ काळीज वोढिता अकल्पित । प्रत्यक्ष जालासि लक्ष्मीकांत । घालूनि विमानीं दयायुक्त । वैकुंठासि नेलें ॥ ९३ ॥ रुक्मांगदासि येकादसीव्रतें । वधविलें तुवा धर्मांगदातें । मग प्रसन्न होऊनि तोषचित्तें । नेलें वैकुंठासि सहनगर ॥ ९४ ॥ विश्वामित्रासि प्रवर्तविलें । हरिश्चंद्राचें सत्व पाहिलें । धारिष्ट देखोनि आपगिलें । तयासि निर्वाणीं ॥ ९५ ॥ तुझें कृपाळुपण पाहाता । त्रिभुवनीं नाहीं साम्यता । तस्करें चादवा सोडिता । पिंडीवरि पाय दिधला ॥ ९६ ॥ तेणें तू सतोषलासी । जें अर्पिलें सर्वांगासी । ह्मणोनि त्या कैलासासी । नेलें तुवा शिवरूपा ॥ ९७ ॥ हे तुझी प्रसन्नताकीर्ति । भक्त परपरा वर्णिती । चित्त देऊनि दाशरथी । आईक महिमा ॥९८॥ प्रल्हादासि नाना आघातीं । परिरक्षिलें रघुपती । मग स्तभीं प्रगटोनि उग्रमूर्ति । अनुग्रहिलें नरहरिरूपें ॥९९॥ देवा माझें मनोगत । परिक्षूनि बरवें यथोचित । तुझें दर्शन अपेक्षित । पुरवीं मनकामना ॥ १०० ॥ डोळे भरूनि सावाचित्त । तुज पाहीन अखडीत । पुरवीं माझे मनोरथ । भेटि देयीं दयाळा ॥ १ ॥ ओंळि घेतळिया बाळकें । माता त्यासि बुझावी कौतुकें । तेंवि मज रविकुळटिळकें । भेटि देयीं जननीचे ॥ २ ॥ मन धींव तवरी । हृदयीं धरीं झडकरी । स्वानदघन मधुरोत्तरीं । करीं समाधान माझें ॥ ३ ॥ कृपाकरा जें झडकरी । कुर्वाळूनि सुखी करीं । शरणागत उपेक्षा न करीं । शरणागतवत्सला ॥ ४ ॥ अभीष्ट पुरवीं माझें । हीन दीन परि अंकित तुझें । धरीं मीपणाचें वाझें । कृपाकरें श्रीरामा ॥ ५ ॥ जन्मोजन्मींचा सांगीत । असताचि चुकला अकल्पित । तो सनातन करीं कृतार्थ । ये चि भेटीनें देवा ॥ ६ ॥ तुजवीण गति नाहीं दुसरी । साच चि जन्मलों

१ हट. २ समजावी. ३ रामानें. ४ सतोष ५ सोषती.

तुझे उदरीं । माया छाऊनि संसारीं । वेगळें घातलें ॥ ७ ॥ देऊनियां अहंकारा । घातलें मायेच्या सासुरा । नाना विपत्ति त्या रघुवीरा । सोसूं मी किती ॥ ८ ॥ जन्म गेले ऐसे चि किती । सोसितां विकल्पभवयातायाती । आतां धीर पुरेना चित्तीं । आईक माझें गाऱ्हाणें ॥ ९ ॥ शुध्द बुध्द सर्वातीत । तुझें निधानस्थळ अकल्पित । तेथें नेयीं मज सदोदित । नांदवीत सुखें ॥ ११० ॥ करूनि सायुज्याचा परिहार । न लवीं ममतेचें माहेर । देयीं तुझे पदीं मज थार । दयासंपन्न श्रीराम ॥ ११ ॥ ऐसीं माझीं करुणासारें । आईकोनि वाक्यें श्रीरघुवीरें । पूर्णदयाळ कृपाकरें । दिल्हें वरदान ॥ १२ ॥ राम भेटला अनंतरूप । तेथें मेरु जाला तद्रूप । ऐक्यरूपें निर्विकल्प । चर्चा अवधारिजे पुढें ॥ १३ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिंव्हाळा । हृदयस्थ तो प्रार्थिला । ह्मणे मेरुअनंत ॥ ११४ ॥ सप्तमखंडे चतुर्थउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः श्रीरामसमर्थ देवदेवा । देयीं मज तुझी नित्य सेवा । माझें जिविचा तूं विसांवा । परतें न करी मातें ॥ १ ॥ तुझें हृदय निर्विकल्प । तें चि माझें सत्यस्वरूप । त्या तुजमजमाजि विकल्प । केला संकल्परूपी मनें ॥ २ ॥ निर्दोष तुझें हृदय । निरुपाधि निर्विषय । निर्मन निःसंग निश्चयें । असतां भेद केला या मनें ॥ ३ ॥ सत्य मनाचा साक्षी तूं । तुजवांचूनि कोण आहे परंतु । त्या चित्ताचा भवदुर्हेतु । प्रहो आह्मांसि लागला ॥ ४ ॥ माझा स्वात्मानुभवराशी । मन राहुतें गिळिला विशेषीं । उपरि बोधज्ञानसूर्यासी । ग्रासिलें दुर्हेतुकेतूनें ॥ ५ ॥ मनसंकल्प विधि पूर्वी । होता पंचवदनभवविभवी । कर्कश वाणी विकल्पजिवीं । दुर्हेतु वरळे ॥ ६ ॥ चहुं वदनें च्यान्हीं निगम । अपस्वरें मुंके मुख पंचम । त्यास्तव बोधमर्गे सुवर्मे । शस्त्रें छेदिलें तें ॥ ७ ॥ तें ब्रह्म कपाळ पाठीं लागलें । जेणें शिवादिका

---

१ लावूं नको. २ अनंत मौनीच्या रूपानें. ३ मेरुस्वामी.

देशधडी । केलें । मग रामचिंतन संस्कारिलें । धरिलें करीं ब्रह्मकपाळ ॥ ८ ॥ विश्वकारण तें ब्रह्मकपाळ । मन संकल्परूपी काळ । ईश्वर काळाचा ही काळ । भिक्षेसि लाविला तेणें ॥ ९ ॥ मन दुर्विषयसंस्कारें । छळिलें विधिसि पंचशरें । पार्वतीविवाहीं वीर्यविकारें । जाले वालखिल्य ऋषी ॥ १० ॥ ब्रह्मच्यारी कमंडलुपाणि । तपासि जाय ब्रह्मयासी नमुनी । ऐसे साठी कोटी संभवोनी । तपासि गेले मनोरूपें ॥ ११ ॥ मनसंकल्पें छळिला सुरेंद्र । देहाची विरक्तीनें जाहला क्षुद्र । मनोमृगांक चंद्र । कळंकी केला ॥ १२ ॥ मन संकल्पप्रवाहीं । पडिले सुरवर कारागृहीं । महा ऋषी सिद्ध तेही । मनें निर्जित केले ॥ १३ ॥ मनोमय विषयाची प्रौढी । तापस केले देशधडी । वनवासी छळेले येवढी । दुष्ट खोडी मनाची ॥ १४ ॥ मन दुर्मद कुंभकर्ण । मक्षु लागला वानर संपूर्ण । धन्य रामशरें निर्वाण । पडिला समरंगणीं ॥ १५ ॥ तो त्रेतायुगींचा प्रसंग । दुसरेन उपजला कुंभकर्ण सांग । तेणें मनोमय संकल्पें जग । नाशासि आणिलें ॥ १६ ॥ रघुवीरा तूं धनुर्वाडा शूर । ह्यान्हीं युगीं तुझा अवतार । मनोमय दुष्ट संस्कार- । कुंभकर्ण विदारीं ॥ १७ ॥ मनोरूपी हा इंद्रजित । विषयमदें जाला उन्मत्त । मोहनागपाशीं कैपी समस्त । खिळेले सत्त्वरूपी ॥ १८ ॥ पाठऊनि तुझा सद्भावसुमित्र । समागमें अनुतापभूमि पवित्र । अविद्या निकुंबळेसीं गात्रविगात्र । निपात करावा श्रीरामा ॥ १९ ॥ मनरावण अनावर । कामक्रोधादि सहपरिवार । करी बोधमुक्तिशरें संव्हार । दुर्मनशत्रूचा ॥ २० ॥ विज्ञानशरसंपत्ती । करीं मनोमयराक्षसशांति । आजानुबाहो रघुपती । हे चि प्रार्थना तुज ॥ २१ ॥ तू चि आमुचा सहाकारी । ह्मणोनि याचा विषाद न धरीं । तुजवांचूनिया भवसागरीं । तारील कोण आह्मां ॥ २२ ॥ मनासि विषयाचा ध्यास । वाचेसि तुझ्या

---

१ भयंकर. २ मदनानें. ३ ज्यांच्या हातांत कमंडलु आहे असे. ४ दाग धारण करणारा. ५ सत्वगुणरूपी वानरांना. ६ मारुति ७ निकुंभिलें सह. निकुंभिला—लंकेच्या पश्चिमेकडील इंद्रजिताची यज्ञभूमि. ८ नि पात, नाश.

नामाचा घोष । या कारणें मनासि निर्विशेष । छेदूनि टाकीं ॥ २३ ॥ सर्वसाधनेंसीं संपन्न । प्रांजळ होतसे ब्रह्मज्ञान । परि मनामाजि अन्यथा चिंतन । तेणें संवित्ति जिरेना ॥ २४ ॥ ज्ञानसदन्न सेवितां । मनमक्षिका सवेगता । सदन्नीं पडोनि स्वभावता । ज्ञानविकृतीसि आणी ॥ २५ ॥ मनसंकल्पें अभ्यंतरीं । बळावले षड्वैरी । ते तुजवीण कोदंडधारी । कवण संव्हारील तयां ॥२६॥ हितशत्रुत्वें प्राण घेती । सेवटीं काळाचे हातीं देती । नानाविपत्ति भोगविती । ते निवारीं रघोत्तमा ॥ २७ ॥ विषयरूप मनसंस्कार । जेणें विधिनें केला संसार । त्यासि तन्हीं सिक्षूनि साचार । मज सोडवीं श्रीरामा ॥ २८ ॥ विज्ञानधनुष्यानें वीरा । सोडूनि प्रबोधरूपी शरा । विदारीं मनोमय असुरा । मज सोडवीं त्यापासूनि ॥ २९ ॥ मन्मथाचें मन्मंथ करी । तरीच धनुर्बाण धरी । मन मारूनि रावणारी । मिरवी श्लाघ्यतां ॥ ३० ॥ ऐसें प्रार्थितां हृदयस्थासि । आला गुरु कृपा प्रतीतीसी । निवारूनि मनःसंकल्पासी । प्रगटला निर्मन सुखें ॥ ३१ ॥ प्रगट बोधप्रतीतीनें । देवभक्तीच्या आवडीनें । उभयसंवादसलगीनें । बोलविलें रहस्यें ॥ ३२ ॥ आईक गा देवा माझी विनंती । तूं कारुण्याची केवळ मूर्ति । प्रसन्नरूप तुझी कीर्ति । विस्तारली जगीं ॥३३॥ तूं प्रतिपाळता सकळां । चैतन्यासी चेतक तुझी कळा । हिताहितासि तुझाचि जिंव्हाळा । मूळ सर्वांचें तूं ॥ ३४ ॥ तूं चालविसी आह्मी चालों । तूं बोलविसी तितुकें चिबोलों । तुजवांचूनि नसों उरलों । संकल्पासि आह्मी ॥ ३५ ॥ तूं विश्वभासक गभस्ति । तुझ्या कळारूपें जीवन जगतीं । तूं स्वानंदसिंधु उचंबळती । कल्लोळाकृती आह्मी ॥ ३६ ॥ सूक्ष्मरूप धरणी । आह्मी विस्तार त्यान्ही खाणी । तूं गगनरूप विद्यमानी । आह्मी अवकाशरूप ॥ ३७ ॥ तूं आत्मा चि अभिन्नस्थिती । तूं स्वरूप मी प्रतीती । तूं

---

१ जाणीव. २ हे रामा. ३ शिक्षाकरून. ४ मन्थन, नाश. ५ स्तुतीस पात्रता. ६ सूर्य.

समाधान निश्चिती । मी बोधसंपदा ॥ ३८ ॥ तूं सद्गुरु सुखैकघन । मी शिष्य तुजसी अभिन्न । तूं परमार्थनिर्वाण । मी तुझा परमार्थी ॥ ३९ ॥ तूं तुझ्या बोधें प्रगट । मी माझें हें सपाट । ज्ञानस्वरूपांबरी घनवट । तुझा तूं चि श्रीरामा ॥ ४० ॥ सद्गुरु रामा समर्था । बोधें अहं करिसी परमार्था । तरि मनोमय भवस्वार्था । निरसूनि टाकीं ॥ ४१ ॥ तूं आदि विरंचीरूप विराट । तूं स्वरूपानुभवीं स्वराट । तूं स्वानंदघन सांम्राट । त्रिपदैविभुत्वें ॥ ४२ ॥ ज्ञेय ज्ञान ज्ञाता विस्तार । विभु त्रय ईश्वर । आदिविधाता विश्वंभर । आद्य विष्णु ॥ ४३ ॥ सद्भाव होय साक्षेपी । तैं विश्व होय हें अनुतापी । ज्ञानप्रळयाग्निस्वरूपी । तैं प्रगटसी तूं ॥ ४४ ॥ विश्रांतिबोध अयोध्यापती । शांतीनें चि निर्वाणस्थिति । आठासि माझिये प्रतीती । ते चि रूढवीं आतां ॥ ४५ ॥ औदुंबरफळगर्भी । कैंवि प्रवेशली व्योमीं । पाहातां सर्वगत त्या अंतर्यामी । अवकाशचि असे ॥ ४६ ॥ जी मति माझी केव्हडी । देव तूं परब्रह्म प्रौढी । जाणावयासी मज येवढी । बुद्धि कैंची समर्था ॥ ४७ ॥ असो ते माझी योग्यता । तुवां अनुग्रहिलें आश्रियेता । तेंचि प्रतिपाळीं बोधसत्ता । साकेतनृपाळा ॥ ४८ ॥ क्षणवितां मानवीयांचें । संकट निवारिती तयाचें । प्राण देती परि पैठिचें । न देती देवा ॥ ४९ ॥ सामर्थ्य त्रिभुवनपती । सुरमोचन विख्याती । या पुरुषार्थाची कीर्ति । त्रिजगीं निर्दोष ॥ ५० ॥ माय बाप धनवंत जगीं । संतति भिक्षा मागे कुसंगीं । हे श्लाघ्यता जनकाळागीं । बरी नव्हे समर्था ॥ ५१ ॥ तुझे नामधारक आम्ही । भ्रमतों नाना भवदुर्गमीं । तरि ठेवावें विश्रांतिधामीं । नामासाठीं वरिष्ठा ॥ ५२ ॥ बोल लागेल बिरुदाला । सांभाळीं निजप्रसन्नतेला । निर्दोष तुझिये कीर्तीला । कल्याण हो समर्था ॥ ५३ ॥ सेवितां ज्ञानेंधुरें । माझें जन्मदारिद्र न सरे । आतां काय करूं मी निर्धारें । इहपरत्रीं नाडलों ॥ ५४ ॥ धनुर्बाण

१ ब्रह्मदेव. २ तिन्ही लोक. ३ अयोध्येचा राजा, रामा. ४ मनुष्य. ५ रामाचे. ६ शरण आले असतां. ७ प्राणाचें लोखंड, ओझें पाहून.

तुझिये हातीं । साह्य करिसील दाशरथी । सत्यवचनीं श्रीरघुपती । ह्मणउनि शरण आलों ॥ ५५ ॥ प्रणतपाळ दीनदयाळ । प्रगट तव कीर्ति सूर्यमंडळ । पाहलें जगीं सोज्वळ । जे अस्तवेना कधीं ॥५६॥ तेणें प्रकाशें भवतम । केला प्रवृत्तीचा निर्गम । तें चि समर्था उत्तमोत्तम । दिनमान सांभाळीं ॥ ५७ ॥ सर्वस्व प्राणांतीं आराधिलें । माझ्या वडिलीं तुज आर्जविलें । संततिपरंपरेसि दिधलें । निरउनि तुझिये हातीं ॥ ५८ ॥ तें सांभाळी तुझें वरदान । घेयीं यशकीर्तिचें महिमान । आमुचें करीं परिपाळण । निजयोगविभवें ॥५९॥ आत्मनिवेदन नौमीउत्सवें सांभाळीं गा स्वामी । अनंतरूपे तां अंतर्यामी । भाक दिधली ते आठवीं ॥ ६० ॥ ऐश्वर्य भक्ति सत्ता ज्ञान । तव प्रसन्नतेचें महिमान । जें जें प्रगटलें आख्यान । तें तें तुझें चि समर्था ॥ ६१ ॥ प्रतिपाळीं भक्तीनें मज । ना तरि आपुल्या हस्तें चि सहज । वध करूनि माझा सतेज । उमज दे अभ्यंतरीं ॥ ६२ ॥ विशेष तुजप्रति मागणें । नाहीं त्रिशुद्धी अंतःकरणें । बोलेन तुजप्रति लडिवाळपणें । सें अवधारीं श्रीरामा ॥ ६३ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । श्रीरामसुप्रसन्न जाहला । ह्मणे मेरु अनंत ॥ ६४ ॥ सप्तमखंडे पंचम उल्हास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः श्रीरामसमर्थ उदारा । भाविकानुकंपें करुणाकरा । भक्तसगोपनमाहेरा । अनाथबंधु ॥ १ ॥ संसारनिवृत्तिज्ञानसूर्या । प्रतीतिअभ्यंतर बाधचर्या । सर्वाधिष्ठान आचार्या । नमन तुजप्रति ॥२॥ भवभयशमन स्वामी । तुझे शरणागत आह्मी । भवदुःखें अंतर्यामीं । त्रासलों बहु ॥ ३ ॥ क्षुधातृषादि महामारे । लोभतिरस्कार नावरे । भवदावाग्नींत येकसरें । जळालों सर्वदा ॥ ४ ॥ नाना अघात अनेक अवस्था । भोगितां पुरे जालें आतां । सोडवीं या दुःखापासूनि समर्था । करीं उदासीन ॥ ५ ॥ प्राणांतीं प्रमाण टाकी मन । तें आजि

---

१ मर्यादा.

मांडलें मज निर्वाणें । तूं करुणेचा स्वानंदघन । बोळेनोसि कां पां ॥ ६ ॥ भवसंतापाकें संतप्त । करुणामृताब्धी तूं संतत । आजि कां आटलासि अप्रांत । निष्ठुर चित्त केलें ॥ ७ ॥ तुझी कृपेची गरिमा काय जाली । तुझी औदार्यता कोठें गेली । दयासंपन्न भक्तमाउली । हृदयी निष्ठुर जालें ॥ ८ ॥ तुझें नाम अमृताहूनि गोड । साधुजनतेचें पुरवी कोड । तें माझें रसनेसि सुरवाड । न करीं स्वसुखाचा ॥ ९ ॥ तुझें रूप स्वसुखवर्धन । न करी माझें संरक्षण । अज्ञानभवाब्धिजीवन-। माजि बुडालों आम्ही ॥ १० ॥ नामें तारिले पाषाण । म्हणोनि तुज आम्ही आलों शरण । तें तारक नाम महिमान । काय जालें न कळे ॥ ११ ॥ शरणागतासि दीधली लंका । उदार कीर्ति रविकुळटिळका । मी वैभव इच्छित नाहीं शंका । न धरिजे तुवां ॥ १२ ॥ अरे आम्हांसि भवअपस्मार लागला । तेणें प्रस्तावा घातला । नाना विपत्ति आम्हांला । या मायासंसर्गें ॥ १३ ॥ न भरितां विषयसुख चित्तीं । भवसंस्कार-मोहकमति । विक्षेपज्वरपणें सर्वार्थी । नाडिलें अज्ञानें ॥ १४ ॥ नाना जन्म जरा मरणें । वरिवारि दुःखाचीं भरणें । काय तऱ्हीं आम्ही करणें । हें निरसावयासी ॥ १५ ॥ आतां तुजवीण सर्वथां । निरसेना हे भव-व्यथा । धांव घालुनि रघुनाथा । ये आकांतीं साडवीं ॥ १६ ॥ तूं अजातशत्रु सनातन । तुज शत्रु मित्र नसे मुळींहून । करावया भक्तभवकंदन । प्रगटलासि रघुवरा ॥ १७ ॥ आम्हां मानिकांत ठीं उत्तरोत्तर । घेतले तुवां अनंत अवतार । धरिसी आयुधें दुर्धर । भक्तभवनिवृत्तीसी ॥ १८ ॥ आयुधें करावया परिपाळण । विश्वआनं-दवर्धनी पूर्ण । तुवां वरिली सनातन । चित्कळा वैदेही ॥ १९ ॥ साचचि आम्हांसाठीं तुज । लागलें करणें विश्वाचें काज । कृपांबरीं ज्ञानसतेज । उदय केला रविमंडळें ॥ २० ॥ करासूर्यउदयमानें । चालें विश्वाचें करणें । अंतरिक्षमेघवृष्टीनें । सफळ केली धरा ॥ २१ ॥

---

१ सकळ. २ प्रथम होत नाहींस. ३ ससार दु खरूपी सूर्यामुळें. ४ (?) चंचल मनाच्या मरवडपणामुळें.

ऐसें बहुविध उपायें । विश्व पाळिसी तूं सदय । परि त्यांहीमाजि वि-
स्मय । कांहींसा भेद करिसी ॥ २२ ॥ कोठें सदय कोठें निर्दय । हें
मायेचें करणें होय । करणें तरी सर्वही स्वयें । निमित्य करिसी व्यर्थचि
॥ २३ ॥ आतां सर्व अपराध क्षमी । कृपेनें सांभाळीं स्वामी । वि-
श्रांतिधामासि आह्मी । शरण आलों तुतें ॥ २४ ॥ तें आईकोनि दीन
करुणा । कृपा आली दयाघना । फळवळिति हृदयस्थ आपणा- । माजि
आपण प्रगटे ॥ २५ ॥ निद्रिस्थ स्वप्नींच्या भयंकरें । बोसणत जिवा-
तून धांविरे । तयासि जाग्रत कृपाकरें । जागें केलें निर्भय ॥ २६ ॥
रघुवीर जाला समर्थ । रघुवीर जाला परमार्थ । रघुवीर अनंततत्वार्थ ।
हृदयासि आला ॥ २७ ॥ रघुवीर अनंतस्वरूपें । ब्रह्मबोधकृपानुरूपें ।
भवभयनिवृत्तिसाक्षेपें । अनुग्रहीतसे ॥ २८ ॥ भक्तांसि अनन्य जा-
णोनि । गुज सांगतसे श्रवणीं । निजकृपेची दृष्टी देऊनि । सदोदीत केलें
॥ २९ ॥ मुळींहूनि मायाचि नसे । दिलें स्वरूपदर्शन ऐसें । भक्तांसि
सुप्रसन्न कृपारसें । घोळला गुरु सुखघन ॥ ३० ॥ ह्मणे मी वक्ता तुझें
अभ्यंतर । होसी तूं श्रोता माझें जिव्हार । निवळोनि हृदयीं निरंतर ।
राहें निवांत तूं आतां ॥ ३१ ॥ अरे हे अनंत सिद्ध जगतीं । स्वरूप-
बोधें निवाले असती । तयांची विश्रांति तुजप्रति । प्रतीति प्रत्यक्ष त्यां
दीधली ॥ ३२ ॥ परंपरेनें स्वरूपज्ञान । बोध चालिला संपूर्ण । वेद-
हृदय निरंजन । प्रतीति याची ॥ ३३ ॥ मळीन न व्हावयासि ज्ञान ।
त्यां लोकांनि दिधलें साधन । भवनिवृत्तिअनुसंधान । जागविलें हृदयीं
॥ ३४ ॥ तूं अहंकारा प्रवर्तलासी । नाना देहबुध्दीनें भ्रमलासी ।
मी प्रगटोनि गुरुरूपें निश्चयेंसी । निर्भय केलें तुजला ॥ ३५ ॥ त्यां
अजत्वाचा टाकूनि संकल्प । नाना अवतार धरिलें देहरूप । सीक्षों-
प्रबोधें निर्विकल्प । करीत आलों तुजला ॥ ३६ ॥ तूं मूळसंस्कारें भवविधी ।
वेष्टलासि अष्टविधा उपाधी । तेव्हां वेदोपदेशें त्रिशुध्दी । निर्हेत तुज
केलें ॥ ३७ ॥ जन्ममुळाचा घ्यावया प्रांत । प्रवेशलासि नाभीकुहरांत । तेथ

१ माहेर पडत. २ नित्य उदित, नित्य ज्ञानयुक्त. ३ शिक्षा, शीक्षा.

निर्बुजोनि अज्ञांत । अवरोधिलासि भ्रमीं॥३८॥ तेथें हंसरूपें प्रगटोनि ।बीज सांगितलें तुज श्रवणी । तेव्हां उमजोनि जगत्कारणी । प्रतिष्ठिलासि निजरूपें ॥ ३९ ॥ अज्ञानशंकासुरें अंकळ । बोधवेद हरिला सकळ । तेव्हां मीन होउनि म्यां तात्काळ । वेदें चि प्रतिष्ठिलें तुज ॥४०॥ तुझी स्वरूपधारणा-धरा । जाऊं पाहे भवजळीं सैरा । तेव्हां छितीचा कूर्म होऊनि त्वरा । मही तळीं सावरिली ॥ ४१ ॥ माहाछितीचे पृष्ठीवरी । सावरतां न सांवरे धरित्रि । बोधवाराहदशनांतरीं । दृढ अवरिली धरा ॥ ४२ ॥ स्वसुखशेषाकारें । वसुंधरा सावरिली सहस्रशिरें । ऐसे ऐसिया अघातीं त्वरें । चमत्कारें चि रक्षिलें ॥ ४३ ॥ मोहहिरण्यकश्यपें, अहंकृती । छळिलें बाळपणीं तुजप्रति । स्तंभीं प्रगटोनि नृसिंहाकृति । बोधनखाग्रें दैत्य विदारिला ॥ ४४ ॥ दुष्टशासन, स्वलीळा । पावनभक्तांचा कंरीं जिव्हाळा । तो प्रल्हाद सत्वागळा । पढियंतों होसी ॥ ४५ ॥ दान-प्रशंसादुराभिमानें । बळी जालासि तूं बळनिदान । पदबोधकृपानुशा-सन । स्थापिलें तुजे त्या पाताळीं ॥ ४६ ॥ जाले रजोगुणक्षेत्रीं प्रबळ बळें । पीडिलीं सात्विक द्विजकुळें । तेव्हां दुष्टघ्नि म्यां तात्काळें । ब्रह्मप्रतिष्ठा केली ॥ ४७ ॥ अहंकारदशकंधरें । भक्तसुरवर तिरस्कारें । छळिलें त्रैलोक्य निशाचरें । प्रवृत्ति जाहली सर्व ॥ ४८ ॥ तेव्हां अव-तरोनि म्यां धनुर्धरें । दुष्टांचा निःपात केला ज्ञानशरें । कृतत्रैलोक्य सुखी येकसरें । येवढी चाड मज भक्तांची ॥ ४९ ॥ कंसादिभवदै-त्यमती । भक्त स्वधर्मातें अवरोधिती । तयांची करूनि उपशांती । राज्ञे स्थापिले निजभाविक ते ॥ ५० ॥ बौध्दमतवादी दुष्ट । त्यांचें करावया सरसपाठ । साक्षि होऊनि बोध्यवरिष्ट । आचरण पाहातसें ॥ ५१ ॥ तो मी बोध्यरूपी जनार्दन । करी बोधरूपें कुजनासि अर्दन । सज्जन-प्रतिष्ठा सुखवर्धन । प्रगटज्ञान अयतारें ॥ ५२ ॥ सकळांचा करावया सेवट । मी कल्की प्रगट तेजें उत्कट । म्लेंच्छासि धधूंनि अवचट ।

१ गोंधळून. २ पृष्ठावरी (?). ३ सत्वानें श्रेष्ट. ४ प्रिय.

करीन स्वरूपप्रतिष्ठा ॥ ५३ ॥ हे प्रतिज्ञा माझी दुर्धर । कोण करूं सकेल स्थीर । वधूनि कृतांतासि सत्वर । अरंगीन भक्तांसी ॥ ५४ ॥ ढीळा याच रीती पुनःपुन्हा तुजं । सांभाळिलें नाठविसी मज । अक्षोममवार्णवीं सहज । तुझा ज्ञानसेतु निर्मिला ॥ ५५ ॥ तुझा बंदी मुख्य कंदर्प । अखंड दंश करितसे विखारी सर्प । त्याचा निवर्तउनि म्यां दर्प । तुज कामांतक केलें ॥ ५६ ॥ ढीळों सुदर्शनें किती । मधिले तुझे द्वंदी निकृती । शंकरहृदया येऊन षण्मुखहिंडति । म्यां तारकासुर वधिला ॥ ५७ ॥ मज नाहीं जन्मप्रवृत्ति । अजरामर मी निश्चिती । ते तुमची प्रवृत्ति संकटें किति । निवारिलीं हें नेणसी ॥ ५८ ॥ मुळींचें शून्य अंधःकार । न कळे तुमचें तुझा अभ्यंतर । तेव्हां प्रगटोनि ज्ञानप्रभाकर । प्रकाशें वर्तविलें तुझा ॥ ५९ ॥ तो अद्वैतअनुभवी असतवतां । अव्यक्तांत्नसानु तत्वता मायामेयकडोसा अवचिता । होय मिथ्यारूप "शर्वरी ॥ ६० ॥ तेंव्हा विवेकसुधाकर नभीं । उभी माया प्रकाशोनि स्वयंभीं । दावी पदार्थज्ञानप्रभा सुगर्भी । बोधचंद्रिकाघन ॥ ६१ ॥ तें निजसंस्थानें चांदिणें । मी चि रामचंद्र तुम्हांकारणें । प्रकाशी निजांग प्रभाकरणें । येव्हडें माझें अद्भुत ॥ ६२ ॥ तेथें हों अवरोधदेहांतरें । प्रकाशी विज्ञानदीप निर्धारें । अवस्थातीत साक्षात्कारें । निवांत सेजे निजवी ॥ ६३ ॥ काळवैकल्याचा वारा । तुम्हांसि लागों नेदी मी सैरा । अंतर्बाह्य रक्षूनि निवारी । ठाव देतसें मी हृदयींचा ॥ ६४ ॥ माझें हृदय निलमुक्त । तुम्ही घेऊनि जालेति भक्त । आतां भेदभावना युक्तायुक्त । मज तुझा कांहीं च नसे ॥ ६५ ॥ तथापि मी ईश्वर त्रिजगंतीं । विस्तारिली उपाधि माझी मज प्रीती । तुम्ही टाऊनि घेऊनि अहंकृती । वेर्थ कां कष्टी होतां ॥ ६६ ॥ सर्वनिर्वाण तुमचें स्वरूप । तेथें काय उगेंळाचि कल्पितां संकल्प । निज आस्तिक्याचा करूनि

१ शत्रु. २ झोलेनें. ३ आत्मा. ४ भेद. ५ (?) ढवडला, प्रतिबिंब. ६ रात्र. ७ सुरक्षित. ८ संवादनिवृत्ति. ९ व्यर्थ.

कोप । वायांचि विक्षेपासि येतां ॥ ६७ ॥ नित्य आत्मज्ञानआरिसा । पाहोनि निजसमाधानसारिसा । आत्मलाभ घेऊनि परिसा । आत्मप्राप्ति अभ्यंतर ॥ ६८ ॥ ऐसें निजरहस्यसौरसें । वाक्यमधुरोत्तर सुरसें । प्रबोधिलें तुम्हांप्रति विस्तारें । धरा अभ्यंतरीं ॥ ६९ ॥ मी तुमचाचि आत्माराम । तुम्ही माझेचि निजविश्राम । बोधिलें गुरुरहस्य अंतर्याम । जिवाआंतील सुखें ॥ ७० ॥ माझा बोधविज्ञानशर । दर्शनें पळोनि जाय अहंकार । विज्ञानआस्तिक्य निर्धार । सत्ताकोदंड मी धरीं ॥ ७१ ॥ या निजायुधनिर्धारें । तुमचे षड्वैरी विस्तारें । निर्दळूनि सुखसम विचारें । माझें स्वरूप म्यां दिधलें ॥ ७२ ॥ देऊनि निजरूपपदवी । दिव्हेपणाचा फुंज नुरवी । स्वरूपानुभव निजजिवीं । तो जिव्हाळा जागवा ॥ ७३ ॥ मी परमात्मा केवळ । मीपणाचा न लागे मळ । सुवेध भक्तांचा दुष्काळ । स्वसुखसुकाळ भक्तयोगें ॥ ७४ ॥ मी परम निर्मळ निजांगें । ज्ञान निर्धूत निस्तरंगें । विज्ञानउदधी अंतरंगें । भक्तप्रतीति आहे ॥ ७५ ॥ बोध बोधक बुधी । मज कांहीं च न साहे उपाधि । तो मी भक्तपराधीन त्रिशुद्धी । निजसिद्धि प्रगटीं ॥ ७६ ॥ माझा स्वभावप्रबोध कर्ता । त्याचेनि होय मी ज्ञानशक्तीचा भर्ता । तुमचे अंतर्निष्ठेनें अकर्ता । निजयोग रूढवीं ॥ ७७ ॥ उत्तरोत्तर भावि प्रीति । निजानुसंधानप्रतीती । परामक्तिअभ्यंतर चित्तीं । अवधानें अवधारिजे ॥ ७८ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । रामकृपानुवादअंतकळा । म्हणे मेरू अनंत ॥ ७९ ॥ सप्तमरुद्रे षष्ठ उल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ मी आत्मता । समानबोधें माझी समता । परि अहंब्रह्मत्वममता- । मायामळ मज नसे ॥ १ ॥ दर्पणेंवीण स्थिरावली दृष्टी । दिव्हदी तुझासि म्या निजसमावेष्टी । धारणेंविना समसाटी । राहिला पवन ॥ २ ॥ ध्येयध्याताध्यानेंवीण । निराश्रयें परि-

---

१ बरोबर, तावदतोव.

भक्तसख्य अभिन्न । येथें प्रमाण नाहीं जाण । आतां सद्गुरुरूपें प्रगटोन । म्यां तुह्मासि बोधिलें ॥ ३४ ॥ तें सुवर्मतत्व अभ्यंतरीं । निजआत्मादृष्टि करूनि निर्धारीं । सद्रूप वाढवा परिवरी । प्रीतीच्या अतिशयें ॥ ३५ ॥ मी उदार करुणानिदान । कृपेनें तुह्मासि जालों प्रसन्न । दिल्हें निजसख्याचें गहन । पुरवीन सर्वस्वें ॥ ३६ ॥ समाधानाची रिघिसिधी । बोळंगेन तुह्मासि मी निरवधी । हे भाक घ्या माझी त्रिशुध्दी । जे कल्पांतीं चळेना ॥ ३७ ॥ शस्त्रें तोडितां न तुटे नभ । तेंवि तुह्मामाजि मी स्वयंभ । असतां काय चिंता शुभाशुभ । भवविकृतीची ॥ ३८ ॥ जळें विघरे सैंधव । तें नभासि विघरिना सर्व । अपूर्व तैसें निरावेव । प्रवृत्तीचेनि न गळे ॥ ३९ ॥ जळें संभवलें मुक्ताफळ । उदक विघरेना अकुमोळ । तेंवि सद्वृत्तोचेनि अकळ । लाधलेति मुक्तता ॥ ४० ॥ ज्ञानदीपीं वृत्ति कर्जळें । तेंवि तुह्मामाजि कर्तव्य सकळ । परि अभ्यंतरीचें अंतराळ । काय तेणें मळीन होय ॥ ४१ ॥ मृगजळाच्या कल्लोळें । काय वाहाविजेल गगनाचळें । मायागंधर्वदिसाळें । उभउनि विरती ॥ ४२ ॥ मृगजळीं सूर्य बुडाला । तैसा अज्ञानीं तुह्मासि प्रवेश जाला । प्रतीतीच्या अमृतीं रिघाला । विपरूप पदार्थ ॥ ४३ ॥ गगनाचे गर्भी सनातन । केंवि रिघों सकेळ पवन । त्या आकाशगर्भासि चाळून । राहिलें हृदय तुमचें ॥ ४४ ॥ सूर्यबिंबी कैचें मृगजळ । तैसें तुह्मासि नसे जन्ममूळ । गगनासि नसे चळवळ । तेंवि प्रवृत्ति तुह्मां नाहीं ॥ ४५ ॥ आतां अज्ञानज्ञानसंगती । बिंबप्रतिबिंबस्थिति । बिंबीं सदोदित अवाप्ती । हे ज्ञानाची अविछिन्नता ॥ ४६ ॥ प्रतिबिंबीं सापेक्षज्ञान । याकारणें उभयमार्ग जाण । ज्ञानाज्ञानसंपन्न । जीव अध्यासबळें ॥ ४७ ॥ अज्ञानअंधारें मोह प्रबळ । अविछिन्नज्ञानाची सांजवेळ । अस्तवतां जीव रविमंडळ । निस्तेज होय सहजें ॥ ४८ ॥ तेणें दहराकाशीं प्रबळ । दाटे

---

१ (१) अणुमात्र. २ धात. ३ काजळी. ४ हृदयाकाशांत.

अज्ञानतम अखिळ । या धूम्रमार्गें अस्तवे जन्ममूळ । बुडे अज्ञानसागरीं ॥ ४९ ॥ ज्ञानरवि अज्ञानजळीं । कवळोनि जाय भ्रांतितळीं । जेंवि अग्नि विझता तत्काळीं । जाय उष्णता सवेगें ॥ ५० ॥ तेंवि धडमती शैत्यातिशयें । प्रज्ञाउष्णता विझोनि जाय । ते समयीं सत्स्वरूपनिश्चय । जगवील कवण ॥ ५१ ॥ या नाव कृष्णपक्षअज्ञान । तमोरूपधूम्रदर्शन । हा दक्षणमार्गनिदान । अधोगती हाये ॥ ५२ ॥ अज्ञानशून्यमंडळभेदी । तो उत्तरोत्तर मार्ग अनादि । प्रबुद्धगुरुकृपा निर्द्वंदीं । अवचट लाहिजे ॥ ५३ ॥ तो ज्ञानशुक्लपक्ष सोज्वळ । अविच्छिन्न जीव अविकळ । जेंवि नभीं नभ केवळ । तेंवि निजीं निजआस्तिक्यें ॥५४॥ नुमसे बिंबप्रतिबिंबभाव । नाहीं अशाअशस्वभाव । आस्तिक्यस्वरूपें स्वमेव । हे चि अविच्छिन्नता ॥ ५५ ॥ अविच्छिन्नज्ञानाग्निज्योति । दहेंनिदानीं विझेना दीप्ति । शरीराभावें सोज्वळ स्थिति । अधिकाधिक अधिकावे ॥ ५६ ॥ होता देहवुद्धीचा सायंकाळ । मावळे अहङ्कृतिरश्मिजाळ । अविछिन्न ज्ञानसूर्यमंडळ । त्यासि लोप असेना ॥ ५७ ॥ सूर्यासि सूर्याचा नव्हे अस्त । देहनिदानीं आत्मा शाश्वत । अविछिन्न परमात्मा सदोदीत । ज्ञानशुक्लपक्ष ऐसा ॥ ५८ ॥ या शुक्लपक्षीं शरीरनिदान । त्यासि शाश्वत सद्गति पूर्ण । कृष्णपक्षीं देहनिवृत्ति अज्ञान । अधोगति तया ॥ ५९ ॥ अविछिन्न सूर्यमंडळ । विज्ञानप्रभेनें अखिल । भेदूनि प्रतीतीनें केवळ । पाविजे परधाम ॥ ६० ॥ ज्ञानप्रभेनें खंडरहित । भेदूनि अखंडमंडळ उदित । निजआस्तिक्यता सदोदित । अग्निज्योति हे बरवी ॥ ६१ ॥ सद्गुरुकृपा अग्निज्योति । निग्यता अविछिन्न

१ आत्मस्वरूप अदृश्य होतें २ जडमतिरूप गारठ्यानें ३ धूमो रात्रिस्तथा कृष्ण षण्मासा दक्षिणायनम् । तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ भ गी $\frac{८}{२५}$ या श्लोकाचं अध्यात्मदृष्ट्या वरील ओंव्यांत स्पष्टीकरण केलें आहे पुढील ओंव्यांत मागील 'अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम्' ह ($\frac{८}{२४}$) श्लोकाचं उद्घाटण केलं आहे ४ देहाचा नाश झाला तरी ५ भ गी $\frac{८}{२६}$ पद्य. एकयायात्यनावृत्तिमन्यया वर्तते पुन. ।

स्वस्थिति । या प्रतीतीनें लीन होती । तें नित्यस्वरूप तेणें चि ॥६२॥ अज्ञानभवतमवृत्ती । अनादि अविद्याप्रवृत्ती । याचि निजध्यासें जे मरती । ते जन्मती तेणेंचि ॥ ६३ ॥ प्राणनिदानीं निजप्राण । प्रगटे गुरुकृपा सनातन । नाहीं क्षयगतिकारण । अक्षयस्थितीनें ॥ ६४ ॥ दीपें प्रकाश आर्जवावा । मग प्रमेचा सुकाळ करावा । तैसा तया ज्ञानासि व्हावा । न लगे साक्षात्कार ॥ ६५ ॥ अमृतें अमृत साधिजे । अमृतसिध्धीयोगा पाविजे । तेंवि शाश्वतासि सहजें । नलगे आस्तिक्य-अपेक्षा ॥ ६६ ॥ नयनें सांवरूनि विलोकन । काय कीजेत पदार्थ-निरीक्षण । तेंवि हा विज्ञानघन । नेघे ज्ञानअपेक्षा ॥ ६७ ॥ देवें देवासि आर्चिजे । सुमनें सुमनासि वाहिजे । जळें जळासि अभिषेकिजे । येथें कांक्षा कायसी ॥ ६८ ॥ पदार्थासि नाहीं पदार्थप्रीति । तैसी हे अविछिन्नस्थिति । केवळ गुरुकृपासंवित्ती । गहनदशा ॥ ६९ ॥ नाहीं जन्मवासनासंस्कार । नाहीं मरणहेतु अपस्मार । नाहीं संकल्प-विकल्प संसार । मुळींहूनि तया ॥ ७० ॥ नाहीं पतन अज्ञानशक्ती । नाहीं पावन अहंकृति । नाहीं जरामरणभीति । ना अजरामरऊर्मी ॥ ७१ ॥ या भवभंजनविवेंरें । गुरुकृपाअभयंकरें । अविछिन्नयोगनि-र्धारें । उपदेशिलें तत्व ॥ ७२ ॥ त्या सनातनासि वर्धविजे । कृपाकल्पतरुरोप सहजें । निजानुभवअमृतें कीजे । नित्य परिपाळण ॥ ७३ ॥ नित्यक्षुधेची उपशांति । करणेंचि लागे पुढती पुढती । तेंवि गुरुबोध-प्रसादें तृप्ती । पाविजे क्षणक्षणा ॥ ७४ ॥ तृषा लागलिया अपेक्षी जीवनें । तेंवि सर्वकाळ अनुसंधानें । संजीवनी अमृतपान । नित्यश्रव-णमुखें कीजे ॥ ७५ ॥ या प्रतीतीच्या अनुसंधानें । नित्य अध्यात्मनि-रूपणें । सहज आस्तिक्यस्थितीनें । अनुभवीं परतत्व ॥ ७६ ॥ बो-ळला सद्गुरु कैवल्यघन । निवाला सच्छिष्य सुखें पूर्ण । सहजास्थितीअ-नुसंधान । अवधारिजे पुढें ॥ ७७ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपे-

१ मिदन. २ संसारनाशक ज्ञानानें.

चा जिव्हाळा । देवअमृतभाषणलीळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ७८ ॥ सप्तमरुद्रे सप्तमउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ क्षेत्रोत्वार । स्वरूपक्षेत्रसन्यासी साचार । रामक्षेत्रप्रतिष्ठाईश्वर । तीर्थस्वरूपी ॥ १ ॥ स्वरूपज्ञानउदधि । प्रगटे क्षेत्रशुल्वीनें त्रिशुल्वी । प्रणवअधिष्ठितविधी । क्षेत्राभिमानी ॥ २ ॥ मातृकात्रयअधिष्ठान । अर्धमात्रा अर्धबिंबदर्शन । अर्धोदय सनातन । गुरुकृपापर्वकाळ ॥ ३ ॥ निवारिल्या कल्पकोटी । हे गुरुकृपा कपिलषष्ठी । भवप्रकाशक सूर्यसमेष्टि । खग्रास केला ॥ ४ ॥ हें अपरोक्ष सूर्यग्रहण । अभिनव अमापूर्णिमेसि विद्यमान । अविद्यानिशीप्रकाशघन । चंद्रग्रहण समकाळें ॥ ५ ॥ प्रवृत्ति निवृत्ति चंद्रसूर्य । खग्रासें जाहलें आश्चिर्य । प्रभा ना तम सूचैर्य । पाहलें आत्मतेज ॥ ६ ॥ नक्षत्रें ना रविकाळ । ना लोक ना विधि अकाळ । या तीर्थींचें वृत्त अकळ । वेधान गुरुकृपेचें ॥७॥ निर्विकार दृश्य द्रष्टा । येथें दर्शनाची प्रतिष्ठा । एक अनेकपर्णेवीण सर्वोत्कृष्टा । मूर्ति निरामय ॥ ८ ॥ स्वरूपज्ञानान्वयस्थिति । हरिहरबोध ऐक्यमती । गुरुशिष्यक्रमसंगती । मूर्तिद्वयप्रतिष्ठा ॥ ९ ॥ ज्ञानयोग प्रभाकरमूर्ति । अद्वैतसबंध गणपति । विरक्ति साधनस्वास्थिति । क्षेत्रपाळ प्रतिष्ठा ॥ १० ॥ प्रणवऋषि परात्पर । चिद्गगनगंगा निरंतर । स्वरूपयोग- गिरिवर । भास्करक्षेत्र हें ॥ ११ ॥ भाव अनंत तीर्थज्ञानरूप तीर्थविधी सच्चित्स्वरूप । विनायकमूर्ति चिद्रूप । सरस्वति गुरुकृपा ॥ १२ ॥ शिव सनातन हृदयस्थ । परमात्मा विष्णु शाश्वत । या चि तीर्थविधीनें कृतार्थ । जीवन्मुक्त होइजे ॥ १३ ॥ हे आत्मतीर्थगति विख्यात । सेविती संत साधु महंत । नित्य प्रातस्नाई अनंत । अघमर्षणें साधिती ॥ १४ ॥ सोज्वळ ब्राह्मी दशा निवळ । दिशा उजळल्या ज्ञानें अखिल । गुरुकृपा प्रभातवेळ । साधिती देशिकभक्त ते ॥ १५ ॥ तिर्थी ब्रह्मवृंदे अया-

---

१ अंधाराचें दर्शन. २ एक पर्व आहे. रु. १ उ. १८९ पद्य. ३ (?) सूर्य.

चित । कैवल्यपदाचे दाते संत । अपरोक्षज्ञानें समस्त । भाग्यवंत ते जन ॥ १६ ॥ आइकोनि या तीर्थाचें महिमान । अमर येऊं पाहती गति पावन । तीर्थ परमामृत सनातन । हंसमुखें सेविती ॥ १७ ॥ नाहीं जन्ममरणाची आवृत्ती । आइकूनि तीर्थविधान स्थिति । अमॆरा मरणमिच्छन्ति । का कथा इतरे जनाः ॥ १८ ॥ ज्यांचे नगरीं सुरतरुउद्यानें । अमृतसरोवरें विस्तीर्णें । हेमचिंतामणीसदनें । खिल्लारें कामधेनूचीं ॥ १९ ॥ उपेक्षूनि ऐसी संपत्ती । अनुतापें आत्मतीर्थासी येती । तीर्थविधीनें कृतार्थ होती । देवसॆंदोह ते ॥ २० ॥ अमृतसरोवरींचे हंस । विटोनियां अमृतपानास । आले चिद्गगनें तीर्थास । जाले परमहंस ते ॥ २१ ॥ परमपावन तीर्थविधी । कर्ता होय गुरुकृपाब्धी । तीर्थस्वरूपउपलब्धी । होय यात्रा सफळ येणें ॥ २२ ॥ आत्मज्ञानअर्थसंपन्न । गुरुकृपें करिती तीर्थविधान । सर्वभूतीं दया समान । ब्रह्मसंतर्पण करिती ॥ २३ ॥ येक नित्यविरक्तीतें उदार । करिती गुरुकृपा प्रणवोच्चार । घेऊनि क्षेत्रसंन्यास साचार । आत्मा विश्वेश्वर सेविती ॥ २४ ॥ क्षेत्रीं आधिदैवत ईश्वर । नावरूपासि आलें जें शरीर । त्यासि देहांतकाळीं उच्चार । करवी तारकाचा ॥ २५ ॥ चहुं खाणीचे प्राणी होती । तितुके तारक उच्चारिती । पावोनि भैरवी बोधस्थिती । होती कृतार्थतेनें ॥ २६ ॥ रामतारकविद्यमानें । रामक्षेत्रमंत्रविधीनें । रामसद्गुरुकृपावरदानें । शिव उपदेश करी ॥ २७ ॥ तारकब्रह्मप्राप्ती व्हावया । कारण सद्गुरूची च दया । सुकृत धन तें वेचूनियां । व्हावें संकल्पशून्य ॥ २८ ॥ आत्माराम सुनिश्चळ । प्रसन्न सद्गुरुरूपें केवळ । ब्रह्मप्राप्तीचा अविकळ । योग पुरवी ॥ २९ ॥ त्याचेनि वेद विख्यातीसी आला । ओंटमातृकॊरूप विस्तारला । तो विघ्नांतक वंदिला । बोधमंगळमूर्ति ॥ ३० ॥ बोधब्रह्मानंदें उचंबळत । स्वरूपयोगें निजपद देत । ना आणितां चि येत प्रत्ययासि सुखें ॥ ३१ ॥

१ देव सुद्धां मरणाची इच्छा करतात, तेथें इतर जन करतील यांत नवल काय? २ ज्या देवांचें. ३ देवांचे समुदाय. ४ (?) (शेवटीं) शेखीं असावें काय? ५ ॐकाररूप.

विज्ञानत्रिलोचन आदिदेव। वेद्यआराध्य उमाधव। जयाचा प्रबोध-भैरव। भवहर्ता वंदिला ॥३२॥ सकळ हि अधिष्ठानदैवतें। वंदिलीं कृतार्थ-मतिचित्तें। जालों पुनित स्वहितें। केलें तीर्थविधान ॥ ३३ ॥ क्षेत्र पूर्वोक्त निजप्रत्ययें। अध्यासगुणत्रय स्वयें। आत्मा क्षेत्रज्ञ होये। त्रिपुटीरूपें ॥ ३४ ॥ येकीं अद्वय अनेकता। अनेकीं अद्वैत येकता। विष्णुशिवशक्ती तत्वता। तीर्थे विख्याती श्रीमंत ॥ ३५ ॥ सत्वगुण आदि विष्णु स्वतंत्र। तीर्थक्षेत्रें प्रतिष्ठाक्षेत्र। तैसा चि शिवसाक्षी सर्वत्र। क्षेत्र स्थापित तयांसी ॥ ३६ ॥ रजोगुण ब्रह्मयासी। नाहीं स्वतंत्रता निश्चयेसीं। त्यास्तव क्षेत्रप्रतिष्ठा स्वयंभूसि। असेचि ना पाहातां ॥ ३७ ॥ पालवी फुटोनि गगनमुळीं। आलेति न तोंवर दोनि फळीं। तमसत्वफळ अकाळीं। फळलें जीवशिवें ॥ ३८ ॥ तिजा बीज सोंपट अकाळें। वांजा फुल फळ फळलीं डाहाळें। तो आभास रजोगुण समुळें। निरसला पाहिजे ॥ ३९ ॥ तया सुमनअभ्यंतरीं। भरला कंदर्प नसे ऊरि। विस्तारलें वांजेचे घरीं। विश्वसंतान हें ॥४०॥ नित्य प्रसवे परि जन्मवंध्या। करूनि उपनयनें प्रणव चिंध्या। तिच्या लेंकुरानें स्नानसंध्या। मांडिली आत्मतीर्थी ॥ ४१ ॥ प्रकृतिक्षेत्रज्ञ जीव होय। चिदाभासचिदान्वयें। प्रत्यक्चैतन्यमित्रें पाहे। पाहालें क्षेत्रीं तया ॥ ४२ ॥ सत्वक्षेत्रसत्ता चित्शक्ति। स्वयंभ प्रत्यगात्मस्थिती। स्वरूप विष्णु सुप्रतीती। अनंत विष्णुस्थळें ॥ ४३ ॥ त्या विष्णुक्षेत्रीं सद्भाव। सेविती भक्तियोगें वैष्णव। अवस्थातीत स्वभाव। स्वरूपता तया ॥ ४४ ॥ सनातन शिव केवळ। गुणातीत विशाळ। शिवप्रतीतीनें अखिळ। शिवप्रतिष्ठा ॥ ४५ ॥ अनंत शिवस्थळें ऐसीं। दशा शांभवी शक्तिविशेषी। सेविति आत्माशेवासी[1]। शांभव शिवस्वरूप ॥ ४६ ॥ या शिवविष्णूचें हृदय। परब्रह्म निरामय। तो आत्माराम चि स्वयें। सेविती राघवभक्त ॥ ४७ ॥ परमरसाळ सांवळें। परब्रह्मरूप आगळें। लावण्यासी लाऊनि डोळे। पाहातां धणी न पुरे ॥४८॥

---

1 तृप्ति.

स्वानंदघन जिव्हाळा । अखंड बैसला माझ्या डोळां । दृष्टी पाहातां पाहातां स्वलीळा । तटस्थ जाली ॥ ४९ ॥ प्रत्यक्ष विस्मयाचे दृष्टीसी । पांतीं लवों विसरलीं कैसीं । जेवि निवांत गगनाचे कुक्षीसी । आकाश स्थिरावलें ॥ ५० ॥ लावण्य परदेशी जालें । तें श्रीरामासी शरण आलें । स्वपदनखचंद्रीं स्थापिलें । अकलंक करूनि ॥ ५१ ॥ सौंदर्यसृष्टीचें निदान । लावण्यवसुधेचें विभूषण । मनोहररूप सगुण । प्रत्यक्ष जालें ॥ ५२ ॥ मनोहर उदधीचें सार । चैतन्यव्योमींचा अमृतेकर । प्रकाशसौंदर्याचा साचार । प्रभाकर श्रीराम ॥ ५३ ॥ रूपलावण्यरत्नाकर । विश्रांतीचा विसावा रघुवीर । पाहिला निजदृष्टीसि सुंदर। राजीवनयन ॥ ५४ ॥ दिपले ज्ञानचक्षू विलोकनें । अवलोकिजेत निजउन्मन । हे रामप्रतिष्ठा विद्यमानें । सर्वत्र पाहा ॥ ५५ ॥ त्रिशुध्दि सत्वदशाग्र । मूर्तिप्रभेनें उजळलें समग्र । भक्तस्वभाव येकाग्र । जडलें रामरूपीं ॥ ५६ ॥ रामांगपत्रिका मनोहर । नयनाक्षरें निरंतर । रेखिली नखशिखांत सुंदर । सुश्यामरसें ॥ ५७ ॥ पत्रिका घनानंद सुनील । अक्षरें ज्ञानांजनें रसाळ । सद्गुरुकृपाकरें अविकळ । मूर्ति अलंकारिली ॥ ५८ ॥ ना ते अनुपम्य विभूषणें । होऊनि जडलीं दृष्टी ध्यानें । कनकांबरें स्वप्रभेनें । प्रकाशली मूर्तिसहित ॥ ५९ ॥ दृश्यद्रष्टृविण केवळ । रामदर्शन हें अखिल । रामक्षेत्रतीर्थ प्रांजळ । अस्मिन् वर्तमानें ॥ ६० ॥ सद्गुरुअनंतकृपा । तीर्थविधीनें पावलों स्वरूपा । पुढील कथेचें अनुसंधान अजपा । तारकविभवें ॥ ६१ ॥ तें चि निरूपणपरवडी । उभऊनि सायूज्याची गुढी । राममूर्तिची शोभा आवडी । पाहावी अवधाननयनें ॥ ६२ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । अवलोकिलें रामक्षेत्र डोळां । ह्मणे मेरुअनंत ॥ ६३ ॥ सप्तमरुद्रे अष्टमउल्लासः संपूर्णः ॥

---

१ निराश्रित. २ चंद्र.

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थअनुग्रह । चिदानंदघनविग्रह । स्वानुभवपरमार्थसंग्रह कल्पकोटि सरेना ॥ १ ॥ तारकअजपाअभ्यंतर । सोहंब्रह्म मी आहे निर्धार । चहुं वाचेहूनि पर । मंत्रोच्चार होतसे ॥ २ ॥ अकार उकार मकारीं । अर्धमात्रा अनुस्वरीं । अखंडीत सोहं अभ्यंतरीं । परतत्वस्मरण ॥ ३ ॥ सोहं विज्ञानघनसुख । चिदाकाशस्वरूप सन्मुख । उपरमोनिया उलेखें । विसावला वेध ॥ ४ ॥ प्रतीतीच्या वाक्यें निर्धारें । पराअभ्यंतरें विवरें । अजपाजप चमत्कारें । अखंडीत होतसे ॥ ५ ॥ हें आजपेचें निजस्मरण । गगन विरालें अनुसंधान । अक्षरें अक्षर निर्वाण । अर्थगर्भविचारें ॥ ६ ॥ या चि स्मरणें सृष्टीवरी । अद्भुत सामर्थ्य विस्तारीं । नाना सत्ते लीलावतारी । चमत्कार होती ॥ ७ ॥ स्थिती थकित चकीत वेध । या च चमत्कारेंसीं निर्वेध । अबोधसित्धी उद्बोध । हे अजपासित्धी ॥ ८ ॥ सर्वदेहीं येक सूत्र । स्मरण होतसे विचित्र । अजपासूत्रें देहचित्र । चळतसे आश्चिर्ये ॥ ९ ॥ हे ब्रह्माडउपासना मुळीं । क्षेत्रज्ञ उपासक निश्चळीं । 'ब्रह्माहमस्मी' या हृत्कमळीं । अजपा निवळे ॥ १० ॥ हा महाकारणी स्वभाव । गगन गाळींव विभव । सोलींव विज्ञान निरावेव । अजपा अभ्यंतरीं ॥ ११ ॥ अजपा मूळ निजविवरें । निश्चयाच्या साक्षात्कारें । सर्वगत अखंडाकारें घोळलें अभ्यंतर ॥ १२ ॥ अजपा हृदयीं निजध्यास । ब्रह्मीं सामावला स्वप्रकाश । मूळ मी ब्रह्मभाव समरस । हे अजपाप्रतीती ॥ १३ ॥ अजपेचा जप अनंत । सर्वदा करिती संत । उच्चारेंवीण सदोदीत । अजपा स्वरूपें ॥ १४ ॥ जपकर्ता जपासी कारण । नसतां होतसे जप सनातन । मूळ सेजट संपुटीकरण । अजपा ऐशी पहा ॥ १५ ॥ निमिषोन्निमीषअवसरें । अजपाजप अनाक्षरें । संख्याविहीन निर्धारें । होतसे अजपा ॥ १६ ॥ येकेवीससहस्र साहशें जप । हा उगाचि कल्पिला संकल्प । कां जे अनुष्टानविधानें जपरूप । क्रमासि आणिलें ॥ १७ ॥

---

१ (१) वेद. २ परावाणीच्या आंतून.

अप्रांतासि गगनाचा प्रांत । निरावरणासि शब्द संकेत । तैसा अजपेसि इत्थंभूत । नेम केला ॥ १८ ॥ परात्परप्रणवहृदय । अजपाचि स्वरूपदशा स्वयें । ब्रह्मानंद निजप्रत्ययें । अनुष्ठानविधी ॥ १९ ॥ अखंड प्रतीतीचा जप । अखंडध्यानाचें स्वरूप । अखंड प्रगटलें आपेंआप । अजपा आधिदैवत ॥ २० ॥ ऐसी अजपा स्वसुखलीला । घोळली स्वरूपदशा चित्कळा । सद्गुरुकृपें उजळा । अभ्यंतर इचेनि ॥ २१ ॥ सद्गुरुशिवलिंगासी स्वयें । अजपामंत्रें अर्चन होय । बेल तांदुळ अर्चन विधेय । संपूर्ण अजपा समर्पे ॥ २२ ॥ गुरुकृपा अखंडैकधार । चिदाकाशगंगा निरंतर । स्वयंभ गुरुलिंगासी साक्षात्कार । अभिषेक हा ॥ २३ ॥ गाळींव पंचतत्वें मनोहर । पूजाद्रव्यें अपार । तत्वानुक्रमें शिवागार । स्वप्रकाशें दाटलें ॥ २४ ॥ चित्ज्योतिर्मय अभंग । शिवगुरु ज्योतिरानंद लिंग । ज्याच्या ज्ञानाग्निनयनें अनंग[1] । भ्रम भस्मोनि गेला ॥ २५ ॥ परिशुध्दतत्व पंचलिंगें । प्रतीतपूजा सानुरागें । अजपाजप अंतरंगें । होय स्वरूपशिवार्चन ॥ २६ ॥ पृथ्वी लिंग स्वयंभ गाभार । अभिषेक ज्ञानघनअखंडधारा । वरुपती स्वानंदाच्या गारा । ते चि तीळ तांदुळ स्वभावें ॥ २७ ॥ विशुध्द सत्व गाळींव सुगंध । तेणें अभिषेकिला स्वरूप सिद्ध । चैतन्य बिल्वदळें कोमळ शुध्द । लाखोली वाहिली ॥ २८ ॥ सुवेद्य धान्याची मोकळी । परमशोभा लक्ष लाखोली । माव अठराभार फळली । वनस्पति पुष्पार्थें ॥ २९ ॥ शून्यप्रेतधूम्र सुधूप । उजळले चित्सूर्यचंद्र दीप । अद्भुत लय अमूप । नैवेद्य जाला ॥ ३० ॥ निरावरण सुधाआवरण । आपोलिंग स्वप्रकाशवर्ण । अभिषेक ज्ञानतेजघन । अखंडतपन तयासी ॥ ३१ ॥ ज्ञानसुधार्णवीं संभवला । आत्मचंद्र प्रकाशला । अनुभवसुगंधें शोभला । गगनेंगाळींववपु[2] ॥ ३२ ॥ ज्ञानप्रतीतिचीं विल्वदळें । लसलसित शांतीनें मृदुळें । तें सुवर्णवर्णें सोज्वळें । शोभलीं आपोलिंगासी ॥ ३३ ॥ धूप दीप तत्व सुवेद्य । नित्यतृप्तीचा

१ मदन. २ शुद्ध आकाशासारखें ज्याचें शरीर आहे असा.

जाला नैवेद्य । अमृतसिद्धीनें तो सद्य । समर्पला शिवात्मयासी ॥३४॥ आतां निजतेज लिंगार्चन । सत्रोंवीचें नित्य तपन । विज्ञानचंदन संपूर्ण । बाणला तया शिवासी ॥ ३५ ॥ ब्रह्मस्फूर्ति उपरमली । सहज-स्थितीनें पाल्हाळली । प्रतीतिकल्पलता फुलली । सुवासें संपूर्ण ॥ ३६ तया सुमनाची स्वभावता । पूजा बाणली तत्वता । नैवेद्य तो स्वभावता । निजयोगें अर्पला ॥ ३७ ॥ चैतन्यशिवाचें आराधन । चिदंबर बोळलें सनातन । तेणें पूजा पंचायतन । जाली स्वभावसिद्ध ॥ ३८ ॥ आता चिदंबरेश्वरपूजा । आत्मा प्रत्यक्ष करूनियां योजा । घनानंद शिवराजा । आत्मनिष्ठेनें प्रत्यक्ष ॥ ३९ ॥ निजप्रतीति दीप निर्मळ । सत्ताविशेष धूप अकळ । सुवासें तया अतराळ । दाटोन ठेलें ॥ ४० ॥ अपरोक्षज्ञान बिल्वदळें । कैवल्य नैवेद्य अवलीळे । शिव चि होऊनि तात्काळें । केली हे शिवपूजा ॥ ४१ ॥ या उपरी आत्मलिंग सहज । कर्तव्येवीण पूजाचोज । काळवेळेहून पर गुज । अकळ या शिवपूजेचें ॥ ४२ ॥ अनंतलिंग अगोचर । न कळे विधिविष्णुसी पार । द्वैताद्वैताहूनि पर । परब्रह्म लिंग तें ॥ ४३ ॥ हें अपरोक्ष लिंगार्चन । करावें दिवसरात्रीवीण । अकाळीं शिवाचें दर्शन । होय सद्गुरुकृपेनें ॥ ४४ ॥ न लगे लिंगप्रतिष्ठा करावी । नलगे बीज-मंत्रीं उद्धरावी । शिव होऊनि आचरावी । शिवपूजा ते उत्तम ॥४५॥ कांहीं च नलगे अनुसधान । ऐसें हें शिवपूजेचें विधान । आत्मारामें स्वरूपशिवार्चन । केलें निजानुभवें ॥ ४६ ॥ हें अर्चन होतां संभ्रम । तो अवघाचि जाणिजे श्रम । विश्रांतीचा शिवविश्राम । मग तयासी कैंचा ॥ ४७ ॥ हें आराध्य आत्मारामाचें । विधान गुरुकृपा शिवाचें । अर्चनरहस्य अभ्यंतरीचें । प्रगटलें शिवपूजन ॥ ४८ ॥ यासि सद्भाव पाहिजे निफट । सद्भावें चि भेटे ज्ञाननीलकंठ । सद्भावें चि शिव

---

१ आत्मस्वरूपी शिवाला. २ जीवनकेल्चे ३ 'शिवोभूत्वा शिव यजेत्' या न्यायानें शिवस्वरूपी झाल्यावर कर्तव्य म्हणून पूजा उरत नाहीं, कौतुक, आवड म्हणून उरते.

धरिह । प्रत्यक्ष होय सुखें ॥ ४९ ॥ भावें भेटला देवाधिदेव । भावें नसतां अवघे चि वाव । धन्य भाविकांचा भाव । आदिदेव प्रगटला ॥ ५० ॥ तिर्थी क्षेत्रीं मूर्तिअभ्यंतरीं । भावें देवाची प्रतिष्ठा करी । भावें प्रसन्न होऊनि धरि । बोलों लागे देव ॥ ५१ ॥ भाव नसतां अंतःकरणीं । व्यर्थ काय तीर्थासी जाऊनि । भ्रांति न फिटे परतोनी । माघारा चि येतसे ॥ ५२ ॥ अभावें भ्रमतां ग्रामोग्रामीं । येक चि जळ येक चि भूमी । विशेष भ्रमण संभ्रमीं । भ्रम चि होतसे ॥ ५३ ॥ हृदयस्थ न पडतां ठायीं । यात्रा पडे प्रवृत्तिप्रवाहीं । भावावांचूनि कोठें चि नाहीं । देव धुंडूनि पाहातां ॥ ५४ ॥ सकळतीर्थी विद्यमान । ज्ञानघनस्वयें आपण । त्या आपआपणासि जपोन । ठायीं पाडावें आधीं ॥ ५५ ॥ आत्मा देव देहदेउळीं । प्रगटलासे स्थळोस्थळीं । निवळोनि पाहातां भूमंडळीं । आपणा चि जवळी तो असे ॥ ५६ ॥ जवळि दुरि हे न साहे । आत्माराम देवं स्वयें । सेवितां सद्गुरूचे पाये । प्रत्यक्ष जाहाला ॥ ५७ ॥ आत्माराम प्रगटे अभ्यंतरीं । तिथें वसती त्याचे शरीरीं । कां जे पुनित व्हावया निर्धारीं । अंगसंग इछिती ॥ ५८ ॥ सकळ तीर्थांचें माहेर । पावन काशीक्षेत्र शरीर । जेथें अखंडवाहिनी साचार । वाहे गुरुकृपाभागीरथी ॥ ५९ ॥ स्नानें अमरंगती दाती । श्रवणपानें दे परम तृप्ती[1] । स्तवनें अमूर्त मूर्ति । प्रगटी चिदाकाशगंगा ॥६०॥ कायाकाशीक्षेत्रीं केवळ । आत्माविश्वेश्वर अढळ । सायुज्य गंगायात्रा सफळ । जाली गुरुकृपेनें ॥ ६१॥ अभेदगुरुभक्ति गया पूर्ण । प्रयाग गुरुपदयोग निर्वाण । गुरुबोध गयापट विस्तीर्ण । अक्षय प्रतीतीनें ॥६२॥ विष्णुपदआदि चतुर्दशविध । स्वरूपप्राप्तीनें प्रसिद्ध । तें गुरुपदयोग स्वतःसिद्ध । देशिकपद अभिवंदिलें ॥ ६३ ॥ सर्व तीर्थांचें जन्मस्थान । तें गुरुपदसंदर्शन । अंतर्निष्ठ गुरुभजन । गुरुपद अभिवंदिती ॥ ६४ ॥

---

1 समाधि स्थिति.

॥ श्लोक ॥ काशीक्षेत्रं शरीरं त्रिभुवनभवनव्यापिनी ज्ञानगंगा
भक्तिःश्रद्धा गयेयं निजगुरुचरणध्यानयोगः प्रयागः ॥
विश्वेशोऽयं तुरीयः सकळजनमनः सर्वभूतांतरात्मा
इत्थं देहे मदीये यदि भवति बहिश्चान्यतीर्थे किमस्ति ॥

एवं आत्मज्ञान तीर्थ पावन । पावन वाराणसी देह जाण । जाणतेपणाची दशा सुलीन । तीर्थविधी ऐशी ॥ ६५ ॥ ऐसी गति आपणापासी । पाशीं यमाच्या गुंतणें ममतेशी । ममताभजन काशीवासी । आत्माविश्वेश वोळगा ॥ ६६ ॥ वोळगा सद्गुरुविश्वेश्वर । विश्वेश्वर आत्मा चि निर्धार । निर्धार हा गुरुकृपाविचार जिवेंसीं जागवा ॥६७॥ जागवा अज्ञाननिद्रिस्थ जीव । जीवशिव स्वभाव भाव । भाव सफळ स्वयमेव । वोळलिया सद्गुरु ॥ ६८ ॥ सद्गुरुकृपा तीर्थ केवळ । केवळ निजआराध्य चिन्मूळ । मूळ निवृत्तीचें अकळ । तीर्थविधान अक्रिय ॥६९॥ अक्रिय अमनस्क अतींद्रिय । अतींद्रीय आत्मा चि स्वयें । स्वयें तीर्थ तीर्थविधि होये । देहयात्रा सफळ ॥७०॥ सफळ यात्रा व्हावयासी । यासि विश्वास निश्चयेंसीं । निश्चयें काहीं दुरि देशासि । जाणें नलगे ॥ ७१ ॥ नलगे देशकाळप्रमाण । प्रमाण गुरुकृपाअनुसंधान । अनुसंधान निजहृदयीं विज्ञान । रक्षावें येयापरी ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ दिग्देशकालाननपेक्ष्य सर्वगं शितादिहृन्नित्य
सुख निरूपमं । यस्त्वात्मतीर्थं भजते विनिष्क्रियः
स सर्ववित्सर्वगतोऽमृतो भवेत् ॥ १ ॥

येयापरी तीर्थविधान । निधान स्वरूपावधान । अवधान गहन सनातन । स्वरूप विवरें ॥ ७३ ॥ स्वरूप विवरें अजपाजप । अजपाजपें प्राप्तिस्वरूप । स्वरूपसिद्धीनें शून्यसंकल्प । काशीक्षेत्रांसि पाहिलें ॥ ७४ ॥ पाहिलें आत्मज्योतिर्लिंग स्वयें । स्वयें चि अर्चिलें ज्ञानप्रत्ययें ।

१ या श्लोकाचा अर्थ वरील ओव्यांत च आला आहे. २ देशकाल इत्यादिकांची अपेक्षा न करणारें, सर्व व्यापी, विमल हृदयस्थ, नित्य सुखात्मक अशा आत्मस्वरूपी तीर्थाची जो निष्काम उपासना करतो तो आत्मज्ञानी होऊन मृत्यु तरून जातो. ३ आत्मस्वरूपाची प्राप्ति.

प्रत्ययासी हितार्थ गुरुरायें । कृतकृत्य केलें ॥ ७५ ॥ केलें गुरुकृपा तीर्थआख्यान । आख्यान अजपेचें अनुसंधान । अनुसंधान जनक तुह्मीं होऊन । श्रवण करा ॥ ७६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । पंचतत्वलिंगार्चन सुवेळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ७७ ॥ सप्तमखंडे ॥ नवमउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीरामसमर्थ आत्मज्ञानी । ज्ञानीं निवळ केलें मजला जनीं । जनीं जन न दिसें नयनीं । निर्गुण भरलें ॥ १ ॥ भरलें स्वरूपज्ञान डोळां । डोळा उघडिला तो सगळा । सगळा आत्माचि जिव्हाळा । प्रगटिला समर्थ ॥ २ ॥ समर्थप्रातीचें रछळ पुराण । पुराणसंमति आत्मनि दान । निदान प्रगटलें सनातन । वेदगर्भीचें ॥ ३ ॥ वेदगर्भ स्वानंदघन । घनवटीं त्या स्वक्रियानिर्वाण । निर्वाण या बोधें खुणेंसी पूर्ण । अधिकारी केलें ॥ ४ ॥ अधिकारी केलें निजयोग्यता । योग्यता सद्गुरु स्वभाव सत्ता । सत्ता प्रगट अखंडता । बोळली गुरुकृपा ॥ ५ ॥ गुरुकृपा सखोल जीवन । जीवनशुद्धीसि गेलें तें गगन । गगन बुडालें संपूर्ण । शुद्धीचि असेना त्याची ॥ ६ ॥ शुद्धीचि असेना त्याची सहज । सहजप्राप्ती गुरुकृपा चोज । चोज चोजवितां उमज । उमजे चि ना कांहीं ॥ ७ ॥ उमजे चि ना कांहीं सुवर्म । सुवर्मे चि आतुडलें निष्कर्म । निष्कर्मस्वरूपीं निरूपम । लाधली आत्मस्थिति ॥ ८ ॥ आत्मस्थिति हे गुरुकृपा । गुरुकृपानुयोगस्वरूपा । स्वरूपापरोक्ष निर्विकल्पा । केलें निर्विकल्प ॥ ९ ॥ केलें निर्विकल्प हें हीं तुमसे । तुमसे भावाभाव अपैसें । अपैसें ज्ञानदर्पण दिसे । आप आपणा डोळां ॥ १० ॥ डोळां दर्पण वदन ईक्षण । ईक्षणीं अभिनव विज्ञान । विज्ञान पूर्ण समाधान । सुखपरवडी ॥ ११ ॥ सुखाची परवडी निजज्ञान । ज्ञानें पाविजे निर्वाण । निर्वाण ब्रह्मदशा पूर्ण । कृपा हे सद्गुरुची ॥ १२ ॥ कृपापरमामृतसागरीं । सागरगरिमा शोभालहरी । लहरी मुद्रा अगोचरी । महासमाधि स्वयें ॥ १३ ॥ महासमाधि

सुखैकघन। घनवटलें घनानंदस्फुरण।स्फुरण हारपलें परतोन। परब्रह्मस्थिति ॥ १४ ॥ परब्रह्मस्थितीचा प्रबोध । प्रबोधमाळा भवावरोध । भवावरोधें शुध्द बुध्द। प्रकाशला आत्मा ॥१५॥ आत्मा तत्वता निर्विकार । निर्विकार स्थिति साचार । साचार निजार्गे अगोचर । सहज आस्तिक्यता॥१६॥ सहज आस्तिक्य परब्रह्म । परमह्म आर्गेचि आत्माराम । आत्माराम निज-विश्राम । अपरोक्ष प्रतीती ॥ १७ ॥ अपरोक्षप्रतीतीचें जिव्हार । जिव्हार निजजीवाचें निरंतर । निरंतरज्ञानें निर्धार । केला स्वभावतेनें ॥ १८ ॥ स्वभावता च सोलींव सुख । सोलींव सुखें स्वरूप सन्मुख । सन्मुखपण आपआपणा देख । दाखविलीं ज्ञानें ॥ १९ ॥ ज्ञानें ज्ञानार्क पाहिला । पाहला आत्माचि आप आपणाला । आपणाला देखे दृष्टीला । द्रष्टा न होनिया ॥ २० ॥ द्रष्टा न होनिया । स्वरूपान्वयें । अन्वयव्यतिरेकातीत स्वयें । स्वयें आस्तिक्यसिध्दि लाहे । सिध्दि गुरुकृपाबळें ॥ २१ ॥ गुरुकृपाबळें प्राप्ति अकळ । समाधीयोग निश्चळ । निश्चळ अंतराळीं अतराळ। सामावलें ज्ञानसुखें ॥२२॥ ज्ञानसुखें अवाप्ति जाली । जाली विश्रांति उपशमली । उपशमली शांति संभवली । नित्यमुक्ति अवचट ॥ २३ ॥ अवचट हा गुरुकृपायोग । योग त्याग ना वियोग । वियोगउपशम अंतरंग । स्वामीचे हृदयींचा ॥ २४ ॥ स्वामीचे हृदयींचा विश्राम । विश्रामस्वभावता निरुपम । निरुपमदशा निष्काम । बोधकल्पतरु फळला ॥ २५ ॥ बोधकल्पतरु श्रीअनंत । अनंतसुखें सुखावले संत । संतश्रीमुखें अप्रांत । कीर्ति वर्णिली अनंताची ॥२६॥ अनंतकीर्तिचा बोधमार्तंड । मार्तंड अखंड भवतमखंड । खंडाखंड निरसूनि प्रचंड । निजतेजें उदेला ॥ २७॥ उदेला उदयअस्तुविहीन । विहितगति प्रमाघन । घनप्रतीतीनें गगन । घोंटूनि असे ॥ २८ ॥ घोंटूनि असे दिवसनिशी । निशिमंडळ प्रकाशी । प्रकाशआत्मज्ञानप्रभेसी । गर्भी घेऊनि सहजें ॥२९॥ सहजें अखंडानंद ऐसा । ऐसा अखंडैकरसा सरिसा । सरिसा साम्यरस्यें तोषा । अभिवृध्दि करी ॥ ३० ॥ अभिवृध्दि करी सनातन । सनातन सहज पुरातन । पुरातनचि नित्य-

नूतन । प्रतीतीनें बोळला ॥ ३१ ॥ बोळला कैवल्यघन उदार । उदार आत्मज्ञानें अपार । अपार विश्रांतीनें साचार । सुखी केलें मजला ॥ ३२ ॥ मजला गुरुनाम माझी गती । गती मतीसि गुरुस्वस्थिती । स्वस्थितीसि मुद्रा अमूर्ति । गुरुमूर्ति प्रत्यक्ष ॥ ३३ ॥ प्रत्यक्ष ध्यान प्रत्यक्ष ज्ञान । प्रत्यक्ष ज्ञेय निजसमाधान । निजसमाधानें अनुदिन । वस्ती केली गुरुपदीं ॥ ३४ ॥ गुरुपदराजीवीं पूर्ण । पूर्ण जाला जीवभृंग सुलीन । सुलीनदशेनें निमग्न । स्वानंदघनमकरंदीं ॥ ३५ ॥ स्वानंदघनमकरंद सेवी । सेवी सुमनपराग अनुभवी । अनुभवी पराअभ्यंतरठेवी । उन्मेषविहीन ॥३६॥ उन्मेषविहीन चिद्गगनीं भरे । भरेसंचरणेसी अनुसरे । अनुसरे निःशब्द विसरे । सोहंझुंकारें ॥३७॥ सोहंझुंकार स्थिरावला । स्थिरावला जीव उपरमला । उपरमला निजयोग भला । फावला गुरुबोध जीवीं ॥३८॥ गुरुबोध जीवीं निजजीवन । जीवन सत्रावीचें सुधापान । सुधापान संजीवनी विज्ञान । हे गुरुप्रसन्नता ॥ ३९ ॥ गुरुप्रसन्नता निजात्मसिध्दी । सिध्दि सायुज्यलघिमा प्रसिध्दी । प्रसिध्दी समाधीची निरवधी । अंतरंगदशा ॥ ४० ॥ दशानिरतिशयें संपूर्ण । संपूर्ण निवर्त्ति द्रष्टे सुलीन । सुलीनचित्तें अनुसंधान । भरण भरिती ॥ ४१ ॥ भरणभरें अभ्यंतरीं । अभ्यंतरज्ञान चिदंबरीं । चिदंबरीं वस्ति निर्धारीं । वसविली स्वरूपता ॥ ४२ ॥ स्वरूपतावस्ति परब्रह्म । परब्रह्मानुभव अंतर्याम । अंतर्यामीचें निजात्मसोम । कृपामृतें बोळलें ॥ ४३ ॥ कृपामृतें घन संत स्वयें । स्वयें सुधाबोधप्रत्ययें । प्रत्ययाच्या निजअतिशयें । कृपांबरीं वरुषती ॥ ४४ ॥ वरुषती निजमुक्तीचा जिव्हाळा । जिव्हाळा चि तो निजचित्कळा । कळा कळातीत स्वलीला । वरुषाव होतसे ॥ ४५ ॥ होतसे महावाक्याविवरण । विवरणअभ्यंतरींचें अनुसंधान । अनुसंधानप्रवृत्तिज्ञान । उजळणी निर्वेध ॥ ४६ ॥ निर्वेधबोध सहजें । सहजास्तिक्यता उमजे । उमज सुमज विहीन सेजे । समाधिनिद्रिस्थ ॥ ४७ ॥ समाधिनिजीं निजउन्मन । उन्मनस्वभावें सुलीन । सुलीन दशेनें अमन । स्वरूपासि आणिलें ॥ ४८ ॥

स्वरूपासि आणिलें आत्मज्ञान । आत्मज्ञानी स्वरूप सनातन । सनातन ज्ञानस्वरूप पूर्ण । प्रतीति आटली ॥ ४९ ॥ प्रतीत आटली स्वभावस्थिति । स्वभावस्थितीनें स्वानंदअवाप्ति । अवाप्तीसुखें निजस्मृति । निर्वाणबोध ॥ ५० ॥ निर्वाणबोधपरंपरा । परंपरेसि विज्ञानगाभारा । गाभारा गगनवैरागरा । विभूषित आत्मरत्नें ॥ ५१ ॥ आत्मरत्नज्योति अंतर्भाव । अंतर्भावीं नित्यमुक्तस्वभाव । स्वभावीं स्वरूपअनुभव । सहजस्थिति ॥ ५२ ॥ सहजस्थितीं निरूपण । निरूपणीं अर्थान्वयज्ञान । अर्थान्वयज्ञानीं समाधान । अकल्पितप्राप्ति ॥ ५३ ॥ प्राप्ती परात्पर अभ्यंतरीं । सद्गुरुकृपा अगोचरी । अगोचरी मुद्रा साक्षात्कारी । वोळली घनामृतें ॥ ५४ ॥ घनामृतें परम तृप्ति । तृप्तीनें अवतरली विश्रांति । विश्रांति निरुपम आद्यंती । गुरुकृपेची गरिमा ॥ ५५ ॥ गुरुकृपेची गरिमा अनंत । अनंतस्वयें अनुभविती संत । संतमाळिकेचा महंत । कळसी चिद्रत्नसानु ॥५६॥ चिद्रत्नसानुबोध सार्वभौम । सार्वभौम निजसिध्दि श्रीराम । श्रीराम चित्छक्तींचा विश्राम । सदोदित स्वयें ॥५७॥ सदोदित सुखें स्वयंभ । स्वयंभचिद्गगनीचा सुप्रभ । सुप्रभचिद्गगनीचा गर्भ । स्वात्माराम स्वयें ॥ ५८ ॥ स्वयें अबोध स्वयें चि उद्बोध । उद्बोधीं अभेद स्वतःसिध्द । सिध्द गुरुकृपा प्रसिद्ध । अवधारिजे सिध्दअवधानें ॥ ५९ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । सिध्दावबोधअंतर्कळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ६० ॥ सप्तमरुद्रे दशमउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीरामसमर्थ सिध्द स्वयें । बोधाब्धिसंभव सदोदय । चिदंबर संपूर्ण सुधामय । बिंबें घनघटला ॥ १ ॥ स्वानंदसुधासांद्र चंद्रमा । केली कृपेची नित्य पूर्णिमा । निरानंदस्वसुखसीमा । अमा पूर्णिमा असे चि ना ॥ २ ॥ नाही मनोमयमृगेलांछन । निष्क-

१ ब्रह्मानंद रूपी अमृतानें थबथबलेला. २ प्रसिद्ध चंद्राला मृगस्वरूपी डाग असतो, तसा या ज्ञानचंद्राला मनरूपी डाग नसतो. ज्ञानाचें स्वरूप मनाच्या पलीकडचें आहे.

ळंक स्वरूपें सुखैकघन । निरवधि कृपामृतें गगन । मरूनि घोळला ॥ ३ ॥ गगन बुडालें अमृतडोहीं । स्वरूपसुखाब्धीसि अंत नाहीं । तळवरि संपूर्ण हृदयीं । हृदयशुधि नाडळे ॥ ४ ॥ जेवि मार्कंडेय कल्पांबुडोहीं । बुडबुडोनि उफाळेत पाहीं । तेवि स्वानुभवनिजहृदयीं । दिसे कांहींयेकपणें ॥ ५ ॥ संपूर्ण सुख सदोदितीं । चित्कल्लोळदशा-विश्रांति । आपआपणांत घेती । दशेची सिधि सहज ॥ ६ ॥ आत्मरती आत्मसुख । आत्मबोधभानु चोख । नित्यावधानज्ञानें उलेख । उजळीला जेणें ॥ ७ ॥ स्वानंदभोग सनातन । प्रत्यक्षासि नाहीं प्रमाण । निजदशारमारमण । वल्लभ आपआपणा ॥ ८ ॥ सोलींव स्वसुखाच्या परवडी । भोगी आपआपणासी आवडी । हे संभोगरिस्थीची गाढी । मिठी पडिली अभिन्न ॥ ९ ॥ नाहीं दृश्यतमस । नाहीं आपपरआभास । रमणीयसुखसौरस । अपरोक्ष अनुभवें ॥ १० ॥ हें अखंडैकरसप्रतीति । गुरुकृपासिधि अवचिती । गगनबिंबसुधाकांति । ओळली आपआपणा ॥ ११ ॥ देशिकबोधचंद्रचंद्रिका । अंतरस्थितीची वेदिका । विज्ञानघनअंबिका । गुरुसांबशांभवी ॥ १२ ॥ हे अनादिसिध संविति । स्वसुखघन संपत्ति । गुरुमाधवकृपास्थिती । इसि रमा ॥ १३ ॥ हे स्वरूपान्वयबोधविधिजा । उन्मेष परसिधि सहजा । गुरु सत्यलोकेशें योजा । आराधिला जियेनें ॥ १४ ॥ ते स्वयेंचि वस्तुज्ञानज्योति । जे स्वयेंचि स्वरूपविश्रांति । जे स्वयेंचि स्वयंभप्रतीती । अनुभवकल्पलता ॥ १५ ॥ जियेचा प्रबोध सुधाकंद । जियेचा कटाक्ष केवळ स्वानंद । जियेचा अनुग्रहो निर्द्वंद्व । अंतर्निष्ठ अनुभवी ॥ १६ ॥ जियेचा स्वछंद अद्वय । जियेचा निर्वंध निजप्रत्यय । ते हे गुरुकृपा सदोदय । चंद्रिका प्रकाशली ॥ १७ ॥ अखंडैकरस सुधांबरी । सात्विकसृष्टीसी वृष्टी करी । तेणें अनुभवऐश्वर्य निर्धारी । पिकली धरा संपूर्ण ॥ १८ ॥ साधक साध्य ना साधन । सुखेंचि घनवटलें गगन । गेलें साध्यासि साधन । पायांळाचि घेनें

१ (?). २ गुरूपदेशरूपी चंद्रप्रकाश. ३ सरस्वती. ४ ब्रह्मदेव. ५ (?).

जाले ॥ १९ ॥ घटमठाकाशीं संपूर्ण । वस्तीसि आलें चित्‌गगन । तें हें गुरुकृपाज्ञान ॥ हृदयासि जालें ॥ २० ॥ पडिली अभिज्ञानुभवमिठी । निजदृष्टी जाली उफराटी । साच चि गुरुकृपेच्या गोष्टी । प्राप्ति रित्यो प्रसवल्या ॥ २१ ॥ मी माझी कैवल्यसंपत्ती । मी चि प्रियरमणस्थिति । मी चि उपभोग अनुभविती । ज्ञेय गरिमा ॥ २२ ॥ मी च परिवारप्रभुत्वें विलसें । मी च प्रयोजन मज उद्देशें । मी च मजमाजि समरसें । ज्ञानरूढीसि येऊनि ॥ २३ ॥ मी च आराम कल्पतरूसी । मी च विराम दुःखप्रवृत्तीसि । मी च अभिराम स्वसुखासी । रमविता स्वयें ॥ २४ ॥ माझें स्वरूपऐश्वर्य । प्रकाशिता माझा मी चि सूर्य । माझा मी च हें आश्चर्य । कवणासि सांगों ॥ २५ ॥ मी मज सुखाचें मूळ । मी मज विश्रांतितरूचें फळ । माझा मी च सद्गुरु कृपाळ । मी च मज उपदेशीं ॥ २६ ॥ मज माझ्या सुखीं विसांवती । मज माझे योगी अनुभविती । मी च मज प्रियसुखें रमति । योगी निजयोगसुखें ॥ २७ ॥ मज माझा लाभ निरंतर । मज माझ्या ज्ञानें साक्षात्कार । मज माझा आनंद अगोचर । निरतिशयें सुखें ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ यल्लाभान्नापरो लाभो यत्सुखान्नापर सुख
यद्ज्ञानान्नापर ज्ञान तद्ब्रह्मेत्यवधारय ॥ १ ॥

तें मी चि ब्रह्म अवधारीं । माझी दशा मजमाझारीं । अतींद्रियचर्या उपचारीं । अक्रिय सर्व ॥ २९ ॥ मी मजमाजि केवळ अक्रिय । मी मज माजि अतींद्रिय । मी मजमाजि दशाअद्वय । भोगती मननसीळ मुनी ॥ ३० ॥ माझें मज अचिंतन ध्यान । माझें मज नैराश्यसमाधान । माझा मज जप सनातन । महामौनस्थितीचा ॥ ३१ ॥ माझी मज अक्रिया चि पूजा । माझा मज सल्लाभ वोजा । मी च स्वतःसिद्ध माझ्या काजा । प्रवर्तलों अद्वय ॥ ३२ ॥

---

१ ज्या लाभाहून दुसरा लाभ नाही, ज्या सुखाहून दुसरें सुख नाही, ज्या ज्ञानाहून दुसरें ज्ञान नाहीं, तें ब्रह्म असें निश्चित समज. श्रीशंकराचार्यकृत आत्मबोध, ५३.

॥ श्लोक ॥ अक्रियैव परा पूजा मौनमेव परो जपः
अचिंतनं परं ध्यानं नैराश्यं परमं सुखं ॥ १ ॥

माझा मज वेध तत्वता । शिवो भूत्वा शिवं यजता । याचि प्रतीतीनें मी वक्ता । मी श्रोता अनुभव ॥ ३३ ॥ अहंविरहित सदोदित । सोहंभावें विगळित । प्राणप्रतिष्ठा माझी संत । मी चि कर्ता होय स्वसुखें ॥ ३४ ॥ मी च मज द्योतक अनंत । मी च आराधी शाश्वत । न देवो देवमर्चयेत् । मी वचन वक्ता ॥ ३५ ॥ मज माझें नित्यस्मरण । मी चि माझें करीं भजन । मी च ब्रह्मअनुसंधान । साधनें दृढावीं ॥ ३६ ॥ मी च वेद शास्त्रें पुराणें । सत्य वाखाणिती मज कारणें । लक्षूनि मज अस्तिक्यप्रमाणें । सर्वत्र प्रवर्त्तलीं ॥ ३७ ॥ सत्यावाचूनि निजनिश्चयें । असत्य केवि प्रवृत्ति होय । मी च सत्य सत्यान्वयें । प्रवर्त्तवी मीं परंपरा ॥ ३८ ॥ सत्य मी परमात्मा राम । माझा अनुभव निगम । माझे इतिहास सत्य अनुक्रम । प्रवर्त्तलें मजसाठीं ॥ ३९ ॥ मी आस्तिक्य कविप्रसिद्धीनें । माझी प्रतिष्ठा सत्यज्ञानें । मज माझा उध्दार करणें । हे ज्ञानप्रतिज्ञा ॥ ४० ॥ आद्यंत माझा मी शाश्वत । आदि कवी मज वाखाणित । शतकोटी भविष्यार्थांत । सत्य राम तो मी स्वयें ॥ ४१ ॥ व्यासें मजचि कारणें अष्टादश । विस्तारिलीं पुराणें परमपरेश । मी विष्णूस्वरूपी येकादेश । पुराण विख्यातीनें ॥ ४२ ॥ मी शिवरूप सत्य पुराणीं । वाखाणिला प्रगटें मननीं । मज अनुभवीत व्यासमुनी । ऐसे नारदरूपें अनुग्रहिला ॥ ४३ ॥ मत्स्य मार्कंडेय भागवत । भविष्योत्तर ब्रह्मवैवर्त्त । ब्रह्मांड ब्रह्मनारदीय सप्त । अग्निपुराण आठवें ॥ ४४ ॥ नारदपुराण लिंगपुराण । पद्मपुराण गरुडपुराण । कूर्मपुराण स्कंदपुराण । वाराहपुराण पंधरावें ॥ ४५ ॥ वामनपुराण विष्णुपुराण ।

---

१ नैष्कर्म्य हीच श्रेष्ठ पूजा, मौन हा च श्रेष्ठ जप, कसलें हि चिंतन न करणें हें च श्रेष्ठ ध्यान, आणि निर्वासना हें च श्रेष्ठ सुख होय. २ देव च देवाची पूजा करी करणार ? ३ वाल्मीकि. ४ मूळच्या शंभर कोटी रामायणांत. ५ भागवत,

विज्ञेय अष्टादशीं पूर्ण । त्या अष्टादशीं विद्यमान । सत्य माझी प्रतिष्ठा ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ (भागवत) मद्वयं भद्वयं चैव ब्रत्रयं वचतुष्टयं।
अपनालिंगकूस्कंद पुराणानां दशाष्टकं ॥ १ ॥

शास्त्रें प्रवर्तलीं मज सत्यावरी । सत्यास्तव युक्तिच्या निर्धारी । मज धरूनि अभ्यंतरीं । चालिले तर्क सहस्रशः ॥ ४७ ॥ राजसत्ता सत्यशासन । शास्त्र प्रजांसि वेद प्रमाण । वेदीं सत्यउपनिषदें निर्वाण । वेदांतवेद्य मीं ॥ ४८ ॥ वेदांतवरिष्ठ राजद्वारीं । शास्त्रप्रमेय सत्याधिकारी । अभिवंदुनी वेदांतअनुसारी । संवादती सुखें ॥ ४९ ॥ तेथें भाष्यकार साही जण । विरपत्ती बळें प्रत्येक प्रस्थान । त्या प्रति आत्मानुभवें बुझाउन । वेदांतें अनुग्रहिले ॥ ५० ॥ मरणें चि होय मुक्ती । हे च्यार्वाकाची मतस्थिति । त्यामध्यें बौध्य क्षपणीक युक्ती । जैन लुंचितकेशें ॥५१॥ मरणे चि मुक्ती जया होये । तरी पुन्हा उपजें चि नये । पाहतां जीव तो अक्षय । मरण कल्पिलें तयासि ॥ ५२ ॥ प्रत्यक्ष मरणे मोक्ष होये । कुंठीत युक्तीचा चि निश्चये । घाणियांत घालूनि गाळीलें पाहे । गुरुवर्य हर युक्तीनें ॥ ५३ ॥ पूर्वमीमांसक कर्माश्रित । मोक्षप्राप्ती कर्मेंचि क्षणत । त्यासि निष्कर्मबोधें विख्यात । निष्कर्मारूढ केलें ॥ ५४ ॥ कर्मवादीयांत अनीश्वरवादी । ज्ञानईश्वरसत्तासंवादी । अनुग्रहिलें वाक्यसुवेदी । उपनिषदानुभवें ॥ ५५ ॥ भट्टप्रभाकर तार्कीक । नैय्यायिक काणाद अलौकिक । युक्तीनें परामऊनि बहुवादिक । निवळ केले वेदांतें ॥ ५६ ॥ उपासक वैशेषिक । सांख्य संख्याप्रमाणिक । शैव शाक्त निषेधिक । अनुभवें निग्रहिले ॥ ५७ ॥ पांतजलीसूत्रप्रधान । शब्दप्रवृत्ति शास्त्रसंपन्न । जपी तपी हठविधान । अष्टांगयोगें अभ्यासी ॥ ५८ ॥ दुराग्रही शब्दज्ञानी । तत्ववादी भेदप्रस्थानी । वेदांतज्ञानें उमजउनि । आत्मपरायण केले ॥ ५९ ॥ अनुभवशास्त्र तें

१ या श्लोकांत १८ पुराणांची आद्याक्षरें आली आहेत.

वेदांत । सर्वशास्त्राचें सार मथित । वेदगर्भ अखंडीत । सर्वज्ञ अनुभविति ॥ ६० ॥ सर्वज्ञता अनुगत विवर्त्त । ज्ञानपरिणाम अव्याकृत । मूळाज्ञान तुलाज्ञानमत । विभांडिलें प्रतीतीनें ॥ ६१ ॥ ब्रह्मणासह मुक्ति निश्चय । ऐसे भेदवादी दुर्जय । वेदप्रशंसा वेदहृदय । बोधें निवळ केले ॥ ६२ ॥ एवं शुत्धज्ञानप्रत्ययें । भेदमतखंडण करुनि स्वयें । उभविला ध्वज वेदांतविजयें । तो मी सत्यस्वभावी ॥ ६३ ॥ वेदहृदय तो वेदांत । वेद शिवउपनिषदार्थ । सर्वेपांवेदांतानांअद्वैत । ब्रह्मणितात्पर्य ॥ ६४ ॥ श्रुति स्मृति बहुधा युक्ती । अभ्यंतरानिर्गुण नित्यमुक्ती । येथें गुरुबोधप्रतीती । वित्पत्ति न चाले ॥ ६५ ॥ अनुभवसहीत शास्त्रज्ञान । बोधमहावाक्यप्रमाण । अनुभवी ते संतसज्जन । गुरुकृपाकटाक्षें ॥ ६६ ॥ अनुभवेवीण शब्दज्ञान । चौदा विद्या युक्तिप्रमाण । चौसष्ट कळा संपूर्ण । युक्तीचें ।चि वैभव ॥ ६७ ॥ आत्मज्ञान वेदपठण । अक्षर गणक जोतिपज्ञान । भेषजें धनुर्विद्या जाण । महेंद्रैविद्या ॥ ६८ ॥ बाहुंकी उपशास्त्र रतिविद्या । शिल्पिकी विद्या वाद्यविद्या । दर्ढे तर्क विद्या नाट्यविद्या । चतुर्दश या प्रकारें ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ आत्मज्ञानं च वेदश्च अक्षरं गणकं तथा ।
ज्योतिषं भेषजंचैव धनुर्विद्या महेंद्रिका ।
बाहुकाचोपशास्त्रं च रतिशास्त्रं च शिल्पिका ।
तथा नृत्यञ्चनाट्यं च चतुर्दश प्रकीर्तिताः ॥ २॥

सकळविद्येचें अधिष्ठान । आपणासी ओळखा आपण । वरकड वित्पत्तीनें सीण । जाणार नाहीं ॥ ७० ॥ आत्मज्ञानसूर्योदय । नसतां वित्पत्तिसृष्टीसि तम होय । प्रकाशेना आत्मतत्व स्वयें । तें ज्ञान चि आंधळें ॥ ७१ ॥ विश्वपाळक आत्मा स्वयें । त्यासि नोळखतां सीण चि होये । नानावित्पत्तीने न होये । समाधान कांहीं ॥ ७२ ॥ जगीं

---

१ सर्व वेदान्त वाक्याचें तात्पर्य अद्वैतब्रह्मप्रतिपादनांत आहे. २ वैद्यकं ३ (?) गारुड विद्या. ४ (?) अश्वविद्या. ५ (?) 'तथा नृत्य विद्या' असें असावें काय? ६ या श्लोकांत फार अशुद्धें होतीं, तीं आम्हाला वाटलीं त्याप्रमाणें शुद्ध केलीं आहेत.

दुर्लभ आत्मतत्त्ववेत्ते । जेहीं आपुलें सार्थक विशुद्धचित्तें । केलें परब्रह्म अर्पैतें । गुरुकृपेनें । निश्चित ॥ ७३ ॥ गुरुकृपा अपरोक्षज्ञान । गुरुकृपा पूर्ण समाधान । गुरुकृपा निजअंजन । आत्मनिधानप्राप्ती ॥ ७४ ॥ गुरुकृपा आत्मउपासना । गुरुकृपा अधिकारीज्ञाना । गुरुकृपा ग्रंथरचना । आत्मप्रतीती ॥ ७५ ॥ गुरुकृपा महारुद्र प्रसन्न । ज्याची बोधसत्तासिद्धी प्रगटोन । रामसोहळा अध्यात्मज्ञान । रुद्रान्वयें संगतीनें ॥ ७६ ॥ प्रथमरुद्रीं क्रमान्वयें स्तवन । तैसें चि समर्थमूळपुरुष आख्यान । द्वितीय रुद्रीं अनुग्रहजाण । जाला अनंतकृपेनें ॥ ७७ ॥ तृतीय रुद्रीं बोधक्रमान्वयें । उपदेशविधी आत्मप्रत्यय । चतुर्थरुद्रीं विरक्तिनिश्चयें । प्रतीतीनें पूर्ण ॥ ७८ ॥ पंचमरुद्रीं उपासनाउद्भव । उपासना प्रसन्नता स्वभावें । परमात्मा नित्य अनुभव । परब्रह्म वस्तुता ॥ ७९ ॥ षष्ठरुद्रीं आत्मउपासनायोग । साक्षात्कारेंसीं अंतरंग । सप्तमरुद्रीं क्षेत्रविधीप्रसंग । क्षेत्रज्ञयोगें ॥ ८० ॥ सप्तमरुद्रीं सप्तमावतार । प्रगटोन केला क्षेत्रोद्धार । अष्टमीं तो चि साचार । मोक्षअयोध्यामहिमा ॥ ८१ ॥ मोक्षअयोध्येप्रति जावया । विचारमार्ग यावा हृदया । तेणें निजलक्षें पाविजे तया । कैवल्यक्षेत्रासी ॥ ८२ ॥ कैवल्यक्षेत्र आस्तिक्यधरा । धरूनि हृदयस्थ धराधरा । स्वरूपधारणेनें उद्धरा । धर धरूनि हृदयीं ॥८३॥ अमळस्वरूप धरेवरी । आत्मानुक्रम निर्विकारी । प्रत्यगात्मा अवस्थांतरीं । स्वयें चि मार्गद्रष्टा ॥ ८४ ॥ प्रत्यक्‌गुणाचें साक्षत्वसूत्र । सरे आत्मानिजध्यासें सर्वत्र । प्रगटे आत्मा चि स्वतंत्र । हा चि मार्ग मोक्षपुरीचा ॥८५॥ सद्गुरुकृपा परिपूर्ण । मोक्षनगरीसी मार्ग सनातन । निजावधानाचें नयन । उघडूनि पाहा ॥ ८६ ॥ अखंड विज्ञानस्वरूप । उजळला द्रष्टा चि चिद्रूप । तो चि कैवल्यपदाचा तद्रूप । मार्ग परिशुद्धीनें ॥ ८७ ॥ अध्यात्मश्रवणपंथें । पाविजे कैवल्यपुरीतें । गुरुकृपा द्रव्यसिद्धि स्वहस्तें । तीर्थविधि करावा ॥ ८८ ॥ प्रकृतिपुरुष परात्पर । निर्वाणचोखें निर्विकार । जाली तया अकर्म कर्मोद्धार । बोधपुत्रें करावा ॥ ८९ ॥ ब्रह्मप्राप्तीनें ब्रह्मार्पण ।

रावें अक्रिय पिंडतर्पण । निदान वैतरणी उतरोन । प्रांतीकयज्ञ
रावा ॥ ९० ॥ संसारविषयार्णवांतून । निघोन करावें पृथ्वीप्रदक्षण ।
द्गुरुकृपा तीर्थाटण । नित्यविरक्तीनें ॥ ९१ ॥ अज्ञानमूळहरण ।
द्गुरुपदद्वयस्मरण । होय जन्मकर्मनिवारण । ज्ञानवैराग्यसिद्धी
। ९२ ॥ अद्वैतशास्त्र गुरुगीता । अधिदैवत होय जयाच्या
चेत्ता । तो पावनरूप तत्वता । जगासि उद्धरी ॥ ९३ ॥
गुरुपदरजसंस्कारें । डौरलें प्रारब्ध नमस्कारें । तो चि भवाब्धीसि नि-
र्धारें । तारक तारुं जाहला ॥ ९४ ॥ जयासी सद्गुरुपदीं निष्ठा । तो
पावला कैवल्यप्रतिष्ठा । अंतर्निष्ठ गुरुभक्त द्रष्टा । स्वरूपदृष्टीचा ॥९५॥
स्वरूपदृष्टीचा साचार । मार्ग अद्वैत ग्रंथ निर्धार । संतकृपार्णवसार
मार्गसंरक्षणकारिती ॥ ९६ ॥ गुरुकृपा कल्पतरुउद्यान । मार्गी निज-
शांति छाया संपूर्ण । देशिककृपा सुधाजीवन । सरोवरें उचंबळती
॥ ९७ ॥ मार्गी स्वबोधअन्नछत्रें । विश्रांतिकर यानें आतपत्रें । गात्रें
निवती उपचारपत्रें । निरुपम विश्रांती ॥ ९८ ॥ स्वरूपप्राप्तीचे
पांथिक । मार्गीच विसावती अनेक । मीं तेथींचा होय अर्चक[1] ।
अज्ञाधारक गुरूचा ॥ ९९ ॥ संत महंत साधुवृंदें । चालती विज्ञान-
गती स्वानंदें । मी यथोचित उपचारसंवादें । अर्चीन पुढती पुढती।
॥ १०० ॥ तरि कृपेचें करूनि वरदान । यावें ग्रंथमार्गें सनातन
हें चि अखंडदंडायमान । नमन साधुसंतांसी ॥ १ ॥ तुह्मी अवधान-
धराधरें । तेथें माझा किती तुह्मासि भार । परिसैण[3] देउनि ग्रंथसार ।
सेविजे श्रवणद्वारा ॥ २ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हा-
ळा । ग्रंथप्रतीती अमृतवेळा । ह्मणे मेरुअनंत ॥ १०३ ॥ सप्तमरुद्रे
एकादश उल्लासः संपूर्णः ॥

---

१ सेवक (?) पूजा करणारा. २ शेष. ३ परिश्रवण (?).

## रुद्र ८ उल्लास १

॥ श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः ।

श्रीरामं परमानंदमुपदेष्टारमीश्वरं ।

व्यापकं सर्वलोकानां कारणं तं नमाम्यहम् ॥

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ मायबाप । कृपेनें कळवळिला आपेआप । विज्ञानसंपत्तीनें सस्वरूप । मज मूळ आला ॥ १ ॥ संसारसासुरा सीणलों मी । जाणोनि कळवळिला अंतर्यामी । स्वकीय क्षेम देऊनि विश्रामीं । निजविश्रांती दिधला ॥ २ ॥ आत्मा जनक आणि जननी । निजकृपासुखसंजीवनी । स्वानंदकल्पतरु येऊनि । भेटला मज ॥ ३ ॥ देऊनि अक्षय संपदा । उपचारीत स्वसुखें सदा । मनोरथचिंतामणीसुखदा । स्वइच्छाकामधेनु ॥ ४ ॥ मज संभऊनि निज-उदरीं । स्वरूपसुखें परिपालन करी । वियोगपरिक्षार्थ निर्धारीं । घातलें होतें सासुरा ॥ ५ ॥ करुणावसर विद्यमानीं । आला कृपेनें धावोनि । स्वस्तिक्षेमसुखवचनीं । सुखी केलें मजला ॥ ६ ॥ कृपेनें घेऊन मजला । परंधामासि नेऊनि घातला । स्वरूपमाहेरीं पुरविला । योग प्रतीतीचा पूर्ण ॥ ७ ॥ तो स्वरूपजनक सद्गुरु । आश्रितजनसुखकल्पतरु । तारक भवाब्धीचें तारु । परतीरासी पाववी ॥ ८ ॥ ज्याचें ऐश्वर्य अगोचर । ब्रह्मादिकांचें माहेरघर । शिवादिक सुरवर । स्वसुखें चि वर्धविले ॥ ९ ॥ सनकादि सिद्धमुनी । पाळिले प्रसिद्ध ब्रह्मज्ञानी । स्वरूपसिद्ध कैवल्यजननी । सकळांसि सुखकर ॥ १० ॥ जे जे मुमुक्ष अनुतापयुक्त । ते ते करावयासि नित्यमुक्त । बोधसंपदेनें स्वानंदमुक्त । सिद्ध उपचारिले ॥ ११ ॥ मुळेंनीण मूळ येऊनि । नेतसे स्वसुखाच्या सदनीं । सहजसुखसुखासनीं । बैसऊनि नेतसे ॥ १२ ॥ येक उपशांतीचे विलास । कृपेची छाया बहुवस । स्वानंदगजस्कंधीं चिद्विलास । वस्तीनें चि नेतसे ॥ १३ ॥ येका उद्बोधरहंवेरी । निद्रायुक्त सुखोप-

१ आत्मबोधरूपी रथावर.

चारी । दशा देऊनि अगोचरी । नेतसे परंधामा ॥१४॥ येका अगोचर नरवाहन । येका नित्यमुक्त सिंहासन । येका समाधितुळिकावहन । विमानाकृति ॥ १५ ॥ ज्ञानसूर्यसम विमान । अपरोक्षगती गहन । नेतसे परंधामासि आपण । अंकीं बैसऊनि मज ॥ १६ ॥ सासर माझा अहंकार । बोळवीत आला अपार । तद्रूप होऊनि साचार । राहिला निरहंकृति ॥ १७ ॥ निजात्मसुखें अगोचर । भर्तार माझा निर्विकार । मज समागमें चि निरंतर । असे स्वभावस्थितिनें ॥ १८ ॥ दोर[3]भात्रे वीरवृत्ति अघोर । ते बोळऊनि सरले महाक्रूर । आतां निजभर्तारेंसि माहेर । वसवीन सुखें ॥ १९ ॥ जे जे माझ्या माहेरासी । येतील ते स्वसुखविशेषीं । उपचारीन मी तयांसी । जननीजनकसुखें ॥ २० ॥ परंधामभक्तिनिर्धारें । येती पदगतीच्या चमत्कारें । बोधसाधनसिद्धिगजरें । पदोपदीं समाधि त्यां ॥ २१ ॥ सद्भावक्षेत्रींहूनि आले । कैवल्यसदनीं सुखें निवाले । नित्यामृततृप्तीनें धाले । सेविती गुरुमायबापा ॥ २२ ॥ हे परंधामयात्रा परात्पर । सद्गुरु समागमें माहेरघर । ज्ञानयोगसिद्धीचा ईश्वर । लळे पुरवी ॥ २३ ॥ परंधामगतीसी पावन । मनोरथसिद्धी सुखैकघन । पाववी मोक्षासि आपण । गती देऊनि अभिनव ॥ २४ ॥ जे इतुकियांसि दिधली गति । तितुकियांहीं गतीचा मी नृपति । चालिलों भजनपंथें गुरुमूर्ति- । सहवासें ॥ २५ ॥ सद्गुरु सायुज्यसुखमूर्ति । सुखैवसिंहासनीं स्वस्थिति । मी उपचारीत अनन्यप्रीती । चालिलों महामहोत्सवें ॥ २६ ॥ फडकती स्वप्रकाशध्वजा । मिरवत चालिला सद्गुरुराजा । विश्रांति टंके पताका सूर्यतेजा । धिःकारीत वर्चसें ॥ २७ ॥ वाजती प्रबोधतुरें गजरें । प्रबोधघन नगारे महास्वरें । भेरी दुंदुभी नादें चेइरें । करिती नभासि त्या ॥ २८ ॥ साक्षात्कार राजोपचार । पदोपदीं विश्रांतिविस्तार । समाधिसुखमंडपीं साचार । सुखवस्तीनें ॥ २९ ॥ सद्गुरु ऐश्वर्य-

१ पालखी. २ आंत मऊ गाद्या असलेलें वहन. ३ (?) भाउजी. ४ (?) ५ तुरें, वाद्यें.

समभारें । साधनसंपत्ति सेना निर्वारें । कैवल्यछत्रशोभा अपारें । निजलक्ष दृष्टीसी ॥ ३० ॥ तळपती बोधमार्तंडपेंत्रें । विरक्तीचीं मकैरवत्रें । मांही मोर्तत्रे आर्तपत्रें । चंद्रमंडळासारिखीं ॥ ३१ ॥ संतमहंत योगीश्वर । महासिद्धीचा चमत्कार । वर्णिती सद्गुरूसी अपार । संकीर्तनयोगें ॥ ३२ ॥ हे स्वरूपयात्रा ऐश्वर्यें । पवाडली विज्ञानमाग्योदयें । नामगजरें सद्गुरुत्रयें । आपुला केला ॥ ३३ ॥ ज्ञानें विचित्र चित्रिले । भारी मोरकुंचे उभारले । तळपती वेधविंजणे प्रकाशले । चंद्रगर्भनिर्मळ ॥ ३४ ॥ सीतळ येकछत्री छाया । अहंरवी उष्णकर नसेचि तिया । राजमार्गे सुखपायघडिया । समाधि विस्तारिली ॥ ३५ ॥ नित्यात्मसुवासिक चंदन । शिंपिला मार्गीं सुखैकघन । चमत्काराचें धूपर संपूर्ण । क्षणक्षणा उघळे ॥ ३६ ॥ नित्यात्म बोधाचें दशांग । तेणें मगमगीत नभ निजांग । बोधसुमनवरुषाव साग । होतसे सर्वदा ॥ ३७ ॥ त्रिदशदशाविहीन देव । पाहोनि गुरुभक्ताचें वैभव । विमानीं बैसोनि अभिनव । सुमनें वरुषति ॥ ३८ ॥ स्वप्रकाश उदयमान । अखंडमंडळीं आत्मसुभान । मार्गीं विदित सनातन । पाहाट फुटली ॥ ३९ ॥ अंतरदृष्टीचा पथ झळाळी । उमटे पदरूप अंतराळीं । न हालता दूरि जवळी । मार्ग चालिला ॥ ४० ॥ गुरुपदयोग भूमिकेवरी । पदसुचिन्हित निर्विकारी । प्रारब्ध देशिकपदसंस्कारी । होतसे पथउत्धार ॥ ४१ ॥ गुरुपदसंस्कार प्राचीन । उजळलें स्वरूपयोगें ज्ञान । त्या देशिकचरणधरेवरून । प्रारब्ध मार्गीं पडिलें ॥ ४२ ॥ निजदृष्टीचें संचरण । पाउल आदिमध्यातेंवीण । मार्गक्रमद्या सनातन । पदासि पावविलें ॥ ४३ ॥ स्वपददायक योग । सकळा मार्ग दावी सन्मार्ग । जेणें सम्यक निःसंग । चालिले महानुभाव ॥ ४४ ॥ जेणें मार्गें अनंत सित्ध । पावले निजपदासि प्रसित्ध । त्या चि सन्मार्गें प्रारब्ध । पडिलें प्रवाहीं ॥ ४५ ॥ गुरुकृपा

---

१ (?) सभारें, पूर्णत्वानें. २ सूर्यपानें, अबदागीर. ३ (?). ४ छत्री. ५ (?) ६ छत्रें. ७ पंखे. ८ (?) काहीं सुगंधित वस्तु.

नित्य मार्ग चाले । जेथें न पडिती काळाचे घाले । ज्या मार्गासि चिंतिता तात्काळें । षड्वैरी निर्दळती ॥ ४६ ॥ जातां गुरुपद धरूनि सोय । मार्गस्थ चि तें पद होय । अभिनव हें सांगों काय । मार्ग चि तो स्वरूप ॥४७॥ अचूक मार्ग मार्गासी । क्रमूनि आला स्वरूपासी । हा मार्ग लक्षिला ज्या दृष्टीसी । तो पद चि होय सर्वस्वें ॥ ४८ ॥ पद येक अनेक धरा । पद अचळ मार्ग चाले त्वरा । पद संपूर्ण मार्ग अपुरा । पदीं आटला तो मार्ग ॥४९॥ ते गुरुचरणीं उर्ध्वरेखा- चिन्ह । अंकित प्रारब्ध जालें संपूर्ण । स्वरूपता सनातन । पावले पदवस्तीसी ॥ ५० ॥ धराप्रारब्ध शिष्याचे भाळीं । देशिकचरण मार्ग तो उजळी । प्राचीन वर्तमान सोज्वळी । गुरुपदचिन्ह जया ॥ ५१ ॥ शिष्यकपाळीं गुरुपद सलग्न । हा चि सन्मार्ग सुखैकघन । देशिकपदीं विराजमान । पदीं पदरूप गति ॥५२॥ सद्गुरुपदीं आचरण । त्वरा ना वि- लंब निवळोन । निर्भय राजमार्गें सुखावोन । यात्रा निघाली ॥ ५३ ॥ अनंतसद्गुरुसमागमें । भुयोळ निजमार्गीचा त्रिक्रमें । न होतां हालि- चालि निभ्रमें । अवचट वस्तीसि आणिलें ॥ ५४ ॥ जेवि निद्रिस्थ नरवाहनीं । सुषुप्ती न मोडत पावे सदनीं । तेवि गुरुकटाक्षें निजभवनीं । आणिलें अकळ ॥ ५५ ॥ हा ज्ञानपंथ सुगम । श्रवणें [illegible] । येणें प्राप्तीसि पाविजे परम । परंधाम स्वयें ॥ ५६ ॥ मूर्ति- [illegible] मार्ग अतिसोपारा । अभ्यंतरवैरीनें अगोचरा । पावलासे [illegible] । स्वरूपवस्तिच्या ॥ ५७ ॥ टाकूनि हा राजमार्ग प्रसिद्ध । [illegible] यमार्गें प्रवर्ततां प्रारब्धें । तेणें अन्यथागति विरुद्ध । अधोगतीसि पाविजे ॥ ५८ ॥ भवसंसर्ग अडरानें । पतनहेतु अकुळ अज्ञानें । [illegible] पारश्रम पाविजे तेणें । कुमार्गें करूनि ॥ ५९ ॥ गोचरवृत्तीचीं अंदोटें । महा खचेरट वाटे दुर्घटें । अडवाटा अधर्म त्रिकुटें । गूढवनें अविद्येचीं ॥६०॥ ठेंचा लागती मरणादि दुस्तर । मोडतां कांटे कामादि दुर्धर । येती अंतराय अनिवार । भवतस्करबाधा ॥६१॥ माया अघोरघन कठिण । भ्रम-

१ मह्मपद. २(?). ३ पालखींत. ४ झोंप. ५ आनंदमार्गांत राहून. ६ आडमार्ग.

भक्री कांटवर्ण। विकराळादि श्वापदें दारुण। भक्षिती तात्काळ ॥ ६२ ॥ भेदभेद सितरीती। दंभ तिरस्कार वाटा पाडिती। मदमत्सर अपहरिती। तेणें कुमार्गें ॥ ६३ ॥ पडतां ऐसिया अडरानीं। निर्गम नव्हे चि परतोनी। दुष्कर्मफळें भक्षितां भ्रमोनि[1]। पडिजे तेथें ॥ ६४ ॥ महा अवघड गूढ पर्वत। सैंघ दर्कुटें तेथें अद्भुत। रिघतां तेणें पथें निभ्रांत। निर्गम नव्हे ॥ ६५ ॥ पातकाचे संग्रह साकडी। कुकर्माची संधी फडोविफडी। कृतांतव्याघ्राची महाधाडी। खग्रास करी जीवाचा ॥ ६६ ॥ मार्ग नाहीं कुकर्मे अहिंचिणें[3]। जीवनरहित फुटिजे प्राणें। घोसाड दरय घरित विहिनें। भवखिंडारें लागलीं ॥ ६७ ॥ विश्रांतीछायेचें नाव नाहीं। अहंरवीनें तापली मोंयी[4]। वरि वरि त्रितापक्षोभ पाहीं। मरणरूप मार्ग तो ॥ ६८ ॥ मायारण्य महा घोसाड। स्थूळ पांचीकें[5] तम गाढ। काळेंवळें[6] दुःख दुर्वाड। मोह बेरड वस्तीचे ॥ ६९ ॥ अकल्पित सरतां पुढारीं। ठाकलें वासनात्मक विकारी। नाना कुग्राम भ्रमांतरीं। अनोळख निष्ठुरें ॥ ७० ॥ भ्रमतां न लभे विचार वस्ति। राहतां सहवासें अधोगती। ऐसिया दुर्मार्गी कल्पांतीं। विश्रांती न पविजे ॥ ७१ ॥ घोसरतां दैविक वासनात्मकें। लागती कारणवस्ति अनेकें। रुतणी कांटवर्णे खडकें। बरैंटा[7] मोहाचा ॥ ७२ ॥ विपोदकें प्रमादसरिता। वाहती प्रमाण टाकूनि अमिता। रिघतां तेथें भवआवर्ता– माजि पडिजे ॥ ७३ ॥ अज्ञानसंभव या मार्गे। पाविजे पतनसंसर्गे। कृपाकरूनि सद्गुरुमार्गें। निजपंथासि लाविलें ॥ ७४ ॥ ऐसा मार्ग अविद्यात्मक। जेथें नाडले चि निजविवेक। तेथें सद्गुरु सुखजनक। धांवोनि आला ॥ ७५ ॥ करीं धरूनिया स्वयें। चमत्काराचें केलें आश्चर्य। स्वरूपानुभवनिश्चयें। दाखविला निजमार्ग ॥ ७६ ॥ अविद्येचा पंथ अडरान। टाकूनि सुविद्यामार्गदर्शन। तेथें अविद्यामूळ

---

१ कांट्यांचें वन. २ फसविती. ३ अति अडचणीचा प्रदेश. ४ भूमी, जमीन. ५ पंचभूतात्मक स्थूळ शरीर. ६ (?) काळोखामुळें ७ बरड जमीन.

महा अज्ञान । मायाअरण्य ऐसें ॥ ७७ ॥ तें चुकऊनि अचुकगती । जावया स्वरूपाप्रति । माया महाशून्यभयवरिति । विस्तारें अवधारिजे ॥ ७८ ॥ जें सकळ भूतांचें कारण । जें अदृश्य शून्य अज्ञान । तें महाकारण महास्फुरण । मूळअवयणाति यावें ॥ ७९ ॥ हें कल्पितज्ञान मायावी । कल्पनात्मजीव अनुभवी । हा प्रतिबिंबपक्षाजिवीं । असे साक्षत्वज्ञान ॥ ८० ॥ साक्षि साक्षत्वा निराळा । तो अविछिन्न निजजिंव्हाळा । गुरुकृपेनें स्वलीळा । पाविजे सन्मार्ग तो ॥ ८१ ॥ निर्भय त्या मार्गें सुखवस्ति । पाविजे स्वरूपनिश्चिती । आतां अवधान देऊनि श्रोतीं । महाशून्य अवधारिजे ॥ ८२ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिंव्हाळा । स्वरूपदृष्टी अविद्या निर्वाळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ८३ ॥ अष्टमरुद्रे प्रथमउल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ विख्यात । स्वरूपमार्गद्रष्टा अनंत । निर्मळ निःसंग निवांत । निर्भय निजयोगें ॥ १ ॥ मार्ग अखंडायमान स्वयें । निजआस्तिक्यें सत्यान्वयें । पाहातां प्रकृतिखंडान्वयें । दिसे अखंड शून्यांत ॥ २ ॥ वस्तुप्रत्यय सनातन । मार्ग अपरोक्ष पुरातन । प्रतीतिसी आलियां अभिन्न । योग स्वसुख दे ॥ ३ ॥ मार्ग काळत्रयअबाधित । निर्विकल्प निर्हेतु अद्वैत । हा पंथ चि परब्रह्म सदोदित । गुरुकृपानुयोगें ॥ ४ ॥ मार्ग निजशुध्दि निराश्रय । असतां कुपंथ कां जाणें होय । यांचें प्रश्नोत्तर निश्चयें । निवळोनि घ्यावें ॥ ५ ॥ स्वयें स्वरूप विद्यमान । द्रष्टा ज्ञानप्रकाशघन । तो दृद- ॥ ५८ म गहन । निजआस्तिक्यसाक्षी ॥ ६ ॥ जो मनबुध्दीसी पाविजे तेणें ज्ञानघन वस्तु केवळ । जो अवस्थेहूनि पर अमूळ । मूळ महा खचेरट[१] ॥ ऐसी निजसोय स्वभावें । असतां साक्षत्वीं प्रसंक्- ॥६०॥ ठेचा लावह्मविकल्प सद्भावें । होय साक्षी चैतन्य ॥ ८ ॥ अंतराय अनिवार । ———

१ महापद. २(?). ३

प्रत्यक् ब्रह्म हा भेद पूर्ण । आणि अहमात्मा मीपण । या दोन्ही अवस्था अज्ञान । स्वरूपीं नसती ॥ ९ ॥ विमळ मार्गे ब्रह्मप्रत्ययें । आत्मा परब्रह्म स्वयें । मुळींहूनि भेद न साहे । केवळ सिद्धांत हा ॥ १० ॥ अहं आत्मत्वीं हेतु संशय । भेदभावास अवस्थात्रय । ब्रह्मस्फूर्ति भेदगुणमय । ब्रह्मांडकोटीचा ॥ ११ ॥ या चि द्रष्टृत्वीं बद्धमुक्ती । जन्ममरणादि प्रसक्ति । वाटे ब्रह्मीं नाहींचि हे युक्ति । मूळमायेची असो ॥ १२ ॥ परब्रह्मीं न घडे कांहीं । हा निश्चयो अहमात्मह्रदयीं । द्रष्टेपण हें सर्वेहीं । गुणसंबंधाचें ॥ १३ ॥ सोलींव द्रष्टृत्व निर्धार । स्वयें चि निवळोनि विचार । निर्मळ निश्चळ निर्विकार । प्रवृत्ति मुळींहूनि नसे ॥ १४ ॥ हें ज्ञान चि निर्विकार । यासि नसे साक्षित्व विकार । मायेसिही द्रष्टृत्व साचार । असे चि ना ॥ १५ ॥ माया जड अज्ञानमूळ । ब्रह्म निःसंग निर्मळ । द्रष्टा विज्ञान केवळ । आतां साक्षित्व कवणा ॥ १६ ॥ ऐसें विचार करितां । भ्रांति होय स्वभावता । आतां द्रष्टृत्वाची कथा । अवधारिजे ॥ १७ ॥ जेथें द्रष्टृत्व प्रादुर्भावें । तेथें निर्विकार स्वभावें । वृत्ति प्रादुर्भावीं मायामार्गे । विपरीत दृष्टी ॥ १८ ॥ द्रष्टा सहज द्रष्टृत्वेंवीण । असे अतिवर्य सनातन । हृदयींचें व्यापक ज्ञानघन । निमिषोन्निमिष ते ॥ १९ ॥ डोळस केवळ दर्शनेंवीण । स्वप्रकाश सर्वांगलोचन । स्वरूप निर्मळ संपूर्ण । ज्ञानदर्पण दावी ॥ २० ॥ अक्रिय तो चि सर्व क्रियेसी । उदासीन भावें प्रकाशी । हे प्रकाश तयासी । मायेच्या संपर्कें ॥ २१ ॥ अधिष्ठित ब्रह्मानुसंधान । ब्रह्मस्फूर्ति स्फुरे जेथून । अधिष्ठात्री अधिष्ठान । उभय आभासें ॥ २२ ॥ निर्मळ ज्ञाय स्वरूपता । ज्ञान सुलीन तत्त्वता । अबोध स्वयें आत्मवस्तुता । निर्विकार ज्ञान ॥२३॥ ज्ञानसूर्य प्रकाशमान । भावसूर्यकांति विवेन । करी प्रत्यक्ष हुताशन । तैसें द्रष्टृत्व स्फुरे ॥ २४ ॥ जेवि दीपसन्निधानें । सन्मणि प्रकाश घन । तेंवि स्वरूपज्ञानें अंतःकरण । त्रिपुटी आभासे ॥ २५ ॥ परि त्या सूर्यकांतेंवीण । अग्नि न प्रसवे सूर्यकिरण । अद्वैतज्ञान निर्गुण । गुणासि नये चि ॥ २६ ॥

अद्वैतीं अद्वैतज्ञान । हें चि भेदाचें मूळ प्रमाण । ज्ञानसूर्यें चि हुताशन । कारणें प्रगटी ॥ २७ ॥ त्यास्तव अद्वैतीं ज्ञान नसे । द्वैतअद्वैत ज्ञानीं च भासे । हें चि साक्षत्वज्ञान प्रकाशे । भेदरूपें ॥ २८ ॥ लोहचुंबक अचंचळ । लोह चळे हे कळ अकळ । तेंवि ज्ञानघनें सकळ । अवस्था जळती ॥ २९ ॥ ज्ञानीं सत्ता प्रबळ । ज्ञानाचें हृदय अचंचळ । ज्ञानामाजि विश्व अखिळ । हे चि ज्ञानसत्ता ॥ ३० ॥ चित्तास बाह्य संपूर्ण । अंतःकरण साक्षी तो अमन । आच्छादलें गगन । जेंवि अभ्रपटळें ॥ ३१ ॥ कीं काष्ठें अवरोधिला वन्हि । तैसा आत्मा अज्ञानी । कां प्रगटे काष्ठाचे मथनीं । तेंवि आत्मा विचारें ॥ ३२ ॥ अग्नि निर्दोष निरंधन । धूम्रज्वाळा काष्ठाचा गुण । काष्ठवन्हीसंस्कारें गगन । कांहीं चि न लिंपे ॥ ३३ ॥ तैसें ज्ञान आणि अज्ञान । स्पर्शलें चि नाहीं निर्गुण । सद्गुरुकृपें निरंजन- । प्राप्ति सहजें ॥ ३४ ॥ सद्गुरुकृपा आत्मा प्रगटोन । करी देहबुद्धीकाष्ठदहन । प्रकाशलें अग्नित्व पूर्ण । तेणेंसीं सामावे ॥ ३५ ॥ वन्हींत काष्ठ दिसेना । आत्मयांत अज्ञान असेना । काष्ठीं संभव हुताशना । हें चि साक्षत्वज्ञान ॥ ३६ ॥ काष्ठीं गुप्त वैश्वानर । देहीं आत्मा अगोचर । प्रगटे आत्मसाक्षात्कार । सोपाधिक जाणिजे ॥ ३७ ॥ गुप्त ब्रह्म परात्पर । प्रगट आत्मसाक्षात्कार । ब्रह्मात्मयोग साचार । जाणिजे वन्हिदृष्टांतें ॥ ३८ ॥ काष्ठ माया अज्ञान । अग्नि उल्लेख ज्ञानघन । उभययोग प्रकाश पूर्ण । साक्षत्व जाणिजे ॥ ३९ ॥ या साक्षत्वीं चित् निदान । या साक्षत्वीं निजसमाधान । याचि साक्षत्वीं महाज्ञान । मायामूळ शून्य वसे ॥ ४० ॥ साक्षत्व हें महा अज्ञान । जालें जीवासि दृढबंधन । नाना यातायाती मरण । दुःखासि प्रसवलें ॥ ४१ ॥ या अज्ञाननिवृत्तीसी जाण । पाहिजे तें अपरोक्षज्ञान । परि तें सद्गुरुकृपेवीण । सहसा नातुडे ॥ ४२ ॥ नाना उपाय तर्क चाळितां । आत्मसंवित् नये हातां । हें गुरुकृपेनें तत्त्वता । ज्ञान अपरोक्ष सिद्धी ॥ ४३ ॥ उपाय फळे बुद्धी भ्रांत । उपचक्षनें तें विलोकित । तें अर्थोपलब्धी असंत । संत कदापि नव्हे

॥ ४४ ॥ सामान्य विशेषा परतें । सहज आस्तिक्य आइतें । तें चि ज्ञेय ज्ञान त्रिपुटितें । अवकाश नेदी ॥ ४५ ॥ जेंवि प्रभा पुढें करून । डोळस देखे पदार्थज्ञान । तो चि तमयोगें सनातन । दृश्य नेदेखे ॥ ४६ ॥ तमें पदार्थ न देखे डोळां । तरि काय ह्मणावा तो आंधळा । तेंवि अज्ञानावरोध जाला । साक्षत्वज्ञानीं ॥ ४७ ॥ दीप तें चि अंतःकरण । साक्षत्वज्ञान तो नयन । द्रष्टा आत्मा सनातन । साक्षत्वातीत ॥ ४८ ॥ त्यासि तमावरोध नसे । अस्तिक्यासि उपाधि न वसे । ज्ञानअंतःकरणें आभासे । दृश्य विपरीत ॥ ४९ ॥ तें अवरोधरूप अज्ञान । साक्षत्वज्ञानासी नव्हे प्रमाण । जेंवि पाहाता पाहाता गगन पार चि न लगे ॥ ५० ॥ तैसें आदि अंतेवीण । अदृश्य शून्य अज्ञान । पाहूं जातां साक्षत्वज्ञान । आंधळें होय ॥ ५१ ॥ अंतःकरण साक्षत्वज्ञान । प्रवर्तता अज्ञानीं निर्बुजोन । जाली शून्यतर निर्वाण । सषुप्तो सारिखीं ॥ ५२ ॥ प्रत्यगात्मा सूर्यबिंबांत । अज्ञान राहो सदोदित । तेणें प्रकाशाचा पैं समस्त । लोप केला ॥ ५३ ॥ तम देखिला नाहीं दृष्टीसी । त्यास्तव तियें रात्रिसी । साक्षी रविबिंबप्रकाशीं । निशी च दिसेना ॥ ५४ ॥ तम प्रभा ज्ञानाज्ञान । साक्षत्व चक्षुसि नव्हे प्रमाण । पाहातां पाहातां निरखून । साक्षत्व सरलें ॥ ५५ ॥ सहजास्तिक्य आत्मज्ञान । त्याच्या आश्रयें असे अज्ञान । तया अज्ञानाचें प्रमाण । केलें चि पाहिजे ॥ ५६ ॥ अज्ञानाचें प्रमाण करणें । तें चि ज्ञानाचें निवर्तवणें । डोळे फोडूनि पाहाणें । मग प्रकाशासि ॥५७॥ नाहीं त्याचें करूनि प्रमाण । पाहातेपणासि घालूनि पाषाण । चिद्रत्नपरिक्षाज्ञान । गर्माधें कीजे ॥ ५८ ॥ आकाशीं आकाश निर्मळ । असतां दिसे तें सुनीळ । त्याचें प्रमाण करूं बैसे केवळ । दृष्टीविहीन तो ॥ ५९ ॥ मुळींहूनि नसे कांहीं । ज्यासि गांव नाव ठाय नाहीं । त्याचें स्वरूप करणें निश्चयीं । हें चि व्यामोहता ॥ ६० ॥ वंधेसि पुत्र असे चि

---

१ न देखे.

ना । त्याची जातकविवंचना । करी तो ज्योतिषी जाणा । पढतमूर्ख ॥ ६१ ॥ डोळां पर्वत रिघाले । तेणें प्रकारें चि ते पाहाले । तेवि कल्पित ज्ञान आंधळे । करिती अज्ञान प्रमाण ॥ ६२ ॥ महा मृगजळाचे सागरीं । तरावयाचा उपाय करी । तयाची प्रशंसा निर्धारीं । केवळ मूढमति ॥ ६३ ॥ एवं अज्ञान शून्यतर । जीवासि असे अगोचर । तयाचा केलियावीण निर्धार । न होय आत्मप्राप्तीचा ॥ ६४ ॥ तें चि पुढें निरूपण । अज्ञानप्रवृत्तिखंडण । लाऊनि अवधानलोचन । दृष्टिसी आणिजे ॥ ६५ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । साक्षत्वीं च निवळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ६६ ॥ अष्टमरुद्रे द्वितीय उल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ निश्चयें । ज्ञानाज्ञानज्ञेय स्वयें । अभेदत्रिपुटी निजान्वयें । निवळ व्हावें ॥ १ ॥ उदयअस्तु विना ज्ञान । निवळ दृष्टि सनातन । स्वरूपद्रष्टा निरंजन । अपरोक्षज्ञानें ॥ २ ॥ हें चि सद्गुरुकृपेचें ज्ञान । हें चि पूर्ण समाधान । हें चि वस्तूसि अभिन्न । निर्वाणसंवित् स्वयें ॥ ३ ॥ सद्गुरुकृपे विरहित । विकल्पज्ञानें भेदजात । अज्ञानप्रमाण अमित । दृष्टिविहीन तो ॥ ४ ॥ अज्ञान काजळाचा पर्वत । भरला नभीं सर्वगत । साक्ष्यत्वज्ञान तया आंत । चक्षु हारपला ॥ ५ ॥ नित्य आमावास्येची निशी । पाहली कालिमा गर्भाधासी । तयाचें पाहणें चि तयासी । तमरूप अवरोधी ॥ ६ ॥ आंधळें कांहीं प्रत्यक् नसे । डोळस चि अंध होतसे । ज्ञान चि निबुजोनि अपैसें । होईजे अज्ञान ॥ ७ ॥ डोळियांतील कृष्णवर्ण । डोळियासि नव्हे प्रमाण । पाहों जातां डोळाचि संपूर्ण । अवरोधूनि जाय ॥ ८ ॥ ज्ञानें सकळांचें रूप होय । ज्ञानासि ज्ञानाचें रूप न होय । पाहों जातां तटस्थ ठाय । महाशून्यतमें ॥ ९ ॥ दृष्टीसि नाणितां प्रमाण । डोळांचे गिळूनि जो निर्वाण । तयासि तमप्रभेचें कारण । कांहीं च नसे

---

१ अंतर्यामीचें, मूळचें.

॥ १० ॥ दृष्टि उघडुनि भयानक । पाहावें कासयासि मानसीक । दृष्टिमनाचा अवभासक । त्यासि भय कायसें ॥ ११ ॥ आपण सिंह होऊनि स्वप्नीं । आपुली च करी विदारणी । निद्राअज्ञान प्रमाणीं । प्रमाण होय हें ॥ १२ ॥ आपुला संशय भयंकर । आपण होऊनि अपस्मार । आपणासि झडपूनि संस्कार । मरणासि पात्र केलें ॥ १३ ॥ जिव्हेवरील कबरीभार । व्योमफणानें करी अरुंधार । कीं चक्षूच्या पाठारीं साचार । बसवी व्योमशिखरीं ॥ १४ ॥ रज्जूचा करूनि भुजंग । भेडसाऊं जाय स्वप्नीचें जग । या भ्रांतीनें मोहिलें मग । करणें तितुकें तैसें चि ॥ १५ ॥ पाताळींच्या कूर्मांची टाळु । विदारूं जाय चक्षुचें बुबळु । कीं ब्रह्मांडखर्पर उगाळुं । पाहे नखपुष्टिवरी ॥ १६ ॥ महाधूम्राचे पर्वत । विदारूं निघती नभहृदयांत । तेंवि अज्ञान प्रमाण होत । निजअस्तिकर्येसीं ॥ १७ ॥ हे अज्ञान शून्यअवस्था । अखंड सुषुप्तीअवस्था । चेतना चेतविना आस्था । असे चि ना कांहीं ॥ १८ ॥ त्यान्हीं अवस्थेसि आवरण । बोढिलें अज्ञान प्रावर्ण । सुषुप्तीसेजेसि निर्वाण । निजेला ज्ञानी ॥ १९ ॥ अज्ञाननिद्रा निर्विकार । नाहीं आत्मत्व स्वप्नउत्धार । नसे साक्षत्व ज्ञानसंस्कार । गाढमूढसुखें ॥ २० ॥ नाहीं विश्वाभास जाग्रति । नसे निर्वाणसुषुप्ती । हे चि अज्ञानसंपत्ति । बोळली जीवासी ॥ २१ ॥ जीव प्रत्यगात्मा स्वभावें । निजेला अज्ञानविभवें । अविद्याप्रमाणें जीवें । जीवंत चि असे ॥ २२ ॥ उठे महत्व चि अहंकार । जागे जाणीव व्यवहार । गाढ सुषुप्तीचा व्यवहार । होय अवचट हा ॥ २३ ॥ त्याचें स्वप्न जगडंबर । त्याची सुषुप्ती अंधकार । मूळशून्याचें अभ्यंतर । अहंकार अनादि ॥ २४ ॥ ऐसी मायाची निद्रिस्थ । गुणसाम्य गुणक्षोभित । भूतोत्पत्ती तें विकृत । जाग्रतीसि आला ॥ २५ ॥ सुषुप्ती पुरोनि तत्वता । आपणें चि होय तो जागता । भोगिली निद्रेची अवस्था । आंगो आंगीं निवळे ॥ २६ ॥ ऐसा साक्षत्वज्ञानें पाहीं । पुन्हा

१ केश, वेणी. २ आकाशरूपी फणीनें. ३ मळ, सुवर्ण ...

ना । त्याची जातकविवंचना । करी तो ज्योतिषी जाणा । पढतमूर्ख ॥ ६१ ॥ डोळां पर्यंत रिघाले । तेणें प्रकारें चि ते पाहाले । तेवि कल्पित ज्ञान आंधळे । करिती अज्ञान प्रमाण ॥ ६२ ॥ महा मृगजळाचे सागरीं । तरावयाचा उपाय करी । तयाची प्रशंसा निर्धारीं । केवळ मूढमति ॥ ६३ ॥ एवं अज्ञान शून्यतर । जीवासि असे अगोचर । तयाचा केलिपावीण निर्धार । न होय आत्मप्राप्तीचा ॥ ६४ ॥ तें चि पुढें निरूपण । अज्ञानप्रवृत्तिखंडण । लाऊनि अवधानलोचन । दृष्टिसी आणिजे ॥ ६५ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । साक्षत्वीं च निवळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ६६ ॥ अष्टमपदे द्वितीय उल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ निश्चयें । ज्ञानाज्ञानज्ञेय स्वयें । अभेदत्रिपुटी[1] निजान्वयें । निवळ व्हावें॥ १ ॥ उदयअस्तु विना ज्ञान । निवळ दृष्टि सनातन । स्वरूपद्रष्टा निरंजन । अपरोक्षज्ञानें ॥ २ ॥ हें चि सद्गुरुकृपेचें ज्ञान । हें चि पूर्ण समाधान । हें चि वस्तूसि अभिन्न । निर्वाणसंवित् स्वयें ॥ ३ ॥ सद्गुरुकृपे विरहित । विकल्पज्ञानें भेदजात । अज्ञानप्रमाण अमित । दृष्टिविहीन तो ॥ ४ ॥ अज्ञान काजळाचा पर्वत । भरला नभीं सर्वगत । साक्ष्यत्वज्ञान तया आंत । चक्षु हारपला ॥ ५ ॥ नित्य आमावास्येची निशी । पाहली कालिमा गर्भाधासी । तयाचें पाहणें चि तयासी । तमरूप अवरोधी ॥ ६ ॥ आंधळें कांहीं प्रत्यक् नसे । डोळस चि अंध होतसे । ज्ञान चि निवुंजोनि अपैसें । होईजे अज्ञान ॥ ७ ॥ डोळियांतील कृष्णवर्ण । डोळियासि नव्हे प्रमाण । पाहों जातां डोळाचि संपूर्ण । अवरोधूनि जाय ॥ ८ ॥ ज्ञानें सकळांचें रूप होय । ज्ञानासि ज्ञानाचें रूप न होय । पाहों जातां तटस्थ ठाय । महाशून्यतमें ॥ ९ ॥ दृष्टीसि नाणितां प्रमाण । डोळां चि गिळूनि जो निर्वाण । तयासि तमप्रमेचें कारण । कांहीं च नसे

---

[1] अंतर्यामीचें, मूळचें.

॥ १० ॥ दृष्टि उघडुनि भयानक । पाहातें [1]कासयासि मानसीक । दृष्टिमनाचा अवभासक । त्यासि भय कायसें ॥ ११ ॥ आपण सिंह होऊनि स्वप्नीं । आपुली च करी विदारणी । निद्राअज्ञान प्रमाणीं । प्रमाण होय हें ॥ १२ ॥ आपुला संशय भयंकर । आपण होऊनि अपस्मार । आपणासि झडपूनि संस्कार । मरणासि पात्र केलें ॥ १३ ॥ जिव्हेवरील कबरीभार । व्योमफणानें करी [2]अरु[3]वार । कीं चक्षूच्या गाठारीं साचार । वसवी व्योमशिखरीं ॥ १४ ॥ रज्जूचा करूनि भुजंग । वेडसाऊं जाय स्वप्नीचें जग । या भ्रान्तीनें मोहिलें मग । करणें तेतुकें तैसें चि ॥ १५ ॥ पाताळींच्या कूर्मांची टाळु । विदारूं जाय चक्षुचें बुबळु । कीं ब्रह्मांडखर्पर उगाळुं । पाहे नखशुक्तिवरी ॥ १६ ॥ महाधूम्राचे पर्वत । विदारू निघती नभहृदयात । ऐसीं अज्ञान प्रमाण होत । निजअस्तिकर्येसीं ॥ १७ ॥ हे अज्ञान शून्यअवस्था । अखंड सुषुप्तीअवस्था । चेतना चेतविना व्यवस्था । नसे चि ना काहीं ॥ १८ ॥ ज्यान्हीं अवस्थेसि आवरण । बोढिलें अज्ञान प्रावर्णे । सुषुप्तीसिजसि निर्वाण । निजेला ज्ञानी ॥ १९ ॥ अ-ज्ञाननिद्रा निर्विकार । नाहीं आत्मत्व स्वमउत्थार । नसे साक्षत्व ज्ञान-संस्कार । गाढमूढसुखें ॥ २० ॥ नाहीं विश्वाभास जाग्रति । नसे निर्गुणसुषुप्ती । हे चि अज्ञानसंपत्ति । बोळली जीवासी ॥ २१ ॥ जीव चैतन्यगात्मा स्वभावें । निजेला अज्ञाननिभवें । अविद्याप्रमाणें जीवें । जीवंत चि असे ॥ २२ ॥ उठे ब्रह्मस्व चि अहंकार । जागे जाणीव व्यवहार । गाढ सुषुप्तीचा व्यवहार । होय अवचट हा ॥ २३ ॥ याचें स्वप्न जगडंबर । त्याची सुषुप्ती अंधकार । मूळशून्याचें अभ्यंतर । अहंकार अनादि ॥ २४ ॥ ऐसी मायाची निद्रित । गुणसाम्य गुणक्षोभित । भूतोत्पत्ती तें निद्रित । जाग्रतीसि आला ॥ २५ ॥ सुषुप्ती सांडोनि तत्वता । आपणें चि होय तो जागता । भोगिली निद्रेची अवस्था । आगो थार्यी निवळे ॥ २६ ॥ ऐसा साक्षत्वज्ञानें पाहीं । पुन्हा

[1] केश, वेणी. [2] आकाशरूपी फणीनें. [3] मग, सुंदर.

निजे पुन्हा जागे देहीं । स्वप्नीचीं जन्मांतरें हीं । पुन्हपुन्हा घे ॥ २७ ॥ त्रिपुटीरहित शुत्यज्ञानें । दीपिका सद्वृत्ति निर्वाण । पाहों लागे आपणा आपण । साक्षत्वज्ञानें ॥ २८ ॥ अंतर्वृत्ति हे चि गती । तुजळी साक्षत्वज्ञानज्योति । पदार्थज्ञानें पुढती पुढती । संपन्न चि होय ॥ २९ ॥ तो अज्ञानाचा सार्वभौम । पदार्थज्ञानाज्ञानी परम । कार्याकारण भवभ्रम । लागला तयासी ॥ ३० ॥ तो चि कारणकार्य जीव । तयाचें आर्जव शून्यसंभव । सांगा तुह्मी चि अभिनव । पुसेन मी जितुकें ॥ ३१ ॥ कांहीं नाहींपणें चि होतें । येकपणें वीण येक येथें । त्याचें उदर प्रसवत । येक आणि दुसरें ॥ ३२ ॥ त्या येकाचा चि परिपाट । होय संख्यारूप टद्वाट । तो मूळापासूनि सेवट । सेवट आला ॥ ३३ ॥ तो येक शून्य येक । मिळोनि जाहला दशक । तयावरि मग येकयेक । अनेक उभारले ॥ ३४ ॥ येक पूर्ण कीं शून्य पूर्ण । हा सांगिजे माझा प्रश्न । येक नौ विवंचून । फार थोडें सांगा ॥ ३५ ॥ येक स्वरूप साचार । नौ शून्याचा चि विस्तार । तेथें विवंचना थोडे फार । संशय असे चि ना ॥ ३६ ॥ तो मुळींच्या स्वरूपें येक । दुजा साक्षी चिदात्मक । संख्येसी कारण मायीक । मांजितां सरे ॥ ३७ ॥ उरे येक येकपणेंवीण । तो परमात्मा निरंजन । ब्रह्मस्फूर्तीचें अधिष्ठान । संख्येसी कारण तेणें चि ॥ ३८ ॥ मुळींचा येक तो यथार्थ । दृश्य नैवांक हा चि व्यर्थ । खांजणीं भांजणीनें समर्थ । उरे येक आस्तिक्य ॥ ३९ ॥ ठाव नाहीं येकपणासी । भेदें येकपण आलें त्यासी । तें चि दुजेपण निश्चयेंसी । विवर्तरूप ॥ ४० ॥ पहिला तो परात्पर । दुजा भेद ब्रह्माकार । तिजा हेतु विश्वेश्वर । सत्तात्मक स्वयें ॥ ४१ ॥ चौथा महदहंकार । पांचवा तो त्रिगुणाकार । साहवा करी व्यापार । इंद्रियद्वारें ॥ ४२ ॥ सातवा तो चेतनात्मक । आठवा इंद्रियदशक । नवां तो दृश्यरूपक । सर्व विस्तारला ॥ ४३ ॥ नव शून्य घेऊनि येक । विशेष जाला दशक । माया शून्य नवांक । शोध

१ नऊ. २ नऊ आंकडे. ३ वजाबाकी आणि भागाकार करून.

घेतला ॥ ४४ ॥ सत्याचें जें येकपण । जालें असत्याचेनि प्रमाण । स्यास्तव सत्यासत्यविहीन । आस्तिक्य पाहावें ॥ ४५ ॥ येका येकपणें जाली तुटी । येका येकपणें होय भेटि । येका येकपणाचे पोटीं । जाला शून्य विचार ॥ ४६ ॥ या नावांचा जो निवाडा । करी तो सज्ञान निधडा । ना तरि येक पदरींचा रोकडा । दवडूनि भ्रमेल ॥ ४७ ॥ तो मुदलासी च ठकला । नी विस्तारलोभें भुलला । शून्यामाजी गेला । फेंदा पडोनि ॥ ४८ ॥ खरेंपणें उटिकें साहे । अज्ञानीं बंधन होय । आप आपणा न पाहे । भुलला भ्रमें ॥ ४९ ॥ सत्य येक असत्य येक । पुसे येक सांगे येक । मुळी येक सेवटीं येक । मायीक नी मध्यें त्रि. ॥५०॥ पाहातां येक मी दुजा तूं । अरे ऐसा मुळीं जो हेतु । मी उमजलों मज तूं । तुज उमजे आतां ॥५१॥ ऐसें साक्षत्वें पुसतां । निघेनि चालिला अवचिता । अखंड पळों जातां । न पडे ठाईं ॥ ५२ ॥ येथें मोठें अभिनव जालें । छायारूप देखोनि आपुलें । उडोनि जाऊं पाहे भलें । उदेलें विघ्न हें ॥ ५३ ॥ सीणला धांवधांवोनि । परि उलंघेना छाया मूर्धनी । तंव अकल्पित अंतःकरणीं । दया आली सद्गुरूसी ॥ ५४ ॥ निरावरण चिद्गगनीं । बोधमध्यान्ह[1] विद्यमानी । सद्गुरुआत्मसूर्य राहोनि । शिष्याचे मस्तकीं ॥ ५५ ॥ माया छाया नानाविकारी । कृपाकरें निर्मोह करी । अभिजितें[2] बोध निर्विकारी । साक्षात्कार दे ॥ ५६ ॥ विस्मयें चाकाटला पाहे । ह्मणे छाया जाली तरी काय । निजअभ्यंतर घेऊनि होय । आश्चर्य करिता ॥ ५७ ॥ पाठीं लागलों प्रत्यक्ष । पळोनि गेली ते असाक्ष । मजमाजि दडाली अलक्ष । काय करूं मी आतां ॥ ५८ ॥ देहामाजि लोपली छाया । तेंवि मजमाजि विराली माया । सद्गुरु चित्सूर्यें दया । केली हे अभिनव ॥ ५९ ॥ शून्य विवंचितां ऐसें । मुळींहूनि कांहीं चि नसे । सूर्यासि मृगजळ जैसें । तैसें दृश्य आत्मत्वीं ॥ ६० ॥ साक्षत्व दृश्य द्रष्टा दर्शन । संकेतें निवळलें ज्ञान ।

---

१ रंगाळत राहून. २ सूर्योदयापासून आठवा मुहूर्त ( दोन घटकांचा काळ ); ह्मणजे मध्यान्हापूर्वी व मागून एकेक घटका इतका काळ.

हें चि विस्तारें संपूर्ण । उमजलें पाहिजे ॥ ६१ ॥ तेंचि दशदेह सविस्तर । पिंडब्रह्मांडींचा विवर । श्रवणीं सावधान ग्रंथांतर । अवलोकन कीजे ॥ ६२ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । शून्यस्वभावें चि निवळला । ह्मणे मेरू अनंत ॥ ६३ ॥ अष्टमदेह तृतीयउल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ नित्यमुक्त । स्वरूपानुभवयोगयुक्त । अक्षयानंदभुक्त । बोधप्रवीण ॥ १ ॥ स्वरूपें आस्तिक्य सनातन । सुखें घनवटलें गगन । हें चि स्वानंदाचें जीवन । सदोदित डोहो ॥ २ ॥ स्वरूपधरा आस्तिक्यतळीं । वरि स्वानंदजळकल्लोळीं । रूढली सोहंअंतराळीं । सोहंकमळणी ॥ ३ ॥ चिदमृत जीवन पूर्ण । विस्तारली सुखैकघन । मूळ अंतर्वृत्तीनें गहन । शिरकली स्वरूपधरेंत ॥ ४ ॥ स्वरूप निजआस्तिक्यता । स्वानंदजळांतूनि तत्वता । उभारोनि चिद्रूपसत्ता । निराळीच रूढली ॥ ५ ॥ निजमूळें आस्तिक्य घेऊनि । स्वानंदजळें पुष्टीतें पावोनि । स्थूळजळें उपळोनि । आली वरिच्या घरी ॥ ६ ॥ जीवनें विरूढला नेंळ । मग्न जाला जळीं तुंबळ । क्रमपत्ररूपें अखिळ । परंपरेनें दाखविला तेणें ॥ ७ ॥ ऐसें अनेकवृत्तिरूप अन्वय । अनंतब्रह्मांड उपाधिमय । नळणीदळगत जळ होय । सुमनासि न येतां ॥ ८ ॥ अभिनवाचेनि अकल्पित । अद्भुत संभवे सुमनहेतें । तेथें चमत्कारेंचि निर्हेत । होय कमळकळिका ॥ ९ ॥ सत्त जीवान्वयक्रम । कळिकेंत अधिष्ठित परम । दैवीकयोगें विश्राम । प्रौढीसि ये ॥ १० ॥ गर्भीं ज्ञानसुवासदाटी । परि मुकुळितभाव निकटीं । न फुटे सुवासराहटी । चिद्भिंगें वाण ॥ ११ ॥ अखंडोदय चिद्गगनदीप । सद्गुरू तो सत्स्वरूप । त्याचा कृपाकर रूप । संपर्क होतां क-

---

१ नित्य आनंदाचा उपभोग घेणारा. २ नित्य भरलेला पाण्याचा डोह. ३ जोर करून. ४ देंठ. ५ नलिनीदलगत, कमळाच्या पानावर असलेलें. ६ वासनारूपी फूल.

ळिकेसि ॥ १२ ॥ अवचट प्राप्ति परात्पर । विकसित निज अभ्यंतर । सद्गुरु स्वप्रकाशकर । संस्कार जाला ॥ १३ ॥ तेणें सद्वृत्तिदळीं दळ । विकास पावलें हृत्कमळ । सुवासें दाटलें, अखिल । व्यापकपण नभाचें ॥ १४ ॥ नित्यानुभव दंती[1] । पावली विस्तारख्याति । चिदाभासभृंग स्वजाति । झेंपावले तेथें ॥ १५ ॥ स्वानंदघन प्रतीतीपूर्ण । मकरंद सेविला नित्यउन्मन । तेणें निमग्नसुखें सुखावोन । विसांवले तेथें ॥ १६ ॥ तव सहजस्थितीची शर्वरी[2] । पांतली निद्रा अगोचरी । तये मुद्रेमाजि निर्विकारी । तादृस्थ वेध जाला ॥ १७ ॥ विज्ञान निःशब्दें अद्वैत । जालें हृत्कमळ मुकुलित । जीवभृंग अखंडित । पावले अवरोध॥१८॥ नित्यानुबोध पुडति । ज्ञानजाग्रति सहजस्थिति । सदोदय रविकांति । करस्पर्श जाला ॥१९॥ तेव्हा निवृत्तिपासूनि सहज । मुक्त जाले, भृंगसमाज । उदारज्ञानें गुरुराज । कृतार्थ करी ऐसा ॥ २० ॥ हे अनंतकृपाकमळणी । पैसावली स्वानंदजीवनीं । मुळींचें मीब्रह्मस्फुरण मनीं । सुमन विस्तारलें ॥२१॥ या सुमनाची माळा पूर्ण । जाली स्वरूपविष्णूसि निवेदन । स्वानंदजळीं दळें विरोन । जीवनरूपें धरेसि मिळालीं ॥ २२ ॥ ते हे प्रणवमूळ कमळा । वरिला निजहृदयींचा जिव्हाळा । आदिविष्णूसि अवलीला । अभिन्नसुखें सुलभ ॥ २३ ॥ हे विद्यारूप वेदजननी । स्वरूपसाक्षात्कार संजीवनी । गुरुवदनविलासिनी । आली निजश्रवणासी ॥ २४ ॥ ब्रह्मस्फूर्तीचें अभ्यंतर । ब्रह्मविद्या अगोचर । ब्रह्मदर्शनें अपार । भरोवरी करी ॥ २५ ॥ हे सद्गुरुकृपा सनातन । विश्रांतिवाहिनी[3] पुरातन । ब्रह्मानुसंधान जीवन । सत्रावी जीवनकळा ॥ २६ ॥ हे स्वरूपविष्णूची भार्या । प्रसिद्ध चतुर्थावस्था तुर्या । ब्रह्मसाक्षात्कारचर्या । बोळली ब्रह्मनिष्ठांसी ॥ २७ ॥ हे परमात्मशिवाची शांभवी । हे निजबोधविधीची पदवी । हे गुरुकृपेची माधवी[4] । बोळली निगमवनीं ॥ २८ ॥ हे चैतन्यचंद्राची चित्कळा । हे विज्ञान-

---

१ हत्ती. २ रात्र. ३ विश्रांति सुखाची नदी. ४ मोगऱ्याची वेल.

हें चि विस्तारें संपूर्ण । उमजलें पाहिजे ॥ ६१ ॥ तेंचि दशदेह सविस्तर । पिंडब्रह्मांडांचा विवर । श्रवणीं सावधान ग्रंथांतर । अवलोकन कीजे ॥ ६२ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । शून्यस्वभावें चि निवळला । ह्मणे मेरू अनंत ॥ ६३ ॥ अष्टमदेहे तृतीयउल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ नित्यमुक्त । स्वरूपानुभवयोगयुक्त । अक्षयानंदर्भुक्त । बोधप्रवीण ॥ १ ॥ स्वरूपें आस्तिक्य सनातन । सुखें घनवटलें गगन । हें चि स्वानंदाचें जीवेंन । सदोदित डोहो ॥ २ ॥ स्वरूपधरा आस्तिक्यतळीं । वरि स्वानंदजळकल्लोळीं । रूढली सोहंअंतराळीं । सोहंकमळणी ॥ ३ ॥ चिदंमृत जीवन पूर्ण । विस्तारली सुखैकघन । मूळ अंतर्वृत्तीनें गहन । शिरकली स्वरूपधरेंत ॥ ४ ॥ स्वरूप निजआस्तिक्यता । स्वानंदजळांतूनि तत्वता । उभारोनि चिद्रूपसत्ता । निराळींच रूढली ॥ ५ ॥ निजमूळें आस्तिक्य घेऊनि । स्वानंदजळें पुष्टीतें पावोनि । स्तळजळें उफाळोनि । आली वरिच्या वरी ॥ ६ ॥ जीवनें विरूढला नॅळ । मग्न जाला जळीं तुंबळ । कमपत्ररूपें अखिळ । परंपरेनें दाखविला तेणें ॥ ७ ॥ ऐसें अनेकवृत्तिरूप अन्वय । अनंतब्रह्मांड उपाधिमय । नळणीदळगत जळ होय । सुमनासि न येतां ॥ ८ ॥ अभिनवाचेनि अकल्पित । अद्भुत संभवे सुमनहेत । तेथें चमत्कारेंचि निर्हेत । होय कमळकळिका ॥ ९ ॥ सप्त जीवान्वयक्रम । कळिकेंत अधिष्ठित परम । दैवक्रियोगें विश्राम । प्रौढोसि ये ॥ १० ॥ गर्भी ज्ञानसुवासदाटी । परि मुकुळितभाव निकटीं । न फुटे सुवासराहटी । चिद्विवें वोण ॥ ११ ॥ अखंडोदय चिद्गगनदीप । सद्गुरू तो सत्स्वरूप । त्याचा कृपाकर रूप । संपर्क होतां क-

---

१ नित्य आनंदाचा उपभोग घेणारा. २ नित्य भरलेला पाण्याचा डोह. ३ जोर करून. ४ देंठ. ५ नलिनीदलगत, कमळाच्या पानावर असलेलें. वासनारूपी फूल.

ळिकेसि ॥ १२ ॥ अवचट प्राप्ति परात्पर । विकसित निज अभ्यंतर । सद्गुरु स्वप्रकाशकर । सत्कार जाला ॥ १३ ॥ तेणें सद्वृत्तिदळीं दळ । विकास पावलें हृत्कमळ । सुवासें दाटलें अखिल । व्यापकपण नमाचें ॥ १४ ॥ नित्यानुभव दंती[1] । पावली विस्तारव्याप्ति । चिदाभासभृंग स्वजाति । झेंपावले तेथें ॥ १५ ॥ स्वानंदघन प्रतीतीपूर्ण । मकरंद सेविला नित्यउन्मन । तेणें निमग्नसुखें सुखावोन । विसावले तेथें ॥ १६ ॥ तव सहजस्थितीची शर्वरी । पातली निद्रा अगोचरी । तये मुद्रेमाजि निर्विकारी । ताटस्थ वेध जाला ॥ १७ ॥ विज्ञान निःशब्दें अद्वैत । जालें हृत्कमळ मुकुलित । जीवभृंग अखंडित । पावले स्वबोध ॥ १८ ॥ नित्यानुबोध पुढति । ज्ञानजाग्रति सहजस्थिति । सदोदय रविकांति । करस्पर्श जाला ॥ १९ ॥ तेव्हा निवृत्तिपासूनि सहज । मुक्त जाले भृंगसमाज । उदारज्ञानें गुरुराज । कृतार्थ करी ऐसा ॥ २० ॥ हे अनंतकृपाकमळणी । वैसावली स्वानंदजीवनीं । मुक्तींचें मीब्रह्मस्फुरण मनीं । सुमन विस्तारलें ॥ २१ ॥ या सुमनाची माळा पूर्ण । जाली स्वरूपविष्णूसि निवेदन । स्वानंदजळीं दळें विरोन । जीवनरूपें धरेसि मिळालीं ॥ २२ ॥ ते हे प्रणवमूळ कमळा । वरिला निजहृदयींचा जिव्हाळा । आदिविष्णूसि अवलीळा । अभिन्नसुखें सुलग्न ॥ २३ ॥ हे विद्यारूप वेदजननी । स्वरूपसाक्षात्कार सजीवनी । गुरुवदनविलासिनी । आली निजश्रवणासी ॥ २४ ॥ ब्रह्मस्फूर्तीचें अभ्यंतर । ब्रह्मविद्या अगोचर । ब्रह्मदर्शनें अपार । भरोवरी करी ॥ २५ ॥ हे सद्गुरुकृपा सनातन । विश्रांतिधैर्यदिनी पुरातन । ब्रह्मानुसंधान जीवन । सत्रावी जीवनकळा ॥ २६ ॥ हे स्वरूपविष्णूची भार्या । अलिप्त चतुर्थावरुता तुर्या । ब्रह्मसाक्षात्कारचर्या । बोळली ब्रह्मनिष्ठांसी ॥ २७ ॥ हे परमात्मशिवाची शांभवी । हे निजबोधविधीची पदवी । हे गुरुकृपेची माधवी । बोळली निगमवनीं ॥ २८ ॥ हे चैतन्यचंद्राची चित्कळा । हे विज्ञान-

1 हत्ती. 2 रात्र. 3 विश्रांति सुखाची नदी

सूर्याची लीळा । हे महासिद्धीची अकळा । स्वसुखरिद्धि ॥ २९ ॥ हें चहूं अवस्थे अंतरीं । स्वभावें अवस्थेचें रूप करी । हे चि मूळमाया चतुरीं । जाणिजे प्रत्ययें ॥ ३० ॥ मूळमायेचा अनुभव । घेयील तो चि कृतार्थ जीव । मायाशांभवीसि आत्मा शिव । सर्वदा अनुभवी ॥ ३१ ॥ विष्णु परतत्व स्वभावें । निजानंददशाअनुभवें । सखोलहृदय अंतर्भावें । कवणा आकळेना ॥ ३२ ॥ तेणें विष्णूमायेची महिमा । देवां दानवांसि न कळे सीमा । स्वरूपहृदयीं चिद्रमा । चिन्हें मिरवला ॥ ३३ ॥ त्या व्यापक विष्णूची स्थिति । नित्यमुक्तदशा चिच्छक्ति । पाहावी अभ्यंतरीं पुढती । महाविष्णुपरियंत ॥ ३४ ॥ धरूनि भास्यभासैकता । विस्तारि उपाधि ममता । लोभें विसरूनि समता । मोहवृत्तीसि ये ॥ ३५ ॥ जैसें भागीरथीचें जीवन । मूळयोगें होय मळीन । गुणअवस्थामेळें अज्ञान- । रूप अविद्या जाली ॥ ३६ ॥ स्वरूपमुळीं मूळमाया । जीवसंस्कारें नाना क्रिया । हे चि अविद्या जीवांसि या । बंधन जाली ॥ ३७ ॥ यियेचें करावें शोधन । तेणें विचारें होय निरसन । मायात्यागें समाधान । पावे जिवासि तत्वता ॥ ३८ ॥ जीव ब्रह्मचि साचार । मायायोगें होय सविकार । जीव ब्रह्मानंदसागर । मायेचेनि दुःखी होय ॥ ३९ ॥ ज्ञानयुक्त परब्रह्म । जीवर्वी सकळ अनुक्रम । अप्रांतसुखें चिद्व्योम । रूप या जीवाचें ॥ ४० ॥ जीवीं मीपण क्षोभलें । ज्ञानीं अज्ञान उठिलें । मळीन दर्पणें दाविलें । दिसे अशुध्द बिंब ॥ ४१ ॥ जीव निरंजन निर्विकार । ज्ञानहृदय निरंतर । जीव आस्तिक्यें साचार । ज्ञान अनुभवी ॥ ४२ ॥ अयमात्माजीव स्वयें । वेदहृदय निरामय । जीव जीवांसि अनुभवसोय । दाखवी मुक्तिची ॥ ४३ ॥ जीवींच आश्रयभूत चळे । जीवींच अनामय निवळे । जीवींच अकळ ते आकळे । अकळतत्वज्ञानें ॥ ४४ ॥ जीवजीवांतरीं चत्वार । अज्ञान ज्ञान निरंतर । निरंतरानुभवसार ।

---

१ कल्पनातीत. २ आत्मसुखाची समृद्धि. ३ प्रकाशित करणारा आणि अप्रकाशित होणारा असें दुहेरी रूप. ४ जीव हा आत्माच होय.

कृतार्थ जीव चौथा ॥ ४५ ॥ जीवें निवृत्तीचें वेझें¹ कळे । जीवेंचि निजअवधान निवळे । जीवें चि सर्वही आकळे । जीव चि मूळ सकळ ॥ ४६ ॥ जीवचि निवळे निजमूळें । जीवस्वरूपें ज्ञान उजळे । जीवसत्तेनें प्रवळे । अद्भुत कर्तव्य ॥ ४७ ॥ जीवासि जाणत नेणतां । जीव जीवाहूनि परता । महारूप आस्तिक्यता । जीवाचि करितां होय ॥ ४८ ॥ अनादिवृत्तिमाया जीवीं । तेणेंचि जीव अवरोध दावी । परंतु निर्जीव जीवा बुझावी । निजआस्तिक्य-बोधें ॥ ४९ ॥ सांगोनि महावाक्य श्रवणीं । करी जीववृत्तीची बुझौं-वणी । जीव सद्गुरु मोक्षपाणि । कृतार्थ करी आपणा ॥ ५० ॥ जीव जीव स्वस्वरूपदाता । जीव सद्गुरूचि तत्वता । अचुक चुकविली व्यथा । भवदुःखाची ॥ ५१ ॥ जीव अभिप्राव हृदयीं । घेऊनि गुरुकृपेनें पांहीं । शाश्वतरूप सर्वा ठायीं । आस्तिक्यें चि असावें ॥ ५२ ॥ जीव षड्विकारविहीन । जीव साक्षीचा साक्षी पूर्ण । जीव शिवरूप गहन । प्रसिद्धबोधें ॥ ५३ ॥ क्षुधा तृषा हे प्राणधर्म । जाण शोक मोह मनोधर्म । जरामरण हे देहधर्म । जीव निर्धर्म सहजें ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ क्षुत्पिपासे प्राणधर्मौ शोकमोहौ तु मानसौ ॥
जरामृती देहधर्मौ षडूर्मिरहितः शिवः ॥ १ ॥

जन्मलीं कोठुनि भूतें । केवि आलीं पष्ठ दशेतें । उपक्रमउपसंहारातें । जाणिजे प्रांजळ ॥ ५५ ॥ केंवि भूतोत्पत्ति भूतस्थिति । भूतप्रवृत्ति भूतनिवृत्ति । विद्याअविद्याव्याप्ति । जाणे जीव तो भगवान ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ उत्पत्तिं च स्थितिं चैव भूतानामगतिं गतिं ॥
वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति ॥ १ ॥

नातळे प्रवृत्तिअज्ञान । ऐसें निर्दोष जीवीं ज्ञान । नापेक्षी भवविषय-भाव । हें नित्य वैराग्य जीवीं ॥ ५७ ॥ नाहीं भयभ्रांति अपेश । ऐसें जीवीं निर्दोष यश । औदार्य तारे विशेषें । स्वरूपदानें ॥ ५८ ॥

---

१ (१) ज्ञान, शुद्धी. २ झाकून टाकण्याची क्रिया. ३ अस्तित्व, उत्पत्ति, वर्धन, विकणें, जीर्ण होणें आणि मरणें.

अनुभवसुखें नित्यसंपत्ती । येणें षड्गुणऐश्वर्यस्थिति । जीवपरात्पर अमूर्तमूर्ति । सद्गुरुस्वरूपें ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञानं वैराग्यमैश्वर्यं मुक्तिरौदार्यमेव च ।
यशो विज्ञानमित्येषां षण्णां भग इतीरणा ॥ १ ॥

येणें सर्वज्ञ साचार । जीव चि तो षड्गुणेश्वर । जीवीं चि तो उलेख वोंकार ।।नित्य प्रसवे ॥ ६० ॥ जीव समान सर्वभूतीं । जीव स्वतंत्र आदिअंतीं । जीव परब्रह्मस्थिती । अन्य ईश्वर नसे ॥ ६१ ॥ जीव निर्गुण निश्चयेंसीं । जीव नित्यसुखाची राशि । जीव नित्यतृप्तीविशेषीं । ज्ञानें सर्वज्ञ ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ समश्चैव स्वतंत्रश्च निर्गुणो निरपेक्षता ।
सर्वज्ञस्तृप्तकामश्च षडेतत् गुणाै[1] ईश्वरः ॥ १ ॥

उपक्रम उपसंहार । दोहींचें जीव अभ्यंतर । घेऊनि आस्तिक्यविवर । निजयोग अनुभवी ॥ ६३ ॥ जीव अधिष्ठाता सूक्ष्म । संभवसुखेंसीं निर्गम । जीव भूपाळ परम । तत्त्वं पदाचा ॥ ६४ ॥ दृष्टीवीण पाहों जाणे । अतिसूक्ष्मी रिगणें । काळ अकाळ लक्षणें । परता प्रवेशें ॥६५॥ देहचत्वारवेष्टणें पांहीं । सोडूनि हृदयग्रंथी तेही । निर्मळस्वरूपविदेही । पांहो जाणे तो ॥ ६६ ॥ मूळमायेचें स्फुरण । औटमातृकाविवरण । अन्वयव्यतिरेकें करून । पाहों जाणें स्वरूपा ॥ ६७ ॥ शून्य निराकार नास्तिक्य । जियेचेनि होय आस्तिक्य । माया चिच्छक्ति ऐक्य । तत्वमसिबोध ॥ ६८ ॥

॥ श्लोक ॥ तत्पदममलमखंडं पदं द्वितीयमपिकैरणं त्वं[2] ।
असिपदमनयोरैक्यं अघटितघटनापटीयसी माया ॥ १ ॥

वेदांतबोधरीतीनें । द्वादश विकल्पशुद्धीनें । मायाविवरण मनें । विस्तार फांजे ॥ ६९ ॥ जें जें सत्व अंतरीं रूढे । तें तें अंतरवृत्तीच्या निःवाडें । गुरुबोधसूर्यउजेडें । पाहोनि लागिजे ॥ ७० ॥ अपरोक्ष ब्रह्म

१ षडेत ईश्वरे गुणाः । असें असावें. २ हा भाग नीट जुळत नाहीं. 'द्वितीयं तथा विकारि त्वम् ' असें कांहीं असावें.

निर्मळ । अपरोक्ष अनुभवस्थळ । अपरोक्ष हृदय केवळ । प्राजळ व्हावया ॥ ७१ ॥ अवधानाचें निजावधान । कीजे निजागार्चें श्रवण । ब्रह्मांडकोटि दृष्टीसि घाळून । पर तें वाढवावें ॥ ७२ ॥ तें निरूपण प्रतीतीचें । परिशोधन मूळमायेचें । भजन लेउनि गुरुकृपेचें । कीजे ग्रंथावलोकन ॥ ७३ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । मायाकमळणीअतर्कळा । ह्मणे मेरूअनंत ॥ ७४ ॥ अष्टमरुद्रे चतुर्थउल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ गुरुमूर्ति । बोधरविप्रकाशें आघंतीं । प्रकाशली तत्वजगती । प्राजळ दिसे ॥ १ ॥ स्वयंभ दृष्टि सनातन । तत्वसृष्टीचा सुलोचन । जीव उलेखीं निवळोन । पावे स्वरूप ॥ २ ॥ उलेख निजहृदयज्ञान । ज्ञेयज्ञातात्रिपदव्याख्यान । उलेखीं समसमान । त्याही परस्वरूप ॥ ३ ॥ परब्रह्मीं आरोपास्तव । उलेखीं आत्मस्वभाव । उलेखीं नामरूप सर्व । मायेचिकरितां ॥ ४ ॥ परब्रह्म तें निर्विकल्प । तेथें नसे भावाभावसंकल्प । तया चि धरि विवर्तरूप । आभासली माया ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥ निर्विकल्प परं ब्रह्म यथावस्थितमेव तत् ।
तत्रान्यथाऽवभासोऽय विवर्तः सप्रकीर्तितः ॥ १ ॥

यथार्थावरी मायामिथ्याआभास । हा मायेचा आत्मस्वीं अध्यास । आत्मा निर्गुण निराभास । शुध्द बुध्द स्वयें ॥ ६ ॥ निर्मळ स्फटिक वर्णयोगें । दिसे कृष्ण पीत सर्वांगें । आत्मा निःसंग ससंगें । माया विकारी करी ॥ ७ ॥ आत्मा द्रष्टृत्वेंवीण सहज । दिसे द्रष्टा मायेचा उमज । माया मुळींहूनि निस्तेज । आत्मयोगें तेजस्वी ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ माया ब्रह्म विवर्तश्चेतीदं वेदांतवादिनः ।
प्रामाणिकार्थोपनिषन्मथितार्थे प्रकीर्तितः ॥ १ ॥

सोहं ब्रह्माहमस्मी स्फूर्तिमय । माया ब्रह्माकार वृत्ति होय । उपनिषदें मथून निश्चयें । तत्ववादी बोलिले ॥ ९ ॥

---

१ (१) ज्ञानविकासांत.

अनुभवसुखें निलसंपत्ती । येणें षड्गुणऐश्वर्यस्थिति । जीवपरात्पर अमूर्तमूर्ति । सद्गुरुस्वरूपें ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञानं वैराग्यमैश्वर्यं मुक्तिरौदार्यमेव च ।
यशो विज्ञानमित्येषां षण्णां भग इतीरणा ॥ १ ॥

येणें सर्वज्ञ साचार । जीव चि तो षड्गुणेश्वर । जीवीं चि तो उलेख ओंकार । निल प्रसवे ॥ ६० ॥ जीव समान सर्वभूतीं । जीव स्वतंत्र आदिअंतीं । जीव परब्रह्मस्थिती । अन्य ईश्वर नसे ॥ ६१ ॥ जीव निर्गुण निश्चयेंसीं । जीव नित्यसुखाची राशि । जीव नित्यतृप्तीविशेषीं । ज्ञानें सर्वज्ञ ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ समश्चैव स्वतंत्रश्च निर्गुणो निरपेक्षता ।
सर्वज्ञस्तृप्तकामश्च षडेतेत् गुणा[१] ईश्वरः ॥ १ ॥

उपक्रम उपसंहार । दोहींचें जीव अभ्यंतर । घेऊनि आस्तिक्यविवर । निजयोग अनुभवी ॥ ६३ ॥ जीव अधिष्ठाता सूक्ष्म । संभवसुखेंसीं निर्गम । जीव भूयाळ परम । तत्त्वं पदाचा ॥ ६४ ॥ दृष्टीवीण पाहों जाणे । अतिसूक्ष्मी रिगणें । काळ अकाळ लक्षणें । परता प्रवेशें ॥ ६५ ॥ देहचत्वारवेष्टणें पांहीं । सोडूनि हृदयग्रंथी तेही । निर्मळस्वरूपविदेही । पांहो जाणे तो ॥ ६६ ॥ मूळमायेचें स्फुरण । औटमातृकाविवरण । अन्वयव्यतिरेकें करून । पांहों जाणें स्वरूपा ॥ ६७ ॥ शून्य निराकार नास्तिक्य । जियेंचेनि होय आस्तिक्य । माया चिच्छक्ति ऐक्य । तत्त्वमसिबोध ॥ ६८ ॥

॥ श्लोक ॥ सत्पदममलमखंडं पदं द्वितीयमपिकेरणं त्वं ।
असिपदमनयोरैक्यं अघटितघटनापटीयसी माया ॥ १ ॥

वेदांतबोधरीतीनें । द्वादश विकल्पशुद्धीनें । मायाविवरण मनें । विस्तार फांजे ॥ ६९ ॥ जें जें सत्य अंतरीं रूढे । तें तें अंतरवृत्तीच्या निवाडें । गुरुबोधसूर्यउजेडें । पाहोनि सांगिजे ॥ ७० ॥ अपरोक्ष मह

---

१ षडेत ईश्वरे गुणाः । असें असावें. २ हा भाग नीट शुद्ध नाहीं. 'द्वितीयं तथा विकारि त्वम्' असें कांहीं असावें.

निर्मळ । अपरोक्ष अनुभवस्थळ । अपरोक्ष हृदय केवळ । प्रांजळ व्हावया ॥ ७१ ॥ अवधानाचें निजावधान । कीजे निजांगाचें श्रवण । ब्रह्मांडकोटि दृष्टीसि घालून । पर तें वाढवावें ॥ ७२ ॥ तें निरूपण प्रतीतीचें । परिशोधन मूळमायेचें । अंजन लेउनि गुरुकृपेचें । कीजे ग्रंथावलोकन ॥ ७३ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । मायाकमळणींअंतर्कळा । ह्मणे मेरूअनंत ॥ ७४ ॥ अष्टमरुद्रे चतुर्थ-उल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ गुरुमूर्ति । बोधरविप्रकाशें आवर्तीं । प्रकाशली तत्वजगती । प्रांजळ दिसे ॥ १ ॥ स्वयंभ दृष्टि सनातन । तत्वसृष्टीचा सुलोचन । जीव उलेखीं निवळोन । पावे स्वरूप ॥ २ ॥ उलेख निजहृदयज्ञान । ज्ञेयज्ञातात्रिपदव्याख्यान । उलेखीं समसमान । त्याही परस्वरूप ॥ ३ ॥ परब्रह्मीं आरोपास्तव । उलेखीं आत्मस्वभाव । उलेखीं नामरूप सर्व । मायेचिकरितां ॥ ४ ॥ परब्रह्म तें निर्विकल्प । तेथें नसे भावाभावसंकल्प । तया चि धरि विवर्तरूप । आभासली माया ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥ निर्विकल्पं परं ब्रह्म यथावस्थितमेव तत् ।
तत्रान्यथाऽवभासोऽयं विवर्तः संप्रकीर्तितः ॥ १ ॥

यथार्थांवरी मायामिथ्याआभास । हा मायेचा आत्मत्वीं अध्यास । आत्मा निर्गुण निराभास । शुद्ध बुद्ध स्वयें ॥ ६ ॥ निर्मळ स्फटिक वर्णयोगें । दिसे कृष्ण पीत सर्वांगें । आत्मा निःसंग संसर्गें । माया विकारी करी ॥ ७ ॥ आत्मा दृष्टेंवीण सहज । दिसे ब्रह्म मायेचा उमज । माया मुळींहूनि निस्तेज । आत्मयोगें तेजस्वी ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ माया ब्रह्म विवर्तश्चेतीदयं वेदांतवादिनः ।
प्रामाणिकार्थोपनिपन्मथितार्थः प्रकीर्तितः ॥ १ ॥

सोहं ब्रह्माहमस्मी स्फूर्तिमय । माया ब्रह्माकार वृत्ति होय । उपनिषदें मथून निश्चयें । तत्ववादी बोलिले ॥ ९ ॥

---

१ (१) ज्ञानविकाशांत.

॥ श्लोक ॥ अहं ब्रह्मास्मि इत्येवं ब्रह्मस्फूर्तिःस्फुरेति या ।
सैवोच्यते महामाया चतुरैस्तत्ववादिभिः ॥ १ ॥

सत्वरजतमोगुणरहित । निर्गुण ब्रह्म तें शाश्वत । असंग अरूप अखंडित । अद्वैतपणें संचलें ॥ १० ॥ तें कांहीं नव्हे भवासि कारण । या कारणें आत्मा चि तो जगत्कारण । आत्मा ब्रह्म संधीस्फुरण । उल्लेखरूप माया ॥ ११ ॥ उल्लेखासहित ब्रह्म । तेथें आत्मयाचा अनुक्रम । स्वरूपीं अभिन्न ज्ञानपरम । परमात्मा बोलिजे ॥ १२ ॥ ब्रह्मीं अनुभवत्रिपुटी नसे । आत्मत्वीं च अनुभव असे । मायेसि स्वतंत्रता ऐसें । घडे चि ना कधीं ॥ १३ ॥ आत्मा स्वतंत्र ज्ञानघन । आत्मा स्वरूपीं अभिन्न । माया अन्वयव्यतिरेक जाण । ज्ञानदृष्टी आत्मत्वीं ॥ १४ ॥ विज्ञानआत्मयाची दृष्टी । आस्तिक्यब्रह्मता प्रतिष्ठी । अभेदीं भेदसृष्टि सेवटीं । भेदीं अभेद तो ॥ १५ ॥ रूप पाहातां निरंतर । पाहातें अरूप अभ्यंतर । पाहणेंचि सरोनि निर्विकार । होय हे अध्यात्मदृष्टी ॥ १६ ॥ विचार चाले स्फुरद्रूप । त्यांत निवळे मूळ संकल्प । सत्यसंकल्पीं निर्विकल्प । स्वभाव आत्मा ॥ १७ ॥ या स्वभावावांचूनि कांहीं । नव्हे मायाब्रह्मीचें रूप देहीं । स्वभावचि निवळोनि हृदयीं । बरा शोध घ्यावा ॥ १८ ॥ स्वभाव ब्रह्म निर्विकार । स्वभाव माया महाकार । स्वभाव आत्मा अगोचर । अनुभवें कळे ॥ १९ ॥ आत्मा माया परब्रह्म । हा स्वभावाचा अनुक्रम । स्वभावें च निवळोनि सुवर्म । लाहिजे स्वभावें ॥ २० ॥ स्वभाव अनादि सिद्ध । वृत्तीसि येऊनि अवरोध । संकल्पसृष्टी नानाविध । कल्पना विस्तारी ॥ २१ ॥ हा स्वभाव अर्वांतर । पूर्ण स्वभाव निर्विकार । या दृष्टीद्वय निरंतर । ज्ञान आत्मत्वीं ॥ २२ ॥ अपरोक्ष ज्ञानाचा झरा । आला देहअभ्यंतरा । या चि अनुसंधानें माघारा । उगमासि न्यावा ॥ २३ ॥ दृश्यत्रिपुटि उखरभूमि । गुप्त जाला अंतर्यामी । तो चि हृदयशुद्धी ब्रह्मास्मी ।

१ हा शब्द जुळत नाही. २ मी ब्रह्म आहे असें स्फुरण. ३ प्रकृति. ४ नाशिक जमिनीत. ५ आत्मा.

पोखरितां प्रगटे ॥ २४ ॥ अवस्थेंत प्रगट न वाहतां । गुप्त अंतरीं वाहे तत्वता । अनुभवरूप वस्तुता । आत्माराम चि तो ॥ २५ ॥ या चि प्रति भासे विश्वाकार । व्यापकपणें विश्वंभार । मूळशाखादि सविस्तर । लीला विस्तारला ॥२६॥ हाचि मुळींचा मूळ उगम । स्वरूपीं मिळाल्या होय संगम । बीज सृष्टीचें परम । तत्व सकळां हृदयीं ॥२७॥ या चि योगें बीजकारण । या कारणाचें बीज महाकारण । त्या महाकारणासि संपूर्ण । निवास हा ॥ २८ ॥ अहंस्फूर्ति अंतःकरण । साक्षात्कारें चि त्या विस्तीर्ण । सनातन अवघें स्मरण । सुखें घनवटलें ॥ २९ ॥ या स्मरणा सरिसें चि तें विस्मरण । करीं स्मरणसूर्यअस्तमान । गाढतमें नभ संपूर्ण । शून्यरूप करी ॥ ३० ॥ निद्रेसि निद्रा लागली । ऐसी त्या शून्याची पोकळी । निशीरूप महाकाळी । मूळमाया स्वभावें ॥ ३१ ॥ तियेमाजि ज्ञानतत्व । कांहीसें निवळलें सत्व । तें चि कारणासि आत्मत्व । दाखवितें होय ॥ ३२ ॥ स्वप्नीं व्यथा भवदुस्तर । ब्रह्माश्रित अहंकार । गुरुकृपेचा संस्कार । जागें केलें तयासी ॥ ३३ ॥ कारणीं पुरुष निजेला । निद्रेमाजि जागा जाला । तेणें जगडंबर देखिला । प्रपंच स्थूळ ॥ ३४ ॥ आकाशाकरितां समीर । होय स्थिरचर गंभीर । तेवि व्यापकाकरितां संसार । विस्तारला ॥३५॥ नाहीं पदार्थावभासन । मूळीं निर्विकल्प अंतःकरण । चतुर्विध वृत्ति सज्ञान । हृदयीं रिघे ॥ ३६ ॥ माया निर्विकल्प स्फुरण । अविद्येंत अंतःकरण । मायेंत सत्यसंकल्प जाण । मन अविद्येमाजी ॥ ३७ ॥ मायेंत स्वरूपनिश्चय । अविद्येंत बुधिचातुर्य । मायेंत ब्रह्मचिंतन होय । चित्त अविद्येंत तें ॥ ३८ ॥ मायेंत अहंब्रह्माकार । अविद्येंत तो अहंकार । एवं वृत्तिक्षोभविस्तार । ज्ञान अज्ञान मूळ ॥ ३९ ॥ जेंवि भानोदय स्वभावें । जनाची प्रवृत्ति संभवे । सूर्य जो नभीं तेजप्रभावें । जैसा तैसाचि ॥ ४० ॥

॥ श्लोक ॥ आत्मचैतन्यमाश्रित्य देहेंद्रियमनोधियः ।
स्वकीयार्थेषु वर्तंते सूर्यालोके यथा जनाः ॥ १ ॥

शुद्धमाया ब्रह्माकार । येक विचारें निर्विकार । ह्मणावी अविद्या विकार । बहु विस्तारली ॥ ४१ ॥ लोहो चुंबकाचेनि तो चळे । तेंवि प्रतिसत्तानुमेळें । माया अविद्यावृत्ति प्रबळे । नाना व्यवसायी ॥ ४२ ॥ माया निर्विकल्पसमाधि । अविद्या सुषुप्ति निधि । उभय अचेतवृत्ति प्रबोधी । तो प्रतिसत्तात्मक ॥ ४३ ॥ निर्विकल्पानुसंधान । सत्तात्मक विशाळ स्मरण । त्या स्मरणामाजि त्रिगुण । आणि सूक्ष्मभूतें ॥ ४४ ॥ माया कुमारी शरीरें । पोटीं भविष्यें संतति विस्तारे । अव्यक्त प्रपंच हा निर्धारें । प्रकृतिमाजि असे ॥ ४५ ॥ बीजामाजि तरुवर न दिसे । तैसा मायेंत प्रपंच न भासे । उपरी कारण मूळें प्रकाशे । भव वासनात्मक ॥ ४६ ॥ सुषुप्तीसि अणुप्रमाण । नसे जाग्रतीचें ज्ञान । ते महानिद्रेसि कोंदून । असेल पाहा ॥ ४७ ॥ ते जाग्रतीसि होय प्रमाण । कारणीं कार्य नसे जाण । कार्यावरूनी च कारण । पाहातां सांपडे ॥ ४८ ॥ अविद्या जगत्कारण । तें चि मायेचें कार्य जाण । त्यास्तव कारणाचें कारण । महाकारण प्रकृति ॥ ४९ ॥ माया निखिळसत्वें घोतली । ब्रह्माऐसी प्रतिष्ठिली । तियेंत अष्टतत्वें उमसली । तेणें अष्टधा ते बोलिजे ॥ ५० ॥ निद्रिस्थासि निद्रा न कळे । जाग्रतीसि निद्रा निवळे । सुखसंभव तत्वमेळें । रजोगुण तेथें ॥ ५१ ॥ सुखनिद्रानें तमोगुण । तें चि शून्यात्मक गगन । गगनीं त्या स्फूर्तिचळण । तो चि वायू जाणिजे ॥ ५२ ॥ इच्छेंत स्मरण निर्धार । तें चि तेज अतिदुर्धर । तेंहीं आप निरंतर । जिव्हाळा तत्वांसी ॥५३॥ तया अपामाजि दृढावें । जाणीव ब्रह्मांडकोटिकटाव । हा अव्यक्तमायास्वभाव । प्रपंच

---

१ सूर्य प्रकाशाचा आश्रयानें जसें लोक आपलीं कामें करतात, त्याप्रमाणें आत्मस्वरूपी चैतन्याचा आश्रय करून, स्थूल देह कर्मेंद्रियें ज्ञानेंद्रियें, मन आणि बुद्धि ही आपल्या कार्याला प्रवृत्त होतात. २ विलक्षण. ३ व्यापेत. ४ उद्भवली. ५ मगता, पदपग.

निरोपिला ॥५४॥ सूक्ष्म तत्त्वामाजि सूक्ष्म । अव्यक्त गुणभूत कर्दम । तया कर्दमाचा निरूपम । अव्यक्तीं हिरण्यगर्भ ॥ ५५ ॥ काष्टीं अग्नि दिसेना । निरोधें वायु भासेना । अरूप अव्यक्त नाना । मुळींचा प्रपंच ॥ ५६ ॥ वंध्यापुत्राचें नामकरण । करणें तैसें प्रपंचाचें विवरण । अव्यक्तापासूनि अहंस्फुरण । विस्तारे पुढें ॥ ५७ ॥ तें चि पुढें निरूपण । मुळींच्या अहंकाराचें स्फुरण । तया अहंकारीं अहंकरण । त्रिविधा कैसें ॥ ५८ ॥ विशेषबोध प्रकाशें । परेचा चक्षु सावकाशें । पदार्थ लक्षूनि निरावकाशें । थारला तें अवधारा ॥ ५९ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरूकृपेचा जिव्हाळा । मायाब्रह्मविवर्तनिवळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ६० ॥ अष्टमरुद्रे पंचमउल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ निर्विकल्प । परब्रह्मरूपें अरूप । विमळब्रह्मीं अध्यारोप । वस्तुता असे चि ना ॥ १ ॥ मिथ्यादृष्टीनें अध्यारोप । तैसाचि अपवाद मायारोप । बाह्यदृष्टीनें सत्यसंकल्प । ब्रह्मीं विवर्त हा ॥ २ ॥ तेथें प्रतीति ना अप्रतीति । काहींयेकपणें नसे स्फूर्ति । तेथें अहंब्रह्म हें अहंकृति । मूळ-अहंकार ॥ ३ ॥ मी परब्रह्म जाण हें अज्ञान । मूळप्रकृतीचें अनुसंधान । ब्रह्मीं काहींच नसे स्फुरण । मायास्वरूपीं ॥ ४ ॥ हे द्वादशविकल्पी माया । विचारें चि पाहावें यिया । मुळीहूनि नसेचि पाहावया । द्रष्टृत्व कैचें ॥ ५ ॥ माया सत्य नव्हे ना असत्य । ना नव्हे सत्यासत्य । हे भिन्न नव्हे मितामित । ना अभिन्न नव्हे ॥ ६ ॥ ना भिन्नाभिन्नाहूनि पर । सावेव ना निरवेव सार । ना नव्हे तें निराकार । भावाभावरूप नव्हे ॥ ७ ॥ नव्हे भावाभावरहित । ना नव्हे स्वभाव इत्थंभूत । या द्वादशविकल्पें विवर्तत । निर्देश मायेचा ॥ ८ ॥ निःप्रपंच परब्रह्म । माया अध्यारोप भवभ्रम । अज्ञानासि बुझावयां वर्म । केला अध्यारोप अपवाद ॥ ९ ॥

---

१ हालचाल न करणारा. २ समजूत घालण्याकरितां.

॥ श्लोक ॥ आत्मचैतन्यमाश्रित्य देहेंद्रियमनोधियः ।
स्वकीयार्थेषु वर्तंते सूर्यालोके यथा जनाः[१] ॥ १ ॥

शुद्धमाया ब्रह्माकार । येक विचारें निर्विकार । ह्मणावी अविद्या विकार । बहु विस्तारली ॥ ४१ ॥ लोहो चुंबकाचेनि तो चळे । तेंवि प्रतिसत्तानुमेळें । माया अविद्यावृत्ति प्रबळे । नाना व्यवसायी ॥ ४२ ॥ माया निर्विकल्पसमाधि । अविद्या सुषुप्ति निधि । उभय अचेतवृत्ति प्रबोधी । तो प्रतिसत्तात्मक ॥ ४३ ॥ निर्विकल्पानुसंधान । सत्तात्मक विशाळ[२] स्मरण । त्या स्मरणामाजि त्रिगुण । आणि सूक्ष्मभूतें ॥ ४४ ॥ माया कुमारी शरीरें । पोटीं भविष्यें संतति विस्तारे । अव्यक्त प्रपंच हा निर्धारें । प्रकृतिमाजि असे ॥ ४५ ॥ बीजामाजि तरुवर न दिसे । तैसा मायेंत प्रपंच न भासे । उपरी कारण मूळें प्रकाशे । भव वासनात्मक ॥ ४६ ॥ सुषुप्तीसि अणुप्रमाण । नसे जाग्रतीचें ज्ञान । ते महानिद्रेसि कोटून । असेल पाहा ॥ ४७ ॥ ते जाग्रतीसि होय प्रमाण । कारणीं कार्य नसे जाण । कार्यावरूनी च कारण । पाहातां सांपडे ॥ ४८ ॥ अविद्या जगत्कारण । तें चि मायेचें कार्य जाण । त्यास्तव कारणाचें कारण । महाकारण प्रकृति ॥ ४९ ॥ माया निखिळसत्वें स्रोतली[३] । ब्रह्मऐसी प्रतिष्ठिली । तियेंत अष्टतत्वें उमसली[४] । तेणें अष्टधा ते बोलिजे ॥ ५० ॥ निद्रिस्थासि निद्रा न कळे । जाग्रतीसि निद्रा निवळे । सुखसंभव तत्वमेळें । रजोगुण तेथें ॥ ५१ ॥ सुखनिद्रानें तमोगुण । तें चि शून्यात्मक गगन । गगनीं त्या स्फूर्तिचळण । तो चि वायू जाणिजे ॥ ५२ ॥ इच्छेंत स्मरण निर्धार । तें चि तेज अतिदुर्धर । तेंहीं आप निरंतर । जिव्हाळा तत्वांसी ॥५३॥ तया अपामाजि दढावें[५] । जाणीव ब्रह्मांडकोटिकटाव । हा अव्यक्तमायास्वभाव । प्रपंच

१ सूर्य प्रकाशाचा आश्रयानें जसे लोक आपलीं कामें करतात, त्याप्रमाणें आत्मस्वरूपी चैतन्याचा आश्रय करून, स्थूल देह कर्मेंद्रियें ज्ञानेंद्रियें, मन आणि बुद्धि हीं आपल्या कार्याला प्रवृत्त होतात. २ विलक्षण. ३ ओपेत. ४ उद्भवली. ५ घनता, घट्टपण.

निरोविला ॥५४॥ सूक्ष्म तत्वामाजि सूक्ष्म । अव्यक्त गुणभूत कर्दम । तया कर्दमाचा निरूपम । अव्यक्तीं हिरण्यगर्भ ॥ ५५ ॥ काष्टीं अग्नि दिसेना । निरोधें वायु भासेना । अरूप अव्यक्त नाना । मुळींचा प्रपंच ॥ ५६ ॥ वंध्यापुत्राचें नामकरण । करणें तैसें प्रपंचाचें विवरण । अव्यक्तापासूनि अहंस्फुरण । विस्तारे पुढें ॥ ५७ ॥ तें चि पुढें निरूपण । मुळींच्या अहंकाराचें स्फुरण । तया अहंकारीं अहंकरण । त्रिविधा कैसें ॥ ५८ ॥ विशेषबोध प्रकाशें । परेचा चक्षु सावकाशें । पदार्थ लक्षूनि निरावकाशें । धारळा तें अवधारा ॥ ५९ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरूकृपेचा जिव्हाळा । मायाब्रह्मविवर्तनिवळा । म्हणे मेरुअनंत ॥ ६० ॥ अष्टमरुद्रे पंचमउल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ निर्विकल्प । परब्रह्मरूपें अरूप । विमळब्रह्मीं अध्यारोप । वस्तुता असे चि ना ॥ १ ॥ मिथ्यादृष्टीनें अध्यारोप । तैसाचि अपवाद मायारोप । बाह्यदृष्टीनें सत्यसंकल्प । ब्रह्मीं विवर्त हा ॥ २ ॥ तेथें प्रतीति ना अप्रतीति । कांहींयेकपणें नसे स्फूर्ति । तेथें अहंब्रह्म हें अहंकृति । मूळ अहंकार ॥ ३ ॥ मी परब्रह्म जाण हें अज्ञान । मूळप्रकृतीचें अनुसंधान । ब्रह्मीं कांहींच नसे स्फुरण । मायास्वरूपीं ॥ ४ ॥ हे द्वादशविकल्पी माया । विचारें चि पाहावें यिया । मुळीहूनि नसेचि पाहावया । द्रष्टत्व कैचें ॥ ५ ॥ माया सत्य नव्हे ना असत्य । ना नव्हे सत्यासत्य । हे भिन्न नव्हे भिताभित । ना अभिन्न नव्हे ॥ ६ ॥ ना भिन्नाभिन्नाहूनि पर । सावेव ना निरावेव सार । ना नव्हे तें निराकार । भावाभावरूप नव्हे ॥ ७ ॥ नव्हे भावाभावरहित । ना नव्हे स्वभाव इत्थंभूत । या द्वादशविकल्पें विवर्तत । निर्देश मायेचा ॥ ८ ॥ निःप्रपंच परब्रह्म । माया अध्यारोप भवभ्रम । अज्ञानासि बुझावया धर्म । केला अध्यारोप अपवाद ॥ ९ ॥

---

१ हालचाल न करणारा. २ समजूत घालण्याकरितां.

श्लोकार्थः—अध्यारोपापवादाभ्यां निःप्रपंचे प्रपंचते ।

अविद्याप्रपंच पंचीकृत । सूक्ष्म गुणपंचभूत । गाढमूढ ते शून्य अवस्थेंत । अष्ट तत्वें पाहा ॥ १० ॥ अत्यंत नेणीव तमोगुण । गाढसुखस्थितीनें सत्व सुलीन । तेथें जगत्कारण रजोगुण । त्रिपंचकें स्फुरे ॥ ११ ॥ अविद्येंत शून्य तें गगन । अविद्येंत स्तब्धगुण पवन । अविद्येंत भासक हुताशन । थंड विस्मरण आप तें ॥१२॥ अविद्येंत अज्ञान पृथ्वी । अविद्या गुणसाम्या जाणावी । अविद्या कारण रूप स्वभावी । देहद्वयासि मूळ ॥ १३॥ अविद्येची निद्रा गाढमूढ । तैसी च विद्या होय स्वप्नारूढ । अवस्था चत्वार ही गूढ । द्रष्टा चतुर्विध ॥ १४ ॥ अवस्थासाक्षत्वें जाणें । आपल्या द्रष्टेपणासि नेणें । प्रत्यक्पणें ब्रह्मलक्षणें । तेणें तो प्रत्यगात्मा ॥ १५ ॥ कारणोपाधी ज्ञान ईश्वर । कार्योपाधि जीव अपस्मार । सर्वकर्ता चि अहंकार । देवत्रयरूपें ॥ १६ ॥ अविद्या महत्तत्वीं स्फुरे । महत्तत्वं स्वरूपें थावरे । अव्याकृत तें चि निर्धारें । कारण देह जीवाचें ॥ १७ ॥ गूढ त्रिगुणाची खाणी । क्षोभली अहंकारें करूनि । ब्रह्मा विष्णु शूलपाणि । व्यक्तीसि आले ॥ १८ ॥ मूळ अहंकार शक्तियुक्त । पंचवीस तत्वें प्रसवत । पंचतन्मात्रा समवेत । दृश्य विस्तारी ॥ १९ ॥

अव्यक्तान्महत् । महतो ऽहंकारः ॥
अहंकारात्पंचतन्मात्राणि । पंचतन्मात्रेभ्यो ऽखिलं जगत् ॥

तामसी द्रव्यशक्तीचें बळ । महाभूतसंभव स्थूळ । स्फूर्ति साळमाळ विशाळ । अवकाशरूपें ॥ २० ॥ नभीं चंचळ प्रभंजन । प्रभंजनीं सतेज दहन । दहनांत जीवन । मृदुपणें चि वसे ॥ २१ ॥ जीवनीं संभवली धरा । अविद्येंत प्रपंच उभारा । अव्यक्त व्यक्तीसि आलें त्वरा । तेंवि अभिप्राव तो ॥ २२ ॥ शब्द गगनीं स्पर्श पवनीं । रूप दहनीं रस जीवनीं । गंध तो पृथ्वीपासूनि । ऐसें विषयपंचक ॥ २३ ॥ राजस क्रीडाशक्तियुक्त । पंधरा तत्वें प्रसवत । श्रोत्र त्वचा चक्षू निभ्रांत । जिव्हा घ्राण तें ॥ २४ ॥ वाचा पाणि आणि चरण । गुद

शिश्न व्यान समान । उदान अपान प्राण । एवं प्रकारें ॥ २५ ॥ ज्ञान शक्तियोगें साचार । प्रसवे सात्विक अहंकार । अंतःकरण मन बुद्धि चत्वार । पांचवा अभिमान ॥२६॥ अहंकारत्रयजनितें । निपजलीं पंचवीस तत्वें । तयामाजि जाणिजे त्रिपुटीतें । ज्ञेय ज्ञाताज्ञातृत्व ॥२७॥ कर्ता कार्य आणि करण । भोक्ता भोग्य भोगणें जाण । साधक साध्य साधन । क्रियेसि येतसे ॥ २८ ॥ भोक्ता ते चि अंतःकरण । भोग्य इंद्रियें प्रवीण । भोगविषय तो संपूर्ण । पंच महाभूतें ॥ २९ ॥ येकेक भोक्ता येणें मूळें । येकेक साधकाचेनि बळें । प्रवेशे साधनानुमेळें । येकेक भूतीं ॥ ३० ॥ व्यानाश्रयें अंतःकरण । श्रोत्र इंद्रिय रंध्रें करून । याचेसह समर्पे पूर्ण । शब्दगुणें गगनीं ॥ ३१ ॥ समानसहवासें मन । त्वगेंद्रियासि आश्रयून । पाणींद्रियसह सुलीन । स्पर्शगुण पवनीं ॥ ३२ ॥ उदानावरोहणें बुद्धि । चक्षुरिंद्रियद्वारें त्रिशुद्धी । पदेंद्रियसह निरवधी । पावे रूप गुणें तेजीं ॥ ३३ ॥ चित्तप्राणसत्ता सवेगें । जिव्हेंद्रिय प्रवृत्तियोगें । शिश्न सहसा अनुरागें । मिळे रसगुणआपीं ॥ ३४ ॥ अहंकार तो अपानुयुक्त । घ्राणेंद्रियछिद्रें निघत । गुदेसह प्रवेशत । गंधगुण पृथ्वीतें ॥ ३५ ॥ भूतातें भूतें येणें प्रकारीं । विषयरूप अंशचत्वारीं । मिळता पंचवीस व्यापारीं । होती पंच महाभूतें ॥ ३६ ॥ तामसअहंकारजनित । पंचतन्मात्रा पंचभूत । त्यास्तव येथें चि समस्त । मिळालीं तत्वें ॥ ३७ ॥ अव्यक्त सूक्ष्म समस्त । महद्भूत अव्याकृत । पावले षष्टदशेआंत । परस्परानुमेळें ॥ ३८ ॥ पंचीकृत सूक्ष्माचें स्थूळ । निपजलें दृश्यजात सकळ । कर्ता ईश्वर अकळ । तेणें अभिनव केलें ॥ ३९ ॥ महाभूतें द्विविधा करूनि । मुख्य भागाचे हिरण्यगर्भ निर्मूनि । उरल्या अर्धभागाचें विस्तारूनि । ब्रह्मांड केलें ॥ ४० ॥ ईश्वराचें हिरण्यगर्भ शरीर । श्रोत्र दिशा त्वचा समीर । सूर्य चक्षू वरुण जिव्हासार । घ्राण अश्विनीदेव ॥ ४१ ॥ वन्हि वाचा पाणि इंद्र । शिश्न ब्रह्मा पायु उपेंद्र । गुद नैरृत्य प्राण सांद्र । चळे पंचधा ॥ ४२ ॥ विष्णु जाणिजे अंतःकरण । चंद्रमा हिरण्यगर्भी मन ।

बुध्दि विधि चित्त नारायण । रुद्र अहंकार जाणिजे ॥ ४३ ॥ पंचवीस तत्वें हें सूक्ष्म । संभवलें हिरण्यगर्भ परम । भोगसाधनाचें सम्र । येथें अपेक्षित स्थूळ ॥ ४४ ॥

॥ श्लोक ॥ पंचप्राणमनोबुध्दिदशेंद्रियसमन्वितं ।
अपंचीकृतभूतोत्थं सूक्ष्मांगं भोगसाधनं ॥ १ ॥

पंचीकृत महाभूतेंवीण । विराट नव्हे चि पां निर्माण । या कारणें पंचीकरण । केलें महतत्व अधिष्ठितें ॥ ४५ ॥ पंचधाकृत येकेक भूत । परंपरेतें समर्पिजेत । अपंचीकृतानें पंचीकृत । होय तें प्रमेय वेदांतीचें ॥ ४६ ॥ मुळीं पंचधा गगन। अंतःकरण व्यानें श्रवण । वाचा शब्द पैं जाण । वांटणी कैसी ॥ ४७ ॥ आकाशें ठेऊनि अंतःकरण । वायोसि दिधला व्यान । तेजास समर्पिलें श्रवण । वाचा आपीं शब्द पृथ्वीसी ॥ ४८ ॥ वायु पंचतत्वें प्रसवला । मन समान त्वचा जाला। पाणि स्पर्श बोलिला । एवंप्रकारें ॥ ४९ ॥ आपणासि ठेऊनि समान । मन केलें गगनार्पण । त्वचा तेजासि निवेदून । पाणि उदकीं समर्पिला ॥ ५० ॥ स्पर्श पृथ्वीसि दिधला । वायूचा विभाग ऐसा जाला । आतां तेज प्रसव जाला । एवंप्रकारें ॥ ५१ ॥ बुध्दि उदान नयन । चरण आणि रूप जाण । तेजें नयन ठेऊन । बुध्दि दिधली गगना ॥ ५२ ॥ पवनीं योजिला उदान । जीवनासि दिल्हे चरण । रूप तें पृथ्वीसि देऊन । तेज सरतें जालें ॥ ५३ ॥ आतां आपपंचकें जाण । चित्त प्राण जिव्हा शिश्न । घ्राण पांचवें संभऊन । उदार होय प्रदानीं ॥ ५४ ॥ शिश्न ठेऊनि आपणापासीं । चित्त नभीं प्राण-वायूसी । जिव्हा ते पृथ्वीयेसी । देऊनि कृतार्थ ॥ ५५ ॥ पृथ्वी-पंचधा अंशें जाण । अहंकार अपान आणि घ्राण । गुद गंध पंचकें पूर्ण । विभागासि आलीं ॥ ५६ ॥ गंध ठेऊनि आपणापासीं ।

१ सूक्ष्म शरीर, लिंगशरीर. २ सर्व शरीरांत संचार करणारा वायु. ३ एक वायु. या वायूंच्या कार्यांचा खुलासा याच दशांत पुढें ८ व्या समासांत ३७ व्या ओवी पासून केला आहे.

अहंकार नभीं अपान वायूसी । प्राण तेजीं गुद आपासी । देआनि स्थिर होय ॥ ५७ ॥ एवंप्रकारें[1] पंचीकृत । महाभूतकर्दमेंजात । गुण-कर्मधर्मेसहित । क्रियेसि आणिलें ॥ ५८ ॥ आकाशींचा तो शब्दगुण । कर्म सछिद्रता कर्मसंपूर्ण । होय अवकाश प्रधान । धर्म तयाचा ॥५९॥ वायूसि शब्द स्पर्श द्वंय गुण । कर्म तयाचें पै चळण । धर्म वाहकता संपूर्ण । वायूआंगीं ॥ ६० ॥ शब्द स्पर्श रूप जाण । हे तेजाचे तिनी गुण । उष्णत्व धर्म पचन । कर्म तयाचें ॥ ६१ ॥ शब्द स्पर्श रूप रस । हे चत्वारी गुण आपास । द्रवत्व धर्म विशेष । क्लेदन कर्म तयाचें ॥ ६२ ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध । पृथ्वी पंचगुणें प्रसिद्ध । कठिणत्व धर्म स्वतःसिद्ध । धारण कर्म तियेचें ॥ ६३ ॥ पंचभूतें यथान्वयें । आपणचि कारण कार्यें । त्यास्तव कारणीं जें आहे । तें कार्यीं वर्ते ॥ ६४ ॥ येकेक गुण येकेक भूतीं । करी मुख्यपणें चि वस्ति । आगांतुक गुण भूतांप्रति । कारणत्वें वर्ते ॥ ६५ ॥ शब्द आ-काशींचा गुण । तेणें सर्वत्र आईकती श्रवण । गगनापासूनि पवन । सो त्याहूनि येकागुणें आगळा ॥ ६६ ॥ श्रोत्रीं शब्दगुणें आइकवी । त्वचेसि स्पर्शगुणें स्पर्शवी । त्या वायूहूनि जाणावी । तेजीं सत्ता अधिक ॥ ६७ ॥ तेज कर्णातें आईकवित । तेज त्वचेतें स्पर्शवित । तेज चक्षूतें दाखवित । रूप बहुधा ॥ ६८ ॥ तेजीं निपजलें जीवन । तें येके गुणें अधिक त्याहून । श्रोत्रां आईकवी स्पर्शन । त्वचेतें करवी ॥ ६९ ॥ रूप दाखवी नेत्रासी । रस चाखवी जिव्हेसी । या चौगुणें विशेषीं । आप वरिष्ठ ॥ ७० ॥ पृथ्वी पंचगुणें ज्ञानेंद्रियासी । वेध होय विशेषी । पंचमहाभूतें हे ऐसी । सकळ गुण कर्म धर्म ॥ ७१ ॥ या महाभूतांचें प्रचंड । महाकंचुकी[2] ब्रह्मांड । ईश्वरें निर्मिलें नवखंड । भुवनत्रयीं ॥७२॥ ऐसीं ब्रह्मांडें अनंतकोटी । ब्रह्मस्फूर्तिमायेच्या पोटीं । ते प्रकृतिअधिष्ठित जगजेठी । महाविराट बोलिजे ॥ ७३ ॥ माया

---

१ चिखल, मिश्रण. २ सात आवरणानीं युक्त.

जया अवकाशी । तें विराटहृदय निश्चयेंसीं । प्रकृतीच्या कोटी आर्थ-तेसीं । तया उदरीं विस्तारें ॥ ७४ ॥ उत्पत्ति स्थिति लय लीळा । महा भौतिक ब्रह्मांडमाळा । विराटरोमरंध्रीं सकळा । सृष्टी सामावल्या ॥ ७५ ॥ ऐसा आदिपुरुष अखंड । ज्याचे उदरीं सृष्टी उदंड । तो आदिविराट प्रचंड । मनें कल्पवेना ॥ ७६ ॥ त्याच्यां उदरांतील वस्ति । अपार ब्रह्मांडांच्या पंक्ती । त्यांतील येक ब्रह्मांडाची स्थिति । विस्तारें पाहा ॥ ७७ ॥ वायूच्या मुसेसी संपूर्ण । तप्त जांबुनदवर्ण । पंच-भूतांचें सार संपूर्ण । संभवलें कैसें ॥ ७८ ॥ अखंडमंडळाकार । सप्त-कंचुकी कोश अपार । आकाश घेऊनियां प्रकार । रचना जाली ॥ ७९ ॥ हिरण्यगर्भ देवतामय । वस्तीसि स्वर्ग अभिनव होय । त्रिवि-क्रमाचें आलय । अधिष्ठान कैसें ॥ ८० ॥ तेंचि विस्तारनिरूपण । पुढिलिये उल्हासीं विराट संपूर्ण । श्रोतीं देऊनियां अवधान । अवधा-रिजे ॥ ८१ ॥ हें पंचीकरण भूळान्वयें । जयासि प्रांजळ होय । तो तत्वासि सारूनि स्वयें । पवाडे परब्रह्मीं ॥ ८२ ॥ त्यास्तव तत्वविवं-चना । करतळामळ व्हावी जाणा । याचि कारणें मूळ श्रवणा । अव-धान द्यावें सादर ॥ ८३ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हा-ळा । पंचीकरणयोग श्रवलीळा । ह्मणे मेरूअनंत ॥ ८४ ॥ अष्टम रुद्रे षष्ठ उल्हास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ तत्वज्ञानी । तत्वसृष्टीचा प्रका-शकमणी । तत्वात्मक अनुसंधानीं । तत्वता वस्तुरूप ॥ १ ॥ तत्वरूप विराटरचना । सविस्तरें आणिजे अनुसंधाना । प्रांजळ जालियां तत्वा-तीत ज्ञाना । अधिकारी होयिजे ॥ २ ॥ त्रिविक्रमाचें अधिष्ठान । सप्त-पाताळें विराटचरण । सातवें पाताळ पैं जाण । पदतळ तयाचें ॥ ३ ॥ प्रपद जाणिजे रसातळ । गुल्फद्वय तें महातळ । पोटरिया त-ळातळ । रसातळ जानुचक्रें ॥ ४ ॥ विराटाचे ऊरुयुगळ वितळ ।

---

१ पायाचा चवडा. २ पायाचा घोटा.

जंघप्रदेश तो अतळ । वृक्षवल्ली तृणादि सकळ । रोमावळी बोलिजे ॥ ५ ॥ नाडिचक्रें त्याचि सरिता । सप्तार्णव जाणिजे शोणितों । जाणिजे वडवानळ तत्वता । जठराग्नि प्रदीप्त ॥ ६ ॥ नाभीस्थान नभमंडळ । ज्योतिर्लोक वक्षस्थळ । महर्लोक कंठनाळ । तया विराटाचें ॥ ७ ॥ विराटवदन मृत्युलोक । ललाट बोलिजे तपोलोक । सत्यलोक तो चि मस्तक । विराट पुरुषाचा ॥ ८ ॥ करकमळयुगळ । जाणिजे इंद्रलोक केवळ । सूर्यमंडळ तेजकल्लोळ । नेत्र विराटाचे ॥ ९ ॥ दिशाचि विस्तीर्ण पोकळी । अधिष्ठित कर्णयुगळीं । कृतांतरूप दंतकवळी । स्नेह पुत्रकलत्र ॥ १० ॥ जिव्हा तो वरुण बोलिजे । शिश्न ब्रह्मा पैं जाणिजे । रेत जळवृष्टी सहजें । गुद निरैयलोक ॥ ११ ॥ जेंवि औदुंबरफळांतरीं । दाटल्या सूक्ष्मजंतूंच्या हारी । तेंवि जीवजात ब्रह्मांडोदरीं । असती अनेकविध ॥ १२ ॥ या भूगोलाच्या देशगुणें । पृथ्वीखर्पर विस्तीर्णपणें । जाणिजे तयाच्या दशगुणें । बहिरावरण जळ ॥ १३ ॥ जळाच्या दशगुण कृशान । निरंभ्र धडधडीत आवरण । तयाच्या दशगुणें प्रभंजनं । महाप्रबळ तो ॥ १४ ॥ वायूच्या दशगुणें विशाळ । असे अवकाशरूपें अंतराळ । नभाच्या दशगुणें प्रबळ । अहंकार जाणिजे ॥ १५ ॥ तया अहंकाराच्या दशगुणें । महत्तत्व सत्ता विद्यमानें । एवं हे सप्तावर्णे । येक ब्रह्मांड ॥ १६ ॥ ऐसीया ब्रह्मांडाच्या कोटी । होत जाती मायेच्या पोटीं । महाभौतिक तत्वसृष्टी । उभारली पाहा ॥ १७ ॥ विराटाची जाग्रती अवस्था । ते उत्पत्तीची कर्तव्यता । अभिमानी सृष्टीचा कर्ता । ब्रह्मदेव बोलिजे ॥ १८ ॥ अकारमात्रा प्रणवांत । तो हा स्थूळ प्रपंच समस्त । प्रथम चरण हा इत्थंभूत । प्रतिष्ठा रजोगुणें ॥ १९ ॥ स्थिति अवस्था परिपालन । कर्ता श्रीविष्णुभगवान । हिरण्यगर्भ उकारात्म जाण । सत्वगुणअभिमानी ॥ २० ॥ हा प्रणवाचा द्वितीय चरण । अव्याकृत देह कारण । रुद्र येथींचा अभिमान । मकार मात्रा

१ केसांच्या रांगा. २ रक्त. ३ नरक लोक. ४ रांगा. ५ दहापट. ६ येथून ब्रह्मांडाचीं सात अवतरणें कोणतीं तें सांगतात. ७ कृशानुअग्नि. ८ वायु.

बोलिजे ॥ २१ ॥ प्रणवाचा तृतीय चरण । तमोगुणें प्रतिष्ठा संपूर्ण । शबळ तत्पदार्थ संपूर्ण । एवंप्रकारें ॥ २२ ॥ प्रणवाचा चौथा चरण । अर्धमात्रात्मक ज्ञानघन । शुद्ध सत्वप्रतिष्ठा जाण । परमात्मरूपें ॥२३॥ विश्वस्फूर्तीचें निजघर । गुणभूत अष्टधा विवर । विश्वाचा आधार मनोहर । वास्तव्यरूपें ॥ २४ ॥ निवांत नित्य निजात्मरूपें । असतां माया क्षोभसंकल्पें । विस्तारली त्यामाजि निर्विकल्पें । प्रगटे बोधरूप ॥२५॥ जयाचे हृदयींचा ठाव । वसवी ब्रह्मांडाचे कटाव[1] । सुरनर असुर अभिनव । समुदाव जयाचा ॥ २६ ॥ लाघवी ईश्वर पाहा कैसा । करून वाजेगौरी[3] तमासा । क्षण न लगतां ब्रह्मांडाऐसा । पदार्थ दावी ॥ २७ ॥ महत्तत्वीं प्रगटे गगन । गगनीं व्यापूनि पवन । असे त्या पवनीं कारण । सूत्र प्रवृत्तीचें ॥ २८ ॥ चपळांग वायूच्या उसाळें । शब्द घटावत अंतराळें । मेघीं विद्युत्कडकडाट प्रबळे । प्रकाश घनरव तो ॥ २९ ॥ महद्भूत तेज तेजाचें । उघडलें भांडार प्रभेचें । गगन भरूनि विस्मयाचें । कारण करी पाहा ॥ ३० ॥ प्रकाशलें द्रवलें तें अभिनव । होये ईश्वरसत्तेनें घटाव । मुसावलें[4] वज्ररूप कटाव । ब्रह्मांड पाहा ॥ ३१ ॥ सुरस कडकडीत उकळी फुटे । माजि कृतांतस्वरूपें प्रगटे । फुगे आर्णवें[5] वायू नेटें । सप्तावरण होती ॥ ३२ ॥ रस उतत जाय जडता । आर्द्र आटोनि होय अपूर्वता । स्वर्ग मर्त्य पाताळ वस्तुता । कोशाकोशांतरें ॥ ३३ ॥ उन्नत निम्न[6] समान परी । पृथ्वीपरियंत भुवनकुसरी । समुद्र द्वीपें द्वीपांतरीं । स्थळोस्थळीं विचित्र ॥ ३४ ॥ वायु वन्हि जीवन धरा । अवकाशें विस्तारलें सैरा । उपजीविकेसि चराचरा । वस्तीसि स्थळ जाहलें ॥ ३५ ॥ वाटोळें कुकुटांडाकार[7] । माजि पन्नास कोटी विस्तार । दाटला ईश्वराचा संसार । गणवेल कवणा ॥ ३६ ॥ अध ऊर्ध्व दीर्घ विस्तीर्ण । समान सभोंवतें प्रमाण । चहूंकडून मध्य-

---

१ प्रकृति. २ कटाह, गोल. ३ जादू. ४ अस्तित्वांत आलें, मुशींतून बाहेर पडलें. ५ आर्णव, समुद्र. ६ खोल. ७ कोंबड्याच्या अंड्याच्या आकाराचें.

मान । मेरु प्रमाणीं वसे ॥ ३७ ॥ तया सुवर्णाद्रीचें अभ्यंतर । तेथूनि पन्नासें सहस्र । जंबुद्वीपाचा विस्तार । लवणाब्धिपर्यंत ॥ ३८ ॥ लवणाब्धि येक लक्ष । पुढें प्लक्षद्वीप दोनि लक्ष । त्याचे तीरीं इक्षुरसाब्धि द्वि लक्ष । योजन असे ॥३९॥ शाल्मलीद्वीप लक्ष चारी । सुरासिंधु त्याचि संख्येनें तीरीं । पुढें आठ लक्ष विस्तारीं । मनोरम कुशद्वीप ॥ ४० ॥ घृताचा सिंधु आठ लक्ष । पुढें क्रौंचद्वीप सोळा लक्ष । तया पुढें दधिसमुद्र प्रत्यक्ष । सोळा लक्ष योजनें ॥ ४१ ॥ शाकद्वीप परम सुंदर । बत्तीस लक्ष योजनें विस्तार । तयाचे प्रदेशीं क्षीरसागर । बत्तीस लक्ष योजन ॥ ४२ ॥ तया क्षीरसागरांत रमणीय । श्वेतद्वीप सुरत्नमय । साडे येकसाष्टि सहस्र होय । योजनें संख्येनें ॥ ४३ ॥ तेथें दिव्यद्रुमांचे आराम । दिव्य सरोवरें अमृतोपम । दिव्य वस्तुजात विश्राम । नांदे महाविष्णु ॥ ४४ ॥ दिव्यसुमनसेजेवरी । अष्टभुजलक्ष्मीसह शौरी । दिव्यउपचारें अभ्यंतरीं । स्वसुखेंचि नांदतसे ॥ ४५ ॥ त्या क्षीरनिधीचे पैलतीरीं । पुष्करद्वीप शोभा विस्तारी । मनोहर अपूर्व परी । चौसष्टि लक्ष योजनें ॥ ४६ ॥ पुष्करद्वीपा मध्यें सुशोभित । ज्योतिर्मय मानसोत्तम पर्वत । दशसहस्र योजनें रुंदीनें वेष्टित । तया द्वीपांतरासी ॥ ४७ ॥ तया पर्वतपाठारें । सूर्यरथाचें चक्र फिरे । रथाच, कणा मेरूसि निर्धारें । जडलासे फिरत ॥४८॥ नित्य सुवर्णाचल प्रदक्षणा । करीत सूर्य काळगणना । साडे नव कोटि योजना । क्रमीतसे प्रत्यहीं ॥४९॥ मानसोत्तम पर्वतीं जाणें । सौंदर्यसृष्टीचें ठेवणें । चतुष्कोनीं च्यारी पट्टणें । महा आश्चर्यें वसती ॥ ५० ॥ इंद्र यम वरुण कुबेर । विलासभुवनीं मनोहर । प्रीति अप्सरासह सुंदर । भोगप्रवृत्तीनें ॥ ५१ ॥ इंद्राचे भेटी सूर्य ये । तेव्हां सृष्टीसि सूर्योदय । यमाची भेटी सूर्यासि होये । दिवस मध्यान्ह तो ॥ ५२ ॥ सूर्य येतां वरुणभेटीसी । सायंकाळ होय सृष्टीसी । पावता कुबेरसभासी । मध्यरात्रि तेव्हां ॥ ५३ ॥ पुष्करद्वीपाचे सेवटीं ।

१ मेरुपर्वताचें. २ ही ब्रह्मांडरचना श्रीमद्भागवतांत दिल्याप्रमाणें आहे. ३ मद्याचा समुद्र. ४ कल्पवृक्षांचें. ५ बाग. ६ काळगणना होण्यासाठीं.

शुद्धोदकसिंधु घरटीं । चौसष्टि लक्ष पोटीं । संख्या तयाची ॥ ५४ ॥ पुढें वज्रभूमी सहा लक्ष । सुवर्णभूमी चौऱ्यासी लक्ष । त्यापुढें आणिखी सहा लक्ष । वज्राची भूमिका ॥ ५५ ॥ त्या पैलीकडे वळयांकित । प्रभाकल्लोळ चक्रवळीपर्वत । शेषफणापरि सुशोभित । शिखरें तयाचीं ॥ ५५ ॥ पाहतां अभिनव दिसे ऐसें । दुर्ग निर्मिलें त्या जगदीशें । अक्षोभ सप्तसमुद्रा ऐसे । परिघें केले सखोल ॥ ५७ ॥ चक्रावळिपर्वत प्रकार । पन्नास लक्ष पन्नास हजार । बाह्य प्राकार मनोहर । शेषपैर्णचरियेनें ॥ ५८ ॥ अष्ट दिग्गज त्या वेष्टित । महामस्तीचे बलोन्मत्त । दिग्विजय वामन ऐरावत । पुंडरीक चौथा ॥ ५९ ॥ सार्वभौम विश्वदंत । सुप्रतीक कुमुद्वत । हे आठही तो पर्वत । आवरूनि असती ॥ ६० ॥ चक्रावळी पर्वतावरी जाण । गदाधर नारायण । अनुदिनीं गदा घेऊन । विश्वसंरक्षणार्थ फिरे ॥ ६१ ॥ तेथें सूर्यप्रकाश कांहीं नसे । निरंतर रात्रीमान असे । म्हणऊनि घरटी घालितसे । विश्वकुटुंबी तो ॥ ६२ ॥ तया पर्वताच्या ऐलीकडे । लोक वसती सूर्यउजेडें । जाण तयाहूनि पैलीकडे । वसे तम सप्तकोटि ॥ ६३ ॥ त्या गेंडदाचिये सेवटीं । घनोदक चौदा कोटी । मेरुपासूनि खर्परनिकटीं । जाल्या कोटि पंचवीस ॥ ६४ ॥ याचिपरी दुसरिये कडे । पंचवीस कोटि निवाडे । मिळोन पन्नास कोटि निवाडे । संख्या ब्रह्मांडकोशीं ॥ ६५ ॥ तया घनोदकीं जाण । ब्रह्मांडखर्परा लागून । हेमाब्जैमय अनंतासन । तरे कमळपत्रा ऐसें ॥ ६६ ॥ चौदा सहस्र त्याची रुंदी । ब्रह्मांडांतर कटिबंदी । तया कमळासनीं स्मरण स्वछंदीं । स्वानंदघन विष्णु वसे ॥ ६७ ॥ कनकपुष्पा ऐसी लीळा । ब्रह्मांडमध्यभागीं पिवळा । हेमाद्रिस्तंभ वाटोळा । सोळा सहस्र योजनें रुंदी ॥ ६८ ॥ भूगर्भी सहस्र सोळा । चौऱ्यासी लक्ष उंचीनें लीळा । पाठार संख्येनें प्रकाशला । बत्तीस सहस्रयोजनें ॥ ६९ ॥ त्या पाठारीं पूर्वदिशेप्रति । वसे इंद्राची अमरावती । परम रमणीय

१ फेरा, वेष्टण. २ परिखा, खंदक इत्यादि. ३ शेषाच्या फणांच्या स्वरूपाचें. ४ अंधाराचें. ५ सोन्याच्या कमळाचें.

वसती । संख्यार्धद्वय सहस्र ॥ ७० ॥ तैसीच अग्निदिशेप्रति । देदिप्य वसे तेजावती । मेषवाहन स्वाहास्वधापती । नांदे इंद्रसम ऐश्वर्ये ॥७१॥ तैसीच दक्षणदिशांतरीं । यमाची संयमनी नगरी । शामळीपति दंडायुध करीं । इंद्रसम ऐश्वर्ये ॥ ७२ ॥ नैऋत्यदिशेप्रति । नरवहन तपस्विनीपति । त्या नैऋत्याची लवणावती । महा ऐश्वर्यें वसे ॥ ७३ ॥ तेंवींच पश्चिमदिशेसि जाण । जान्हवीपति मकरवाहन । वरुणाचें विघाळि पट्टण । परम ऐश्वर्ययुक्त ॥ ७४ ॥ तेंवीचि वायव्यदिशेसि जाण । भारथीपति मृगवाहन । वायूची गंधावती संपूर्ण । शोभेची गरिमा ॥७५॥ तेंवीचि उत्तरादिशेप्रति । पुष्पकवाहन श्रद्धाहणीपति । कुबेरवस्तीची अळकावती । मनोहर रचना ॥ ७६ ॥ तैसाचि ईशान्य दिशेप्रति । नंदीवाहन उमापति । त्या ईशान्याची यशोवती । निरुपम सौंदर्यें ॥ ७७ ॥ ब्रह्मांडसभेचा विस्तार । ब्रह्मलोक मनोहर । दशसहस्र विमानाकार । रचना तेथिंची ॥ ७८ ॥ सत्यलोकीं सत्य मूर्तिमंत । दया शांति असे वर्तत । छाया वनवस्ती अद्भुत । मनोहर स्थळें ॥ ७९ ॥ अपार सुकृतें जया जवळी । तेणें क्षणमात्र वसावें तये स्थळीं । अभिनव सुखाची नव्हाळी । क्षणात कल्पकोटि गमे ॥ ८० ॥ मेरुसभोंवता विस्तार । दिव्य नैामाथिले गिरिवर । दिव्य नवखंडें मनोहर । वसती क्रमें ॥ ८१ ॥ येकेक समुद्रांतरीं । वसती द्वीपें नृपविस्तारीं । नद्या पर्वत नानापरी । तेथिंची रचना ॥ ८२ ॥ ते जाण खंडारकर्पति । तयाची विख्यात संपत्ति । दशक अधिकावे असती । शतसंख्येनें समुद्रीं ॥ ८३ ॥ मेरुपूर्वदिशेकडीलें प्रात । दशसहस्र मंदरपर्वत । जटदेवी कुळपर्वत३। तितुकीच योजनसंख्या ॥ ८४ ॥ मंदराचळीं परम गहन । शोभायमान नंदनवन । इक्षुरससरोवर पूर्ण । सुवर्णतरुवेष्टित ॥ ८५ ॥ तेथें सहस्रयोजन विस्तार । येक आम्रवृक्ष मनोहर । तयाचीं फळें शिखराकार । सुवर्णात्मक परिपक्वें ॥ ८६ ॥ परिपक्व फळें तीं पडोनी ।

---

१ अग्नि, स्वाहा आणि स्वधा अशा अग्नीच्या दोन स्त्रिया कल्पिल्या आहेत. २ यमाच्या स्त्रीचें नांव श्यामला. ३ नांवें असलेले. ४ (?).

वाहे सुवर्णरसवाहिनी । ते अरुणनदी उसळोनि । इळावर्तखंडीं रिघे ॥ ८७ ॥ रिचवे मंदराचळाहून । जैंवि विद्युत्प्रभा वाहे जीवन । ना ते तप्त जांबूनद उसळोन । भरे इळावर्तमुसेसीं ॥ ८८ ॥ अष्ट दिशा, अष्टमूर्ति । याच्या अभिनव उपवस्ति । इंद्राची सम संपत्ती । उपवनशोभा ॥ ८९ ॥ रत्नसानु अग्रशिखर । तेथूनि पाहातां ऊर्ध्व खर्पर । मध्य अवकाशीं अगोचर । येकवीस स्वर्गें असती ॥ ९० ॥ अमोघशक्ति दिव्यास्त्रें । तया येकांतस्थळीं विष्णूचीं शस्त्रें । दिव्य वनें सुगात्रें । सुवर्णहंस तेथ ॥ ९१ ॥ स्वर्गगाचक्रविभवें । वायु आश्रय वाहे अभिनवें । येके विसावे स्वर्गीं रिचवे । तेथ नित्य प्रातस्नाई ऋषी ॥ ९२ ॥ येकवीस सर्गांचा कळस । शुंशुमारें कवळिला बहुवस । ब्रह्मांडतळीं वळें विशेष । कूर्में आवरिला ॥ ९३ ॥ तऱ्हीं येकीकडे कलथेला । तो वाराहदंष्ट्रनें धरिला । शेषें सहस्रफणें आवरिला । ब्रह्मगोळ तो ॥ ९४ ॥ हा विराटरचनेचा विस्तार । दशमस्कंद भागवतीं अपार । तैसाचि विष्णुपुराणीं साचार । बोलिला तृतियाध्याईं ॥ ९५ ॥ ज्योतिषशास्त्र भूगोळ । प्रकार बोलिला प्रांजळ । कांहीं भेद दिसे परि निवळ । दृष्टीनें पाहावा ॥ ९६ ॥ हें शास्त्रदृष्टी परम । भूगोळरचना निरुपम । आह्मी गुरुकृपेनें निभ्रम । पाहिली डोळां ॥ ९७ ॥ वसलियां कुग्रामांतरीं । कैसी दिसेल काशीनगरी । तयासि न दिसे ते पृथ्वीवरी । काय अभाव तियेचा ॥ ९८ ॥ नित्य वाराणसींत वसती । तयासि ते रचनेची न पडे भ्रांती । तेंवि पूर्वापर शास्त्रस्थिति । वर्तूनि आह्मी रूढी ॥ ९९ ॥ नारदादि ऋषेश्वर । ज्यांचा त्रिभुवनीं संचार । महाप्रस्थानीं शास्त्रकार । तेणेंचि रूढले ॥ १०० ॥ संक्षेपयुक्तीनें साचार । निरूपिला विराटविस्तार । सबळ तत्पदार्थ संसार । हा ईश्वराचा ॥ १ ॥ आतां पुढील निरूपण । सबळत्वं-पदार्थ-विवरण । शुध त्वंपदार्थ निव-

---

१ वाहते. २ मेरु. ३ प्रातःस्नान करणारे. ४ शिशुमारें, मगरानें. ५ ही ब्रह्मांडरचना प्रत्यक्ष पाहिली असें मेरस्वामी ह्मणतात, तर हें खरें की खोटें ? याचा कांहीं अध्यात्मपर अर्थ करावा काय ?

ळोन । अवधारिजे श्रोतीं ॥ २ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । भूगोळरचनास्वलीळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ३ ॥ अष्टमरुद्रे सप्तम उल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामसमर्थ ॥ श्रीरामसमर्थ प्रबोधार्थ । निवळला सबळ तत्पदार्थ । कृपेनें अशुद्ध त्वंपदार्थ । एव निरोपिला ॥ १ ॥ तत्पदार्थ तो जाण ईश्वर । त्वंपदार्थ जीव अहंकार । शुद्ध त्वंपदार्थ सार । जीवशिव केसे ॥ २ ॥ ब्रह्म स्वतःसिद्ध निरुपाधि । माया हे ईश्वरोपाधि । ईशात्तव उपलब्धि । जीवासी ब्रह्मत्वें ॥ ३ ॥ ब्रह्मीं मायेचें सकट नसे । त्यासि उपदेश साकडें कायसें । भवबंधन आपैसें । तोडिजे ईश्वर ॥ ४ ॥ स्वरूपज्ञानी तो ईश्वर । स्वयंबोधेंप्रभाकर । योगऐश्वर्ये परात्पर । सच्चित्सुखतनु ॥ ५ ॥ परमात्मा पुरातन स्वयें । सर्वात्मा सर्वहृदय । तो आदिपुरुष स्वप्रकाशमय । परेश भगवान ॥ ६ ॥ सर्वज्ञ विश्वेश विश्वकुक्षी । सर्वदा विश्वासी परिक्षी । स्वसुखात्मबोधें सरक्षी । आदिगुरु सकळां ॥ ७ ॥ महाविष्णु निजलाघवी । नाहीं तें ब्रह्मकटाह दावी । परि चमत्कारें चि लपवी । जेथिच्या तेथें ॥ ८ ॥ जो [3]आइके श्रवणेंबीण[4] देखे तैसा चि चक्षुविहीन । रसनेवीण रस चाखे संपूर्ण । चरणेंवीण चाले ॥ ९ ॥ तो समीप ना अतिदूरि । शरीरविना व्यापार करी । वदनेंवीण गगनभरी । भरणी अक्षरांची ॥ १० ॥ स्मरणरूप सर्व शरीरीं । सर्व व्याप्तीचें रूप करी । ज्ञानविग्रहविचारीं । प्रवर्तवीं जीवा ॥ ११ ॥ त्याचें मायिक अवतरणें । परि सत्याचें होय करणें । जडजीवासी होय उद्धरणें । अवतारलीला ॥ १२ ॥ आत्मसोय न टाकिता जनीं । धरी अवताराची भरणी । नानाप्रसंगीं उद्धरणी । उद्धरीतसे जीवा ॥ १३ ॥ भक्तीचेनि भारोळेपणें । भक्तासि स्वरूपकैवल्य देणें । परमात्मा कृपाळुपणें । निजरूपबोध करी ॥ १४ ॥ इच्छाशक्ति

---

१ आत्मज्ञानानें प्रकाशणारा सूर्य २ मायाश्री ३ अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः । ( ३/१९ ) या श्वेताश्वतरोपनिषदाचा अनुवाद येथें केला आहे ४ दूरात्सुदूरे तदिहान्तिके च । मुंडकोपनिषत् ३,१,७ ५ आपलें खरें स्वरूप ६ उपकाराच्या भारामुळे

चक्रनियंता । सर्गस्थित्यंत सृष्टिकर्ता । षड्गुणऐश्वर्यसंपन्नता । जीवासि संपन्न करी ॥ १५ ॥ जीव अविद्याभ्रमें भूलला । विषयकाम कर्में गुंडाळला । नाना सुखदुःखें जाकळला । आत्मज्ञानेंवीण ॥ १६ ॥ बुडतां भवाब्धीं दुस्तरी । ईश्वरीं तारिजेत स्वकरीं । अज्ञाननिद्रा चेवउनि निर्धारीं । निजजाग्रतीसि आणावा ॥ १७ ॥ अविद्याबंधनें छटिकें चि । परि जीवासि जाले साच चि । ईश्वरें कृपा करूनि मुळिचि । नित्यमुक्तता द्यावी ॥ १८ ॥ नाहीं त्या अज्ञानें गोविला । त्यासि मुक्त करावयासि धांवोनि आला । तो स्वरूपजनक कळवळिला । हृदयस्थ अंतरींचा ॥ १९ ॥ या जीवाचा अधिष्ठाता । तो सत्यसंकल्प चि तत्वता । सद्गुरुरूप ज्ञानसत्ता । निज ऐश्वर्यें प्रगटे ॥ २० ॥ तो चि भवानुसंधानुलेशें । किंचित्स्वरूपज्ञानीं उमसे । तेणें अज्ञानशक्तिकल्मषें । जालीं अंतःकरणें ॥ २१ ॥ आत्माज्ञानघन प्रभाकर । निघोंट बिंब निर्विकार । अविद्याजळीं विकार । अनेक बिंबें बिंबला ॥ २२ ॥ हें अज्ञानदृष्टीचें देखणें । साच आत्म्यासि नसे चि जाणें । रज्जुविपर्ईक अज्ञानें । केला भवभुजंग ॥ २३ ॥ अज्ञानी अन्यथा ज्ञान । त्यासि ज्ञान चि अधिष्ठान । जडासी नाहीं स्वतंत्रपण । भासासि आणिलें ज्ञानें ॥ २४ ॥ अग्नीपासूनि धूम्र जाला । तेणें अग्नि अवरोधिला । तेंवि अज्ञानें निरोध केला । परिशुध्द ज्ञानासी ॥ २५ ॥ सूर्यरश्मिं मेघ जाले । तेहीं सूर्यासि आच्छादिलें । परि दिवसमान चाळिलें । लोप न करितां ॥ २६ ॥ अज्ञानें आत्म्यासि अवरोधिलें । परि साक्षत्व नाहीं तयाचें गेलें । माझें अंतःकरण या चि बोलें । अज्ञानीं साक्षी वेगळा ॥ २७ ॥ अविद्या अज्ञान आवरण । दुजें विक्षेप विपरीत ज्ञान । येणें चि जीवासि पतन । उभयशक्तियोगें ॥ २८ ॥ अविद्या अष्टपुरी प्रवेश । करी परी शुध्द निर्दोष । पुरुष निजांगें ब्रह्मांश । बोलिला निश्चियेसीं ॥ २९ ॥ ब्रह्म तें शुद्ध बुद्ध निर्मळ । ब्रह्म विवर्त

१ आकळला, जखडला. २ बुडतांत नसलेल्या, खोट्या. ३ सूर्याच्या किरणांनी.

गृहीतव्य अधिभूत जाण । [illegible] सकळ । अविद्यायोगें अधिदैवत तेथें औपाधिक [illegible] स्वरूपीं अज्ञान । हें चि जीवाचें देहकारण । कारण [illegible] त्रिविक्रम अन्यथा ज्ञान । वासनात्मक तें ॥ ३१ ॥ अनेक अंतःकरणदर्पणें । सोहंचित्सूर्यबिंब तेणें । चिदाभास जीव विकृतीनें । आकृतीसि ये अनेक ॥ ३२ ॥ मुळीं निर्विषय स्फुरण । जाणिजे तें अंतःकरण । अंतःकरणीं स्फुरलें मन । संकल्प विकल्पें ॥ ३३ ॥ पदार्थस्फूर्तीचें प्रमाण । करी ते निश्चयात्मक बुद्धि जाण । त्या निश्चयाचें अनुचिंतन । करी तें चित्त जाणिजे ॥ ३४ ॥ स्फूर्तीचा जो अभिप्राव । आंगें आक्रमे क्रिया अभिनव । तो चि तो अहंभाव । निश्चयेंसीं ॥ ३५ ॥ प्रकृतिपुरुष सप्रयोग । संभवे करणपंचक सांग । आगीं चपळ स्फूर्तिचा वेग । पंचप्राण जाले ॥ ३६ ॥ सर्वांगातें असे व्यापून । भुक्तरस दं सदीपन करूनि । राहे सर्व नाडी पुरऊनि । व्यान त्यातें बोलिजे ॥ ३७ ॥ सवेग संधीसि प्रवेशोनि । करचरणादि संचरणीं । समान तो नाभीसि बसोनि । राहे निरंतर ॥ ३८ ॥ विषयें छाया प्रवर्तऊनि । नाना विकृति दावि स्वप्नीं । तो चि उदान कंठस्थानीं । असे महाशक्तिवंत ॥ ३९ ॥ ज्याचें अधोगति चळण । करी मळमूत्र विसर्जन । गुदस्थानीं वसे अपान । मूळशक्तीनें ॥ ४० ॥ श्वासोश्वासें संचरणें । करी क्षुधातृषादि आचरण । तो नासापुटीं वसे प्राण । चपळत्वें देहीं ॥ ४१ ॥ श्रोतव्यस्वभावें संपन्न । शब्दोन्मुख अंतःकरण । श्रवणरंध्रीं बैसोन । शब्दासि परिसे ॥ ४२ ॥ स्पर्शविषयातें जाणोनि । त्वचा ते सर्वांग व्यापूनि । मानसीकवृत्ति सुचिन्हीं । स्पर्श घेतसे ॥ ४३ ॥ बुद्धि तत्वता निर्धारें । रूपग्रहण चमत्कारें । कृष्णतारांमध्यवर्ती निर्भरें । चक्षुस्थानीं रूप पाहे ॥ ४४ ॥ रसनास्थानीं विलासें । चित्तवृत्ति रससीरसें । रसग्रहण करीतसे । जिव्हारूप ॥ ४५ ॥ अह सुवासिक सुमनी । घ्राणवसंत उपवनीं । तत्पर होऊनि अवघ्रहणीं । नासापुटें सुगंध घे ॥ ४६ ॥ शब्द बोलों इच्छी स्वभावें । वागेंद्रिय मुखोक्तिविभवें ।

१ डोळ्याच्या बाहुलीच्या टोकावर राहणारी.

चक्रनियंता । [illegible] प्रसवे । वाचा मातृका षड्गुणऐश्वर्यसंपन्नता । जीवासि [illegible] [illegible] ग्रहणक्रिया करांची । नाना व्यापार। [illegible] । पा-णींद्रियें जाणें ॥४८॥ संक्रमणोद्देश सवेगता । गमनोन्मुख तत्वता । चेष्टवी बुधिची वृत्तिसत्ता । चरणेंद्रियें ते ॥ ४९ ॥ आत्मारामाची आत्मरति । भोगी चिच्छक्तिसीतासती । स्वानंद निपजे मदनस्थिति । ते चि विश्वकामकारण ॥ ५० ॥ अहंबीज विषयांकुरित । क्रिया मळोत्सर्गा आणीत । तें चि गुदस्थान निश्चित । पायु इंद्रिय बोलिजे ॥५१॥ अंतःकरण पंचवृत्ति । शब्दादि विषय स्फुरति । ते वासनात्मकीं जाणिजेती । पंच विषय ॥५२॥ पंचवीस तत्वाचें एवं हें । जिवाचें लिंगशरीर पाहे । येथीचें अधिदैवत निश्चयें । जाणिजे हिरण्यगर्भ ॥ ५३ ॥ इंद्रियें जें ईश्वराचीं । तें आधिदैवतें जिवांचीं । आतां आधिभूतें तें चि । जाणिजे अध्यात्मिक ॥ ५४ ॥ पाहा अध्यात्म अंतःकरण । अधिभूत निर्विकल्प स्फुरण । अधिदैवत तें जाण । विष्णु तेथींचा ॥ ५५ ॥ अध्यात्म पाहा मन । अधिभूत संकल्प पूर्ण । चंद्रमा तेथिचें जाण । अधिदैवत ॥ ५६ ॥ अध्यात्म बोलिजे बुधि । निश्चितव्य अधिभूतसिद्धि । अधिदैवत त्रिशुध्दी । विधाता तेथिचा ॥ ५७ ॥ चित्त अध्यात्म बोलिजे । चेतव्य अधिभूत सहजें । अधिदैवत तें जाणिजे । नारायण ॥ ५८ ॥ अध्यात्म तो अहंकार । अधिभूत अहंस्फूर्ति अपार । अधिदैवत निर्धार । रुद्र तेथिचा ॥ ५९ ॥ श्रवण अध्यात्म जाण । अधिभूत श्रोतव्य पूर्ण । अधिदैवत प्रमाण । दिशा यथार्थ अष्ट ॥ ६० ॥ त्वचा अध्यात्म जाण । स्पर्शत्व अधिभूत पूर्ण । अधिदैवत पवन । बोलिजे तेथें ॥६१॥ स्वभावें अध्यात्म नयन । अधिभूत अवलोकन । अधिदैवत प्रकाशघन । सूर्य तेथिचा ॥ ६२ ॥ जिव्हा अध्यात्म विख्यात । रसग्रहण अधिभूत । वरुण तें अधिदैवत । बोलिजे शास्त्रीं ॥ ६३ ॥ अध्यात्मघ्राण निश्चित । घ्राणीतव्य अधिभूत । अश्विनी देव अधिदैवत । निश्चयेंसीं ॥ ६४ ॥ वाचा अध्यात्म प्रख्यात । वक्तव्य तें चि अधिभूत । हुताशन अधिदैवत । सम्प्रचीतीनें ॥ ६५ ॥ पाणींद्रिय अध्यात्मपूर्ण ।

गृहीतव्य अधिभूत जाण । सुरेंद्र तो चि प्रमाण । अधिदैवत तेथें ॥ ६६ ॥ चरणेंद्रिय अध्यात्म जेथें । गंतव्य अधिभूत तेथें । त्रिविक्रम अधिदैवत । तेथें बोलिजे ॥ ६७ ॥ अध्यात्म जेथें शिश्न । सुखैतव्य अधिभूत जाण । स्रष्टा अधिदैवत पूर्ण । बोलिजे तेथें ॥ ६८ ॥ पायु अध्यात्म निश्चित । विसर्गतव्य अधिभूत तेथें । नैर्ऋत्य तें अधिदैवत । बोलिजे असें ॥ ६९ ॥ अध्यात्म जेथें अज्ञान । अधिभूत विकृति पूर्ण । पुरुषत्व तेथिचें जाण । अधिदैवत ॥ ७० ॥ जडत्व कारण प्राणासी । तें चि तें विषयपंचकासी । त्यास्तव अध्यात्मक त्यासी । विभाग नसे ॥ ७१ ॥ लिंगशरीर अष्टपूर । अविद्या काम कर्म त्रिपुर । अंत:करण-पंचक निर्धार । पुर चौथें तें ॥ ७२ ॥ ज्ञानेंद्रिय पुर पंचम । कर्मेंद्रिय जाण षष्ठम । पंचप्राण तें सप्तम । अष्टम विषयपंचक ॥ ७३ ॥ एवं हें वासनात्मक शरीर । ज्ञानाग्नें होय संव्हार । तो ज्ञानद्रष्टा परात्पर । निर्वाणज्ञानी ॥ ७४ ॥ सकळ तत्वातें प्रकाशून । असे सूक्ष्मीं ज्ञान-घन । स्थूळशरीरीं विद्यमान । घटस्थ दीप जैसा ॥ ७५ ॥ बीज भू-मींत आच्छादिलें । जेंवि वासनात्मक स्थूळीं धारलें । तेंवि प्रत्यक्षाकार अंकुरलें । सुखसुमनफळीं ॥ ७६ ॥ ते स्थूळोत्पत्तीचा विचार । देऊनि अवधान तत्वसार । अवधारिजे जीवाचा संसार । चतुर्विध प्रकारें ॥ ७७ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । जीवशिव-स्वभावतत्वमाळा । ह्मणे मेरूअनंत ॥ ७८ ॥ अष्टमरुद्रे अष्टम उल्लास संपूर्ण ॥ ॥ ७ ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीराम समर्थ नरोत्तम । सत्यसंकल्प कल्प-द्रुम । फळला मूळशाखान्वयें परम । विश्वाकारें ॥ १ ॥ जेंवि तंतूसि वेष्टिले मणी । तंतु पुरोनी उरला अग्रणी । गुणगण सगुण विद्यमानी । मुळपुरुष हा ॥ २ विश्वप्रकाशगभस्ति । अनेकजळवासनावृत्ती । बिंबो-

१ विश्वाला चैतन्यप्रकाश देणारा एकटाच परब्रह्मरूपी सूर्य भिन्न वासनारूप जलांत प्रतिबिंबित झाल्यामुळें अनेक वाटूं लागला.

निया प्रतिबिंबस्थिती । जाहला अनेक ॥ ३ ॥ कारण हे स्थूळव्यक्ति । पांचभूतिक जगती । विस्तारली विख्याती । चौखाणीप्रकारें ॥ ४ ॥ जैसा येक मंडप विस्तीर्ण । त्यांतील रचना विश्व संपूर्ण । तेवि ब्रह्मांडी हा चि प्रगटोन । सामावला ॥ ५ ॥ पर्वत नद्या सरोवर । नौ खंडें पृथ्वी विस्तारे । सप्त सागर भूमिपैसारें । नाना रचना ॥ ६ ॥ गुल्में लता वृक्ष नाना । नाना देश भुवनें गणवेना । दृश्य बहु जिनस जाणा । ब्रह्मांडीचे पदार्थ ॥ ७ ॥ पिंड त्यांतील एक पदार्थ । जाण देहोत्पत्ति निश्चितार्थ । स्थिति प्रतिष्ठा निदानार्थ । विवंचूनि राहावें ॥ ८ ॥ मुळ विधात्यापासूनि । जाले चतुर्दश विधाते जनीं । लक्ष चौऱ्यासी विस्तारूनि । तिंही निर्मिले पिंड ॥ ९ ॥ सकळ आकृतितें सजूनि । पाहातां आदि विधाता विवंचूनि । जाला विस्मित अंतःकरणीं । देह सज्ञान येक ही नसे ॥ १० ॥ तेव्हां आपुलें स्वरूप प्रार्थून । केलें प्रत्यक्ष दृष्टीस प्रमाण । त्याचीच प्रतिमा पूर्ण । निर्मिली नैराकृती ॥ ११ ॥ तो हा नरदेह सुलक्षण । निर्मिला ईश्वरें ज्ञानसंपन्न । त्यास्तव नर तोचि नारायण । ऐसें ह्मणती ॥ १२ ॥ नरदेहीं ज्ञान परम । निज प्रतिष्ठी पुरुषोत्तम । शरीरसंभवासि काम । कैसा जाला ॥ १३ ॥ सबीज वासनासंस्कारें । प्रकृतिपुरुषनिर्धारें । रतिस्वसुखचमत्कारें । भिन्न आवेव करी ॥ १४ ॥ विषयसुखें चि अभिनव । नरनारीरूप स्वभाव । मूळ काम बीजसंभव । प्रीतीसी आणिले ॥ १५ प्रीतीपासीं त्या परस्परें । गोवुनिया दुखसंस्कारें । लक्षचौऱ्यासी विस्तारें । सोंगें धरिती ॥ १६ ॥ कामसबंध शरीरें । मोहित त्रिजग पंचशरें । कामिणी कटाक्षविकारें । विकृतीसि आणिले ॥ १७ ॥ उन्मादें जेविं अनुडुव्त्र । येक गौवरि संदर्यविहीन । प्रमादमत्सरें प्रमाण । टाकूनि रति वर्धविली ॥ १८ ॥

---

१ क्षुद्रप. २ चौदा प्रजापति. ३ मनुष्याच्या मूळ उत्पत्ती सबंधानें ख्रिस्ती लोकांच्या बायबलांत हि असें च ह्मटलें आहे. परमेश्वरानें आपली प्रतिमा ह्मणून मनुष्य निर्माण केला. ४ मत्त झालेले. ५ बैल. ६ पुष्कळ.

अतिशयें काम क्रोध जाण । सर्वदा कामिणीचिंतन । हरिणीपदमात्रेंण । धर्मणा मोहित जगत् ॥ १९ ॥ तेथें आचारवृध पुरुषीं । विवाहनेम केला रतिसि । तेणें मिताश्रमें जगतीसी । प्रमाण चालिलें ॥२०॥ स्वस्त्रियेसी युक्त रति । होय अवचट गर्भ धरिती । उत्पत्तिस्थितीनें जगति । कर्मसंस्कार केला ॥२१॥ मृत जीव वासनात्मक । असती स्वर्गीं नभीं अनेक । मर्त्यलोकीं पैशाच्यक । सचरती किती ॥ २२ ॥ वासना उत्पत्तीसि कारण । जळीं स्थळीं पदार्थ राहोन । अन्नोदकयोगें करून । पुरुष उदरा येती ॥२३॥ नक्षत्रपात्र जगती । धान्यउदकीं क्रीडती । ते पुरुषउदरीं वर्धती । मासत्रय ॥२४॥ मासत्रय उदक वीर्य होय । ते कामिणीसगें सुरतविभ्रमेंं । रिघोनि कमळकोशीं आश्रियें । रक्तशुक्लसमिश्र ॥ २५ ॥ पित्याचें वीर्य मातेचें शोणित । समान होता नपुसक होत । अधिकवीर्यें नरसभवत । शोणिताधिकें वनिता ॥ २६ ॥ बुद्बुदाकार तिये स्थानीं । पक्षा येका फेनें मुसावोनी । अडाकारें तें गोठूनि । वाढे दिवसेंदिवस ॥२७॥ अन्नोदकरसें वृद्धि तया । गर्भी रूढे मासद्वया । वासनाक्षुधित क्षोभोनिया । मातेसि पीडा करी ॥ २८ ॥ जैसें पिश्याच लागलें । विकार करी वासनामुळें । उठवी मातेसि डोहळें । आहार अपेक्षी ॥ २९ ॥ आम्ल तीक्ष्ण नाना रस । गर्भगोळ इछा बहूंस । डोहळे पुरवितां प्रीतीस । गर्भ वृद्धीतें पावे ॥ ३० ॥ मासत्रयीं जठराग्नीत । पक्क होऊनि दाढर्या येत । मूळ कदासि त्या पायें हात । अकुर फुटति ॥ ३१ ॥ मुख नासिक सुरेखता । चिन्हें बाणती सर्वेगता । चतुर्थ पचम मासीं अवेचता । षण्मासीं नखे केस ते ॥ ३२ ॥ षष्ट सप्तमी

---

१ स्त्रीचे ठिकाणीं रम्य हा शब्द मात्र आहे वस्तुत ती कातड्याची पिशवी असून तीवर सर्व जग मोहित झालें आहे २ ठरून गेले आहेत आश्रमाचे प्रकार जीं अशा ३ हें वर्णन गर्भोपनिषदाच आधारें केलें आहे ' पितू रेतोऽतिरेकात्पुरुषो मातूरेतोऽतिरेकात्स्त्री उभयोर्बीजतुल्यत्वान्नपुसको भवति ' ४ एका पक्षानें, पघरवण्यान ५ फार ६ उत्पन्न होऊन ७ बहुधस, नाना प्रकारची ८ ' मास त्रयेण पादप्रदशो भवति ' गर्भोप०

चक्षुप्रकाश । परि डोळे झांकोनि मानस । पूर्वजन्मांतरतमस । आठऊनि स्फुंदे ॥ ३३ ॥ नरकीं दुःख जाणवे तया । अष्ट नवमीं संपूर्णकाया । प्रसववेदनेनें तिया । मातेसि दुःख होय ॥ ३४ ॥ गर्भी अधोमुखं सांकडी । प्रसवकाळ बळेंचि ओढी । प्राणांत ते दुःखप्रौढी । सांगवे चि ना मुखें ॥ ३५ ॥ प्रसवजन्मीं च मरण । मरणांत दुःखें संभवोन । करिती जातक निर्माण । ज्योतिषी वर्त्तारीं ॥ ३६ ॥ नामकरण तोषप्रकृति । पोडश संस्कारें वर्धविती । सेवट देहासि उपहती । होय षड्विकारें ॥ ३७ ॥ या पिंडांत देह चत्वार । याचा करावा निजविचार । तेणें विचारें पर पार । पाविजे भवाचा ॥ ३८ ॥ नाशिवंत जाणोनिया देह । धरावी सत्यस्वरूपाची सोय । शोधुनि पिंडब्रह्मांड स्वयें । व्हावें परात्पर ॥३९॥ अस्थि मांस त्वचा नाडी रोम । हे पृथ्वीचे पंचक निभ्रम । शुक्र शोणित लाळ मूत्र वर्म । स्वेदेंसह आप तें ॥ ४० ॥ क्षुधा तृषा आलस्य निद्रा मैथुन । हें तेजपंचक पैंजाण । चळण वळण प्रसरण । निरोधन अकोचन वायु ॥ ४१ ॥ काम क्रोध शोक मोह भय । हें आकाशपंचक निश्चयें । एवं पांचीक स्थूळदेह । विवरोनि पहावा ॥ ४२ ॥ जाग्रति अवस्था विश्वाभिमान । स्थूळभोग क्रियाशक्ति नेत्रस्थान । वैखरि वाचा रजोगुण । अकार मातृका ॥ ४३ ॥ अकारमातृका उकारीं । प्रवेशतां स्थूळदेहाची बोहरी । पंचवीस तत्वें वासनाशरीरीं । शोधूनि पाहावें ॥ ४४ ॥ अंतःकरण मन बुधि चित्त । जाणोनि नभपंचक सूक्ष्मांत । पांचवा अहंकार निश्चित । निर्हेत करावा ॥ ४५ ॥ व्यान उदान समान अपान । प्राण पवनपंचक निवळोन । निर्विकार स्फुरणीं सुलीन । किजे निजप्रत्ययें ॥ ४६ ॥ श्रोत्र त्वक् चक्षु जिव्हा घ्राण । तेजपंचक ज्ञानें प्रांजळ करून । निर्वाण ज्ञानाग्निसमर्पण । किजे पूर्ण प्रतीतीनें ॥ ४७ ॥ याचा कर चरण

---

१ पूर्वे जातिं स्मरति शुभाशुभं कर्म च विन्दति । गर्भे०. २ अथ नवमे मासि सर्वलक्षणज्ञानकरणसंपूर्णो भवति । ३ ( ? ) ४ आकुंचन. ५ ( ? )

शिश्न गुद । आपपंचक समजोन विशद । समर्पावे तो रसस्वानंद । परमानंदीं ॥ ४८ ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध । हें पृथ्वीपंचक प्रसिद्ध । जाणोनि ब्रह्माहमस्मि अतिशुद्ध । वेधें समर्पावें ॥ ४९ ॥ परि हे वासनात्मक अपस्मार । लागलें सर्वत्रासि लिंगशरीर । सद्गुरुपंचाक्षरीनें साचार । स्वरूपस्तंभीं खिळवे ॥ ५० ॥ स्वप्नावस्था तैजसाभिमान । प्रविविक्तभोग इछ्याशक्ति कंठस्थान । मध्यमा वाचा सत्वगुण । उकार मातृका ॥ ५१ ॥ उकारमातृका सोहंनिर्धारें । सुखकारण मकारीं मरे । त्यास्तव कारणज्ञानविवरें । परिशुध्द करावें ॥ ५२ ॥ सुषुप्तिअवस्था प्राज्ञाभिमान । आनंदभोग द्रव्यशक्ति हृदयस्थान । पश्यंती वाचा आणि तमोगुण । मकार मातृका ॥ ५३ ॥ मकार मातृका कारण । प्रवेशे महाकारण अर्धमात्रेंत जाण । ब्रह्मस्फूर्ती ब्रह्मार्पण । कीजे ब्रह्मात्मनिष्ठेनें ॥ ५४ ॥ तुर्यावस्था प्रत्यगात्माभिमान । आनंदावभासभोग मूर्ध्निस्थान । ज्ञानशक्ति परा वाचा सत्वगुण । अर्धमातृका ॥ ५५ ॥ अर्धमात्रा स्वरूपीं संचरे । अहंत्वचणकणिका स्वानंदाब्धींत विरे । ज्ञानज्वाळ चिद्गगनीं सरे । सहजस्थिती ॥ ५६ ॥ विज्ञानजीवनीं स्वानंदगार । मुसावोनि विघरली साचार । नित्यात्मबोधपिंडीचे चत्वार । साक्षी वोसरले ॥ ५७ ॥ पंचीकृत भूतमय । विचारुनि वर्तमानीं प्रलय । भूतभावना निरामय । जीवनीं परिशुद्ध केली ॥ ५८ ॥ वंध्येसि पुत्र जाला चि नाहीं । नभासि पुष्प नसे चि कांहीं । चित्रतरूसि छाया कांहीं । असेल पाहतां ॥ ५९ ॥ स्वरूपदृष्टीनें सनातन । पाहतां माया अनुत्पन्न । *परि हे चि प्रकृतीनें जगद्भान । बंधन केलें होतें ॥ ६० ॥* मिथ्या मायाबंधन अज्ञान । सद्गुरुकृपेनें जालें निरसन । अनिर्वाच्य समाधान । अवधारिजे श्रोतीं ॥ ६१ ॥ प्रपंचप्रळय मायानिदान । कल्पांतदृष्टीनें निवर्त्तऊन । सत्यस्वरूपानुभवें ज्ञान । निवळलें पाहिजे

---

१ भूत. २ स्वप्नावस्थेंतील अभिमानी जीव. ३ सुषुप्ति अवस्थेंतील अभिमानी जीव. ४ समाधि अवस्थेंतील अभिमानी आत्मा ५ अहंकाररूपी मिठाचा कण. ६ आत्मानंदरूपी बर्फाचा तुकडा.

॥ ६२ ॥ तें चि निरूपण सुखैकघन । परिसिजे अवधान देऊनं । निर्मळ निश्चळ निरंजन । आत्मप्रतीति ॥ ६३ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । पिंडोत्पत्ति शबळ त्वंपदार्थ निवळा । ह्मणे मेरु-अनंत ॥ ६४ ॥ अष्टमरुद्रे नवमउल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीराम समर्थ तत्पदार्थ । बोधें प्रांजळ केला त्वंपदार्थ । शबळ त्वंपद तत्पदें परमार्थ । निवळ केला ॥ १ ॥ जहल्लक्षण अजहल्लक्षणें । जिवोपाधिशिवोपाधिविवंचनें । त्यागात्यागप्रतीतीनें । पाहणें स्वरूपासि ॥ २ ॥ जहदजहल्लक्षणें । नित्यात्मबोधसिध्दीनें । शुध्द तत्पदार्थ अनुभवणें । परब्रह्म स्वयें ॥ ३ ॥ शुध्द त्वंपदार्थ केवळ । निजआस्तिक्यें ब्रह्म निर्मळ । प्रतीत गुरुकृपा अखिल । निरंजन वस्तु ॥ ४ ॥ तत्वता निरंजन वस्तु स्वयें । गुरुबोधें फिटला संशय । देहीं च असोन विदेह । प्रतीति ऐसी ॥ ५ ॥ प्रारब्धीं टाकिला देह । नाहीं संकल्पाचा संशय । स्वरूपनिश्चयें निरामय । तत्वता ज्ञानी ॥ ६ ॥ नित्य उपासना अंतर्भाव । सर्वकर्ता देवाधिदेव । जयाचे सत्तेनें अभि-

---

१ शब्दाचे वाच्य, लाक्षणिक आणि व्यंग्य असे तीन प्रकारचे अर्थ असतात. शब्द कानीं पडल्यावरोबर जो अर्थ मनांत येतो तो वाच्य, वहिवाटीमुळें किंवा अन्य कांहीं कारणामुळें तो दुसरा तत्संबंधीं अर्थ त्यांतून आपण काढतों तो लाक्षणिक आणि केवळ धोरणानें जाणावयाचा तो व्यंग्य. यांपैकीं लाक्षणिक अर्थ शब्दाच्या ठायीं लक्षणानामक शक्ती कल्पिलेली आहे तिच्या मुळें उत्पन्न होतो. या लक्षणेचे जहल्लक्षणा अजहल्लक्षणा आणि जहदजहल्लक्षणा असे तीन भेद आहेत. त्यांपैकीं जहदजहल्लक्षणेनें 'तत्वमसि' या महावाक्याचा अर्थ करितात. जहत् ह्मणजे सोडणारी आणि अजहत् ह्मणजे न सोडणारी. जी लक्षणा शब्दाचा मूळ अर्थ अंशतः सोडते व अंशतः सोडीत नाहीं ती जहदजहल्लक्षणा. तत्वमसि यांत तत् त्वम् असि ह्मणजे तें ( परब्रह्म ) तूं (जीव) आहेस, अशीं पदें आहेत. ब्रह्म आणि जीव सकृद्दर्शनीं भिन्न वाटत असल्यामुळें तीं एक कशीं होतील असा प्रश्न उत्पन्न होतो ह्मणून त्वं शब्दावरून होणारा अल्पत्वाचा अर्थ टाकून आणि चैतन्याचा अर्थ ठेवून जीव परब्रह्मस्वरूपी आहे असें ठरविलें आहे. या च दशांतील ४ थ्या उल्लासांत ६८-च्या ओंवी पुढील श्लोक पहा.

नव । सृष्टी वर्ततसे ॥ ७ ॥ त्याच्या स्मरणसूत्रसत्तेनें । देह वर्ते पूर्वसंस्कारानें । उत्पत्तिस्थितिनिदानें । वर्तविलें तैसा वर्ते ॥ ८ ॥ स्वानुभवसुखें परात्पर । समर्थे अर्जविला रघुवीर । समर्थसंप्रदायें निरंतर । सेविजे तयासि ॥ ९ ॥ परम सुंदर तेजमथित । सुश्याम घनकोटीउदित । लावण्याचें लावण्य अमित । कमनीय शोभा ॥ १० ॥ सुनीळ नभ गाळींव गाभा । सुश्याम विद्युत्प्रभेची शोभा । स्वानंदघन दूर्वांकुराची शोभा । मनोहरविग्रही ॥ ११ ॥ सुवेषरत्नाकरभूषित । परम सुंदर शोभित । मुकुट कुंडलें अलंकृत । विशालाक्ष ॥ १२ ॥ केवळ स्वानंदाचा कंद । शिवहृदयारविंदींचा मकरंद । मुनिमानसमत्तमिळिंद । वेधले जेथें ॥ १३ ॥ योगीमानसमरॉळ । कैवल्यकल्पद्रुम रसाळ । नवविधाभजनें कृपाळ । आपुला केला जीहीं ॥ १४ ॥ तयासि भवतमक्षोभ नसे । प्रारब्ध दैवीक हि नुमसे । देहीं च देहातीत ऐसे । स्वसुख घेती भजनाचें ॥ १५ ॥ प्रारब्धयोगें बाधा शरीरीं । स्वप्नींचें दुःख जाग्रतीमाझारी । मरण पातलें नाना विकारीं । तऱ्हीं भवभय नसे ॥ १६ ॥ काळें गिळिला जाय देह । तेहीं काळचि गिळिला प्रत्ययें । स्वानंदें गाती नाचती स्वयें । रामकीर्तनीं गजरें ॥ १७ ॥ मरणभयाधीन न होतां । ओळली अमृतसिध्दि रामकथा । पीयूषाची सखोलता । घेती निर्याणशुध्दी ॥ १८ ॥ देहीं पंचप्रळय अनिवार । तयांचा कीर्तनीं करूनी उत्धार । रामभजनीं च निरंतर । तनुभाव ठेविला ॥ १९ ॥ ब्रह्मांडीचा महाप्रळय । जो का भविष्यें होणार आहे । तो ही गुरुकृपाप्रत्ययें । अनुभवऊनि सोडिला ॥ २० ॥ हेतुविधीची सुषुप्ति । नित्य ब्रह्मकल्प त्यातें ह्मणती । निजजीवनें होय अव्याप्ति । सत्यलोकपरियंत ॥ २१ ॥ माया मर्त्यलोकीचे प्राणी । सुलीन होती निजदानजीवनीं । उल्लेखविधाता जागा होऊनि । पुन्हा सृजी सकळां ॥ २२ ॥ हा ब्रह्मांडीचा निद्राप्रळय । पिंडीं नित्यसुषुप्तिरूप होय । निद्रामराणाचिया

१ सुंदर, मोहक. २ (?). ३ रूपीचीं मनें हे च मत्त भुंगे. ४ हंस. ५ सृष्टिकर्ता ब्रह्मदेवाची. ६ आत्मसमर्पणरूपी जलात. ७ उत्पन्न करी.

प्रत्ययें । जागती ज्ञानी ॥ २३ ॥ पिंडीचा जाण मृत्युप्रळय । मरम-रोनि आठवे भय । अनुभविती जीव स्वयें । अज्ञानप्रवृत्ती ॥ २४ ॥ हे प्रवृत्तीसि नित्य मरण । कृतांत ते स्वयें चि होऊन । मारिती आपणासि आपण । नेणोनिया ॥ २५ ॥ भाविलें ते चि फळद्रूप होय । भोगि-ल्या वाचोनि सुटेल काय । आपुल्या कल्पनेनें आपण होय । मृत्युआधीन त्या ॥२६॥ तो संकल्प काळकृतांत । करी सकळ सृष्टीचा अंत । देहीं च असतां जीवंत । मृत्युसि वोळखावें ॥ २७ ॥ आपणासि मृत्यु येणार आहे । हा उधारीचा न ठेवितां संशय । वर्तमानीं च अनुभऊनि स्वयें । ज्ञानें अमर व्हावें ॥ २८ ॥ मृत्युरूप अवस्था येक असे । जें वि मूर्छना देहीं अभासे । अथवा सुषुप्तिमरें वसे । अभाव शरीरीं ॥ २९ ॥ सुषु-प्तेंत मरण समरसे । तेव्हां इंद्रियासि प्रकाश नसे । जैसा माजघरींचा प्रवेशें । दीप अंतर्बाहेरींतें ॥ ३० ॥ तेव्हां बाहेर पडे अंधकार । प्रवे-शला सूक्ष्मीं करी थार । मरणसमयीं सूक्ष्म शरीर । जाय स्थूळें त्यागूनि ॥ ३१ ॥ आतां मरणसमय तो कैसा । नसोनि प्रारब्धासी आला जैसा । संकल्पमुक्त बैसोनि तैसा । पाहिजे अनुभविला ॥ ३२ ॥ अलो-भमित्र संगतीनें । देखिला देहाभिमान प्रीतीनें । अज्ञानभवसंस्कार भोगणें । घडलें जिवासि या ॥ ३३ ॥ पोटिचीं[३] व्याली वेधनेस्तव । तळमळी बाळकां दुःख होतां सर्व । प्रत्यक्ष आंगीं नसोनि जीव । मरण भोगी ॥३४॥ हे देहममता मरणांत । दुःखें भोगवी कल्पादि समस्त । विकळ अति-शयेंसीं होत । चित्त मरणसमयीं ॥ ३५ ॥ त्या समयीं नित्य सत्याव-धान । बुध्दिमंतीं असिजे सावधान । वृत्तीसि न बांधी व्यवधान । भयरूप मृत्यूचें ॥ ३६ ॥ दुःखें प्राण फुटतील । दुर्घातें नाडी धडक-तील । काळज्वरें ते फणफणितील । अवरोध काया ॥ ३७ ॥ इंद्रि-यांचा मोधा होईल । मायेनें जीव कळवळील । दुःखांचे आघात विंझ-तील । आंगीं जिवाच्या ॥ ३८ ॥ इंद्रियें मनामाजि रिघतील । संधी

१ भविष्य कालीन गोष्टीचा. २ आंतल्या खोलींत. ३ आई. ४ मोधळा, अव्यवस्थित गोळा.

विस्फाळित होतील । शिरा आसडों लागतील । देहांत–अनिळें ॥ ३९ ॥ दुःखाचे पर्वत पडतील । पंचप्राण निर्बुजैतील । अग्नीचें रूप काल-वेळ । पोटीं जिवाच्या ॥ ४० ॥ दुःखें कळवळूनियां पोटीं । आसुडेल नाभीची गांठी । काळ काळिजीं घालूनि मुष्टी । वोढील जेव्हां ॥४१॥ तेव्हां शुधि उडोनि जाईल । शून्याकार विस्मृति येईल । जीवज्योति आहेंळोनि पावेल । अवकाशीं तिया ॥ ४२ ॥ जेंवि स्वारीसि प्रभू निघतां । सेना पुढें चि चाले सवेगता । तेंवि ज्योतिसत्ता सत्वता । जाय स्मरणरूपें पुढें ॥ ४३ ॥ चित्त आधीं च निर्बुजैल । प्राणातीं अपानद्वार बुजैल । संपूर्ण कफें दाटिजैल । कंठ उदानेंसीं ॥ ४४ ॥ ते वेळेस निज आठव । धरील तो ज्ञानीयाचा राव । निर्मळ निश्चळ निरावेव । स्वभावें चि तो ॥ ४५ ॥ नित्य गुरुभक्ति जयासी । जो सद्भाविकांची काशी । जेणें केलि गुरुपद मिरासी । त्याचें धारिष्ट च-ळे ना ॥ ४६ ॥ जैसें सुवर्ण पुँटिं घालितां । अधिक चि होय स्वच्छ-ता । तेवि निदानी गुरुभक्ता । अभेदभक्ति दृढावे ॥ ४७ ॥ प्रवृत्तीचें स्मरण उडे । अचेतन दशा ते पवाडे । दृष्टि पूर्ण खमंडळीं जडे । अंतःकरणेंसीं ॥ ४८ ॥ विस्मयो अहंकार वितुळे । प्राणाधारें चित्तीं मिसळे । चित्त अपानेंसीं मिळे । बुध्धीच्या पोटीं ॥ ४९ ॥ बुधि अपान श्रेंडनी । त्वरें चि प्रवेशे मनीं । ते समयीं सहज उन्मनी । प्रकाशे ज्ञानियासी ॥ ५० ॥ ज्यासि नित्यानुभव उन्मनी । जे अखड समाधानी । तयासी निदानें चि नसे निदानीं । अक्षरस्वरूपें ॥ ५१ ॥ जे प्रकाशें पदार्थ देखिले । प्रकाश नसता हीं दिसों लागले । तो प्र-काश चि सर्वकाळें । जयाचे हृदयीं ॥ ५२ ॥ त्यासी न पडे हा अंध-कार । ते स्वयप्रकाशाचे भास्कर । तयासि तो मरणसंस्कार । असे चि ना कांहीं ॥ ५३ ॥ जेणें मरावें तें चि ते नव्हेती । हे अज्ञानाची मरणस्थिति । देहांतीं पडे विस्मृति । ह्मणती चंद्री लागली डोळां

---

१ दिसके वसूं लागतील. २ व्याकुळ होतील. ३ भाजून. ४ मुशांत. ५ सदून.

॥ ५४ ॥ कोण्ही प्राण गेला ह्मणती । येक धुकुधुकीतें पाहती । देहबुधीचे परिक्षिती । पाहते प्राण नाशिकीं ॥ ५५ ॥ संस्कार मरणा अगोधर । पाहिलें जन्मांतर विढार । जेंवि परिनोंळी ते पाहूनि थार । पश्चात् भाग त्यागी ॥ ५६ ॥ मन प्राणसमागमें । वासनावृत्तीच्या धर्में । अधिकारपरत्वें जन्मे । नाना योनींत ॥ ५७ ॥ मन समानवेगें करूनि । प्रवेशे अंतःकरणीं । अंतःकरण शून्य होऊनि । अवकाशीं रिघे ॥ ५८ ॥ अवकाश शब्देंसहित । शुध्य अहंकारीं प्रवेशत । तेंव्हां ज्ञानीयासी सदोदित । ब्रह्माहमस्मि ब्रह्मीं निवळे ॥ ५९ ॥ सोहं सत्य अहंकार । रिघे स्वानंदगुणमईचें घर । सत्ता महतत्त्वीं साचार । गुणमयीं रिघे ॥ ६० ॥ महतत्त्व महाईश्वर । सत्ता ऐश्वर्य सृष्टीचा कर्तार । मूळमायेंत निर्विकार । अवसीनीं रिघे ॥ ६१ ॥ ब्रह्मस्फुरण मूळमाया । परब्रह्मीं जाय विलया । मायानिरासें ज्ञानिया । सहज चि परब्रह्म ॥६२॥ ऐसा देहनिदानसमय । अनुभऊनि जाला निःसंशय । आतां ब्रह्मांडींचा महाप्रळय । पाहिला साक्षत्वें ॥ ६३ ॥ भूतळय ज्ञानप्रळयाग्नि । स्वबोधशंकराचे नयनीं । तो च कल्पांतनिदानीं । पूर्ण प्रगटला ॥ ६४ ॥ आकाळ सत्ताभावस्थिति । भयसर्गस्थिलंलगती । प्रगटूनियां सर्व भूतीं । भूतभाव सारी ॥ ६५ ॥ ज्ञाननिरंधनेंवैश्वानर । भूतइंधनें निवारी दुर्धर । निर्वाणबोध साक्षात्कार । हेतु कल्पांतीचा ॥ ६६ ॥ जगत्कारण समसेंाटि । शतवरुषें अनावृष्टि । स्वानंदसिंधुसरिता सृष्टी । शोषूनि टाकी ॥ ६७ ॥ प्रळयानळ वृष्टि करित । तपों लागला कल्पांत उदित । तेणें वृक्षें तृणादि जीवजात । आहळोनि जाती ॥ ६८ ॥ भूतपर्वतांच्या लाह्या फुटती । पर्वतगर्भीं ज्वाळा रिघती । द्वादशादित्य कल्पांतीं । तपतां बारा कळेनें ॥ ६९ ॥ प्रळयसूर्याच्या ज्वाळा । लागती दीसीनें भूगोळा । महा उष्णें भूमंडळा । तडे फुटती ॥ ७० ॥ तिरढोंविरढी जाय धरणी । सप्ततळें सूर्यकिरणीं ।

---

१ नाकांत. २ पर्णाळी, पानावरची आळी, कीड. ३ शेवटीं. ४ जळवणाशिवाय. ५ ( ? ) यरोयरीनें. ६ करपून. ७ चिरा, भेगा, तडे. ८ ( ? ) अकटोविकट.

भेदूनि शेषाचिये अंतःकरणीं । चेतविती विषासी ॥ ७१ ॥ आह-ळोनि विष वमी शेष । पाताळें जळती निःशेष । वरि सूर्यांच्या रश्मि विशेष । जाळिती भूमि कर्पूराऐसी ॥ ७२ ॥ पाताळलोक ज-ळोनि जाती । येकवीस स्वर्ग प्रदीप्त होती । कल्पातवन्हींत आहाळती । नक्षत्रमाळा ॥ ७३ ॥ पेटला सुवर्णाद्रि बंबाळ । उजळीतसे नभमं-डळ । ज्वाळांकित तेजकल्लोळ । रत्नसानु कोसळे ॥ ७४ ॥ सत्यलोक अमरावती । वैकुंठ कैलास स्थिति । नानाकुसरीचे ज्वाळा उठती । नभीं पर्वताऐसा ॥ ७५ ॥ ज्याचेनि प्रळय होय सृष्टि । त्यासी प्रळय अभिनवता मोठी । प्रळयाग्नींत त्या देवकोटि । पुढीं घाळूनि पाहिल्या ॥ ७६ ॥ प्रळयाग्नींत नव्हे क्षय । जाणिजे देव तो अक्षय । वरकड-देवांसी प्रळय । निदानीं करितसे ॥ ७७ ॥ विश्वहर्ता कृतांतकाळ । त्यासि'ही आला प्रळयकाळ । अमृताचीं कुंडें सकळ । जळों लागलीं प्रदीप्त ॥ ७८ ॥ ईश्वरनेत्रींचा प्रळयानळ । सूर्य विद्युल्लता आणि अनळ । अवघे येकवटले ज्वाळ । महातेजविभवें ॥ ७९ ॥ प्रळयश-क्तीनें सद्भावें । ब्रह्मांडकर्पूराचें अभिनवें । शाश्वतदेवासी स्वानुभवें । उजाळिलें आरत ॥ ८० ॥ ब्रह्मांडें अनंतकोटि । चिच्छक्तीचें आरत सेवटीं । प्रकाश चिदाकाशतटीं । आरत केलें ॥ ८१ ॥ येकली उभी राहोनि निर्वाणी । परात्परप्राणवल्लभा लागोनि । कुर्वंडी पंचप्राणतत्व-निदानी । महा आरत हें ॥ ८२ ॥ प्रळयाग्निप्रदीप्त ब्रह्मांडें । तप्तसु-वर्णमय प्रचंडें । धगधगायमान नवखंडें । दिसती सिंदूरवर्ण ॥ ८३ ॥ पृथ्वी भस्मोनि जाता सवेग । लोटले आवरणोदकवोघ । वर्षों लागले प्रळयमेघ । शुंडाधारीं ॥ ८४ ॥ नद्या कोसळती नभींहूनि । असंभाव्य जालें पाणी । कल्पातजीवनीं धरणी । विघरोनि गेली ॥ ८५ ॥ तुमतें आप गगनोदरीं । आवरणानळ ये जीवनातरीं । सूर्यबिंबासा-रिखा अवांतरीं । उठे उदकासी शोषित ॥ ८६ ॥ निरंधन वन्हि अ-मित । त्यांत आवरणवायु प्रवेशत । प्रळयझळझडाटें निवात । केलें

१ ओकतो. २ मेरुपर्वत. ३ अंत.

असती ग्रामोग्रामीं । तैसी नव्हे हे चिता संयमी । आत्मशिवें वसविली ॥ २३ ॥ इतर चिता शोकस्वरूप । हें अशोक अमृत सुखरूपें । पाविजे सुखप्रद गुरुकृपें । परमभाग्यें करूनि ॥ २४ ॥ मूळ उगमीं च मूळक्षय । हा महास्मशानीचा प्रत्यय । जीव निदानें ब्रह्म स्वयें । नित्य सायुज्यसिध्दी ॥ २५ ॥ इतर स्मशानीं मृत्यु असे । येथें अमृतधाराधिर वरुषे । अहं निशानीं आत्मसंतोषें । प्रत्यक्ष तो मृत्युंजय ॥ २६ ॥ निजात्मप्रतीतीच्या गजरें । लाऊनि अनुहतमंगळतुरें । जीत चि मरोनि साक्षात्कारें । मिरवत यावें स्मशाना ॥ २७ ॥ हे सदाशिवाची निजमिरासी । केवळ स्वसुखाची राशि । हे अनुभव महादेवें निश्चयेंसीं । चिता वसविली ॥ २८ ॥ इतरांसि कैंचें हें महास्मशान । परम दुर्लभ सद्गतिस्थान । अमर हि पावावया मरण । येती महास्मशानीं ॥२९॥ महास्मशानीं आनंदवन । आनंदवनीं महास्मशान । पाहावें हें जीत चि मरोन । कल्याण आपुलें ॥ ३० ॥ महास्मशानींचा सोहळा । जीत चि मरोन पाहावा डोळा । संप्रज्ञातयोगी जिव्हाळा । अनुभवी सुखें ॥ ३१ ॥ कोण्ही मरोनि स्मशाना येती । त्या स्मशानीं चि अन्यथा गति । येथें स्वरूपप्रतीति पदगती । स्वयें चि यावें ॥ ३२ ॥ साधनचतुष्टयसंपूर्ण । वाहक परिशुध्द चौघे जण । वाहोन स्वस्कंधीं निर्वाण । या भूमिकेसी आणिती ॥ ३३ ॥ अभिन्नप्रतीतीचें सरणें । स्वहस्तें लाऊन ज्ञानहुताशन । मायामय शवाचें दहन । होय त्या चितेसि ॥ ३४ ॥ ज्ञेयत्रिपुटिविकल्प तुरे । भर्जितबीज भस्म सरे । अद्वयाचा मोक्ष चमत्कारें । होय ऐसा ॥ ३५ ॥ विज्ञानभागीरथीप्रवाहीं । विघरोनि गेल्या अस्थि सर्व ही । स्वरूपसमावेशें हृदयीं । नित्यकैलासवास ॥ ३६ ॥ धन्य धन्य स्मशानींचा उत्सव । पाहे संप्रज्ञात दृष्टीनें सर्व ।

---

१ इंद्रियनिग्रही आत्मरूप शिवानें २ मेघ. ३ अनुहतध्वनिरूप मंगल वाद्यें. ४ ज्या समाधींत मनाचा पूर्ण लय झालेला नसतो अशा समाधि, सविकल्प समाधि. ५ आत्मप्रत्यय आल्यावर. ६ स्वतःच्या पायानीं च. ७ ऐहिक पारलौकिक सर्व भोगांविषयीं पूर्ण वैराग्य. इंद्रिय निग्रह, मोक्षाची इच्छा इत्यादि साधनें.

प्रसन्न जाला सद्गुरु सदाशिव । कैवल्यकैलासींचा ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ या चिता सर्वभूतानामुदयव्ययसाक्षिणी ।[1]
तां चितां पश्यतांतस्थां पूर्णानंदघनामृतो ॥ १ ॥

विज्ञानघन सुखामृत । तीर्थस्वरूप सदोदित । चिदंबरसुख डवाबित । अप्रांत डोहो भरला ॥ ३८ ॥ स्वरूपडोहामाजि बुडविले । ना तें स्वयें चि डोहो केलें । परतोनि नाही च तें आलें । मीपण वृत्तींसीं ॥ ३९ ॥ स्वरूपडोहो हृदयीं रिघे । अमोघ भरला वाहेना वोघें । डोहो चि होय हें हें आवघें । अनंताचें करणें ॥ ४० ॥ लवण रिघोनिया सागरीं । सिंधू चि जालें अभ्यंतरीं । तैंचि स्वरूपसमुद्रामाझारीं । विराली झेलीसुखकणिका ॥ ४१ ॥ डोहो डोहामाजि बुडाला । कोण शुधि सांगेल कोणाला । या चि प्रतीतीनें डोहो भरला । सकळां बुडवितसे ॥ ४२ ॥ सोहं सद्गुरुकृपेनें पूर्ण । स्वानंद डोहामाजि सनातन । उडिया चि टाकिती संतसज्जन । डोहो चि होती ते ॥ ४३ ॥ स्वरूपसिंधूंत प्रसिद्ध । बुडाले कपिलादि महासिध्द । शिवसनकादि नवसिध्द । बुडोनि गेले डोहीं ॥ ४४ ॥ आत्मज्ञानी ब्रह्मनिष्ठ । योगी मुनि सुखें अवचट । स्वरूपामृतडोहो निकट । समरसोनि गेले ॥ ४५ ॥ घनामृत निजजीवन । चिरकल्लोळ सुखैकघन । चुबुकळ्या देती संपूर्ण । डोहो चि होऊनियां ॥ ४६ ॥ डोहो डोहामाजि स्वभावें । प्रवेशलासे स्वानुभवें । आलों कोठुनि कोठें जावें । हें प्रमाण टाकिलें ॥ ४७ ॥ एवं निर्वाण निजप्रलयें । संशय ना तो निश्चयें । विश्रांतीचा ठाव स्वयें । निर्विकार ॥ ४८ ॥ अवचट बाणे सुषुप्ति । आठवीं च रूढे विस्मृति । तैसी साक्षात्काराची स्थिति । शुध्द निराकार ॥ ४९ ॥ स्वभावें निद्रा ना जागर । ब्रह्म मी हा आठव ना विसर । अपरोक्षप्रतीति साचार । त्रिपुटीविहीन ॥ ५० ॥ अवस्थापंचम नास्ति । च्यान्ही पुरुषार्थ उपशांति । निरुपमंदशा अवचिती । बाणली स्वभावें ॥ ५१ ॥ सहज अ-

१ ऋषभाचे पुत्र कवि, हरि इत्यादि नऊ बंधु. २ पश्यत (पद्य)+अंतःस्थाम्.

वस्तेची विश्रांति । सहजसमाधीची उपरती । अवसानदशासंविती । स्वरूपसीमा ॥ ५२ ॥ निश्चयेसीं नळगे अंत । महामौनी स्थिति अनंत । परा गाळुनि निवांत । संत अनुभविती ॥ ५३ ॥ अनिर्वाच्य समाधान । प्रतीतीसी ही जेथें निर्वाण । सद्गुरूकृपेचें महिमान । ज्ञान अपरोक्ष ॥ ५४ ॥ निःशब्द सुख कांहीं येक । रूपकर्तेवीण रूपक । संकेतवृत्तीसि अनुमापक । नव्हे चि कदां ॥ ५५ ॥ जे सकळार्थसांटवण । ते सांटवली जेथें पूर्ण । जे अठवणेवीण आठवण । लहरी विराली सुखें ॥ ५६ ॥ सद्गुरूकृपेचें सोळीव स्मरण । जालें आचार्यपदीं समर्पण । विज्ञान जीवेंसी उत्तीर्ण । होउनि ठेलें ॥ ५७ ॥ कठिणांश तेथें धरणी । द्रष्टृत्व तेथें करणी । स्फुरण तेंचि अंतःकरणी । अनेकवृत्ती ॥ ५८ ॥ द्रवत्व तेथें जीवन । सुक्रत तेथें पावन । चळण तेथें पवन । स्वतःसिध्द असे ॥ ५९ ॥ भुवन तेथें भरणी । मरीचि[1] तेथें तरैणी[2] । स्वानंद तेथें सैरणी[3] । सार्थकतेची ॥ ६० ॥ स्वधर्म तेथें सत्य । सत्कर्म तेथें शुचिनित्य । विनय तेथें अमित । योग्यता वसे ॥ ६१ ॥ अनुताप तेथें विरक्ति । भावार्थ तेथें भक्ति । निर्विषय तेथें मुक्ति । स्वानंद तेथें स्वरूप ॥ ६२ ॥ जे जे प्रतीतीचे जिव्हाळे । ते ते स्वानंदाचे पाळिले ळळे । नित्यबोधाचे पुरविले डोहळे । सोहळे संपूर्ण ॥ ६३ ॥ सहज अंतर्भाव शुध्द । सहज स्वामीचा शुध्द बोध । सहज अनुभव प्रसिध्द । निवळला सुखें ॥ ६४ ॥ मूळ मीमाजि मी नसे । मूळ मीमाजि अमूळ असे । मूळ मी माजि कांहीं नुमसे । अद्वैतपणें ॥ ६५ ॥ हें वेदांतींचें रहस्य पूर्ण । ज्ञानविज्ञान आस्तिक्यखूण । स्वसंवेद्यनिर्वाण । नुमसे चि कांहीं ॥ ६६ ॥ हें निर्वाणज्ञान प्रतीतीसी । अवधूतें सांगीतलें गोरक्षासि । निजअनुभव देऊनि निश्चयेंसीं । निवळ केला ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ वेदांतसारसर्वस्वं ज्ञानं विज्ञानमेव च ।
अहं चात्मा निराकारः सर्वं वेद्मि स्वभावतः ॥ १ ॥

---

१ अनुभव. २ किरण. ३ सूर्य. ४ मार्ग.

अद्वैत हें मुख्यार्थ । जीवेंसी अनुभवी परमार्थ । वाच्य ना वाचक यथार्थ । अनिर्वाच्य जालें ॥ ६८ ॥ संकेत न घडे निर्गुणासि । पल्लव न येती गगनासी । भेदाभेद आत्मदृष्टीसी । नाहींत मुळींहूनि ॥६९॥ आश्चर्य नाडळे मज मीं । ब्रह्म सदोदित नाहीं ऊर्मि। अनंत सद्गुरु अंतर्यामी । प्रगटला ऐसा ॥ ७० ॥ मज मी भिन्नपणें उरेना । आतां बोध सांगेल पां कवणा । पडिली निर्गुणमिठी सुटेना । सहज निःशब्द ॥ ७१ ॥ ऐसी सद्गुरुकृपा पूर्ण । आहे स्वरूपें सनातन । दयेनें अनुभव प्रासून । बोलविलें मज ॥ ७२ ॥ केवळ अनुभवाचे पोटीं । सोलींव ज्ञानाची दृष्टी । समीप बैसऊनि गोष्टी । सांगितल्या कृपेनें ॥७३॥ वाच्यलक्षाहूनि परतें । निर्गुणस्वरूप आइतें । अहं निवर्तऊनि सहज तें । आणविलें प्रत्यया ॥ ७४ ॥ हें स्वरूपसिद्धिनिवाडें । प्राप्तीचें न पडे सांकडें । अद्वैतअनुभव पवाडें । महा अद्वैतीं ॥ ७५ ॥ अकळ अनुभवाची खूण । हें स्वामीचें देणें संपूर्ण । जें बोलता चि नये तें पूर्ण । मज बोलविलें ॥ ७६ ॥ वर्म कळलें सांगतां नये । पैरेसि बोबडी पडोनि राहे । तें अनुभऊनियां स्वयें । वाचेसि आणिलें ॥ ७७ ॥ जेथें अनुभव कोसळला । आनंद उभा चि विराला । जेथें मुळींहूनि विवेकाला । ठाग चि नलगे ॥ ७८ ॥ ऐसें पाहातां तट पडिलें । पाहावयासि कोण उरलें । पाहणेंपणेंसीं गेलें । पाहातें आटोनियां ॥ ७९ ॥ अमनाची घेतां खोली । उन्मनाची शुध्दि उडाली । समाधि सहजस्थिति जाली । ब्रह्मार्पण ॥ ८० ॥ सहजभावना उडाली । स्वरूपधारणा बुडाली । सायुज्यतेची विघडली । स्थिति अतिदुर्गम ॥ ८१ ॥ ऐक्यता भावावी कवणें । अद्वैतीं कैंचें जाणणें । निर्गुणासि निर्गुण बोधणें । हें तों असे चि ना ॥ ८२ ॥ येथें खुंटल्या सर्व ही युक्ती । हे केवळ स्वामीकृपेची प्राप्ति । सत्यस्वरूप नित्यमुक्ति । तत्वता वस्तु ॥ ८३ ॥ येक च अद्वैत ब्रह्म । नाना म्हणणें हा भ्रम । नाहीं तयासि रूपनाम ।

---

१ परा वाचेला.

ऐसें श्रुतिवाक्य ॥ ८४ ॥ हें चि वर्ण पैं श्रुतीचें । बोलणें पूर्वपक्षीचें । वाक्येंचि या वाक्याचें । निर्वाण केलें ॥ ८५ ॥ दृष्टांत होय साचार[1]। तरि द्राष्टांतासि कोण विचार । जें दृष्ट तें नष्ट जीर्णोद्धार । केला श्रुतिवाक्यें चि या ॥ ८६ ॥ कोणें काय केव्हां देखिलें । कोठें काय नासोनि गेलें । अपरोक्ष वस्तूसि प्रतिष्ठिलें । कवणत्या वाक्यार्थे ॥ ८७ ॥ पूर्वपक्षेंसीं सित्धांत । स्वरूपीं सर्व ही असंगत । सद्गुरुकृपा श्रीअनंत । प्रगटला या अर्थे ॥ ८८ ॥ आपुलें स्वरूप आपण । बोलिलें स्वरूपाचें अनुसंधान । जाणिजे तें शुत्ध बुत्ध ज्ञान । अभिन्न वस्तुसि॥८९॥ अष्टमरुद्रीं मायानिवृत्ति । पिंडब्रह्मांडउत्पत्तिस्थिति । कार्या कारणाची रीति । केली प्रांजळ ॥ ९० ॥ निवळलें जीवशिवांचें रूप । निवळलें केवळ स्वस्वरूप । निवळला तो सत्यसंकल्प । प्रांजळ प्रणवेंसीं ॥९१॥ निवळले पिंडब्रह्मांडप्रळय । निवळला पंचमप्रळय स्वयें । निवळ गुरुकृपेनें हृदय । प्रांजळ जालें ॥९२॥ गुरुकृपाज्ञानसूर्योदयीं । नुरे चि भवतमाची वार्ता तेहीं । चिदाकाशदशा पाहीं । संपूर्ण पाहली ॥ ९३ ॥ ऐसें निवळले स्वरूपज्ञान । दशदिशा स्वछ सनातन । दृश्य द्रष्टा ना दर्शन । ऐसें पाहलें ॥ ९४ ॥ पैस संचला सदोदित । वस्तुता तो चि मी अनंत । हा आत्मानुभव निवांत । जाला द्रष्टेपणाहूनि वेगळा ॥ ९५ ॥ दुजेपणें वीण येकपण । संचलें निर्मळ निश्चळ पूर्ण । बोध ना बोधकता संपूर्ण । कांहीं च नाडळे ॥९६॥ तत्वता वस्तू चि निरंजन । वस्तूसि वस्तूचें नसे भान । येकजिनसी प्रांतविहीन । संचली अखंडता ॥ ९७ ॥ उदास आसपास पैस । निरामास आकाश भकास । व्योम गाळींव निरावकाश । निवांत संचलें ॥ ९८ ॥ अष्टम रुद्रींचें निरूपण । उपशमलें ज्ञानेंसीं ज्ञान । पुढील क्रमासि कारण । कांहीं उरलें चि नसे ॥ ९९ ॥ नित्यमुक्ती वरील भक्ति । क्षुधित जाली नित्य तृप्ति । गुरुसेवा स्वानंदभुक्ति— । अपेक्षा अनिवार ॥ १०० ॥ ते भक्तीची निजप्रतीति । सद्गुरूची निर्विकार मूर्ति । कैवल्य अयो-

[1] अन्तरहित.

ध्याछत्रपति । सर्वस्वें सेविला ॥ १ ॥ तें नवमरुद्रीं निरूपण । श्रीरामयोगें अनुसंधान । निरोपील तें संपूर्ण । अवधारिजे श्रोतीं ॥ २ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । ज्ञानाग्निप्रळयउजाळा ।।म्हणे मेरुअनंत ॥ ३ ॥ अष्टमरुद्रे येकादशउल्लास संपूर्ण ॥

---

## रुद्र ९ उल्लास १

॥ श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

श्रीरामं परमानंदमुपदेष्टारमीश्वरं ।
व्यापकं सर्वलोकाना कारणं तं नमाम्यहं ॥

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ तीर्थस्वरूप । सकळतीर्थास्पद निष्पाप । सत्य सनातन चिद्रूप । अखंडतेनें ॥ १ ॥ अमळस्वरूप धरेवरीं । अभिन्नयोग निर्विकारी । आत्मा परेश साक्षात्कारी । अनुभवप्रतिष्ठा ॥ २ ॥ सदोदित परम विश्राम । स्वानंदघन आत्माराम । अनंत सद्गुरु परब्रह्म । कृपेनें बोळला ॥ ३ ॥ निरावर्णीं अनंतावर्णें । विस्तीर्ण देवालयें रचलीं सुवर्णें । तयामाजि देव तो चित्स्फुरणें । सदोदित असे ॥ ४ ॥ अक्रिय प्रतीतीची पूजा । ज्ञानें ज्ञेय अनुभऊनि बोजा । अर्चना होतसे निजतेजा । अभिन्न समर्पणें ॥ ५ ॥ अखंड देवापुढें सद्रूप । प्रकाशला विज्ञानदीप । निर्मळ देवाचें स्वरूप । निजदृष्टीसि न्याहळलें । अभेदप्रीतीचा पूजक । अखंड प्रसन्नतेसि भाव येक । समर्पूनि सर्वोत्तमीं विवेक । योजिला साक्षेपेंसीं ॥ ७ ॥ आदिदेव हा पुरातन । अनादि अनंत निरंजन । देखिला निजदृष्टीसि सुखैकघन । जाला तीर्थविधी ॥ ८ ॥ अनंत असोनि अभ्यंतरीं । आदिमध्यांत न पाहे दृष्टिभरी । यासि चुकोनि भ्रमसंस्कारी । संसारयात्रा करिती ॥ ९ ॥ नाना जन्मप्रवृत्ती ससारीं । सचित वाधोनि वासनेचे पदरीं । चुकावया ससारभ्रांति अंतरीं । भ्रम चि अर्जेविती ॥ १० ॥ सेवावे सद्गुरुचरण । सेविजे आत्मतीर्थ गहन । सुकृतद्रव्य-

राशि घेऊन । निघावें परमतीर्थें ॥ ११ ॥ प्रकृतिपुरुष परात्पर । तत्वता जाली निर्विकार । तयाचा अक्रिये क्रियाउद्धार । करावा बोधपुत्रें ॥ १२ ॥ निर्वाणस्थितिवैतरणी तरोन । कीजे स्वानुभवें पिंडतर्पण । गुरुकृपायोग पूर्ण । महा पर्वकाळ ॥ १३ ॥ या आत्मतीर्थासि न जातां । पितरें क्षोभतील तत्वता । सद्गतीनें सार्थक न होतां । अधोगतीसि पाविजे ॥ १४ ॥ अधोगति दुःख अपार । यमयातना अति घोर । पुन्हा गर्भवास अपस्मार । संसारप्रवृत्ति ॥ १५ ॥ या विषय निरर्कार्णवीं । पचेती परि त्रास नये जीवीं । आरूढोनि अहंकारतरुपल्लवीं । पुन्हा पतन पावती ॥ १६ ॥ हें पतन चुकवावयासी । सेवावें सद्गुरुपदासी । तेणें अज्ञान निवृत्तीसी । पाविजे सुखरूप ॥ १७ ॥ अज्ञानमूळहरण । जन्मकर्मनिवारण । सद्गुरुपदतीर्थ पावन । सेविजे सद्भावें ॥ १८ ॥ सकळ तीर्थाहूनि कोटिगुणें । अधिक गुरुपदतीर्थ गतीनें । देशिकपादसंस्कारें तरणें । भवसिंधुसी ॥ १९ ॥ नरदेह तारूं परम पावन । सद्गुरु कर्णधारें आपण । असोन भवाब्धी न तरे जाण । तो आत्महत्यारा ॥ २० ॥ आत्महत्या महापातक जनीं । याची संख्या केलीसे पुराणीं । कोटि गोहत्या प्रमाणी । येक ब्रह्महत्या बोलिजे ॥ २१ ॥ कोटि ब्रह्महत्या होतां । येक स्त्रीहत्या तत्वता । ऐश्या कोटि स्त्रीहत्या घडतां । येक भ्रूणहत्या बोलिजे ॥ २२ ॥ कोटि भ्रूणहत्या सेवटीं । येक यतिहत्येचें पातक सृष्टी । ऐश्या यतिहत्या कोटि । येक आत्महत्या बोलिजे ॥ २३ ॥ ऐश्या आत्महत्या निरंतर । होती त्याच्या पापासी नाहीं पार । पापें चि संभव पापें चि संसार । पापक्रिया धारे आचरे ॥ २४ ॥ ऐशिया पापापासूनि । सुटावया काय सुकृत असे

१ ' निरयार्णवीं ' म्हणजे नरकाच्या समुद्रांत असें असावें. २ दुःख पावतात. ३ सुकाणूवाला. ४ भ्रूणहत्या; गर्भहत्या. ५ आत्महत्या म्हणजे आत्मज्ञानापासून परावृत्त होणें. ही केली असतां अर्थात दुःखाच्या अनंत फेऱ्यांत जीव सांपडणार च. याविषयीं ईशावास्योपनिषदांत म्हटलें आहे, ' असुर्यानाम ते लोका अन्धेन तमसावृताः । तां स्ते प्रेत्याभिगच्छन्ति येके चात्महनो जनाः ' ॥३॥ आत्मघात करणारे लोक अत्यन्त भयंकर अशा लोकाप्रत मरणोत्तर जातात.

जनीं । असत्यें चि वर्ततो अज्ञानी । आत्महत्यारी जीव ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ नृदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभं प्लवं सुकल्पं गुरुकर्णधारं ।
मयानुकूलेन नभस्वतेरितं पुमान् भवाब्धिं न तरेत्स आत्महा॥१॥

सत्य तें चि सुकृत निदानीं । जाणिजे असत्य पाप जनीं । सत्य आत्मा स्वयें चि असोनि । असत्य मायेनें गोविलें ॥ २६ ॥ असत्य मायेचें निरसन । करी सद्गुरु समर्थ पावन । जावें आत्मतीर्थासी आपण । आपणा उद्धरावया ॥ २७ ॥ आत्महत्यादोषनिवृत्ति । होय पूर्वजासि सद्गति । परमहंसाचे संगती । जावें निष्क्रियपयोगें ॥ २८ ॥ करूनि प्रज्ञाभूप्रदक्षण । अंतरिक्षपथगमन । अलक्षगति चिद्गगन । आत्मतीर्था पाविजे ॥ २९ ॥ क्रमिता वृत्तिरूप पथ पूर्व । पाविजे निवृत्ति पश्चिम अपूर्व । दक्षण उत्तर मार्ग सर्व । पाहोन सोडिजे ॥ ३० ॥ गुरुभोयांलें दाखविला । तो मार्ग प्रत्ययासी आला । विदेश देश हात चालिला । परमसुखें ॥ ३१ ॥ सासरें चि माहेर होऊनि । भेटों आलें आपआपणा लागुनि । अनोळखी ओळखी देऊनि । सुखें बोळलीं ॥ ३२ ॥ कठिण दुःखें सुखें फळलीं । विष अमृतें वोळलीं । निष्ठुरें चि सप्या प्रवर्तलीं । केवळ विश्रांतीनें ॥ ३३ ॥ अज्ञान जालें ज्ञान सहज । गुप्त तें चि प्रगटलें गूज । अंधकार तो चि सतेज । विंबें प्रगटला ॥ ३४ ॥ क्रमोनि भवजन्मभूमि स्वयें । गुरुबोध आत्मप्रत्ययें । सदानंदघन निश्चयें । विष्णुरूप कृष्णातिरीं ॥ ३५ ॥ चित्प्रकाशाचें निजांग । आत्मानुभव मेरुलिंग । अनुभवदर्शनें सांग । नामें चि त्या रूढलें ॥ ३६ ॥ सकळतीर्थाचें तीर्थ स्वयें । प्रतीतीसी येऊनिया हृदय । आलों दक्षणमानसासि स्वयें । दैवीक गतीनें ॥ ३७ ॥ तीर्थ अधिष्ठानाचें निरंतर । प्राप्ति होति सद्गतीचें द्वार । तें मूळबांगळेसि अभ्यंतर । रुद्रदर्शन जालें ॥ ३८ ॥ लाधलीया गुरुपद केवळ । सकळ तीर्थाचे मार्ग सोज्वळ । तो स्मरणरूप अरुणाचळ । दुरूनि

१ घाटाच्यानें (?) २ या नावाच्या गावीं.

राशि घेऊन । निघावें परमतोयें ॥ ११ ॥ प्रकृतिपुरुष परात्पर । तत्वता जाली निर्विकार । तयाचा अक्रिये क्रियाउत्धार । कराया बोधपुत्रें ॥ १२ ॥ निर्वाणस्थितिवैतरणी तरोन । कीजे स्वानुभवें पिंडतर्पण । गुरुकृपायोग पूर्ण । महा पर्वकाळ ॥ १३ ॥ या आत्मतीर्थासि न जातां । पितरें क्षोभतीळ तत्वता । सद्गतीनें सार्थक न होतां । अधोगतीसि पाविजे ॥ १४ ॥ अधोगति दुःख अपार । यमयातना अति घोर । पुन्हा गर्भवास अपरमार । संसारप्रवृत्ति ॥ १५ ॥ या विषय निरकार्णवीं । पचेती परि त्रास नये जीवीं । आरूढोनि अहंकारतरुपल्लवीं । पुन्हा पतन पावती ॥ १६ ॥ हें पतन चुकवावयासीं । सेवावें सद्गुरुपदासी । तेणें अज्ञान निवृत्तीसी । पाविजे सुखरूप ॥ १७ ॥ अज्ञानमूळहरण । जन्मकर्मनिवारण । सद्गुरुपदतीर्थ पावन । सेविजे सद्भावें ॥ १८ ॥ सकळ तीर्थांहूनि कोटिगुणें । अधिक गुरुपदतीर्थ गतीनें । देशिकपादसंस्कारें तरणें । भवसिंधूसी ॥ १९ ॥ नरदेह तारूं परम पावन । सद्गुरु कर्णधारु[3] आपण । असोन भवाब्धी न तरे जाण । तो आत्महत्यारा ॥ २० ॥ आत्महत्या महापातक जनीं । याची संख्या केलीसे पुराणीं । कोटि गोहत्या प्रमाणी । येक ब्रह्महत्या बोलिजे ॥ २१ ॥ कोटि ब्रह्महत्या होतां । येक स्त्रीहत्या तत्वता । ऐस्या कोटि स्त्रीहत्या घडतां । येक भ्रूणहत्या बोलिजे ॥ २२ ॥ कोटि भ्रूणहत्या सेवटीं । येक यतिहत्येचें पातक सृष्टी । ऐश्या यतिहत्या कोटि । येक आत्महत्या बोलिजे ॥ २३ ॥ ऐश्या आत्महत्या निरंतर । होती त्याच्या पापासी नाहीं पार । पापें चि संभव पापें चि संसार । पापक्रिया धारी आचरे ॥ २४ ॥ ऐशिया पापापासूनि । सुटावया काय सुकृत असे

१ 'निरयार्णवीं' म्हणजे नरकाच्या समुद्रांत असें असावें. २ दुःख पावतात. ३ सुकाणूवाला. ४ भ्रूणहत्या; गर्भहत्या. ५ आत्महत्या म्हणजे आत्मज्ञानापासून परावृत्त होणें. ही केली असतां अर्थात दुःखाच्या अनंत फेऱ्यांत जीव सांपडणार च. याविषयीं ईशावास्योपनिषदांत म्हटलें आहे, 'असुर्यानाम ते लोका अन्धेन तमसावृताः । तां ँस्ते प्रेत्याभिगच्छन्ति येके चात्महनो जनाः' ॥३॥ आत्मघात करणारे लोक अत्यन्त भयंकर अशा लोकाप्रत मरणोत्तर जातात.

देखिला ॥ ३९ ॥ जेथें सत्स्वरूपप्राप्ति निवळ । तो चित्कल्लोळ अरुणा-चळ । पावतां तये वस्तीसि अढळ । आत्मतीर्थ गुरुकृपा ॥ ४० ॥ तये स्थळींचा निवासी । सद्गुरु अनंत निश्चयेंसीं । जोडला जिवलग आम्हांसी । पूर्वसुकृतयोगें ॥ ४१ ॥ तो आत्मा चि होय परम । जिवीचा जीव निजविश्राम । परम कृपाळु सुखैकधाम । परत्रीचा सखा ॥ ४२ ॥ स्नेहसहवासीं ठेऊनि । आपंगिलें तेणें मजलागुनि । आपल्या जिविच्या गोष्टी सांगोनि । वेध केला हृदयासी ॥ ४३ ॥ प्रवृत्ति-ऐश्वर्ये श्रीमंत । मी असतां हि भवउन्मत्त । स्नेहसहवासें कृपायुक्त । दिवसेंदिवस बोधिलें ॥ ४४ ॥ सद्गुरु अनंताची पत्नी । परमस्नेहाळ ते माझी जननी । परमार्थरूप मजलागूनि । संभविलें तिनें[1] ॥ ४५ ॥ मजकारणें स्वामीसि प्रार्थूनि । महावाक्य[2] सांगविलें श्रवणीं । परम प्रीतीनें अंतःकरणीं । अर्थ प्रांजळ केला ॥ ४६ ॥ मार्ग चुकोनि अट्टरानीं । जात होतों मरमरोनि । पंथ दाऊनि निजनयनीं । आणिलें सुखवस्तीसीं ॥ ४७ ॥ तिये मातेचा कृतोपकार । मी उत्तीर्ण नव्हे चि पामर । जन्ममरणसंस्कार । अपार चुकविले माझे ॥ ४८ ॥ सद्गुरुपदातें पावविलें । तेणें चि सार्थक माझें जालें । तियेसि गुरुत्वें चि म्या वंदिलें । गुरुवामांकीं सहज ॥ ४९ ॥ सत्य सद्गुरु अनंतमौनि । स्वरूपाचा अनुभव रूढोनि । परम सुश्याम सगुणी । लावण्यतेजें शोभत ॥ ५० ॥ भव्य सुप्रसन्नवदन । राजीवाक्ष कृपाघन । कृपावलोकनें पूर्ण । आपुलें सुख देत ॥ ५१ ॥ आजानुबाहु विशालहृदय । कंबुग्रीव सुखाच्या विस्मयें । सुहास्यवदन तेजोमय । शोभती दशनपंक्ती ॥ ५२ ॥ विशाळ भ्रूलता सरळ । सुरेख नासापुटी केवळ । तांबोल वदनीं रसाळ । अमृतभाषणी ॥ ५३ ॥ उदारदृष्टीनें विलोकित । ठेऊनि कृपेचा मस्तकीं हात । सांगितलें श्रवणीं अप्रांत । तत्व आपुलें हृदयींचें ॥ ५४ ॥ स्वानंदयुक्त नित्य बैसका । प्रतीतीचा बोध होय निका । दाऊनि स्वरूपभू-

[1] मला परमार्थाकडे वळवून जणूं दुसरा जन्म च दिला. [2] तत्वमसि इत्यादि आत्मस्वरूपबोध करणारीं वाक्यें.

मिक्षा । केलें योगारूढ ॥ ५५ ॥ संप्रज्ञात सुखें समाधी । देत निर्वि-कल्पतेची शुध्दी । सहजस्थितीची रिध्दी । स्वाधीन केली ॥ ५६ ॥ परम सुंदर मनोहर । अनंत सद्गुरु सत्यावतार । पूजूनि सद्भावें निरंतर । हृदयीं ठेविला ॥ ५७ ॥ अनंत माझें गतिदायक तीर्थ । अनंत प्रत्यक्ष माझा परमार्थ । अनंतदर्शनें मी कृतार्थ । समर्पलों अनंतपदीं ॥ ५८ ॥ अनंतप्राप्तीनें प्रारब्धस्थिति । देहयात्रा आत्मप्रतीति । क्षेत्रयोगें तीर्थ घडती । स्वभावरीतीनें ॥ ५९ ॥ पावनमणीमुक्ततीरिं । स्वसुखवर्धन वर्धागिरी । सेऊनि विज्ञानकावेरीचे कांठावरी । पाहिला स्वानंद कुंमेश्वर ॥ ६० ॥ भवचक्रहर चक्रपाणी । सारंगपाणि भवदैत्यदमनी । अनुभवसुखें कुंभकोणीं । सेविले हरिहर ॥ ६१ ॥ तेथून सुत्रैयचंपकारण्यीं । येऊनि पाहिला निजनयनीं । आत्माराज गोप वेत्रपाणि । दक्षिणद्वारकाधीश ॥ ६२ ॥ तेथें सद्गुरु श्रीअनंत । आला सच्छिष्यवात्सल्यें धावत । मनोरथ सिध्दीनें निवात । राहिला दक्षिणद्वारकेसी ॥ ६३ ॥ परमार्थराज्यसाक्षात्कारी । करीत राहिला आचंद्रार्कवरि । राघवउपासक तो निर्धारी । राम प्रत्यक्ष जयासी ॥ ६४ ॥ अनंतें दक्षिणद्वारकेंत । केली दक्षिणअयोध्या शाश्वत । निर्मूनि देवाळय अद्भुत । राम वसविला ॥ ६५ ॥ कल्पकोटि रामभजन । चालावें परंपरेसीं संपूर्ण । श्रीरामासि मागोनि वरदान । आपुला केला सुखें ॥ ६६ ॥ होऊनियां क्षेत्रसंन्यासी । अनंतें श्रीरामीं केली मिरासी । स्वस्वरूपसिध्दविश्रांतीसि । वसविला वास्तव्यमठ ॥ ६७ ॥ श्रीमुखें नाम संवत्सर । भाद्रपदवादि नौमी स्थिरवारें । अनंतसद्गुरूनें पूर्णावतार । केला सहजस्थितीनें ॥ ६८ ॥ तेव्हां गतकळि निर्धार । च्यारिसहस्र सप्तशतापर । जाले चौराण्वौ संवत्सर । मासदिवसक्रमें ॥ ६९ ॥ स्वानंदघनचंपकउद्यान । सद्गुरुअनंतें करूनि अधि-

---

१ सविकल्प समाधि, ज्यात भावनाचा पूर्ण लय झाला नाहीं असा समाधि. २ शके १६१५ अनंतमौनींचा समाधिशक ३ शनिवार. ४ गतकलि ४७९४ म्हणजे शके १६१५ श्रीमुखनाम संवत्सर. शालिवाहन शकाच्या आरंभी गतकलि ३१७९ होता.

स्थान । दिली मिरासी मज संपूर्ण । स्वरूपऐश्वर्येंनसी ॥ ७० ॥ तेथूनि भवाब्धीसि बोधसेतु । रचिला अळंकृत मोक्षकेतु । तो परमात्मा राम निर्हेतु । पाहिला रामेश्वर ॥ ७१ ॥ विरक्तिदर्भासनीं शयन । वधावयासि अहंरावण । तो परमात्मा रघुनंदन । पाहिला तेथें ॥ ७२ ॥ स्वरूपजाग्रती ये माझारीं । पश्चिमतीर्थें निर्धारीं । गुप्त प्रगट चमत्कारीं । जाली समुद्रतीरें ॥ ७३ ॥ स्वरूपयोग अविकळ । पाहिला अगस्तिआश्रम केवळ । भवपापनाशी चित्कल्लोळ । घेतली जळधार मस्तकीं ॥ ७४ ॥ तेथें कोदंडदीक्षा धनुष्पाणी । देखिले रामलक्ष्मण नयनीं । गजेंद्रमोक्षासि तेथूनि । येऊनि सेविलें स्वभावें ॥७५॥ भवनक्रें जळीं अवरोधिला । भावगजेंद्र जर्जर जाला । आत्माविष्णूनें येऊनि त्याला । सोडविलें स्वहस्तें ॥ ७६ ॥ चक्रें हाणोनि दुर्धर । भवनक्राचें फोडिलें शिर । धाराप्रवाहें रुधिर । तऱ्हीं नेत्र सोडीना ॥ ७७ ॥ जळीं घालूनियां स्वकर । गजनक्रासि काहाडिलें बाहेर । दोघांसि कृतार्थ करूनि थार । दीधली निजभुवनीं ॥ ७८ ॥ मायास्वरूप साक्षात्कारी । अबीजा ते ब्रह्मकुमारी । स्वरूपरामप्राप्तीस्तव करी । अद्यापिवरि तप ॥ ७९ ॥ विज्ञानशंखमुखीं सागरीं । नित्यमुक्तांची खाणि साजिरी । पाहोन अनंताच्या निजनिर्धारीं । सुचंद्र तो पाहिला ॥ ८० ॥ न होतां त्रिभुवनवन । आदिवर्तित सुछिद्र पावन । ब्रह्मरूपनिर्वाण तीर्थविधीनें केलें ॥ ८१ ॥ स्वानंदभुवनीं निवांत । पाहिला आत्मा आदि अनंत । सदचिद अनंतकृत । द्वारांतूनि ॥ ८२ ॥ तैसा चिन्मुख्य अनंतशयन । तत्त्वमस्यादि द्वारांतून । आदिमध्यांतविहीन । देखिला आदिमध्यांतीं ॥ ८३ ॥ असत्यभावें विसर्जन । केलें संध्यावसत्य आपोशनें । करी अज्ञानजनासि अर्दन । तो जनार्दन वंदिला ॥ ८४ ॥ अपरोक्षभक्ति नवविध । तेणें येक आत्मप्राप्ती विशुध । त्या नव त्रियंति प्रसिध । जाल्या तीर्थविधानें ॥ ८५ ॥ आत्मवैकुंठ कंठीरवें । बोधकैलासींचा शरभ शिव । ऐक्यासि येऊनि अभिनव । शंकर नारायण पाहिला ॥ ८६ ॥ विदेहमर्थे सर्वसाक्षी । चिच्छक्ति स्वयंभ मीनाक्षी । मीनमार्गें

१ दीप. २ ( ? ). ३ नाश. ४ तिरुपति ( ? ). ५ सिद्ध. ६ ( ? ).

चि सुलक्षी । वंदिली ते आदि अंबा ॥ ८७ ॥ चित्तचोरटा अभिनव । पाहिला तो अळंगिरीचा देव । पुण्यदायक अनुभव । निर्मळ प्रवाह सेविले ॥ ८८ ॥ विज्ञानजंबुवृक्षमूळीं । आपोलिंग चित्कल्लोळजळीं । चित्प्रकाशाच्या राउळीं । पाहिलें जंबुलिंग तें ॥ ८९ ॥ नित्यप्रतीति श्रीरंगलीला । शोभली कावेरीवनमाळा । त्या चि क्रमें रंगत्रयजिव्हाळा । लाधलों तीर्थविधीनें ॥ ९० ॥ ब्रह्मत्वें ब्रह्महत्यामोचन । जालें तो सप्रतीत मध्यार्जुन । आच्यापि प्रतिध्वनींनें जन । शैव्य ते प्रतीत पाहिली ॥ ९१ ॥ प्राण निवेदितां उर्वरित । पाहिला पंचवदन हृदयस्थ । ज्याच्या दर्शनें सदोदित । कैलासवस्ति ॥ ९२ ॥ चिदंबिका माळा मयूरी । शिवप्राप्तीस्तव तपश्चर्या करी । शिव प्रत्यक्ष होय गौरी । गौरी मायूर जाहलें ॥ ९३ ॥ आत्माविष्णु ज्ञानस्वभावें । मोक्षरमेसीं क्रीडे अभिनवें । रोपें त्यागेश होऊनि रूपें नावें । पालटोनि राहिला ॥ ९४ ॥ ज्ञानकमळा धरूनि सोय । प्रगट होऊनि कमळालयें । निजात्मवल्लभास्तव पाहे । अनुष्ठितसे अद्यापि ॥ ९५ ॥ अणुपासूनि विस्तीर्ण । सूक्ष्म होय मधुसूदन । देखिलें स्वानंदनिधान । रुद्रपद दर्शनीं ॥ ९६ ॥ बोधसिह्यौळीचा गुप्त भैरव । भूतशासनस्वभाव । पाहिला वैद्यनाथ निर्भेव । जाग्रतीस्थळीचा ॥ ९७ ॥ निराकार स्वयंभस्थिति । पाहिला चिदंबर-प्रतीति । ज्ञेयकांचीचा विख्यात जगतीं । तो येकांबर वंदिला ॥ ९८ ॥ स्वरूपवरदाता सहज । वंदिला विश्रांतिवरदराज । चित्छक्ति पूर्णकाम सतेज । ते कामाक्षी पाहिली ॥ ९९ ॥ स्वबोधशेषाचळनिवासी । प्रत्यक्ष भूवैकुंठ तेजोराशी । सुवर्णदेवालयीं चिद्विलासी । पाहिला आत्मा वेंकटेश ॥ १०० ॥ ज्ञप्तिसुखसत्रापवन । जालें काळहस्तीचें दर्शन । भाव गोपीचंदनीं प्रगटोन । असे तो कृष्ण उडपेचा ॥ १ ॥ अक्षी ब्रह्मत्व समर्पून । उपदेशें करी ब्रह्मसंतर्पण । सुब्रह्मण्य कृपाघन । तो सद्गुरु वंदिला ॥ २ ॥ पूर्णकाम क्षोभें संभवोन । प्रसिद्धीसी आला कामारिनंदनें । विदेहमुक्तीसि कवळोन । भोगी त्रैलोक्यवनिता ॥ ३ ॥

१ (?). २ (?). ३ सह्याद्रीचा.(?). ४ कार्तिकेय.

स्थान । दिली मिरासी मज संपूर्ण । स्वरूपऐश्वर्येंनसी ॥ ७० ॥ तेथूनि भवाब्धीसि बोधसेतु । रचिला अलंकृत मोक्षकेतु । तो परमात्मा राम निर्हेतु । पाहिला रामेश्वर ॥ ७१ ॥ विरक्तिदर्भासनीं शयन । वधाव- यासि अहंरावण । तो परमात्मा रघुनंदन । पाहिला तेथें ॥ ७२ ॥ स्वरूपजाग्रती ये माझारीं । पश्चिमतीर्थें निर्धारीं । गुप्त प्रगट चम- त्कारीं । जाली समुद्रतीरें ॥ ७३ ॥ स्वरूपयोग अविकळ । पाहिला अगस्तिआश्रम केवळ । भवपापनाशी चित्कल्लोळ । घेतली जळधार मस्तकीं ॥ ७४ ॥ तेथें कोदंडदीक्षा धनुष्पाणी । देखिले रामलक्ष्मण नमनीं । गजेंद्रमोक्षासि तेथूनि । येऊनि सेविलें स्वभावें ॥७५॥ भवनक्रें जळीं अवरोधिला । भावगजेंद्र जर्जर जाला । आत्माविष्णूनें येऊनि त्याला । सोडविलें स्वहस्तें ॥ ७६ ॥ चक्रें हाणोनि दुर्धर । भवनक्राचें फोडिलें शिर । धाराप्रवाहें रुधिर । तन्ही नक्र सोडीना ॥ ७७ ॥ जळीं घालूनियां स्वकर । गजनक्रासि काहाडिलें बाहेर । दोघांसि कृतार्थ करूनि थार । दीधली निजभुवनीं ॥ ७८ ॥ मायास्वरूप साक्षात्कारी । अवीजा ते ब्रह्मकुमारी । स्वरूपरामप्राप्तीस्तव करी । अद्यापिवरि तप ॥ ७९ ॥ विज्ञानशंखमुखीं सागरीं । नित्यमुक्तांची खाणि साजिरी । पाहोन अनंताच्या निजनिर्धारीं । सुचंद्र तो पाहिला ॥ ८० ॥ न होतां त्रिभुवनवन । आदिवस्ति सुछिद्र पावन । ब्रह्मरूपनिर्वाण तीर्थविधानें केलें ॥ ८१ ॥ स्वानंदभुवनीं निवांत । पाहिला आत्मा, आदि अनंत । सदचिद अनंतकृत । द्वारांतूनि ॥ ८२ ॥ तैसा चि मुख्य अनंतशयन । तत्त्वमस्यादि द्वारांतून । आदिमध्यांतविहीन । देखिला आदिमध्यांतीं ॥ ८३ ॥ असत्यभावें विसर्जन । केलें सद्भावसत्य आपोशनें । करी अज्ञानजनासि अर्दन । तो जनार्दन वंदिला ॥ ८४ ॥ अपरोक्षभक्ति नवविध । तेणें येक आत्मप्राप्ती विशुध । त्या नव त्रिपति प्रसिध्य । जाल्या तीर्थविधानें ॥ ८५ ॥ आत्मवैकुंठ कंठीरवें । बोध- कैलासींचा शरभ शिव । ऐक्यासि येऊनि अभिनव । शंकर नारायण पाहि- ला ॥ ८६ ॥ विदेहमधैरे सर्वसाक्षी । चिच्छक्ति स्वयंम मीनाक्षी । मीनमार्गें

१ शेष. २ ( ? ). ३ नाश. ४ तिरुपति ( ? ). ५ शिंह. ६ ( ? ).

चि सुलक्षी। वंदिली ते आदि अंबा ॥ ८७ ॥ चित्तचोरटा अभिनव। पाहिला तो अळेगिरीचा देव। पुण्यदायक अनुभव। निर्मळ प्रवाह सेविला ॥ ८८ ॥ विज्ञानजंबुवृक्षमूळीं। आपोलिंग चित्कल्लोळजळीं। चित्प्रकाशाच्या राउळीं। पाहिलें जंबुलिंग तें ॥ ८९ ॥ नित्यप्रतीति श्रीरंगळीला। शोभली कावेरीवनमाळा। त्या चि क्रमें रंगत्रयजिव्हाळा। लाधलों तीर्थविधीनें ॥ ९० ॥ ब्रह्मत्वें ब्रह्महत्यामोचन। जालें तो सप्रतीत मध्यार्जुन। आद्यापि प्रतिष्ठनीनें जन। शेव्य ते प्रतीत पाहिली ॥ ९१ ॥ प्राण निवेदिता उर्वरित। पाहिला पंचवदन हृदयस्थ। ज्याच्या दर्शनें सदोदित। कैलासवस्ति ॥ ९२ ॥ चिदंबिका माळा मयूरी। शिवप्राप्तीस्तव तपश्चर्या करी। शिव प्रत्यक्ष होय गौरी। गौरी मायूर जाहलें ॥ ९३ ॥ आत्माविष्णु ज्ञानस्वभावें। मोक्षरमेसीं क्रीडे अभिनवें। रोपें त्यागेश होऊनि रूपें नावें। पालटोनि राहिला ॥ ९४ ॥ ज्ञानकमळा धरूनि सोय। प्रगट होऊनि कमळालयें। निजात्मब्रह्मास्तव पाहे। अनुष्ठितसे अद्यापि ॥ ९५ ॥ अणुपासूनि विस्तीर्ण। सूक्ष्म होय मधुसूदन। देखिलें स्वानंदनिधान। रुद्रपद दर्शनी ॥ ९६ ॥ बोधसिद्धीळींचा गुप्त भैरव। भूतशासनस्वभाव। पाहिला वैद्यनाथ निभेत्र। ज्ञप्रतीस्थळीचा ॥ ९७ ॥ निराकार स्वयंभस्थिति। पाहिला चिदंबरप्रतीति। ज्ञेयकाचीचा विख्यात जगतीं। तो येकांबर वंदिला ॥ ९८ ॥ स्वरूपवरदाता सहज। वंदिला विश्रांतिवरदराज। चित्छक्तिपूर्णकाम सतेज। ते कामाक्षी पाहिली ॥ ९९ ॥ स्वबोधशेषाचलनिवासी। प्रत्यक्ष भूवैकुंठ तेजोराशी। सुवर्णदेवालयी चिद्विलासी। पाहिला आत्मा वेंकटेश ॥ १०० ॥ ज्ञप्तिसुखसत्पावन। जालें काळहस्तीचें दर्शन। भाव गोपीचदनीं प्रगटोन। असे तो कृष्ण उडपेचा ॥ १ ॥ ब्रह्मी ब्रह्मत्व समर्पून। उपदेशें करी ब्रह्मसंतर्पण। सुब्रह्मण्य कृपाघन। तो सद्गुरु वंदिला ॥ २ ॥ पूर्णकाम क्षोभें संभरोन। प्रसिद्धीसी आला कामारिनंदनें। विदेहमुक्तीसि कवळोन। भोगी त्रैलोक्यवनिता ॥ ३ ॥

१ (?) २ (?). ३ सह्याद्रीचा.(?). ४ कार्तिकेय.

ष्ठान । दिली मिरासी मज संपूर्ण । स्वरूपऐश्वर्यैनसी ॥ ७० ॥ तेथूनि भवाब्धीसि बोधसेतु । रचिला अळंकृत मोक्षकेतु । तो परमात्मा राम निर्हेतु । पाहिला रामेश्वर ॥ ७१ ॥ विरक्तिदर्भासनीं शयन । वधावयासि अहंरावण । तो परमात्मा रघुनंदन । पाहिला तेथें ॥ ७२ ॥ स्वरूपजाग्रती ये माझारीं । पश्चिमतीर्थें निर्धारीं । गुप्त प्रगट चमत्कारीं । जाली समुद्रतीरें ॥ ७३ ॥ स्वरूपयोग अविकळ । पाहिला अगस्तिआश्रम केवळ । भवपापनाशी चित्कल्लोळ । घेतली जळधार मस्तकीं ॥ ७४ ॥ तेथें कोदंडदीक्षा धनुष्पाणी । देखिले रामलक्ष्मण नयनीं । गजेंद्रमोक्षासि तेथूनि । येऊनि सेविलें स्वभावें ॥७५॥ भवनक्रें जळीं अवरोधिला । भावगजेंद्र जर्जर जाला । आत्माविष्णूनें येऊनि त्याला । सोडविलें स्वहस्तें ॥ ७६ ॥ चक्रें हाणोनि दुर्धर । भवनक्राचें फोडिलें शिर । धाराप्रवाहें रुधिर । तन्हीं नक्र सोडीना ॥ ७७ ॥ जळीं घालूनियां स्वकर । गजनक्रासि काहाडिलें बाहेर । दोघांसि कृतार्थ करूनि थार । दीधली निजभुवनीं ॥ ७८ ॥ मायास्वरूप साक्षात्कारी । अबीजा ते ब्रह्मकुमारी । स्वरूपरामप्राप्तीस्तव करी । अद्यापिवरि तप ॥ ७९ ॥ विज्ञानशंखमुखीं सागरीं । नित्यमुक्तांची खाणि साजिरी । पाहोन अनंताच्या निजनिर्धारीं । सुचंद्र तो पाहिला ॥ ८० ॥ न होतां त्रिभुवनवन । आदिवस्ति सुछिद्रं पावन । ब्रह्मरूपनिर्वाण तीर्थविधीनें केलें ॥ ८१ ॥ स्वानंदभुवनीं निवांत । पाहिला आत्मा आदि अनंत । सदचिद अनंतकृत । द्वारांतूनि ॥ ८२ ॥ तैसा चिन्मुख्य अनंतशयन । तत्त्वमस्यादि द्वारांतून । आदिमध्यांतविहीन । देखिला आदिमध्यांतीं ॥ ८३ ॥ असत्यअभावें विसर्जन । केलें सद्भावसत्य आपोशनें । करी अज्ञानजनासि अर्दन । तो जनार्दन वंदिला ॥ ८४ ॥ अपरोक्षभक्ति नवविध । तेणें येक आत्मप्राप्ती विशुध । त्या नव त्रिपति प्रसिध । जाल्या तीर्थविधानें ॥ ८५ ॥ आत्मवैकुंठ कंठीरवें । बोधकैलासींचा शरभ शिव । ऐक्यासि येऊनि अभिनव । शंकर नारायण पाहिला ॥ ८६ ॥ विदेहमर्धरे सर्वसाक्षी । चिच्छक्ति स्वयंभ मीनाक्षी । मीनमार्गें

१ शेष. २ ( ? ). ३ नाश. ४ तिरुपति ( ? ). ५ छिद्र. ६ ( ? ).

चि सुलक्षी। वंदिली ते आदि अंबा ॥ ८७ ॥ चित्तचोरटा अभिनव। पाहिला तो अळेगिरीचा देव। पुण्यदायक अनुभव। निर्मळ प्रवाह सेविला ॥ ८८ ॥ विज्ञानजंबुवृक्षमूळीं। आपोलिंग चित्कल्लोळजळीं। चित्प्रकाशाच्या राउळीं। पाहिलें जंबुलिंग तें ॥ ८९ ॥ नित्यप्रतीति श्रीरंगलीला। शोभली कावेरीवनमाळा। त्या चि क्रमें रंगत्रयजिव्हाळा। लाधलों तीर्थविधीनें ॥ ९० ॥ ब्रह्मत्वें ब्रह्महत्यामोचन। जालें तो सप्रतीत मध्यार्जुन। आद्यापि प्रतिध्वनीनें जन। शेव्य ते प्रतीत पाहिली ॥ ९१ ॥ प्राण निवेदितां उर्वरित। पाहिला पंचवदन हृदयस्थ। ज्याच्या दर्शनें सदोदित। कैलासवस्ति ॥ ९२ ॥ चिदंबिका माळा मयूरी। शिवप्राप्तीस्तव तपश्चर्या करी। शिव प्रत्यक्ष होय गौरी। गौरी मायूर जाहलें ॥ ९३ ॥ आत्माविष्णु ज्ञानस्वभावें। मोक्षरमेसीं क्रीडे अभिनवें। रोपें त्यागेश होऊनि रूपें नावें। पाळटोनि राहिला ॥ ९४ ॥ ज्ञानकमळा धरूनि सोय। प्रगट होऊनि कमळालयें। निजात्मवल्लभास्तव पाहे। अनुष्ठितसे अद्यापि ॥ ९५ ॥ अणुपासूनि विस्तीर्ण। सूक्ष्म होय मधुसूदन। देखिलें स्वानंदनिधान। रुद्रपद दर्शनी ॥ ९६ ॥ बोधसिद्धीळीचा गुप्त भैरव। भूतशासनस्वभाव। पाहिला वैद्यनाथ निर्भव। जाप्रतीस्थळीचा ॥ ९७ ॥ निराकार स्वयंमस्थिति। पाहिला चिदंबर प्रतीति। ज्ञेयकांचीचा विख्यात जगतीं। तो येकाबर वंदिला ॥ ९८ ॥ स्वरूपवरदाता सहज। वंदिला विश्रांतिवरदराज। चित्छक्ति पूर्णकाम सतेज। ते कामाक्षी पाहिली ॥ ९९ ॥ स्वबोधशेषाचळनिवासी। प्रत्यक्ष भूवैकुंठ तेजोराशी। सुवर्णदेवालयीं चिद्विलासी। पाहिला आत्मा वेंकटेश ॥ १०० ॥ ज्ञप्तिसुखसत्तापघन। जालें काळहस्तीचें दर्शन। भाव गोपीचंदनीं प्रगटोन। असे तो कृष्ण उडपेचा ॥ १ ॥ ब्रह्मी ब्रह्मत्व समर्पून। उपदेशें करी ब्रह्मसंतर्पण। सुब्रह्मण्य कृपाघन। तो सद्गुरु वंदिला ॥ २ ॥ पूर्णकाम क्षोभें संभवोन। प्रसिद्धीसी आला कामारिनंदन। विदेहमुक्तीसि कवळोन। भोगी त्रैलोक्यवनिता ॥ ३ ॥

---

१ (?). २ (?). ३ सह्याद्रीचा.(?). ४ कार्तिकेय.

स्वरूपसतीपातिव्रत्यभंगें । पार्वतीप्रति सतीवृंद सांगे । ते प्रत्यक्ष जगीं निजांगें । प्रगटोनि राहे ॥ ४ ॥ विन्मुख स्वामि कार्तवीर्य । निवृत्तिदरकुटींत पळोनि जाय । शर्वाणी पाठीं लागोनि स्वयें । धरूं धांवे तयासि ॥ ५ ॥ संभवआस्तिक्य क्षीर टाकी । येकांतवस्तीसि अवलोकी । तो षण्मुख निजविवेकी । प्रत्यक्ष पाहिला ॥ ६ ॥ आत्मसायुज्यनदी खडतरोनि । भेदिला शेषाचळ पुच्छस्थानीं । तो मल्लिकार्जुन निजनयनीं । प्रत्यक्ष पाहिला ॥ ७ ॥ आत्मा स्वयंभअवस्थातीत । वंदिला तो अहोबळ शाश्वत । स्वसुखपानकें नृसिंह अद्भुत । पाहिला आत्मदृष्टीनें ॥८॥ वृत्तिपाताळीं हटकेशअर्चन । कारिती भावब्रह्मादि सुरगण । ते प्रतीतिअर्णवा आंतून । निर्माल्य गोकर्णासि ये ॥ ९ ॥ तो प्रत्यगात्मा गोकर्ण । पाहिला स्वरूपें चि संपूर्ण । निवृत्तिपश्चमसमुद्रीं विज्ञान-। हरिहरेश वंदिला ॥ ११० ॥ प्रवृत्तीनें चळेना निर्विशेष । बोधसिंह्याद्रिवरी महाबळेश । अभ्यंतरींचा स्वप्रकाश । आला प्रत्ययासी ॥ ११ ॥ पापकर्मधौत घूमेश । वृत्तिकोटिलिंग कोटेश । विष्णुतनु कृष्णातीरीं प्रवेश । पाहिला डोळां ॥ १२ ॥ या दक्षिणमानसीचीं तीर्थें । जालीं गुरुकृपा परमार्थें । तैसीं च उत्तरमानसीचीं स्वार्थें । तीर्थें अवधारिजे ॥ १३ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । दक्षिणमानसतीर्थमाळा । म्हणे मेरुअनंत ॥ ११४[४] ॥ नवमरुद्रे प्रथमउल्लास: संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ संगती । दक्षिणमानस आत्मप्रतीति । जालीं तीर्थें पावनस्थिति । उत्तरमानस अवधारा ॥ १ ॥ सकळ तीर्थांचें माहेर । गुरुपदयोग निर्धार । नित्य आत्मानुसंधानपर । तीर्थें पावन ॥ २ ॥ प्रवृत्तीचें पाप निरसावया । तीर्थें पवित्र असती भूमीत या । तीर्थांचें पापमळ हरावया । साधु तीर्थरूप स्वयें ॥ ३ ॥ अध्यात्मज्ञान जयासी । तो सकळतीर्थांची काशी । तीर्थराज गुरु मा-

१ पार्वती. २ (?). ३ मागें ९७ ओवीवरील टीप पहा. ४ मूळांत ११५ ओव्या आहेत. फक्त आंकड्यांत चूक आहे ११२ या आकडा नाहीं. दुसऱ्या प्रतीतहि अशी च चूक झाली आहे..

नसीं [1]अखंड जयाच्या ॥ ४ ॥ उत्तरमानस परात्पर । स्वस्वरूप निरंतर । अनुसंधानस्वरूप साचार । प्रतीति अवसर तीर्थें ॥ ५ ॥ स्वरूपब्रह्मगिरीवरी स्वानंद । अभिन्नानुभव सुखकंद । आत्मात्र्यंबक निजनिर्द्वंद्व । स्फूर्तिगोदाउगमींचा ॥ ६ ॥ भवभीमाउगमीचा भयंकर । कामदमन भीमशंकर । विज्ञानयोगप्रभाकर । ज्योतिर्लिंगतेजें ॥ ७ ॥ शंभु स्वानंदशिखरावरी । पाहिला योग निर्धारीं । जो विश्रांतिकर अभ्यंतरीं । राजयोगेश्वराचा ॥ ८ ॥ देहपंढरीसी निर्धारीं । विज्ञानभीमा योगतिरीं । उभा शांतिइटेवरि । कर कटावरी देखिला ॥ ९ ॥ विश्रांतिरुक्मिणीवर विठल । नवविधाभक्तीचा घोष प्रबळ । कीर्तनसुखें सर्वकाळ । जेथें गजर होतसे ॥ १० ॥ पाहातां निवळे निजनयन । भवाब्धी सुचवी कटिप्रमाण । भावपुंडलिकें तें मुक्तीनिधान । प्रगट केलें जनीं ॥ ११ ॥ चित्कल्लोळतीर्थीं पावन । विश्रांतितुळजा सुखैकघन । पाहिली निजदृष्टीसि परतोन । उपरम नव्हे चि ॥ १२ ॥ अहंममत्वविहीन भावें । सोहंस्वरूपानुभवविमर्वे । ज्ञानज्योतिर्लिंग बरवें । आवढा नागनाथ ॥ १३ ॥ साक्ष्यत्वातीत सहज । विज्ञान उज्जनींत महंकाळ[1] सतेज । अकाळयोगें आत्मा निजगुज । पाहिला शिव तो सुखें ॥ १४ ॥ प्रळयवृत्तीसि न येतां । ज्योतिर्लिंग स्वभावता । परळी वैद्यनाथ तत्वता । पाहिला हृदयांवरीं ॥ १५ ॥ जो अमळप्रणवांतरीं स्थिर । ज्योतिर्लिंगस्थिति निर्धार । तो वोंकार अमरेश्वर । पाहिला हृदयभुवनीं ॥ १६ ॥ निर्वाणशिवालय संपूर्ण । आत्माघुमेश्वर पावन । ज्योतिर्लिंग सनातन । पाहिलें हृदयालयीं ॥ १७ ॥ विष्णुअवतार साक्षात्कारी । प्रगटला दैविक देवकीचे उदरीं । सद्भाववसुदेव निर्धारीं । वासुदेव जाहला ॥ १८ ॥ वसविली भक्तिद्वारावती । वर्धेला मायामथुरेसि श्रीपति । तो परमात्मा विष्णुमूर्ति । पाहिला निजदृष्टीसीं ॥ १९ ॥ सप्रेमें यशोदानंदवर्धन । भगवद्गीता मोक्षनिदान । अर्जुन निमित्तासी करून । त्रैलोक्य उद्धरिलें ॥ २० ॥ उन्मेषशंखद्वारीं नाद-

[1] महाकाळ.

घन । कळातीत कळा संपूर्ण । तो शंखधर्ता शंखनारायण । भैमति-
तीरीं पाहिला ॥ २१ ॥ भववंशक्षयपिंडारकीं । संकल्पशून्य येकायेकीं ।
पाहिला परमात्मा निष्कळंकी । जाहालों मीं तेणें ॥ २२ ॥ विश्रांति-
रुक्मिणी वनीं । नीळांबरतनु निजनयनीं । पाहोनि चालिलों ज्ञानवाहि-
नी । मधुमतीतीरा ॥ २३ ॥ विशाळ ब्रह्मस्फूर्तिस्फुरण । पाहोनि निज-
दृष्टी हिंडबावन । प्रणवअर्बुदाचळ वेघोन । अचळेश्वर पाहिला ॥ २४ ॥
पाहोन साक्षत्वपंचकृष्ण । ज्ञेयहिरण्यगर्भा जीवन । चालिलें त्याचि
तीरें क्रमून । आदिवैकुंठ पाहिलें ॥ २५ ॥ ज्ञेयप्राप्तिद्वाराहृशरीरीं ।
आत्मा परात्परज्ञानपुष्करीं । चिद्भानुतनुद्योतिसरोवरीं । पाहिला
फरशधर ॥ २६ ॥ धर्मप्रतिष्ठा निजअधिष्ठित । धर्मक्षेत्र कुरुक्षेत्र
विख्यात । तीर्थ पावन जगतींत । विष्णुस्थापितयोगें ॥ २७ ॥
पूर्वक्रम अतिक्रमोनि निजांग । कृष्णप्रयाग निजयोग । पाहिला प्रती-
तीनें अभंग । निवालों सुखें ॥ २८ ॥ स्वप्रकाशडोहो सदोदित । त्या
सूर्यकुंडीं जालों सुस्नात । विश्रांतिसुधासोमकुंडांत । निवालों अघमर्षणें
॥ २९ ॥ क्रमून अद्वैतवन अघोर । उन्मनयमुनातीर साचार । पाहि-
ली आकाशगंगा स्वयंभधार । अमृतकुंडांतूनि येतसे ॥ ३० ॥ साक्ष-
त्वातीतसुखें निवांत । रूढलें इंद्रप्रस्छ यमप्रस्थ विख्यात । तैसें चि
जैयंती वरुणावर्तै । हरिद्वार पावन ॥ ३१ ॥ चित्तभंग मनभंग प्रस्ता-
वपर्वत । अतिक्रमूनि स्वभावें तेथें । हिमकेदार अखंडित । ज्योति-
र्लिंग पाहिलें ॥ ३२ ॥ ज्ञानस्वभाव निजयोग । प्राप्तीचें पंचप्रयाग ।
क्रमूनि सूर्यधार अव्यंग । स्वर्गधार वोळांडिली ॥ ३३ ॥ निर्वाणयोग-
बद्रिकाश्रम । सेविला बद्रिनारायण परम । जेथें सिद्धतपोनिधीआश्रम ।
आत्मपरायण ते ॥ ३४ ॥ लंघिला प्रस्तावशैल्यपर्वत । देखिलें
मानससरोवर अप्रांत । अमळजीवनें असे उचंबळत । नीळांबर
जैसें ॥ ३५ ॥ ज्ञानगंडिकाउगमीं निर्धूत । देखिला सालग्रामपर्वत ।
अपरोक्षगतीचें विख्यात । स्वर्गद्वार पाहिलें ॥ ३६ ॥ स्वानंदभरत

१ परशुराम. २ जयंत. ३ वारणावत.

लोहितवन । पाहिलें भरद्वाजभंडारवन । विकल्पद्वादशवनें क्रमून । आलो तीर्थप्रतिष्ठेनें ॥ ३७ ॥ तीर्थराज वैतरणीतीरीं । सकलतीर्थांचे योग प्रगट करी । त्रिवेणीसंगम अभ्यंतरीं । पाहिला माधव प्रयागीचा ॥ ३८ ॥ अमरसेविनीच्या परिसरीं । विश्वेशज्योतिर्लिंग निर्धारीं । अवलोकितां विश्रांतिकारी । तारक दीक्षा देतसे ॥ ३९ ॥ ज्ञेयगया गदाधर स्वयें । अज्ञाननिवर्तक चित्सूर्य । सद्गुरुकृपेनें निजहृदय । गयावर्जन जालें ॥ ४० ॥ विज्ञानपूर्वसमुद्रतीरीं । मूर्तित्रय साक्षात्कारी । जो जगन्नाथ कैवल्यशरीरीं । परंपरेसी पावन ॥ ४१ ॥ अव्यक्तपंचवटी गोदातटीं । सुंदरकपाळेश्वर धूर्जटी । पवित्र रामाश्रम दृष्टी । पाहोनि निवालों ॥ ४२ ॥ सकळ तीर्थांचा जिव्हाळा । तो मुक्तिअयोध्येचा घनसांवळा । सकळतीर्थीं पाहिला डोळां । नामरूपें सहित ॥ ४३ ॥ निजवेधक स्वभावस्थिति । भक्तिसमारंभें गर्जना करिती । कीर्तनाच्या गजरें अयोध्येप्रति । चालिला समर्थ स्वसुखें ॥ ४४ ॥ समर्थसहवासी अनंत संत । सप्रेमें नाचती आनंदभरित । रामकीर्तनें मार्गे क्रमित । आरोळ्या देती नामगजरें ॥ ४५ ॥ राम अवतरला सर्वांप्रति । जाहला रामवेध महास्थिति । ठसावली राममूर्ति । श्रीरामपिसें अनिवार ॥ ४६ ॥ अखंडउन्मनीपर सुखें अद्भुत । स्वानंदघन विदेहउन्मत । खेदरहित समाधिपर विस्मृत । भूमिकारूढ स्वस्थिति ॥ ४७ ॥ वेधली वृत्तिदशा निर्वेध । नुमजे भेदाभेददशा प्रसिद्ध । अखंडविश्रांतीचा अवरोध । अष्टभावें योसंडती ॥ ४८ ॥ स्वानंदाश्रूनें पाझरती नयन । सप्रेमयुक्त प्रतीतीनें पूर्ण । थरकति रोमांच चमत्कारोन । कांपती गदगदां ॥ ४९ ॥ स्तब्ध अंतकरण स्तंभीभूत । पराकाष्ठा निचेष्टित । लोटांगणीं दंडवत । पडती भूमीवरी ॥ ५० ॥ स्वानंदगारेचें जीवन । विघरोन तटस्थता संप्रज्ञान । सगुणनिर्गुणवेधकीर्तन । होतसे प्रभूपुढें ॥ ५१ ॥ विज्ञानश्वेतआरक्तधुसर । दाटित चालिले चिदंबर । येकवटले दीपप्रभाकर । समसमान तेजें ॥ ५२ ॥ सुनीळ

१ गंगेच्या. २ तीरीं.

तेज गाळीव चोखडें । मनोहर रामाचें रूपडें । ठाणठकारें चहूंकडे । उभें ठाकलें सुंदर ॥ ५३ ॥ वामकरीं ज्ञेयकोदंड । विज्ञानधरेवरि ठेऊनि प्रचंड । दक्षिणकरीं शरमार्तंड । समतेजें धरियला ॥ ५४ ॥ स्नेह लाऊनि अंतःकरणीं । भरितसे निजवेधधरणी । राघवरूप आकाशरूपधरणी । दाटोन भरलेंसें ॥ ५५ ॥ प्रत्यक्ष दिसें केलें दर्शनीं । ईक्षणें अवलोकित मजलागूनि । तेणें अंतर्भाव वोसरोनि । दाटे रघुवीर ॥ ५६ ॥ नेणो येतो अवचट कैसा । आंगीं भरे विस्मयासरिसा । अनिवार प्रेमाचा वळसा । आलोट लोट न संवरे ॥ ५७ ॥ भरीव सुखवेधें उत्कट । निजहृदईंचा चि होय प्रकट । निघोंट सुखें दिसें चि अवचट । लाऊनि सोडी ॥ ५८ ॥ नुमजें चि उमजवी पष्ट । त्याचेनि मी जालों पिसाट । काय करूं प्रेमें हृदयस्फोट । सुखें चि प्राण घेतो ॥ ५९ ॥ हे श्रीरामाची क्षडपण । जाली न दिसे गुणागुण। अयोध्येच्या मार्गीं स्वानंदघन । समर्थसहवासें ॥ ६० ॥ निर्विकल्पना उत्कट । बुडऊनि स्वानंदनिधीसी अवचट । पदोपदीं समाधिसुख निघोंट । थाटें हरिदास चालती ॥ ६१ ॥ रामस्मरणें आकाश फुटे । निरावकाश अनुसंधान प्रगटे । अमरवृंद पाहों लोटे । सुमनवृष्टि तोषें ॥ ६२ ॥ रामस्मरणसंकीर्तन होय । तेणें पडसादें नभहृदय । दाटोनि तैसें चि गाये । पूर्णप्रतिध्वनीनें ॥ ६३ ॥ समाधिनिद्रेचे जाग्रत । पाहों लागती चाकाटलें चित्त । तेणें चमत्कारेंसीं विस्मित । हांसों लागती खदखदां ॥ ६४ ॥ येक सहजस्थितीचे महासंत । भक्तिमार्गें करिती सावचित्त । ह्मणति अयोध्येचा तो समर्थ । पाहावा आजि दृष्टीसी ॥ ६५ ॥ समाधिअवस्थावेध निर्वेध । कुर्वंडी करूनि टाकिजे प्रसिध्द । विश्रांतीचा विसांवा स्वतःसिध्द । पाहों प्रत्यक्ष दृष्टीसी ॥ ६६ ॥ भक्तिअंतर्भाव कृपायुक्त । भक्त भावार्थें नित्यमुक्त । सगुणप्रेमेंवीण अमुक्त । विदेहदशा तितुक्या ॥ ६७ ॥ जन्हीं जाल्या जीवनेंवीण त्या सरिता ।

---

१ (?). २ परिपूर्ण. ३ प्रतिशब्दानें.

ँया प्रख्याता । काय कराव्या त्या त्रिशिता । विश्रांति न देती ॥ ६८ ॥ कीं वस्तीवीण थोर नगर । जन्हीं जालें तें मनोहर । तरी काय करावें शरीर । प्राणेंविना जैसें ॥ ६९ ॥ दृष्टीवीण जैसा नयन । कीं श्रोत्रत्वें-विना श्रवण । गतिकुंठित रम्य चरण । काय करावे ते ॥ ७० ॥ नसता भक्तांचें जिव्हार । नाहीं गुरुविश्वास निर्धार । जैसा द्रव्येंवीण व्यवहार । कारण होय दुःखासी ॥ ७१ ॥ जैसी प्रीतीविना सोयरीक । तेंवि भक्तिवीण ज्ञानविवेक । सेवा सायुज्यसुखदायक । नायेक वैदेहीचा ॥ ७२ ॥ गायक हो तुम्ही ज्यासी गाता । मायिक साडूनि समाधि-अवस्था । पायिक होऊनि तयाचे आतां । पाहों निवासदृष्टीनें ॥ ७३ ॥ पाहा रामनिवास मनोहर । ज्ञानपताकांनीं अर्चिलें अंबर । चित्र चि चित्ररत्नसार । कळसहारी शोभती ॥ ७४ ॥ कोटिबाळसूर्यांची घरटी । प्रकाशलें तेजें दिक्पटीं । दूरूनि पाहातां चि दृष्टी । जडोनि ठेली तेथें ॥ ७५ ॥ रामचित्सूर्याचें मंदिर । प्रकाशघन चिदंबर । खेचरदृष्टीनें अगोचर । हृदयासि आलें ॥ ७६ ॥ नगरदृष्टीनें पाहातां । राम भेटों आला तत्वतां । स्वानंदमिठी वस्तुता । त्रिपुटी मावळली ॥ ७७ ॥ जावें कोठें राहावें कैसें । कोण मी मज विचार पुसे । चाळतें आणि चाळवितें ऐसें । कवण तें कळे चि ना ॥७८॥ पाउलें ठेवावया धरेवरी । राघवावीण उरली नाहीं उरि । अवघा चि राम मार्गभरि । आतां अयोध्या ने कवण ॥ ७९ ॥ ऐसें स्वच्छंदें अनुवादत । मार्ग विक्रमिला समस्त । विश्रांतीचा शरयूचा प्रांत । अवचट देखिला ॥ ८० ॥ सरली अवचट विस्मृति । आली अकल्पित जाग्रति । अमळजळविश्रांति । वाहे शरयू स्वानंदें ॥ ८१ ॥ निर्मळ वाळवट शरयूचें । प्रकाशवज्रकिरण पासुचे । पाहातां पाहातां दृष्टीचें । तेज तटस्थ होय ॥ ८२ ॥ मनें देखोनि शरयूचें तीर । लोळण घातलें स्वसुखें निर्भर । शरयूदर्शनें चि रघुवीर । हृदयासि आला ॥ ८३ ॥ दृष्टीसि धाऊनि उगमातरीं । रामसायुज्यसाक्षा-

---

१ तृषिता, तहानेल्याला. २ कुंठित आहे गति ज्यांची असे.

त्कारी । प्रतीतिशरयू चमत्कारीं । अखंडित वाहे ॥८४॥ आत्मप्रतीतीच्यां जिव्हारें । जीवनें भिजऊनि दोनी तीरें । भेदूनि सुलीनभूमि निर्धारें । अभ्रांत वाहे ॥ ८५ ॥ परमविश्रांतिनिर्मळजळ । स्वसुखदायक सुसीतळ । शरयूस्वरूपें घननीळ । राम दिसे संपूर्ण ॥ ८६ ॥ शरयू नव्हे राम स्वयें । दयेच्या पुरें लोटिली आहे । जियेच्या दर्शनें तापत्रयें । जाती श्रम जन्मांतरींचे ॥ ८७ ॥ सत्यसंकल्प टाकूनि मागें । राम शरयूंत निजांतरंगें । उड्या घालिती ते सवेगें । भक्त अतिशयेंसीं ॥ ८८ ॥ सखोलपण अविछिन्न । चुबकळ्या देती सुखैकघन । पाहोन स्वानंदतळ उफळोन । प्रतीतीनें वरि येती ॥ ८९ ॥ बुडोनि बुडणें बुडविती । तळाचा हि तळ सुखें होती । तया स्वसुखाचा मागुति । तये चि बुडबुडा ॥ ९० ॥ गुरुकृपाशरयूमाझारीं । उसळती परमानंदलहरी । भक्त समाधिस्थ साक्षात्कारी । क्रीडती सुखें ॥ ९१॥ परात्पर सहजें सहज । मज्जन होतसे निजउमज । शरयूदर्शनें रघुराज । भक्तसमजीं देखिला ॥९२॥ शरयूसंभव तो पावन । पावन शरयूचें अख्यान । पावन श्रीरामाचें महिमान । अवधारिजे श्रोतीं ॥ ९३ ॥ रामकथा अमृतवाहिनी । सेवा भवतारक श्रवणीं । या चि जन्में कृतार्थ होऊनि । राहा रामपदीं शाश्वत ॥ ९४ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । उत्तरमानसतीर्थांतरकळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ९५ ॥ नवमरुद्रे द्वितीय उल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ वामन । कृपेनें भक्तांसि करी पावन । जगदुद्धारजीवन । पदीं संभवी ॥ १ ॥ स्वबोधसुखइंद्राग्रज । ब्रह्मचर्यस्वरूपें विराज । शुक गणिका गजराज । योगिराज पावन करी ॥ २ ॥ उपेंद्रस्वरूपीं परमानंद । भावकश्यपोदरीं मुकुंद । प्रगटला सायुज्यकंद । सुखदाता ॥ ३ ॥ सद्भावें बळी उत्कट । भक्तीनें आराधिलें वैकुंठ । जाला स्वयंभ मोक्षपीठ । विष्णुपदधर्ता ॥ ४ ॥

---

१ जगाच्या उद्धार करणारें जल म्ह० गंगा. २ अमज की अनुज ।

भक्तिप्रसादींचा कळस । जैसा नवरसांत शांतरस । सर्वस्वदानीं निजध्यास । सत्वसंपन्न तो ॥ ५ ॥ त्याची देखोनि योग्यता । पावन करावयासि सवेगता । वामनस्वरूपीं तत्वता । आला महाविष्णु ॥ ६ ॥ शोभली बटुआकृती सुंदर । मौंजी यज्ञोपवीत मनोहर । ब्रम्हचर्य अगोचर । कौपीन कटीं ॥ ७ ॥ अद्वैतछत्र साजे मूर्धनीं । विज्ञानजळकमंडळ पाणी । परम लावण्य नयनीं । पाहातां वेध होय ॥ ८ ॥ विश्वकारण नर्मदातटीं । बळी भाव जगजेठी । यज्ञमंडपीं ऋपीदाटी । वटु तेथें पातला ॥ ९ ॥ निजतेजप्रावरणशाटी । विज्ञानकोटि विद्यापेटी । ठवुलावये धाकुटी । मूर्ति अभिनव ॥ १० ॥ निजांग ब्रम्हचर्यशोभा । पाहातां तटस्थ जाली सभा । यज्ञपुरुष राहुनि उभा । वंदी वामनासि सा ॥ ११ ॥ सद्भावें सन्मुख जाऊन । बळीनें अभिवंदिला वामन । विनयें स्वागत विचारून । वरासनीं अर्चिला ॥ १२ ॥ ह्मणे आजि माझा भाग्योदय । आश्चिर्याचा उदेला सूर्य । हें मूर्तिमंत ब्रह्मचर्य । पाहिलें आजि ॥ १३ ॥ सत्पात्रीं घडावी सेवा । कांहीं अपेक्षावें भूदेवा । बळी बोलतां ऐसें तेव्हां । तोपला वामन ॥ १४ ॥ ह्मणे मी अनपेक्षें राया । आलों तुझा सद्भाव पाहावया । तव मनोगत तरि राहावया । दे पदत्रय भूमि ॥ १५ ॥ बळी ह्मणे स्वल्प मागितलें । वामन वदे हें अपार जालें । दानोदकासि आणिलें । सन्मती ते वळीची पत्नी ॥ १६ ॥ सुवर्णकळसीं तोय आणी । धारा घालितां वल्लभपाणी । पाणी शुक्रें रोधिलें ते क्षणीं । सिक्षिलें तया ॥ १७ ॥ राया आइकतोसि हे वामनपदवी । सर्वापहारें आपद घी । समजोनि बरें फरें सूदवी । संकल्पतोय ॥ १८ ॥ बळी म्हणे संकल्प जाहला । कोण मोडूं शकेल तयाला । उदक घालितां रिघाला । झारींत शुक्र ॥ १९ ॥ वामन जाणे सकळ कळा । झारींत दर्भ घालून लीला । फोडिला शुक्राचा डोळा । जळ आलें तेथुनि ॥ २० ॥

---

१ डोयावर. २ हातांत. ३ सिंहासनावर. ४ हे ब्राम्हणा. ५ फसटी हि इच्छा न करणारा. ६ पतीच्या हातावर. ७ डोळा फोडून शिक्षा केली. ८ उत्पन्न करील. ९ ( ? ).

बळीनें संकल्प घातला । वामन भूमि मागता जाला । येकपदें चि[१] द्दश्य महिला । संपूर्ण केलें ॥ २१ ॥ दुज्या पदें सारिला अवकाश । तिसरें पद मागे बळीस । बळी निजमूर्धा त्यास । देता होय ॥ २२ ॥ पदें सायुज्यतळासि पूर्ण । पावला सद्भाव सनातन । बळीचें आत्मनिवेदन । जालें ऐसें ॥ २३ ॥ निरंजनें बळीचे द्वारीं । द्वारपाळ चक्रधारी । त्या उपेंद्रपदें विदारीं । भेदब्रह्मांड ॥ २४ ॥ त्रिविक्रमाचें पदनख । लागोनि विधिकपाळींसि तिखें । विमलांबुधारा सुख- । प्रवाह आला ॥ २५ ॥ अहंभावमूर्धाभंजन । विज्ञानप्रवाहें योगीरंजन । कृतबोधचर्या निरंजन । पदगतिदाता ॥ २६ ॥ ते पदगतिसंभवजीवनें । चालिलें पुनित करूनि त्रिभुवन । चिदाकाशगंगा पावन । भवकल्मषहर्त्ती ॥ २७ ॥ तत् त्वं असि पदधार । गुरुसांप्रदाय संप्रधार । सुरवरपरंपराउत्धार । आली भूतळासी ॥ २८ ॥ आकाशचक्रीं सुखें क्रीडत । चित्कल्लोळबळें आवृत । सुरवरतरंगिणी उसळत । बोध मेरुशिखरीं ॥ २९ ॥ येकेवीस स्वर्गें कडोविकडी । सहस्रधारा धडाडी । रिचवत नाना अवघडीं । प्रवाह बळें ॥ ३० ॥ चतुर्दश लोक पावन । विज्ञानभागीरथीजीवन । भावभगीरथभावपूर्ण । प्रगटजालें॥ ३१॥ कैलासवैकुंठशिखरें । सत्यलोकनिवास निर्धारें । पुनित जळसाक्षात्कारें । पावली निजपद ॥३२॥ विश्रांतिसुसीतळवाहिनी । अमरावतीलोकपावनी । त्रैलोक्यआनंदकारिणी । त्रिभुवनगंगा ॥३३॥ निजनिश्चयाच्या निर्वाहें । सर्वदा अंतरिक्षीं वाहे । सदाशिवमस्तकीं आहे । विष्णुपदतीर्थरूप ॥ ३४ ॥ स्वसुखें चिदाकाशगंगेसी । सुस्नात होती भावसप्तऋषी । हनुमंत तपोधनरासी । प्रातस्नायी तेथींचा ॥ ३५ ॥ बेथसुवर्णशिखरावरी । येकविसावे स्वर्गशिखरीं । महदांबरगाभा उभा आवरीं । मस्तकीं अनिवारबोध ॥ ३६॥ आराध्य त्रैतायुगअंतःकरणीं । तरणीकुळोद्भव उत्धार धरणी ।

---

१ आकाश. २ विमल ब्रह्मस्वरूपी वामन. ३ ब्रह्मांडाच्या कवचाला. ४ तीक्ष्ण. ५ स्वच्छ पाण्याचा सुखदायक प्रवाह. ६ पायाच्या गतीमुळें उत्पन्न झालेल्या पाण्यानें. ७ संसाररूप पाप हरण करणारी. ८ स्वर्गांतील लोकांना पवित्र करणारी ९ सूर्यवंशांत अवतारलेला.

श्रर्चा करुणामृतकिरणी । भरणी भावमुळें ॥ ३७ ॥ पूर्वार्धे जालियां क्रमण । लीळा जीमूतवर्ण उड्डाण । जितमदन शशीमनपवन । उत्तरार्धे क्रीडे ॥ ३८ ॥ सुवर्णाद्रीवरील पाठारें । रमणीय स्थळ मनोहर । स्वर्गंगाप्रवाहविस्तारें । उद्यानें अमरतरूंचीं ॥ ३९ ॥ मगमगीत सुमनतरुपरीं । स्वानंदफळाच्या पडिभरीं । अमृतोपम विस्तारीं । विहरे पवनोत्मज ॥ ४० ॥ परिपक्व अमृताचीं रसाळफळें । स्वानदाचे गळाळ उगाळे । सुश्याम तेजरूप सावळें । बैसविलें नयनीं ॥ ४१ ॥ अमनसुमनयाति उत्तम । आघ्राणें निवालें चिद्व्योम । रामानुसेव्य प्लवगम । सुवास अर्पी श्रीरामीं ॥ ४२ ॥ पाटीरतरुवरकोटरीं । विसावले पक्षी सुखनिर्भरीं । शरत्चंद्रिकावर्ण धारी । तरुमुळीं वाहातसे ॥ ४३ ॥ बक कारंडव सुवर्णगर्भ । हस क्रीडती सुप्रभ । मदनक्षोभें निर्लोभ । सुरांगना क्रीडती ॥ ४४ ॥ अमरवनितानयनारविंदें । खुललीं चिद्रगेंत स्वानदें । कृष्णताराप्रभृंग मकरदें । लोधले तटस्थ गमती ॥ ४५ ॥ त्रिदशकामिनीपयोधर । स्वानंदें चक्रवाकें मनोहर । दिव्यभामिनीसंदोहसार । क्रीडती मज्जनें ॥ ४६ ॥ अमळजळवाहिनीतीरीं । कल्पतरुवन साजिरीं । लीळामनोहर विहरी । वनचरें तेथिचीं ॥ ४७ ॥ रसाळ सुवर्णतरू सफळ । परिपक्वसुवासें सोज्वळ । सुवर्णभूमिका अमळ । शोभती पाटागणें ॥ ४८ ॥ निरुपम चिंतामणिसदनें । हिरे परिस सन्मणी विमानें । कामधेनूची गोठणें । ठायीं ठायीं अपूर्व ॥ ४९ ॥ शांतिसुवर्णकदलीवनीं । शोभे पाटलानन पावनी । शिखामौंजीयज्ञोपवीता भरणी । कोटिमार्तंडतेजें ॥ ५० ॥ वज्रांग पिंगाक्ष प्रचंड । पद्मरागकुंडल सदंड । जितकदर्पकोटि वितंड । भीम लावण्यरूपी ॥ ५१ ॥ उर्ध्वतळांगुळ दक्षिणकरें । रामाघ्रिपद्मांचा भ्रमर । परमसुदर

१ मारुति. २ राम आहे अनुसेव्य ( स्वामी ) ज्याचा असा. ३ वानर, हनुमान ४ चदन. ५ शरदृतूतील चादण्याप्रमाणें स्वच्छ ६ पाणी. ७ अप्सरांचे कमलासारखे नेत्र. ८ अप्सरांचे स्तन. ९ देवस्त्रियांचे समुदाय. १० उजवे हातांत पुच्छ धारिलें आहे असा.

मनोहर । क्रीडे वृक्षवृक्षांतरें ॥ ५२ ॥ स्वसुखपारिजात सुपुष्पित । सुवासें चिदंबर दाटित । तया सुमनवृष्टिसेजे विसांवत । तप्तकांचनसन्निभ ॥ ५३ ॥ निर्विकल्पनिद्रासमाधि । घेत सहजा जाग्रतशुद्धि । प्रज्ञाभूतळासि प्रसिद्धि । संचरे पवनज तो ॥ ५४ ॥ अवलोकूनि स्वामीचा रछापित । पश्चिमदिशा निशि येकांत । ब्राह्मीं मुहूर्ती पुनरपि सुस्नात । होय सुधामय सरितेसी ॥ ५५ ॥ एवं सुरवरकोटि । विष्णुपद संभवगंगातटीं । सुस्नात होती सुखाचे पोटीं । वसती अमरवृंदें ॥ ५६ ॥ ते अंतरिक्षगंगा निराळी । झळके आत्मप्रभुचमंडळीं । क्रमें सुवर्णाचळछळीं । अखंड रिचवे ॥ ५७ ॥ अमनबोधस्वछोदका । वैकुंठ कैलास सत्यलोका । पवित्रगतीनें पुण्यदायका । क्रमान्वयें कैसी ॥ ५८ ॥ शिवध्यानच्छ कैलासीं । असतां भागीरथी ये सघोषीं । शिवें जटापटळीसी । सामाविली स्वर्गंगा ॥ ५९ ॥ ते भावभगीरथें प्रार्थूनि । मागतां शिवें दिधली जटेंतूनि । ते सत्यलोकासि येऊनि । राहे विधिहृदयकमंडळीं ॥ ६० ॥ तेथूनि अमरावतीपाठारीं । पडतां बोघ होती चत्वारी । प्रणवचतुक्षरण निर्धारीं । जाय अप्रांतसमुद्रा ॥ ६१ ॥ देहचतुष्टय चहूं दिशेसी । छोटली अवस्थाभरें कैसी । नामरूप निर्धारेंसीं । यावी प्रत्यया ॥ ६२ ॥ तुर्येचा प्रांत उत्तरेसी । भद्रा नाम वाहे सुखेंसी । सुप्तियोग पश्चिमेसी । सीताअभिधानें प्रवाहे ॥ ६३ ॥ स्वप्नांतरअवस्थेसी । चक्षुनामका वाहे पूर्वेसी । अळकनंदा ते जाग्रतीसी । शोभे दक्षिणवाहिनी ॥ ६४ ॥ हे अस्मादिकां गतिदायक । गुरुभगीरथकृपा निश्चयात्मक । प्रतीतीसि आली निष्कळंक । श्रवणद्वारें ॥ ६५ ॥ सुवर्णाचळाचेनि आधारें । भेदूनि अव्ययमतेसि सुस्वरें । भरूनि अवधान कंदरें । आली बळें चि प्रतीतीच्या ॥ ६६ ॥ विमुक्तधाराप्रवाहें पूर्ण । संकल्पहिमाचळीं रिचवोन । चालिली जेथें अनुष्ठानें । करीत होता जन्हु ऋषी ॥ ६७ ॥ महाप्रवाहघोषें ऋषी । चमत्कारला गंगा नेत आचमनेंसी । मग भगीरथें प्रार्थूनि तयासि । मागीतली स्वर्गंगा ॥ ६८ ॥ तेणें दिधली जानु फोडूनियां । म्हणोनि जान्हवी म्हणती तिया ।

येऊनि बद्रिकाश्रमाहूदया । वाहे प्रवाह पाठारें ॥ ६९ ॥ तेथूनि येत भरतखंडासी । पावन धरणी समुद्रेंसीं । मिळाली सहस्रमुखें कैसी । निजलक्षविवरें ॥ ७० ॥ भगीरथें पावन सगर । भगीरथें पावन सुरवर । भगीरथें पावन ऋषिवर । नर अमरवाहिनीयोगें ॥ ७१ ॥ पुनित करूनि त्रैलोक्यासी । मिळाली निर्वाणजळासी । तियेसि श्रीरामें अयोध्येसी । आणिलें प्रार्थूनियां ॥ ७२ ॥ राम शिवपूजाधुरंधर । सुरगंगाजळें अर्चनपर । भावभरत निरंतर । तें अग्रोदक पुरवी ॥ ७३ ॥ त्रिशूल्य साळूनि प्रमाण । महाशून्यीं आत्मसुभान । येतां त्या प्रभातेसि जीवन । शिवार्चन होतसे ॥ ७४ ॥ साधनक्रम नित्यनेमेंसीं । काळ अपेक्षित क्रमासी । लागला विलंब हृदयस्थासी । जाणवलें अवरोधें ॥ ७५ ॥ वेधोन अवधानदामोदरीं । कृपामृतें विलोकन करी । साधनक्रमश्रमांतरीं । भावभरत येतसे ॥ ७६ ॥ द्रवोनि कृपार्णव कृपेनें । लक्षिली आकाशगंगा नयनें । सत्ताज्ञान शरासनें । धाडिला सूचनार्थ ॥७७॥ भेदूनि उर्ध्व चमत्कारें । चुकऊनि प्रवृत्ति रामशरें । आणिली चित्कल्लोळगजरें । भागीरथी ते ॥७८॥ शराप्रपैन्ना क्षणऊनि । शरयू म्हणिजेत अभिधानी । ते शरयूतीरीं पावनी । श्लाघ्यता अयोध्येची ॥ ७९ ॥ राम भक्तकामकल्पद्रुम । योगीमंडण विश्रामधाम । मुक्तीचें माहेर परम । भक्त चालिले तेथें ॥ ८० ॥ शरयूतटाकें पुनीत । अग्रारें वसती सुशोभित । तेथें शिवालयें अमित । प्रभेनें साजिरीं ॥ ८१ ॥ शिवालयीं दिव्य उद्यानें । शिवालयींच तरूचीं वनें । महामंडप रमणीय स्थानें । पायरिया नदीतीरीं ॥ ८२ ॥ सुस्नात ब्रह्मवृंदें शरयूतीरीं । पाहातां अमरावती न पुरे सरी । पुराणें देवार्चनें गजरीं । वृंदावनें सुशोभित ॥ ८३ ॥ महाविस्तीर्ण पडशाळीं । अन्नछत्रें धर्मशाळा । उपचार होतसे सकळां । रामआज्ञेनें दुर्धर ॥ ८४ ॥ भक्त सुस्नात शरयूसी । आले अयोध्येच्या प्रदेशीं । वसले उपवन-

१ शरापासून म्हणजे बाणापासून झालेली म्हणून शरयू. २ अग्रहार. ३ धर्मशाळा.

विलासी । रामार्चनीं तत्पर ॥ ८५ ॥ अर्चनीं राम प्रत्यक्ष होत । संभाषणें भक्तासि निववीत । भक्त चाकाटले ध्यानस्छ । रामछंदें नाचती ॥ ८६ ॥ प्रेमें विचरती सैराट । अद्भुतरसें करिती अभीट । झुत्थी उडाली अवचट । लूटी होय कौतुकाची ॥ ८७ ॥ पिसें परी केवळ सुखाचें । जयासि लागलें तोचि तें निजाचें । त्यावांचून कांहीं न रुचे । रामपिसें अनिवार ॥ ८८ ॥ विस्मयेंसीं वृक्षाप्रति । आपुलें गुज सांगों येती । आकाशासी तूं ह्मणती । साक्षी येथें असावें ॥ ८९ ॥ रामवेधें वेधिलें मज । धांवोनि सांगों आलों मी तुज । रामवेधें अचेत सहज । गूज आतां सांगों कवणा ॥९०॥ श्याम सौदामिनीचा उजाळा । दुजा बाळरवी जिव्हाळा । माझे जीवींची अंतर्कळा । चोरूनि पळाले ॥ ९१ ॥ चित्तचोरटें तें प्रसिध्द । अनादिसिध्दाचे ही सिध्द । पाठीं लागलें बाळ वृध्द । योगी अद्यापिवरी ॥ ९२ ॥ माझा सखा जरी तूं होसी । तरि मजऐसा आक्रंदसी । आहा रे तूं सुजाण नव्हसी । द्रवेसिनासि दुःखें ॥ ९३ ॥ मी अचेत पारि द्रवत चित्तीं । कंप मूर्छा अवरोधमती । वळे आनंदाश्रु लोटती । कंठीं बाष्प दाटतसे ॥ ९४ ॥ कांहीं न सुचे आतां । करुणा भाकूनि रघुनाथा । भेटवीं म्हणउनि सवेगता । वृक्षासि कवळी सदृढ ॥ ९५ ॥ सांगे प्रीती लाऊनि ऐसी । कां रे आतां निष्ठुर होसी । करुणारस मानसीं । होता तो काय जाला ॥ ९६ ॥ अरे अरे तें गगन गाळींव । सावळें निजेलें निर्भेव । माझा देखोनि स्वभाव । कैसें निवांत राहिलें ॥ ९७ ॥ लागला तयाचा धोसरा[1] । झुरतसे मानस तरुवरा । हृदयगारेचा जिव्हारा । द्रवला संपूर्ण ॥ ९८ ॥ उभा सुनीळ गगनगाभा । तो माझिये हृदयींची निजशोभा । विज्ञानदर्पणाची प्रभा । बिंबित वर्चसें ॥ ९९ ॥ एवं रामस्वछंदें पूर्ण । उन्माद अवस्थेंत भक्तजन । विचरती राघवकृपेचें उद्यान । तें अवधारिजे ॥ १०० ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । शरयूआख्यानस्थळीला । म्हणे मेरुअनंत ॥ १०१ ॥ नवमरुद्रे तृतीयउल्लास संपूर्ण ॥

---

१ गांगाट. २ उत्कंठा.

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीराम समर्थ शरयूतीरीं । शोभे आरामरूप विस्तारी । सुमनफळसंभारतरूवरी । पवाडले निजभक्त ॥ १ ॥ रामकृपेचें उद्यान गहन । स्वानंदें रूढलें विश्रांतिघन । छायासुगंधें उन्मन । विसावत सुखें ॥ २ ॥ पळभरि राहातां तिये छायेसी । निवृत्ति होय तापत्रयासि । फळप्राप्तीनें निश्चयेसीं । क्षुधा हरे जन्मांतरींची ॥ ३ ॥ तेथिचें सुवासआघ्राण । केवळ विश्रांतीसि ये निजमन । निर्विकल्पतरुकानन । वसलें अयोध्यावेष्टित ॥ ४ ॥ उपवनें योगें निर्विकार । तरुवररूपें मनोहर । भेटि देतसे रघुवीर । सुमनफळसंभरें ॥ ५ ॥ आरामीं राम प्रत्यक्ष होय । शांतिवनोपवनीं उभा ठाय । रम्यासि रमविता होय । आरामअभिरामें ॥ ६ ॥ वनीं उत्कट परमानंद । सद्गुरुसंत सुखप्रद । स्वसुखवृक्षसुखें निर्द्वंद्व । वसती सदोदित ॥ ७॥ मूळसूत्र साधूनि धरे । निजआस्तिक्यावरी निस्तारे । जीवनचाळणी निर्झरें । वृक्ष-[illegible]-विवती ॥ ८ ॥ गुप्तश्रोत्रघरेमाझारीं । परमामृतजळनिर्झरीं । कपालैश्वाळ वृक्षातरीं । परिपूर्ण असे ॥ ९ ॥ स्वानंदें मोहरती तरुवर । सरसावती सरळ गंभीर । पाल्हेजती पल्लवें साचार । सकोमळ शाखीनें ॥ १० ॥ रसरसीत सुश्यामवर्ण । फळसुमनीं वरुषती सपूर्ण । तळीं प्रसुधा सुवर्ण । संकीर्ण सुमनफळीं ॥ ११ ॥ मगमगीत सुवासें वेदिका । राजविलास रत्नपीठिका । परमपवित्र तेथें बैसका । अमळ पाटांगणें ॥ १२ ॥ घोटींव निजसुधारसें । सभामंडप चंद्रप्रकाशें । येक सुवर्णांक सावकाशें । सूर्यवर्णवर्ण सौध ॥ १३ ॥ वनीं विमळ ऋषींचे आश्रम । समीप निर्मळ जळें परम । अखंड ध्यानीं रघोत्तम । प्रत्यक्ष जाला जयासी ॥ १४ ॥ स्वानंदजळें उचंबळती । उद्यानीं सरोवरें डवरती । सुस्नात ब्रह्मवृंदें ध्यानपंक्ती । शोभा आणिती वर्चसें ॥ १५ ॥ प्रज्ञाभूगर्भगोमुखें । सहजसूत्र जीवनउल्लेखें । वन सजीव नित्यसुखें । सजीवनी संपूर्ण ॥ १६ ॥ स्वसुखें सुरवाडले तरुवर ।

---

१ हरे, नाहींशी होते. २ झरे ३ कृपेनें आलें.

समाधिछाया निरंतर । न फुटे अहंमित्रें आतपकरें[1] । रघोत्तमठायानीं ॥ १७ ॥ वृक्षीं भेदिलें ऊर्ध्व नभ । पैसावले अनयासें स्वयंभ । वनपरिपाळण अक्षोभ । सुखेंचि होतसे ॥ १८ ॥ सुमनफळांचिया राशी । मगमगीत हृदयघरेसी । साजुक पसरल्या विशेषीं । नसे फळापहारी ॥१९॥ अपाड पाडाचीं परिपक्कें । गोडीनें अमृतासि करिती फिकें । जे स्वसुखासिही कौतुकें । दर्शनें इछा आणिती ॥ २० ॥ रामआरामीचीं परिपक्क फळें । अमृतासी चवी चाखविती रसाळें । स्वानंदासि म्हणती आगळें । वैभव आमुचें पाहा ॥ २१ ॥ ऐसिया फळें सफळ तरुवर । रामदयेच्या पवनें मनोहर । गंभीर हेलावती शाखापदर । हिंदोळती परस्परें ॥ २२ ॥ वृक्षीं शुकपिक सनकादिक । पक्षिस्वरूपें निजविवेक । प्रबोधें कूजती अनेक । योगरिछतीनें ॥ २३ ॥ कोकिळारूपें सरस्वती । होय मधुरध्वनीनें वेधिती । गंभीर सुस्वरें घुमती । प्रबोधपारवे ॥ २४ ॥ सर्वऋतूचें येक आयतन । सर्वकाळ फळद्रूपवन । वनश्रिया लावण्यें तरुण । शोभे अभिरामवनीं ॥ २५ ॥ कस्तूरीसि सुवास देत । वनीं झळकत मलयमारुत । सुखकदंबवृक्षा आंत । सुवास दाटला ॥ २६ ॥ या मकरंदीं षट्पदें संत । झुंकारें क्रीडती सुखोन्मत्त । रामपदारविंदीं निवांत । वसती सुखें ॥ २७ ॥ सेविती अनुभवमकरंद । तेथूनि निघती ते पट्पद । भक्तिरहस्यसुमनीं स्वछंद । क्रीडती सर्वदां ॥ २८ ॥ येक आमोद सुखें सेविती निर्भर । कुचुंबो नेंदिती आनंदकेशर । रामरूप मनोहर । भ्रमराकृतीनें ॥ २९ ॥ अढळस्थिति रामआरामीं । प्रतीतिशारिका उक्त ब्रह्माहमस्मि । सोहंहंस वनचिन्मोर्मी । विहरती सुखें ॥ ३० ॥ साधुसंतसिध्दजिव्हाळा । अखंडचर्चेनें घनसांवळा । प्रत्यक्ष करूनि पाहाती डोळा । घेती सोहळा रामप्राप्तीचा ॥ ३१ ॥ ऋषी मुनी तपस्वी प्रसिध्द । रामआरामनिवासें निर्वेध । अनंत सिध्दाचे निवासशुध्द । वसती पवित्राचरणें ॥ ३२ ॥ बोधसंपदा साध्यसाधनीं । विवेकवन यत्न संरक्षणीं । निर्वाळले शुध्दसत्वगुणी । पाळिलें तरुवर

१ अहंकाररूपी तापदायक सूर्य.

॥ ३३ ॥ वेदांतविकसितसुमन । कैवल्य परिमळें दाटे चिद्गगन । स्वानंदमुळावरी संपूर्ण । वृक्ष तो रूढला ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ आनंदमूलगुणपल्लवतत्वशाखे वेदांतपुष्पफलमोक्षरसायनादि ।
चेतोविहगम सुबोधतरुं विहाय संसारशुष्कविटपे वद किं करोषि॥

मूळडाळेंवीण संपूर्ण । सोलींव सुखाचा ज्ञानघन । विज्ञानामृतें वर्धन । प्रतीतीनें सेविजे ॥ ३५ ॥ वाढिमोडोंवाण सगळा । केवळगोडीचा चि जिव्हाळा । शामविजूचा तरुउजाळा । सेवीं सर्वांगसुंदर ॥ ३६ ॥ तो वृक्ष भरि दिव्यपरिमळ । अखिल सुखा हें चि केवळ । पत्रें पुष्पें शाखा रसाळ । सेवितां रसना विरे ॥ ३७ ॥ सुखावला शर्करेचा मनोहर । वृक्ष अवघाचि होय मधुर । रामकल्पतरु साचार । सेवीं बरवा ॥ ३८ ॥ दिसे प्रतीतीच्या प्रांतभूमीसि । निर्वृतिदर्शी[२] वर्णिती तयासी । भवऔषध निश्चयेंसीं । सेविजे स्वसुखें ॥ ३९॥ स्वभावसिध्द मुहुरला। स्वस्थितीनें संपूर्ण फुळला । स्वानंदफळीं लगडला । सुश्याम तरुवर ॥ ४० ॥ रसरसनावर्जित । अखंडैकरस सेवित । सुखावलें स्वसुखें संत । अंगीकरिती सर्वदां ॥ ४१ ॥ ऐसा वृक्ष नाहीं ज्या आरामीं । संसारविटप परिश्रमी । तेथ वस्ति न करावी उत्तमीं । कासया भ्रमावें ॥४२॥

॥ श्लोक ॥ यस्मिन् देशे मरुत्तुल्यो नास्ति सज्जनपादपः ।
सफलः शीतलच्छायो न तत्र निवसेद्बुधः ॥ १ ॥

अहो अपूर्वता कोण्ही येक । संसारविष महामारक । त्या विषयींच[३] गतिदायेक । दोनि फळें अमृताचीं ॥ ४३ ॥ भवविषमसुरतरूसी । अमृतोपमें फळें कैसीं । म्हणाल तरि सुकृतविशेषीं । लाभती अवचट ॥ ४४ ॥ कोटिसुकृताचें फळ । रामभक्ति सुनिश्चळ । भक्त श्रीराघवाचे केवळ । भेटती जरि कां ॥ ४५ ॥ कदाचित् राम सेविजे ।

---

१ ब्रह्मानंद हें ज्याचें मूळ, सत्वादि गुण ज्याचीं पानें, अहंकारादि तत्वें ज्याच्या शाखा, वेदान्तशास्त्र ज्याचीं फुलें आणि फळें, तसें च मोक्ष हा ज्याच्या रसाचा साठा असा ज्ञानतरूला टाकून, हे मनरूपी पक्ष्या ! तूं या संसाररूप वाळलेल्या झाडावर काय करीत आहेस ? २ निवृत्तिदर्शी (?). ३ (?).

परि भक्तासि केवि भेटिजे । देव भेटे परि निजउमजे । भक्त भेटणें दुर्लभ ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ संसारवृक्षविषये द्वे फले अमृतोपमे ॥
फदाचिद्राघवे भक्तिस्तद्भक्तस्य समागमः ॥ १ ॥

दुर्लभ भक्तसंगती । पावलों रामवनविश्रांती । कैवल्यक्षेत्रअयोध्यापति । भेटला भक्तयोगें ॥ ४७ ॥ प्रथमदर्शन बोधवनीं । जाली विश्रांतितरुलावणी । साक्षात्काराचे धरणी । दाटित वृक्षसमाजें ॥ ४८ ॥ स्वसुखसुमनवनें साजिरीं । जायी जुयी मोगरे केसेरी । दवना मरुवा सेवंती परी । वाळा कृष्ण श्वेत सुगंध ॥ ४९ ॥ वेधपुन्नागपुष्पीं परिमळ । ज्ञानचंपकपुष्पींत द्रवले । ज्ञेयबकुळी पाडट प्रवळे । मंदार पारिजात ॥ ५० ॥ विवेकबिल्व सकोमळदळीं । तुळसीवन घनमंडळीं । अशोक मळयागरु वनस्थळीं । मगमगाट उठे ॥ ५१ ॥ अशोक मलयार्जुन रसाळ । शिशुप देवदारु विशाळ । आंब्रवनें अळुमाळ । परिपक्वफळीं ॥ ५२ ॥ परिपक्वफणसस्रुवासें । अंजिरें मधुकैवनें सुरसें । मातुलिंग खर्जूरीं सौरसें । बदरी कंटकाविहीन ॥ ५३ ॥ कपित्थें साळ ताळ तमाळ । सोनकेळीवनें केवळ । रांयणी औदुंबर सफळ । आंवनी इंगुदी ॥ ५४ ॥ रायआवळी जांबळी । नारंगी निंबोळी नारिकेळी । पिंपळ पळस वृक्षमेळीं । दाटलेंसे वन ॥ ५५ ॥ मल्लातक कोविदार । गोराटे श्वेत पीत सुंदर । द्राक्षीचे मंडप मनोहर । अमृतरस स्रावतो ॥ ५६ ॥ भक्षितां द्राक्षफळें मधुर । गोडीनें हृदयासि ये रघुवीर । इक्षुदंड सुरससार । रस उलोनि वाहतसे ॥ ५७ ॥ निःशब्दहंसचंचू लागतां । रस उलोनि वाहे तत्वता । तो स्वानंदइक्षु भक्षितां । अरुचि जाय जन्मोची ॥ ५८ ॥ रामउद्यानीचीं सरोवरें । माजि क्रीडती स्वसुखजळचरें । वाहती अप्रांतसुंदरनीरें । नदीरूप वनीं ॥ ५९ ॥ उचंबळती पुष्कर्णी । असंभाव्य डोहो पूर्ण जीवनीं । जैसे नीळांबर नयनीं ।

१ कन्हेर. २ सुंदर (?). ३ साखरलिंबाच्या झाडांच्या राई. ४ कवठाचें झाड. ५ (?). ६ (?). ७ चिच्वा. ८ कांचन.

ठसावे तेंवि तडाग तें ॥ ६० ॥ विकसित सुवर्णकमळणी । कुमोदिनी[१] पैसावल्या नळिणी । हंस विहरत सुमनी । परम शोभा ॥ ६१ ॥ श्वेतोत्पळें रातोत्पळें । नीळोत्पळें जीवनोत्पळें । शोभती सरोवरीं सोज्वळें । बक कारंडकें क्रीडती ॥ ६२ ॥ जळकुक्कुटें उसाळे घेती । सरोवरतटाकीं वैनाकें शोभती । वनबिडाळें विचरती । कस्तूरिमृग ॥ ६३ ॥ सामरें चितळें मनोहरें । घनीं नृत्य करिती मयूरें । नानावर्णाचीं वनचरें । स्वइच्छा सचरती ॥ ६४ ॥ वैर विसरोनि निरंतर । हरिणें व्याघ्र निर्मत्सर । गजसिंह सुखें अपार । येकत्र क्रीडती ॥ ६५ ॥ राम प्रगटला त्याचे हृदयीं । विसरलीं वैर तें सर्वही । राघवभक्त त्यो निश्चयी । पाहिलें विश्रातिघन ॥ ६६ ॥ जालें नित्यविधिविधान । आता अयोध्याप्रवेशन । होयील श्रीरामाचें दर्शन । तें अवधारिजे श्रोतीं ॥ ६७ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । रामकृपेचें घन पाहिलें डोळा । म्हणे मेरुअनंत ॥ ६८ ॥ नवमरुद्रे चतुर्थउल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीराम समर्थ वसति अयोध्या । जे युक्तें करूनि प्राप्ति नव्हे योध्या । ते स्वसुखें चि गति अवध्या । सिद्ध सत्या वसविली ॥ १ ॥ तो रामरहिवास परम । प्रवेशती भक्तअंतर्याम । राघवप्राप्ति निरुपम । प्रगटले भक्तमार्गें ॥ २ ॥ अमृताचा दिवस पाहला । अमृतसिध्दीचा योग जाहला । अमृताचा घन वोळला । अभिजित मुहूर्तीं ॥ ३ ॥ उन्मनीपर विश्रांति । समाधिसुखें विदेहस्थिति । सगुण साक्षात्कार चित्तीं । कुंठती प्राणे ॥ ४ ॥ कैवल्यमुक्तीवरील हे भक्ती । केवळ सद्गुरूची कृपास्थिति । नित्यामृताची होय तृप्ती । सगुणप्रेमातिशयें ॥ ५ ॥ तृप्तीसि क्षुधा लागे अनिवार । निर्वेध प्रेमा परात्पर । तृषेनें फुटों लागलें जिव्हार । जेंवि जीवनाचें ॥ ६ ॥ परमान्नक्षुधेनें तळमळी । तेंवि मुक्तीवरील प्राप्ती आगळी । भक्त चालिले अनुवेळी । सगुणानिर्गुणवेधें ॥ ७ ॥ जैसी निरालंब भूमिका । समान पाटा-

---

१ कुमुदिनी, चंद्रकमलिनी. २ तांबडी कमळें. ३ सोपट्या. ४ राजमाजरें

गणें पीठिका । रामविलासबैसका । महामंडप पंक्तीनें ॥ ८ ॥ उपरमलें तेथें जाय । समीप परि अतिदूरि होय । उभयसेवा मार्गीं रम णीय । वृक्ष लागले हारीनें ॥ ९ ॥ गज रथ तुरंगमयानें । श्रीरामाचे सेवक सन्मानें । विचरती दाटि विद्यमानें । मार्गीं अयोध्येच्या ॥ १० ॥ निघोंट घटावली धरणी । तरणीचक्ररथस्थ भरणी । चरणी चालत अंतःकरणी । तोषभरें अद्भुत ॥ ११ ॥ सुवर्णसम निघोंट पाटांगणें । तेथें देहवीण लोटांगणें । अवतरत चालिले अष्टअंगणें । अष्टभावाचीं ॥ १२ ॥ विज्ञानमूर्धा कलंडत । स्वानंदसुखें चि उलंडत । सुलीनचित्तें मळंडत । दंडायमान धरेसी ॥ १३ ॥ राम विचरत जेथ चरणी । तया चरणमार्गें आचरणी । प्रारब्धगति संचरणी । चालिले त्वरा ॥ १४ ॥ मोक्षाची करूनि कुरवंडी । श्रीरामरूपीं उभारूनि दिंडी । गात नाचत पंथ अखंडीं । चालिले गजरें ॥ १५ ॥ प्रेमळ केवळ सत्वें गळित । लोळणि घालूनि अखंडित । आठवें चि प्रत्यक्ष हृदयांत । भरला रघुराज प्रेमें ॥ १६ ॥ अनिवार प्रेमा गहिवर । पदोपदीं प्रत्यक्ष रघुवीर । रामभेटीची भडेस दुर्धर । प्रीति जीवांतरीं ॥ १७ ॥ राघवेंविना नाइकती श्रवण । न पाहती नयन रामेंवीण । ध्यानीं मनीं रघुनंदन । जडोनि राहिला ॥ १८ ॥ निजध्यासीं रामजिव्हाळा । पाहाती अखंड राघव डोळां । स्वानंदघन सांवळा । प्रगटला विश्वरूप ॥ १९ ॥ राम लेऊनि सर्वांगीं । अखंड वसती रामरंगीं । राम होऊनि अंतरंगीं । रामचर्चा करिती ॥ २० ॥ आजि प्रत्यक्ष पाहूं श्रीराम । हरुषें दाटतसे अंतर्याम । वांछा स्फुरित परम । राघवासि भेटावया ॥ २१ ॥ डोळे लवती शुभचिन्हें होती । शकुन अवघेचि प्रगटती । मनोहर करुणेची मूर्ति । प्रत्यक्ष पाहूं आजि ॥ २२ ॥ पाहातां अयोध्येची रचना । तटस्थ वेध होय मना । बैसले चित्त उपरमेना । कांहीं केलियानें ॥ २३ ॥ सौंदर्यसिंधुमाथित । प्रकाशगाभाराकोटि उदित । रत्नसानुगर्भ लखलखीत । सुवर्णाची नगरी ॥ २४ ॥ स्वयंभ सेजाचें भांडार ।

१ दोन्ही बाजूनीं. २ उत्कंठा.

ाकारचर्या प्रभाकर । विरंचीरचना मनोहर । वर्णवेल कोणासी ॥२५॥ ायोध्या हे कैवल्यनगरी । वर्णितां हे कुंठित होय वैखरी । साच गुरुकृपेनें अभ्यंतरीं । होय अयोध्या प्रवेश ॥ २६ ॥ अयोध्या मरूप स्वयें । राघव चिन्मूर्य तेजोमय । अयोध्येची रचना रम- ीय । प्रभेनें आगळी ॥ २७ ॥ नगरींत दिव्यद्रुमआराम । लक्षितां र्ते दिसे सुश्याम व्योम । माजि कळस उभारिले सूर्य सोम । नक्षत्रां रिसे तेजें ॥ २८ ॥ कनकांबरपताका विस्तीर्ण । वरि सुरेख सळप- से हनुमान । पवनवेगें चपळायमान । डोल देतसे अंबरीं ॥ २९ ॥ भा राहोनि पताकांवरी । भक्त भेटावयासि निरंतरीं । वाट पाहातसे पुर्धारी । विजयध्वज उभऊनि ॥ ३० ॥ दुडांदुडां पताका ढाळा । ीर्तनाचा गजर होय आगळा । प्राकार जयघोषें उठावला । भवभय- नवृत्तीसी ॥ ३१ ॥ प्राकारीं शेषवल्लीदळें । चर्यारूपबाळार्कउजाळें । हिरे वैडूर्यप्रभा कल्लोळें । रत्नकमळें ठायीं ठायीं ॥ ३२ ॥ प्राकारीं ोध सुंदर । अतुर्बळी सेनासंभार । काळदमन भयंकर । घरटिकार फ़रती ॥ ३३ ॥ जयजय जयजय रघुवीर । होतसे महागजरें उच्चार । जयजय रावणांतक धनुर्धर । जयजय सुरवरमोचक ३४ ॥ विशाळपणें ाहाथोर । सामावलें महदंबर । मकरतोरणांकित महाद्वार । देखिलें अ- ोध्येचें ॥ ३५ ॥ काळकृतांतनिवर्तक । भीमस्वरूपी रामसेवक । दुर- द्वौं बैसले भयानक । दृष्टि सळोनि पडे पाहाता ॥ ३६ ॥ परम- कृपाळु सात्त्विकासी । म्हणती सवेग जा भेटावयासी । राम वाट पाहतो महर्निशीं । प्रेमें दाटला अनिवार ॥ ३७ ॥ अनोळखींची पोळखी तुम्हासि सांगितली स्वमुखी । बहुतकाळ ही या हरिखीं । वाट पाहतो तुमची ॥ ३८ ॥ भाविकाचें कोड पुरवीन । भेटेन सुखें बाह्या पसरून । अखंड हृदयीं च कवळीन । निजभक्तासी ॥ ३९ ॥ अरवभक्तांची उत्कंठा याहे । धावोन येयील तो व्लाहे । ठेउनि निडळावरि बाहे । ाट पाहे उतावेळा ॥ ४० ॥ ऐसें द्वारपाळ सुचविती । तेणें प्रेमें उल-

१ प्रात:काळींच्या सूर्यप्रकाशानें. २ दोन्ही बाजूनीं, दुरस्ता. ३ पाहतो.

योनि चित्तीं । टाळी पिटिली समस्तीं । जयघोषें गर्जिनले ॥ ४१ ॥ स्वानंद मुसावला तनुपुष्टी । चालिले भक्त श्रीरामाचे भेटी । आनंदाश्रुधेंबुटीं । भिजतसे धरणी ॥ ४२ ॥ बाष्प दाटलासे कंठीं । रोमांच स्फुरकती उठाउठीं । हरिकीर्तनाची होय दाटि । अयोध्येंत चालतां ॥ ४३ ॥ होतसे घूसराचा उधळा । सुमनें अर्चिला घनसावळा । पदोपदीं उपचारचित्कळा । धूप दीप नैवेद्य ॥ ४४ ॥ हेमदंडें श्वेतचामरें । उडविती सवेग श्वेतांबरें । सिंहासनारूढ रघुवीरें । अद्भुत केलें तेथें ॥ ४५ ॥ नेणों सिंहासनीचा उठिला । किंवा अधिष्ठानीचा राम आला । निजसमुदायासि भेटला । भक्तसमुदायासी ॥ ४६ ॥ जेंवि दूरदेशासि गेले कुमर । ते गांवांसि आलियां सत्वर । माय बाप धांवोनि ये रघुवीर । तैसियापरीं ॥ ४७ ॥ मिरवत चालिला रघुवीर । आपआपणासि भेटावया निर्भर । कृपेनें दाटलें अभ्यंतर । प्रेमा अनिवार भक्तांचा ॥ ४८ ॥ सुवर्ण चौंटीव सोपानें बिदीं । मिरवत चालली भक्तांची मांदि । तेथें समाधिसुख स्वछंदीं । पायघडिया घालित ॥ ४९ ॥ चालतां मार्गीं राघव भेटे । हें अयोध्येसि अभिनव मोठें । रामकीर्तनाच्या कडकडाटें । भक्त थाटें चालिले ॥ ५० ॥ निरुपम सुख अयोध्येसि । जरि नसेचि द्वैताद्वैतासी । महाअद्वैतपंथें सदनासि । रामासि भेटावया चालिले ॥ ५१ ॥ कोण्ही येक आश्चिर्य ऐसें । समाधि रुढे अयोध्याप्रवेशें । चाकाटलें मन होय पिसें । रामछंदें नाचत ॥ ५२ ॥ स्मरणासि ना फळे रूप । तें प्रत्यक्ष केलें चित्स्वरूप । गुरुदयाळें आपेंआप । दाखविलें डोळां ॥ ५३ ॥ जें श्रुतिशास्त्रांसि दुर्गम । जें हृदयीचें गूढ परम । तें प्रत्यक्ष केलें निरुपम । रामरूप समर्थे ॥ ५४ ॥ परमसुखाचें निजनयन । रामरूपीं प्रतिष्ठा करून । पाहाविलें जनवनविजन । अभिरामरूपें ॥ ५५ ॥ भाव प्रगटला अचेतनीं । बोलों लागल्या रामवचनीं । हे सद्गुरु अनंताची करणी । काय सांगों अभिनव ॥ ५६ ॥ हारपलें जेथ मनउन्मन । या स्वरूपाचें जालें दर्शन ।

---

१ राम.

रूपेंवीण राजीवनयन । देखिला दृष्टीमी ॥ ५७ ॥ त्रिभंगी वज्रागठाणें । करीं घेऊनि धनुर्बाण । कानाडोविन्[2]ासें वोढून । प्रगटे पाठिराखा ॥ ५८ ॥ नयनीं ठसावला श्रीराम । कीर्तनीं प्रगटला निरुपम । विश्वरूपअभिराम । देखिला अयोध्येसी ॥ ५९ ॥ मी उदासीन इतराचे चाडें । माझा रघुवीर मज आवडे । अयोध्येमाजि वाडेंकोडें । पाहिला विश्वरूप ॥ ६० ॥ बिदी बाजार चौबार कुंचे । दुरस्ता दुकानें उंचउचें । केणें[3] भरिलें रामनामाचें । घेता देता पावन ॥ ६१ ॥ येथें आळस न कीजे श्रोतीं । भविष्यें ऐमी कैंची प्राप्ति । राम प्रत्यक्ष घ्या हातोहातीं । प्रसन्न जालिया सद्गुरु ॥ ६२ ॥ या सांतें आलिया जोडी करा । मुदलाचा रामलाभ बरा । अवधान देऊनि त्वरा । राघव सांठवा हृदयीं ॥ ६३ ॥ तुम्ही वेवसायी अतिचतुर । शट्टेवर्तक[4] महाथोर । रामजोडी करा संसार । दों दिसाचा असे ॥ ६४ ॥ राम सौदा तुमचे घरीं । घाल तसा घेऊं पदरीं । सद्भावद्रव्य घ्या करीं । रोकडें आमुचें ॥ ६५ ॥ ते ह्मणती हे अयोध्यानगरी । येथ नाही उणी अधिक परी । तुह्मी विचारूनि अभ्यतरीं । सुखें असा निर्विकल्प ॥ ६६ ॥ शेयअर्थिक सोभैनी । भोळें चाटे भाटे अयोध्याभुवनीं । राम घेणें राम देणें करूनि । अर्थसपन्न जाले ॥ ६७ ॥ बाह्यप्रकार नगरी । अखड दाटि भरली गजरीं । तेथुनि चालता पुढारीं । लागलीं अग्रारें द्विजांचीं ॥ ६८ ॥ विमळ वेदिका द्विजसदनें । तेथें अखंडीत पाटांगणें । सरळ वृक्ष उभय हारीनें । शोभती सुशोभित ॥ ६९ ॥ सडे मार्जन परिशुत्ध । रगमोळ चौक प्रसिध्द । वेदाध्ययनें तरुणवृत्र । उंचस्वरें करिती ॥ ७० ॥ पुराणीक अग्निहोत्री प्रवीण । भट ज्यातिषी ज्ञानसंपन्न । रामकृपेनें सुखैकघन । नांदती अयोध्येसी ॥ ७१ ॥ तेथूनि पुढें जातां सत्वर । देखिलें शिवालय मनोहर । तेथील रचनेचा विस्तार । पाहाता ब्रह्मांड भरलें ॥ ७२ ॥ सुवर्णमय सप्त प्राकारीं । शिवनिवास

१ (?). २ (?) आकर्ण ( कानापर्यंत ओढून ) ३ विक्रीचे पदार्थ. ४ सट्टे (?) ५ व्यापारी ६ सट्टे करणारे. ७ प्रामाणिक (?) ८ अमदार. ९ रांगोळ्या.

परोपरी । स्वकाशं हिरे सुवर्णसारीं । शिवविमान निर्मिलें ॥ ७३ ॥ शिवसन्मुख सरोवरें । सुवर्णहंसिताब्ज मनोहरें । शिवार्चन त्या त्या अवसरें । होतसे अभिनव ॥ ७४ ॥ गंध पुष्प धूप दीप । नैवेद्य मनोहर अमुप । नृत्य गीत संगीत नृप–। आज्ञेनें होतसे ॥ ७५ ॥ अभिवंदूनियां सदाशिवासी । भक्त चालिले समुदायेंसीं । तंव तेणें मार्गें सर्वोत्तमासी । देखिलें विष्णुस्वरूपें ॥ ७६ ॥ वर्णवेना विष्णुविलासस्छळ । लावण्यमथित सोज्वळ । प्राकारभूमिका विशाळ । सुवर्णमय प्रदीप्त ॥ ७७ ॥ तत्वांगसत्व गाभारा । दिव्यविमानीं सुनीळ साजिरा । अळंकृत हृदयींचा हिरा । भूषणाढ्य विष्णु ॥ ७८ ॥ पडदे मनोहर सुमनाचे । चंपक चांदोवे मुक्तांचे । धूप दीप नैवेद्याचे । होती उपचार वरिवरि ॥ ७९ ॥ टाळ मृदंगाचे गजरीं । कीर्तन होतसे सप्तस्वरीं । नानावाद्यें उपचारीं । संगीत होतसे सुंदर ॥ ८० ॥ वंदूनि घनौंनिवळ सुखशरीर । श्रीराम पहावयाची त्वरा फार । भक्त चालिले प्राकारद्वार । समीप उरलें ॥ ८१ ॥ नगरसंरक्षण दैवतें । अभिवंदुनि ते समस्तें । पावलों प्राकारद्वारीं त्वराचित्तें । धांव घेतली सन्मुख ॥ ८२ ॥ तंव ते द्वारीं महाविक्राळ । येकाग्र सुचविती द्वारपाळ । म्हणती श्रवणद्वारें अंतराळ । गतीनें रामीं प्रवेशा ॥ ८३ ॥ तें चि पुढें निरूपण । नव प्राकार उल्लंघून । निजअंतर्स्तीं रामदर्शन । होयील तें अवधारिजे ॥ ८४ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । कैवल्यक्षेत्र पाहिलें डोळां । म्हणे मेरूअनंत ॥ ८५ ॥ नवमरुद्रे पंचमउल्लास संपूर्ण ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीरामसमर्थउपदेश । कैवल्यअयोध्याप्रवेश । सदोदितज्ञान समरस । आपआपणा दर्शन ॥ १ ॥ स्वानंदें चि अखिल । रामाचें वास्तव्यस्छळ । स्वप्रकाशमणीमय राउळ । परम रमणीय ॥ २ ॥

---

१ स्वप्रकाश. २ फुललेलीं सुवर्णकमळें. ३ घननीळ ? घनाप्रमाणें निवळ म्हणजे निर्मळ असा अर्थ होऊं शकेल. ४ अंतर्यंदांत (?).

तेथ नवभक्तीचे नव प्राकार। शोभती स्वानुभवरूप मनोहर। ज्ञेयगोपुर-मंडपविस्तार। सुवर्णभूमिका घोटीव ॥ ३ ॥ चर्मचक्षूंसि जेणें प्रकाशे। त्या अंतरचक्षूनें सावकाशें। पाहतां श्रीरामवनविलासें। वसलें असे अधिष्ठान ॥ ४ ॥ पावावयासि श्रीरामसदनीं। समागमें अनंतमौनीं। समर्थ संताची मिळणी। भक्तीनें चि प्रवेश तो ॥ ५ ॥ श्रवणद्वारें पारिक्षिती। पावला रामसायुज्यस्थिति। कीर्तनें नारदाप्रति। जाली राघवस्वरूपता ॥ ६ ॥ स्मरणें प्रल्हाद उद्धरला। पादसेवनें लक्ष्मीचा उद्धार केला। अर्चनें पृथुराजा जाला। परम पावन ॥ ७ ॥ वंदनें कृतार्थ जाला अक्रूर। दास्यें हनुमंत परात्पर। सख्यें अर्जुन निरंतर। गतीसि पावला ॥ ८ ॥ स्वात्मनिवेदनें बळी। पावला सायुज्य पाताळीं। त्या नवभक्तीनें भूमंडळीं। विख्यात जाले भक्तराज ॥ ९ ॥ सद्गुरुकृपेनें नवही भक्ति। बोळगती चतुर्विधा मुक्ति। गुरुमहिमा अलक्षस्थिति। ब्रह्मादिकांसि अकळ ॥ १० ॥ जेंवि परिस चढलिया हातां। अभिवृद्धि संपत्ति स्वभावतां। द्रव्योपलब्धीसि चिंता। कारणें चि न लगे ॥ ११ ॥ जेणें श्रवणें जगाचे श्रवण। आइकती त्या श्रवण-द्वारें पूर्ण। रामसदनीं प्रवेशोन। राघवदर्शन घ्यावें ॥ १२ ॥ जेणें नयनें जगाचे नयन। पाहती त्याचि नयनें पूर्ण। स्वप्रकाशदर्पण घन। विमान निरखावें ॥ १३ ॥ श्रवणसृष्टीची रचना। गोचर होय जया नयना। श्रवणभक्तीनें अंतर्भावना। प्रवेश होतसे ॥ १४ ॥ सोहं-शब्दाचें अभ्यंतर। शब्दत्रिपुटी विना विवर। निःशब्दसुखें परात्पर। महाद्वार ओलांडिलें ॥ १५ ॥ अविछिन्न आणि प्रतिबिंब। पक्षद्वयी तें निर्बिंब चिद्बिंब। व्यतिरेकें मुख्य बिंब। आलें अन्वयासी ॥ १६ ॥ बिंब होऊनि दर्पणस्थिति। दर्पणीं रिघोनि आर्यंती। दर्पणांतील बिंब-प्रतीति। डोळाचि जाला असे ॥ १७ ॥ करूनि दर्पणा च अचळ। पाहे डोळीयासि डोळा अखिल। तेथ दृश्यत्रिपुटीचा विटाळ। दृष्टीसि असेचि ना ॥ १८ ॥ याच निजदृष्टीचे श्रवण। हेंचि संपुटीकर मन।

१ कान.

निर्मळचिदाकाशदर्पण । घेऊनि पाहावें ॥ १९ ॥ जें जें निजान्वयें तत्वपरा । गाळींव स्फूर्ति अर्थविवरा । निःशब्दजिव्हार अभ्यंतरा- । माजी बोळलें ॥ २० ॥ हें सद्गुरुमुखें श्रवण । होय श्रवणभक्ती सुप्रसन्न । सायुज्यसिध्दीचें सदन । वसऊं ये सुखें ॥ २१ ॥ औटमात्रा प्रणवांतर । बावन्न मात्रृकेचा विचार । शब्दमात्राचा उच्चार । तेथूनि होतसे ॥ २२ ॥ तेथें चि अर्थज्ञानाचा झरा । घेऊनि निःशब्दजिव्हारा । श्रवणासि येतसे परा । परात्परविवरें ॥ २३ ॥ हे विख्याति श्रवणभक्ति । जेवि विश्वप्रकाश गभस्ति । किंवा सर्वनिवास वसुमती । कारण होय ॥ २४ ॥ ब्रह्मांडकोटीस आश्रयें । आकाश चि होय स्वयें । तेवि श्रवणभक्तीचें हृदयें । परब्रह्म तत्वता ॥ २५ ॥ आतां कीर्तनाचा प्रकार । साच श्रवणाचें चि अभ्यंतर । प्रत्ययासि येऊनि निरंतर । वैखरीसि येत असे ॥ २६ ॥ जैसें सेविलिया पंचामृत । त्याचि तृप्तीचे ढेंकर येत । तैसे गुरुकृपेचे अभ्रांत । भाव कीर्तनासि येती ॥ २७ ॥ कीर्तन सायुज्याची पदवी । कीर्तन साक्षात्कार संभवी । जेवीं पाकसिध्दीनें बरवी । चवि ये पदार्थासि ॥ २८ ॥ कीर्तनीं निजध्यासाचे उद्गार । कीर्तन चि विकार निर्विकार । कीर्तनीं च सगुण साक्षात्कार । प्रगटे विश्वरूप ॥ २९ ॥ कीर्तनीं च आराध्य आंगीं भरे । कीर्तनीं च समाधिसुख अवतरे । सभा रामरूपनिर्धारें । तुंबळे परमानंद ॥ ३० ॥ दिव्य सिंहासनीं श्रीराममूर्ति । पुढें हरिदास कीर्तन करिती । विश्वविख्याती वर्णिती । पवाडे सर्वोत्तमाचे ॥ ३१ ॥ देवभक्तपरंपरा । देवप्रसन्नता योगविवरा । गुरुशिष्यअभ्यंतरा । प्रगट करिती ॥३२॥ हे देवाधिदेव मम जनका रे । तुझें चि मी मूळ विसरलासि कां रे । तुझें नाम विश्वरूपात्मका रे । त्याचि प्रतिष्ठिलें ॥ ३३ ॥ माझें स्वरूप तुझे हृदयीं । लपऊनि बैसलासि ठायींचे ठायीं । निगम वर्णितां वर्णितां सर्वही । [१]अवातीसि आले ॥ ३४ ॥ शास्त्रें वेवादतां

१ पुरे वाट. वेदांना तुझें वर्णन करतां करतां पुरे वाट झाली, ते थकले.

राहिली । पुराणें प्रवाहीं च पडली । मांग सद्गुरूनें दाविली । निजसोय तुझी आह्मां ॥ ३५ ॥ जैसें गुप्त ठेवणें आपुलें । चुकोनि गेलें बहुता काळें । तें चि जिवींच्या जीवलगें दाविलें । सुखें चि लाधलें तात्काळ ॥ ३६ ॥ तैसा गुरुवचनीं प्रगट । भेटलासि आह्मा अवचट । आतां तऱ्ही प्रेम दे उत्कट । विसरों नको समर्था ॥ ३७ ॥ तुझा-स्वभाव येकदेशी । समजल्यावीण न उमजसी । पूर्ण विसराळुचि होसी । तैसा चि आठवही पूर्ण ॥ ३८ ॥ जैसें अग्नीचें लक्षण । पेटविल्या होय संपूर्ण । विझविल्यां जाय रिघोन । नव्हता चि ऐसा ॥३९॥ परि अग्नीचा अभाव होय । तूं अभावाचा साक्षी स्वयें । अवतरोनि सत्यान्वयें । रक्षिलें आह्मासि तुवां ॥ ४० ॥ साच चि आह्मासाठीं देवा । तुज दशावतारजन्मगोवा । आमुच्या जननाचा उगावा । केला बहुतां प्रसंगीं ॥ ४१ ॥ ऐसे हरिकीर्तनीं पवाडे । सन्मुख राहोनि देवापुढें । दाविती विन्यास रोकडे । आवेशा भरोनि ॥ ४२ ॥ मछ कछप वाराहाकृति । नृसिंह वामन भार्गवमूर्ति । धनुर्बाण घेऊनि हातीं । रामरूपें अभिनव ॥ ४३ ॥ शरासनीं सज्जूनि शर दुर्धर । कौनाडी मोडूनि अनिवार । ठाणें मांडूनिया संव्हार । दाविती अहंरावणाचा ॥ ४४ ॥ पावन कृष्णचरित्रलीला । गोपिका गोपाळ सकळा । हरिकीर्तनी लाऊनि चाळा । उद्धरीत विश्व ॥ ४५ ॥ राम कृष्ण अवतार श्रेष्ठ । तेणें कीर्तन होतसे वरिष्ठ । दोन्ही अवतारांचें उत्कट । चरित्र जगीं विस्तारलें ॥ ४६ ॥ राम सूर्यवंशविख्याति । कृष्ण चंद्रवंशप्रख्याति । उभयतांची कीर्ति जगतीं । उभय कवीनी वर्णिली ॥ ४७ ॥ वाल्मीकें शतकोटी रामायण । वर्णिलें रामचरित्र गहन । व्यासें श्रीकृष्णआख्यान । भागवतीं निरोपिलें ॥ ४८ ॥ रामें ताटिका उद्धरिली । कृष्णें पूतना कृतार्थ केली । श्रीरामें अहिल्या पावन जाली । कृष्णीं कुब्जा स्वरूपीं मिळाली ॥ ४९ ॥ रामें भवधनुर्भंग केला । कृष्णें शिशुपाळ निवटिला । राम दंडकारण्य आला । कृष्ण प्रवेशला द्वारकेसी ॥ ५० ॥

---

१ उलगडा. २ विषयाची मांडणी. ३ आकर्ण ( ? ). ४ आव.

रघुवीरें विराध वधिला । कृष्णवीरें कंस मारिला । रामें खरदूषण भेदिला । कृष्णें निवटिला जरासंध ॥ ५१ ॥ रामें वाली निर्मूळ केला । कृष्णें काळयौवन निर्दाळिला । रामें सुग्रीव सखा केला । कृष्णेंसि सखा अर्जुन ॥ ५२ ॥ रामें पाषाण तारिले । कृष्णें जडमूढ उत्धरिले । रामें रावणादिक संहारिले । कृष्णें निवटिले महा दैत्य ॥५३॥ रामें सुरवर मुक्त केले। कृष्णें देववृंद तोषविले । रामकृष्ण अवतार भले । चंद्र सूर्य जगतीसि ॥ ५४ ॥ रामें अयोध्या वैकुंठा नेली । कृष्णें अद्वैतें सृष्टी बोधिली । रामकृष्णवंशावळी । परंपरा पावन ॥ ५५ ॥ ऐसें हरीकीर्तनीं रसाळ । प्रमेय गाती भक्ती प्रेमळ । सिंहासनींचा उठोनि तात्काळ । भेटी देत भक्तांसि ॥ ५६ ॥ ऐसिया हरिकीर्तन गजरीं । मकरतोरणांकित महाद्वारीं । द्वितीय अंतर्छीं प्राकारीं । दाटी जालीसे महा ॥ ५७ ॥ कंप रोमांच बाष्प दाटी । नामस्मरणें आकाश उठी । धूसर उधळतसे दिक्पटीं । सुरवर कोटी पाहती ॥ ५८ ॥ वृंदारकेंवृंद तोषोनि । सुमनें वर्षती विमनांतूनि । दुंदुमीघनरवें गगनीं । घनवटला शब्द ॥ ५९ ॥ ऐसें श्रीरामकीर्तन । द्वितीय प्राकार उल्लंघून । जातां तृतीय अंतर्छीं स्मरण । देखिलें महाद्वार तें ॥ ६० ॥ स्मरणाच्या पैसारें पूर्ण । तृतीय अंतर्छीं आत्मजन । स्मरणसुखवस्ती गहन । वसती रामालयें वेष्टित ॥ ६१ ॥ नित्यस्मरणसंपुटीकरण । तेथें नाहीं स्मरणविस्मरण । याचि स्मरणें शंकर प्रवीण । रामस्मरण करितसे ॥ ६२ ॥ शिवहृदय चिदंबर । लिहिलें रामनाम मनोहर । संख्याविहीन साचार । वाचिलें स्मरणरसनेनें ॥ ६३ ॥ नाहीं स्मरण सूत्रत्रिपुटी । नलगे स्मरणीसि याज्या गाठीं । ऐसें स्मरण तो धूर्जटी । कैलासपीठीं करितसे ॥ ६४ ॥ ऐसें चि स्मरण करी भवानी । याचि स्मरणें कपिलादि मुनी । सिध्दसाधु समाधानी । रामस्मरणीं तत्पर ॥ ६५ ॥ देवऋषि ब्रह्मर्षि संपूर्ण । रामस्मरणें चि झाले पावन ।

१ अंतःकरणरूप मंदिरांत. २ देवांचे समुदाय. ३ स्मरणासाठी गांठी मारायच्या लागत नाहींत.

भक्त भाविक रामस्मरण । करिती निरंतर ॥ ६६ ॥ रामस्मरणें तृतीय अंतर्छी । राम कीर्तनघोषमति । चालिले प्रदक्षणा करित रिछती । पाहत अंतरछरचना ॥ ६७ ॥ श्रीरामाचे आप्तवर्ग । जेंहीं विसर्ग केला . भवसर्ग । रामानुभवी ते भर्ग । वसती माहासुखें ॥६८॥ पूर्वदिशेसि भरतसदन । सप्तभूमिकाप्राकार गहन । स्वानंदाचीच भरणी ' संपूर्ण । ऐश्वर्य महासिद्धीचें ॥ ६९ ॥ दृष्टी पाहता भरतभुवन । लावण्यनिधीचें तेज गहन । निवालें 'लावण्याचें नयन । जडोनि ठेले प्रमेसी ॥ ७० ॥ अभिवंदुनि भरतसदन । पुढें चालिले भक्तसज्जन । तंव ते दक्षिणदिशेस भवन । देखिलें शत्रुघ्नाचें ॥ ७१ ॥ भवशत्रूसि करुनि दमन । रचिलें निर्भवतेजें सदन । चिद्गगनाचे प्रकाश गहन । घनवटले सदनीं ॥ ७२ ॥ सुवर्णचिद्रत्नखचित । सप्तप्राकारीं सुशोभित । शत्रुघ्नमंदिर देखत । निवाली दृष्टी ॥ ७३ ॥ नमस्कारूनि पुढत पुढती । आले प्रतीचीसि सद्गती । पाहतां तेथ लक्ष्मणवस्ती । राजभवन सुंदर ॥ ७४ ॥ सप्तप्राकारीं चित्सूर्या । मंडलाकृतीनें वसविलें आश्चर्या । झळाळिती शेषफणांचिया चर्या । दिव्यरत्नसंभूता ॥ ७५ ॥ सुवर्णमाणिक्यमय आलय । दैवी संपत्तीनें वसता होय । तो श्रीरामाचा सखा निश्चयें । सुमित्रासहवासें वर्तला ॥७६॥ प्रणाम करूनि सौमित्रमंदिरा । उत्तरदिशेसि आलों सत्वरा । तव तेथें देखिला साजिरा । आश्रम वसिष्ठ ऋषीचा ॥ ७७ ॥ वसिष्ठ ब्रह्मऋषि वरिष्ठ । वंद्य ब्रह्मादिकांसि' श्रेष्ठ । शिवाचें आराध्य उत्कट । तयासि अनुग्रहिलें जेणें ॥ ७८ ॥ समव' ब्रह्मयाचे मानसीं । परि परम गुरु होय शिवासि । जेणें उपदेशिलें श्रीरामासि । परब्रह्मतत्व स्वयें ॥ ७९ ॥ जो अक्षोभशांतीचा सागर । जो समाधि सुखाचा गिरिवर । जो विश्रांतिवनकुसुमाकर । निगमागमवेत्ता ॥ ८० ॥ जो विज्ञान व्योमींचा दिवाकर । जो निर्वाणनिशीचा सुधाकर । जो स्वरूपानुभव साचार । अवत-

१ ज्यानीं जन्ममरणरूप संसाराचें विसर्जन म्हणजे समाप्ति केली. २ मोक्षरूप. ३ पश्चिमेस, प्राचीदिशेस. ४ (?).

रला सृष्टीसि ॥ ८१ ॥ तया वसिष्ठऋपीचें भुवन । पाहतां निवालें¹ निजनयन । आणिमादि सिध्दि आंगण । वोळंगती दास्यत्वें ॥ ८२ ॥ महाचमत्काराच्या सिधी । वोळगती जया त्रिशुध्दी । काळज्ञाननिरवधी । अकाळतत्ववेत्ता ॥ ८३ ॥ जें केवळ वेदांतसार । स्वप्रकाशघन मनोहर । चिद्रत्नसुवर्णसागर । सप्त सप्तप्राकारी ॥ ८४ ॥ अभिवंदुनि वसिष्ठाश्रम । स्मरणअंतरस्थेंचि परम । आलों महाद्वारासी श्रीराम । न्याहाळिला नयनीं सन्मुख ॥ ८५ ॥ वोलांडिलें स्मरणअंतरस्थ । लागलें पादसेवन तेथ । मकरतोरणांकित अद्भुत । महाद्वार देखिलें ॥ ८६ ॥ जैसी मनोमयसृष्टि । पाहतां पाहतां अप्रांत दृष्टी । ज्ञानप्राकारघरटी । श्रीरामभुवना ॥ ८७ ॥ येकेक नगरें येकेक अंतरस्थी । स्वसुखाची च केवळ वस्ती । जयाचा आत्माचि रघुपति । ते चि वसती तेथें ॥ ८८ ॥ पादसेवन साचार । जे सर्वस्व सोडूनि अहंकार । शरण रिघोनि निरंतर । सद्गुरुपद सेवावें ॥ ८९ ॥ सद्गुरुपदीं अनन्य शरण । यातें चि बोलिजे पादसेवन । सेव्य कैसें सेविना कवण । हें प्रांजळ निवळावें ॥ ९० ॥ सेव्य सद्गुरुपद अनंत । सेवितां संकल्प करूनि शांत । पद सदोदित अप्रांत । सेविजे अनुभवें ॥ ९१ ॥ पद व्योम गाळीव सार । पद अखंडमंडळाकार । पद अपरोक्ष निर्विकार । सेवावें अभिन्न ॥ ९२ ॥ हृदयस्मरणासि येतसे । पद सनातन द्योततसे । मुरडूनि पदज्ञानसौरसें । पदींच समरसावें ॥ ९३ ॥ सद्गुरुपदाची स्फूर्ति । भेदें विस्तारिली त्रिजगतीं । पद अभेदबोधस्थिती । स्फुरण कांहींच असेना ॥ ९४ ॥ पदीं सामावलें सकळ । पदीं वोसरिलें जन्ममूळ । पदीं विसावलें मंडळ । साक्ष्यत्वसूर्याचें ॥ ९५ ॥ सद्गुरुपदीं निरंतर । सद्भावें समर्पिलें शिर । देशिकपदलिंगपूजा साचार । घडली सच्छिष्यांसी ॥ ९६ ॥ गुरुपदलिंगीं शिरकमळ । वाहिलें अखंडित रसाळ । पंचप्राणाचें सोज्वळ । आरत उजळिलें ॥ ९७ ॥ गंधपुष्पादि उपचार । समर्पिले आत्मत्वें प्रकार ।

---

१ शांतात.

गुरु तोषोनि अभयकर। पावलों मस्तकीं ॥९८॥ गुरुकृपाअनुग्रह श्रवणीं। चमत्कारलों अंतःकरणीं। वेधनिर्वेधताकरणी। राहिली सकळ ॥ ९९ ॥ व्रतें तपें दानें अपूर्व। गुरुपदीं समर्पिलीं सर्व। व्रतें उद्यापनें अर्ह। जालों गुरुकृपेसी ॥ १०० ॥ चतुर्थ अतस्थ श्रीरामभुवन। गुरुकटाक्षें अनुसंधान। लक्षूनि निजजीवीं सनातन। पावलों अर्चनअंतस्थीं ॥१॥ इति श्रीरामसोहळा। सद्गुरुकृपेचा जिव्हाळा। श्रवणादिपादसेवनलीळा। म्हणे मेरुअनंत ॥ १०२ ॥ नवम रुद्रे। षष्ठउल्लास संपूर्ण ॥

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ परम। सद्गुरुरूप निरुपम। प्रतीतीचे अंतर्याम। विभूषित सुखें ॥१॥ मनोरथसिध्दी सिंहासनीं। अमलसुखतनु धनुष्पाणि। भवभयशमन ध्यानीं। प्रत्यक्ष जाला ॥ २ ॥ स्वरूपज्ञान-मनोहर। चिदाकाशींचा प्रकाशकर। लावण्यतेज दिव्यशरीर। राजीवनयन ॥ ३ ॥ श्रवण कीर्तन स्मरण। निजध्यासें अंतःकरणें। पाहिला निजदृष्टीसि मनें। वस्ती केली चरणाबुर्जी ॥ ४ ॥ पादसेवन चौथी भक्ती। जाली सद्गुरुपदीं निजमुक्ति। मुक्तीचें माहेर तेणें च प्रतीती। अर्चिलें सुखें ॥ ५ ॥ नवविधा भक्तीचें अभ्यंतर। चौथी भक्ति निरंतर। चौथे भक्तीचा चि साचार। घडलें आत्मनिवेदन ॥ ६ ॥ आत्मा अक्षर परब्रह्म स्वयें। महद्‌ब्रह्म सुवर्णमय। गुणघनरत्नाकर निश्चयें। रत्नसानु स्वयंभ ॥ ७ ॥ तें आत्मतत्वरत्नसुवर्ण। जोतिर्मयानंदघन। सर्वसाक्षत्वाचें भूषण। नामरूपासि आलें ॥ ८ ॥ त्या निजतत्वसुवर्णाचे। चिद्रत्नखचित प्रकाशाचे। स्वरूपयोगमत्स्याचे। केले अळंकार ॥ ९ ॥ सद्गुरुरामासि अर्चन। केलें परम आवडीनें पूर्ण। षोडशोपचार प्रमाण। गंधपुष्पादिक भावें ॥ १० ॥ ज्ञेय चंदन गाळीव गर्भ। मगमगाटें दाटिलें ज्ञाननभ। स्वयंभ घननीळ सुप्रभ[1]। तनूसि चर्चिलें ॥ ११ ॥ भाळीं चद्ररेखा सुरेख। शोभलें हसिताब्जश्रीमुख। लावण्य पाहता स्वसुख। दाटिलें निजहृदयीं ॥ १२ ॥ सुवासीक चंपकमाळा। घातल्या सद्गुरूच्या गळां। शोभला घनानंद सावळा। बैसला

१ प्रफुल्ल कमळासारखें रमणीय मुख.

ज्ञानदृष्टीसी ॥ १३ ॥ पंचतत्वांचें अभ्यंतर । महत्तत्व तत्वसार । प्रतीतीसि ज्ञानासि दुर्धर । धूप तो समर्पिला ॥ १४ ॥ जेणें ज्ञेय ज्ञाता ज्ञान । प्रकाशिलें विश्व संपूर्ण । मूळ विश्वोदय सनातन । दीप आत्मप्रभेचा लाविला ॥ १५ ॥ अनेकवृत्तींचें विसर्जन । करुनि येकारत केलें पूर्ण । नैवेद्य परमतत्व उन्मन । अमृत समर्पिलें ॥ १६ ॥ निवृत्ति पंचतत्वांचे प्रदीप्त । उजळूनियां पंचारत । पंचारतीं अखंडीत । केली सद्गुरुरायासी ॥ १७ ॥ उपरतीसि येऊनि तत्वता । आरत धरुनि सप्रेमता । विज्ञानज्योतिर्मय वस्तुता । जाहलें पूर्ण आरत ॥ १८ ॥ सद्गुरुरामाची रुपडी । निजतत्वप्रकाश चोखडी । संतस्वरूपें धडपुडी । अर्चिली अनंतरूपें ॥ १९ ॥ अर्चनभक्तीचा प्रेमा थोर । अर्चनीं संतुष्ट होय परमेश्वर । अर्चनीं प्रसन्नता साक्षात्कार । अर्चन शोभा आगळी ॥ २० ॥ अर्चनभक्ति घडली जयासी । तुळना नाहीं त्याच्या भाग्यासी । दैवदृष्टीचा उदयासी । भाग्योदयो रवी ॥ २१ ॥ अर्चनाची विधि अवसरें । उपकर्णसिधि मनोहर । निर्मळ सोज्वळ अपारें । पात्रादि वस्तुजात ॥ २२ ॥ परमनिर्मळ सुवर्णमय । देवद्विजवस्तींचीं आलयें । तेथें सर्वसिध्दीची समृध्दि होय । स्वभावेंचि पाहतां ॥ २३ ॥ सोज्वळ कनकासन वसन । नाना अळंकार नाना भूषण । यानें वाहनें आणि सुखासनें । दिव्या पताका सुंदर ॥ २४ ॥ सुवर्णचित्रगरुड टके । देदीप्त सूर्यपत्रक अनेक । विक्राळ मकरमुखें । भयंकर कृतीनें ॥ २५ ॥ चंद्रमंडळाकारें छत्रें । मेघडंबरें प्रभाघनविचित्रें । ऐश्वर्य पाहतां निजनेत्रें । तेथें चि वसिजे ॥ २६ ॥ नाना आश्रममनोहर । तापसनिवास सुंदर । आरामीं लागले तरुवर । परिपाळिले सुखें ॥ २७ ॥ नाना सुमनयाती उपवनें । पावती नित्यसचेतें जीवन । सर्वां ठायीं तत्पर मन । साक्षेप जो स्वयें ॥ २८ ॥ तो सत्वाचा गाळींव घडला । ना तो निजशांतीचा चि मुसावला । अर्चनविधीनें समर्पिला सर्वलें सद्गुरूसि ॥ २९ ॥ परमानंदविग्रही । सद्गुरुअनंतरूप

१ एकारति. २ (?).

पाहीं । तीर्थक्षेत्रीं सर्वा ठायीं । अर्चिला सद्भावें ॥ ३० ॥ देव देवता नाना व्यक्ती । शिव शक्ति दिव्यमूर्ति । सूर्य गजानन आकृती । विष्णुमूर्ति अर्चिल्या ॥ ३१ ॥ जें जें वेळेसि अपेक्षित । तें तें वेळेसि होय प्राप्त । सन्निधचि सर्व पदार्थजात । परिशुध्द संग्रहिले ॥ ३२ ॥ ऐसी हे अर्चनभक्ति । निवेदिली सद्गुरुप्रति । अर्चनप्रकारीं भक्त पंथीं । रामालयीं प्रवेशले ॥ ३३ ॥ तंव तो वंदनभक्तीचा प्रकार । विज्ञानगाभा मनोहर । निजांगींच्या तेजें दुर्धर । प्रकाशलें तेणें ॥ ३४ ॥ निरुपम रचना तेथें चि । रत्नगाभा घोंटीव पाची । स्वप्रकाशघन नीळाची । शोभा आगळी वर्चसें ॥ ३५ ॥ महाप्राकारद्वार विशाळ । उभयविक्राळ द्वारपाळ । अभिवंदुनि त्यासि तात्काळ । अनुग्रह घेतला ॥ ३६ ॥ दिव्यपुष्पकीं अवकाश पूर्ण । पाहिजे तितुकें हो विस्तीर्ण । पाहतां येकवस्तीचें प्रमाण । सांठवण त्रैलोक्यासि ॥ ३७ ॥ तैसें अभिवंदनप्रकारीं । स्थळ त्रैलोक्यवस्तीचें निर्धारीं । तिनी लोकव्यक्ति त्यामाझारीं । आसती दाटल्या ॥ ३८ ॥ जो सद्गुरूचा उपासक । तेणें किजे हें नमन निश्चयात्मक । नमन चि होय सार्थक । संशय नसे सर्वथा ॥ ३९ ॥ करूनि अहंभावशत्रुकदन । करावें विश्वरूपगुरुवंदन । सत्य तो चि तो देशिकनंदन । अभिवंदन भावें ॥ ४० ॥ सर्वस्वेंकरूनि निवेदन । करावें श्रीगुरूसि अभिवंदन । अहंकाराचें उपशमन । नमन बोलिजे या अर्थें ॥४१॥ संकल्पशून्य मनोन्मन । तेंचि जाणावें पैं नमन । प्रतीतिरूप अमन । नमन घडलें तया ॥४२॥ वाहिलें शिरकमळ गुरुपायीं । तें जेणें काढिलें चि नाहीं कहीं । या अभिवंदनें निश्चयीं । कृतार्थचि जाला तो ॥ ४३ ॥ वंदन त्रिशुध्दीनें स्वतःसिध्द । वंदन अष्टभावें अष्टविध । सद्गुरुपदीं नित्यबोध । संकल्पशिर वाहिलें ॥ ४४ ॥ नाना तत्वांचें प्रमेय । त्या पर निरामय हृदय । अर्पिजे गुरुपदीं प्रत्ययें । हें हृदयअभिवंदन ॥ ४५ ॥ सर्वांगदेखणीयाची निजदृष्टी । जाली स्वरूपेसीं समसाटी । सद्गुरुपदीं अर्पित समष्टी । दृष्टीअभिवंदन हें ॥ ४६ ॥ निजमनोरथ जाल्यासिध्दी । सत्यसंकल्पाची अवधी ।

ज्ञानदृष्टीसी ॥ १३ ॥ पंचतत्वांचें अभ्यंतर । महत्तत्व तत्वसार । प्रतीतीसि ज्ञानासि दुर्धर । धूप तो समर्पिला ॥ १४ ॥ जेणें ज्ञेय ज्ञाता ज्ञान । प्रकाशिलें विश्व संपूर्ण । मूळ विश्वोदय सनातन । दीप आत्मप्रमेचा ओविला ॥ १५ ॥ अनेकवृत्तीचें विसर्जन । करुनि येकोरत केलें पूर्ण । नैवेद्य परमतत्व उन्मन । अमृत समर्पिलें ॥ १६ ॥ निवृत्तिं पंचतत्वांचे प्रदीप्त । उजळूनियां पंचारत । पंचारतीं अखंडीत । केली सद्गुरुरायासी ॥ १७ ॥ उपरतीसि येऊनि तत्वता । आरत घरुनि सप्रेमता । विज्ञानज्योतिर्मय वस्तुता । जाहलें पूर्ण आरत ॥ १८ ॥ सद्गुरुरामाची रुपडी । निजतत्वप्रकाश चोखडी । संतस्वरूपें धडपुडी । अर्चिली अनंतरूपें ॥ १९ ॥ अर्चनभक्तीचा प्रेमा थोर । अर्चनीं संतुष्ट होय परमेश्वर । अर्चनीं प्रसन्नता साक्षात्कार । अर्चन शोभा आगळी ॥ २० ॥ अर्चनभक्ति घडली जयासी । तुळना नाहीं त्याच्या भाग्यासी । दैवदृष्टीचा उदयासी । भाग्योदयो रवी ॥ २१ ॥ अर्चनाची विधि अवसरें । उपकर्णसिध्दि मनोहर । निर्मळ सोज्वळ अपारें । पात्रादि वस्तुजात ॥ २२ ॥ परमनिर्मळ सुवर्णमय । देवद्विजवरतीचीं आलयें । तेथें सर्वसिध्दीची समृध्दि होय । स्वभावेंचि पाहतां ॥ २३ ॥ सोज्वळ कनकासन वसन । नाना अळंकार नाना भूषण । यानें वाहनें आणि सुखासनें । दिव्या पताका सुंदर ॥ २४ ॥ सुवर्णचित्रगरुड टके । देदीप्त सूर्यपत्रक अनेक । विक्राळ मकरमुखें । भयंकर कृतीनें ॥ २५ ॥ चंद्रमंडळाकारें छत्रें । मेघडंबरें प्रभाघनविचित्रें । ऐश्वर्य पाहतां निजनेत्रें । तेथें चि वसिजे ॥ २६ ॥ नाना आश्रममनोहर । तापसनिवास सुंदर । आरामीं लागले तरुवर । परिपाळिलें सुखें ॥ २७ ॥ नाना सुमनयाती उपवनें । पावती नित्यसत्तेनें जीवन । सर्वां ठायीं तत्पर मन । साक्षेप जो स्वयें ॥ २८ ॥ तो सत्वाचा गाळींव घडला । ना तो निजशांतीचा चि मुसावला । अर्चनविधीनें समर्पिला सर्वस्वें सद्गुरूसि ॥ २९ ॥ परमानंदविग्रही । सद्गुरुअनंतरूप

१ एकारति. २.(?)

पाहीं । तीर्थक्षेत्रीं सर्वा ठायीं । अर्चिळा सद्भावें ॥ ३० ॥ देव देवता नाना व्यक्ती । शिव शक्ति दिव्यमूर्ति । सूर्य गजानन आकृती । विष्णुमूर्ति अर्चिल्या ॥ ३१ ॥ जें जें वेळेसि अपेक्षित । तें तें वेळेसि होय प्राप्त । सन्निधचि सर्व पदार्थजात । परिशुत्ध संग्रहिले ॥ ३२ ॥ ऐसी हे अर्चनभक्ति । निवेदिली सद्गुरुप्रति । अर्चनप्रकारीं भक्त पंथीं । रामालयीं प्रवेशले ॥ ३३ ॥ तंव तो वंदनभक्तीचा प्रकार । विज्ञानगाभा मनोहर । निजांगींच्या तेजें दुर्धर । प्रकाशलें तेणें ॥ ३४ ॥ निरुपम रचना तेथें चि । रत्नगाभा घोंटीव पाची । स्वप्रकाशघन नीळाची । शोभा आगळी वर्चसें ॥ ३५ ॥ महाप्राकारद्वार विशाळ । उभयविक्राळ द्वारपाळ । अभिवंदुनि त्यासि तात्काळ । अनुग्रह घेतला ॥ ३६ ॥ दिव्यपुष्पकीं अवकाश पूर्ण । पाहिजे तितुकें हो विस्तीर्ण । ाहतां येकवस्तीचें प्रमाण । सांठवण त्रैलोक्यासि ॥ ३७ ॥ तैसें अभिवदनप्रकारीं । स्छळ त्रैलोक्यवस्तीचें निर्धारीं । तिनी लोकव्यक्ति ामाझारीं । आसती दाटल्या ॥ ३८ ॥ जो सद्गुरूचा उपासक । णें किजे हें नमन निश्चयात्मक । नमन चि होय सार्थक । संशय ासे सर्वथा ॥ ३९ ॥ करूनि अहंभावशत्रुकदन । करावें विश्वरूपरुनंदन । सत्य तो चि तो देशिकनंदन । अभिवंदन भावें ॥ ४० ॥ र्वस्वेंकरूनि निवेदन । करावें श्रीगुरूसि अभिवदन । अहंकाराचें पशमन । नमन बोलिजे या अर्थें ॥ ४१ ॥ सकल्पशून्य मनोन्मन । तेंचि णार्थें पैं नमन । प्रतीतिरूप अमन । नमन घडलें तया ॥ ४२ ॥ वाहिलें रकमळ गुरुपायीं । तें जेणें काढिलें चि नाहीं कहीं । या अभिवदनें क्षयीं । कृतार्थचि जाला तो ॥ ४३ ॥ वंदन त्रिशुत्धीनें स्वतःसित्ध । न अष्टभावें अष्टविध । सद्गुरुपदीं निलबोध । संकल्पशिर वाहिलें

निजप्रतीति निरवधि । मनोमय गुरुवंदन ॥ ४७ ॥ वाचेसि वाचेतीत तत्व आलें। तेणें अनिर्वाच्य सुख जालें । हें वाचेचें वंदन बोलिलें । सद्गुरुपदीं ॥ ४८ ॥ तत्वमसिपद अर्थान्वयें । ब्रह्मींच संचरण स्वयें । ते पदगतीनिवेदन निश्चयें । पदवंदन बोलिजे ॥ ४९ ॥ प्रणाम अखंडदंडायमाने। प्रवृत्तिनिवृत्ति जानुचक्रगतीनें । आस्तिक्यधरेसि नमन विधानें । जानुअभिवंदनें ॥ ५० ॥ स्वयंमप्राप्तीचे ग्रहण भाव । ज्ञानरूप करस्वभाव । करू निवेदन स्वानुभव । करवंदन हें ॥ ५१ ॥ ऐसिया अष्टांगभावेंसीं । नमन होय जें गुरूसी । तें कृतार्थता तयासी । योगसिध्दीनें प्रसन्न ॥ ५२ ॥ काष्ठ लोष्ट अचेतन । आकृतिमात्रासि वंदन । स्थावरजंगम अभिवंदन । होय सद्गुरुभक्तासी ॥ ५३ ॥ चांडाळादि गो खर । अक्रूरें वंदिले हे प्रसिध्दि थोर । परि तयाचे दृष्टीसि साचार । परमात्मस्वरूप ॥ ५४ ॥ खर आपणासि नेणे खरपणें । खरासि खरपणें जें देखणें । तेंचि खरअज्ञान जाणणें । नेणे तत्वतां हृदयें ॥ ५५ ॥ काष्ठाचा निर्मिला हस्ती । तयासि हस्तीपणें उच्चारिती । येक तयासि वोळखती । काष्ठपणें चि संपूर्ण ॥ ५६ ॥ तैसें जग नाना रंगीं । अभासलें ज्ञानाचेनि आंगीं । येकीं वोळखोनि निजांगीं । तत्वतांचि प्रतिष्ठिलें ॥ ५७ ॥ हे अभिवंदन महास्थिति । षष्ठप्राकार वंदनभक्ति । अभिवंदनेंचि निश्चिती । दास्यत्वासि आलें ॥ ५८ ॥ तो दास्यत्वाचा सप्तम प्राकार । तेथील रचना परम सुंदर । चिद्रत्नाचें जिव्हार । कामावलें अंतरंगीं ॥ ५९ ॥ दास्यभजनसृष्टीचा सूर्य । तपोधन विरक्ति निजवीर्य । शांतीस्वभावऔदार्य । गुणें आगळा ॥ ६० ॥ तो वानरवीर पुरुषार्थी[१] जेणें आत्माचि केला दाशरथी । कृपामृतकर सर्वार्थी । वोळला रामचंद्र जया ॥ ६१ ॥ अखिल सत्वाचा गाभा केवळ । सद्भाव इंद्रनीळ गिरि निर्मळ । सन्मुख लक्षूनि घननीळ । उभा असे अभिवंदनयुक्त ॥ ६२ ॥ दृष्टी जडली श्रीरामचरणीं । राघव भरोनि अंतःकरणीं । धरणी स्रवतसे स्मरणी । आनं-

१ मारुति.

द्राक्षूची ॥ ६३ ॥ तरणी कुळोद्भव तरणी । त्याला सर्वदा सर्व करणी । स्मरणी आनंदसिंधुभरणी । भरण भरतसे प्रेमें ॥ ६४ ॥ दास्यें सर्वस्वें पुरला । भडस घेऊनि असे उरला । रामदास्यीं च अनुसरला । रामदास तो यथार्थ ॥ ६५ ॥ राघवदास्याची भडस न पुरे । रामभजनसंस्कारें । होऊनि चिरंजीव निर्धारें । दास्य करितसे अद्यापी ॥ ६६ ॥ जीवाहूनि प्राणसकटें । केलीं स्वामीचीं प्रयोजनें निकटें । साहा हि अब्धी लंघूनि अवचटें । द्रोणाद्री आणिला ॥ ६७ ॥ तेणें सजीव केला सौमित्र सुखें । जो आणिला स्वामिमुखें । जो प्रतापी महावीर हरिखें । कर्ता होय अद्भुत ॥ ६८ ॥ दास्यभजनस्थितीनें । सखा केला श्रीराम जेणें । सर्वस्वें सद्भक्तीनें । समर्पला राघवीं ॥ ६९ ॥ राम सद्गुरु परात्पर । सच्छिष्य निगमागम वनचर । अहंवन विध्वंसक वानर । दास्यभक्तीनें रूढला ॥७०॥ तो रामदास होय ईश्वर । सद्गुरु आमुचा प्रबोधकर । त्याचें दास्य जालियां रघुवीर । भेटि देईल प्रत्यक्ष ॥ ७१ ॥ दास्य पुरवेल ऐसा क्षण । येथ महाशक्तीवंताचें कारण । येक बळभीमावाचून । दुजा सृष्टिसी नाडळे ॥ ७२ ॥ हनुमंतासि अभिवदून । जालें दास्यप्राकार उल्लंघन । तंव तो परमसख्याचा गहन । प्राकार देखिला ॥ ७३ ॥ सद्गुरूसि परमसख्य । हें परमहंसी ऐक्य । विवर्जित भवभावअसंख्य । त्याचें सख्य चळेना ॥ ७४ ॥ जीवाप्राणाहून अधिक । निजप्रतीतीचा जनक । भवभयभ्रांतिछेदक । तयासि सख्य केलें ॥ ७५ ॥ प्रवृत्तिस्नेहसूत्र तोडिलें । सद्गुरूसि निजसख्य जोडिलें । लोभमित्रापासूनि काढिलें । जेणें तो सखा निजाचा ॥ ७६ ॥ विषयसुखाची जिवलगें । सख्यीं च दुःख देती सवेगें । सद्गुरुसखा अंतरंगें मृत्युपासूनि सोडवी ॥ ७७ ॥ प्रवृत्तिजनकें मायेचीं । जन्मऊनि दुःखें देती लोभें चि । वनितासुतधन तैसें चि । घालिती भवबंधनीं ॥ ७८ ॥ हित शत्रुत्वाची सखि । जयाचेनि आपआपणा अनोळखी । सद्गुरु

१ उरला.

सखा वोळखि । केली आपआपणां ॥ ७९ ॥ अविनाश वस्तूचा ठेवा । तत्वता विनियोग विसावा । स्वसुखउदधी जीवा । अंतरीं प्रगटे जेणें ॥ ८० ॥ जो मनबुधीसी अगोचर । तो जळीं स्थळीं निरंतर । निजदृष्टीसी दाऊनि थोर । कृतोपकार केला ॥ ८१ ॥ देहबुध्दीच्या धुळीत । हारपलें आत्मरत्न अप्रांत । ते धरीं घेऊनि निश्चित । दिधलें प्रत्यक्ष ॥ ८२ ॥ आपआपणामाजि चोरी । केली होती आत्मतस्करीं । तयासि प्रबोधूनि साक्षात्कारीं । भेटविलें आपआपणा ॥ ८३ ॥ त्या सद्गुरूचें उत्तीर्ण । होइजैल आतां कैसेन । जेणें अविनाश सनातन । आत्मत्वें चि दिधलें ॥ ८४ ॥ तो आप्तसखा होय निजाचा । सद्गुरु सोयरा जीवाचा । जेणें सोय दाखऊनि स्वरूपाचा । योग केला निरंतर ॥८५॥ ऐसें हें परमसख्य स्वयें । गुरुशिष्य येक हृदयें । कल्पांतीं सख्य न चळे निश्चयें । शाश्वतब्रह्मसख्यत्वें ॥ ८६ ॥ गुरुशिष्य देव-भक्त । सख्यसत्यत्वें नित्यमुक्त । ज्याच्या सख्यामाजि अयुक्त । माया कपट असेना ॥ ८७ ॥ ऐसिया सख्यभक्तीनें । श्रीरामसदनीं प्रवेशोन । कीर्तन समारंभ गजरानें । सख्यप्राकार उंघिला ॥ ८८ ॥ देखिला निवेदनप्राकार । जो कां परमतेजें अगोचर । ज्ञेयगर्भ मनोहर । सुवर्णे सारिला ॥ ८९ ॥ जेथें सर्व हि प्रवृत्ति सरे । तेथ अस्तिक्य सहज चि उरे । त्या अस्तिक्याचा चि साक्षात्कारें । प्राकार रूढला ॥ ९० ॥ याचि अंतस्थीं गहन । सदोदित राम सनातन । निर्विकार स्थितीनें संपूर्ण । निवांत संचलासे ॥ ९१ ॥ अवकाशीं निरावकाश जेंवि । नित्यनैमित्य राम तेंवि । निवेदनभक्ति आत्मठेवि । लाभली गुरुकृपेनें ॥ ९२ ॥ आत्मनिवेदनें गुरुकृपा होय । कीं गुरुकृपेनें आत्मनिवेदन पाहे । चिदचिद्ग्रंथीनें हृदय । उकलिलें बरवें ॥ ९३ ॥ छेदूनि भवभय संशय । करूनि कर्माकर्मक्षय । परात्परवस्तूचि स्वयें । दाखविली डोळां ॥ ९४ ॥ ज्ञानसूर्योदयीं साचार । तमोपशमप्रभेची धार । सरिसाचि पदार्थ उध्दार । प्रतीत डोळां दिसे ॥ ९५ ॥ गगनीं जैसा नीळवर्ण । तैसें चि आत्मत्वीं अहंपण । होय अहंकार-उपशमन ।

आत्मनिवेदन जाणिजे ॥ ९६ ॥ घेऊनि गुरुकृपादर्पण । निजनयनविंबीं संतुर्पण । कीजे आपआपणासि अर्पण । आत्मनिवेदन या अर्थे ॥ ९७ ॥ बहुता काळाचा वियोग । केला मायेनें भवसंसर्ग । जेंवि रज्जुवरील भुजंग । भासला भ्रमें ॥ ९८ ॥ तया विवर्तसर्पासि कांहीं । संव्हारूनि निवारिलें नाहीं । उमजऊनि दृष्टिदोष पाहीं । भय दूरि केलें ॥ ९९ ॥ तैसें निर्विकार असतां । ब्रह्मस्फुरण सक्षोभता । अहंब्रह्मास्मि अहंता । प्रबळ जाली ॥ १०० ॥ सद्गुरूनी कृपा करून । सांगितलें ब्रह्माहमस्मीचें विवरण । वृत्तिसंस्कारविसर्जन । केलें मुळींचें मुळीं ॥ १ ॥ ब्रह्माचळीं मायेचा झरा । आलों परंपरा स्थूळशरीरा । तो चि परतोन माघारा । सामाविला उगमीं ॥२॥ ह्मणउनि अघटित हें करणें । कल्पेना ब्रह्मादिका अतःकरणें । परमकृपाळ कृपाकिरणें । उदेला चिद्गगनचंद्र ॥ ३ ॥ अहं उपशांति नित्यप्रतीति । नाहं अंतरंगसुखस्थिति । सोहं विवर्जित आद्यंतीं । आत्तिक्यता सहज ॥ ४ ॥ ब्रह्मीं नाहीं ब्रह्मस्वरूपिसें । प्रतीतीसि आणून दिलें ऐसें । आत्मनिवेदन सौरसें । शिवात्मा सद्गुरु ॥ ५ ॥ जीवात्मा अनन्यप्रतीति । समर्पला शिवात्मा याप्रति । शिवात्मा स्वसुखाची मूर्ति । उपरमें परमात्मत्वें अर्पे ॥ ६ ॥ परमात्मा अनुभव केवळ । न धरी अनुभव त्रिपुटीचा मळ । या चि अनुभवें सबळ । अर्पे परब्रह्मीं ॥ ७ ॥ हे आत्मनिवेदन भक्ति । नित्यस्वरूप नित्यमुक्ति । श्रीरामभक्त नवम अंतर्थी । रिघाले गुरुकृपेनें ॥ ८ ॥ सद्गुरुकृपेनें सनातन । जालें ऐसें आत्मनिवेदन । दृष्टीसि देखिला सुखैकघन । राम आत्मा चि आपुला ॥ ९ ॥ निवेदन नवम प्राकार । पाहातां निरावरण साचार । ज्याचे पोटीं स्वरूपांबर । दृष्टीचें प्रमाण ॥ १० ॥ दृष्टीचें प्रमाण चक्षुमाजि । लक्षितां तिळप्रमाण सहजीं । तेथूनि दृष्टि विस्तारे सतेजीं । सावकाशें संपूर्ण ॥ ११ ॥ तैसें अणुप्रमाणीं विस्तीर्ण । हें हि पुरे वृत्तीचें प्रमाण । रामभवन निरावरण । पाहाती भक्त नयनीं ॥ १२ ॥ नयनें चि जालें दर्शन । दर्शनीं उमा ठाकला नयन । दृश्य त्रिपुटी विहीन । देखिलें सदन श्रीरामाचें

सखा वोळखि । केली आपआपणा ॥ ७९ ॥ अविनाश वस्तूचा ठेवा । तत्वता विनियोग विसावा । स्वसुखउदधी जीवा । अंतरीं प्रगटे जेणें ॥ ८० ॥ जो मनबुध्दीसी अगोचर । तो जळीं स्थळीं निरंतर । निजदृष्टीसी दाऊनि थोर । कृतोपकार केला ॥ ८१ ॥ देहबुधीच्या धुळींत । हारपलें आत्मरत्न अप्रांत । ते धरीं घेऊनि निश्चित । दिधलें प्रत्यक्ष ॥ ८२ ॥ आपआपणामाजि चोरी । केली होती आत्मतस्करीं । तयासि प्रबोधूनि साक्षात्कारीं । भेटविलें आपआपणा ॥ ८३ ॥ त्या सद्गुरूचें उत्तीर्ण । होइजैल आतां कैसेन । जेणें अविनाश सनातन । आत्मत्वें चि दिधलें ॥ ८४ ॥ तो आत्मसखा होय निजाचा । सद्गुरु सोयरा जीवाचा । जेणें सोय दाखऊनि स्वरूपाचा । योग केला निरंतर ॥ ८५ ॥ ऐसें हें परमसख्य स्वयें । गुरुशिष्य येक हृदयें । कल्पांतीं सख्य न चळे निश्चयें । शाश्वतब्रह्मसख्यत्वें ॥ ८६ ॥ गुरुशिष्य देवभक्त । सख्यसत्वत्वें नित्यमुक्त । ज्याच्या सख्यामाजि अयुक्त । माया कपट असेना ॥ ८७ ॥ ऐसिया सख्यभक्तीनें । श्रीरामसदनीं प्रवेशोन । कीर्तन समारंभ गजरानें । सख्यप्राकार लंघिला ॥ ८८ ॥ देखिला निवेदनप्राकार । जो कां परमतेजें अगोचर । ब्रह्मगर्भ मनोहर । सुवर्णें सारिला ॥ ८९ ॥ जेथें सर्व हि प्रवृत्ति सरे । तेथ अस्तिक्य सहज चि उरे । त्या अस्तिक्याचा चि साक्षात्कारें । प्राकार रूढला ॥ ९० ॥ याचि अंतर्स्थीं गहन । सदोदित राम सनातन । निर्विकार स्थितीनें संपूर्ण । निवांत संचलासे ॥ ९१ ॥ अवकाशीं निरावकाश जैंवि । नित्यनैमित्य राम तैंवि । निवेदनभक्ति आत्मठेवि । लाभली गुरुकृपेनें ॥ ९२ ॥ आत्मनिवेदनें गुरुकृपा होय । कीं गुरुकृपेनें आत्मनिवेदन पाहे । चिदचिद्ग्रंथीनें हृदय । उकलिलें बरवें ॥ ९३ ॥ छेदूनि भवभय संशय । करूनि कर्माकर्मक्षय । परात्परवस्तूचि स्वयें । दाखविली डोळां ॥ ९४ ॥ ज्ञानसूर्योदयीं साचार । तमोपशमप्रभेची थार । सरिसाचि पदार्थ उद्धार । प्रतीत डोळा दिसे ॥ ९५ ॥ गगनीं जैसा नीळवर्ण । तैसें चि आत्मत्वीं अहंपण । होय अहंकार उपशमन ।

आत्मनिवेदन जाणिजे ॥ ९६ ॥ घेऊनि गुरुकृपादर्पण । निजनयनबिंबीं सतर्पण । कीजे आपआपणासि अर्पण । आत्मनिवेदन या अर्थे ॥ ९७ ॥ बहुता काळाचा वियोग । केला मायेनें भवसंसर्ग । जेंवि रज्जुवरील भुजंग । भासला भ्रमें ॥ ९८ ॥ तया विवर्तसर्पासि कांहीं । संव्हारूनि निवारिलें नाहीं । उमजऊनि दृष्टिदोष पाहीं । भय दूरि केलें ॥ ९९ ॥ तैसें निर्विकार असतां । ब्रह्मस्फुरण सक्षोभता । अहंब्रह्मास्मि अहंता । प्रबळ जाली ॥ १०० ॥ सद्गुरूनीं कृपा करून । सांगितलें ब्रह्माहमस्मीचें विवरण । वृत्तिसंस्कारविसर्जन । केलें मुळींचें मुळीं ॥ १ ॥ ब्रह्माचळीं मायेचा झरा । आलों परपरा स्थूळशरीरा । तो चि परतोन माघारा । सामाविला उगमीं ॥२॥ ह्मणउनि अघटित हें करणें । कल्पेना ब्रह्मादिका अंतःकरणें । परमकृपाळ कृपाकिरणें । उदेला चिद्गगनचंद्र ॥ ३ ॥ अहं उपशांति नित्यप्रतीति । नाहं अंतरंगसुखस्थिति । सोहं विवर्जित आयेतीं । आस्तिक्यतां सहज ॥ ४ ॥ ब्रह्मीं नाहीं ब्रह्मस्पर्शें । प्रतीतीसि आणून दिलें ऐसें । आत्मनिवेदन सौरसें । शिवात्मा सद्गुरु ॥ ५ ॥ जीवात्मा अनन्यप्रतीति । समर्पला शिवात्मा याप्रति । शिवात्मा स्वसुखाची मूर्ति । उपरमें परमात्मत्वें अर्पे ॥ ६ ॥ परमात्मा अनुभव केवळ । न धरी अनुभव त्रिपुटीचा मळ । या चि अनुभवें सबळ । अर्पे परब्रह्मीं ॥ ७ ॥ हे आत्मनिवेदन भक्ति । नित्यस्वरूप नित्यमुक्ति । श्रीरामभक्त नवम अंतर्यों । रिघाले गुरुकृपेनें ॥ ८ ॥ सद्गुरुकृपेनें सनातन । जालें ऐसें आत्मनिवेदन । दृष्टीसि देखिला सुखैकघन । राम आत्माचि आपुला ॥ ९ ॥ निवेदन नवम प्राकार । पाहातां निरावरण साचार । जयाचे पोटीं स्वरूपांबर । दृष्टीचें प्रमाण ॥ १० ॥ दृष्टीचें प्रमाण सक्ष्माजि । लक्षितां तिळप्रमाण सहजीं । तेथूनि दृष्टि विस्तारें सतेजीं । सावकाशें संपूर्ण ॥ ११ ॥ तैसें अणुप्रमाणीं विस्तीर्ण । हें हि पुरे वृत्तीचें प्रमाण । राममवन निरावरण । पाहातो भक्त नयनीं ॥ १२ ॥ नयनें चि जालें दर्शन । दर्शनीं उभा ठाकला नयन । दृश्य त्रिपुटी विहीन । देखिलें सदन श्रीरामाचें

॥ १३ ॥ दिव्य ज्ञान ज्ञेय सत्ता तेज । गाळींव प्रभेचें सुख सहज । मसिविता हे रघुराज । राममंदिररचना ॥ १४ ॥ नवविधा नव प्राकार । भक्तीच्या अंतर्भावें साचार । सद्गुरुसहवास साक्षात्कार । जाहला सहज ॥ १५ ॥ तें चि पुढें निरूपण । अपरोक्ष दशम लक्षण । ज्ञेसि भुवनांत रिघोन । पाहा अवधानें श्रीरामासी ॥ १६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । अर्चनादिनिवेदनभक्तिळीळा । ह्मणे मेरु-अनंत ॥ १७ ॥ नवमरुद्रे । सप्तम उल्लास । संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ परात्पर । परास्फूर्तीचें अभ्यंतर । परब्रह्म परात्पर । निरावरण मुळीं ॥ १ ॥ अनुत्पन्न ज्ञानत्रिपुटी । समसमान अखंडता घोंटी । अभिन्नानुभव कसवटी । विज्ञानावरण ॥ २ ॥ निरावरण ऐसें स्फुरलें । तें चि तया आवरण जालें । विशाळपण घनवटलें । सघन आवरण ॥ ३ ॥ शुध्द बुध्द निर्मळ निश्चळ । अप्रांत निज अंतराळ । तेथें स्वानुभव सुख केवळ । दाटीनें घनवटे ॥ ४ ॥ सावकाशीं प्रतीत पूर्ण । तें चि सघनांबर सुखैकघन । श्रीरामभवना प्रथमावरण । सुवर्ण स्वप्रकाशें ॥ ५ ॥ निरुपम भवरचना । स्वानंदघनवटित गुणघना । त्रिपुटीवीण समाधाना । रूपक होतसे ॥ ६ ॥ चहूं गगनाचे सांटोवे । अप्रांत चतुष्कोण बरवे । निजअस्तित्वतेचा स्वभावें । मध्यस्थ चौक रूढळा ॥ ७ ॥ तें प्रत्यगात्म्याचें अभ्यंतर । चिद्गगनीं निरंतर । तें चि प्राकार होऊनि थोर । ज्ञेय रूढीसि आलें ॥ ८ ॥ श्रीराम अंतरस्थ सदनीं । चौक सोपा निरावरणी । प्रतीतीचें आवरण होऊनी । विस्तारला असे ॥ ९ ॥ शुध्द सत्वात्मक रजतगर्भ । ना ते आत्मचंद्राची प्रभा स्वयंभ । कीं स्वानंद सुधासिंधु अक्षोभ । प्रभा घनवटली ॥ १० ॥ या सुधामय रसें निर्मित । हर्म्यी माळा सौध वेष्टित । नवरत्नांक विभूषित । प्रतिमा तेथें शोभती ॥ ११ ॥ अक्षोभ शांतीचीं पाटांगणें । रंगमाळा अलंकृत

---

१ कसोटी (?). २ (?). ३ हर्मी, माळ्यांत.

कुसरीनें । मुक्तांचे चौक स्वप्रभेनें । शोभेसी शोभा आणिती ॥ १२ ॥ चिद्रत्नांक पर्दे रंगांगणीं । सुवर्णरसें चित्र रेखुनि । सौध शृंगार नयनी । आर्चितसे दृष्टी रमा ॥ १३ ॥ जडाजडदृष्टिविहीन । मध्यमार्गी सनातन । त्या मध्यस्थीं ज्ञप्ति विमान । शोभतसे निपरुम ॥ १४ ॥ त्या दिव्य [१]पुष्पाची वेदिका । दृष्टि घालूनि पाहा विवेका । अचळ अतिक्य पीठिका । गगन गाळींव निर्मळ ॥ १५ ॥ चिदानंदघनसागरीं । चाळिल्या उन्मनीरूप लहरी । वेदिका सोपानें त्यावरी । पायि-रिया असंख्य ॥ १६ ॥ द्वैताद्वैत विवर्जित । महा अद्वैत स्थिति उंचावत । तया वेदिके पाठारीं सशांत । अमळ पाटांगणें ॥ १७ ॥ तेथें अभिन्नानुभवें अभिनव । रचलें विमानाकृति निर्भेव । कैवल्यपुष्पक नव नव । प्रतीतीनें प्रकाशे ॥ १८ ॥ स्वानंद कल्पद्रुमातळीं । शोभा विमानाची आगळी । सोहं स्वभावें निर्मळी । प्रकाशलें सुरतरूसि विमान ॥ १९ ॥ केवळ कैवल्याचें अधिष्ठान । श्रीरामनिवासाचें दिव्यविमान । ज्यामाजि अप्रांत गहन । अवकाश स्वानुभवाचा ॥ २० ॥ कैवल्य विमानीं शांति सिंहासन । जें अभिनवें रचिलें संपूर्ण । स्वबोध-चेर्या सोपान । दशावरण पंक्ती ॥ २१ ॥ स्वप्रकाशें सुवर्णाचें चोखडें । विज्ञानबाळरविपडिपाडें । जेणें ज्ञानदृष्टीसी उजेडें । निजतेज अधिष्ठान ॥ २२ ॥ ज्ञेय ज्ञान ज्ञाता स्वभाव । पंचतत्वात्मक अभिनव । ब्रह्मस्फूर्ति अंतर्भाव । मूळ अष्टदळ कमळ ॥ २३ ॥ या ब्रह्मस्फूर्ति कमळासी । निरावरण निरावकासीं । रचिलें ज्ञप्तिमूळ चिदाकाशीं । सहस्त्रदळ तत्वात्मक ॥ २४ ॥ अनेकवृत्तींचीं अनेकदळें । सोहंकर्णिकानुमेळें । दशावर्णे सोज्ज्वळें । दशदेहस्वभाव ॥ २५ ॥ प्रथम अहं ब्रह्मास्मि स्फुरण । अष्टदळाब्ज मूळ अनुसंधान । तेथें परमादि सनातन । भाव अष्टभावें उदित ॥ २६ ॥ अष्टदळाब्ज मध्यप्रदेशीं । वसिष्ठादि सप्तऋषि । कमंडळ[१]पाणी मंत्र घोषीं । अर्चिती आत्मारामातें ॥ २७ ॥ नारद तेणें चि प्रतीती । अर्चितसे आत्मारामाप्रति । चतुर्थावरण

१ हातात कमंडलु घेऊन.

पंक्ती। तुल्पैसी नळनीळादि ॥ २८ ॥ पंचमावरण प्रभा घन। पोडशदळाब्ज संपूर्ण। मंत्री वसु आज्ञा प्रमाण। जोडल्या करीं तिष्ठति ॥ २९ ॥ पोडशदळ मध्य गहन। रुद्रपंचप्राण पष्ठावरण। षोडशामें सप्तमावरण। आदिलेंसी वेद त्यान्ही ॥ ३० ॥ द्वात्रिंशति दळाब्जमुळीं। अष्टमूर्ति सुरवरमेळीं। अष्टमावरण ऋपि सकळीं। दाटिलें नभ ॥ ३१ ॥ नवमावरणीं त्रैलोकींचे जन। श्रीरामीं तत्पर होऊन। नवविधा भजनें संपूर्ण। उपरमले सुखें ॥ ३२ ॥ दशमावरणीं महातेज। दिव्यायुधें सिद्धिसहज। एवं दशावरणीं रघुराज। सेविला निजभक्तीं ॥ ३३ ॥ पुढें सभामंडप महा विस्तीर्ण। निजज्ञातीचें पाटांगण। महा आश्चर्याचे संपूर्ण। स्तंभ उभारले ॥ ३४ ॥ येकेक स्तंभीं त्रैलोक्य रचना। ऐसे अनंत स्तंभ चित्रनाना। [१]स्वप्रकाशगर्भ नयना। जडोनि ठेला सभामंडप ॥ ३५ ॥ स्वच्छ स्वानंदचंद्रगर्भ। चांदिवे प्रकाशले सुप्रभ। निलमुक्तता चि स्वयंभ। झालर रुळती मुक्तांचे ॥ ३६ ॥ ज्ञान नवरत्नमाळा सोज्वळ। अनेक नक्षत्रमाळा निर्मळ। तोरणें बांधिलीं प्रकाशमूळ। विवलें सभांह्रदय ॥ ३७ ॥ रामसभेची रचना। पाहातां तटस्थता ये नयना। भावितां मनाच्या मनना। उन्मनी वाणे ॥ ३८ ॥ सद्भाव शाहाणे कुळींचे। भृत्यानुभृत्य रामाज्ञेचे। सिध्द किंनर गायकांचे। मेळ उमे असती ॥ ३९ ॥ महा सिध्दी अप्सरा थाटें। रामसभेसी भावनिकटें। ब्रह्मानंद अभिनव उत्कटें। गीत नृत्य करिती ॥ ४० ॥ कामी निष्काम वेध होय। यां अभिनवामाजि संगीत स्वयें। रंभा उर्वशी महा विस्मयें। निर्विकार नृत्य करिती ॥ ४१ ॥ गायकमुनिजनमेळा। एकूनि निजदृष्टीसि जिव्हाळा। निजगायन अंतर्कळा। प्रगट करिती ॥ ४२ ॥ प्रथमस्वरीं अनुस्वरित। तारमंद्रघोरान्वित। मात्र त्रय सुस्वरित। उध्दरति सप्तस्वर ॥ ४३ ॥ स्वरीं च स्वराचें निजमूळ। होतसे नादब्रह्म प्रांजळ। गायन रस रंग तुंबळ। [२]गाजला रामकीर्तनीं ॥ ४४ ॥ तेथ हरिदास महासावडे। पुढें ठाकूनि श्रीरामा-

१ हीर. २ फार कुशल.

पुढें। वर्णिती राघवाचे पवाडे। चरित्रें अद्भुत ॥ ४५ ॥ - परात्पर कीर्तिपावन। सगुणध्यानें सुख गहन। माजि ब्रह्मानुभव घन। समाधिचर्या ॥४६॥ तया कीर्तनीं अनिवार। संभवलें निजप्रेम दुर्धर। विश्वाकारें रघुवीर। अवतरला भजनीं ॥ ४७ ॥ नारद तेणें विस्मयें करूनि। ब्रह्मवीणा करीं घेऊनि। नृत्य करितसे गायनी। माहावेध सफळां ॥ ४८ ॥ अनुष्ठाते भक्त तापसी। विसरोनियां देहभावासी। आवेशा भरोनियां सभेसी। नृत्य करिती स्वछंदें ॥ ४९ ॥ पिसाट दीक्षा प्रेमा अनिवार। करिती नामस्मरणाचा महा गजर। गदगदां कांपती रघुवीर। आंगीं भरला तयांच्या ॥ ५० ॥ सनकादि महा सिद्धमुनि। निजतत्त्ववेत्ते समाधानी। आत्मनिष्ठ ब्रह्मज्ञानी। जाले कीर्तनसमाधिस्थ ॥ ५१ ॥ येक उन्मादें गर्जना करिती। येक स्वानंदें खदखदां हांसती। रामसभेसि अद्भुत स्थिती। रंग माजला कीर्तनीं ॥५२॥ स्वयंभ चिद्रत्नदीपमाळा। तेणें सभेसि निजतेज उजाळा। श्वेत आरक्त धूसर उधळा। होतसे अभिनवें ॥ ५३ ॥ तेणें सभावर डौरलें। स्वप्रकाशतेज रजेंवटलें। लक्षितां सभास्थान तें जालें। पारणें निजदृष्टीसी ॥ ५४ ॥ पाहोनि दृष्टीसि सभांबर। दृष्टि कुर्वाळूनि टाकिली सत्वर। निवाले नयन मनोहर। राम हृदयासि आला ॥ ५५ ॥ पाहातां शोभा रामसभेसी। भडस पुरे चि ना दृष्टीसी। पाहातां पाहातां अधिक ऐसी। प्रीती होय पाहावया ॥ ५६ ॥ राघवसभेमाजि चमत्कारें। वेधलीं श्रीरामीं वानरें। रूप लक्षूनियां साजिरें। तटस्थ हाकलीं पाहतां ॥ ५७ ॥ असंख्य वानरांचा मेळा। सभेंत लोटला प्रेमागळा। जैसे सरिताओघ सिंधुजळा—। माजि सामाऊं येती ॥५८॥ जाऊनि श्रीरामाजवळी। निकट पाहाती नयनयुगळीं। घननीळशोभा आगळी। प्रतिमा बैसली दृष्टीसि ॥ ५९ ॥ सुग्रीवादि महावीर। त्यासि परतें सारूनि सत्वर। सेवटिचे भाविक वानर। उभे ठाकती तेथें ॥ ६० ॥ रामदर्शनें चि निर्विकार। जाला तटस्थ वेध साक्षात्कार। स्वामिसेवक हा

१ धुळीनें भरलें (?).

पंक्ती। जुत्पैती नळनीळादि ॥ २८ ॥ पंचमावरण प्रभा घन। षोडशदळाब्ज संपूर्ण। मंत्री वसु आज्ञा प्रमाण। जोडल्या करीं तिष्ठति ॥ २९ ॥ षोडशदळ मध्य गहन। रुद्रपंचप्राण षष्ठावरण। षोडशाग्रें सप्तमावरण। आदिलेंसी वेद च्यान्ही ॥ ३० ॥ द्वात्रिंशति दळाब्जमुळीं। अष्टमूर्ति सुरवरमेळीं। अष्टमावरण ऋषि सकळीं। दाटिलें नभ ॥ ३१॥ नवमावरणीं त्रैलोकींचे जन। श्रीरामीं तत्पर होऊन। नवविधा भजनें संपूर्ण। उपरमले सुखें ॥ ३२ ॥ दशमावरणीं महातेज। दिव्यायुधें सिद्धिसहज। एवं दशावरणीं रघुराज। सेविला निजभक्तीं ॥ ३३ ॥ पुढें सभामंडप महा विस्तीर्ण। निजशांतीचें पटांगण। महा आश्चिर्याचे संपूर्ण। स्तंभ उभारले ॥ ३४ ॥ येकेक स्तंभीं त्रैलोक्य रचना। ऐसे अनंत स्तंभ चित्रनाना। [1]स्वप्रकाशगर्भ नयना। जडोनि ठेला सभामंडप ॥ ३५ ॥ स्वच्छ स्वानंदचंद्रगर्भ। चांदिवे प्रकाशले सुप्रभ। नित्यमुक्तता चि स्वयंभ। झालर दळती मुक्तांचे ॥ ३६ ॥ ज्ञान नवरत्नमाळा सोज्वळ। अनेक नक्षत्रमाळा निर्मळ। तोरणें बांधिलीं प्रकाशमूळ। विंबलें सभाहृदय ॥ ३७ ॥ रामसभेची रचना। पाहातां तटस्थता ये नयना। भावितां मनाच्या मनना। उन्मनी बाणे ॥ ३८ ॥ सेद्भाव शाहाणौ कुळीचे। भृत्यानुभृत्य रामाज्ञेचे। सिध्द किंनर गायकांचे। मेळ उभे असती ॥ ३९ ॥ महा सित्धी अप्सरा थाटें। रामसभेसी भावनिकटें। ब्रह्मानंद अभिनव उत्कटें। गीत नृत्य करिती ॥ ४० ॥ कामी निष्काम येथ होय। यां अभिनवामाजि संगीत स्वयें। रंभा उर्वशी महा विस्मयें। निर्विकार नृत्य करिती ॥ ४१ ॥ गायकमुनिजनमेळा। लक्षूनि निजदृष्टीसि जिव्हाळा। निजगायन अंतर्कळा। प्रगट करिती ॥ ४२ ॥ प्रथमस्वरीं अनुस्वरित। तारमंद्रघोरान्वित। मात्र त्रय सुस्वरित। उत्वरति सप्तस्वर ॥ ४३ ॥ स्वरीं च स्वराचें निजमूळ। होतसे नादब्रह्म प्रांजळ। गायन रस रंग तुंबळ। माजला रामकीर्तनीं ॥ ४४ ॥ तेथ हरिदास महासावडे। पुढें ठाकूनि श्रीरामा-

१ हीर. २ फार कुशल.

पुढें । वर्णिती राघवाचे पवाडे । चरित्रें अद्भुत ॥ ४५ ॥ परात्पर कीर्तिपावन । सगुणध्यानें सुख गहन । माजि ब्रह्मानुभव घन । समाधिचर्या ॥४६ ॥ तया कीर्तनीं अनिवार । संभवलें निजप्रेम दुर्धर । विश्वाकारें रघुवीर । अवतरला भजनीं ॥ ४७ ॥ नारद तेणें विस्मयें करूनि । ब्रह्मवीणा करीं घेऊनि । नृत्य करितसे गायनी । माहावेध सकळा ॥ ४८ ॥ अनुष्ठाते भक्त तापसी । विसरोनिया देहभावासी । आवेशा भरोनिया सभेसी । नृत्य करिती स्वछंदें ॥ ४९ ॥ पिसाट दीक्षा प्रेमा अनिवार । करिती नामस्मरणाचा महा गजर । गदगदा कापती रघुवीर । आंगीं भरला तयाच्या ॥ ५० ॥ सनकादि महा सिध्यमुनि । निजतत्त्ववेत्ते समाधानी । आत्मनिष्ठ ब्रह्मज्ञानी । जाले कीर्तनसमाधिस्थ ॥ ५१ ॥ येक उन्मादें गर्जना करिती । येक स्वानंदें खदखदा हासती । रामसभेसि अद्भुत स्थिती । रंग माजला कीर्तनीं ॥५२॥ स्वयंभ चिद्रत्नदीपमाळा । तेणें सभेसि निजतेज उजाळा । श्वेत आरक्त धूसर उधळा । होतसे अभिनवें ॥ ५३ ॥ तेणें सभावर डौरलें । स्वप्रकाशतेज रजेंवटलें । लक्षितां सभास्थान तें जालें । पारणें निजदृष्टीसी ॥ ५४ ॥ पाहोनि दृष्टीसि सभावर । दृष्टि कुर्वाळूनि टाकिली सत्वर । निवाले नयन मनोहर । राम हृदयासि आला ॥ ५५ ॥ पाहातां शोभा रामसभेसी । भडस पुरे चि ना दृष्टीसी । पाहाता पाहाता अधिक ऐसी । प्रीती होय पाहावया ॥ ५६ ॥ राघवसभेमाजि चमत्कारें । वेधलीं श्रीरामीं वानरें । रूप लक्षूनिया सार्जिरें । तटस्थ हाकलीं पाहता ॥ ५७ ॥ असंख्य वानराचा मेळा । सभेंत लोटला प्रेमागळा । जैसे सरितालोट सिंधुजळा[1] । माजि सामाऊं येती ॥५८॥ जाऊनि श्रीरामाजवळी । निकट पाहाती नयनयुगळीं । घननीळशोभा आगळी । प्रतिमा बैसली दृष्टीसि ॥ ५९ ॥ सुग्रीवादि महावीर । त्यासि परतें सारूनि सत्वर । सेवटिचे भाविक वानर । उभे ठाकती तेथें ॥ ६० ॥ रामदर्शनें चि निर्विकार । जाला तटस्थ वेध साक्षात्कार । स्वामिसेवक हा

---

१ धुळीनें भरलें (?).

व्यवहार। विसरोनि गेले ॥ ६१ ॥ येक सद्भावप्रीतीच्या मुळें। श्रीरामापासीं ठेविती फळें। येक वानर तात्काळें। घेऊनि फळें ते भक्षिती ॥ ६२ ॥ फळें भक्षितां मिटक्या देती। म्हणती श्रीरामदर्शनीं मोठी प्रीति। सुखरासि विटाविती। भेडसाविती ऋषींतें ॥ ६३ ॥ भरला अंगीं राम अनिवार। वानरांचा प्रेमा महादुर्धर। कुसी खाजविती वारंवार। विस्मयें चि छंद करिती ॥ ६४ ॥ मुख करुनियां वांकडें। धांकोल्या दाविती वाडेकोडें। श्रीरामा म्हणती महत्व केवढें। धरूनि बैसलासि आतां ॥ ६५ ॥ सीतावियोगें कवाळिलीं झाडें। मैत्रीनें जोडिलीं मांकडें। जानकीच्या वियोगें आह्मापुढें। नाना छंद करित होतासी ॥ ६६ ॥ आतां बैसोनि सिंहासनीं। दाविसी प्रतिष्ठा आम्हां लागूनि। आम्हीं च तुला खांदीं वाहोनी। नेलें लंकेप्रति ॥ ६७ ॥ महा महा राक्षसांचीं जवटें[३]। आम्हीं च निर्दाळिलीं निकटें। सीतेसि अपंगूंनि अवचटें। भूषण भोगिसी आतां ॥ ६८ ॥ तें सर्व तूं विसरलासि। महाराज होऊनि बैसलासि। आम्हांसि हृदईं न धरिसी। हें काय सख्यत्व तुझें ॥ ६९ ॥ ऐसें अनुवादतां वानर। श्रीराम प्रेमें दाटला थोर। उठोनि सिंहासनींचा सत्वर। आलंगिलें तयांसी ॥७० ॥ गहिंवर नावरे श्रीरामासी। अंकीं बैसऊनि वनचरांसी। कृपाकरतळीं तयांसी। कुर्वाळितसे ॥ ७१ ॥ श्रीरामासि प्रेम अद्भुत। मूर्धा आघ्राणूनि क्षेम देत। ह्मणे मी तुम्हासाठीं च इत्थंभूत। अवतरलों सुखें ॥ ७२ ॥ मज भक्तांची आवडी मोठी। सिंह शूकर होय भक्तां चि साठीं। प्रगटलों कोरडिया काष्ठिं। प्रल्हादाकारणें ॥ ७३ ॥ ऐसा आपंगुनि भक्तराज। बैसला सिंहासनीं सहज। तोषले वानर सहज। भुभुःकारले सर्व ॥ ७४ ॥ महाघनरव तो गंभीर। अद्भुत प्रेमा भयंकर। तेणें घोषें महदंबर। पडसाद उठिलें ॥ ७५ ॥ साच वानरांची निजभक्ति। निर्विकार प्रेमा चित्तीं। आत्मा चि करूनि रघुपति। सेविती सर्वदा ॥ ७६ ॥ दाटल्या ऋषेश्वरांच्या पंक्ती। ब्रह्मादि सुरवर उभे

१ वेडावतात. २ कौतुकानें. ३ समुदाय. ४ स्वीकारून.

असती । वानरें तयांचे माथां बैसती । तेथूनि लक्षिती श्रीरामा ॥७७॥ सुखराशि सुखर स्थिती । जैं उंच नीच लक्षिती । तैसे सुखर अल्पमति । परिक्षिती वानर ॥ ७८ ॥ तैसीं च ऋषीश्वरांचीं चित्तें । परीक्षूनि पाहाती वानरें तें । देखतां निर्विकार स्थितीतें । आनंदती मानसीं ॥ ७९ ॥ रामसभा आनंदसागरीं । क्रीडति वानररूप लहरी । पर्वतसम स्तंभाच्या हारी । कधीं तयावरि वेंघती ॥ ८० ॥ विसरोनि क्षुधा तृषा संपूर्ण । वानरें श्रीरामीं जालीं सुलीन । राघवसभेसि संकीर्तन । होतसे गजरें ॥ ८१ ॥ महासमारंभ सभेसी । समर्थभक्त समुदायेंसीं । अनंतसद्गुरुसहवासीं । जाला रामसभाप्रवेश ॥ ८२ ॥ घनामृताचा रामचंद्र । देखिला निजदृष्टीसि सुखसांद्र । कुर्वाळूनि पंचप्राण योगींद्र । अभिवंदिला साष्टांगीं ॥ ८३ ॥ अतरनिष्टेच्या निजप्रेमें । श्रीरामाचीं पदपद्में । निजउल्हार्टी अनुक्रमें । धरूनि आणिलीं हृदया ॥ ८४ ॥ भक्त, अंतर्भाव आत्माराम । भक्तासि अनुक्रमें चि देत क्षेम । जाल्या सुखगोष्टी, विश्राम । दाटला अभ्यंतरीं ॥ ८५ ॥ तें चि पुढें निरूपण । सद्भावें कीजेल रामार्चन । कैवल्यक्षेत्रविधि पावन । अवधारिजे श्रोतीं ॥ ८६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । भक्तीं श्रीराम दृष्टीसि पाहिला । म्हणे मेरुअनंत ॥ ८७ ॥ नवमरुद्रे ॥ अष्टम उल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ अर्चन । हृदयशुद्धी अंतःकरण । स्वयंभ ब्राह्मीसि उठोन । चिद्गंगेसि पाविजे ॥ १ ॥ चिदाकाशशरयूजळीं । अघमर्पण चित्कल्लोळीं । सुस्नात होऊनि प्रभातकाळीं । नित्यनेम सारिजे ॥ २ ॥ निगमांतरदरकुटी । निर्मेव निवृत्तिदृष्टी । समान आसन निकटीं । प्रणवमूळ साधिजे ॥ ३ ॥ सायुज्यसाक्षात्कार राम । सद्गुरुकृपा परम । समाधिदर्शनें निरुपम । कीजे ब्रह्मप्रतिष्ठा ॥ ४ ॥ रामतारकजपें पूर्ण । अनुष्ठानविधीनें सुप्रसन्न । सभेसहित रामदर्शन । प्रत्यक्ष व्हावें ॥ ५ ॥ दशावर्णपंक्तीनें राम । सिंहासनीं

१ ओळी. २ सुखानें थबथबलेला. ३ ब्राह्ममुहूर्तावर, पहाटेस.

पुरुषोत्तम । रामसमर्थअंतर्याम । अनंतेंअर्चनीं सादर ॥ ६ ॥ अनंतां-पासीं परिवार । परिशुध्दीनें निरंतर । द्रव्योपचारासि सार । सत्व-सिध्दि समृध्दि ॥ ७ ॥ श्रीराम अभ्यंग परवडी । ऐश्वर्यें उभविली गुढी । त्या समारंभाची प्रोढी । अयोध्येंत न समाय ॥ ८ ॥ घरोघरीं गुढिया उभविल्या । निर्मळ विदी[1] शृंगारिल्या । नगरनारी अळंकारल्या । श्रीरामउत्सव पाहावया ॥ ९ ॥ पाहातां अयोध्येचें ऐश्वर्य । अमरावती दास्य करी स्वयें । कैलास वैकुंठ पाहावयासि ये । सौंदर्य निरुपम ॥ १० ॥ नंदनवन चित्ररथवन । वसोनि अयो-ध्येमाजि वस्तीनें । विसरलीं पावावया स्वस्थानें । सुखावलीं अयोध्येसी ॥ ११ ॥ त्रिभुवनीचें अभिनव थोर । रचिलें श्रीरामें अयोध्यानगर । सेविती ब्रह्मादि सुरवर । शरयूतीर विलासें ॥ १२ ॥ ब्रह्मांडींचीं सकळ तीर्थें । कृतार्थ व्हावयासि निजस्वार्थें । वसविती अयोध्याप्रवेश अर्थें । पत्रगती तयां ॥ १३ ॥ रामाभ्यंगअवसरीं । समारंभ महाद्वारीं । नगारे दुंदुमी मेरी । वाजती वाजंतरें ॥ १४ ॥ राजद्वारीं नृपांची दाटि । येती नरनारी कोट्यानकोटी । मंगळ आरतें सुवर्णताटीं । आ-रत करिती श्रीरामा ॥ १५ ॥ ज्ञेयपंचकतैळ सुवासिक । मर्दन करिती निजविवेक । स्वानंदघनमस्तक । चर्चिती श्रीरामाचा ॥ १६ ॥ दिव्य-कबरी कुटिळ कुंतळ । सुस्नेहें द्रवती निर्मळ । विशाळहृदयें घननीळ । सुवासतैळें चर्चिला ॥ १७ ॥ कळाकळातीत जिंव्हाळा । स्नेह मर्दती चमत्कारलीळा । तोषूनि तनुघनसावळा । बैसविला अभ्यंगस्थळीं ॥ १८ ॥ सीता श्रीरामाची चिच्छक्ति । लावण्यवसुमतीजा युवती । राम आत्मसूर्याची कांति । सीतेसह अभ्यंग ॥ १९ ॥ गुणागुणातीत छीळा । उभयपल्लवीं येक जिंव्हाळा । रामसीता दंपत्य सोहळा । अ-भ्यंगीं होतसे ॥ २० ॥ वेद शास्त्रें पुराणें । सुस्वरित सामगायन । अखंडस्वर वेदपठन । अभिषेक होतसे ॥२१॥ चिद्रत्नखचित नाहणीं ।

---

[1] गल्ल्या, रस्ते.

सुनीळ पांची पाटांगणीं । रामाभिषेकजीवनीं । पावन होती सर्व तीर्थे ॥ २२ ॥ गंगा गोदावरी यमुना । गंडिका सरस्वती पयोष्णा । कृष्णा वेण्या तथा नाना । आदिकरूनि भागीरथी ॥ २३ ॥ नीरा भिवरा पयस्विनी । सुवर्णभद्रा संजीवनी । मलापहारी पावनी । कावेरी तुंगभद्रा ॥ २४ ॥ सकळ तीर्थांचें माहेरघर । रामपदारविंदनीर । अभिषेक होतसे निरंतर । रामअभ्यंगसमयीं ॥ २५ ॥ सुवर्णसरोवरासमान । कढया विस्तारिल्या विस्तीर्ण । माजि सीतोष्ण समसमान । सुवासिक जळ सारिलें ॥ २६ ॥ स्वच्छ चिदंबर स्वस्थिति । चहूं निगमीं महावाक्यमती । धरिलें तत्वमस्यादि चहूं हस्तीं । उदकधाराप्रवाहीं ॥ २७ ॥ चिदंबरीं स्वानंदजीवन । मंगळ सुवासिनीहस्तीं सपूर्ण । उन्मनीपरात्परं अनुसंधान । अखंड धार लागली ॥ २८ ॥ परमात्मा रघुवीर । चिच्छक्ति सीता मनोहर । तया जीवनधारेसि निरंतर । अभिषेक जाला ॥ २९ ॥ विमळ- सुनीळांग सावळें । प्रकाशनीळ रविउजाळें । आंगीं घनवट तेज आगळें । उघड दृष्टीसि देखिलें ॥ ३० ॥ निवाली निजदृष्टी सुलीन । रामांगीचें आर्द्र काढिलें पूर्ण । दिव्य पीतांबर प्रकाशघन । कास काशिली ॥ ३१ ॥ स्वानंदचंद्रनिभाबर । धुतलें सुधासागरीं मनोहर१ । परिधानाबर सुंदर । शोभलें रघोत्तमीं ॥ ३२ ॥ सीतालावण्यघन वनस्त्रिया । नेसली कनकांबरचर्या । प्रभामथित चित्सूर्या-। सम काचोळि लेयिली ॥ ३३ ॥ उभयतां महासदनीं । बैसऊनि दिव्यसिंहासनीं । रामसीता युग्म नयनीं । पाहिलें निरंतर ॥ ३४ ॥ ज्ञेतिचंदनाचा गाळ । मिश्र ज्ञेयकेशर रसाळ । उन्मनीकस्तुरी परिमळ । दाटितसे नभा ॥ ३५ ॥ अनेकभावपरिमळ सार । सुमनयाति मनोहर । अर्चनविधीचे उपचार । संपूर्ण सिध्द असती ॥ ३६ ॥ सुरेख चंद्रकळा भाळीं । अर्चिली मूर्ति घनसावळी । कस्तुरी द्विबोटी झळाळी । मणिमय अक्षता त्रिपुटीं ॥ ३७ ॥ दिव्यशरीरीं उटि पातळ । घातल्या

१ (?) पाच नावाच्या रत्नांनी केलेल्या. २ भीमानदी. ३ ओलेंपण.

चंपकमाळा सोज्वळ । कंठमाळा चिद्रत्नकळ । प्रकाशी किरणें पडती ॥ ३८ ॥ शोभली वैजयंती वनमाळा । शोभे कौस्तुभमणि तेजागळा । तत्त्वप्रकाश करवी उजाळा । पदकें गळां श्रीरामाचे ॥ ३९ ॥ श्रवणीं कुंडलांचे झळाळ । करिती ज्ञानरवींसि सुढाळ । गंडस्थळीं प्रभा अखिल । डोहो चित्प्रकाशाचे ॥ ४० ॥ माथां मुगुट मनोहर । जो ज्ञानसृष्टीचा प्रभाकर । दिव्यप्रभेनें चिदंवर । ढौरलें तेणें ॥ ४१ ॥ दिव्यनक्षत्रतेजघरटि । रघुराजविभूषण किरीटी । शुक्र सुढाळें मुक्तांचे घोंस दाटी । माळीं रुळती ते ॥ ४२ ॥ मनोहर कुटिल कुंतळ । येक-वटुनि येक मुष्टीनें केवळ । जुडा बांधोनि सोज्वळ । मुगुट वरी अळं-कारला ॥ ४३ ॥ तया मुगुटातळील कुंतळ । मुरडले जावळापरी कोमळ । तेणें शोभलें अळुमाळ । भाळ रघोत्तमाचें ॥ ४४ ॥ दंत सोज्वळ रत्नकीळ । शोभे सीताब्जमुख निर्मळ । आकर्ण नेत्र विशाळ । सरळ दिव्य नासापुटीं ॥ ४५ ॥ निजांजनें सुरेखित । च्यापाकृति भ्रूलता सुशोभत । सर्वांगभूषणें विभूषित । रामराज विग्रही ॥ ४६ ॥ कटीं कटिसूत्र सुवर्णी । ज्वाळामाळायुक्त किंकिणी । शोभे दिव्य सौदामिनी । अंबर कटिवेष्टित ॥ ४७ ॥ आपाद रुळे पीतांबर । पदीं तोडर भवहर । अंदु नूपुरें मनोहर । वांकी लेवविल्या चरणीं ॥ ४८ ॥ सद्भावें राम अळंकरिला । सीताचिद्विग्रह भूषणें अर्चिला । निरुपम त्या सौंदर्याला । पाहीं दिपले नयन ॥ ४९ ॥ चाकटलें सौंदर्यप्रभेसी । पाहा दृष्टीसि मिठी ये कैसी । निरखितां श्रीरामसीतेसी । तन्ही दृष्टी न धाय ॥ ५० ॥ परम सुंदर मनोहर । सीतेचें स्वरूप अगोचर । निष्काम रामासि निरंतर । वेध केला ज्या रूपें ॥ ५१ ॥ सौंदर्यरत्ना-करगर्भा । लावण्यवसुधाकरगर्भप्रभा । कमनीय काननशोभा । शृंगार-लहरी ॥ ५२ ॥ लावण्यदीपांतरींची भरणी । चिदानंद घन करणी । करणशोभेची धरणी । प्रगटली मूळमाया ॥ ५३ ॥ लावण्यचंपकदाम-

१ अतिशय. २ सीतेचें मुखकमल. ३ वाळे. ४ चकित झालें.

निमा । श्रृंगारवन केतकीशोभा । परममनोहर स्वयंभा । अमृताची पुतळी ॥५४॥ श्रृंगारतरूची मंजिरी । सौंदर्यवनकुसुमाकरी । केतकीगर्भवर्ण साजिरी । मनोहर रूपें ॥ ५५ ॥ स्वयम प्रकाशाचें उदित । चिद्रत्नसुवर्णाचें खचित । सर्वांग अळंकार सुशोभित । दिव्य सौदामिनी सीता ॥ ५६ ॥ मेघश्यामा प्रकाशमय । सीता लावण्यविजू स्वयें । अर्पिलीं भूषणें सौंदर्यें । भूषणासि आलीं ॥ ५७ ॥ ज्ञानबाळरवि तोटकें । श्रवणीं प्रकाशलीं तेजात्मकें । मुक्तमालिका दिव्यपदकें । कंठमाळा सोज्ज्वळ ॥ ५८ ॥ ज्ञेयप्रकाशक वैजयंती । कटीं कटिसूत्राची दीप्ति । ज्ञानरत्निमडळें वसती । कटिसूत्रप्रदेशीं ॥ ५९ ॥ कोमळ पातळ पाउलें । शोभती जेविं रातोत्पैळदळें । अंदु नूपुर वांकीं सुढाळें । शोभती अभिनव ॥ ६० ॥ सीतावदनेंदुसौंदर्य । पाहानि चंद्र करी आश्चर्य । जानकीनखाग्रीं सुचर्य । रेखारूप जडला ॥ ६१ ॥ सीता हसिताब्जवदनी । दशनदाडीमबीजें सुरंगवर्णी । बिंबाधरतटाकें दोनी । मदनसुधा उदधीसि ॥ ६२ ॥ तांबोल रंगलें सुवदनीं । कज्जल सूदलें दिव्य नयनीं । माळीं मळवट विराजमानी । शोभे कुंकुम श्रृंगारें ॥ ६३ ॥ माथा सौंदर्याची सीगें । विज्ञानचंद्रसूर्य झगझग । ज्ञानसिंदूरें भरिला भांग । रविमुक्तसर सोडिला ॥ ६४ ॥ माथां मिरवली मुक्तजाळी । वेणी सुशोभित भृंगावळी । भूषणें शृंगार केतकीदळीं । महाशोभाऐश्वर्य ॥ ६५ ॥ रामसीता वधूवरें । अर्चिलीं निजतत्वअळंकारें । निजआस्तिक्य मूळवोहरें । अनादि सित्ध मेहुणें ॥ ६६ ॥ पुरले मनोरथ सित्धीचे ठळे । निवाले निजसुखाचे डोळे । वोळली गुरुकृपा सोहळे । पुरले निजहृदयांचे ॥ ६७ ॥ भरत शत्रुघ्न लक्ष्मण । दिव्याबरें सुभूषण । अळंकारविधीनें संपूर्ण । अर्चिलें तयासी ॥ ६८ ॥ अर्चिला वसिष्ठ ब्रह्मऋषि । अर्चिले ऋषेश्वर सभेसी । शिवि सनकादिकनिश्चयेसी । रामरूप अर्चिले ॥ ६९ ॥ तेथ अभिनव पाकसित्धी ।

१ बीज २ कर्णभूषणें. ३ तांबड्या कमळाच्या पाकळ्या. ४ पराकाष्ठा, सीमा, शिखर ५ (?)

घालीत पैजा । ध्वजा उभऊनि समभारें ॥ १३ ॥ स्वानंदमदजाती कुंजरीं । बाणला चौबरडोल प्रभांवरीं । फांकती रत्नकिळा तेजलहरी । रथलावण्यसिंधूच्या ॥ १४ ॥ विज्ञानमेरूचीं शिखरें । ध्वजा फडकती चिदंबरें । साधकसिध्द महागजरें । महारथ धडाडिले ॥ १५ ॥ विजयध्वजरथावरी । बैसलासे अहंरावणारी । सौंदर्यसिंधूची लहेरी । रामघननिधीअंकीं ॥ १६ ॥ समागमें शाहाणौ कुळीचे नृप । सुरवरकोटि सद्रूप । ऋषिसंभार तपोरूप । सूर्यअग्निवर्णरथी ॥ १७ ॥ सेना चतुर्विध प्रकारें । आत्माराम वेष्टित संचरे । बोधघनरव वाजंतरें । दुंदुभी गजरें गर्जती ॥ १८ ॥ विरक्तिमकराननें विक्राळें । ज्ञानसूर्यपणें सोज्वळें । कुंचे विंजणें तेजागळे । वैभव मिरविती ॥ १९ ॥ भयंकर रणतुरांची घायी । भवनिवर्तक माटीव नवायी । सुनीळभूमिकेवरि लवलाहीं । पसरली रामसेना ॥ २० ॥ उठावले ज्ञानअसिवारें । धडाडिले बोधरहंवरें । लोटले अद्भुत थाटें कुंजर । सेनाचक्र उसळे ॥ २१ ॥ पदातीतपदस्थिति अनिवार । पदोपदीं होती राजोपचार । भक्त चालिले जयजयकार । करिती क्षणक्षणा ॥ २२ ॥ प्रेमधूसर उघळे । तेणें चिदंबर झांकोळलें । भक्तअंतर्भाव लोळे । आला प्रारब्धचांफळा ॥ २३ ॥ समर्थआज्ञेनें भृत्यानुभृत्य । करी प्रारब्धचांफळीचें पारपत्य । असत्यनिवृत्तीनें सत्य । उत्सव होय आगळा ॥ २४ ॥ नगर शृंगारलें वाडेंकोडें । शोभले ज्ञानकुंकुम सडे । चित्सूर्यपताका चहूंकडे । भरिले चोखडे मुक्त चौक ॥ २५ ॥ सुवर्णे शृंगारिले प्राकार । सुरंग राजांगणें मनोहर । दिव्य देवालयें विमानाकार । सुखें रघुवीर वसों ये ॥ २६ ॥ शृंगारूनि निवासठेवा । कीर्तनीं समोरें आले देवा । पाहोनि विश्रांतीचा विसांवा । जडले रामपदारविंदीं ॥ २७ ॥ कीर्तनाच्या समारंभें । रघुवीर सप्रेम स्वयंभें । वसला चांफळीं उत्सवसभे । शोभा कोण गणील ॥ २८ ॥ नवविधा भक्ति अभिनव । प्रति-

१ अंबारी (?). २ सीतारूपी. ३ मोर्चेल. ४ पंखे. ५ रणवाद्यांची. ६ नवलाई, कौतुक (?) ७ (?) खड्गांचे समुदाय. ८ रथ.

पदेपासूनि नवनव । संभवनवमीसि अंतर्भाव । महा प्रगटे ॥ २९ ॥ दशमीचें पूर्ण आरत । होय रथोत्सवाचें अद्भुत । उत्तरचाफळीं इत्यंभूत । केला उत्सव समर्थें ॥ ३० ॥ समर्थकृपा उत्सव अनंत । दक्षिण मानसीं होये अद्भुत । मूळतेजोलिंग विख्यात । केला उत्सव अनंतें ॥ ३१ ॥ प्रतिपदेपासूनि जन्मनौमी । उत्सव न समाय तो चिद्व्योमीं । अनंत तो सुवर्णादिनामी । प्रतिष्ठिला निजउत्सव ॥ ३२ ॥ उत्सवेंसि घनानंदसावळा । अनंत आला दक्षिणचांफळा । तो दक्षण द्वारकेसि आगळा । उत्सव समारंभें ॥ ३३ ॥ राम आमुचा मूळपुरुष । होय चित्सूर्यवंशीचा ईश । आम्ही त्याचे स्वप्रकाश अंश । उत्सवदिवस पाहिला ॥ ३४ ॥ सरली अज्ञानशर्वरी । बिंबला आत्मरवि चिदंबरीं । अमृताचा दिवस निर्धारीं । रामउत्सव पाहिला ॥ ३५ ॥ अष्टभावें करूनि पूर्ण । ब्राह्मीं मुहूर्तीं भक्त उठोन । विज्ञानसरितेसी निमग्न । सुस्नात जाले ॥ ३६ ॥ राममुद्रांकित टिळे । जिवें जपोनि आवळिले । आश्रमसित्धीनें तात्काळें । पूजेसि त्वरा होतसे ॥ ३७ ॥ अणिमादि रिधि सिधि कोडें । केलीं संमार्जन चहुंकडे । रंगमाळा चौक चोखडे । उठे देशांग मगमगाट ॥ ३८ ॥ सुवर्ण सुरेख चित्रशाळा । उजळती आनंतदीपमाळा । मिळाला सात्विकभक्तमेळा । दाटि जाली सभेसी ॥ ३९ ॥ श्रृंगारिलें सुमनविमान । शोभती सुमनपडदे विस्तीर्ण । मुक्तवितानें शृंगारघन । वोळला दिसे नभीं ॥ ४० ॥ वाद्यें गर्जती घनरव गंभीरें । हरिदास आले कीर्तनगजरें । राजा रघोत्तम चमत्कारें । शृंगारिला भक्तांनीं ॥ ४१ ॥ सुरेख स्वप्रकाश गाभा । सिंहासनीं राहिला उभा । दक्षणेसी सीता स्वयंभा । वामांगीं लक्ष्मण ॥ ४२ ॥ शत्रुघ्नें धरिलें चामर । भरताकरीं छत्र मनोहर । सन्मुख उभा ईश्वरावतार । विनीत बद्धांजुळीनें ॥ ४३ ॥ तवकें गर्जती दुंदुभी भेरी । करणे कोहाळां बुरंगनें फेरी । जेंगटें घंटा मृदांग झल्लरी । टाळ

१ जन्मनवमीच्या दिवशीं. २ एक सुवासिक पदार्थ. ३ शंकराचा अवतार मारुति. ४ (?). ५ (?) नगारा. ६ (?). ७ (?). ८ मोठी झांज. ९ (?) डफ.

भक्तजन । तंव चित्सूर्यें रात्रिमान । दाविलें सहजें ॥ ७५ ॥ रात्रीचा उत्सव आगळा । उजळिल्या असंख्य दीपमाळा । सभेची बैसक पाहातां डोळां । तटस्थ वेध होतसे ॥ ७६ ॥ कथेनें दिनमान उदेलें । आरत सर्वोत्तमासि केलें । एवं प्रतिपदेपासूनि चालिलें । पर्व नवमीपरियंत ॥७७ ॥ नित्य कथा रामायणीं । बैसला हनुमंत श्रवणीं । रामसंभव मूळापासूनि । आरंभली कथा ॥७८॥ देव मुक्त न्हावयासी । प्रगटला राम सूर्यवंशीं । अहंरावणवध लंकेसी । वाट पाहाती सुरवर ॥७९॥ [1]विधि येऊनि क्षीरनिधिसी । प्रसन्न केलें विष्णूसी । तेणें अवतरणें विष्णूसी । दिल्हें वरदान ब्रम्हया ॥ ८० ॥ अमरीं विक्षेपिलें कैकयेसी । डोहळीयामिसें मागे भाकेसी । विरक्तिदशेनें उदरासी । आला कौसल्येच्या ॥ ८१ ॥ विश्वामित्रें दशरथासी । मागीतला यज्ञ संरक्षणासी । जातां सीतेच्या स्वयंवरासी । मार्गी अहिल्या उद्धरिली ॥ ८२ ॥ भग्न करूनि शिवशक्ति लीळा । वरिली वैदेही चित्कळा । अयोध्येसि येतां परिहरिला । गर्व त्या भार्गवाचा ॥ ८३ ॥ पट्टाभिषेकें उद्देशें । परिपालन पितृवाक्यपरितोषें । आला दंडकारण्यासि सौरसें । सृष्टि पावन कर्ता ॥ ८४ ॥ भरत भेटी घे चित्रकूटासी । त्यासि अभय देऊनि पाठविलें अयोध्येसी । घोरारण्यीं वधिलें विराधासी । भेटोनि ऋषीस चालिला ॥८५॥ वसला पंचवटीस लीळा । शूर्पनखेस गौरव दिधला । तिच्या चि उद्देशें वधिला । खरदूषणादि राक्षस ॥ ८६ ॥ मारीचासि घेऊनि रावण । केलें मृगाकृतीनें विंदाण । मृगासवें राम लक्ष्मण । पाठीं सीता हरिली तेणें ॥ ८७ ॥ सीतेच्या वियोगें विचरे वनीं । कबंध वधिला तत्क्षणीं । शबरीआश्रमा येऊनि । आले पंपा सरोवरा ॥ ८८ ॥ तेथें भेटला हनुमंत । जालें सुग्रीव सख्य वाली हत । तारा किष्किंधा अभिषेचित । सुग्रीव पट्टीं बैसविला ॥ ८९॥ मिळाला वानरांचा मेळा । [4]भीमें सीताशुध्दि आणिली लीळा । [5]सिंधुबंधनें [6]सुवेळीं । पावला लंकेसि

१ ब्रम्हदेव. २ शिवाचे धनुष्य. ३ कौतुकाची गोष्ट. ४ वज्रभीमानें, मारुतीनें. ५ समुद्रावर सेतु बांधून. ६ सुवेल नामक पर्वतावरीं.

श्रीराम ॥ ९० ॥ रावण सहपरिवारी । निर्दाळिला निर्वाण परी । सुरवर मुक्त अमरपुरी । पावले रामप्रतापें ॥ ९१ ॥ बिभीषणासि लंका दीधली । सीता वन्हिस्नानें भेटली । पुष्पकीं बैसोनि भेटि दिधली । भरतासि श्रीरामें ॥ ९२ ॥ जननी जनवृंददर्शन । जालें अयोध्याप्रवेशन । पट्टीं बैसला विराजमान । राजा येकछत्री ॥ ९३ ॥ या चि कथेच्या अनुसंधानें । अष्टही रात्रि दिनमान । जैसी चंद्रकळा अभिवृधिनें । वाढली उत्सवेंसी कथा ॥ ९४ ॥ तो नवमीचा पूर्ण दिवस । उत्सव पाहों येती त्रिदश । अवधान करून येती अवकाश । उत्सव घ्यावा श्रवणीं ॥ ९५ ॥ इति श्रीरामसोहळा । 'सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । रामप्रारब्धवस्तीसि आणिला । म्हणे मेरु अनंत ॥९६॥ नवमपदे दशमउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ उत्सव । निवेदन नौमीचा संभव । गगनीं पाहों आले देव । विमानीं बैसोनियां ॥ १ ॥ चिदादित्यकुळीं सद्रूप । जाला वंशोत्धार तद्रूप । संभवला राम कुळदीप । चिद्रूप साक्षात्कारीं ॥ २ ॥ तें जन्मनौमीचें पर्व । अजन्मीं जन्माचें अपूर्व । शिवसनकादि सिद्ध सर्व । या चि नवमीस अनुसरले ॥ ३ ॥ गुरुकृपा कौसल्योदरीं । रामसंभव निर्विकारी । निजचरित्रें चि उत्धरी । त्रैलोक्यातें ॥ ४ ॥ वृत्ति घरामार फोडिला । दुष्ट अरिवर्ग संव्हारिला । सज्जनवृंद प्रतिपाळिला । सुखैकघनरामें ॥ ५ ॥ निजभक्तांचे प्रीतीसि । आला प्रारब्ध वसुमतीसी । जेंवि कारण येउनि कार्यासी । मूळ निर्मूळ करी ॥ ६ ॥ बीजीं प्रगटोनि तरुवर । फळद्रूप जालें बीज सार । सुरसानदेंसी साक्षात्कार । रूढीसि आलें ॥७॥ तेंवि रामतत्व परात्पर । प्रतीतीसि आलें अभ्यंतर । तो जन्मनौमीचा उत्सव थोर । भक्त तत्पर श्रीराघवीं ॥८॥ माह्मीं मुहूर्तीं भक्तपंक्ती । सुस्नात नित्यनेमें आचरती । विश्रांतिराम-

---

१ अमोंत दिव्य करून. २ देव.

आलया येती । निरपृहस्थितिविभूषित ॥ ९ ॥ सुखैकघनसमाधिमंदिरीं । सीताराम सुमनसेजेवरी । निजेलीं त्यांसी सप्तस्वरीं । गायनें जाग्रती आणिलें ॥ १० ॥ नारद तुंबर महामुनी । शिवादि तत्पर रामदर्शनीं । सिध्द सनकादि कपिलमुनी । दत्तात्रेयादिक ॥ ११ ॥ स्वर्ग मृत्य पाताळींचे । मिळाले साधुजन निजांचे । सरिता सिंधुप्रसिध्दीचे । आले मूर्तिमंत पाहों ॥ १२ ॥ महापर्वत महाविभूति । अंतर्निष्ठ पाहों येती । ब्रह्मादिक देव रावती । नौमीची ये पर्वणीसि ॥ १३ ॥ सुरेंद्र स्वयें पारपत्य करी । सुरवर तिष्ठती जोडल्या[१] करीं । वेदशास्त्रें पुराणें गजरीं । मिळालीं महापर्वणीं[२] ॥ १४ ॥ महोदेय अर्धोदयें[३] कपिलपष्ठी । सर्व जयंत्या मुहूर्तांच्या कोटी । अमृतसिध्दियोग त्या परिपाटीं । पावनयोग पावावया ॥ १५ ॥ सकळांसि देऊनि दर्शन । हृदयसिंहासनीं सुखैकघन । पंचतत्वसार संपूर्ण । होय पंचामृताभिषेक ॥ १६ ॥ वसिष्टादि महा ऋषिवृंदें । मंत्रस्वरीं अभिषेकिला सुखकंद । तोयीं तोषविलें निर्द्वंद्व । दिव्यकोटि अपार ॥ १७ ॥ राम शृंगारला प्रकाशघन ॥ दिव्य सिंहासनीं विराजमान । सीता वामांकीं शृंगारोन बैसली शृंगारसिंधुजा ॥ १८ ॥ भरत शत्रुघ्न सौमित्र । चामर व्यजनधृतछत्र । सन्मुख बैसोनि पवित्र । रुद्र पुराण सांगे ॥१९॥ पुष्पांजळी अर्पिती ऋषी । जाई जुई चंपकविशेषीं । सुमनहार समेसीं । शृंगार जाला ॥ २० ॥ विमान शृंगारिलें सतेज । असंख्य उभविले सुवर्णध्वज । महा पताका ऊर्ध्वभुज । भीम[४] अंबरीं फडके ॥ २१ ॥ दिव्यरत्नांकरूपें विशाळ । गगनीं उभा असे गोलांगुळें । त्यासी लक्षूनि येती सकळ । यात्राकार सूर्याचे ॥ २२ ॥ मुख्य नौमीचा येक दिवस । प्रवृत्तीसि[५] नसे चि अवकाश । रात्रींदिवस हा उमस । असे चि ना कांहीं ॥ २३ ॥

---

१ हात जोडून. २ एक पर्वणी आहे. माघ किंवा पौष महिना, सोमवार, सूर्योदय, अमावास्यारंभ, श्रवण नक्षत्राचा मध्य, व व्यतिपाताचा अंत इतक्यांचा योग. ३ रविवार, अमावास्यारंभ, श्रवण मध्यमाग व व्यतिपाताचा अखेर भाग यांचा योग होऊन झालेलें पर्व. ४ वानर, मारुति. ५ जाणीव.

सिंहासनीं सीतापति । भक्तजन पाहों येती । दाटि जाली अणु हि प्रति । अवकाश नसे तेथें ॥ २४ ॥ शृंगाराच्या समारंभें । लक्षिती जन महासभे । वाद्यें वाजती स्वयंभें । महा सुस्वरित ॥ २५ ॥ राम नौमीस प्रत्यक्ष राम । पाहोनि विसांवले योगी विश्राम । भेरी दुंदुभीस्वरें व्योम । घनवटलें पडसादें ॥ २६ ॥ गिडीबिडी गुजगुजी काहाळ । झल्लरी समेळ दुताळ । रबाब उपांग टमाळा । स्वर तो विविध उठे ॥ २७ ॥ डफडी पांवे चुरंग तुतारे । नफेरी वांके कर्णे नगारे । सनया सुस्वर चमत्कारें । वेधिती जनां ॥ २८ ॥ तुंबळ हुडुक सारंगी कमाच । विणे सारमंडळ स्वर उंच । वाजती रुद्रविणे साच । रघुराजतोषे विश्व-अभ्यंतरें ॥ २९ ॥ नामेंधिळे मुख्य महंत । ढाळें गजरें कीर्तन करित । दिंड्यां पताकासि अत्यद्भुत । ऐती महाद्वारासी ॥ ३० ॥ नित्यनेम आरत जालें । धूपारतीसि मिरवत आणिलें । हनुमंत वाहनें विराजलें । छत्रें मार्तांडपत्रेंसी ॥ ३१ ॥ माही मोर्तेबेसी विचित्र । कुंचे उमारले सुचित्र । धूपदीपादि पवित्र । क्षेत्रविधीनें अर्चन ॥ ३२ ॥ सुवास मधुर चहुंकडे । रगमाळा चौक चोखडे । पाहतां पाहता मंडप रेंढे । पाहावयासि तेथें ॥ ३३ ॥ महा प्रस्थान हरिदासमेळा । कीर्तन करिती रंग आगळा । प्राकारीं घनानंद सावळा । स्वस्थ आला मिरवत ॥ ३४ ॥ जोगी बैरागी भैरवं । गाती नाचती अभिनव । हे पहावयासि नयलाव । जन दाटले ॥ ३५ ॥ शौपी वासुदेव चौडके । दिंढी गाणें गाती कौतुकें । चटक्या टिपरी अनेकें । रंगीं बांगडे नाचती ॥३६॥ टाळ घोळ भक्तमेळें । द्वादश आरत उजळले । प्रदक्षणेसीं ते प्रेमळें । लोटांगणें आली ॥ ३७ ॥ रामपदतीर्थसेवन । जालें मंत्रविधीं अर्घ्यप्रदान । बैसका सुरंग विस्तीर्ण । आनुक्रमें घातली ॥ ३८ ॥ जालें नित्यनेम निरूपण । होये गंधपुष्पीं सभेचें अर्चन । सुमनमाळा

---

१, २७–२९ ओंव्यांत नाना वाद्यांचीं नांवें आलीं आहेत. २ सुप्रसिद्ध. ३ (?) टाळ. ४ उत्कंठा. ५ वाढे. ६ (?). ७ (?). ८ (?) एक वाद्य. ९ (?)

भूसरें पूर्ण । विश्वरूप पूजिलें ॥ ३९ ॥ रामजन्मनौमीउत्सव । पाहों आले स्वर्गींचे देव । चित्सूर्यमाध्यान्हीं संभव । अभिजित मुहूर्ती ॥ ४० ॥ स्वरूपअनुभव सहज । स्वयंभसुखाचें निजतेज । विश्वपावन रघुराज । आत्मसूर्य प्रगटला ॥ ४१ ॥ भक्तिकौसल्या पुत्रवती । श्रुतिमंगळें सुखें गाती । मंगळआरतें उजळती । वांटिती मंगळद्रव्यें ॥ ४२ ॥ सीतळ सुगंध मगमगीती । विश्रांति विज्रणे निववितीं । परमानंद सभेप्रती । महा उत्सव तो ॥ ४३ ॥ हसिताब्जसुवर्णवर्णे । तोरणें बांधिलीं विस्तीर्णें । केतकीदळें नाना सुमनें । सुवर्णचंपक कदळी ॥ ४४ ॥ निंबें नारिंगें रसाळें । नाना रंगाचीं परिपक्व फळें । सभामंडपीं मुक्त घुढाळें । पाहाती जन टकमकां ॥ ४५ ॥ हरिदास अवघे चि गायक । परि सकळांचा जिव्हाळा येक । आरंभीं स्तविला विनायक । निस्पृहरूप समर्थे ॥ ४५ ॥ दास्यें विर्गळितें विनयान्वयें । रामदासांची जाणीजे स्वयें । महा प्रस्थान हनुमंत होय । गायक रामसभेसी ॥४७॥ नौमीची कथा मिराशी । निरविली समर्थे निस्पृहासी । ह्व्यास राघव कथेचा ज्यासि । तो रामरूप गायक ॥ ४८ ॥ हर्षे ब्रम्हांडीं न समाय । राम विश्वरूप प्रत्यक्ष होय । रंगदेवता उभी ठाये । त्या रामसंकीर्तनीं ॥ ४९ ॥ जयजय करुणासिंधु । धांव घालुनी ये दीनबंधु । करुणा भाकितां तो प्रबंधु । श्रवणीं घेतला ॥५०॥ धांवोनि आला लवलाहीं । चमत्कारले जन निजहृदयीं । त्यासि कीर्तनासि पाहीं । उपमा चि असे चि ना ॥५१॥ श्रुति शास्त्रांसी न कळे लीळा । तो कीर्तनी प्रगटला जिव्हाळा । लक्षूनि घनानंद सावळा । स्तवनें करुणा भाकितो ॥ ५२ ॥ देवा *भक्तकाजकैवारें । वैकुंठींहूनि आलासि त्वरें । वधिला अहंरावण शरें ।* केली कैवल्यप्रतिष्ठा ॥ ५३ ॥ अद्वैतयेकछत्री राजा । स्वानंदें परिपाळिल्या प्रजा । नामस्मरणें चि तरा जा । भवसिंधूसि आज्ञा ॥ ५४ ॥ रामकीर्तनीं करुणारस । रंग माजला बहुवस । सभा चमत्कारली अखंड रस । जिवीं राम दाटला ॥ ५५ ॥ निर्विकार प्रेमा अद्भुत । सभा

१ ( ? ) नम्रत्यामें. २ ' रामदासांचि ' असें असावें.

सकंप रोमांचित । सुखें आनंदाश्रु टाकित । नयन सकळांचे ॥ ५६ ॥ राम सजळजळदवर्ण । जननयनारविंदीं संपूर्ण । रामकथेसि रामअवतरण । रामस्मरणें होतसे ॥ ५७ ॥ होतसे दिव्यधूसरउधळा । रजवर्टला रामतेज उजाळा । गैर्द माजली पाहातां डोळां । दाटला निजरंग निबिड ॥ ५८ ॥ क्षीरपति मिरवत येती । गायक सन्मुख जाऊनि आणिती । क्षीरापतीच्या परवडी होती । राशी देवापुढें ॥ ५९ ॥ दौळी सोलीव निर्मळा । मिति नाहीं फदळीफळा । नारिकेळें आम्रफळा । प्रमाण नव्हे चि ॥ ६० ॥ फणस उत्तर्यां द्राक्षरासी । इक्षुदंड शर्कराविशेषीं । देवें पाहूनि दृष्टीसी । तृप्तीनें उभा असे ॥ ६१ ॥ कथासागरा भरितें आलें । रामचंद्रबिंब उदेलें । चित्कल्लोळसरिताजळें । हेलावती जनमानसें ॥ ६२ ॥ कथाअैवासीं श्रीरामीं । आरत उजळलें निजनौमी । महा स्वसुख संभ्रमीं । क्षीरापति वांटिल्या ॥ ६३ ॥ जे जे आरती गुंतले । त्या त्याच्या पदरीं घालिती बळें । जे क्षीरापतीसी लोधले । ते चुकले आरतीं ॥ ६४ ॥ संपूर्ण पंचपंचकें । आरत जालें कौतुकें । जन बहुडले सुखात्मकें । परतोनि पावया ॥ ६५ ॥ समस्तीं फळाहार केला । रात्रीं समुदाय सर्व मिळाला । हरिकीर्तनें उगवला । दिवस तो अमृतें ॥ ६४ ॥ दशमीचा दिवस पाहीं । समाराधनाह्व्यास हृदईं । नित्यनेमें भक्त सर्वही । सादर साक्षेपी ॥ ६७ ॥ पारपत्याधिकार योजूनि । साहित्यासी मिळालीं मिळणी । स्वयंपाकस्थळें धरणी । संमार्जनें जालीं ॥ ६८ ॥ स्वयंपाकसिद्धि सकळ । पात्र घासूनि निर्मळ । स्वयंपाकीणी त्या सुशीळ । सुगरणी महा ॥ ६९ ॥ जाली स्वयंपाकसिद्धि,त्वरा । मांडिली भोजनासि जन पाचारा । त्रैलोक्यनिवासी रघुवीरा । समर्पा नैवेद्य ॥ ७० ॥ मुक्त चत्वार महाद्वारें । ब्राह्मण येती सोधभरें । अपरसूर्यचमत्कारें । बैसविल्या पंक्तीं ॥ ७१ ॥ द्विज अर्चिले सुगंधसुमनीं । विस्तीर्ण फदळींपर्णें मांडूनि । आरंभिली ते वाढणी ।

१ रजानें भरला. २ प्रकाश. ३ दाटी. ४ खिरापत, प्रसाद. ५ वाळी (हरभऱ्याची). ६ (?) ७ समाप्त झाली असतां. ८ (?) निघाले.

महा समारंभेसी ॥ ७२ ॥ विश्व धालें जियेच्या ईक्षणीं । ते वाढिती होय विश्वजननी । नवविधा भक्ति तोषोनि । घालिती परवडीनें ॥ ७३ ॥ चतुर्विधा मुक्ति अभिनवें । वाढिती अपेक्षित बरवें । मुख्य प्राणपंक्ति स्वभावें । परामृशकर्ता ॥ ७४ ॥ विश्वाभिराम स्वयें । पंक्तीनें संचरता होये । परमामृत दृष्टीनें पाहे । ते वृत्तीच आगळिक ॥ ७५ ॥ रिद्धिसिद्धि समृद्धि सकळा । षड्सें विस्तारें जिव्हाळा । समर्थस्वामि अवलीळा । परामृश होतसे ॥ ७६ ॥ वरि विशेष अनंतमौनी । संतोषला संतर्पणीं । कर्ता होय महापर्वणीं । धाल्या द्विजपंक्ती त्या ॥ ७७ ॥ येक भोजनें परिशुद्ध जाले । येक समुदायें जेवाया आले । पदार्थसमृद्धीनें केले । संतृप्त सकळ ॥७८॥ हरिकीर्तनाचा अवसर । सिंहासनीं रघुवीर । महासभेसी गजर । दाटि जाली ॥ ७९ ॥ विमान शृंगारिलें सुंदर । सिंहासनीं मनोहर । शृंगाररस रघुवीर । पाहोनि नयन निवाले ॥ ८० ॥ स्वच्छचंद्र गर्भ निर्मळ । चांदवे खुलले मुक्तघोंस[1] । आरंभले नित्यनेमें सोज्वळ । आरत प्रारंभीं ॥ ८१ ॥ देवप्राकारीं मिरवला । दीप हिलाल चंद्रज्योति उमाळा । आश्चिर्य दारूचा उजाळा । उजळलें नभ ॥ ८२ ॥ पुढें कीर्तनासि उभे ठाकूनि । वाखाणिती सूर्यवंशकीर्ति जनीं । महाप्रसिद्ध शिरोभूषणी । विख्याती परंपरा ॥ ८३ ॥ रथ शृंगारिला उत्तमोत्तम । शोभती ध्वज तेथ मनोरम । संपूर्ण प्रकाशें महाव्योम । धवळलें ते वेळे ॥ ८४ ॥ बंदीजन बिरुदें वाखाणिती । भाट प्रतापें भाटींव[3] करिती । हरिदास गाती नाचती । नामघोषें कीर्तनीं ॥ ८५ ॥ म्हणति रात्रिमान सरों आलें । श्रीरामासि रथारूढ पाहिजे केलें । दीपमाळांनीं उजळिलें । प्राकारआलय ॥ ८६ ॥ देवासन्मुख रंगांगणीं । दीप उजळिले खणोखणी । ते शोभा पाहतां नयनीं । आश्चिर्य वाटलें ॥ ८७ ॥ राजीव नयन पाहातां मनें । बैसला दृष्टीसि ऐश्वर्यप्रभेनें । विमान शृंगारलेंसे सुमनें । मनें तेथें चिं वरित केली ॥ ८८ ॥ दीपमाळा प्रकाशमानें । शोभा घनवटिली जनदाटीनें ।

---

१ मरामर्श, विचारपूस. २ मोत्यांनीं सजविलेले. ३ स्तुति, भटापण.

सुमनें कोमायिलीं प्रभेनें । दिनमान सुचविलें ॥ ८९ ॥ रघुराज रथारूढ जाला । यात्रकारीं रहींवरें मोढिला । तो घडघडायमान चालिला । प्राकारविथीनें ॥ ९० ॥ त्या रथोत्सवाचा महागजर । दारूनें उजळलेंसे अंबर । हिलाळ चंद्रज्योति मनोहर । तेथें प्रकाश खुलले ॥९१॥ नळे अर्डत उठती । बाण सरकत नभीं भरती । फेरकती रोमांच दाशरथी—। उत्सव आंगीं भरला ॥ ९२ ॥ उजळल्या फुलबाज्या विचित्र । दारूनें प्रकाशलें महाचित्र । प्रभामंडपनभीं नक्षत्र— । माळा विस्तारल्या ॥ ९३ ॥ उधळे श्वेत आरक्त धूसर । वाधें घनवटलें अंबर । उंचें स्वरें मनोहर । गाती हरिदास ते ॥ ९४ ॥ संपूर्णप्रातीच्या प्राकारें । घ्यान्ही पुरुषार्थ मुक्तद्वारें । राजा अयोध्येचा महागजरें । मिरवत आला ॥ ९५ ॥ सिंहासनीं - विराजमान । शोभला रघुराज आपण । पाहिला उत्सव तो दिनमान । अमृतें पाहलें ॥ ९६ ॥ पुरले मनोरथ सकळ । संपूर्णतेचा तो दिवस केवळ । रामसोहळा सुख अखिल । आरत उजळलें ॥ ९७ ॥ राम सफळांचें जीवन । सिंहासनीं स्वानंदघन । हृदयीं ठेऊनि रघुनंदन । आज्ञा घेती यात्रेकार ॥ ९८ ॥ जन्मांतरयात्रा हे सफळ । जालें कृतकृत्य श्रीरामें सकळ । प्रारब्धयोग हा अविकळ । उत्सवें रूढला ॥ ९९ ॥ आतां येथूनि समारंभ । रामदास सदोदित स्वयंभ । भक्त अभ्यंतर निजलाभ । संपूर्ण प्रतीतीनें ॥ १०० ॥ हें चि प्रमाण प्रारब्धीचें । तंववरि मूळ आहे यात्रेचें । जन्मनौमीयात्रा वार्षिकीचें । पर्व- जाणोनि येती ॥ १ ॥ देहप्रारब्धयात्रा सफळ । रामप्रसाद पावलों अखिल । तुटलें साक्षत्य-जन्ममूळ । समर्थपरंपरेचें ॥ २ ॥ श्रीरामसमर्थ स्वरूपें । प्रगटला तो निजप्रतापें । तारिली बोधसृष्टिरूपें । समर्थदीक्षेनें ॥ ३ ॥ हे उपासना समर्थांची । भक्ति निजभावपरत्रीची । येणें चि जन्मांतरीची । सुटली यात्रा ॥ ४ ॥ त्या समर्थाची कृपा परिपूर्ण । महा उच्छवासी होय कारण । समर्थ चि श्री अनंत प्रस्थान । अधिष्ठान उत्सवाचें ॥ ५ ॥

१ रथ. २ दृढदम उभे राहिले. ३ वार्षिक नियमाचे.

कृपा सद्गुरु अनंताची । यात्रा जाली कैवल्याची । हे चि कृतार्थता आमुची । राहिलों अनंतरूपीं ॥ ६ ॥ सद्गुरु अनंताची कृपा । पावविलें निजस्वरूपा । प्रगट करूनि रविकुळदीपा । केला महाउत्सव तो ॥ ७ ॥ महापर्वणी जन्मनौमीसि । पाहिला रथोत्सव श्रीराघवेंसी । जाला मनोरथ सिध्ध मानसीं । भरला श्रीरघुवीर ॥ ८ ॥ पुरविली भडस श्रीअनंतें । साह्य केलें परम समर्थें । सांभाळिलें रघुनाथें । आपुलें म्हणऊनियां ॥ ९ ॥ रामउपासक जगतीं । रामउपासना प्रतीती । राम सदोदित आचंतीं । अनुभवासि आला ॥ ११० ॥ पुरलें अभिष्ट आत्मप्राप्तीनें । आराध्य वोळिलें नवविधा भजनें । आपंगिलें भक्तांसि कृपेनें । महारुद्रें तया ॥ ११ ॥ सप्तमरुद्रीचें अभ्यंतर । कैवल्यक्षेत्रासि यात्रकार । जातां मार्गीं शून्य अघोर । अविद्यावन लागलें ॥ १२ ॥ निरसूनि अविद्यामाया दुस्तर । अष्टमरुद्रीं केला प्रकृतिविवर । अपरोक्षमार्गेंचे निरंतर । आणिलें कैवल्यक्षेत्रासि ॥ १३ ॥ नवमरुद्रीं निरूपण । कैवल्यक्षेत्र अनुक्रमें चि पूर्ण । जालें आत्मक्षेत्र रामाचें दर्शन । तीर्थविधीनें ॥ १४ ॥ समर्थ प्रार्थूनि श्रीरामासी । आणिलें उत्तरचाफळासी । अनंतें प्रसन्न करूनि समर्थासी । राघव दक्षिण चांफळा आणिला ॥ १५ ॥ दक्षिणचांफळीं श्रीरामवस्ती । अनंतसमर्थ तेथ असती । पुढें अद्वैतबोधस्थिति । दशमरुद्र अवधारा ॥ १६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । जन्मनौमीउत्सव आगळा १ म्हणे मेरुअनंत ॥ ११७ ॥ नवमरुद्रे येकादश उल्हासः संपूर्णः ॥

---

## रुद्र १० उल्हास १

श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः ।

॥ श्रीरामं परमानंदमुपदेष्टारमीश्वरं ।

व्यापकं सर्वलोकानां कारणं तं नमाम्यहं ॥

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थदयाघनें । प्रबोधघनामृतवृष्टीनें । नि-

वर्षिली महाअद्वैतवृष्टीनें । सगळी सृष्टी ॥ १ ॥ धाली अनादि अतृप्तीची क्षुधा । निरसली भूतसंबधाची बाधा । पिकली विश्रांतिघनवसुधा । अद्वैतदिनमानें ॥ २ ॥ निरंजनसिधिप्रसन्नना । दिधली ; सायुज्यस्वरूपता । अकल्पदुःखाची अहंता । उपशमली सुखें ॥ ३ ॥ विज्ञानचंद्रामृतपानें । निवाले जनचित्त चकोरें तेणें । सर्वाभीष्टपूर्तीनें । फळलें सुकृत ॥४॥ निजात्मदर्शेचें वैभव । निजात्मदृष्टीसि पातलें दैव । निजात्मेमहाअद्वैतसंभव । जाली सहजसिधि ॥ ५ ॥ निजअस्तित्वयतेचें अधिदैवत । प्रत्यक्ष जालें प्रसन्नतायुक्त । स्वानुभवें सदोदित । उमें ठाकलें ॥६॥ उन्मेषचक्षुचे अभ्यंतरीं । येकजिनसी निर्विकारी । दाटलें स्वरूप त्यामाझारी । सामावला लोचन ॥७॥ विज्ञानदीप जाला नयन । सद्रूपदृष्टीचें विलोकन । पाहाते पाहणें सनातन । घनावली दृष्टी ॥८॥ याच दृष्टीनें उघडा नयन । उघडीचि वस्तु पुरातन । जालें दर्शन तें विद्यमान । महाअद्वैत ॥ ९ ॥ महाअद्वैतें पाहिली दृष्टी । तेथें हारपली दर्शनत्रिपुटी । सद्गुरुकृपा पाठा पाठीं[१]। दृश्य द्रष्टा नाडळे ॥ १० ॥ सोलीव हे निजदृष्टी । पडिली महाअद्वैताची मिठी । अनुभवाचा सेवट सेवटीं । अनुभविल कोण ॥ ११ ॥ सिध्दांतसंकेत गहन । जाणिजे हा योग अविछिन्न । अनुत्पन्न मूळ अज्ञान । ज्ञेय ज्ञाता नुमसे ॥ १२ ॥ आतां स्वप्रकाश तें ज्ञान । अपरोक्षस्थिति समाधान । अनुभवीळ कवणासि कवण । दुर्जे नसतां ॥ १३ ॥ ज्ञानदृष्टीविण केवळ । अपरूप तें स्वरूप निर्मळ । अभिन्नानुभव अफळ । हाही संकेत पाहिला ॥ १४ ॥ हे स्वरूपअनुभवज्ञान । अनुभविती महासिध्द सुलीन । स्वानंदसमुद्रीं रिघोन । विरावले सुखें ॥ १५ ॥ महायोगरिध्दीचे ईश्वर । जे समाधिस्थ निरंतर । जयाचे हृदयीं आपपर । प्रवृत्ति असे चि ना ॥ १६ ॥ अनुत्पन्नहेतु आत्मस्थिति । उत्पन ज्ञानी महाप्रतीती । स्वरूपानुभवविश्रांति । अव-

१ सर्व इच्छा पूर्ण झाल्यामुळें. २ आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होऊन अद्वैत बाणल्यामुळें झालेली सहजावस्था. ३ ज्ञानरूप डोळयांचे ४ आत्मस्वरूपांत हेतु नसतो.

तारचर्या ॥ १७ ॥ स्वरूप अनुभवावयासि पूर्ण । हेतुविहीन समाधिघन । जयां अखंडीत समाधान । वाणलें अवचट ॥ १८ ॥ स्वरूपअनुभऊं जातां । निःशब्द स्वानंदघनता । महाअद्वैतस्थितीनें तत्वता । जाल्या निवांत श्रुति ॥ १९ ॥ ज्ञानाज्ञान उपशमन । तेथें नसे अज्ञानविरोधि ज्ञान । ज्ञानावरोधी अज्ञान । नसेचि मुळिंहूनि ॥ २० ॥ स्वप्रकाशदृष्टी उघडी । वस्तूची सोज्वळता चोखडी । ज्ञानदर्पणाची रोकडी । चर्या अभिनव ॥ २१ ॥ सहजस्वरूपा आंत । नुमसे स्वरूप सदोदित । तया स्वरूपासी दृष्टांत । कैचा दुसरा ॥ २२ ॥ अभिनव गुरु कृपेची दृष्टी । स्वरूपानुभव पोटीं । परि प्रतीतीच्या परिपाटीं । न पडे द्रष्टेपणें ॥ २३ ॥ जेवि चर्मचक्षूची दृष्टी । अवकाश सामाऊनि पोटीं । असे सूक्ष्मपणें संपुटीं । पदर तो न दिसे ॥ २४ ॥ प्रत्यक्ष पर्वतादिक थोर । घनें विस्तारादि दुर्धर । तितुकी यांची साठवण अपार । अवलोकनें उठे ॥ २५ ॥ परि त्वचा नसे चि कांहीं येक । तैसें ज्ञानाचें विलोकन नेमक । सामावलें जाय अनेक । परि तो संबंध नसे ॥ २६ ॥ डोळां रिघालियां कण । बाधा होय संपूर्ण । दृष्टी सृष्टीची सांठवण । परि अणुही खुपेना ॥ २७ ॥ प्रमाण दृष्टी ते गोचर । करी दृश्याचा तिरस्कार । चर्मचक्षुसि अणुमात्र । हरळ न सटे ॥ २८ ॥ सहजदृष्टी सदोदीत । सस्वरूपेस भरामरित । अलिप्त प्रतीतीची अनंत । दृष्टी अगोचर ॥ २९ ॥ जैसी गर्भांधाची दृष्टी । देखें गडदचि पाटीपोटीं । तैसी ज्ञानचक्षु घनवटी । निज अभिन्नपणें ॥ ३० ॥ स्वयंभचि सगळा डोळा । आपआपणात निवळला । भेद ना अभेद उमजला । पाहे आपण आपणा ॥ ३१ ॥ निजीं निज निरंजन । हेचि निजदृष्टीसी अंजन । लेटनि पाहती सज्जन । डोळाचि वस्तुरूप ॥ ३२ ॥ आतां ऐसीया निजदृष्टीनें । अपरोक्ष डोळस देखणें । आप दर्पण होऊनि आपणें । आप आपणा पांहाती ॥ ३३ ॥ अवांतर

१ अवतारस्थितीत, नित्य असा जो ब्रह्मानुभव तो जरा बाजूला सारल्यासारखें करून, विश्रांति घेतल्यासारखें होतें.

दृष्टी अखिल । ज्ञानत्रिपुटीचें मूळ । धरणी आणि बीज जळ । फळरूपें गोडीस ये ॥ ३४ ॥ रसना रस होऊनिया चाखे । तैसा साक्ष्यत्वीं वस्तूसि देखे । स्वप्रतीतज्ञान स्वसुखें । सांगावयासि प्रवर्त्ते ॥३५॥ कर्मकांड मुळींचा उमज । कर्माकर्माचें निजगुज । स्वरूपप्राप्तीसी सहज । मार्गरूढीनें ॥ ३६ ॥ कर्मयोगें परात्पर । सांख्ययोग निरंतर । या योगद्वयामाजि साचार । अंतर्भाव येकं असे ॥ ३७ ॥ सांख्यासि म्हणिजेत संन्यास । संन्यास कर्मयोगींच न्यास । विचारता कर्मयोगास । संन्यास तो आतुडे ॥ ३८ ॥ कर्म आणि कर्मकर्त्ता । विचारें शोधूनि पाहता । अढळ निजआस्तिक्यता । आतुडे कर्मसंन्यासें ॥ ३९ ॥ स्वभावीं निज उमजलें । तें कर्मचि निष्कर्म जालें । कर्म न करितां राहीलें । तें अकर्म नव्हेच कीं ॥ ४० ॥ कोण्ही म्हणती कर्म करिता ठेले । ते चि ते अकर्म जालें । परि तें अकर्म नव्हे आणिलें । प्रत्यवायासि तेणें ॥ ४१ ॥ सत्कर्मआचरणीं फलत्याग । तोचि संन्यास कर्मयोग । कर्म न करिता कर्मत्याग । पापात्मक तम होय ॥ ४२ ॥ नभ भरूनि वायु राहाटे । परि गगनेंसीं न घसवटे । तरी गगनावाचूनि कोठें । वसावें तेणें ॥ ४३ ॥ गगनगर्भी न रिघे कांहीं । गगनचि गगनाचे हृदयीं । तैसा निजवस्तूमाजि पाहीं । असे योग स्वरूपाचा॥ ४४ ॥ तैसा संन्यास तो चि निर्वाण । त्यासि पावावया अनुसंधान । साधनक्रम संपूर्ण । कर्मयोगविस्तारें ॥ ४५ ॥ द्वैताद्वैत सपाटशिखरीं । पावणे आहे आपणा जरी । तरी सोपानें सोपारीं । पाहिजेत कीं ॥ ४६ ॥ कर्मयोग तोचि सोपान । संन्यास-

---

१ सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः । एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ (५/४) इत्यादि गीतोक्तीचाच या दोन ओव्यांत अनुवाद आहे. २ कांहीं एक न करतां रहाणें हें खरोखर अकर्म आहे, निष्कर्म नव्हे. ज्या कर्मांत आत्मस्वरूपाचा विसर होत नाहीं तें कर्म च खरें निष्कर्म होय. ३ कर्मयोगाचा पक्ष याहून जोरानें तो काय मांडावयाचा ! ४ ' घसवटे ' (?) घर्षण करीत नाहीं.

पद अनुक्रमण । निरावलंब अविछिन्न । शृंग पावावयासि ॥ ४७ ॥ ना ते अविद्याअरण्यांतरीं । पडतां ऋजुमार्गी जाणें जरी । तरी पाऊलवाटेनें सुमारी । पावावें राजमार्गा ॥ ४८ ॥ डावें उजवें कांहीं न जातां । सांगितलें ऋजुचि प्रवर्ततां । पाविजे राजमार्गासि तत्वता । तेवि कर्मसन्यास आतुडे ॥ ४९ ॥ कर्मयोग सांख्यासी मिळोनी । सरता जाला अधिष्ठानीं । दोहींचें अभ्यंतर घेऊनि । पाविजे स्वरूप ॥ ५० ॥ कर्म सांख्य नेणतां स्थिति । भिन्न म्हणती ते मंदमति । हा अभिप्राव गीतार्थी । बोलिला श्रीकृष्ण ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः ।
एकमप्यास्थितःसम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ( गी. ५-४ )

उभय पंथें द्रष्टा निपुण । जाणे साध्यें‍सी साधन । तो परमात्माचि होऊन । पावे परब्रम्हीं ॥ ५२ ॥ निद्रास्वानुभव सुखासनीं । वसे साध्यवस्तुचि होउनि । सुखासनवाहेक[1]साधणी । मार्गे जाय क्रमिता ॥ ५३ ॥ जें ठायींचें सुनिश्चळ । तयाचा प्रवेश तैसाचि केवळ । नाहीं उन्मेशाचि चळवळ । अंतराळमार्गें ॥ ५४ ॥ मार्ग सनातन ज्ञानघन । जैसा दीप प्रभेकरून । काहीं वर्तणूक न करी जाण । परि वर्त्तवी प्रभेनें ॥ ५५ ॥ अतःपुरी राजा निद्रस्थ । बाह्य वर्त्तती सेवक समस्त । तेविं इंद्रियव्यापार होत । आत्मा निश्चळ अंतरीं ॥ ५६ ॥ आत्मा दिसतो शरीरीं । परी देहभाव नसे तिळभरी । सांख्यत्वें ज्ञानव्यापारीं । वर्तत असतां ॥ ५७ ॥ कूटस्थां आश्रयें लीळा । प्रकाशे ज्ञानाचा डोळा । तेणें योगें पाहे सकळा । आत्मा अचक्षु ॥ ५८ ॥ आंगऊनि[2] अंतःकरण । विस्तारी शब्द श्रवण । आईकतसे श्रोता होऊन । तो अकर्ण[3] तत्वतां ॥ ५९ ॥ आत्मा अस्तिक्यत्वाचे आंत । मनासी स्पर्श घेववीत । पाहतां तो त्वक्‌विरहित । अतींद्रिय आत्मा ॥ ६० ॥ आत्मा वास्तव्य चित्तीं । प्रत्यक्‌चैतन्य घ्राणाप्रति । देत.

---

१ (?) ' वाहक साधनीं ' असावें कीं ' वाहेक साधनी ' असावें
२ अन्तः करणाचा आश्रय करून. ३ अकर्ण, कर्णविहीन.

सुवासप्रतीती । परि तो अघ्राण ॥ ६१ ॥ अमृततनु सुखैकघन । रसनेमाजि वसोन । करवी परमान्न भोजन । निरावेव तो ॥ ६२ ॥ आत्मा निश्चळ स्वस्थिती । तो चि चळणासी आवकाश गती । गमन त्याचें त्रिजगतीं । तो अचरण ॥ ६३ ॥ ज्यासी आठव ना विसर । तो अवस्थेंत निरंतर । करी निद्रा परि साचार । अवस्थाचि नसे तया ॥ ६४ ॥ ज्यासी आवकाशाचि नसे । तो प्रेणवा तरी श्वासोश्वासें । प्राणरूप प्रगटला भास । परि तो अप्राणें ॥ ६५ ॥ जो निःशब्द स्वभावता । तो अक्षरांतरीं असतां । बोलवी अवसरोचिता । परि तो अबोलणा ॥ ६६ ॥ जो निरापेक्ष सहजीं । ता प्रत्यक्भावें मनामाजि । अनिष्टत्यागें इष्ट घेउमैजी । परि तो अनिच्छ ॥ ६७ ॥ सकळ कर्मी-कर्मातीत । जैसें आकाश पदार्थांते । घसघटेना मेळ निवात । निर्मळ निजागें ॥ ६८ ॥ सिंधूनें तारिली नौका । हा दिसोन आला सिंधु अंवांका । तरणें नौकेचें चि विवेका । आणूनि पाहावें ॥ ६९ ॥ वसुमतीचे सुढाळें । रहंवराचें धावणें होय आगळें । रथाचे धावेसरिसी न चळे । स्थिर वसुंधरा ॥ ७० ॥ तैसें अस्तिक्य आत्म्यावरी । चाळली इंद्रियस्थितिव्यापारी । हे गुणकर्त्तव्यता परी । अस्तिक्यवीण न घडे ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।
पश्यन्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन् स्वपन्श्वसन् ॥ १ ॥
प्रलपन्विसृजन् गृण्ह उन्मिषन्निमिषन्नपि ।
इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तंत इतिधारयन् ॥२॥ (गी॰ टी॰)

सकळ इंद्रियाची क्रिया । आत्मास्तिक्यें घडे इंद्रिया । निवळलें ज्ञान योगीया । तो परमात्माचि निःसंग ॥ ७२ ॥ अतिसुषुप्तींत निजेला । स्वप्नचिदाभासें भय पावला । परि निजेलाचि नाही तयाला । कैचें

१ पाय नसलेला. २ ओंकाराचा हि तो श्वासोच्छ्वास म्हणजे प्राण आहे, पण त्याला स्वतःला प्राण नाहीं. ३ प्रसंगाला योग्य असें. ४ अंतःस्थ रूपानें, अंतर्यामी म्हणून ५ 'घेऊं उमजी' असे असावें काय ? ६ शक्ति, कार्य. ७ उतरणीवर. ८ रथाचें.

स्वमदुःख तें ॥ ७३ ॥ आत्मज्ञानी हाचि गाथा । पावती स्वप्नांतर व्यथा । त्यासी निद्रा ना जागृती तत्वता । नसे संसारस्वप्न ॥ ७४ ॥ अलिप्तअधिष्ठानीं कर्माकर्म । जो अधिष्ठानचि निष्कर्म । त्यासी कांहीं च नसे भ्रम । निभ्रम तो वस्तुता ॥ ७५ ॥ जळीं संभवलें पद्मपत्र । परि त्या जळासि लिंपेना पवित्र । तैसें देह ज्ञानीयाचें विचित्र । माया-जळासि नातळे ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।
लिप्यते न स पापेभ्य: पद्मपत्रमिवांभसा ॥१॥ ( गी $\frac{५}{१०}$ )

आहो ज्ञानीयाचे शरीरीं । कर्मे निपजती कवणे परी । कर्त्ता कारणें-वीण संसारीं । वर्तती कैसे ते ॥ ७७ ॥ कर्म तें त्रिविध जाण । काया इंद्रियें मनें करून । होतसे कर्म अनुदिन । भिन्नपणें त्रिविधा ॥ ७८ ॥ बुध्दीसि नव्हे अवगत । संकल्पासि न येतां होत । तें शारीरकर्म सुनिश्चित । वोळखोनि घ्यावें ॥ ७९ ॥ विशेष जाणीव न घेतां आंगीं । चेष्टा वसे बाळकाळागीं । हें कर्म परि तया लागीं । साक्षेपें असेना ॥ ८० ॥ जेविं सुषुप्तीसी शरीर । अवेवयंत्रे दिसे विकार । तेविं चळवळसंस्कार । जाणिजे शारीरकर्म ॥ ८१ ॥ मन देहाची चाड न धरी । मनोरथसृष्टीच्या भरोवरी । करी तें चि मनो-जन्य निर्धारीं । कर्म वासनात्मक ॥ ८२ ॥ मनें चि सृष्टि मनें चि संव्हार । मुळीहूनि हा मनाचा संसार । स्फुरे स्फूर्ति महाकार । त्या-माजि विश्व हें ॥ ८३ ॥ आतां इंद्रियाचें कर्म । स्मरणें वीण अनुक्रम । कर्म होतसे निधर्म । काजेविण ॥ ८४ ॥ जैसा तो मद्यपी उन्मत । नाना छंद करी अवस्थेंत । युक्तायुक्त कांहीं च तेथ । न सुचे अव-स्थेनें ॥ ८५ ॥ का तें पिशाच्य विचरे । तारतम्य त्यासी न संचरे । तेविं योगीयासी व्यव्हारें । आभासे प्रवृत्ती ॥ ८६ ॥ काजेविण निप-जलें । तें इंद्रियकर्म बोलिलें । बुध्दीस ज्याजें संभवलें । कर्म केविं योगिया ॥ ८७ ॥ अहंकाराची शंका नसे । समारंभें कर्म होतसे ।

१ हेतुपुरःसर यत्न. २ कार्य, प्रयोजन, हेतु नसतां.

तया कर्मापासूनि कैसे । सुटिजे तिहीं ॥ ८८ ॥ तरी निःसंग मुळी-हूनि । आलेचि नाहीं कर्मबंधनीं । डौरवे गगन त्या जीवनीं । परि तेणें तें भिजेना ॥ ८९ ॥ तैसे योगी कर्मांचि निष्कर्म । जीहीं वोळखिलें निःसंगवर्म । ते निजांगेंचि परब्रह्म । न लिंपती कर्ममेळीं ॥ ९० ॥

॥ श्लोक ॥ कायेन मनसा बुध्या केवलैरिन्द्रियैरपि ।
योगिनः कर्मकुर्वंति संगं त्यक्त्वात्मशुद्धये ॥ १ ॥

निजास्तिक्याचे निर्मळ । तयांसी न लगेचि मायामळ । गगनाचे । स्वछतेसी कज्जळ । लावितांही लागेना ॥ ९१ ॥ परि ते परिशुद्धीनें अभ्यंतर । गगनगर्भीं निरंतर । स्वरूपयोगें योगेश्वर । सहज निर्विकारी ॥ ९२ ॥ तें चि पुढें निरूपण । कर्माकर्मस्थितिलक्षण । देऊनि मुळानुसंधान । अवधरीजे श्रोतीं ॥ ९३ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । कर्मसन्यासयोगनिवळा । म्हणे मेरुअनंत । दशमरुद्रे । प्रथमउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थअभ्यंतर । बोधक्रमस्वरूप निर्धार । जेणें तरिजे हा भव दुस्तर । अज्ञानसिंधु ॥१॥ कर्मी च कर्मफलत्याग । दुष्कर्मत्यागें वितराग । अधिकारयोगें निजयोग । पाविजे सहजे ॥ २ ॥ अज्ञानमूळ असतां जिवीं । बळेंचि कर्मासि प्रवर्त्तवी । कर्म निर्मूळ तो करवी । बोध सद्गुरूचा ॥ ३ ॥ कर्मचि कर्मातें मुक्त करी । रिण घेतलें देऊनि वारी । जन्मजन्मांतरें निवारी । सद्गुरुकृपा ॥ ४ ॥ युक्त कर्माचें आचरण । चित्तशुध्दीसि तें कारण । परम उपशांतीचें निर्वाण । पावे निजपदासि ॥५॥ परम उपशांती नाहीं जया । कर्मफलाशा लागलीचि तया । वासनाप्रवाह दुस्तर माया । जन्मांतरासि कारण ॥ ६ ॥ दुराशा सकाममता । कर्मप्रवृत्तीनें सलोभता । नाना मरणजन्मव्यवस्था । बंधन होय तेणें ॥ ७ ॥ या कारणें युक्त कर्मे करावीं । शांतीनें भोगिजे पूर्णपदवी । अयुक्त कर्म संसार गोवी । फलाशा बंधन ॥ ८ ॥

स्वप्नदुःख तें ॥ ७३ ॥ आत्मज्ञानी हाचि गाथा । पावती स्वप्नांतर व्यथा । त्यासी निद्रा ना जागृती तत्वता । नसे संसारस्वप्न ॥ ७४ ॥ अलिप्तअधिष्ठानीं कर्माकर्म । जो अधिष्ठानचि निष्कर्म । त्यासी कांहीं च नसे भ्रम । निभ्रम तो वस्तुता ॥ ७५ ॥ जळीं संभवलें पद्मपत्र । परि त्या जळासि लिंपेना पवित्र । तैसें देह ज्ञानीयाचें विचित्र । मायाजळासि नातळे ॥ ७६ ॥

*॥ श्लोक ॥ ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।*
*लिप्यते न स पापेभ्यः पद्मपत्रमिवांभसा ॥१॥* ( गी ५/१० )

आहो ज्ञानीयाचे शरीरीं । कर्मे निपजती कवणे परी । कर्त्ता कारणेंवीण संसारीं । वर्तती कैसे ते ॥ ७७ ॥ कर्म तें त्रिविध जाण । काया इंद्रियें मनें करून । होतसे कर्म अनुदिन । भिन्नपणें त्रिविधा ॥ ७८ ॥ बुध्दीसि नव्हे अवगत । संकल्पासि न येतां होत । तें शारीरकर्म सुनिश्चित । वोळखोनि घ्यावें ॥ ७९ ॥ विशेष जाणीव न घेतां आंगीं । चेष्टा वसे बाळकालागीं । हें कर्म परि तयां लागीं । साक्षेपं असेना ॥ ८० ॥ जेविं सुषुप्तीसी शरीर । अवेवयंत्रे दिसे *विकार । तेविं चळवळसंस्कार । जाणिजे शारीरकर्म ॥ ८१ ॥* मन देहाची चाड न धरी । मनोरथसृष्टीच्या भरोवरी । करी तें चि मनोजन्य निर्धारीं । कर्म वासनात्मक ॥ ८२ ॥ मनें चि सृष्टि मनें चि संव्हार । मुळीहूनि हा मनाचा संसार । स्फुरे स्फूर्ति ब्रह्माकार । त्यामाजि विश्व हें ॥ ८३ ॥ आतां इंद्रियाचें कर्म । स्मरणें वीण अनुक्रम । कर्म होतसे निर्धर्म । काजेविण ॥ ८४ ॥ जैसा तो मद्यपी उन्मत । नाना छंद करी अवस्थेंत । युक्तायुक्त कांहीं च तेथ । न सुचे अवस्थेनें ॥ ८५ ॥ कां तें पिशाच्य विचरे । तारतम्य त्यासी न संचरे । तेवि योगीयासी व्यव्हारें । आभासे प्रवृत्ती ॥ ८६ ॥ काजेविण निपजे । तें इंद्रियकर्म बोलिजे । बुध्दीस ज्याजें संभवलें । कर्म केविं योगिया ॥ ८७ ॥ अहंकाराची शंका नसे । समारंभे कर्म होतसे ।

१ हेतुपुरःसर मल. २ कार्य, प्रयोजन, हेतु नसतां.

तया कर्मापासूनि कैसे । सुटिजे तिहीं ॥ ८८ ॥ तरी निःसंग मुळी-हूनि । आलेचि नाहीं कर्मबंधनीं । डौरवे गगन त्या जीवनीं । परि तेणें तें भिजेना ॥ ८९ ॥ तैसे योगी कर्माचे निष्कर्म । जीहीं वोळखिलें निःसंगवर्म । ते निजांगेंचि परब्रह्म । न लिपती कर्ममेळीं ॥ ९० ॥

॥ श्लोक ॥ कायेन मनसा बुध्या केवलैरिन्द्रियैरपि ।
योगिनः कर्मकुर्वंति संगं त्यक्त्वात्मशुद्धये ॥ १ ॥

निजास्तिक्याचे निर्मळ । तयांसी न ळगेचि मायामळ । गगनाचे । स्वछतेसी कज्जल । लावितांही लागेना ॥ ९१ ॥ परि ते परिशुध्दीनें अभ्यंतर । गगनगर्भी निरंतर । स्वरूपयोगें योगेश्वर । सहज निर्विकारी ॥ ९२ ॥ तें चि पुढें निरूपण । कर्माकर्मस्थितिलक्षण । देऊनि मुळानुसंधान । अवधरीजे श्रोतीं ॥ ९३ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । कर्मसन्यासयोगनिवळा । म्हणे मेरुअनंत । दशमरुद्रे । प्रथमउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थअभ्यंतर । बोधक्रमस्वरूप निर्धार । जेणें तरिजे हा भव दुस्तर । अज्ञानसिंधु ॥१॥ कर्मी च कर्मफलत्याग । दुष्कर्मत्यागें वितराग । अधिकारयोगें निजयोग । पाविजे सहजे ॥ २ ॥ अज्ञानमूळ असतां जिवीं । बळेंचि कर्मासि प्रवर्त्तवी । कर्म निर्मूळ तो करवी । बोध सद्गुरूचा ॥ ३ ॥ कर्मेचि कर्मातें मुक्त करी । रिण घेतलें देऊनि वारी । जन्मजन्मांतरें निवारी । सद्गुरुकृपा ॥ ४ ॥ युक्त कर्माचें आचरण । चित्तशुध्दीसि तें कारण । परम उपशांतीचें निर्वाण । पावे निजपदासि ॥५॥ परम उपशांती नाहीं जया । कर्मफळाशा लागलीचि तया । वासनाप्रवाह दुस्तर माया । जन्मांतरासि कारण ॥ ६ ॥ दुराशा सकाममता । कर्मप्रवृत्तीनें सलोभता । नाना मरणजन्मव्यवस्था । बंधन होय तेणें ॥ ७ ॥ या कारणें युक्त कर्मे करावीं । शांतीनें भोगिजे पूर्णपदवी । अयुक्त कर्म संसार गोवी । फळाशा बंधन ॥ ८ ॥

स्वप्नदुःख तें ॥ ७३ ॥ आत्मज्ञानी हाचि गाथा । पावती स्वप्नांतर व्यथा । त्यासी निद्रा ना जागृती तत्त्वता । नसे संसारस्वप्न ॥ ७४ ॥ अलिप्तअधिष्ठानीं कर्माकर्म । जो अधिष्ठानचि निष्कर्म । त्यासी कांहीं च नसे भ्रम । निभ्रम तो वस्तुता ॥ ७५ ॥ जळीं संभवलें पद्मपत्र । परि त्या जळासि लिंपेना पवित्र । तैसें देह ज्ञानीयाचें विचित्र । माया-जळासि नातळे ॥ ७६ ॥

*॥ श्लोक ॥ ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।*

*लिप्यते न स पापेभ्यः पद्मपत्रमिवांभसा ॥१॥* ( गी $\frac{५}{१०}$ )

आहो ज्ञानीयाचे शरीरीं । कर्मे निपजती कवणे परी । कर्त्ता कारणें-वीण संसारीं । वर्तती कैसे ते ॥ ७७ ॥ कर्म तें त्रिविध जाण । काया इंद्रियें मनें करून । होतसे कर्म अनुदिन । भिन्नपणें त्रिविधा ॥ ७८ ॥ बुध्धीसि नव्हे अवगत । संकल्पासि न येतां होत । तें शारीरकर्म सुनिश्चित । वोळखोनि घ्यावें ॥ ७९ ॥ विशेष जाणीव न घेतां आंगीं । चेष्टा वसे बाळकालागीं । हें कर्म परि तया लागीं । साक्षेपें असेना ॥ ८० ॥ जेविं सुषुप्तीसी शरीर । भवेवयंत्रे दिसे विकार । तेविं चळवळसंस्कार । जाणिजे शारीरकर्म ॥ ८१ ॥ मन देहाची चाड न धरी । मनोरथसृष्टीच्या भरोवरी । करी तें चि मनो-जन्य निर्धारीं । कर्म वासनात्मक ॥ ८२ ॥ मनें चि सृष्टि मनें चि संव्हार । मुळीहूनि हा मनाचा संसार । स्फुरे स्फूर्ति महाकार । त्या-माजि विश्व हें ॥ ८३ ॥ आतां इंद्रियाचें कर्म । स्मरणें वीण अनुक्रम । कर्म होतसे निधर्म । काजेविण ॥ ८४ ॥ जैसा तो मद्यपी उन्मत । नाना छंद करी अवस्थेंत । युक्तायुक्त कांहीं च तेथ । न सुचे अव-स्थेनें ॥ ८५ ॥ कां तें पिश्याच्य विचरे । तारतम्य त्यासी न संचरे । तेविं योगीयासी व्यव्हारें । आभासे प्रवृत्ती ॥ ८६ ॥ काजेविण निप-जलें । तें इंद्रियकर्म बोलिलें । बुध्धीस ज्याजें संभवलें । कर्म केविं योगिया ॥ ८७ ॥ अहंकाराची शंका नसे । समारंभें कर्म होतसे ।

१ हेतुपुरःसर यत्न. २ कार्य, प्रयोजन, हेतु नसतां.

तया कर्मापासूनि कैसे । सुटिजे तिहीं ॥ ८८ ॥ तरी निःसंग मुळी-
हूनि । आलेंचि नाहीं कर्मबंधनीं । डौरवे गगन त्या जीवनीं । परि तेणें
तें भिजेना ॥ ८९ ॥ तैसे योगी कर्मांचे निष्कर्म । जीहीं वोळखिलें
निःसंगवर्म । ते निजांगेंचि परब्रह्म । न लिंपती कर्ममेळीं ॥ ९० ॥

॥ श्लोक ॥ कायेन मनसा बुध्या केवलैरिन्द्रियैरपि ।
योगिनः कर्मकुर्वंति संगं त्यक्त्वात्मशुद्धये ॥ १ ॥

निजास्तिक्याचे निर्मेळ । तयांसी न लगेचि मायामळ । गगनाचे ।
स्वछतेसी कज्जळ । लावितांही लागेना ॥ ९१ ॥ परि ते परिशुध्दीनें
अभ्यंतर । गगनगर्भीं निरंतर । स्वरूपयोगें योगेश्वर । सहज निर्वि-
कारी ॥ ९२ ॥ तें चि पुढें निरूपण । कर्माकर्मस्थितिलक्षण । देऊनि
मुळानुसंधान । अवधरीजे श्रोतीं ॥ ९३ ॥ इति श्रीरामसोहळा ।
सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । कर्मसन्यासयोगनिवळा । म्हणे मेरुअनंत । दश-
मशद्दे । प्रथमउल्लासः सपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थअभ्यंतर । बोधक्रमस्वरूप नि-
र्धार । जेणें तरिजे हा भव दुस्तर । अज्ञानसिंधु ॥१॥ कर्मीं च कर्मफल-
त्याग । दुष्कर्मत्यागें वितराग । अधिकारयोगें निजयोग । पाविजे सहजे
॥ २ ॥ अज्ञानमूळ असता जिवीं । वळेंचि कर्मांसि प्रवर्त्तवी । कर्म
निर्मूळ तो करवी । बोध सद्गुरूचा ॥ ३ ॥ कर्मचि कर्मातें मुक्त करी ।
रिण घेतलें देऊनि वारी । जन्मजन्मांतरें निवारी । सद्गुरुकृपा ॥ ४ ॥
युक्त कर्माचें आचरण । चित्तशुध्दीसि तें कारण । परम उपशांतीचें
निर्वाण । पावे निजपदासि ॥५॥ परम उपशांती नाहीं जया । कर्मफ-
ळाशा लागलीचि तया । वासनाप्रवाह दुस्तर माया । जन्मांतरासि
कारण ॥ ६ ॥ दुराशा सकाममता । कर्मप्रवृत्तीनें सलोमता । नाना
मरणजन्मव्यवस्था । बंधन होय तेणें ॥ ७ ॥ या कारणें युक्त कर्म
करावीं । शांतीनें भोगिजे पूर्णपदवी । अयुक्त कर्म संसार गोवी ।
फळाशा बंधन ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीं ।
अयुक्तः कर्मकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १ ॥ गी(५/१२)

सर्व कर्माचें मूळ तुटे । आणि सुखेंचि सत्स्वरूप भेटे । मनापासूनि त्याग प्रगटे । निजप्रतीतीनें ॥ ९ ॥ न देखे कार्य कर्तृत्व ना कर्म । जो अद्वैत अनुभवी निष्कर्म । जयासी आकळलें निजवर्म । नित्यमुक्ततेचें ॥ १० ॥ तो दयेनें जयाकडे पाहे । त्याचें कर्मबंधन मुक्त होय । जयाच्या ईक्षणीं सदोदय । प्रगटे ज्ञानरविमंडळ ॥ ११ ॥ जयाच्या कटाक्षीं स्वानुभव स्वयें । परमामृताची वृष्टि होय । तो विदेहकैवल्य निश्चय । सच्चिदानंदतनु ॥ १२ ॥ जो स्वानंदांचा अमृतकंद । जो ज्ञप्तिरूप निजानंद । जो स्वरुपानुभव निर्द्वंद्व । महायोगी ॥ १३ ॥ तो शरीरें अवतरला दिसे । परि त्यासी तो संस्कारचि नसे । अभ्रें आवरिलें व्योम जैसें । आतुडे ना तयासीं ॥ १४ ॥ पापपुण्याचे संस्कार । नातळे चि निजांगें निर्विकार । तो कारण ना कार्यविकार । गुणक्षोभ असोचि ना ॥ १५ ॥ तो कोण्हाचा नसेचि कांहीं । पाहतां तयाचें कोण्हीच नाहीं । शुद्ध बुद्ध निजहृदयीं । निष्कारण वस्तु ॥ १६ ॥ निर्मळ निश्चळ निरंजन । निर्मन निर्दोष निर्गुण । व्योम गाळींव सनातन । अधिष्ठान स्वयें ॥ १७ ॥ तो अविनाशस्वरूपी केवळ । त्यासि कल्पांतीं क्षय नसे निश्चळ । आकाशासी नये चळवळ । वायूच्या योगें ॥ १८ ॥ निश्चळपणें सर्वांठायीं । प्रवाहीं न पडे चि कोणत्याही । तैसें आस्तिक्य निजहृदयीं । चळेना ढळेना ॥ १९ ॥ तो येक जग येक ऐसें । मुळींहूनि स्फुरण नसे । तेथें स्वजातीविजातीचें पिसें । असेचि ना तया ॥ २० ॥ स्वरूपयोगें योगेश्वर । सहज वस्तु निरंतर । त्यागात्यागयोगसंस्कार । कांहीं च नसे ॥ २१ ॥ ऐसा हा अभिन्न निजयोग । भवविरक्तीचा वीतराग । प्रतीतज्ञानें निस्तरंग । स्वानंद जेहीं सेविला ॥ २२ ॥ तेहीं च प्रवृत्तिचि देखिली निवृत्ति । विकारचि निर्विकारस्थिती । पदार्थाचें अभ्यंतर प्रतीति । पाहतां सनातन ॥२३॥ जे साम्यसेजेसि निजेले । संकल्पउदयास्तासि नाहीं आले ।

ज्यांच्या अंतरस्थितीनें जाले । मननें योग पावन ॥ २४ ॥ विद्याविनयसंपन्न । द्विजश्वपचशुनि अज्ञान । गो गजेंद्र समसमान । देखोनि हृदयें तयाची ॥ २५ ॥ गुणक्षोभ देहविकार । प्रकृतिसंबंधें विश्वाकार । जगाचें अभ्यंतर साचार । स्वरूपचि देखती ते ॥ २६ ॥ चांडाळादि श्वपचस्थितीं । ते प्रकृतीसी नाताळती । जेवि सर्वांघटीं व्योमव्याप्ति । घटाकृतीसी नातळे ॥ २७ ॥ ऐसे समन्वित समदर्शन । प्राणिमात्रांचे हृदय होऊन । असती ते सनातन । सहजस्थिती ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।
शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥१॥ (गी ५/१८)

ब्रह्मस्थितीनें अगोचर । ते परब्रह्म चि साचार । ब्रह्मप्रतीतीनें योगेश्वर । ब्रह्मानुभवी ते ॥ २९ ॥ ज्यांची ब्रह्मदशा अढळ । जे विश्रांतिचे अचळे[1] । जे आदिपुरुषाचे केवळ । आत्मयोगठेवे ॥ ३० ॥ याचि देहीं देहसंस्कार । जितिला जन्ममृत्यूचा व्यवहार । ब्रह्मस्थितिसाम्य अभ्यंतर । मन निर्मन योगें ॥ ३१ ॥ निर्दोष समब्रह्म नित्यवस्ती । ज्याची अखंडीं विश्रांति । चळेना ढळेना कल्पांतीं । ऐसे ते महापुरुष ॥ ३२ ॥ मृगजळें मेरु न लोटे । अंधकारें सूर्य न दाटे । स्वरूपानंद न निवटे । वृत्तिसंस्कारें ॥ ३३ ॥ स्वरूपसुधामानसमराळ[2] । सेविती स्वानंदमुक्तें[3] केवळ । जेहीं सोहंस्वपक्षी अंतराळ । घेऊनि उचावले ॥ ३४ ॥ जयांसि समविषम कांहीं नसे । निरावभास गगनाचि ऐसे । विषयाविषय कांहीं च नुमसे । ऐसें स्वरूप निःसग ॥ ३५ ॥ निजबोधामृतपानें धाले । नित्यउपशांतीनें निवाले । अद्वयानंदसुखें जाले । निर्हेतु सहजें ॥ ३६ ॥ ते सभाग्य स्वरूपविमर्वे । वस्तुसायुज्यस्वभावें । स्वसुखउदधि स्वानुभावें । दुमदुमीत भरले ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ इहैव तैर्जितःसर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।
निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥(गी ५/१९)

---

१ पर्वत. २ आत्मस्वरूपरूपी मानस सरोवरांतील हंस. ३ मुक्ताफळें म्ह० मोतीं.

जिहीं स्वानंदसिंधूचा तळ। घेतला येकसरे निवळ। तयांसि प्रवृत्ति-धरेचा गोंधळ। न पडेचि श्रवणीं ॥ ३८ ॥ जें अभ्यंतरीं सुख नि-वांत। त्यासि बाह्यवृत्तीचा नसे हेतु। अपेक्षारहित संशांत। व्योमगर्भ निश्चळ ॥ ३९ ॥ उन्मनीच्या वोवरींत रिघाले। स्वरूपामृतासिंधूंत विराले। निर्विकल्पसमाधींचे जाले। वल्लभ स्वभावता ॥ ४० ॥ सर्वसं-कल्परहित तत्वता। वस्तुरूप संत असतां। असंतपणाची वार्ता। असेचि ना तया ॥ ४१ ॥ अनिच्छ ते स्वभावस्थिति। निष्कामता आस्तिक्यमति। मानापमानक्षोभ चित्तीं। असेचि ना जया ॥ ४२ ॥ ऐसे महासिध्द संत स्वयें। जयाचे सनातन हृदय। अखंडीत परब्रह्म स्वयें। प्रवृत्ति कैंची तयां ॥ ४३ ॥ नसतां हे ब्रह्मप्रतीती। शब्दज्ञानें रूढली मति। असंतचि ते म्हणविती। संत आपणातें ॥ ४४ ॥ संतस्थितीचें निजजिंन्हार। न कळोनिया ते साचार। संतपणेंचि तो संस्कार। अज्ञानें रूढविला ॥४५॥ कामानळें आहाळले चि ते। जे क्रोध-व्याघ्रामुखीं जाले प्राप्त। जे शोकार्णवीं समस्त। बुडोनि गेले ॥ ४६ ॥ जया नित्य मोहाचें मार्जिरें। भुलीनें रात्रिदिवस निदसुरे। निद्रा जागृतिसी भयंकरें। स्वप्नींच्या भयें गिळिलें ॥ ४७ ॥ जे भूतमसणवटीचे वेताळ। जे संकल्पसिध्दीचे भैराळे[1]। जे कामकल्पनेचे र्‍याळ[2]। विषय-विषें उह्माळती ॥ ४८ ॥ जे भवाभ्रछायेसि विसांवले। जे स्वप्नींचिया पाहुणोरा[4] भ्रमले। जे विषयमृगोदकात तृपेले। विकल्पवनीचे मृग ॥ ४९ ॥ जे अमृत ह्मणोनि विष सेविती। जे विषयानंदें माजती। जे मरणेंचि मोक्ष ह्मणती। तेवि मत्त मतवादी ॥ ५० ॥ सर्वे चोराचा सांघातें[5]। उपचारे चि करिती घात। तयाच्या सहवासेंचि होत। नाश स्वहितासि ॥ ५१ ॥ विषयसुखें विष मधुर। गोडीनें चि घेती जिव्हाँर[6]। मच्छ गळीं गुंतोनि साचार। मुकला जाय प्राणें ॥ ५२ ॥ मृग संचरती सुखें वनीं। तयाचें वैर नसेचि जनीं। परि पारधी तो

१ ओसरींत, आश्रयांत. २ (?) मैंदाळ, कपटी. ३ सर्प. ४ पाहुणचाराला. ५ संगतींत. ६ जीव.

प्राण घेऊनि । जाय निष्कारण वैर हें ॥ ५३ ॥ तेविं सात्विकासि दुर्जनयोगें । दुःखदायक अगाधप्रसंगें । या कारणे विचारसन्मार्गे । सज्जनसहवास किजे ॥ ५४ ॥ मनुष्यदेहीं विवेक थोर । तेणेंचि तरीजे भवसागर । ज्ञानेंवीण भवसंस्कार । सहसा निवर्तेना ॥ ५५ ॥ हटयोगी महाधीट । अनुष्ठानासिद्धि पारिपाट । तेणें सामर्थ्योंचि वळकट । अहंकृतीसीं येती ॥ ५६ ॥ शाप उपशापाचीं प्रसिध्दी । अंतरीं सलोभ भजनविधी । क्रोधस्छितींची प्रसिध्दि । दाविती विरक्तीनें ॥ ५७ ॥ मायेचे भैंदावें[1] मोठें । परमार्थरूढीनें आंगी झगटे । हा ममतेचा क्षोभ प्रगटे । ज्ञानें प्रशंसेन ॥ ५८ ॥ घरोघरीं जालिया ज्ञान । विश्वचि होयील ब्रह्मार्पण । मग प्रपंचासि कारण । उरेल कैचें ॥ ५९ ॥ अज्ञानें कवणासि बाधावें । पातकीं कवणासि अक्रमावें । विषयें कवणासि भूलवावें । विश्वचि मुक्त जालियां ॥ ६० ॥ या कारणें अनादिसंस्कार । मायेचें भैदावें महाथोर । येथूनि जाईल तो निधडा वीर । निर्विपयपुरुषार्थें ॥ ६१ ॥ या कारणें जिवापासूनि । न जावें विपयाचे वाहणी । अवचट हि विसरोनि । मार्गेचि त्या नव जावें ॥ ६२ ॥ स्वतत्र होऊनि सर्वदा । भोगावी आत्मानुभवसंपदा । विपयदुर्भेवींच्या आपदा । इच्छूं नयेती पुढती ॥ ६३ ॥ विपयस्वप्नीचें मृगोदक । इच्छील तो पढतमूर्ख येक । निजहृदयींचें निश्चयात्मक । न करीं अमृतपान ॥ ६४ ॥ नाहीं तो विषय अपेक्षी । यास्तव काळ तयाला सिक्षी[2] । असोनि अवस्छेचा साक्षी । आतुडे अवस्छेंत भ्रमें ॥ ६५ ॥ जो आपुलें स्वहित न करी । तो इतराचें हित काय करी । या कारणें सर्वापरीं । चतुरें स्वहित करावें ॥ ६६ ॥ आपुला काम होऊनि आपण । भोगावी आत्मता नवीन । त्यजूनि देहबुधि हे जीर्ण । व्हावें नित्य आत्मरत ॥ ६७ ॥ विश्रांति कैवल्ययुवती । ते अपरोक्ष सुखें पुरती । परात्पर निजे येकांतीं । अनुभविजे सर्वदा ॥ ६८ ॥ संसर्ग घालूनि बाहेरी । उन्मन सुमनसे-

१ कपट. २ शिक्षा, दंड करतो.

उपाय योजिला । बारडीचा अग्रभाग अपेक्षिला । असुरीं तोचि अग्रहें घेतला । महाहटयोगबळें ॥ १२ ॥ बुधीचा पश्चातु भाग उपरी । ब्रह्मपुछ धरिलें अमरीं । अवधान मंदर क्षीरसागरीं । फिरतसे चिद्रविरूप ॥ १३ ॥ भावबृहस्पतीचे हस्तक । वोढिती बुधिसर्पासि सविवेकें । अभावशुक्रांकित अनेक । वोढिती देहबुधिबळें ॥ १४ ॥ विखार वोढीनें खवळला । थमितसे निर्वाणविषज्वाळा । विखप्रळयानळ आहळला । राक्षसवृंद तो ॥ १५ ॥ विखारमुखींहूनि निघे गरळ । तोचि विक्षेपस्थितीचा अनळ । भूतक्षयें भूमंडल । ज्वाळा कवळिलें ॥ १६ ॥ अग्रपूजेसीं दुष्टांचि बळी । देऊनि आनंदले सुरवरमेळीं । गुसळितां प्रकाशकल्लोळीं । सिंधुगर्भीहूनि उकळ्या येती ॥ १७ ॥ निजानंदक्षीरसागर । जेथें लक्ष्मीकांत अगोचर । योगऐश्वर्यरत्नाकर । फावला आराधिती ॥ १८ ॥ अपरोक्ष चतुर्दशरत्नें । प्रगटतील साधकतायत्नें । परि निर्वाणकाळकूटें क्षोभकतेनें । उठेल प्रळयरूप ॥१९॥ तयासी प्रीतीनें अंगिकारी । तोचि योगेश्वर निर्विकारी । त्रिगुण त्रिपुरहर भवारी । सेविलें निर्वाणविष तें ॥ २० ॥ मथितां क्षीराब्धि अभिनवें । प्रमादमदिरा संभवे । ते चि अमृत म्हणोनि स्वभावें । सेविती ते असुर ॥ २१ ॥ उन्मादताटस्थता भरे । मुक्तक्रिया कामसंस्कारें । भ्रांतिसुरापानअवसरें । भाविती स्वानंद तो ॥ २२ ॥ हे तामसाची मोहअवस्था । राजसीं रतिसुखव्यवस्था । अतएव सात्वांचूनि तत्वता । परमामृत न लभे ॥ २३ ॥ विशुधसत्वें ज्ञानामृत । सेविती अमरवृंद विख्यात । अखंड योलावा सर्वांतीत । मननयुक्त असती ॥ २४ ॥ नित्यानंद परमामृत । विष्णुआधीन असे सदोदित । तें कृपावसरें सप्रतीत । आवचट आतुडे ॥ २५ ॥ सुरासुरयुक्तीनें मथित । क्षीरसिंधु रत्नें प्रसवत । ते अधिकारवशें फळूनि होत । प्राप्ति अवसरें तयां ॥ २६ ॥ भावक्षीराब्धीची गरिमा । प्रगटली अपरोक्ष रमा । स्वरूप-

१ मंथनदंडाच्या म्हणजे माथ्याच्या दोरीचा. २सर्प.३ बुद्धीच्या व्यग्रपणाचा. ४ जीवन कलेंत. ५ माहात्म्य, सर्वस्व.

विष्णुहृदयीं महिमा । वसों ये निर्भव ॥ २७ ॥ विज्ञानकौस्तुभप्रभा निर्मळ । बोधरूप परम सोज्वळ । विष्णुवक्षस्थळीं चित्कल्लोळ । शोभवी भूषणें ॥ २८ ॥ अनुहतध्वनीचे विढार । प्रणवरूप निजजिव्हार । पांचजन्यस्वरउच्चार । कराग्रीं वसों ये ॥ २९ ॥ अखंड स्वरान्वित घुमतसे । वेदसंभव होतसे । कांडत्रय प्रसवतसे । तत्वत्रिपदव्याख्या ॥ ३० ॥ महा असुरांतें संव्हारी । ज्ञानशक्तिशार्ङ्ग निर्धारी । वसोनि विष्णुकराग्रीं करी । दुष्टांचा संव्हार ॥ ३१ ॥ हें च्यारी रत्नें निरुपम । विष्णूसि प्राप्त जाली परम । त्यावरी मथितां तो निस्सीम । बोधसुरें-तरु प्रगटला ॥ ३२ ॥ तो पारिजाततरु अकळ । वसे इंद्रसदनीं सर्व-काळ । तैसाचि स्वानंदभद्रजाति केवळ । प्राप्त जाला पाकशासनासी ॥ ३३ ॥ तो ऐरावत इंद्राचे सदनीं । प्रगटला क्षीरसिंधुमथनीं । ज्यावरि सुरेंद्र आरूढोनि । भवजंभारी रूढला ॥ ३४ ॥ त्यावरि सिंधु जो मथितां । प्रगटली रंभा लावण्यलता । तियेसि इंद्र होय अनुसरतां । काममदें उन्मत्त ॥ ३५ ॥ प्राप्तिरत्नावसरप्रीति । देव आणि असुर सिंधूतें मथिती । निघालें अमृत तें सुरपति । विभागी जाला तयाचा ॥ ३६ ॥ इंद्राप्ति च्यारि रत्नें जालीं प्राप्त । अधिकतोषें सिंधुतें मथितें । प्रगटला धन्वंतरी विख्यात । भवरोगहर्ता ॥ ३७ ॥ तो स्वइच्छा विचरे सर्वत्र । पद्महस्ति तो परमपवित्र । परमामृतकर विचित्र । आरोग्यता दे सकळां ॥ ३८ ॥ पुनरपि मथितां तो क्षीरार्णव । प्रगटली सुरभि अभिनव । ते वशिष्ठें प्रतिपाळिली सदैव । सुकृताच्या योगें ॥ ३९ ॥ अलक्षगतीचा निजवेग । अश्वरत्न उच्चैश्रवा तुरंग । क्षीरसिंधूंत प्रगटला अव्यंग । बोधसूर्यरथीं वसे ॥ ४० ॥ पुन्हा मथितां तो क्षीराब्धि । प्रगटला अमृतकळानिधि । सकळांसि आल्हादकर प्रसिद्धि । आ-त्मानुभवचंद्र ॥ ४१ ॥ प्रबोधशंकरें शिरीं धरिला । चिदाकाशविहारी

१ सत्, त्वम्, असि या तीन पदांचें स्पष्टीकरण. २ कल्पवृक्ष. ३ ऐरावत. ४ इन्द्राला. ५ योग्य वेळीं आपल्या इष्ट रत्नाची प्राप्ति होईल या इच्छेनें. ६ (?). ७ कामधेनु. ८ चंद्र.

जाला । वरी वरी मथितां क्षीराब्धिला । विष उसळों लागलें ॥ ४२ ॥ सरतांचि स्वानुभवसुख । निर्वाणदशेचें उदेलें विख । तें कडकडूनि विश्वतोमुख । लोटलें तये वेळीं ॥ ४३ ॥ कल्पांत गमला तियेवेळीं । सुरासुरवृंद विखज्वाळीं । अमृताशा विषप्रळयानळीं । भस्म होऊं पाहाती ॥ ४४ ॥ महादुःखातिशयें अहळती । प्राण घेऊनियां पळती । आदिकरूनि लक्ष्मीपती । प्राणांत गमला तयां ॥ ४५ ॥ तेथें ध्यानस्थ तो शिवयोगेंद्र । अखंड समाधिस्थ सुखसमुद्र । विष प्राशन करूनि स्वतंत्र । महास्थितीनें राहे ॥ ४६ ॥ जेन्हां कडकडाटें विष उसळलें । तेन्हां ब्रह्मांड जाळिलेंसें गमलें । तें विश्वमरण शिवें दयाळें । प्राशिलें लीला ॥ ४७ ॥ उदरीं ब्रह्मांडकोटिकारण । बाह्य विश्वरूप अवतरणें । स्यास्तव कंठींच विश्वसंहारण । विष विश्वेशें ठेविलें ॥ ४८ ॥ तो आदिपुरुष विषें नीलकंठ । महासिद्धीचा सिद्ध उत्कट । विष प्राशितां इष्ट अनिष्ट । कांहीं पाहिलेंचि नाहीं ॥ ४९ ॥ ऐसा देहलोभ नाहीं ज्यासी । मोक्ष आतुडला तयासी । विरक्तीचें निजतेज मानसीं । प्रतीतीनें वसे ॥ ५० ॥ सकळ करूनि अकर्ता । जो मोक्षलक्ष्मीचा भर्ता । तोही विषभयें पुरुषार्था । न दाखवीचि कांहीं ॥ ५१ ॥ सुखावला लक्ष्मीसी अलिंगितां । स्याचि सुखें जरी विष सेविता । तरि तो कां निघोनि जाता । विषानळभयें ॥ ५२ ॥ शंख शार्ङ्ग कौस्तुभ । देखूनि वस्तुजात दुर्लभ । अभिलाषितां आला लोभ । कारण भयासि होय ॥ ५३ ॥ ऐसे अपक्वबुद्धीचे भाव । न कळे विष्णूचें अभिनव । जाणोनि कार्याकार्य सर्व । राहे साक्षत्वें निराळा ॥ ५४ ॥ अश्वाचा वेग वरी आरूढे त्यासि नसे । परि तुरंगगतीचें स्वामित्व असे । तेविं युक्तिजोंताविशेषें । बळाचें बळ महाविष्णु ॥ ५५ ॥ शस्त्राचा घाय खेटकें निवारी । तो घेऊं नयेचि कीं आंगावरी । तेविं अद्भुतयोगें परिहरी । महासंकट तितुकें ॥ ५६ ॥ ज्याचेनि मुक्तीची निजमुक्ती ।

---

१ दाही दिशांना. २ सर्व युक्त्या माहीत असल्यामुळें. ३ ढालीनें.

त्याचे प्राप्तीस्तव शिवादिकां विरक्ति। वर्णितां वेदादिकांच्या युक्ति। कुंठित जाल्या ॥५७॥ भस्मासुरापासूनि सोडविलें। कामांतकासि मोहन केलें। त्याचि मोहनी रूपें मोहिलें। असुरांसि त्या ॥५८॥ मदिरा आणि अमृत-कळसीं। बैसऊनि पंक्ति सुरांसुरांसी। करलाघव पात्रविशेषीं। वाढी अधिकारें ॥५९॥ सुरवरांवरी कृपा पूर्ण। त्यांसी वाढीतसे अमृत ईक्षण। असुरांसि मदिरा देऊन। उन्मत्त करीतसे ॥६०॥ सात्विक देवां बोधामृतपान। तामस करिती भ्रमसुराप्राशन। राहूनें हें जिवींचें विवंचून। सुरवर-पंक्तिसी बैसला ॥ ६१ ॥ असुर वोळखोनि अंतरवृत्ती। कर्णींच्या तार्टंकें छेदिलें त्याप्रति। तें कराळवदन रुंडस्थिति। राहु केतु जाले ॥ ६२ ॥ विश्वलाघवी महाविष्णु पूर्ण। सुरवरसंकटमोचन। करूनि असुरांसी दमन। विरक्तिसी आणी ॥ ६३ ॥ एवं हृदयसिंधुमथनीं। सुरासुरं लाभ घेऊनि। राहिले ते स्वस्थानीं। प्राप्ति अधिकारें ॥ ६४ ॥ श्रीगुरुकृपा हृदयसिंधूसी। प्राप्ति चिद्रत्नें मानवासी। न करितां साधन विशेषीं। अकल्पित लाभ ॥ ६५ ॥ न लगे मंदर आणि वासुगी। न लागे मथनयुक्ति प्रसंगीं। बुडी देऊनि निजांतरंगी। काढिलीं रत्नें अपरोक्ष ॥ ६६ ॥ हृदयचिद्रत्नाकरांत। दुर्लभ आत्मप्राप्ति वस्तुजात। दहरगर्भीं होऊनि निवांत। गुरुकृपा पाहावें ॥ ६७ ॥ सखोल स्वानंद-तळीं। बुडी देऊनि उन्मेषमुळीं। अवचट प्राप्ति करतळीं। अलभ्य लाभें कवळावें ॥ ६८ ॥ गुरुकृपेचें अंजन डोळां। होय भवजळगर्भीं उजाळा। स्वरूपधरारत्नउमाळा। अवचट लाहिजे ॥ ६९ ॥ येतां तळ घेऊनि[1] स्वयें। निवानचिद्रत्नगर्भ सूर्य। सोज्वळ चंद्र सुधामय। परिस आतुडती ॥ ७० ॥ विज्ञानघनानंदकीळ[3]। निजांग भरूनि झळाळ। तो व्योमगर्भ इंद्रनील। सर्वोत्तम साजिरा ॥ ७१ ॥ केवळ सुवर्णमय सन्मणि। विश्वसंभवकारणी। गोमेदवर्ण चिंतामणी। तो सत्यलोकीं वसे ॥ ७२ ॥ गाळींव सत्व स्फटिकवर्ण। स्वरूपप्रभेनें

---

१ खुपी जाणून. २ हृदयाच्या आंत. ३ तेज. ४ एकप्रकारचें रत्न.

निरावरण । तो कैलासनिवासी सनातन । स्वच्छ शिवरूप ॥ ७३ ॥ आत्मपुष्कर राजतेजें । चिदंबर प्रकाशित सहजें । तो सद्गुरु करामी उमजे । झळाळी पद्मराग तो ॥ ७४ ॥ गर्भी निजतेजडोहो हेलावे । जो साक्ष्यत्वारहित स्वभावें । तो चिद्रत्नाकर स्वानुभवें । वसे आत्मसन्मणींत ॥ ७५ ॥ मी आदिवस्तूचा जोहेरी । चिद्रत्नाकरभांडारी । आलों प्रीतिस्तव तुमच्या घरीं । तरि परिक्षूनि घ्या रत्नें ॥ ७६ ॥ दैवसृष्टींत तो भाग्यवंत । संग्रही चिद्रत्न वस्तुजात । गुरुकृपा चिद्रत्नाकर शांत । हृदयीं सांठवा ॥ ७७ ॥ हें हृदयींचें ठेवणें सनातन । लुटितां त्रिभुवनींचे जन । अधिकचि होय महिमान । प्रशंसितां ॥७८॥ ज्ञानार्कमणि आत्मा स्वयें । द्वादश प्रांप्ति कळा ज्योतिर्मय । सर्वदा विवंचूनि पाहे । जो हृदयांबरीं ॥ ७९ ॥ तपनी चित्सूर्याचि कळा[१] अनुतापें तापवी सकळां । तापिनी द्वितीय भवउमाळा । निढारी निजनयनी ॥ ८० ॥ धूम्रमय आकाशवर्ण । झांकोळिते पदार्थ गहन । ते तृतीयकळा धूम्रा निरावरण । करूनि दावी ॥ ८१ ॥ मरीचि ते चतुर्थकळा । जगत्कारण मृगजळा । ज्वलनी तेज उजाळा पंचमकळा जाणिजे ॥ ८२ ॥ ज्वाळाविंब मरूनि घन । अनुभव देतसे संपूर्ण । ते रुचि षष्ठ कळा गहन । महासित्यींची ॥ ८३ ॥ सुषुम्ना अंतर्वेध निवळी । सप्तम कळाचि सूर्यमंडळीं । भोगदा अष्टम कळा मंडळी । स्वसुखदायक ॥ ८४ ॥ नवम कळा जगविख्यात । विश्व अंतर्भावें प्रगटित । बोधिनी दशम कळा बोधित । पदार्थस्वरूपार्थ ॥ ८५ ॥ येकादश कळा धारिणी । जे स्वप्रकाशाची धरणी । द्वादश कळा क्षमा विश्वोद्धरणी । निजतेजआस्तिक्यें ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ तपनी तापिनी धूम्रा मरीचि र्ज्वलिनी रुचिः ।
सुषुम्ना भोगदा विश्वा बोधिनी धारिणी क्षमा ॥ १ ॥

आत्मरत्न षोडशकळा । स्वरूपप्राप्तीचा षोडश जिव्हाळा । प्राप्ति

१ एक प्रकारचें रत्न. २ जवाहिऱ्या. ३ पुढें ८० व्या ओंवीपासून या बारा कळांचीं तपनी, तापनी, धूम्रा इत्यादि नांवें दिलीं आहेत.

सत्रावी जीवनकळा। आत्मचंद्रमंडळीं ॥ ८७ ॥ प्रथम अमृत चंद्र-कळा। जीवौपधी करी सफळा। द्वितीय मानदा स्वलीळा। अनुभव प्रमाणा ये ॥ ८८ ॥ पूषा ते तृतीय कळा चंद्रीं। पुरुषत्व दे सुख-सांद्रीं। तुष्टि चतुर्थ कळा हृत्समुद्रीं। भरण भरी तोषाचें ॥ ८९ ॥ पुष्टि ते पंचम कळा पूर्ण। पुष्टितें पाववि सुखैकघन। रति षष्ठकळा अनुदिन। स्वरूपीं रमवी ॥ ९० ॥ धृति सप्तम कळा परम। स्वरूप-धारणा निरूपम। शशिनी सोमकळा अष्टम। स्वरूपीं विश्वरूपें ॥ ९१ ॥ नवम कळा ते चंद्रिका। तोषलि स्वरूपरतकामका। दशम कळा कांति बोधात्मका। आत्मचंद्रीं वसे ॥ ९२ ॥ ज्योत्स्ना ते येकादश कळा। दावी स्वानंदघन डोळां। विज्ञानश्री अवलीळा। कळा कैवल्य द्वादशा ॥ ९३ ॥ प्रीति त्रयोदश कळा स्वयंभ। चतु-र्दश अंगदा सुप्रभ। पंचदश कळा अक्षोभ। पूर्णा बोलिजे ॥ ९४ ॥ जियेचेनि स्वरूपप्राप्ति पूर्ण। ज्ञानकळेची कळा वर्धन। षोडश कळा असाधारण। स्वरजा मुळींची ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ अमृता मानदा पूषा तुष्टिः पुष्टी रतिर्धृतिः।
शशिनी चंद्रिका कांति ज्योत्स्ना श्रीः प्रीतिरंगदा ॥ १ ॥
पूर्णा पूर्णामृता कामदायिनी स्वरजाकळा।
सोममंडलमध्यस्था रक्षां कुर्वन्तु मे सदा ॥ २ ॥

हे चित्सूर्यचंद्र रत्ननिधि। निरुपम हृदयविशुद्धि। प्राप्ति अवचट नि-रवधि। सद्गुरुकृपा ॥ ९६ ॥ मन उन्मनामृतसिद्धि। मथिला निज-तेज उदधि। सोमपानें ब्रह्मसमाधि। आतुडे अमरत्व ॥ ९७ ॥ तेंचि पुढें निरूपण। गाळूनि षोडशकळा गगन। कीजेल घनामृतपान। सत्रावीचें ॥ ९८ ॥ करूनि अवधान अनंत पदश्री। अनुसंधान अनं-तसंजीवनी। नित्यात्मतृप्तीनें श्रवणीं। सांटवा हृदयांत ॥ ९९ ॥ तत्व-संभव तत्वअभ्यंतर। उमजूनि साक्षत्वापर। स्वरूपधारणा निरंतर। श्रवण व्हावें ॥ १०० ॥ जें जें नाम विश्वीं रूढलें। तयाचें रूप

१ येथपासून चंद्राच्या सोळा कळांचीं नावें दिलीं आहेत.

पूर्वीच जालें । परि तें प्रतीतीसी पाहिजे आलें । त्यास्तव विस्तार हा ॥ १ ॥ नामरूपें विस्तारिलीं । तितुकीं ग्रंथीं निरोपिलीं । प्रज्ञाविशेषीं परीक्षिलीं । पाहिजे तीं सर्वज्ञें ॥ २ ॥ पाहातां सर्वत्र येक ईश्वर । तयाचा ब्रह्मादिकांसि न कळे पार । तेथें सर्वज्ञपणाचा भार । घेयील तो व्यर्थचि ॥ ३ ॥ जाणीव अहंकृतिसी न येतां । सृष्टीचा विस्तार पाहतां । बाणे सहजचि योग्यता । महाकवीच्या प्रबंधीं ॥ ४ ॥ येकेक वाक्यसृष्टीची रचना । कोण करील कवीश्वरें विना । सृष्टीचे सुलोचन जाणा । कवीश्वर सर्व ते ॥ ५ ॥ कविनिर्मित वाक्यभूषण । मिरवि श्रवणीं तो सभाग्य पूर्ण । कवीचें हृदय संपूर्ण । होय अनुभवित ॥ ६ ॥ कविहृदयजा कुमारी । तियेसी अनुभवितां प्रौढ करी । श्रवण-राज अंतःपुरीं । करी प्राणाहूनि प्रिये ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ कवितारसचातुर्यं श्रोता जानाति नो कविः ।
वनितारतचातुर्यं भर्ता जानाति नोपिता ॥ १ ॥

व्यास वाल्मीक दोन्ही नयन । कविता वनितेचें भूषण । कां जे प्रसिद्धीसी कारण । काव्यरचना प्रबंधें ॥ ८ ॥ रत्नजडित मनोहर । दिव्य-सुशब्दाचे अळंकार । तेणें अळंकरिलें विश्वंभर । स्वरूप देवाचें ॥ ९ ॥ कवि विश्वकर्म्याचीचातुरी । ते समर्पिली परमेश्वरीं । निजध्यासेंचि साक्षात्कारीं । पावन केलें जगातें ॥ ११० ॥ सकळ हृदियींचा हृदिस्छ । तोचि मुख्य कवेश्वर अनंत । अनुभवरचना विख्यात । ग्रंथासी अवधारिजे ॥ ११ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । हृदयसिंधुमथनस्वलीळा । म्हणे मेरुअनंत ॥ ११२ ॥ दशमरुद्रे ॥ तृतीयउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः॥ श्रीरामसमर्थ उदारा । प्रबोधिलें ब्रह्म जगदंतरा । शिष्यवात्सल्य करुणाकरा । अभिनव तुझें ॥१॥ पुढति पुढति निजअभ्यंतर । सांगीतलें प्रांजळ तत्वसार । कोमळहृदया प्रबोधांबर । वसविलें आम्हास्तव ॥ २ ॥ तत्वता परब्रह्म स्वामी ।.परि प्रबोधरूप अंतर्यामी ।

प्रकटसाक्षात्कार सुवर्मी। प्रसन्न जालासी आम्हा ॥ ३ ॥ मुळींहूनि क्रमान्वयें। जितुकें विस्तारलें जगीं आहे। तें तें प्रांजळ करूनि प्रत्ययें। श्रवणीं घातलें ॥ ४ ॥ स्थूळदेहापासूनि पुरुष। दशदेहरूपें निर्विशेष। साक्ष्यत्वासि आणूनि दृश्य। केलें साक्ष्यत्वावेगळें ॥ ५ ॥ अविद्यावनविस्तार। माया गूढ आरण्य थोर। पसरूनि उपसंहार। दाविला प्रत्ययाग्नीनें ॥ ६ ॥ महारण्याप्रति जावया। मार्गी सुयाळ स्वयें होऊनियां। आणिलें स्वरूपवस्तीसि हृदया। अद्वैतमहासुखें ॥७॥ महाअद्वैतस्वरूपस्थिति। जेथें नसे उत्पत्ति लय वसती। अविछिन्न ब्रह्मप्रतीती। द्विल्ही अपरोक्ष ॥ ८ ॥ तुझ्या प्रबोधाची प्रशंसा थोरी। भवगजप्रभंजन केसरी। बोधकृपाअनुग्रह करी। सिंहावलोकन तो ॥ ९ ॥ निजअनुसंधान अभ्यंतरीं। क्रमान्वय सिंहावलोकन-करी। मुळापासूनि सेवटवरी। येकविंशति प्रश्न केले ॥ १० ॥ तया प्रश्नाच्या प्रत्योत्तरें। समाधान केलें पुरें। तें नामरूप विस्तारें। विस्तारिले प्रश्न प्रांजळ ॥ ११ ॥ जीव कैसा कैसें बंधन। कैसा मोक्ष अविद्या किलक्षण। विद्येचें रूप कवण। जागृति स्वप्न सुषुप्ति ॥ १२ ॥ कैसी तुर्येची स्थिति। पंचकोश ययाची प्रतीति। प्रपंचकर्ता विद्यापति। देव तो कैसा आहे ॥ १३ ॥ कैसा आहे शिवाचा[१] स्वभाव। केंवि क्षेत्रज्ञ अंतर्भाव। कैसा साक्षी कूटस्थप्रभाव। केंवि अंतर्यामी बोलिजे ॥ १४ ॥ कैसा प्रत्यगात्मा तो आहे। परमात्मयाचें रूप काय। एवं हे येकविंशति प्रश्न निश्चयें। आइका प्रत्योत्तरें ॥ १५ ॥ तरी अनात्मवर्ग देहबुध्धी। प्रिय करूनियां कृतबुध्धी। शरीराभिमानें निरवधी। अज्ञानपाशीं गुंतला ॥ १६ ॥ याचि ज्ञानें होय निवृत्ति। तेव्हां जीवासि सांचचि घडे[२] मुक्ति। त्यास्तव अज्ञान बंधन निश्चिती। ज्ञानासि मोक्ष बोलिजे ॥ १७ ॥ देहाभिमानासि आणिलें। तें चि अविद्या जाणिजे या बोलें। शरीराहंकृति निरसिलें। सुविद्या पैं जाणते ॥१८॥ जीवाची जागृति ते कैसी। ज्ञानइंद्रियें कर्म-

१ वाटाच्या (?). २ भ्रम समजूत.

पूर्वीच जालें । परि तें प्रतीतीसी पाहिजे आलें । त्यास्तव विस्तार हा ॥ १ ॥ नामरूपें विस्तारिलीं । तितुकीं ग्रंथीं निरोपिलीं । प्रज्ञाविशेषीं परिक्षिलीं । पाहिजे तीं सर्वज्ञें ॥ २ ॥ पाहातां सर्वत्र येक ईश्वर । तयाचा ब्रह्मादिकांसि न कळे पार । तेथें सर्वज्ञपणाचा भार । घेयील तो व्यर्थचि ॥ ३ ॥ जाणीव अहंकृतिसी न येतां । सृष्टीचा विस्तार पाहतां । बाणे सहजचि योग्यता । महाकवींच्या प्रबंधीं ॥ ४ ॥ येकेक वाक्यसृष्टीची रचना । कोण करील कवीश्वरें विना । सृष्टीचे सुलोचन जाणा । कवीश्वर सर्व ते ॥ ५ ॥ कविनिर्मित वाक्यभूषण । मिरवि श्रवणीं तो सभाग्य पूर्ण । कवीचें हृदय संपूर्ण । होय अनुभवित ॥ ६ ॥ कविहृदयजा कुमारी । तियेसी अनुभवितां प्रौढ करी । श्रवणराज अंतःपुरीं । करी प्राणाहूनि प्रिये ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ कवितारसचातुर्यं श्रोता जानाति नो कविः ।
वनितारतचातुर्यं भर्ता जानाति नोपिता ॥ १ ॥

व्यास वाल्मीक दोन्ही नयन । कविता वनितेचें भूषण । कां जे प्रसिद्धीसी कारण । काव्यरचना प्रबंधें ॥ ८ ॥ रत्नजडित मनोहर । दिव्यसुशब्दाचे अळंकार । तेणें अळंकरिलें विश्वंभर । स्वरूप देवाचें ॥ ९ ॥ कवि विश्वकर्म्याचीचातुरी । ते समर्पिली परमेश्वरीं । निजध्यासेंचि साक्षात्कारीं । पावन केलें जगातें ॥ ११० ॥ सकळ हृदियींचा हृदिस्थ । तोचि मुख्य कवेश्वर अनंत । अनुभवरचना विख्यात । ग्रंथासी अवधारिजे ॥ ११ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । हृदयसिंधुमथनस्वलीळा । म्हणे मेरुअनंत ॥ ११२ ॥ दशमखंडे ॥ तृतीयउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः॥ श्रीरामसमर्थ उदारा । प्रबोधिलें ब्रह्म जगदंतरा । शिष्यवात्सल्य करुणाकरा । अभिनव तुझें ॥१॥ पुडति पुडति निजअभ्यंतर । सांगीतलें प्रांजळ तत्वसार । कोमळहृदया प्रबोधांबर । ... आम्हास्तव ॥ २ ॥ तत्वता परब्रह्म स्वामी । परि प्रबोधरूप अं...

प्रकटसाक्षात्कार सुवर्मी । प्रसन्न जालासी आम्हा ॥ ३ ॥ मुळींहूनि क्रमान्वयें । जितुकें विस्तारलें जगीं आहे । तें तें प्रांजळ करूनि प्रत्ययें । श्रवणीं घातलें ॥ ४ ॥ स्थूळदेहापासूनि पुरुष । दशदेहरूपें निर्विशेष । साक्ष्यत्वासि आणूनि दृश्य । केलें साक्ष्यत्वावेगळें ॥ ५ ॥ अविद्यावनविस्तार । माया गूढ आरण्य थोर । पसरूनि उपसंहार । दाविला प्रत्यग्नीनें ॥ ६ ॥ ब्रह्मारण्याप्रति जावया । मार्गी सुयाळें स्वयें होऊनियां । आणिलें स्वरूपवस्तीसि हृदया । अद्वैतमहासुखें ॥७॥ महाअद्वैतस्वरूपस्थिति । जेथें नसे उत्पत्ति लय वसती । अविछिन्न ब्रह्मप्रतीती । द्विल्ही अपरोक्ष ॥ ८ ॥ तुझ्या प्रबोधाची प्रशंसा थोरी । भवगजप्रभंजन केसरी । बोधकृपाअनुग्रह करी । सिंहावलोकन तो ॥ ९ ॥ निजअनुसंधान अभ्यंतरीं । क्रमान्वय सिंहावलोकन करी । मुळापासूनि सेवटवरी । येकविंशति प्रश्न केले ॥ १० ॥ तया प्रश्नाच्या प्रत्योत्तरें । समाधान केलें पुरें । तें नामरूप विस्तारें । विस्तारिले प्रश्न प्रांजळ ॥ ११ ॥ जीव कैसा कैसें बंधन । कैसा मोक्ष अविद्या किंलक्षण । विद्येचें रूप कवण । जागृति स्वप्न सुषुप्ति ॥ १२ ॥ कैसी तुर्येची स्थिति । पंचकोश ययाची प्रतीति । प्रपंचकर्ता विद्यापति । देव तो कैसा आहे ॥ १३ ॥ कैसा आहे शिवाचा स्वभाव । केंवि क्षेत्रज्ञ अंतर्भाव । कैसा साक्षी कूटस्थप्रभाव । केंवि अंतर्यामी बोलिजे ॥ १४ ॥ कैसा प्रत्यगात्मा तो आहे । परमात्मयाचें रूप काय । एवं हे येकविंशति प्रश्न निश्चयें । आइका प्रत्योत्तरें ॥ १५ ॥ तरी अनात्मवर्गी देहबुध्दी । प्रिय करूनियां कैतबुध्दी । शरीराभिमानें निरवधी । अज्ञानपाशीं गुंतला ॥ १६ ॥ याचि ज्ञानें होय निवृत्ति । तेव्हां जीवासि साचचि घडे[1] मुक्ति[2] । यास्तव अज्ञान बंधन निश्चितीं । ज्ञानासि मोक्ष बोलिजे ॥ १७ ॥ देहाभिमानासि आणिलें । तें चि अविद्या जाणिजे या बोलें । शरीराहंकृति निरसिलें । सुविद्या पैं जाणते ॥१८॥ जीवाची जागृति ते कैसी । ज्ञानइंद्रियें कर्म-

१ माटाल्या (१). २ ग्राम समजूत.

इंद्रियें सरिसी । मन बुधि चित्त अहंकारेंसीं । चतुर्दश करणें ॥ १९ ॥ यांसि सूर्यादिकांची अपेक्षित प्रभा । प्रबोधीं प्रवृत्तिसीं शुभाशुभा । ते हे स्मरणरूप जागृति शोभा । सर्वप्रवृत्तीची ॥ २० ॥ जाणपां स्वप्नाचें लक्षण । सुषुप्तियोगें जागृतिध्यासन । शब्दादि पंचविषय पूर्ण । चतुर्दशकरणेंसी ॥ २१ ॥ स्थूळाचे वासनेसहित । वासना शब्दाचिविषयांत । विस्तारलें विश्व देखत । जाणिजे स्वप्नाचिया ॥ २२ ॥ चतुर्दशकरणेंसीं । नाटवि शब्दादि विषयांसी । जेव्हां परमात्मयोग जीवासी । तेव्हांचि निद्रा संचरे ॥ २३ ॥ विश्व अविद्यावबोधें जागृतीसि ये । ना तरि निद्राचि समाधि स्वयें । पैंदार्थ अभाविनी निश्चयें । वसे साक्ष्यत्वविहीन ॥ २४ ॥ अवस्थात्रयविलक्षण । भावाभाव रहित आत्मज्ञान । तेंचि जाणिजे पैं गहन । पूर्ण तुर्य अवस्था ॥ २५ ॥ या तुर्येचेनि योगें तुर्यस्थ । जिवासीच पैं बोलिजेत । पंचकोश आतां सुनिश्चित । वोळखोनि घ्यावे ॥ २६ ॥ अन्नमय कोश शरीर । अन्नावांचूनि न चले विचार । अन्नाचि उपजीविका साचार । अन्नमय कोश हा ॥ २७ ॥ अन्न वर्जिलियां शरीर पडे । अन्नावीण कांहीं उपाय न घडे । येणें अन्नमय जीवचि निवाडें । अन्नं ब्रह्म बोलिजे या अर्थे ॥ २८ ॥ प्राणमय कोशाचा निश्चय । दशवायुयोगें सचेत देह । नाडीद्वारा अन्नरसतोय । प्राणमय कोशहा ॥ २९ ॥ प्राणमय अन्नमय कोशद्वय । मनादि चतुर्दश इंद्रिय । संकल्पधर्माधर्म पंचविषय । प्रवृत्ते तो मनोमय कोश ॥ ३० ॥ अन्नमय प्राणमय मनोमय । कोशत्रययुक्त हृदय । विशेष जाणोनि वर्तविताहे । विज्ञानमय कोश तो ॥ ३१ ॥ विज्ञानकोश विशेषज्ञानें । जेणें प्रवृत्तिपर साक्षीनें । पडे स्वरूपीं दृष्टि मननें । विज्ञानकोश पैं हा ॥ ३२ ॥ हे च्यारी कोश ज्ञानेंसहित । आपुल्या कारणासी येती निवांत । येकवटूनि वृत्ति समस्त । सामाऊनि जाती ॥ ३३ ॥ ज्ञान तें वटबीजसूक्ष्म । ज्ञानबीजीं सामावला भवत-

---

१ इंद्रियें. २ शब्दादि (?). ३ आत्मस्वरूप. ४ अविद्येच्या अभावीं. ५ अन्नं ब्रह्मेति व्यजानात्‌ ॥ तै. उप. भृगु० २.

क्रम । सांटवलें कारण व्योम । सहजस्थितीनें ॥ ३४ ॥ स्वरूपाच्या प्रतीतीनें सहज । बीजीं प्रवळला निजउमज । तो निर्वाणवन्हि सतेज । बीजीं निर्बीजकर्ता ॥ ३५ ॥ स्वसुखाच्या विस्मयाक्रांत । ज्ञानाचि निर्बीज होत । सुखें गगन घनावत । आनंदमय कोश तो ॥ ३६ ॥ बुधिआदिकरूनि पूर्ण । निश्चयेंसि निर्विषयज्ञान । सुखदुःखहेतु निवळोन । जनीं प्रवर्ते ॥ ३७ ॥ पुण्यपापानुसारें द्वैत । तोचि कर्ता पैं जाणिजे येथ । प्राकृतशरीरीं असे वर्तत । जीव अध्यासबळें ॥ ३८ ॥ शरीर जीवें जिवविलें । कीं शरीरें जीवासि जियंत केलें । निश्चयें जीवेंचि सजीव जालें । जीवयतीति जीव हा ॥ ३९ ॥ आतां क्षेत्रज्ञ तो कैसा जाणिजे । क्षेत्रप्रतिष्ठा ज्याचेनि सहजें । सस्वरूपाच्या निजउमजें । समजला तोचि साक्षी ॥ ४० ॥ जाणे ज्ञानविज्ञान परात्पर । अविद्यातिरोभावपरिहर । सर्वाविगळा निरंतर । साक्षी म्हणावें तया ॥ ४१ ॥ ब्रह्मादिस्थावर परियंत । जाणे सर्वत्राचें मनोगत । विश्वाचें होये हृद्गत । तो कूटस्थ जाणिजे ॥ ४२ ॥ जाणोनि जाणिवे वेगळा । जागा विश्वरूपाचा जिव्हाळा । स्वरूपयोगेंचि निवळला । तो निर्विकार कूटस्थ ॥ ४३ ॥ नाडळे देहअहंभावी । अंतर्यामी तो स्वानुभवी । जो अरूप निर्गुण स्वभावी । परेहूनि परता ॥ ४४ ॥ पर म्हणिजेत उत्कटभावें । त्यासी प्रमाण नसेचि जाणावें । विज्ञानब्रह्म स्वानुभव । परमात्मा बोलिजे ॥ ४५ ॥ सर्वसार उपनिषदर्थ । येकवीस प्रश्नांतरें निश्चितार्थ । प्रांजळ केला परमार्थ । प्रतीतियोगें ॥ ४६ ॥ त्वंपदअर्थ तत्त्वता । तत्पदार्थ तोचि वस्तुता । तूं मी हें रूढीनें असता । येथचि निर्वाण पाहा ॥ ४७ ॥ विज्ञानस्वरूप अभिन्न । महाअद्वैत समाधान । चिची ज्ञान निर्वाण । सद्गुरुकृपेचें ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ त्व पदार्थो य आभाति सोऽहं शब्दार्थ एव हि ।
तमहं रूदशब्दार्थो येक एव चितिः परा ॥ १ ॥

---

१ 'शब्दार्थ एव' किंवा 'शब्दार्थायेक' असें असावें २ ज्ञान.

यां ज्ञानाचें स्वरूप । पदार्थेवीण आपेंआप । सदोदित नित्य अरूप । जाणिजे क्रमान्वयें ॥ ४९ ॥ क्रमामाजि व्यतिरेक अन्वय । शोधूनि पाहावे दशदेह । निर्वर्तनिवृत्तीनें संदेह । कांहींच नुरे ॥ ५० ॥ आकाशासी पुष्प असेना । तैसी मायेची विवंचना । प्रकृतीचा अत्यंताभाव जाणा । नाहींपणासि ठाव असे ॥ ५१ ॥ दुसरें प्रागभाव तो कैसा । जाणिजे वंध्येचा पुत्र जैसा । स्वरूपआस्तिक्यासरिसा । नास्तिक्यपणें रूढला ॥ ५२ ॥ निर्धारितां स्थाणु पुरुष । निरसोनि जाय निःशेष । आधीं भाव मग विशेष । अभाव होय परी ॥ ५३ ॥ तैसा प्रागभाव हा जाणिजे । मृगजळाचा सिंधु सहजें । नसोनियां रूढला निर्बुजे[1] । अविद्यात्मक हा ॥५४॥ जैसा स्वप्नींचा तरु सफळ । तळीं छाया सुसीतळ । तैसा हा प्रागभाव केवळ । कारणदेहीं ॥५५॥ अन्योन्याभाव लिंग देहीं । घटाचा अभाव पटीं पाहीं । पट पाहातां घटांत नाहीं । परस्परें अभाव हा ॥ ५६ ॥ भीष्मकुमरें वंध्या कुमारी । वरूनि जाला जीव संसारीं । पाहातां दोहींचा अभाव परस्परीं । अन्योन्याभाव जाणिजे ॥ ५७ ॥ प्रत्यक्ष घट भंगोनि जाय । तेंवि ब्रह्मांडासि कल्पांत होय । हा प्रध्वंसाभाव निश्चय । निर्वाणदानींचा ॥५८॥ पाहातां च्यान्ही हे अभाव । मायेसी नसे कांहींच ठाव । परि अज्ञानदृष्टीचा स्वभाव । भास रज्जूवरील सर्प ॥ ५९ ॥ अभाव एवंप्रकारें । मिथ्यापिंडब्रह्मांडआकारें । आभासलीं गंधर्वनगरें । इंद्रजाळ मायावी ॥ ६० ॥ ब्रह्मीं कारण नसेचि कांहीं । मायाही मुळींहूनि नाहीं । चतुर्विध अभावें सर्वही । दृश्याभास वारिला ॥ ६१ ॥ दृश्य आभासलें कवणा । याचीच पाहिजे विवंचना । साक्ष्यत्वाची विचारणा । करावी लागे वास्तव ॥ ६२ ॥ साक्ष्यत्व ही ब्रह्मीं न घडे । हें साक्ष्यत्वीच ज्ञान उजेडे । अद्वैतवस्तु प्रतीत रूढे । सुधर्म साक्ष्यत्वीं ॥ ६३ ॥ तरि हा अनादि मायास्वभाव । ब्रह्मींच रूढविलें साक्ष्यत्व । साक्ष्यातीत निरावेव[2] । स्वभाव अनादि ब्रह्मींचा ॥ ६४ ॥ ब्रह्मस्फूर्ति जाणीव

१ भ्रम. ३ भ्रमानें भासतो. २ विभागाच्या प्रलय कालींचा.

घट। अंतर्बाह्य चिदंबर निघोट। त्या घटनप्रयोगें स्वभाव अवचट। साक्षी रूढला ॥ ६५ ॥ बीजभूमिउदकयोगें। फळीं माधुर्यता ये सवेगें[1]। तेंवि ब्रह्ममायाअंतरगें। द्रष्टा जाहला परम ॥ ६६ ॥ तो निजांगें वस्तुता ब्रह्म। तो साक्षत्वें स्वात्मानुक्रम। तो जगत्कारण परम। परमात्मा बोलिजे ॥ ६७ ॥ तयासीचि ज्ञानघन म्हणती। मूळमाया पुरुषस्थिति। अष्टतत्वें अंतर्वृत्ती। भूतगुणक्षोभविस्तारें ॥ ६८ ॥ तयावीण कांहींच न चले। त्याचेनि च सर्व काहीं चाले। पाडिलें पर्ण तेंही न हाले। मूळि वायूचि तो ॥ ६९ ॥ तोचि कारण-रूपें सूक्ष्म। तोचि कार्यरूपें रूप नाम। दृश्यद्रष्टा संभ्रम। दर्शन स्वमार्गें ॥ ७० ॥ आतां तयाचें जें हृदय। अस्तिक्यासी ठाव होय। पाहातां पाहातां निरामय। तोचि तेथें नाडळे ॥ ७१ ॥ म्हणोनि श्रुतीचे संकेतप्रत्ययें। सर्वाधिष्ठानमद्वय[2]। साक्षीचाही साक्षी स्वयें। त्यासि साक्ष्यत्व असेचिना ॥ ७२ ॥ तत्वता परमात्मा परब्रह्म। उप-संहार न उपक्रम। हें प्रतीतीचें अंतर्याम। साक्ष्यत्व मुळींहूनि नसे ॥ ७३ ॥ आतां जगत्कारण परमात्मा। बोलिजेति साक्ष्यत्वाची सीमा। परमात्मा आणि परब्रह्म। पाहातां भेद नामाचा ॥ ७४ ॥ अथवा भेदांचि कल्पिला। तरि द्वैतार्थचि सिद्ध जाला। अद्वैतसिद्धांत संकेताला। काहीं ऊरि असेचि ना ॥ ७५ ॥ या कारणें हें अघटित। वाटे उपदेश कैसा अद्वैत। बोध बोधकता विख्यात। द्वैतप्रसिद्धिचि हे ॥ ७६ ॥ द्वैत अद्वैत उपदेशिलें। हें तरी कैसें प्रतीतिसी आलें। द्वैतापासूनि संभवलें। कायेकेंवि तें अद्वैत ॥ ७७ ॥ अथवा अद्वैतें अद्वैत। केंवि उपदेशिलें हृद्गत। उपदेशासी कारण आपणात। आपण कैसें जाहलें ॥ ७८ ॥ एवं हे संकल्प संशय। निरसोनि जावें निज-निश्चयें। मायाब्रह्मविवरण होय। प्रांजळ सर्वही ॥ ७९ ॥ आपली अशंका आपण। संशयनिश्चयें भिन्नाभिन्न। पाहातां आपुलेंचि अंतः-करण। आपणासि कळेना ॥ ८० ॥ आपण आपणासि झाडविलें।

१ केंवळ, एकसारखें. २ 'सर्वाधिष्ठानमद्वयम्.'

ळीसे. ॥ १३ ॥ वेदांतीं उपादानकारण । तार्किकमतें समवाय कारण । विचारितां हें निष्कारण । कार्येचि नाहीं ॥ १४ ॥ या माया 'सा माय; अभाव । या अर्थे मायेसि नसे ठाव । कार्यकारण स्वभाव । भ्रांती माजि वसे ॥ १५ ॥ परमेश्वर कर्ता म्हणती । परि तयाचें अभ्यंतर नेणती । परिपाटीं पडिली प्रवृत्ति । गर्भांधपरंपरा ॥ १६ ॥ वंध्यासंततिविस्तारें । जगदांध्यज्ञान निर्धारें । चित्रतरुछयायाप्रकारें । विश्रांति घेती ॥ १७ ॥ मृगजळपूरीं नाहती । गगनसुमनें तुरंबिती । शशशृंगाचें धरिती । धनुष्य करीं ॥ १८ ॥ करूनि आस्तिक्याचा निर्धार । करिती नास्तिक्याचा परिहार । साचचि वंध्येचे कुमर । मृगजळीं बुडाले ॥ १९ ॥ ऐसें विचारितां तत्वज्ञान । मायेची निवृत्ति देखोन । सत्यब्रह्मीं प्रतिष्टा पूर्ण । करूनि ऐक्य होती ॥ २० ॥ अविछिन्नपक्ष तो विमळ । निषेधूनि प्रतिबिंबपक्ष केवळ । पक्षद्वयातीत अकळ । ब्रह्म अनुभविती ॥ २१ ॥ ते कर्तेपणें रूढले । तेणेंचि नाहंकृतीसी आले । जेविं स्वस्वप्नामाजि जाले । जागे तत्वज्ञानी ॥ २२ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिंव्हाळा । ग्यान्ही अभावकारणी निवळा । ह्मणे मेरुअनंत ॥ १२३ ॥ दशमरुद्रे ॥ चतुर्थउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थप्रबोधीं । निवळली उपाधि निरुपाधि । द्वैताद्वैतसंधि त्रिशुध्दि । जाली प्रांजळ ॥ १ ॥ चतुष्टे अभाव कारणें । प्रांजळ जालीं निरूपणें । प्रमेय चतुर्विध प्रमाणें । कळलीं पाहिजेत ॥ २ ॥ अनुमान आणि उपमान । प्रत्यक्ष शब्द प्रमाण । याचें निवळलें ज्ञान । एवं प्रकारें ॥ ३ ॥ अनुमान प्रमाण ययापरीं । धूम्र देखोनि पर्वतावरी । अग्नीचा निश्चय निर्धारीं । अनुमान प्रमाण ॥ ४ ॥ या पर्वतावरी अग्नि असे । काशावरूनि तरि धूम्र दिसे । यासि दृष्टांत 'यथा महानसे' । ह्मणिजे स्वयंपाकगृहीं ॥ ५ ॥ 'पर्वतोयं अग्निमान्' हें निश्चित । 'कुतःइत्युक्तेधूमवत्वात्।'

---

१ (?) आकाश पुष्पांचे तुरे करतात. २ चतुरंग ?

'यत्र धूमस्तत्राग्निः' यथार्थ । अनुमान प्रमाणें ॥ ६ ॥ असत्य अस्ति-
क्यावांचूनि । न भासे हा निश्चयें करूनि । सृष्टिउत्पत्ति अधिष्ठानी ।
कल्पिलें हें अनुमान प्रमाण ॥ ७ ॥ ज्याच्या भासें सर्वेही दिसती ।
प्रतिष्ठूनि पूर्वपक्षश्रुति । रज्जु स्थावरि सर्पाकृति । याचि दृष्टांतयोगें
॥ ८ ॥ उपमान प्रमाण तत्वता । गगनाची देऊनि साम्यता । ब्रह्म-
प्रतीतीसि आणावें वस्तुता । उपमान प्रमाणें ॥ ९ ॥ दुजें नवीन अन-
यासें । ब्रह्म ब्रह्मत्वीच नुमसे । तेथें गगनासि कैंचि असे । अवकाश
पाहातां ॥ १० ॥ निरावकाश परब्रह्म । कैंचि घडे गगनोपम । शाखा
चंद्रनिरूपम । उपमा चि कीं हे ॥ ११ ॥ म्हणोनि उपमान प्रमाण ।
करणें हेंचि मूळअज्ञान । अपरोक्षासी परोक्ष करून । दृष्टांतासि आ-
णिलें ॥ १२ ॥ पतिव्रतेचा प्राणवल्लभ । प्रार्थूनि लौकिकें करविजे
क्षोभ । तैसा ज्ञानी आत्मा स्वयंभ । गुणक्षोभें आपकीजे ॥ १३ ॥
हीन दृष्टांतें सर्वसाम्य । मुखचंद्रोपमेसी हें चि ग्राम्य । कांहीं अल्हाद-
कर सौम्य । याचि अर्थे उपमा ॥ १४ ॥ आतां शब्द प्रमाण तें विवं-
चिजे । श्रुतीचीं महावाक्यें सहजें । कडोविकडीनें अर्थविजे । शब्दें
चि निःशब्द ॥ १५ ॥ साखरशब्दामाजि गोडी । न दिसे चि कांहीं
परवडी । परि शब्दाग्रांचूनि रोकडी । शर्करा अप्राप्त ॥ १६ ॥ महा-
वाक्य स्वामीच्या वदनीं । स्वसुखनिःशब्दाची भरणी । विवरितां विव-
रितां अंतःकरणीं । स्वानंद घटावे ॥ १७ ॥ अनुभवेंसी शब्दप्रमाण ।
नाहीं तरि तें व्यर्थचि शब्दज्ञान । जेवि ते शर्करेचीं अक्षरें लेहोन ।
तेवि मृत्तिका भक्षिली ॥ १८ ॥ जाणे शास्त्रज्ञान मांजळ । शब्दोत्पत्तीनें
निर्मळ । शब्दाची कडोविकडी केवळ । शब्दशास्त्र रूढलें ॥ १९ ॥ ऐक्यपरें
श्रुतिवाक्यें जाणे । आत्मा शाश्वत या निश्चयानें । असोनिही प्रतीतीनें ।
निवेन हृदयीं ॥ २० ॥ [illegible] जे सद्गुरुकृपाविहीन । तर्कज्ञानें नव्हे
समाधान । गुरुकृपा अपरोक्षज्ञान । होय अर्थेचट विश्रांति ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ ऐक्यपरैः श्रुतिवाक्यैरात्माशश्वत्प्रकाशमानोपि ।
देशिकदयाविहीनैरपरोक्षं न शक्यते पुरुषैः ॥ १ ॥

---

१ येथें कांहीं तरी कमी अधिक वाटते.

महावाक्यें गुरुकृपापूर्ण । निवळ जालें शब्दप्रमाण । आतां तें प्रत्यक्ष-प्रमाण । कवणेपरीचें पाहा ॥ २२ ॥ प्रत्यक्ष आपणासि आपण । कैसे परीचा किंलक्षण । अपरोक्ष प्रतीतीनें निर्वाण । स्वयें अनुभविजे ॥ २३ ॥ चक्षुरादिइंद्रियें संपूर्ण । मन बुद्धी अवस्था गुण । ज्या मजकरितां स्मरण । रूपासी येती ॥ २४ ॥ तो मी कैसा अतींद्रिय । गुरुकृपेनें अनुभवासी ये । अपरोक्षानुभव स्वयें । प्रत्यक्ष प्रमाण ॥ २५ ॥ जैसा तळहातीचा सन्मणि । तैसा आत्मा अपरोक्षज्ञानी । जाणीजे प्रत्यक्ष प्रमाणीं । करतळामळ ॥ २६ ॥ एवं चहूं हि प्रमाणीं । निवळला जो आत्मज्ञानी । तो कदापि ही अनुमानीं । प्रवर्तेचि ना ॥ २७ ॥ गुरुमुखें वेदांतश्रवण । प्रांजळ तें तूं असिसि हें विवरण । जहदजहल्लक्षणें जाण । निवळला हृदयीं ॥ २८ ॥ जहल्लक्षण म्हणिजे त्याग । अजहल्लक्षण जाण अत्याग । ऐक्यबोध त्यागात्याग । जहदजहल्लक्षणें ॥ २९ ॥ जहल्लक्षणीं त्वंपद जीव । अजहल्लक्षणीं तत्पद शिव । जहदजहल्लक्षणी स्वमेव । ब्रह्म असिपदीं त्या ॥ ३० ॥ या चि लक्षणीं वाच्यांश । बोलिजेती तैसा चि लक्षांश । वाचेसि बोलतां आलें निर्विशेष । वाच्यांश त्यानें म्हणिजे ॥ ३१ ॥ सरला परेचा संकेत । निवळ अपरोक्ष ज्ञानहृदयांत । तत्वता अपरोक्ष निर्वांत । लक्षांशें निवळे ॥ ३२ ॥ वाच्यांशीं च असे लक्षांश । कां जे वाक्यें चि परतत्व उपदेश । शब्दांचा अंतर्भाव परेश । परात्पर तो ॥ ३३ ॥ जीवाची उपाधि वाच्यांशें सरे । शिवाची निरुपाधि लक्षांशें भरे । जीवशिवऐक्य अनुसरे । वाच्य लक्षातीत सुखें ॥ ३४ ॥ देहधुळीमध्यें आत्मरत्न । हारपलें बहुता काळींचें निजज्ञान । तें श्रुतिशास्त्रवाक्यें करून । उमगिलें शरीरीं ॥ ३५ ॥ परि तें शरीरासगट घेतां नये । यास्तव निरसूनि घ्यान्ही देह । घ्यावें आत्मरत्न निजप्रत्ययें । गुरुज्ञान डोळसें ॥ ३६ ॥ याचि नाव जहल्लक्षण । त्याग उपाधीचा संपूर्ण । कीजे हें अजहल्लक्षण । आत्मतत्वयोगें ॥ ३७ ॥ रत्नेंसहित मृत्यका-त्याग । तेणें रत्नाची अप्राप्ति सवेग । अथवा रत्नें चि म्हणोनि मृत्ति-

कायोग। भूषण नव्हे तेणें ॥ ३८ ॥ हे त्यागात्याग स्थिति । यासि दृष्टांत बहुत असती । अद्वैतछत्रगच्छंति । विद्यमानें द्रष्टव्यें ॥ ३९ ॥ राजा आणि सेनासंभार । अवरोधें न देखतां साचार । उन्नत छत्र चि प्रकाशकर । दृष्टीसी देखिलें ॥ ४० ॥ त्याचे दृष्टीसी अपूर्व वाटलें । जें अचेतन छत्र कैसें चालिलें । तैसें शरीरधर्त्यासी चुकलें । पाहातां लि देहासी ॥ ४१ ॥ वृक्षांगरूनि मार्ग आहे । ऐसें सूचनार्थ सांगणें होय । तरी तरुवरी चढोनि जाय । काय मार्गस्थ मार्गें. ॥ ४२ ॥ ' मंचाःक्रोशंति ' म्हणतां । माळा गर्जे कैंचि पाहातां । त्यावरी बैसला. आहे तो तत्वता । शेतसंरक्षणार्थ गर्जे ॥ ४३ ॥ ' शोणो धावति ' हें वचन । तरी धावे नारंगीवडा वर्ण । निश्चयेसीं कीजे प्रमाण । जें वृषभ धावतो ॥ ४४ ॥ मार्गीं जाता श्रमला पाहा । येणारासी पुसे निवास महा । सांगे तो ' गंगायां घोषः ' । विवंचूनि पाहावें ॥ ४५ ॥ घोष शब्दें जाणिजे ग्राम । ते गंगेमाजि नसे निभ्रम । गंगातीरीं चि असेल हा धर्म । जाणोनि तेथें जावें ॥ ४६ ॥ तैसें शब्दार्थसंकेत । वर्जूनि ध्यावें निजतत्वसंत । वाक्यविवरण निवांत । स्वरूपवस्तीसी यावें ॥४७॥ ' सोयंदेवदत्त ' पाहातां । याचें अभ्यंतर विचारिता । जीवशिव उपाधि परता । आत्मा जाणोनि ध्यावा ॥४८॥ जीव उपाधिकरितां संभ्रम । देहयोगें गृहस्थाश्रम । अविद्याकुग्रामीं सत्कर्म । जीव देखिला होता ॥४९॥ तो चि विज्ञानवाराणशीसी । शिवरूपाक्षेत्रसंन्यासी । दृष्टीसी पडतां निश्चयेसीं । देह वोळखिलें पूर्वील ॥ ५० ॥ परि शिखा यज्ञोपवीत नसे । दंडकमंडलें काशायवेशें । तेविं अज्ञान निरसूनि प्रकाशें । जीव चि शिवरूपी ॥ ५१ ॥ दंड कमंडल टाकिता । म्हणती अवधूत तत्वता । एवं देहउपाधि करिता । आत्मत्वीं आश्रम ॥ ५२ ॥ जो शुत्वबुत्वं निजनिर्गुण । निष्कर्म निर्हेतु निर्वाण । त्यासि आश्रम ना जाण वर्ण । मुळिंहूनि नसे ॥ ५३ ॥ जें जें वर्णाश्रमयोगें । तें तें

---

१ एका च क्षेत्रांत नित्य राहणारा संन्यासी. २ भगव्या वेषांत.

कर्म भवसंसर्गें । आरोपलें परि तो निजांगें । शुत्धबुत्ध पाहातां ॥५४॥ त्यासी काया ना माया काहीं नसे । अवधूत अखंड उघडा असे ।। भ्रह्मीं समरसोनि सावकाशें । निरावकाश जाहला ॥ ५५ ॥ निर्वाणदशेनें देह धरिला । पाषाणापरी अवरोधला । अचेतसमाधीनें रूढला । सचेतन वृक्षापरीं ॥ ५६ ॥ देह वर्ते प्रारब्धसंस्कारें । जेंवि भर्जिलें बीज नांकुरे । परि धान्यबीज तें निर्धारें । तृप्तीसी देतसे ॥ ५७ ॥ तैसा विदेह कैवल्यशरीरें । भवाब्धीसी सेतु निर्धारें । तारिलें जग कृत्योपकारें । निजबोधदीक्षेनें ॥ ५८ ॥ प्रतीतीनें निजअभ्यंतर । मुक्तांचा देह चि निर्विकार । कां जे स्वरूपसाक्षात्कार । होय जयापासूनि॥५९॥ साधूचा देह निरंजन । प्रबोध वस्तुज्ञानांजन । डोळां घालूनि मंजन । करिती भवभेदाचें ॥ ६० ॥ ते अपरोक्ष साक्षात्कारी शुत्ध । कैवल्य अधिष्ठानीचा बोध । अक्षरें प्रसवती प्रसित्ध । ब्रह्मसाक्षात्कारें ॥६१॥ विदेह अवस्थेंत अखंडीत । नेणती विश्वाचें हृद्गत । परि बोध करिती निवांत । स्वभाविक दीक्षेनें ॥ ६२ ॥ सूर्य उदयतां चि सृष्टीवरी । सांगणें चि नलगे प्रकाशाची परी । भानुदर्शनें चि सृष्टीभरी । प्रकाशे चि होय ॥ ६३ ॥ तैसें महापुरुषाचें दर्शन । होय साक्षात्कारें अवतरणें । भवाब्धीसी सुखें चि तारणें । ईक्षण नौका तयाची ॥ ६४ ॥ सभाग्य सृष्टीचा भाग्योदय । अकल्पित साधुदर्शन होय । अवचट स्वानंदहृदय । मोक्षवस्तीसी आला ॥ ६५ ॥ सकळ सुकृताचीं दैवें आलीं । जे साधूची मूर्ति डोळां देखिली । भवदरिद्राची सरली । तेथूनि वार्ता ॥ ६६ ॥ साधु प्रत्यक्ष तें परब्रह्म । जयासी न कळे चि हें निजवर्म । तया अंतरींचा भ्रम । गेला चि नाहीं ॥ ६७ ॥ अंतरीं अंतरस्थितीचें रूप । बाह्यदीक्षा निर्विकल्प । नाहीं समाधि संकल्प विकल्प । सहजस्थितीनें ॥ ६८ ॥ अछेद्य अक्लेद्य अदाह्य । याचि दृष्टीनें पाहिलें देह । कां जे देहामाजि निरामय । व्यापक ज्ञानानें ॥ ६९ ॥ पदार्थमात्राचें

---

१ वाढत नाहीं, न + अंकुरे.

अभ्यंतर । परब्रह्म निरंतर । अपरोक्षज्ञानें परात्पर । वस्ति केली तेथें ॥ ७० ॥ चिदंबरवस्तीसि आले । चिदानंदसिंधूंत रिघाले । चित्सुखाचे विघरले । कल्लोळ निजजीवनीं ॥७१॥ नाहीं इहपर अवस्था । नाहीं समाधि ना कांहीं व्यवस्था । शांतिकर्पूराचे तत्वता । कुंभ जीवनीं रिघाले ॥७२॥ विज्ञानदीप पूर्तिसी आले । निवातीं निवांत सुखीं जाले । निवाती निवांत राहिले । निष्कंप योगी ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ अनात्मरूपं च कथं समाधिरात्मस्वरूपं च कथं समाधिः ।
अस्तीति नास्तीति कथं समाधिः स्वस्थस्वभावं यदि ब्रह्म चैकं ॥१॥

सद्गुरुअनंतकृपाज्ञानें । स्वरूपप्रतीतीच्या प्रमाणें । जहदजहल्लक्षण । उमजविलें निज ॥ ७४ ॥ वाच्य लक्षातीत सहज । वितळोनि गेला निजरमज । अनिर्वाच्य जाहलें माझें मज । गुज आतुडलें ॥ ७५ ॥ तें चि, निरूपण प्रांजळ । आत्मप्रतीति प्रमेय रसाळ । श्रवणद्वारें व्हावें निवळ । अनुभव श्रोतेजनीं ॥ ७६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । प्रमाणेंसी त्यागात्यागलीळा । म्हणे मेरुअनंत ॥७७॥ दशमरुद्रे ॥ पंचमउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ षडाक्षरी । मंत्र पावन विश्व उद्धरी । अनंतमौनी पंचाक्षरी । भूतपंचक निवर्तक ॥ १ ॥ भूतमविष्यवर्तमानी । प्रगटला बोध निदानीं । भूतनिवृत्ति करूनि । पूर्वस्थितीसी आणिलें ॥२॥ भूतसंकल्प भस्मासुर । त्यासी आत्मशंकरें देऊनि वर । केला भवरूद्रीसी अपस्मार । तो परतानि पडिला ॥३॥ आत्मा शिव अविनाशरूपी । त्याच्या चि नाशा प्रवर्तला विकल्पी । तो मद्गुरुविष्णूनें निर्विकल्पी । उपशमविला कैसा ॥ ४ ॥ त्याचा चि प्रळयकर दुर्धर । विश्वमोहनस्वरूपें मनोहर । अभिनव नाट्यलीळेनें सुंदर । मोहिला असुर तो ॥५॥ अभिनवें करूनिया लीळा । मस्तकीं कर ठेऊनि तात्काळा । भवभस्मासुर शमविला । प्रबोधप्रयुक्तीनें ॥ ६ ॥ तेवि चि देहस्तंभीं प्रगटोनि । बोधनृसिंहरूप धरूनि । हिरण्यकश्यप देहाभिमानी । निर्मूळ केला ॥७॥

मायाकार्यीं प्रळयाग्निरूप । कडकडीत निघाला चित्स्वरूप । गडाडिलें ब्रह्मांड सत्यसंकल्प । कृतांत कांपत भयें ॥ ८ ॥ ज्ञानप्रळयविजूचा उमाळा । तडतडिला स्तंभ अवलीळा । प्रगटलें महातेज डोळां । झांपडी पडिली ब्रह्मादिकां ॥ ९ ॥ स्वयंभ बिंब महातेज । नेत्रांतूनि ज्वाळा निघती तेजःपुंज । वदन विक्राळ सतेज । दंष्ट्रा कराळ दर्शनें ॥ १० ॥ जिव्हा लाळीतसे सरोष । समीप न थारे चि त्या भयावेशें । ब्रह्मादिक तिच्या उद्देशें । असन्मुख जाहाले ॥ ११ ॥ मोक्षलक्ष्मी पुढें नव जाय । दर्शनें चि भयें सकंप होय । तेव्हां भक्त प्रल्हादासी निश्चयें । समोर केलें सकळिकीं ॥ १२ ॥ बाप भक्तवत्सळ कृपाळु । सदयहृदय पूर्ण स्नेहाळु । आपंगूनि प्रल्हादासि अळुमाळु[1] । रसनेनें चांटितसे ॥ १३ ॥ केवळ भक्ताची स्नेहजननी । लळे पुरवितसे अवतरोनि । विरोधि दुष्ट संहारूनि । अवरोध मुक्त करी ॥ १४ ॥ ते नृसिंहरूप गुरुमूर्ति । भवहिरण्यकश्यपा उपशांति । पावऊनि भक्तासी विश्रांती । देतसे निजात्मदर्शनें ॥ १५ ॥ भक्तांचा भवसंकल्प निवारी । भूतपंचबाधा परिहारी । षडाक्षरी पंचाक्षरी । देऊनि मंत्रदीक्षा ॥ १६ ॥ तारकमंत्र त्रयोदशाक्षरी । अनुष्ठानविधानें पावन करी । त्रयोदश लक्षमंत्रोच्चारीं । येक पुरश्चरण तें ॥ १७ ॥ एवं प्रतीतसाक्षात्कारें । करी निर्द्वैत निर्विकारें । अनुष्ठान विधि अभ्यंतरें । अखंड रामाक्षर उच्चार ॥ १८ ॥ इच्छयाप्रारब्ध अनिच्छयाप्रारब्ध । प्रवर्ततां प्रगटीं दैवीप्रारब्ध । अवरोधनिवृत्ति करी प्रबोध । दैविकें चि त्या ॥ १९ ॥ अनिच्छयाप्रारब्ध जाणिजे माया । इच्छयाप्रारब्ध अविद्या मोक्षकाया । दैवीप्रारब्ध दोहींसी विलया । नेतें निजअनुसंधानें ॥ २० ॥ संचित क्रियमाण प्रारब्ध । त्याचा प्रांजळ जाला पाहिजे बोध । जीवासि संकल्पेंचीण संबंध । अनादि लागला असे ॥ २१ ॥ हें अभ्यंतर निपटीं[2] यया । प्रसन्न करावें सदयहृदया । संकल्पमुळीं बैसोनियां । निवांत उमजावें[3] ॥ २२ ॥ कैसी आदि अनादि केंवि । सायंतादि

[1] प्रेमानें, आवडीनें. [2] रहस्य. [3] स्पष्ट होण्यासाठीं.

तेही जाणावी । प्रथमस्वरूपाची पदवी । अनादि मायाविवर्ती ॥ २३ ॥ सायंतादि अविद्या । प्रगट करूनियां सुविद्या । आदिस्वरूप आद्या । अनुभविजे जीवें ॥ २४ ॥ शक्तिद्वययोगें जीवासी । इछा अनिछाप्रारब्धविशेषी । लागलें कर्म संकल्पेसीं । काळ तेथें रूढला ॥ २५ ॥ जीवासी सर्वकाळ वर्तमान । काळें रूढलें भूतभविष्यज्ञान । संचित आणि क्रियमाण । काळें चि विस्तारिलें ॥ २६ ॥ पूर्वसंचित ह्मणती जनीं । परि सचित कैंचें विचारीना कोण्ही । जीवाचा शोध घेता घेतां निर्गुणी । निरावकाश चि तो ॥ २७ ॥ जिवासी संचित ना प्रारब्ध नसे । क्रियमाणासी ठाव चि न दिसे । ऐसा शोध न घेतां उमसे । विकल्पजात सर्व ॥ २८ ॥ नाहीं सत्स्वरूपाचें ज्ञान । तेंचि जाणिजे पैं अज्ञान । जीवासी लागलें तें मुळींहून । त्यासी च सचितें ह्मणावें ॥ २९ ॥ अज्ञानकल्पकोटि हें संचित । त्यातील प्रारब्ध इछा अवचित । अनेक जन्मातरें वेचित । आला सचितासि त्या ॥ ३० ॥ तऱ्ही अज्ञानसचित तें न सरे । करी लक्षचौऱ्यासी योनिफेरे । तेथें क्रियमाणें कर्मानुसारें । होसी प्रारब्धासी कारणें ॥ ३१ ॥ प्रारब्ध बहुविध शरीरें । इच्छा प्रारब्ध अविद्याभरें । जन्मता मरता चमत्कारें । नरदेहासि आला ॥ ३२ ॥ अवचट अनिछा मूळ सस्कारें । दैविक प्रारब्धभाग्यानुसारें । ज्ञानदेहप्रतिष्ठानिर्धारें । स्वरूपबोध जाला ॥ ३३ ॥ दैविक प्रारब्धाचा ईश्वर । प्रसन्न जाला परात्पर । सद्गुरुस्वरूपें साक्षात्कार । भेटीसि आला ॥ ३४ ॥ वर्तमानींचि या प्रबोधिलें । संचितअज्ञान उपशमलें । जेविं सूर्यप्रभेनें निवारिलें । काळोखें निशिजातं ॥ ३५ ॥ सचिताचा केला निर्वाळा । क्रियमाणीं जाहला उजाळा । प्रारब्धयोगें प्रज्वळला । कर्पूरन्यायें ॥ ३६ ॥ इच्छाप्रारब्धें स्वरूपआरत । उजळिलें अनिच्छा प्रारब्धसहित । दैविकप्रारब्धाचा अनत । योग उजळला ॥ ३७ ॥ ज्ञानाग्नीचा बंबाळ थोर । प्रकाशला विशुद्ध

---

१ रात्री मुळें झालेला. २ वासलात, निकाल.

सत्वकर्पूर । आरत उजळिलें चिदंबर । प्रत्ययें प्रकाशलें ॥ ३८ ॥ अध्यात्मशास्त्रप्रतीति । परमार्थसत्वाची उपशांति । अपरोक्ष अनुभवें निवृत्ति । होय व्यवहाराची ॥ ३९ ॥ तत्वता स्वरूपनिर्वाण । गुरुकृपे प्रारब्ध निदान । एवं त्रिविधा उपशमन । अनादिमायेचें ॥ ४० ॥

॥ श्लोक ॥ शास्त्रेण नश्येत् परमार्थसत्वं तथा परोक्षाद्व्यवहारनाशः । प्रारब्धनाशात्प्रतिभासनाश एवं त्रिधा नश्यति विश्वमाया॥

माया अनादि विचारें । पाहातां अभ्यंतर विश्वाकारें । साहा अनादि स्वभाव निर्धारें । विस्तारलीसे ॥४१॥ जीव अनादि मायेमध्यें । विक्षेप-आवरणरूप[1] संबंधें । आवरला जाय प्रारब्धें । सद्गुरुशिवें सोडविला ॥ ४२ ॥ शिव अनादि मायेत ज्ञान घन । स्वरूपानुभव सनातन । याचि अनादि स्वभावें निर्वाण । बोलिजे शिवासी ॥ ४३ ॥ विशुद्ध-ज्ञानस्वरूपें अभिन्न । हे हीं अनादि मायेंत संपूर्ण । अनादिस्वभावें चि विज्ञान । प्रतीतीनें पाहातां ॥ ४४ ॥ जीवशिव उपाधिभंजन । ज्ञान-प्रळयप्रभंजन । अनादि मायेंत विश्वनिदान । अनादि स्वभाव चौथ। ॥ ४५ ॥ अनादि मायेंत अविद्या अनादि । जियेसी बोलिजे साद्यंतादि। आदि अंत प्रगट आदि । पांचवा स्वभाव ॥ ४६ ॥ सत्स्वरूप पुरातन । चित्प्रकाशक नित्य नूतन । संचितयोग हा सनातन । अनादि स्वभाव साहावा ॥ ४७ ॥ हे सहाहि अनादि स्वभाव । संचित क्रियमाणेसीं जीव । प्रारब्धीं वसला अहंभाव । निवर्तविला सद्गुरूनें ॥ ४८ ॥ कोण्ही म्हणती सद्गुरुकृपेनें वेहिलें । संचित क्रियमाणेसीं सरलें । प्रारब्धमात्र असे उरलें । देहनिदानपर्यंत ॥ ४९ ॥ विद्यारण्यस्वामीचें द्रुत[2] । जे प्रारब्धमात्र असे उर्वरीत । तरी प्रारब्ध उरलिया अकल्पित । संचित उरलें चि असे ॥ ५० ॥ संचितीं क्रियमाण असे लागलें । क्रियमाण सरोन प्रारब्ध उरलें । परि त्या प्रारब्धींच पाहा चालिलें । असें तें क्रियमाण ॥५१॥ ज्या स्वप्नामाजि विश्व जालें। त्या स्वप्नींचें राज्य

१ आवरण म्हणजे वस्तूचें सत्य स्वरूप झांकून टाकणें, व विक्षेप म्हणजे त्यावर दुसऱ्या वस्तूचा भ्रम उत्पन्न करणें; अशा दोन शक्ति मायेच्या ठिकाणी कल्पिल्या आहेत. २ त्वरित.

करितां मळें । स्वप्न वोसरोन असे उरलें । स्वप्नीचें आश्चिर्य ॥ ५२ ॥ स्वप्नीचें आश्चिर्य जागृती । उमसे परि नसे निश्चयेसीं । तेविं स्वरूपानुभव प्रारब्धासी । प्रतिष्ठिलें विदेहकैवल्य ॥ ५३ ॥ परि हा देहसंबंध तत्वता । विदेह कैवल्य मूळ अहंता । स्फूर्ति ब्रह्माहस्मि स्वभावता । मुळीची वृत्ति ॥ ५४ ॥ ते वृत्ति चि निवृत्ति जालियावीण । नव्हे चि तत्वता ब्रह्म पूर्ण । वस्तुता जीव चि सनातन । वृत्तीसि आला चि नाहीं ॥५५॥ भवक्षोभ देखिला चि नाहीं जेणें । ज्यासी नसे चि जन्म ना मरण । देहविदेह संकल्पानें । जो विटाळला चि नसे ॥५६॥ त्यासी कैंचें संचित आणि क्रियमाण । नसे चि त्रिविधा [1]प्रारब्धअज्ञान । सप्त हि भूमिका निर्वाण । दृष्टीसि आला चि नाहीं जो ॥ ५७ ॥ या चि प्रतीतीनें निजहृदयीं । निरंजन वस्तु चि ठाईंच्याठाईं । निर्मळ निश्चळ निराश्रयी । निर्धूत उघडा ॥ ५८ ॥ घटीं मुक्त घटाकाश । पिंडीं मोकळा हा अविनाश । सदोदित निराभास । निरावकाश संचला ॥५९॥ तत्वता परब्रह्म स्वयें । तत्वता फुंज नसे चि सदोदय । तत्वता स्वरूपार्थें निरामय । पदीं मुक्त स्वभावें ॥ ६० ॥ एवं पिंडीं मुक्त पदीं मुक्त पूर्ण । या रूपासि आलें समाधान । म्हणऊनि स्वानंदमुक्त निरंजन । स्वमुक्त स्वभावें ॥ ६१ ॥ वस्तुता अद्वैतस्वरूप । कवणें करावें तयाचें रूप । आस्तिक्य स्वभावें चि अरूपाअरूप मुक्त निर्वाण ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ पिंडे मुक्तः पदे मुक्तो रूपे मुक्तः षडानन ।
रूपातीते च यो मुक्तः स मुक्तो नात्र संशयः ॥ १ ॥

अभिन्नस्वरूपप्रतीतीनें । सद्गुरुकृपा ज्ञानाजनें । निवळलें हृदय निरंजन । वसविलें सहज ॥ ६३ ॥ सहज स्वरूपाची व्यापकता । दृष्टत्वासि कांहीं च न येतां । अपरोक्ष ज्ञान तत्वता । निवळलें हृदईं ॥ ६४ ॥ त्या ज्ञानाचें अभ्यंतर । पाहातां न दिसे चि पारावार । दर्शनें चि सर्व विकार । निर्विकार जाले ॥ ६५ ॥ न दिसे ज्ञानरवितेज निर्धारें । नुमसे अखिल सृष्टीचें ज्ञान चेईरें । नुमसे आनंदचंद्राचें

[1] अवस्था.

उजिगरें । द्रष्टेनिर्वाण डोळां ॥ ६६ ॥ तेथें गेलिया निर्वाण धृति । ते परतोनि येईना मागुती । ते चि परंधाम अर्जुनाप्रति । निरूपिलें वासुदेवें ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।
यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥१॥ (भ. गी. १५-६)

सद्गुरुकृपा परंधाम । बोधत्रिधमार्गे आत्माराम । संकल्पशून्यनिरूपम । मोक्षगृहप्रवेश ॥ ६८ ॥ या परंधामीं प्रवेशिलियां । पुनरागमन नाहीं जया । तरि काय मोक्षगृहचि होऊनियां । असे तो तत्वता ॥ ६९ ॥ जो मुळींहूनि जाला नाहीं वेगळा । त्यासि केविं ऐक्याचा सोहळा । अथवा मुळींहूनि ऐक्य तयाला । ऐक्य ह्मणणें हें अघटित ॥ ७० ॥ अनेकवातीचा जुडा प्रकाशिला । येक चि प्रकाश दिसे तो आगळा । तेविं अनेकजीववृत्तिज्ञानउजाळा । काय निर्वाण मर्ह्मी ॥ ७१ ॥ तैसे जीवस्वरूपीं मिळाले । अवघे पावोनि येक चि जाले । कीं अनेकघट भंग पावले । घटारोप आकाशीं ॥ ७२ ॥ कीं अनेकजीवकुंभीं जीवन । मिळालें स्वरूपसिंधूंत संपूर्ण । केंवि जीवब्रह्म ऐक्यलक्षण । कळलें पाहिजे ॥ ७३ ॥ तें चि पुढें निरूपण । जीवब्रह्मऐक्यलक्षण । अभिन्न प्रतीतिसमाधान । अपरोक्ष विवरा ॥ ७४ ॥ श्रवणाचें मनन होय । तरी च स्वरूप प्रत्ययासि ये । विचाराचे उघडूनि नेत्र स्वयें । पाहावें अक्षरब्रह्म ॥ ७५ ॥ क्षरवृत्तीसि न येतां अर्थ होय । या चि अक्षरीं परमार्थ स्वयें । अर्थज्ञ अर्थ चि होऊनि पाहे । प्रथांतर स्वभावें ॥७६॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । प्रारब्धयोगनिवळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ७७ ॥ दशमरुद्रे षष्ट उल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ ब्रह्मविद । ज्ञेय ज्ञान ज्ञाता सत्व विशुद्ध । जीवब्रह्मैक्य अनुवाद । कवणेपरी ॥ १ ॥ आधीं जीवाचें अभ्यंतर । मग पाहावें ब्रह्म साचार । जीव चिदाकाश निरंतर । ब्रह्म त्यातें चि बोलिजे ॥ २ ॥ हृदयाची ग्रंथी ज्ञानाज्ञान । पाहावी गुरुकृपेनें सोडून । तेव्हां सर्व संशयाचें दहन । ज्ञान अपरोक्ष आतुडे

॥ ३ ॥ वृत्ति संकल्प कर्में अपार । जाती भ्रष्ट होऊनि साचार । परा-वर दृष्टीनें निर्विकार । अद्वैत वस्तुता ॥ ४ ॥ आपण आणि परब्रह्म । ऐसा नाडळे चि कांहीं सभ्रम । वेगळीक अथवा ऐक्य परधाम । स्फूर्तिचि तेथें असेना ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥ भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यते सर्वसंशयाः ॥
क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे ॥ १ ॥

जेथें दृश्य द्रष्टा ना दर्शन । त्याचि रूपें पैं आपण । अपरोक्षप्रतीतीनें पूर्ण । ज्ञान मावळे ॥ ६ ॥ प्रतिष्ठा व्हावी जयाचे स्वरूपीं । तो चि नाडळे तत्वता अरूपीं । अपरोक्ष याचि अर्थे निर्विकल्पीं । आलें ज्ञानासी निदान ॥ ७ ॥ चिद्वर गाभा सूर्यबिंब । मावळे स्वयंभ चिद्बिंब । उपशमलें नित्य निर्बिंब । तया चि सरिसें ॥ ८ ॥ ज्योतींत सामावलें स्नेह संपूर्ण । ज्योतीनें आक्रमिलें चिद्गगन । चिद्गगनाचें अनुसंधानें । वितुळलें सहज ॥ ९ ॥ चिदामृत अनुसरलें वदन । वदन माधुर्य तृप्ति अनुसरोन । दहराकाशीं सनातन । सामावलि तृप्ति ॥ १० ॥ महावाक्यसुधासार-स्वत । अर्थे विवरें श्रवणासी येत । अर्थज्ञानेंसी उपरमत । विसावलें जाय हृदयीं ॥ ११ ॥ येथें आश्चर्याचें आश्चर्य जालें । चमत्कारेंसीं ज्ञान हारपलें । बोधक्रमासि बुडविलें । निर्वाणदशेनें ॥ १२ ॥ गुरु-कृपाक्रमरहित क्रम । सप्रतीत परधाम । जेथें सगळें चि जाय व्योम । हारपोनियां ॥ १३ ॥ तेथें अर्थ ना अर्थविता । कैंचा अर्थज्ञ वक्ता श्रोता । सहज सिद्ध अपरोक्षता । भेदाभेद असे चि ना ॥ १४ ॥ धन्य गुरुकृपेचें महिमान । जेथें महा अद्वैतासी अवसान । तेथें बोधें रूढविलें समाधान । भिन्नपणासी न येता ॥ १५ ॥ अभिन्न निजांगीं अपरोक्षज्ञान । अभिन्नप्रतीतीचें समाधान । अभिन्न होतसे श्रवण । गुरुशिष्यक्रमान्वयें ॥ १६ ॥ शब्दासी श्रवण समरलें । अर्थासीं मनन

---

१ मुंडकोपनिषत् । २ हें ब्रह्मस्वरूप साक्षात् जाणल्याने हृदयाची गांठ ( माया पाश ) तुटते, सर्व संशयांची निवृत्ति होते, व कर्मबंधन नाहीसे होते. २ स्थैर्य. ३ स्वरूप हेतु, अवस्था.

प्रवर्तलें । शब्दार्थासी विवरलें । ऐक्य मुळींचें मुळीं ॥ १७ ॥ अरूप रूपासि आलें नयन । पाहातां दृष्टिवाण दर्शन । द्रष्टा ना साक्षी सनातन । ऐक्य सहजचि मुळींचें ॥ १८ ॥ प्रबोधासि स्वरूप अनुसरे । ऐसें प्रतीतीसि आलें बरें । वेदविधिबोधनिर्धारें । मुळींचेंचि ऐक्य हें ॥ १९ ॥ उमसळीच नाहीं सद्रूपता । अभिन्नप्रतीति तद्रूपता । तेथें सत्स्वरूपाची समता । उमसेल कवणा ॥ २० ॥ स्वरूपें कैसें करावें स्मरण । केविं ब्रह्में कीजे ब्रह्मार्पण । अपरोक्षसिद्धीचें समाधान । केविं अपरोक्षें कीजे ॥ २१ ॥ नित्यानित्यता नुमसे काहीं । ते नित्यता अनुभवील काई । वस्तुसी आठवविसर कदापि हि । असेचि ना तो ॥ २२ ॥ वस्तु वस्तुत्वें उमसेना । स्वभावें चि निवळलें ज्ञाना । त्या अभिन्नज्ञानासीहि असे चि ना । अवकाश तेथें ॥ २३ ॥ निरावकाश देखोनि त्वरा । परतोनि व्हावें यासि पाठिमोरा । ज्ञानाचेंहि येकसरा । पाउल हि न शिरके ॥ २४ ॥ दाटिलें विज्ञानघनासि पूर्ण । घनवटलें आनंदासी सनातन । आटलें अनुभवसिंधुजीवन । निरावकाशीं तया ॥ २५ ॥ आतां मोघि ना पुढें अवकाश । घनवटला तो निरावकाश । स्वरूपांवरीं निर्विशेष । विज्ञानआटणी ॥ २६ ॥ विदेहकैवल्यपंचत्व । आकळिलें मुळींचें मुळीं तत्व । चिणूनि टाकिलें अखंडत्व । ज्ञान निरावकाशें ॥ २७ ॥ याचि उत्तरदशेनें उत्तरोत्तर । जाले तत्सत्परात्पर । प्रांतिकविधीनें निरोत्तर । अक्रिय सहजें ॥ २८ ॥ ज्ञान निदान प्रांतिकविधि । दिधली स्वयंभ समाधि । स्वतःसिद्धता उपलब्धि । अपरोक्ष स्वरूपें ॥ २९ ॥ विज्ञानपूर्णसमाधि । पावलो उपशांतीतें सिद्दि । सत्स्वरूपयोगें निरवधि । महासमाधिदशेनें ॥ ३० ॥ गुरुअनुग्रहकृपाकरें । चिदंबरगर्भीं नित्यनिर्धारें । दिल्ही समाधि साक्षात्कारें । अखंडितवस्तु ॥ ३१ ॥ येक येक सिद्धांची समाधि । पाहातां अनंत स्वरूपीं सिद्धि । परि चिन्ह चि न दिसे निरवधि । स्वरूप चि सगळें ॥ ३२ ॥ याचि समाधीनें पहिलें । जे स्वरूपीं समाधिस्थ जाले ।

१ मार्गे. २ शेवटच्या.

ते ते परतोनि नाहीं आले । संकल्पासि पुढाती ॥ ३३ ॥ संकल्पशून्य वस्तु त्रिशुद्धि । जितेचि दिधली नित्य समाधि । जन्ममरणाची अवधि । असेचि ना तया ॥ ३४ ॥ अखंडैकरस अमृतसिद्धि । स्वरूपजनन समाधि । बाणली गुरुकृपा प्रसिद्धि । समाधिद्वारें ॥ ३५ ॥ स्वरूपभूमिका. निर्वाण । आत्मनिष्ठयोगी सुलीन । विदेहकैवल्य सनातन । स्वरूपयोग समाधि ॥ ३६ ॥ निजयोगयुक्तप्रसिद्ध । स्वरूपसमाधिसिद्ध । त्यास्तव स्वरूप चि समाधि शुद्ध । बुध कैवल्यप्रतिष्ठा ॥ ३७॥ संतस्वरूप कैवल्यदेह । सकळ तीर्थांचें माहेर स्वयें । तेथें पावन होती या निश्चयें । साधुपदसत्कारें ॥ ३८ ॥ साधु निर्विकार स्वरूप । साधूचें शरीर निर्गुणरूप । साधूचा प्रबोध निर्विकल्प । संकल्पशून्य करी ॥ ३९ ॥ स्वरूपसाक्षात्कारी निरंतर । जाले सुस्नात अगोचर । स्वरूपानुभव साचार । बुडाले स्वरूपडोहीं ॥ ४० ॥ स्वरूप निरावरण सागरीं । विराले स्वानंदघनगिरी । परतोनि यावयासि माघारीं । उरे असे चि ना ॥ ४१ ॥ जे निरावरणडोहीं बुडाले । ते कदापि परतोनि नाहीं आले । तयाचे शुद्धीसी जे जे गेले । ते ते जाले तद्रूप ॥ ४२ ॥ सकळांचें निदानस्थळ । सुखैकघनवस्तूचें अकळ । स्वानंदागार प्रतातकल्लोळ । आटले स्वरूपघरेंसी ॥ ४३ ॥ जेविं निरंधन वन्हीचें मंडळ । आटवि कल्पांतीचें जळ । तेविं स्वरूपवस्तूचें सकळ । नाहींसें गेलें तत्वज्ञानीं ॥ ४४ ॥ तुटलें जन्मप्रवृत्तीचें[1] मूळ । सुटलें सकळपापासूनि सकळ । हा स्वरूपसमावेश केवळ । अपरोक्ष दशेचा ॥ ४५ ॥ निरोपिली सिद्धप्रतीति स्वयें । पुढें साधकप्रतीति क्रमान्वयें । सप्तभूमिकाज्ञानप्रमेयें । अवधारिजे श्रोतां ॥ ४६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । विज्ञानसिद्ध अवसानलिळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ४७ ॥ दशमरुद्रे ॥ सप्तमउल्लासः संपूर्णः ॥

---

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ तत्व संत । समाधि भूमिका

---

१ जीवतपणीं च.

बोध विदित । परमशुध्दसत्वें अखंडित । अनुभवदशा ॥ १ ॥ निरु-पाधि ब्रह्मज्ञान । वशिष्ठअनुग्रहें निजनिर्वाण । अनुभविता होय रघु-नंदन समाधिसुखें ॥ २ ॥ वसिष्ठयोगें भूमिका क्रम । जाणे प्रतीतीनें आत्माराम । भूमिका अतिक्रांतें परम । वस्तुचि तो स्वयें ॥ ३ ॥ भूमिका भिन्नभिन्न प्रकारें । बोलती कितीयेक मतांतरें । असोत दुस्तर्के ते निर्धारें । प्रसिध्दीसी पाविजे ॥ ४ ॥ वादक बहुभेदें करूनि । बोलती भूमिका शब्दज्ञानी । अफाट वर्जिल्यां त्या सज्जनी । पाषांड ह्मणवोनियां ॥ ५ ॥ छळवाद असेल जेथें । विश्रांति काय होईल तेथें । ह्मणवोनि मत्सरेंरहित समर्थें । योगवाशिष्ठीं नेमिल्या ॥ ६ ॥ जो ज्ञानीयाचा पूर्ण ईश्वर । ब्रह्म चि ब्रह्मरूपी साचार । योगियाचें भूषण थोर । प्रख्याति जयाची ॥ ७ ॥ शांतीचा अक्षोभ सागर । समाधीचा केवळ निर्धार । स्वसुखाचा होय गिरिवर । अढळस्थितीनें ॥ ८ ॥ तपस्वरूपी वैश्वानर । प्रबोधदर्शचा प्रभाकर । कल्पतरुह्नि होय उदार । दाता आत्मज्ञानें ॥ ९ ॥ गिरा अमृत संभाषणी । स्वानंद-पद समाधानी । निरुपमदशा योगाग्रणी । वसिष्ठ भगवान ॥ १० ॥ पवित्रामध्यें वरिष्ट पूर्ण । समाधिदशासुखैकघन । स्वरूपकरतळामळ ज्ञान । विस्तारें कथिलें ॥ ११ ॥ उभऊनि मोक्षकरध्वज । बोधनिश्चयें वाक्य सतेज । प्रगट वेदहृदय गूज । अनुवादला ॥ १२ ॥ तें योग-वासिष्ठीं निरूपण । बोलिलें जविन्मुक्तप्रकरण । तेथें सप्तभूमिकों-पाख्यान । प्रांजळ केलें ॥ १३ ॥

॥ श्लोक ॥ वेदंति बहुभेदेन वादिनो योगभूमिकां ॥
मम त्वभिमता नूनमियमेव सुखप्रदा ॥ १ ॥

विशेष या अभिप्रायें करून । ब्रह्मऋषिप्रोक्त ब्रह्मज्ञान । भूमिकाअन्वयें चि कहून । हृदयासि आणिजे ॥ १४ ॥ याची प्रतीति येतां अभ्यं-

१ योगवासिष्ठांत सांगितलेल्या सात भूमिकांचा क्रम. २ त्या भूमिका ह्मणजे अवस्था उलटून गेल्यावर. ३ मत्सर. ४ वाणी. ५ योग भूमिकांचे नाना प्रकार वावदूक लोकांनीं मानिले आहेत, पण ( वसिष्टमुनि ह्मणतात, ) त्यांतील ( पुढें सांगितलेला) सप्तभूमिकांचा प्रकार च मला आभमत आहे. ६ वषिष्ठानें सांगितलेलें.

तरीं । होय विश्रांतीची भरोवरी । महासाक्षात्कार स्वकरीं । मोक्षमणी आतुडे ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ अवबोध विदुर्ज्ञानं तदिदं सप्तभूमिकं ।
मुक्तिसुज्ञेयमित्युक्तं भूमिकाकर्णनादथ ॥ १ ॥

प्रथमेपासूनि सप्तपरियंत । पृथक्काकारें अभ्यासयुक्त । भूमिकानामरूप विख्यात । एवं प्रकारें ॥ १६ ॥ प्रपंच हा तव अशाश्वत । जाणोनि वाटे करावें हित । अमुक यत्नासी प्रवर्तत । अनुतापस्थितीनें ॥ १७ ॥ वाटे काय उगेचि बैसोनि । व्यर्थ चि होते आयुष्यहानी । उपजे सद्भाव अंतःकरणीं । शास्त्रश्रवण आवडे ॥ १८ ॥ सत्समागमीं प्रेमा । भक्तीनें भजे परमात्मा । धरूनि श्रवणीं नित्यनेमा । विवरों लागे ॥ १९ ॥ दृढाविलें अद्वैतश्रवण । हे चि प्रथमभूमिका पैं जाण । श्रवणमननीं अनुसंधान । शुभेच्छा म्हणिजे इयेसी ॥ २० ॥

॥ श्लोक ॥ स्थितः किंनु मुधैवास्मिन् वक्ष्येऽहं शास्त्रसज्जनैः ।
वैराग्य पूर्वमिच्छति शुभमिच्छेत्यथ ते बुधाः ॥ १ ॥

द्वितीयभूमिकालक्षण । सद्गुरुसहवासें पूर्ण । बरवें अर्थांतर निवळोन । निजविचारीं प्रवर्ते ॥ २१ ॥ विमळ सदा कर्माचरण । वैराग्यपूर्वक साधन । तत्वता निजअनुसंधान । राखे ते चि विचारणा ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ शास्त्रसज्जनसंपर्काद्वैराग्याभ्यासपूर्वक ।
सदाचारप्रवृत्तिर्या प्रोच्यते सा विचारणा ॥ १ ॥

तृतीय भूमिकाअभ्यंतरीं । इंद्रियें मुरडूनि माघारीं । दहराकाशनिर्धारीं । अवरोधितसे ॥ २३ ॥ बाह्यवृत्तीसि नाणिता । स्वरूपसुखासिधृतें अव-

१ हें सप्तभूमिकाचें ज्ञान मोक्षात्मक आहे त्याच्या श्रवणानें मोक्ष प्राप्तिच होते.
२ योगवासिष्ठातील म्हणून दिलेले हे श्लोक त्यांत असे च सगळे अ द्याला सांपडले नाहीत. यांत अशुद्धें फार दिसतात, म्हणून विद्यारण्यांच्या जीवन्मुक्तिविवेकांत (४ थें प्र.) हे श्लोक जसे आढळले तसे येथ टीपांत देतों 'स्थित किं मूढ एवास्मि प्रेक्षेऽहं शास्त्रसज्जनैः । वैराग्यपूर्वमिच्छेति शुभेच्छेत्युच्यते बुधैः ॥ ३ शास्त्रसज्जनसंपर्कवैराग्याभ्यासपूर्वकम् । सदिच प्रवृत्तिर्या प्रोच्यते सा विचारणा ॥

चिता । अभ्यासद्वारें विश्रामता । दृढावों पूर्ण ॥ २४ ॥ ब्रह्माद्धारणाचित्त । तन्मयानंदीं विगळित । सुखोपलब्धीनें निवांत । विसांवतसे ॥ २५ ॥ ताटस्थता मनासी पूर्ण । साधक होय विस्मयापन्न । इंद्रियें आणि विषयता ज्ञान । आडळेना हे तनुमानसा ॥ २६ ॥ हृदयमानससरोवरीं । हंस विसावत विहार करी । साक्षात्कारअभ्यंतरीं । बोलिजे तनुमानसा ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ विचारणाभ्यासताभ्यामिन्द्रियार्थेऽनुरक्तता ।
यत्र सा तनुतामेति प्रोच्यते तनुमानसा ॥ १ ॥

भूमिकात्रयानिर्धारें । निजध्यासअभ्यासद्वारें । पैसावत स्वसुखीं आदरें । प्रतीतीसी येती ॥ २८ ॥ चतुर्थ भूमिका सत्वापत्ति । होय स्वरूपाची सुखावाप्ति । सत्व उपरमोनि प्रतीति । होय केवळ ॥ २९ ॥ सत्वापत्तिदशानिर्वाण । स्वानंदघन निरावरण । जेथें प्रतीतीचे चि प्रमाण । हारपलें सुखें ॥ ३० ॥ हे सद्गुरुकृपेची भूमिका । मुख्य सस्वरूपदायका । ये भूमिकेवरि निश्चयात्मका । भूमिका चि नाहीं ॥ ३१ ॥ इयेतें चि बोलिजे सुलीन । वेदांत अभिप्रायें करून । च्यारि भूमिका लक्षण । निरोपिलें असे ॥ ३२ ॥ विक्षेपता गता याता । संश्लीनता सुलीनता । याचा विवंचना तत्वता । निरोपिजेल पुढती ॥ ३३ ॥ विक्षेपतेचें निजलक्षण । विटलें प्रपंचासी मन । अनुतापयुक्त अनुसंधान । विक्षेपरूप अंतरीं ॥ ३४ ॥ नाहीं स्वरूपाचें समाधान । नसे प्रपंचाचें अवधान । अंतर पिशाच अनुदिन । विक्षेपें प्रवर्ते ॥ ३५ ॥ रात्रि न जाय दिवस न लोटे । विश्रांति चि न वाटे कोठें । सज्जनसहवासें निकटें । अर्थांतरें विवरे ॥ ३६ ॥ निर्विकल्पीं फुटेना मन । मौढ्य अवस्था अचेतन । संकल्पबोधेंवा अज्ञान । अनुतापयुक्त ॥ ३७ ॥ हे चि जाणिजे विक्षेपता । आतां अवधारिजे गतायाता ।

---

१ हें तिसऱ्या भूमिकेचें नांव. २ शास्त्र व सज्जन यांच्या संपर्कानें व अभ्यासानें विषयांची आवड कमी होणें या अवस्थेला तनुमानसा म्हणतात. ' विचारणाशुभेच्छाभ्यामिन्द्रियार्थेष्वसक्तता । यत्र० ॥

स्वरूप निदिध्यासें, तत्वता । काहींसी प्रतीति आली ॥ ३८ ॥ पडे प्रवृत्तीचा विसर । स्वरूपधारणा चुरे श्रर । विस्मयापन्न अभ्यंतर । पुन्हा वृत्तीसि ये ॥ ३९ ॥ जैसी अभुक्त अबळा । मानसिकभोगार्जि- न्हाळा । पुरुषीं चि वसे अवळीळा । योगें चुकावित ॥ ४० ॥ क्षण- येक वृत्ति चिदान । क्षणयेक सुखानें अनतरण । हें गतायातांचें लक्षण । मननीं पवाडे ॥ ४१ ॥ आता सश्लीनता ते कैसी । विश्रांतीची मांदु- सें जैसी । जे स्वानदतुळिकेसी । प्रतीतीनें आरुढे ॥ ४२ ॥ निर्वि- कल्प सस्थान सुख । मावळला निजउलेख । सदोदित सुखसन्मुख । घोळली दशा ॥ ४३ ॥ व्युत्थानासी येतसे परि । जेविं स्वानंदसिंधूची लहरी । तळ घेऊनि प्रतीतिवरी । उफाळत सुखें ॥ ४४ ॥ विक्षेप- तेसी श्रवणाभ्यास । मनन होय गतायातेस । सश्लिष्टतेसी निदिध्यास । साक्षात्कारेंसीं ॥ ४५ ॥ हे चि तृतीय भूमिकेची स्थिति । परिपक्व- दशा विश्रांति । दृढावोनि उन्मनिप्रतीति । सुलीनतेसी जाय ॥ ४६ ॥ स्वानदीं राहे सनातन । शर्करापाकीं मक्षिका विरोन । होय शर्कराचि सपूर्ण । वृत्ति तैसी समरसे ॥ ४७ ॥ परतोनि वृत्तीसि न ये । स्वरू- पार्णवीं विरोनि जाय । चित्कल्लोळसुखें होय । आठवासि कारण ॥ ४८ ॥ जेविं जळीं कल्लोळाकृति । उदकरूप मीन अभ्यासती । परि ते मछ म्हणोनि हातीं । न येती धरितां ॥ ४९ ॥ सुलीनता हे चि पाहीं । न धरी प्राप्तीचा फुज काहीं । सुलीन भूमिकाहृदयीं । परब्रह्मरूप ॥ ५० ॥ नव्हे हे भूमिका बोलिजे ऐसी । नाहीं समाधीचा लेश जियेसी । वृत्तिनिर्देश निश्चयेसीं । निर्दोष भूमिका ॥ ५१ ॥ हे निर्वाणभूमिकेवरी । भूमिका चढेना दुसरी । तरी सप्तभूमिकानिर्धारीं । उरल्या भूमिका त्रय ॥ ५२ ॥ त्या भूमिकात्रयाचें लक्षण । विचारें पाहातां असे भिन्न । देहप्रारब्धरूढीनें पूर्ण । सत्वबळें रूढल्या ॥ ५३ ॥

१ घी.

॥ श्लोक ॥ भूमिकात्रितयाभ्यासाच्चित्तेऽर्थे विरतेर्वशात् । [1]
सत्वात्मनिश्चिते शुद्धे सत्वापत्तिरुदाहृता ॥ १ ॥

सत्वापत्ति नित्यबोधयुक्त । साधनसमाप्तीनें नित्यमुक्त । अनुभवामृत सुखभुक्त । विरक्त विश्रांति ॥ ५४ ॥ हे सद्गुरुकृपा परिपूर्ण । सत्वापत्तिदशा सुलीन । सर्वदा वृत्तिविहीन । नसेचि समाधिस्थिति ॥ ५५ ॥ सद्गुरुकृपा नित्यमुक्तता । साक्ष्यत्वातीत ब्रह्मवस्तुता । त्या ब्रह्मरूपासि पाहातां । कैंचि समाधि ॥ ५६ ॥ हे नित्यप्रतीतीनें अभ्यंतर । चौथे भूमिकेसी साक्षात्कार । देहचत्वारसंस्कार । ज्ञानाग्नीनें सारिला ॥ ५७ ॥ आतां प्रारब्धयोगवशें । लोकदृष्टया वृत्तीच्या लेशें । अवस्था समाधिरूप तोषें । सत्वीं रूढल्या ॥ ५८ ॥ तो पांचवीचा समाधिस्थ । असे समाधि सुषुप्तियुक्त । निद्रा पुरोनि स्वसुखभुक्त । ये जागृतीसी ॥ ५९ ॥ असंसक्तनामिका जाण । पांचवी भूमिका निर्वाण । नामरूपाचें निदान । उन्मेषपर सर्वदां ॥ ६० ॥

॥ श्लोक ॥ दशाचतुष्टयाभ्यासादसंसर्गफला भृशं । [2]
रूढसत्वचमत्कारा प्रोक्तासंसक्तनामिका ॥ १ ॥

साहावे भूमिकेचा समाधिस्थ । पदार्थाभाविनीनें विख्यात । जैसी निद्राळु नित्य निद्रिस्थ । तैसा अवस्थाविहीन तो ॥ ६१ ॥ स्वयें जागृतिअवस्थेसि न ये । साक्षेपेंसीं जागृतीसि ये । स्वानंद उन्मनी माजि स्वयें । समरसत्वासे सुखें ॥ ६२ ॥ निर्विकल्प निष्कळंक । घेऊनिया निर्वाणबैसक । होते जडभरतादिक । हे चि भूमिकेसी ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ भूमिकापंचकाभ्यासात् स्वात्मारामतया दृढा । [3]
अभ्यंतराणां बाह्यानां पदार्थानामभाविनी ॥ १ ॥

---

१ भूमिकात्रितयाभ्यासाच्चित्तेऽर्थे विरतेर्वशात् । सत्त्वात्मनि स्थिते शुद्धे सत्त्वापत्तिरुदाहृता ॥ २ दशाचतुष्टयाभ्यासादसंसर्गफला तु या । रूढसत्त्वचमत्कारा प्रोक्ताऽसंसक्तिनामिका ॥ ३ भूमिकापंचकाभ्यासात्स्वात्मारामतया भृशम् । आभ्यंतराणां बाह्यानां पदार्थानामभावनात् । पदार्थाभाविनी नाम षष्ठी भवति भूमिका ॥

सातवे भूमिकेचें लक्षण। निरानंदसुखें निर्वाण। स्वव्युत्थान ना परव्युत्थान। असे चि ना तया ॥ ६४ ॥ तो सचेतन चि अचेतन। कांहीं च नेणे गुणागुण। तनू पडतां वागतां मान। देहाचें असे चि ना ॥ ६५ ॥ जैसा वृक्ष सचेतन। नेणे अंतःकरणादिस्मरण। तैसा निर्विकल्प निर्गुण। पूर्णसाक्षात्कारें ॥ ६६ ॥ अद्भुत भूमिका हे अभिनव। विशुध्धसत्वें गळितभाव। तेणें चि दढावे देहस्वभाव। असे चि ना शरीरीं ॥ ६७ ॥ सातवे भूमिकेचा ऋषभदेव। पूर्णकाष्ठवतस्वभाव। निर्विकल्प अंतर्भाव। दढावली महास्थिति ॥ ६८ ॥ नेणे चि तनु हे बैसली। अथवा प्राणसंस्कारें वर्तली। जैसी शिरच्छेदावरी जाली। क्रिया देहसंस्कारें ॥ ६९ ॥ जेथें ते अवस्था महानिर्वाण। प्रवृत्तिज्ञानाविना संचरण। वनीं विचरतां निष्कारण। स्वभावस्थितीनें ॥ ७० ॥ तेणें जन वन विजन। नेणे वनांतरीचें विचरण। तेणें जाळींसीं जैट अटकून। तनु अवरोधिली नेणे ॥ ७१ ॥ नेणे चि वनीं पेटवा लागला। तेणें देह जळोनि गेला। तोही नाहीं च जाणवला। निर्वाण भूमिकेभरें ॥ ७२ ॥ जैसें महाउन्मादद्रव्य तें। गाढ मूढ करी देहातें। प्रत्यक्ष देह छेदितां त्यातें। दुःख स्फुरों नेदि च ॥ ७३ ॥ हा अवस्थांतरें भेद पूर्ण। असे मूळवृत्तीचें अवरोधन। सत्वाधिक्यतेणें रूढिली निर्वाण। तुर्यगा सातवी ॥ ७४ ॥ हे महासमाधिसुखें अचेत। काष्ठ लोष्ठ पाषाणवत। तूर्यगाभूमिकेचा समाधिस्थ। देहनिदानी उमजे ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ भूमिषट्कचिराभ्यासात् भेदस्यानुपलम्भतः।
नैषः स्वभावनिष्ठत्वं सा ज्ञेया तुर्यगामृता ॥ १ ॥
इह राम महाभाग सप्तमीं भूमिका गतः।
आत्मारामो महात्मा स श्रीमानात्मपदं गतः ॥ २ ॥

---

१ विरोध. २ जटा, केस. ३ वणवा. ४ क्लोरोफार्म सारखा गुंगी आणणारो पदार्थ. ५ भूमिषट्कचिराभ्यासा द्भेदस्यानुपलम्भनात्। यत्स्वभावैकनिष्ठत्वं सा ज्ञेया तुर्यगा गतिः ॥

या सप्त भूमिका अनुक्रमें । अनुभव सत्वाधिक विक्रमें । प्रारब्धी अवस्था-त्रय अतिक्रमें । अवस्थारूप रूढल्या ॥ ७६ ॥ येक अनुभव नसतां केवळ । सप्त हि भूमिका वृत्तिमूळ । भूमिकाअभ्यासें सुखप्रबळ । दिसे तार-तम्य ॥ ७७ ॥ समाधिवरूनि उतरे । तेव्हां साक्षत्व सुखें चि विस्तारे । समाधिसुखाच्या आठवें स्फुरे । अभ्यंतर तयाचें ॥ ७८ ॥ जैसी सुख-भराची निद्रा भंगे । तेव्हां क्षोभलें मानस वेगें । निद्रेसि आठऊनि त्या प्रसंगें । येतसे विक्षेपासी ॥ ७९ ॥ तैसें चि हें अवस्थाजनित सुख । अवस्थाभेदें होतां विन्मुख । सुखाचें चि त्या सोळीव दुःख । सुखास्तव क्षोभवी ॥ ८० ॥ याकारणें स्वरूप तें निष्कळंक । तेथें नलगे चि समाधिमय कळंक । सप्त हि भूमिका माईक । माया सूक्ष्मरूपें तेथें ॥ ८१ ॥ नित्यमुक्त ब्रह्म स्वभावें । त्यासि भूमिकेसीं काय यावें । निर्गुण निराश्रयें वास्तवें । आस्तिक्य सहज ॥ ८२ ॥ परब्रह्मीं च नित्यमुक्तता । ते अवस्थेनें नये चि हाता । तेथें समाधिअवस्था तत्वता । कांहीं च नाडळे ॥ ८३ ॥ संकल्पशून्य मुळींहूनि[1] । ते तत्व-ता स्वरूप विद्यमानी । हा सत्वापत्तींत निदानी । अनुभव जाला ॥ ८४ ॥ त्या अनुभवीं च अनुभव निर्माण । तेथें प्रारब्धासी कैंचें प्रमाण । प्रारब्धदृष्टीनें भूमिका धरून । रूढविल्या समाधि ॥ ८५ ॥ संप्रज्ञात असंप्रज्ञात । समाधिद्वय या विख्यात । सविकल्प निर्विकल्प म्हणिजेत । तयातें चि जनीं ॥ ८६ ॥ असंसक्तनामिका पांचवी । जागृतियुक्त सुषुप्ति जाणावी । सविकल्प निर्विकल्प अनुभवी । पांचवीचा समा-धिस्थ ॥ ८७ ॥ पदार्थभाविनी साहावी । स्वप्नयुक्त निद्रा अनुभवी । स्वप्नींचें जागरण जिथीं । निर्विकल्पता अखंड ॥ ८८ ॥ देहीं निद्रा पूर्ण निर्विकल्प । जीवीं ब्रह्मानुसंधान विकल्प । जागृतीसि न यावें हा संकल्प । दृढेंनि राहिजासे ॥ ८९ ॥ त्यास्तव अवस्थाविसर्जन । निर्वि-कल्प समाधीचें व्युत्थान । सविकल्पतेनें जगद्भान । आडळों लागे ॥ ९० ॥ तुर्यगा भूमि सातवी । ते केवळ निद्रारूप जाणावी । देहीं

[1] उतरणें.

निदान अनुभवी । मूळजागृतीसि ये ॥ ९१ ॥ जागृती स्वप्न सुषुप्ति । गळींव अवस्था जयिं होती । तैं या समाधि रूढती । प्रारब्धीं ज्ञानियाच्या ॥ ९२ ॥ योधें निरसलें जगज्ञान । स्वरूपप्रतीतीनें अभिन्न । जाहालें परम समाधान । ऐसें असतां ॥ ९३ ॥ कोण्ही येकवेळेसि निदान । होय अखंडीत समाधान । कोण्ही येकवेळेसी जगज्ञान । भासे अवस्थाभेदें ॥ ९४ ॥ हे तरि खंडाखंड वृत्तिज्ञान । नव्हे चि अपरोक्ष समाधान । जैसें स्वप्नींचें दृश्यमान । जागृतिसी भासे ॥ ९५ ॥ भावी विश्वभास तैसे परी । विदेह कैवल्य देहधारी । हा अवस्थारूप संस्कारी । सत्यता ब्रह्म नव्हे ॥ ९६ ॥ ब्रह्म चि होऊनि ब्रह्मनिष्ठ । हें ही निजानुसंधान हें उत्कट । तो ब्रह्मज्ञानीचि परि निकट । ब्रह्म नव्हेति सर्वथा ॥ ९७ ॥ ब्रह्मासी ब्रह्मत्वें कांहीं नसे । तेथें समाधीसी कारण कायसें । आत्मप्रतीतीसि न दिसे । साहोस काहीं ॥ ९८ ॥ केवळ अनुभऊनि नित्य तृप्ति । अक्षयानंद घनप्रतीति । निजयोगी अनुभविती । ब्रह्मसुखें सर्वदां ॥ ९९ ॥ हे साधकअनुक्रमस्थिति । नसेचि सिद्धस्वरूपासि प्रसक्ति । परि निजानुसंधान प्रतीति । निर्वाणसुखें ॥ १०० ॥ हे चि केवळ सहजस्थिति । वसिष्ठादि योगी अनुभविती । नित्य जागृतीची जागृती । सहजस्थिति या अर्थें ॥ १ ॥ हे सिद्धानुभवदशा पूर्ण । निःसंदेह नित्य निर्भन । स्वानंदसमुद्रीं सुलीन । अभिन्नानुभवें ॥ २ ॥ महायोगी कपिलादिक । सिद्धाचा सिद्ध कैलासनायक । अनुभवितसे निष्कळंक । स्वरूपामृत सुखें ॥३॥ जेणें अमृतासीं असेचाखिलें । तेणें सकळ रसासी अव्हेरिलें । पाकसिद्धाचें घोसरलें । कार्य तयापासूनि ॥

॥ श्लोक ॥ यथामृतेन तृप्तस्य कृतकृत्यस्य योगिनः ।
नैवास्ति किंचित्कर्तव्य अस्ति चेन्न स तत्ववित् ॥ १ ॥

१. १ सायास. २ अमृतपानानें तृप्त झालेल्याला आणखी कोणत्या हि पदार्थांची चव घेण्याचें जसें उरत नाहीं, त्याप्रमाणें कृतकृत्य झालेल्या योगसिद्धाला कोणतीहि गोष्ट कर्तव्य म्हणून शिल्लक रहात नाही, आणि तशी ज्याची राहिली तो तत्वज्ञानी च नव्हे. हा श्लोक उत्तर गीतेंत १।२३ असून त्यांत ' यथामृतेन ' बद्दल ' ज्ञानामृतेन ' असा व ' नैवास्ति ' बद्दल ' न चास्ति ' असा पाठ आहे.

ते चि पुढें निरूपण । समाधीचें प्रांजळ लक्षण । जीवन्मुक्तदशेनें अवधान । देऊनि अवधारा ॥ ५ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । सप्तभूमिकायोग निवळा । म्हणे मेरुअनंत ॥ १०६ ॥ दशमरुद्रे ॥ अष्टमउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ स्वतःसिध्द । परब्रह्मस्वरूप प्रसिध्द । अविछिन्न उन्दोधी अबोध । द्रष्टाचि नसे स्वभावें ॥ १ ॥ तेथें प्रवृत्ति ना निवृत्ति । तेथें बोध ना बोधक शक्ति । तेथें बंधन ना जीवनमुक्ति । संकल्पचि असेना ॥ २ ॥ तेथें उपाधिरूप नसेचि आधी । तेथें कैंचि निरुपाधि समाधि । हे तत्वता आत्मशुध्दि । अविछिन्नयोगें ॥ ३ ॥ अविछिन्नयोगें नित्यमुक्तता । अविछिन्नयोगें स्वरूपतत्त्वता । अविछिन्नयोगेंचि आभासता । मायाचि निरसे ॥ ४ ॥ प्रतिबिंबपक्ष जाळियां । निरसेचिना सूक्ष्म माया । तेव्हां प्रतिबिंबपक्षें यावां । दुस्तरीं सिणावें ॥ ५ ॥ प्रतिबिंबपक्ष करूनि जाण । अविछिन्नपक्षासि यावें शरण । तस्मात् अविछिन्नपक्षावांचून । रीघ नाहीं स्वरूपीं ॥ ६ ॥ जेविं वज्रचि वज्रा निर्वाण । तेविं ज्ञानचि ज्ञानाचें निदान । तैसा अविछिन्नपक्ष अभिन्न । स्वरूपीं सरता होय ॥ ७ ॥ परंतु प्रतिबिंबपक्षेंवीण । निवळेना अविछिन्नपक्ष निर्वाण । यास्तव जीवन्मुक्तप्रकरण । चालिलें वाशिष्ठ्[1]योगें ॥ ८ ॥ जीवन्मुक्तदशा देहीं । विदेहकैवल्य पाहीं । समाधितारतम्य हृदयीं । साधन अध्यासें ॥ ९ ॥ जागृतीची नित्यजागृती । जाणिजे ते भूमिका चौथी । प्रबोधयुक्त महास्थिती । सकळांसि वरिष्ठ ॥ १० ॥ हे केवळ सद्गुरुकृपा । सुलीनता पाववी स्वरूपा । केवळ निराश्रयें निर्विकल्पा । सहजस्थितियोगें ॥ ११ ॥ याचि चौथे अवस्थेवरी । प्रारब्धरूढीनें निर्धारी । पांचवी भूमिका अंगिकारी । ब्रह्मविद समाधिस्थ तो ॥ १२ ॥ सहावीचा ब्रह्मविद वरिष्ठ । सातवीचा ब्रह्मविद्वरीयान्न श्रेष्ठ । यांत चौथे भूमिकेचा स्पष्ट । प्रबोधकर्ता स्वयें

---

[1] योगवासिष्टांत.

॥ १३ ॥ अद्वैतसंपदेचा अनुभवी । प्रबोधें अद्वैतप्रदपदवी । विख्यात-जगतीचा गोसावी । ज्ञानें कृतार्थकर्ता ॥ १४ ॥ अनुभवस्थितिमांजि-पूर्ण । साधनद्वारा समाधि रूढऊन । प्रबोधींच प्रत्यक्ष करून । देहीं दशा रूढवी ॥ १५ ॥ सत्वाचेनि आधारें साधनें । स्वरूपाभ्यास दृढ-तेनें । दशा अनुभवित सुखेंकरून । नित्यजीवन्मुक्त तो ॥ १६ ॥ देखे स्वरूपें विश्वतत्वता । सर्वाभूतीं येकात्मता । न पाहे गुणदोषभेदवार्ता । निर्विकारस्थितीनें ॥ १७ ॥ पदार्थमात्र जो कां आहे । त्यासी नाम-रूपेंवीण पाहे । केवळ अस्ति भाति प्रिये । देखे आत्मत्वेंचि ॥ १८ ॥ हेचि स्वभावस्थिति स्वयें । स्वरूपावांचूनि नसे हृदयें । नामरूपविवर्जित निश्चयें । देखे सनातन तो ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ अस्ति भाति प्रियं रूपनामनी इत्यपंचकं ।
आद्यत्रयं ब्रह्मरूपं मायारूपंततो द्वयं ॥ १ ॥

खं वायो वन्हि सलिल । भूमि सुर नर सकळ । तिर्यगादि जंतु प्रांजळ । अभिन्न रूपेंचि ॥ २० ॥ सकळांचें ब्रह्म अभ्यंतर । हे तदेकसमाधि साचार । असता नामरूपीं विस्तार । नसेचि नामरूप ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ खं वायुभूम्यग्निजले देवतिर्यङ्नरादिषु ।
अभिन्नं सच्चिदानंदं भेदतो नामरूपवत् ॥ १ ॥

पाहाता विश्वाचा विस्तार । उपेक्षूनि नामरूपविकार । पाहावें स्वरू-पचि साचार । अविनाश तें ॥ २२ ॥ त्या स्वरूपयोगें निरंतर । हृदयीं अथवा बाहेर । धरावी समाधि सुखकर । आत्मनिष्ठें तेणें ॥ २३ ॥

॥ श्लोक ॥ उपेक्ष्ये नामरूपे द्वे सच्चिदानंदतत्परे ।
समाधिं सर्वदा कुर्याद्धृदयेप्यथवा बहिः ॥ १ ॥

हें समाधीचें लक्षण । निर्विकल्प सविकल्प जाण । त्यात दृश्यशब्दवेधें-करून । सविकल्प दों प्रकारें ॥ २४ ॥ समाधीचें प्रांजळपण । केलें विद्यारण्यस्वामीनें पूर्ण । ते ब्रह्मानंदप्रकरण । असे सविस्तर ॥ २५ ॥

१ पंचदशी, जीवन्मुक्तिविवेक इत्यादि ग्रंथांत.

॥ श्लोक ॥ सविकल्पो निर्विकल्पः समाधिर्द्विविधो हृदि ।
दृश्यशब्दानुवेधेन सविकल्पः पुनर्द्विधा ॥ १ ॥

कामादिकांची ते वृत्ति । ज्याचेनि चित्तीं दृश्य होती । तो साक्षत्वें स्वयेंप्रतीति । साक्षत्वावेगळा ॥ २६ ॥ हे येकाग्रता स्थिरबुधि । जाण हे दृश्यानुविधि । चित्तशोध प्रथम समाधि । सविकल्पनामें ॥२७॥

॥ श्लोक ॥ कामाद्याश्चित्तगा दृश्यास्तत्साक्षित्वेन चेतना ।
ध्याये दृश्यानुविद्धोयं समाधिः सविकल्पकः ॥ १ ॥

द्वितीय सविकल्पक ऐसी । तूंचि ब्रह्मशब्दासरिसी । पुष्टितुष्टिवेधका कैसी । दृढावली तेणें ॥ २८ ॥ जेंवि नामप्रशंसास्तवनें । अवचट तोष संभवे तेणें । देहविसरोनि जाय मनें । समाधि अनुभवी ॥ २९ ॥ अखंड वस्तुत्वेंचि वस्तु स्वयें । स्वरूपार्णवीं बुडोनि राहे । विमळप्रज्ञा निजनिश्चयें । शब्दानुविधि हे ॥ ३० ॥ असंग सच्चिदानंदमय । द्वैतविवर्जित निरामय । स्वरूपस्वस्थिति निश्चयें । असे समाधिरूप ॥३१॥

॥ श्लोक ॥ असंगःसच्चिदानंदः स्वप्रभोद्वैतवर्जितः ।
अस्मीति शब्दविद्धोयं समाधिः सविकल्पकः ॥ १ ॥

आतां निर्विकल्प समाधि । जियेची अवचट उपलब्धि । जीच्या आठवेंचि आधिव्याधि । वोसरे भवदुःख ॥ ३२ ॥ जीच्या स्मरणें त्रिविधताप सरे । जीच्या दर्शनें आठव विरे । जे स्वानंदसुखाब्धीची निर्धारें । अप्रांत लहरी ॥ ३३ ॥ स्वानुभूतीं ते सद्वृत्ति । योजी ब्रह्मात्मऐक्यरति । नापेक्षी दृश्य शब्दस्थिति । स्वानुभवसुखें ॥ ३४ ॥ स्वानंदाचेंचि भरण भरी । ताटस्थता अवतरवी परी परी । समाधिसिंधुवरील लहरी । उसळति अतिशय सुखें ॥ ३५ ॥ निरतिशय सुख सुनिश्चळ । जेंवि गगन अचंचळ । ते निर्विकल्पता केवळ । सहज निर्वात ॥ ३६ ॥ निर्वातींचा निश्चळदीप । तेंवि समाधिसुख निष्कंप । निर्विकल्पता समाधिस्वरूप । केवळ अंतरीची ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ स्वानुभूतिरसावेशात् दृश्यशब्दानुपेक्षया ।
निर्विकल्पः समाधिः स्यात् निवातस्थितदीपवत् ॥ १ ॥

अंतरीं अथवा बाहेरी । वस्तुवाचूनि नसेचि उरि । निजानुसंधान निर्धारीं । निजलक्ष जागे ॥ ३८ ॥ पदार्थमात्र दिसताहीं । सन्मात्रस्वरूपचि हृदयीं । स्वरूपधारणा निश्चयीं । अवचट समाधि हे ॥ ३९ ॥ न दिसे कांहीं वस्तूवीण । सदोदित तदैकध्यान । ध्येयध्यानध्याता सुखानें । ध्येयेचि जाला ॥ ४० ॥

॥ श्लोक ॥ हृदि वा बाह्यदेशेऽपि यस्मिन् कस्मिंश्च वस्तुनि ।
समाधिराद्य.सन्मात्रो नामरूपपृथक्कृतः ॥ १ ॥

मध्यें समाधिगहन । अविछिन्न सुखैकघन । सत्यानंद सनातन । अखंडैकरसें ॥ ४१ ॥ दृक् दृश्य द्वैताद्वैत । नाडळेचि जडाजड कल्पित । नुमसेचि माया ब्रह्म हृदयात । अपरोक्ष सुखें ॥ ४२ ॥ आत्मा ब्रह्मत्वें अक्षोभित । क्षोभेचिना सम सदोदित । सहजें अस्तित्वें निवांत । मध्यम समाधि हे ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ अखंडैकरस वस्तु सच्चिदानंदलक्षण ।
इत्यविछिन्नचिंतेयं समाधिर्मध्यमो भवेत् ।

समाधीचा वर कळस । नसे ज्ञानाज्ञान उमस । जैसें गगन निराभास। उदास सहजें ॥ ४४ ॥ न धरी सुखवृत्तीचा लेश । अवस्था निरसे अशेष । स्वरूपासि स्या विशेष । कांहींच न साहे ॥ ४५ ॥ हेचि प्रतीतीनें अभिन्न । गळित जाला देहाभिमान । लवण समुद्रांत रिघोन । विरालें जैसें ॥ ४६ ॥ स्वभावसकल्पविहीन । जाय तेथें वस्तु वांचून । कांहींच असेना म्हणऊन । त्रिपुटीसि शुरे ॥ ४७ ॥

॥ श्लोक ॥ देहाभिमाने गलिते विज्ञाते परमात्मनि ।
यत्र यत्र मनो याति तत्र तत्र समाधयः ॥ १ ॥

समाधिसुखें सुखाचळ । सुखधात्रीचा भेदूनि तळ । राहे अक्षय स्वरूपें केवळ । तो विमळज्ञानी ॥ ४८ ॥ अवस्थाजनितसुखें । सुखावला

१ सुखाचा पर्वत.

तो दुःखवेळ दुःखें । यास्तव सुखदुःखवृत्तीनें देखे । तोचि निवळला ॥ ४९ ॥ येकपणाचाहि जाला अंत । जाणे तो हा निजयेकांत । समाधीचा समाधिस्थ । अनंतकृपेचा ॥ ५० ॥ येकांत तत्वता वस्तु स्वयें । अनुभवसुखें अतींद्रियें । अनंतपदयोगअद्वयें । प्रांजळ ज्ञान ॥ ५१ ॥ जेथें सुख ऐसें उमसलें । तें सोलींव दुःख जाणवलें । अथवा ज्ञेयज्ञान दिसों आलें । तेंचि अज्ञान केवळ ॥ ५२ ॥ वस्तूसि न पडतां भिन्न । जालें पाहिजे समाधान । ऐसी अलिप्त अनुभवाची खूण । दीधली सद्गुरूनें ॥ ५३ ॥ आस्ठाचि नाहीं वस्तूची । तेथें चाड कैंची ते मुक्तीची । स्वयंचि वस्तु सद्गुरूची । वाणली कृपा ॥ ५४ ॥ हे स्वभाव निजप्रतिष्ठा । नाडळेचि दृश्य ना तो द्रष्टा । सद्गुरूपदीं येकनिष्ठा । वाणली स्थिति ॥ ५५ ॥ स्वसुखी सामावलें सुख । सन्मुखीं विसावलें मुख । दर्शनादर्शन देख । द्रष्टा न दिसे ॥ ५६ ॥ ऐसी येकांत संविति[1] । मनोन्मनाची उपशांति । परमपदाची प्राप्ति । सद्गुरुकृपा ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ दृश्यदर्शनसंबंधात् न भवेत्परमं सुखं ।
तस्य चैकांतसंवित्या मनोनाशः परं पदं ॥ १ ॥

सहज अस्तिक्य संचलें । गुणरहितरूपा वेगळें । असंत नव्हेचि तें भरलें । सर्वत्र असे ॥ ५८ ॥ चर्मदृष्टीसि न दिसे । मनासीही न भासे । वाचेनें बोलिजे ऐसें । नव्हेचि तें ॥ ५९ ॥ उपक्रम ना उपसंहार । नसे स्ठान मान संस्कार । सदसद्विलक्षण साचार । अपरोक्ष स्वयें ॥ ६० ॥ आहे ह्मणतां दावितां नये । नाहीं म्हणावें आस्तिक्यासि काय । सदसद्विलक्षणनिश्चयें । नेमिता कवण ॥ ६१ ॥ रूप ना रेखा जयासी । सत्यासत्यभाव नसे त्यासी । जें लक्षालक्षकल्पनेसी । आतळेचि ना ॥ ६२ ॥ केवळ ऐसें वेगळें पडे । समान म्हणणें त्यासि न घडे । प्रतीत ना अप्रतीत निवाडे । संकेत न धरी ॥ ६३ ॥ जें विकारी ना अविकारी । तें विमळतत्व अभ्यंतरीं । साक्षत्वविहीन

1 अनुभव.

निर्धारी । स्वयेंचि तत्वता॥ ६४ ॥ जें खंडित ना अखंडित । जें सर्वत्र ना सदोदित । जें अनिर्वाच्य ना अनंत । अपरोक्ष तें ॥ ६५ ॥ जयाचा प्रांत ध्यावयासी । श्रुति प्रवर्तल्या निश्चयेसीं । तयाच्या आठ-वेंचि सुखेंसीं । सामावल्या सहज ॥ ६६ ॥ ऐसें तें निर्मळ निश्चळ । निरावकाश अचंचळ । निर्हेतसुख अंतराळ । निर्दोष सहजें ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ भावगम्यं निराकारं साकारं दृष्टिगोचरं ।
भावाभावविनिर्मुक्तं अंतरालं तदोच्यते ॥ १ ॥

अमळ हृदयाकाश ऐसें । उमसलें तरि भेदासरिसें । आकाशेचि होये जैसें । भाविलें जाय ॥ ६८ ॥

॥ श्लोक ॥ जडाजडद्वयोर्मध्ये यत्तत्वं पारमार्थिकं ।
अनंताकाशहृदयं तन्मयोऽस्य सर्वदा ॥ १ ॥

जेथ आश्रय ना आश्रित । तयाचा आश्रय इत्थंभूत । कैंचि कारणें हाचि संकेत । अवधारिजे पुढें ॥ ६९ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरु-कृपेचा जिव्हाळा । जीवन्मुक्त समाधिलीळा । म्हणे मेरुअनंत ॥ ७० ॥ दशमरुद्रे ॥ नवम उल्लास संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीरामसमर्थ हृदय । निर्दोष निज निराश्रय । अनंताकाश स्वयें । आश्रयिलें न वचे ॥ १ ॥ जें उघड ना आछया-दिलें । जें रूप ना अरूप वहिलें । जें आप ना पर निव-ळिलें । विमळास्तित्व ॥ २ ॥ जैसें गगन असंग सहजें । जें उमजेना कांहीं नुमजे । जें सद्रूप ना तत्य मांजें । कांहींयेकपणें ॥ ३ ॥ जें आदि ना अनादि स्वयें । जें अगुण ना अमन होये । जें द्वैत ना अ-द्वैत निश्चयें । नयेचि फलितां ॥ ४ ॥ ते सदोदित सुखवस्ति । आ-काश गाळींव विश्रांति । स्याचि सुखें जीव मातृगंती । नेणोनि तया ॥ ५ ॥ जाणतां तेचि होयीजे तत्वता । स्वरूपार्णवीं विसावोनि समतां । स्वानंदजीवन प्राशितां । अनुभवें जगतां ॥ ६ ॥ अतींद्रिय-

---

१ (?). २ छन्द लागत नाहीं.

सुखें सजीवंता । स्थानंदशरीरीं सतेजता । अवचट सुखेंचि त्या असतां । नेणती तया ॥ ७ ॥ सुखें अक्रिय क्रिया सर्वसुखें । प्राणासि तृप्ति अपूर्वसुखें । चिद्राणलें मुळींचें पूर्वसुख । स्वरूप तें ॥ ८ ॥ स्वरूपसुखें बुधि प्रबळ । स्वरूपसुखें देहीं चळवळ । स्वरूपसुखें अतर्क्य केवळ । सुखाब्धि वृद्धि ॥ ९ ॥ स्वरूपसुखेंचि ज्ञानजागृति । स्वरूपसुखें अनुभवस्थिति । स्वरूपसुखें निद्राविश्रांति । समाधि बाणे ॥१०॥ जेणें सुखें अवधान निवळे । जेणें सुखें प्रांजळ कळे । तें सुखचि स्वयें उचंबळें । अक्षयानंद ॥ ११ ॥ जेणें सुखें सर्वांगीं निविजे । जेणें सुखें सुखचि भोगिजे । तें आस्तिक्यसुख सहजें । उपचारें वीण ॥ १२ ॥ स्वरूपामृतसुखार्णवीं । अमन होऊनि अनुभवी । अपरोक्ष सुखाची पदवी । सुखेंचि लाहिजे ॥ १३ ॥ स्वरूपसुखें विश्व जालें । परि जितचि सुखासी मुकलें । सुखीचि असोनि अंतरलें । सिणे सुखास्तव ॥ १४ ॥ सुखात्मा स्वयें असोनि । सीणले जीव सुखालागूनि । आपणासि इतर करूनि । दुःखासि आले ॥ १५ ॥ येन मात्रामुपजीवंति । तें स्वयें चि सुख आयंतीं । कोंदाटलें सर्वभूतीं । जळ जळ-

तेंचि सावकाशें विस्तीर्ण । विश्वाचें निवासस्थान । सावकाशसुखेंचि संपूर्ण । वाचली सृष्टी ॥ २३ ॥ निरुपद्रव त्याचें असणें । कोणासी अवरोधिना वर्तोनें । सहजसावकाशें तेणें । कार्य चालिलें ॥ २४ ॥ अवकाश नसता कैंचि प्रवृत्ति । सावकाशेंचि होय विश्रांति । अवकाश कोंडता जाति । जीव सर्वत्राचे ॥ २५ ॥ जीवासी होतां कासावीस । ह्मणे मज येऊ द्या अवकाश । विसावां सुखें सावकाश । जीयें सुखेंचि उठे तो ॥२६॥ श्वासोश्वास निर्गति । सावकाशें होय विश्रांति। अवकाशेंवीण जगती । वसली कोठे ॥२७॥ अवकाश हें निजजीवन । तेणें सजीव होय प्राणें । सर्व सावकाशाचेनि जाण । प्रवृत्ति चालिली ॥२८॥ भेदसृष्टीचि सावकाश । आत्मदृष्टी निरवकाश । अनुभविजे चिदाकाश । सुखस्वरूप ॥ २९ ॥ त्या सुखप्राप्तीनें निसवृत्तो । त्याचि सुखें संकल्पशांति । देहीं याचि सुखाची प्रतीति । कैसी ते पाहा ॥ ३० ॥ सुखदाटें पडे विसर । परि तो नव्हे निद्रा अवसर । नव्हेचि जागृतीचा निर्धार । ना नव्हे ताटस्थता ॥ ३१ ॥ निर्बंध ते निजस्थिति । दशा ते प्राणिमात्र भोगिती । साक्षेपेंवीण पुढती । पुढति अवचट संभवे ॥ ३२ ॥ सर्व अवस्थेचा विसर । स्वसुख तें अगोचर । आंगो आंगीं सुख निर्भर । जाणवत तुमसे ॥ ३३ ॥ तेणें स्तब्ध ता दुखित दिसे । अवचटदशेचा यांवा येतसे । जिस्मयें स्वानुभूतीसरिसें । अभिनव करी ॥ ३४ ॥ सकळ करणी स्वसुख निवळे । स्वानंदसिंधु उचंबळे । अचेतदशाचि प्रबळे । गाढसुखभरें ॥ ३५ ॥ ऐसी स्वसुखदशा उत्कट । निर्विकार निज निर्वाट । तियेसि प्रलयाचें पुट । देऊनि पाहावें ॥३६॥ जेंवि जीर्ण दिव्य असिलता । प्रकाशेंडोहो होय उजळिता । तेंवि पुरातनदशा हे तत्वता । उजळिता कळे ॥ ३७ ॥ ब्रह्मस्थिति हे पुरातन । वशिष्ठें उपदेशिला रघुनंदन । येचि महास्थितीनें निर्वाण । समाधिस्थ जाला ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ प्रशान्तसर्वसंकल्पा या शिलावदवस्थितिः परा ।
जाड्य निद्राविनिर्मुक्ता सा स्वरूपस्थितिः परा ॥ १ ॥

१ प्राप्ति. २ एकाग्रीत.

पाटांगणें विस्तीर्णता । भूमिका परिशुध ॥ ४ ॥ स्थळ देखालियांचे अवचट । योगप्रसक्षतेसि सुख उत्कट । स्वरूपप्राप्ति कैवल्यपीठ । जे प्रसिध्यतेनें ॥ ५ ॥ अवचट जातां वैरागरा । प्राप्त होइजे दिव्य हिरा । किंवा पावतां क्षीरसागरा । दुग्ध सेऊं ये सुखें ॥ ६ ॥ जातां अमृतसरोवरासी । प्राशन करूं ये अमृतासी । कां जातां कल्पतरुवनासी । इच्छिलें पाविजे ॥ ७ ॥ तेवि अपरोक्षसाक्षात्कारें । ठाव प्रसन्नतेसी साचोकारें । देवतामय प्रत्यक्षाकारें । जळस्थळविस्तार ॥८॥ प्रवेशावें ऐसीया देशीं । जेथें भेटों ये परमात्मयासी । स्थळदर्शनें साधकासी । चमत्कार रूढे ॥९॥ नाहीं जनाचा संसर्ग । न कल्पे मनाचा विसर्ग । अखंडदृष्टिचि पुढें मर्ग । दिसे उभा ठाकला ॥ १० ॥ जनपायरजें मळवटेना । ऐसीं अमळस्थळें नाना । विश्रांति पाहातां नयना । वेधकाचि होय ॥११॥ निर्विकल्प तें येकांतवन । विचित्र वनचराचें विचरण । अमळेजळीं संपूर्ण । जळचरें क्रीडती ॥ १२ ॥ महापर्वताचे कातरे । काठिण स्थळ विशाळ दरे । कडेकपाटें विवरें । सुयारी बहुसाळ ॥ १३ ॥ गिरि गव्हरें शृंगें शिखरें । द्रुम लागले विस्तीर्ण पाठारें । पडती धबाबा भयंकरें । विशाळवोघ ॥ १४ ॥ कल्पतरूच्या पडिपाडें । सदा सफळ तीं वनीचीं झाडें । छयाया विश्रांतिसुरवाडें । कूजेती विहंगम ॥ १५ ॥ शुकशारिका मयूरें । पारिवे घुमति गंभीरस्वरें । अनादिरचनाविस्तारें । शिवालयें किती ॥ १६ ॥ फळें अमृतापरीस गोड । सेविलियां जाय जन्मांतरीची चाड । परम तृप्तीनें हृदयीं गाढ । धारिष्ट आतुडे ॥१७॥ येकदां सेविलियां तेथींचें जळ । जाय आजन्मतृषा सकळ । क्षुधेतृषेरहित केवळ । साधनींच प्रवर्तवी ॥१८॥ मनींचा अकल्प संकल्प सरे । कल्पनाचि समूळ विसरे । ऐशा स्थळसामर्थ्यानुसारें । देवाचि प्रत्यक्ष होय ॥१९॥ विळासें बैसोनि पर्वतीं । पाहिलीं ते ते अश्चियें किती । सगुण साक्षात्कारें मूर्ति । वसे सहवासी ॥२०॥ पर्वताची विस्तीर्णता । विस्तार द्रुम वाहाती सरिता । जळघसणीनें पर्वता । कर्यातिंलें दिसे ॥ २१ ॥

१ तुटलेले कडे. २ गातात.

छोटती जळ अमोघ स्रोत । सानुप्रदेशीं कंदरें गुप्त । ठायीं ठायीं उ-
फाळत । जळकल्लोळ ते ॥ २२ ॥ विस्तीर्ण शिळा मनोरम । त्यावरि
बैसताचि विश्राम । हृदयासि ये आत्माराम । कोदंडधारी ॥ २३ ॥
विचित्रवर्ण विहंगम । कलरव करिती परम । तेणें श्रवणें उपरम । होय
वृत्तीचा ॥ २४ ॥ शुक अनुवादती सहज । तेणें प्रगट होय वेदबीज ।
सनकादिसिध्धसमाज । उगेचि दृष्टीसि पडती ॥ २५ ॥ विचित्र श्वाप-
दाचे मेळ । निर्वैर क्रीडती सकळ । गज सिंह मृग शार्दूळ । सह-
वासें वसती ॥ २६ ॥ निःशब्द वसे निरंजन । सहवासें मत्सरासि[1]
निर्गुण । नित्य अनुतापें अंतःकरण । देव समीप करी ॥ २७ ॥
ऐसिया निवासस्थळासी । शोधूनि पाहावें देशोदेशीं । पाहातां प्रशस्त
मनासि । मानेल तेथें ॥ २८ ॥ मनें प्रार्थूनिया तो देश । स्थळ मागावें
निजवस्तीस । तेणें वस्तीनें निजहृदयास । ये परमात्मा ॥ २९ ॥
शुभ्रउदरें कृष्णमृगें । जे भूमिकेसी वसती अंतरंगें । ते भूमिसी नम-
स्कारूनि वेगें । प्रत्यक्ष करावीं ॥ ३० ॥ भेटोनियां पर्वतासी । स्थळ
मागावें वस्तीसी । तेथींच्या त्या वनस्पतीसी । सख्य करावें ॥ ३१ ॥
गळित पत्रें पुष्पें फळें । लाहोनिया सुख समेळें । निरुपद्रव सर्वकाळें ।
वसावें तेथें ॥ ३२ ॥ रमणीय अपूर्व दरी । गुहा पाहोनिया बरी ।
साधूनि भूमिका निर्धारीं । आसन रचावें ॥ ३३ ॥ गाळींव भस्म-
आसनातळीं । त्यावरी कुशास्तरणाची मोकळी । उपरि मृगाजिन-
मवाळी । सुवस्त्रेंसीं ॥ ३४ ॥ ऐसें सिध्ध करूनिया आसन ब्राह्म
मुहूर्तींच उठोन । कीजे अखंड धोधीं स्नान । परम शुध्ध ॥ ३५ ॥
वस्त्रपरिधान ना प्रावरण । सर्वांग तें भस्में डौरून । नित्यनेमेसी वि-
धान । सारूनि त्वरा ॥ ३६ ॥ रिघोनियां गुहेभीतरीं । घावें दृढक-
पाट द्वारीं । बैसोनियां आसनावरी । निश्चळ व्हावें ॥ ३७ ॥ आसन
जयाकारणें पूर्ण । कीजे प्रणवाचें अवग्रहण । प्राणायामें स्थिरावोन ।
सोहं राहे ॥ ३८ ॥ निवांत होतां स्वासोस्वास । ध्यावा अंतर्खेचरीचा

1 मत्सराला.

पैस । तेणें सायकाशींचि भकास । हृदयीं भरावें. ॥ ३९ ॥ तें अंत-खेंचरीच्या लक्षें । हेतु स्थिरावेल अलक्षें । निरालंब मानस विपक्षें । पक्ष रहित ॥ ४० ॥ लक्षूं जातां परात्पर । हृदयेंचि होये चिदंबर । तेव्हां वृत्ति ब्रह्माकार । दढावे बरी ॥ ४१ ॥ हंसपक्षि त्या अंतराळें । जातां जातां चि सत्वगेळे । राहिलीं ब्रह्मांडें सकळें । त्यापर उंचावे ॥ ४२ ॥ जेवि अणुरेणुचे जीनस । तेंवि ब्रह्मांडें दिसती तयास । वाहाटुळीनें रजवटला पैस । गदळ आभासे ॥ ४३ ॥ स्वरूप-सिंधूचें उत्तर्गे तीर । ब्रह्मांडा सहित अंबर । अवकाश मळीन नीर । दृश्यस्थळयोगें ॥ ४४ ॥ तें मळीनजळ सारूनि । रिघे उन्मनमीन जीवनी । तेथें दृश्य नाडळे चि नयनीं । निर्मळ जळ पाहतां ॥ ४५ ॥ येकजीनसी अपरंपार । व्योम गाळीव निराधार । नसेचि तया पारावार । लक्ष पवाडलें ॥ ४६ ॥ परतोनि पाहे. तो संपूर्ण । जिकडे तिकडे निरावरण । कोठूनि आलों मी कवण । प्रमाण सरलें ॥ ४७ ॥ न दिसे तळ ऊर्ध्व पाहातां । जायील कोणेकडे आतां । समान सारिखेंचि तत्वता । चहुंकडे ॥४८॥ जेंवि ब्रह्मारण्यामाझारीं । वाट चुकोनि विहार करी । तेंवि त्या स्वरूपांवरीं । निर्बुजेलें जाये ॥ ४९ ॥ निराश्रयीं त्या राहवेना । निज दृष्टीसी तें पाहावेना । सीमालंघुनि जाववेना । कोणेकडेहीं ॥५०॥ जैसा त्या समुद्रोदरीं । पक्षी अंत-रिक्ष धीर धरी । परि सकळा तुटोनि त्या माझारी । बुडोनि जातसे ॥ ५१ ॥ स्वरूपडोहामाजि अप्रांत । स्वानंदेसी चुबकळ्या देत । त्रिपु-टिरहित विसांवत । जाय वितळोनि ॥ ५२ ॥ आकाशीं दीप हार-पेला । जाये तो नये मागुता आणिला । नये अर्णवामाजि रिघाला । लवणाचा कण ॥ ५३ ॥ स्वरूपीं समरसलें स्मरण । जेवि घूम्रें आ-क्रमिलें गगन । क्षणामाजि वितळोन । रूप वोसरलें ॥ ५४ ॥ वृत्तिसीं न येतां माघारें । निवेदनस्वरूप निर्धारें । दढावलेनि चमत्कारें । निज-

१ आकाश. २ सत्वागळे (?) असंत प्राल्विक. ३ वावटळीनें, वादळानें. ४ उंच. ५ घोटाळलें.

निर्वाण होय ॥ ५५ ॥ जाला अवघाचि विसर । पडिलें अचेतन शरीर । नासिकारंध्रींचा समीर । आटोनि गेला ॥ ५६ ॥ म्हणावें हें चि प्राणविसर्जन । परि अनुभवामृताचें करी पान । त्यास्तव ते मूर्घनीस राहोन । उन्मन सुखें वसे ॥ ५७ ॥ ऐसी होयील अवस्थे आंत । तेही अस्तवेळ निरांत । तो स्वरूपानुभव अप्रांत । सहज जाहाला ॥ ५८ ॥ जंवरी सत्वाचें वळ असे । तंवरी ते काष्टचि विलसे । सत्व विगळित अनयासें । ये सहजस्थिति ॥ ५९ ॥ पूर्वीसी पालट नसे कांहीं । नव्हे देही ना तो विदेही । सहज स्वरूपाच्या ठायीं । वसेचि संस्कार ॥ ६० ॥ प्रारब्ध देखिलेंचि नाहीं । तेथें क्रियमाण कैचें पाहीं । कोठें पूर्वसंचित ही । पाहता तया ॥ ६१ ॥ लोकदृष्टी बाह्यात्कार । दिसतसे तो साकार । स्वरूपसाक्षात्कारें साचार । संस्काराचि नसे त्या ॥ ६२ ॥ कज्जेल सारूनि नभ देखावें, चित्रकारें स्वयंभ । त्या चित्रलेरासि लाभलोभ । क्षोभ तो कायसा ॥ ६३ ॥ जयाचें हृदय परम । तयाची दृष्टि निरुपम । तेणें ज्ञानें निर्मन । व्योमगर्भ स्वयें ॥ ६४ ॥ स्वरूपनिवृत्ति निज-धर्म । आत्मसाक्षात्कारी चिद्व्योम । सायुज्यतेचा संगम । उगमचि तो ॥ ६५ ॥ जैसा निर्मन आस्तिक्यें । सद्गुरुकृपेच्या निजऐक्यें । साक्षिविहीन, अनास्तिक्यें । सहज आस्तिक्य ॥ ६६ ॥ हा स्वरूपानुभवी सिध्द । स्वरूपानंदें अगाध । तपश्चर्येनें प्रसिध्द । स्वरूप साधिलें ॥ ६७ ॥ संपूर्णतेचें जिव्हार । साक्षात्काराचें अभ्यंतर । सद्गुरुकृपेनें निरंतर । स्थिरावला ॥ ६८ ॥ जो अमनस्क अगोचर । जो सदोदित निर्विकार । तोही सद्गुरूचा किंकर । दास्य करी स्वयें ॥ ६९ ॥ जेणें मीपण देखिलेंचि नाहीं । नवेचि स्वरूपाचा उमस तोही । परि सद्गुरूच्या भजनासि पाहीं । उरला चि असे ॥ ७० ॥ जयासि आदि ना अंत नसे । कर्तव्यास काहींच न दिसे । परि अखंडित उरलासे सद्गुरुभजनीं ॥ ७१ ॥ गुरुभजनाचेनि निर्धारें । विनटलासे

१ मस्तकांत. २ (?) कज्जल, काजळ, काळारंग.

मरणानंतरें । समूळ गेलियांही शरीरें । अनुसरला सेवेसी ॥ ७२ ॥ छत्तीसा तत्वाचें शरीर । येकतीस तत्वें निर्विकार । शरीरींच असतां साचार । समर्पिला सद्गुरूसि ॥ ७३ ॥ उरली पंचतत्वें काष्टाकार । देहविसर्जनीं गुरुनिर्धार । पंचतत्वाचें अभ्यंतर । योजिलें अनुसंधानीं ॥ ७४ ॥ गुरु बैसती ते भूमिकेसी । मेळविलें शरीर भस्मासी । त्या पृथ्वीच्या आश्रयें कैसी । विस्तीर्णता धरिली ॥ ७५ ॥ गुरुनिवास मनोहर । निजदेह पृथिवीचा विस्तार । देशिकस्नानासि साचार । जीवन होतसे ॥ ७६ ॥ त्याचि जीवनीं साचार । मेळविलें जीवनांशें शरीर । गुरुआरतासी मनोहर । तेजीं तेज योजिलें ॥ ७७ ॥ देशिक व्यजनींचा पवन । वायूचा अंश सुलीन । त्या व्यजनपवनें करून । निववीन गुरुमायेसी ॥ ७८ ॥ गुरुभजन नभ गाभा । तेथें निजव्यापकशोभा । देहपंचांशें स्वयंभा । सेवीन सर्वदा ॥ ७९ ॥ जीत असतां भजनपरवडी । तैसाचि मेलियांही न सोडी । ऐसी गुरुभजनाची आवडी । सर्वदां मजला ॥ ८० ॥ गुरुभक्तीच्या निजनिश्चयें । असतां मज मुक्तीची चाड काये । आचार्यनामस्मरणेंचि होये । गतिचि निजगति ॥ ८१ ॥ गुरुपदस्मरण होतां । आटोनि गेली देहअहंता । सरली ब्रह्माहमस्मिची अवस्था । ओंटमातृकारूप ॥ ८२ ॥ अर्धमात्रेचें अभ्यंतर । राहिलें गुरुपदींच निरंतर । आहे नाहीं पूर्वापर । सर्व निवेदिलें ॥ ८३ ॥ अनादिजन्मसंस्कार । सद्गुरुकरस्पर्शे साचार । जाले सत्वकर्पूराचे डोंगर । उजळले ज्ञानाग्नीनें ॥ ८४ ॥ अनेकजन्मांतरमणिमाळा । लोह वज्ररूप स्वलोळा । गुरुपरिससंस्कारें चित्कळा । जाली सुवर्ण ॥ ८५ ॥ तये माळेचा वरकळस । सद्गुरुकृपेनें निर्विशेष । मेरु होय तो स्वप्रकाश समर्पे सद्गुरुपदीं ॥ ८६ ॥ निजनिदानींचें[1] आरत । उजळीलें तें सदोदित । वंवाळ होऊनियां संशांत । आरत जालें ॥ ८७ ॥ तळीं हारपली आस्तिक्यधरा । वरी ठाव नाहीं कैवल्यांबरा । निजानंद-घनगाभारा । निजीं निजेला निवांत ॥ ८८ ॥

---

१ गुरुला आरति ओवाळण्यासाठीं. २ जीवंत.

पुढती येणें चि नाहीं जागृती । अथवा घेणें नाहीं सुषुप्ति । ऐसिये निद्रेची विश्रांति । घेतली गुरुअंकीं ॥ ८९ ॥ आतां सद्गुरु तो चि साचार । करितसे भवसिंधुउत्धार । श्रोता वक्ता साक्षात्कार । होतसे गुरुकृपा ॥ ९० ॥ जालें दशमरुद्रआख्यान । विविध समाधिनिरूपण । पुढें येकादशरुद्रीं निर्वाण । ऱ्हिति ते अवधारा ॥ ९१ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । पवित्रदेशनिवासलीला । ह्मणे मेरुअनंत ॥ ९२ ॥ दशमरुद्रे ॥ येकादशउल्लासः संपूर्णः ।

---

## रुद्र ११ उल्लास १

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥
श्रीरामं परमानंदमुपदेष्टारमीश्वरं ॥
व्यापकं सर्वलोकाना कारणं तं नमाम्यहं ॥

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसर्थ रुद्र आख्यान । येकादशरुद्राचें दर्शन । सगुण साक्षात्कार सुप्रसन्न । प्रगट अमृतवेळा ॥ १ ॥ अनादि सुकृताच्या कोडी । उभविली भवविजयाची गुढी । प्रसन्नावसर स्वसुखरूढी । प्रत्यक्ष होय स्वरूपें ॥ २ ॥ गुरुकृपेचा अभिनव योग । जाहला प्रत्यक्ष अंतरंग । चमत्कार ऱ्हिपीचा प्रसंग । अमृतयोग फळला ॥ ३ ॥ अनादि वियोग वोसरला । निज आस्तिक्यतायोग अनुसरला । स्वकीय दैवदशेचा ऊंचावला । सभाग्य कळस ॥ ४ ॥ अवचट स्वकीय आस्तिक्यबळ । जालें निजव्यासें चि प्रबळ । काळवेळ रहित तात्काळ । काळांतक प्रगटला ॥ ५ ॥ यथार्थ चि सांगतों जिव्हार । प्रगटलें महातेजें अपार । स्वयंम निजतेज निर्धार । भरलें अंबरीं ॥ ६ ॥ साच चि मुक्तीचें माहेर । नित्यमुक्ताचें अभ्यंतर । योगियाचें विश्रांति मंदिर । कृपेनें प्रगटलें ॥ ७ ॥ विज्ञाननिशीचे मध्यान्ह । प्रकाशला प्रकाशघन । रात्रि ना तो दिनमान ।

स्वयंम चंद्रगाभारा ॥ ८ ॥ द्रष्टेविण द्रष्टा निर्विकार । भेटों आला दिगंबर । त्याच्या वर्चसें ज्ञेयगोपुर । चंद्रवर्ण शोभलें ॥ ९ ॥ समाधि-योगनिद्रिस्थ । तुर्या उन्मनीसीं जाग्रत । नव्हे चि स्वप्न ते विख्यात । वेळ प्रमाणासि न ये ॥ १० ॥ काय सांगो कवणाप्रति । माझा मी चि जाणें विस्मय स्थिति । न कळोन बोलविलें मती । देवप्रत्यक्षतेनें ॥ ११ ॥ नव्हे जाणिवेचें हें कार्य । कल्पितां मस्तकपात होय । अद्भुत संचार स्वयें । देखतसे डोळां ॥ १२ ॥ झळाळित प्रभा घनवर्ण । प्रकाशले चंद्रसूर्य नयन । विश्वरूपें जेवि दर्शन । दिल्हें त्या अर्जुनाप्रति ॥ १३ ॥ अवघा आकाश निर्वोट । धूम्रवर्ण लख-लखाट । तया तेजांतूनि अवचटें । प्रगटला अनुपम्य ॥ १४ ॥ भानु अभ्रांतूनि बाहेर ये । तेंवि चर्मचक्षूसि प्रत्यक्ष होये । चाकाटलें मन लक्षीत राहे । नव्हे प्रमाण तयाचें ॥ १५ ॥ दिव्यपादुकावरी[1] स्वयंम । उभें ठाकलें तेज अक्षोभ । पाहातां सामावलें जाय नभ । अंगुष्ठनखीं तयाच्या ॥ १६ ॥ विशाळतेची नवलपुरी । रोमरंध्रीं ब्रह्मां-डाच्या हारी । नसे चि प्रमाणतेसि उरि । महाविराटरुद्र ॥ १७ ॥ सर्वांगीं बाळसूर्यवर्ण । प्रकाशलें गाळींव तेजदर्पण । तप्तजांबुनदसंपूर्ण । अखंडैकरस वपु ॥ १८ ॥ दिव्यवपु रुद्रसुवर्णाद्रि । रोमावळी वृक्षसं-भारी । ना तें कनकअभ्रभरी । सौदामिनी बिंबल्या ॥ १९ ॥ भीमदु-धार्णवसागरीं । रोमावळी कल्लोळहारी । निरुपम शृंगारलहरी । प्रका-शघनतनूतें ॥ २० ॥ निर्धारितां निजदृष्टीसी । पालट दावीत आकृ-तीसी । दत्तात्रेय महामुनि दीक्षेसी । दाखविता होय ॥ २१ ॥ व्याघ्रां-बरधर सर्वेंचि होय उघडा । निःसंग निर्धूत योगी निधडा । भस्में डौरली काया रोकडा । साक्षात्कार ॥ २२ ॥ नयन खदिरांगारवर्ण[2] । महाउग्र आवेशें दारुण । करतांत भैरव पंचवदन । नानाप्रकारें ॥ २३ ॥ होय हा ईश्वर निश्चयकरीं । तव तो विष्णु स्वरूपें व्याप करी । सुरसा-

१ सोनें. २ खैराच्या निखान्याप्रमाणें.

भवर्णे घनशरीरीं । मनोहर रूप तें ॥ २४ ॥ सहस्रशिरें सहस्रकर । होय विश्वरूप विश्वंभर । निरखूनि पाहातां ईश्वर । होय प्रत्यक्ष ॥ २५ ॥ सुवर्णवर्ण विखरल्या जटा । ज्वाळा नेत्रांतूनि निघती पिं-गटा । अद्भुत वीरश्रीनें ताठा । भरलासे नयनीं ॥ २६ ॥ आंगी चंद्र-वर्णे विभूति । उदासीन महायोग स्थिति । दिव्यमनोहरआकृति । येऊनि मज भेटला ॥ २७ ॥ मी मज नाठवें चि कांहीं । या चि विस्मयें आलिंगिलें बाहीं । ते प्रत्यक्षतेसी नाहीं । उरलें प्रमाण ॥ २८ ॥ क्षेम देता समसमान । पांहों जातां प्रांतविहीन । लक्ष लावितां निज-नयन । पूर्ण तटस्थ जाले ॥ २९ ॥ निष्ठाप्रत्यय तेणें साचार । उभा ठाकला परात्पर । जयाचे उदरींचा विस्तार । प्रमाणासि नये ॥ ३० ॥ त्याचे उदरीं राहोनि पाहे । त्याची च प्रार्थना करिता होये । भया-भीतरूप विस्मयें । अभिवंदन करी ॥ ३१ ॥ स्तवनें प्रवर्तऊनि वैखरी । देवा त्राहे त्राहे ये अवसरीं । सद्भावमौळी पायांवरी । ठेवितसे सर्वदां ॥ ३२ ॥ सर्वांग श्रवण सर्वांग देखण । दृष्टी न येसी च प्रमाण । ह्मणे पोळखिलासि विद्यानिदाना । राहे आतां उगलाचि ॥ ३३ ॥ दयेनें प्रगटलासि जिव्हाळा । तेंचि निजरूप दाखवीं डोळां । येर संप-त्तीची लीळा । वेदादिकांसी अकळ ॥ ३४ ॥ ऐसें प्रार्थितांचि तात्काळ । रूपें प्रगटला गोलांगूळ[1] । अद्भुत भुभुःकारें भूगोळ । भंगा जातसे ॥ ३५ ॥ काळ दचकतसे मनीं । भयंकर रूपाची भरणी । तरणी-चक्रें नयनीं । भ्रमती अतिशयें ॥ ३६ ॥ काळाकाळा कर्कोट[2] भ्यासुर । भिंगोळ[3]वर्ण भयासुर । भयंकर शरीर भासुर । कल्पांतकाळवेशें ॥ ३७ ॥ पुछ गगनीं तळपतसे । धरणीहूनि उर्कावतसे[4] । अवचितां चि चौता-ळतसे । सैराट दाही दिशा ॥ ३८ ॥ स्थिरावेना चि अनिवार । ह्मणि-तलें म्या स्वभाव साचार । कवणें करावा वा निर्धार । तुझ्या स्वरू-पाचा ॥ ३९ ॥ तूं प्रत्यक्ष चंचळ निश्चळीं । उभा ठाकलासि दूरि

१ वानर, मारुति. २ मोठा विषारी सर्प. ३ चहूंच्या मातीसारखा भुरका. ४ जोरानें उभें राहतें.

जवळी. । मस्तकठेवीन पदयुगळीं । ऐसें करीं आतां ॥ ४० ॥ अपार-कृपेनें उचंबळला । भयंकर तो स्थिरावला । अर्चनविधीनें समर्पिला । मस्तक तयाचे चरणीं ॥ ४१ ॥ मानसीं भयंकर दाखविलें । धारिष्ट सळोनि पडिलें । अवचितें चि कोसळलें । मस्तक पायांवरी ॥ ४२ ॥ शिरकमळ पडतां पायीं । अभयकरें ठेविलें ठाईं । कपि बोलिला ते चि समईं । निदानीचें अभय ॥ ४३ ॥ विष्णूचें आवडतें पदकोटें । तो मज या समयीं भेटे । अरे नामापासीं च प्रगटे । म्हणा जयराम ॥ ४४ ॥ हें रुद्रमुखीचें वचन । मिथ्या म्हणेल त्यासी शासन । प्रमाण सद्गुरूचें चरण । प्रत्यक्ष तेसि ॥ ४५ ॥ सख्यानें देऊनि दर्शन । संरक्षिलें सुखैकघन । तयाचें मी केंवि उत्तीर्ण । होईन विकृतिशरीरें ॥ ४६ ॥ त्याचा विसर सर्वथा न पडे । आठवितां प्रत्यक्ष दृष्टीपुढें । पिंगाक्षरूपें पवाडे । बोलतां चालतां ॥ ४७ ॥ कृपेची महिमा न कळे । नाम घेतां चि जिवीं प्रबळे । आवेशें आंगा ये स्वलीळे । जिवलग माझा ॥ ४८ ॥ भीम निर्वाणीचा सोयरा । भेटों आला कृपेच्या अवसरा । सांगितलें वाक्य अवधारा । मज अर्थविलें ॥ ४९ ॥ आवडतें पद तें चि स्मरण । स्मरणें विस्तारलें भजन । भजनीं प्रत्यक्षदर्शन । सगुण साक्षात्कार ॥ ५० ॥ नवविधा भजनस्थिति । हे चि सर्वोत्तमाची प्रीति । ज्या पुरुषीं वसे तो विख्याति । विष्णूचें अधिष्ठान ॥ ५१ ॥ विष्णुभक्तीनें प्रगटला । श्रीरामरूपें अवतरला । सृष्टीचा उद्धार केला । भक्तकाजकैवारें ॥ ५२ ॥ राघवभजनीं तत्पर । ईश्वररूपी तो वानर । रामदासें निरंतर । उमा विजयश्रीनें ॥ ५३ ॥ शिवविष्णु परात्पर । भीमराम येकअभ्यंतर । येकस्वरूपें चि साक्षात्कार । आराध्य परस्परें ॥ ५४ ॥ महादेव आदिवैष्णव । महाविष्णु मुख्यशांभव । विष्णूचें हृदयसदाशिव । शिवाचें हृदय तो विष्णु ॥ ५५ ॥ हरिहरासी भेद मानिती । त्याच्या न चुकती पुनरावृत्ति । शिवविष्णु-

१ (!). २ 'शिवतो विष्णुरूपाय विष्णोश्च शिवरूपिणे । शिवस्य हृदयं वि ष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः' ॥ या सुप्रसिद्ध संस्कृत श्लोकांत हाच भावार्थ आहे.

रहस्य पुढती पुढती । उभयतासि भजावें ॥ ५६ ॥ शिवहृदय जाणोनि बरवें । शिवभक्तीं विष्णूसि भजावें । विष्णुहृदय घेऊनि स्वभावें । शिवासि वैष्णवें भजिजे ॥ ५७ ॥ हें वेदशास्त्रांचें प्रमाण । पुराणें या चिं अर्थी संपूर्ण । याकारणें त्यजूनि अभिमान । भजावें भगवंतीं ॥ ५८ ॥ भगवद्भक्ति निष्ठावंत । देखे विश्वरूपें भगवंत । देवप्रतिष्ठा शाश्वत । कल्पांतीं न चळे ॥ ५९ ॥ शाश्वत देव हा श्रीराम । म्हणऊनि महारुद्रें सप्रेमें । हृदयीं धरिला नित्यनेमें । अनुष्ठानविधीनें ॥ ६० ॥ रामभजनीं अनुसंधान । धरूनि बैसला अखंड ध्यान । रामभक्तशिरोभूषण । रामदास विख्याती ॥ ६१ ॥ भजनाचेनि कृतोपकारें । आभारला रामें साक्षात्कारें । तपसामर्थ्ययोगविस्तारें । धावयासि प्रगटला ॥ ६२ ॥ सप्तलोकींचें अधिपत्य स्वयें । प्रसन्न होऊनि देता होये । नेघेचि निरापेक्षहृदय । पूर्ण वीतरागी ॥ ६३ ॥ स्वरूपसायुज्यकैलास । जो त्यागूनि जाहला उदास । घालूनि नित्यविरक्तीची फास । रामभजनीं लागला ॥ ६४ ॥ वैकुंठक्षीरसागरादि पदें । उपेक्षूनियां विनोदें । रामपरंधाम स्वानंदें । सेविलें सनातन ॥ ६५ ॥ तो राघवउपासक महारुद्र । अक्षयानंद सुखसमुद्र । रामभद्राचळ सुभद्र । सेविला सर्वदा ॥ ६६ ॥ नाहीं कल्पनायोगअपेक्षा । निर्वाणवीतरागदीक्षा । क्षोमलिया अभक्तासि शिक्षा । करी प्रळयरुद्ररोपें ॥ ६७ ॥ राघवभक्तपरंपरेसी । भीम संरक्षिता निश्चयेसीं । दंमूनि[1] काळकृतांतासि । पाववी श्रीरामीं ॥ ६८ ॥ तो अकरावा रुद्र विख्यात । भक्तसंरक्षण करी कृतार्थ । समर्थे अर्जऊनि परमार्थ । वंश तया निरविला ॥ ६९ ॥ रामसमर्थभीमरूपें । पावन होईजे स्वरूपें । समर्थपरंपरेसी प्रतापें । रुद्र संरक्षिता ॥ ७० ॥ येकादश रुद्रांचा प्रथम । प्रत्यक्ष जाला बलभीम । आतां मनोरथसिध्दि परम । प्रत्यक्ष जालियां ॥ ७१ ॥ महाअद्वैतशास्त्रसंपन्न । अनुभव नवव्याकरणी सुप्रसन्न । उपनिषदमथितधूडारत्न । हातासि आलें ॥ ७२ ॥ सफळ प्राप्तीची अफळकळा ।

१ दमन करून.

सातर्की धरिली ते स्वलीला । ते चि अभिव्यक्तीनें जिव्हाळा । जाहिला अद्वैतामृतें ॥ ७३ ॥ तें चि निरूपण रसाळ । अद्वैतानुभव कौतुक । श्रोते स्वरूपअवधानशील । परिसोत पुढें ॥ ७४ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । एकादश रुद्र प्रगटला । ह्मणे एकअनंत ॥ ७५ ॥ एकादशरुद्रे ॥ प्रथमउल्लासः संपूर्णः॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ सर्वगत । सर्वी असोनि सर्वातीत । समस्त श्रुतीचें सार मथित । परतत्त्व स्वयें ॥ १ ॥ सर्वार्थसिद्धीची सिद्धि । सर्वसिध्यार्थउपलब्धि । सायुज्यसुख निरवधि । परात्पर ॥ २ ॥ समर्थप्रसन्नता भीमदर्शन । समर्थकृपेनें साक्षात्कार पूर्ण । समर्थहृदयींचें निरावरण । तत्त्वप्रतीतीसि आलें ॥ ३ ॥ निजवैखरीची वैखरी । समर्थस्वामि उद्घाट करी । परा अभ्यंतराक्षरीं । प्रगटीतसे ॥ ४ ॥ परामायार्णव दुस्तर । समर्थ होऊनि कर्णधार । कृपेनें भवसिंधूचा पार । पावविला ॥ ५ ॥ अपरोक्षज्ञाननौका । बैसऊनि निजविवेका । सर्वसिंधूतीत निष्कळंका । पदासी नेतसे ॥ ६ ॥ अक्षयाचें शीड उभविलें । चैतन्यपवनाचेनि ढाळें । चमत्कारें चि चालविलें । परतीरासी ॥ ७ ॥ अक्षोभ भवसिंधूंत जळचरें । ब्रह्मांडाऐसीं मच्छ मगरें । काळरूपीं विशाळें क्रूरें । नेणवे सावजें किती ॥ ८ ॥ उल्लाळती अहंकृतीचेनि प्रबळें । गिळिती तारूंचि तें सगळें । सिंधुजळीं आवर्त विशाळें । तत्काळें बुडविती ॥ ९ ॥ भेदप्रवृत्तीचीं द्वीपांतरें । विषमपर्वताचीं शिखरें । गुप्तघसणीनें कठोरें । जाहाज फोडिती ॥ १० ॥ महाभवजळावैधैसंधि । बुडवितां नसेचि शुद्धि । अज्ञानजळनिरवधि । अहं प्रबळ लाटा ॥ ११ ॥ परमकृपाळु यत्नें पूर्ण । भवाब्धीसि तारक संपूर्ण । तारवांत बैसोनि आपण । निजदृष्टीनें चालवी ॥ १२ ॥ विवेकबोध बळाढ्य भले । नौकेसी नावाडी लाविले । प्रतीतीची चाकूनि आवळे । चालविलें त्वरा ॥ १३ ॥ न लगतां विकल्पाचा वास ।

---

१ भवाद्धानें. २ (?). ३ यतं (?).

घुकेऊनि भ्रमावर्ते त्वरा । आणिलें अप्रांताच्या तीरा । कळों नेदितां ॥ १४ ॥ जेथूनि साक्षत्व सरलें । जाणिवेचें जळ वोसरलें । अंक्ष-यांचें तीर लागलें । स्वरूपास्तित्व ॥ १५ ॥ जेथें धरांबरविहीन । पाठारं लागलें समसमान । पाहातां दृश्य द्रष्टा दर्शन । हारपलें-तेथें ॥ १६ ॥ नाहीं आश्रय ना रूप कांहीं । येकेजिनसी सर्वां-ठायीं । तया अप्रांतदेशीं पाहीं । आणिलें वस्तीसिं ॥ १७ ॥ अपरोक्ष सित्वांचा ठायं । वस्तीवीण तो अवघा चि गांव । निरंजन ऐसें उपनांव । संकेतें बोलिजे ॥ १८ ॥ परमगहन सित्वार्थ । साक्षा-त्कारें चि परमार्थ । सुळीन भूमिका ते परार्थ । भोगावयाची ॥ १९ ॥ अपरोक्ष तत्व सनातन । समाधिसुखं सिन्हासन । सर्वगतवैसकें पूर्ण । शुद्धबुद्ध स्वयें ॥ २० ॥ महाअद्वैत येकछत्री नृप । देशदेशाधिपति अरूप । अपरोक्षतत्वस्वरूप । उमसे चि ना ॥ २१ ॥ परमार्थ-पिकाची धरणी । निस अक्रियाची करणी । अक्षेय स्वानंदाची भरणी । अभेदप्रतीति ॥ २२ ॥ शक्तिचक्राहूनि पर । मोक्षसुखाडांचें माहेर । अक्षय निधीचें भांडार । भरलें असे ॥२३॥ पूर्ण निजकैवल्य-संपत्ति । होय अनुभवावया वस्ति । चौथी भूमिका विश्रांति । पुरातन जे ॥ २४ ॥ प्रवृत्तिनिवृत्तिहूनि पर । जन्मभूमिका हे अगोचर । सद्गुरुकृपाकरें अवाङ्मानसगोचर । आणिलें वस्तीसी ॥ २५ ॥ मज समाधिशिबिकेसी । बैसऊनि कृपाविशेषीं । आणिलें आपुलिया स्थ-ळासि । कैसें अकल्पित ॥ २६ ॥ परात्परा देशांतरा । आणून देशो चि केलें त्वरा । अपरोक्ष सुखाचा थारा । योगी वसों येती ॥ २७ ॥ जनकादिक महा अनुभवी । लाधले संस्थानपदवी । शुकसनकादि निजजिंवीं विसांवोनि आले ॥ २८ ॥ आदिनाथ मछेंद्रमुनी । गोरं-क्षादिककरूनि । तत्वतां निजवस्तीसि येऊनि । विसांवले ॥ २९ ॥ प्रवृत्तिपरिभ्रमणें श्रमलें । परमवीतरागे निघालें । तें तें निजविश्रांतीसि आले । राहिले निश्चळ ॥ ३० ॥ सरली प्रवृत्तीची प्रवृत्ति । आंगींच्या

---

१ पृथ्वी व आकाश. २ बैठक.

आंगीं च निद्रा घेती । ते हे स्वरूपसुखवस्ति । लाभे अवचट ॥ ३१ ॥ कपिलादि महायोगेश्वर । विसांवले अद्वैतसुखें अपार । स्वरूपवस्तीनें चि साचार । विश्रामले सिध ॥ ३२ ॥ अनंतसिधनिवास स्थळ । उभा विराला ब्रह्मगोळ । अपरोक्ष आनंद केवळ । तोहीं विसांवला ॥ ३३ ॥ दत्तात्रय महामुनि । अनुभवति निस्य उन्मनी । तो ही स्वरूपवस्तीसि येऊनि । निवांत जाला ॥ ३४ ॥ सर्वगत तें अधिष्ठान । नसे नामरूप आकृतिभान । स्थळदर्शनें चि पूर्ण । विश्रांतीसि आले ॥ ३५ ॥ जेथें हरिहर विसांवले । गुप्त प्रगट अनुभविले । अभेदप्रतीतीनें जाले । स्वरूप चि ते ॥ ३६ ॥ त्रैलोकींचे ज्ञाते सकळ । पावोनियां विश्रांतीचें स्थळ । आवघें स्वरूप चि केवळ । होऊनि ठेले ॥ ३७ ॥ स्वरूपवस्तीसि आलियां । परतोनि प्रवृत्ति नसे तया । त्या स्वरूपस्थानासी जावया । मार्ग योगियां पुसा ॥ ३८ ॥ आधारेंवीण उर्ध्वगमन । द्रष्टा चि द्रष्टत्वेंविहीन । सद्गुरूनें कडियेस घेऊन । आणिलें तेथें ॥ ३९ ॥ बाळकासि निद्रासुखभरें । वोसंगा घेऊनि कृपाकरें । स्वरूपवस्तीसि चमत्कारें । आणिलें ऐसें ॥ ४० ॥ नसे चि प्रमाणाची सीमा । मागें घालूनियां व्योमा । आणिलें निजवस्तीसि निरूपमा । परंधामासी ॥ ४१ ॥ नाहीं रूप रेखा ना नाव । समान सारिखा चि ठाव । सदोदित निरावेव । सर्वत्र तें ॥ ४२ ॥ निर्मळ उदास आसपास । संपूर्णपणें तें चि तें भकास । पैसें मोकें उद्वेस । निवास पाहातां ॥ ४३ ॥ सैराट वोसाड लागलें । कोठें देखिलें ना आईकिलें । ऐसिया ठायांसी आणिलें । अकल्पित ॥ ४४ ॥ पाहातां वोसाड चहुंकडे । दुजें कांहीं च दृष्टी न पडे । अंतरखेचरीच्या उजेडें । देखिलें डोळां ॥ ४५ ॥ पाहातें पाहाणें निघोन जाय । ऐसें तें भयानक पाहे । स्थळदर्शनें चि होय । निवृत्ति सहजें ॥ ४६ ॥ ब्रह्मारण्य तें खचरट । निघोंटें सुखें चि घनवट । पैसपणें न फुटे चि वाट ।

१ मांदीवर. २ आकाश. ३ अफाट. ४ मोकळा, रिकामा. ५ निर्जन. ६ स्वैर, अमर्याद. ७ भरपूर.

कोंडिलें तेणें ॥ ४७ ॥ ऐसियाचे अभ्यंतरीं । आणिलें साक्षात्कार-निर्धारीं । आपण हि न दिसे स्वीकरी । मोकळिलें तेथें ॥ ४८ ॥ स्मरणासीच असे दाटित । उमसे चि ना काहीं निश्चित । अनंता काय जालासी गुप्त । निदानीं यया ॥ ४९ ॥ कोण्ही च न दिसे दृष्टीसि । चाकाटलें जाय भयेंसीं । भयानक चिदाकाशीं । उभे ठाकले अद्भुत ॥ ५० ॥ दुजें नसे चि चोजविता । आपआपणा भयें पाहाता । तया विस्मयात अवचिता । जाय सामावला ॥ ५१ ॥ काहींसें उर्वरीत अवसान । केवळ उन्मनीची दशा गहन । इतिमात्र निरंजन । प्रतीतीसि ठाके ॥ ५२ ॥ तें निर्मळ स्वरूपानुसंधान । निरावकाशीं पैस घन । असता अनंतमौनीनें निर्वाण । आणिलें तयासी ॥ ५३ ॥ येकट ते निरजनवनीं । आक्रदत धाय मोकलोनि । धाव पाव गा अनंतमौनी । आळवीतसे भरें ॥ ५४ ॥ प्रतिध्वनीनें अत्यद्भुत । अनंतमौनि असें चि ह्मणत । निजश्रवणासी सुखावित । तेणें चि वचनें ॥ ५५ ॥ शब्दीं विवरे मौनीअनंत । तवं तो याचेसी न ये निवात । ना अनुसंधानासी अत । नेंदी च स्वयें ॥ ५६ ॥ जेवि उद्वसवनांतरीं । केवळ बाळकासी आपुल्या करीं । मोकळूनि माता जाय माघारी । तैसें वर्तविलें ॥ ५७ ॥ भयानकासि सळोनि पडे । बाळक जाईल कोणीकडे । ऐसें उदासीन रोकडें । केलें त्या अनंतें ॥ ५८ ॥ पाहाता पाहाता सिणले डोळे । बैसले सदोदित ते न ढळे । जावें कोणेकडे हें न कळे । निर्बुजले तेणें ॥ ५९ ॥ हें अनंतें अभिनव केलें । विस्मयेंसीं भांबावलें । आप आपणा विसरलें । मूर्छित होये ॥ ६० ॥ यथार्थ जाणोनि निदान । पुन्हा सावरूनि अनुसंधान । केलें अनताचें स्मरण । नामघोषें ॥ ६१ ॥ त्या स्मरणासरसाचि सदोदित । उभा ठाकला मौनी अनत । कुरवाळूनि कृपाकरें निश्चित । हृदयीं धरी ॥ ६२ ॥ कृपामृतसजीवनी । पाजिली त्या निजनिदानी । येकवेळ निदान पावोनि । पुन्हा उठविलें ॥ ६३ ॥ जैसें मरण पावलें

होतें । अकल्पित देविकें त्यातें । पुन्हा परतोनि शवातें । जीव आला ॥ ६४ ॥ तेंवि त्या वोसाडस्थळीं । अनुभविली निदान दसाळी । पुन्हा पाहांतां अंतराळीं । अपरोक्ष होये ॥ ६५ ॥ मूळवृत्तीचें अवसान । चिदाकाश सनातन । सस्वरूपाचें ध्यान । दृष्टीसी बैसलें ॥ ६६ ॥ पैवसावलें निज अनुसंधान । निरावरणासी नाहीं प्रमाण । अखंडीत अनंतस्मरण । गर्जना केली ॥ ६७ ॥ प्रळयकडक फुटोनि तत्क्षणीं । सप्रभ वीज समावे गगनीं । तेंवि निजानुसंधाननिदानीं । अस्तूतें पावे ॥ ६८ ॥ नाहीं आपपर भावना । ऐसिया निरंजनीं जाणा । मोकलिलें अनुसंधाना । अनंतमौनीनें ॥ ६९ ॥ नाहीं चंद्र सूर्य ना जगती । नाहीं दिवस ना ते राती । कैंचे उदय अस्तु त्याप्रति । निरविलें मातें ॥ ७० ॥ जैसें तप्तलोहो जळ आटी । तैसी जाली तेथें समसाटी । परंतोनि यावयाची गोष्टी । करील कवण ॥ ७१ ॥ माहाप्रळयींचा पवन । सर्वस्वें उपाधिविहीन । जाय गगनीं सामावोन । तैसें जालें ॥ ७२ ॥ विशाळीं विशाळ हारपलें । निर्गुणीं निर्गुण सामावलें । तेथें अधोर्ध्व वोसरलें । प्रमाण जाय ॥ ७३ ॥ पदार्थेंवीण तें निर्मळ । कर्तेन विना साळेंमाळ । येकजिनसी अंतराळ । तें चि तें अवघें ॥ ७४ ॥ अद्वैत अनुभवश्रुति । अभिन्न प्रतीतीनें अनुभविती । त्या चि उपदेशक्रमासि येती । अभेदप्रत्ययें ॥ ७५ ॥ प्रमाणसीमा वोसरली । वस्तुचि प्रतीतीसि आली । अभिन्नप्रतीतीनें राहिली । नित्यनिश्चळता ॥ ७६ ॥ रूपेंवीण पैस मोकळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । अक्षयठाव तो निराळा । निःसंग स्वयें ॥ ७७ ॥ नुरे चि सावकाश त्रिपुटी । ऐसी दिल्ही अनंतानें भेटि । अभिन्नस्वानंदाचें पीठीं । सामाविलें ॥ ७८ ॥ अवचट लागे सुषुप्ति । तैसी साक्षित्वाची उपशांति । अनिर्वाच्ये सहजें स्थिति । मौन्यमुद्रा अभंग ॥ ७९ ॥ ऐसी हे निर्वाणप्रतीति । अभिन्नरूपें सहजस्थिति । अनंतस्वरूपप्राप्ति । अपरोक्षता ॥ ८० ॥

१ (!) देविकचमत्कारानें. २ दसंदी. ३ अस्तास. ४ लोपचंदांव, अर्कीट.

बोलतां न ये तें बोलविलें। अनुभवावीण अनुभवा आलें। ऐसें हें अभिनव केलें। सद्गुरुअनंतें ॥ ८१ ॥ अनिर्वाच्य अर्थांतरें। प्रगटला अपरोक्ष साक्षात्कारें। आपेंआप निर्विकारें। प्रगट जाला ॥ ८२ ॥ स्वरूपध्यानें साक्षात्कार। अनंतरूप अगोचर। अनंतस्वामी निरंतर। प्रसन्न जाला ॥ ८३ ॥ निजहृदयीचें अपरोक्षज्ञान। अपरोक्षवस्तूचें समाधान। अपरोक्षसाक्षात्कारें पूर्ण। प्रत्ययासि आला ॥ ८४ ॥ स्वरूपांबर धारणाधर। अनन्यप्रतीतीचा विवर। अक्षरीं अक्षर साचार। अर्थें प्रगटला ॥ ८५ ॥ घेऊनियां निजअभ्यंतर। प्रत्ययासि आणिलें साचार। नाहीं अवस्थेचा संस्कार। ऐसें चि केलें ॥ ८६ ॥ तें सद्गुरु अनंतस्मरण। मोक्षप्राप्तीचें अधिष्ठान। ध्येयध्याताध्यान। विसांवलें तेथें ॥ ८७ ॥ गाळींव चिदाकाशस्थिति। पुढीलिये उल्हासीं पुढती। अवधान देऊनि श्रोतीं। अवधारिजे ॥ ८८ ॥ नित्य बोधामृतपान। नित्य नूतन समाधान। नित्य श्रवण नित्य मनन। सहजस्थितीनें ॥ ८९ ॥ इति श्रीरामसोहळा। सद्गुरुकृपेचा जिव्हाळा। स्वरूपांबरध्यानलीळा। म्हणे मेरुअनंत ॥ ९० ॥ येकादशरुद्रे ॥ द्वितीयउल्हासः संपूर्णः ॥

---

॥ श्रीरामचंद्रायनमः। श्रीरामसमर्थ सदोदीत। अखंडीतस्वरूपें अनंत। निजअनुग्रहें प्रबोधित। अभिनव तें ॥ १ ॥ मस्तकीं ठेऊनि कृपाकर। श्रवणीं सांगितलें साचार। साक्षात्कारेंसीं अभ्यंतर। घेऊनि गेला ॥ २ ॥ कोण मी, होतो हें न कळे। पूर्वापर हिरोनि नेलें। कैसें अर्थी अर्थविलें। स्मरणेंवीण ॥ ३ ॥ काय केलें कीं न कळे सहसा। विसराचि, वर्तविला ऐसा। आतां ब्रह्म मी, प्राप्तीचा वळसा।[1] कवणें करावा ॥ ४ ॥ मरण मारूनि वांचविलें। जन्मेंविना जीवविलें। भेदेंवीण नांदविलें। आत्मस्वरूपीं ॥ ५ ॥ कळों नेंदितां बुद्धीसी। स्वरूपेंचि आला प्रत्ययासी। अनंताची कृपा ऐसी। बोलिली न वचे

---

१ (१) फेरा, वळसा.

॥ ६ ॥ अवधान मागूनि संपूर्ण । अवधानींच केलें निर्वाण । काय बोलों मी तें अनुसंधान । वृत्तीसि न ये ॥ ७ ॥ स्वरूपसीमा वोलांडिली । ध्यान धारणा वोसरली । शाश्वतपणें चि संचली । केवळ वस्तु ॥ ८ ॥ नाहीं द्वैत त्या अनुसंधानीं । कवण करील बुझावणी । सांच चि हा अनंतमौनि । प्रगटला ऐसा ॥ ९ ॥ आपआपणांत अनुसंधान । संपूर्णपणें चिद्गगन । ज्ञेय त्रिपुटीविहीन । निरालंबदशा ॥ १० ॥ अतिउंचें त्या अंतराळीं । लंघिली सावकाश पोकळी । अलक्ष अनुसंधान समूळी । संपूर्ण मूळक्षय ॥ ११ ॥ पाहे संपूर्ण आसपास । प्रांत नाहीं तया स्वरूपास । समरसला तेथें निदिध्यास अंतरखेचरीचा ॥ १२ ॥ मनोजन्य विगळित भावें । लक्ष संपूर्णपणें घटावें । तदाकारतेणेंचि स्वानुभवें । वितळोनि जाय ॥ १३ ॥ कांहीं आश्रय अपेक्षित । तव तें निराश्रय सदोदित । तर्कवा तुटोनि पक्षरहित । लक्ष हारपलें ॥ १४ ॥ दृश्याची देखीच दिसेना । नयन सीणले तें पाहवेना । पाहतें पाहणेपणाच्या निदाना । येऊं न सरलें ॥ १५ ॥ स्वरूपार्णवीं हारपलें । लक्ष त्याचें निर्वाण जालें । निःशब्दरूप प्रतिष्ठिलें । अनंतमौनीनें ॥ १६ ॥ अंतसमयींचा दीप सोज्वळ । प्रकाशाचा भाव धरी विशाळ । परि तो शेवटचि होय तत्काळ । जालें तैसें लक्षासी ॥ १७ ॥ विशुद्ध सत्वाचें सरलें बळ । निःशेष स्वयें होय व्याकुळ । सरली मनाची चळवळ । जळ आटलिया मछोपरी ॥ १८ ॥ सिंधु होता तरि लहरी चालिली । प्रभाकरआस्तिक्यें प्रभा जाली । चंद्रावरि चंद्राची फांकली । किरणें जैसीं ॥ १९ ॥ अग्नीवरी अग्नीच्या ज्वाळा । पृथ्वीकरितां अवतारमाळा । जगजीवनें नानाकळा । प्रगट जगीं ॥ २० ॥ तैसें जगत्कारण मूळ मी । असतां सत्यासत्य आक्रमी । पक्षविवर्जित अंतर्यामी । लक्षें वोसरलें ॥ २१ ॥ निःशेष नामरूपाची वार्ता । असेचिना ऐसिया अनुभविता । नसोचे अनुभव ना अनुभविता । ऐसें जालें ॥ २२ ॥ वळीस घेतलें निज-

---

१ (१) प्रति. २ माधाप्रमाणें.

लक्ष । चिदंबरभावना हे प्रत्यक्ष । कपिलादि महासिद्ध दक्ष । याचि लक्षें रूढले ॥ २३ ॥ गगन गाळींव विशाळ । द्रष्टृवीण येक अंतराळ । याचि निजलक्षें सुनिश्चळ । जाहले योगी ॥ २४ ॥ येणें लक्षें स्मरणीच उडे । देहीं अचेतनता रूढे । केवळ अंतरखेचरीच्या पवाडें । निर्विकल्प समाधि ॥ २५ ॥ पारि येथें येकचि विचारणा । तटस्थ जालियां उरे भावना । ते अवस्थारहित समाधाना । पाहिजे घेतलें ॥ २६ ॥ जैसा अत्यंत तृषेला । ध्यानस्थ नदीतीरीं बैसला । तेथें अकाळवृष्टीनें आला । पूर प्रमाण टाकूनि ॥ २७ ॥ देहीं तृषा तैसीच राहे । तो नदीप्रवाहें जाये । तैसें अनुभव नसतां होये । ताटस्थतेशी ॥ २८ ॥ याकारणें अनुभवसमाधि । दुर्लभ ते गुरुकृपा उपलब्धि । समाधिसुख निरवधि । स्वयेंचि तो आत्मा ॥ २९ ॥ सोय धरावी येथें कवणें । हें अंतःकरणाचें लक्षणें । स्वरूपाचें ध्यान धरणें । स्वरूपें केवीं ॥ ३० ॥ असो ते प्रत्यक्षतेसि कारण । सद्गुरुकृपा स्वरूपध्यान । येथें तर्‍हीं विचारेंचि करून । धारणा रूढावी ॥ ३१ ॥ हें उगेंचि बोलिलें न जाये । प्रत्यक्ष जालें तरीच होये । आपला आपणचि जो स्वयें । कैंचा साक्षी आणावा ॥ ३२ ॥ या दशेच्या प्रवळें । समाधिसुषुप्ति चावळे । ज्ञान अंतर्यामीं निवळे । वैखरीसि येऊनि ॥ ३३ ॥ शब्दत्रिपुटी ज्ञानत्रिपुटी । नसोनि सांगतसे गोष्टी । तो अनंतमौनीसमसाटी । आपणेसीं करित ॥ ३४ ॥ अंतसमयीचें निरवणें । जैसें जीवलगीं जीव धरणें । तैसी निर्वाणींचीं हे वचनें । हृदयीं धरा ॥ ३५ ॥ येकायेकीं अकस्मात । वहुतामध्यें येकासि अंत । आला तैसा चि हा वृत्तांत । प्रत्यक्षतेसी ॥ ३६ ॥ चहुं देहांचें साक्षित्व । निःशेष जालें शुध्द सत्त्व । निर्मूळ गेलें महत्तत्व । दीपकर्पूरयोगें ॥ ३७ ॥ संकल्पशून्य नसे कथिता । न दिसे श्रोता ना तो वक्ता ।

वस्तु निजजिवें । अनुभवील कवण ॥ ४० ॥ वस्तु वस्तुरूप निवाडें । हें हीं बोलणें न घडे । वस्तूमाजि कोणे कडे । वस्ति करावी ॥ ४१ ॥ न रिघे विवेक केवळ । निर्घोटपणें चि तें अढळ । अखंडीत अचंचळ । रूपरेखा कैंची ॥ ४२ ॥ निःसंगसमाधि सेविती । योगी अनुभऊं ह्मणती । परि कदापि अनुभवस्छिति । आले चि नाहीं ॥ ४३ ॥ वृत्तीसि तें आतळेचिना । निवृत्तीसि तरी उरोंचि देयिना । केवळ अभिन्न समाधाना । ऊरि नसेचि ॥ ४४ ॥ अपार संचलेंचि असे । विवेकाच्या हातीं न बसे । कोणतेही युक्तीनें सरिसें । घेतांचि नये ॥ ४५ ॥ विवंचूनि पाहातां निर्गुण । व्यापक होय सनातन । कोणेकडे जायील मन । अंत पाहावया ॥ ४६ ॥ ह्मणो अंतर्बाह्य तें आहे । तरि मध्ये न हातें तें काय । आहे नाहीं हें हीं साहे । निःसंगपणें ॥ ४७ ॥ काहीं संधि नसे चि तयासी । चाळिलेंचि आहे पदार्थासी । पदार्थापूर्वींच आसपासीं । निश्चळ संचलें ॥ ४८ ॥ मध्येंच कल्पित पदार्थ । रुधिला सावकाश व्यर्थ । पदार्थदृष्टीनें अनर्थ । विकृतीसि आणिलें ॥ ४९ ॥ मूळपदार्थावरी दृष्टी । पडतां मासली हे सृष्टि । पदार्थाच्या पाठींपोटीं । संपूर्णपणें ॥ ५० ॥ पाठींपोटीं असे भरलें । आंगोआंगीं कोंदाटलें । पदार्थामागेंपुढें संचलें । तेविंच तें निखिलें ॥ ५१ ॥ उपाधिकरितां बोलणें जालें । त्यास्तव द्रष्टृत्व प्रतिष्ठिलें । द्रष्टयाकरितांचि उभारलें । दृश्य हें संपूर्ण ॥ ५२ ॥ नामरूपस्छितीनें सकळ । पाहातां द्रष्टाचि अवघा अखिल । स्वरूपदृष्टीनें द्रष्टा केवळ । असेचिना मुळीं ॥ ५३ ॥ द्रष्टृत्वासि खचूनि पाहे । उरल्यासि कवणें ह्मणावें काय । प्रतीतीनें हे धरिली सोय । कांहींयेकपणें ॥ ५४ ॥ खुणेमाजि निर्वाणज्ञान । वस्तुपरिक्षा ज्ञाननिर्वाण । जैसी पृथ्वी पाहातां उकरून । अवकाश रिघे ॥ ५५ ॥ तो अवकाश कोठील कैंचा । नूतन कीं पाहातां पूर्वींचा । परिक्षम आणून तयाचा । पाहावा अंतर्भाव ॥ ५६ ॥ ऐसेंचि सर्व पदार्थांत । व्यापक आहे अखंडित । त्या दृष्टांतें पाहातां सदोदित । पदार्थ नाडळे ॥ ५७ ॥ पदार्थदृष्टीनें पाहातां । पदार्थ जातील तत्वता ।

कल्पांतकाळीं वस्तुता । कांहींच नुरे ॥ ५८ ॥ भविष्यार्थे कल्पांत । वर्त्तमानीं तेंचि विवंचित । पदार्थरहित शाश्वत । दृष्टि जयाची ॥५९॥ पदार्थ गेलिया द्रष्टा नुरे । हेंचि जाणूनि अभ्यंतरें । आत्मनिवेदन-निर्धारें । निस्संग जाला ॥ ६० ॥ दृश्याकरितां ब्रह्मदर्शन । तें द्रष्टृत्व जालें ब्रह्मार्पण । दृश्यचि द्रष्टयाचें जीवन । निःशेष आटलें ॥ ६१ ॥ पदार्थमात्रीं निरंजन । रिघालें ज्ञानदृष्टीसि अंजन । या अर्थे जन वन विजन । शोधूनि पाहिलें ॥ ६२ ॥ सीतमात्र चांचपूनि पाहातां । कळे पाकसिध्दि तत्वता । तैसें पदार्थाचें अंतर घेतां । व्यापक आडळलें ॥ ६३ ॥ तें व्यापकपणें संपूर्ण । तें दृश्यारहित निर्गुण । तें निर्मळ निश्चळ निर्वाण । गगनासारिखें ॥ ६४ ॥ निराश्रयें अवलंबेंवीण । न राहेचि ज्ञानाचें आसन । पृथ्वी गेलियां संपूर्ण । सृष्टिचि नुरे ॥ ६५ ॥ काळ गेलियां काळज्ञान । कवण करील त्या प्रमाण । समान सारि-खेंचि चिद्गगन । तेंचि तें उरलें ॥ ६६ ॥ योगी जे कां सनातन । अनुभविती त्यासि तें चि होऊन । पाहातां वेगळीक मुळींहून । असे-चि ना तया ॥ ६७ ॥ नसेचि वस्तूचा वियोग । स्वरूपींचि योगिये निःसंग । प्रतीतीनें निस्तरंग । स्वरूपार्णव ते ॥ ६८ ॥ वर्तती प्रा-रब्धें जनीं । जैसी कर्पूरदीपिका उजळूनि । निवाळिलीसे तत्क्षणीं । निदानभविष्यें ॥ ६९ ॥ अखंडस्वरूपीं नितांत । स्वसुखकुंम स्वरूप-सिंधूंत । गळोनि गेले अप्रांत । जीवनीं तया ॥ ७० ॥ दिवसरात्रि समाधिस्थ । अखंडवस्तूचा येकांत । सहजस्थितीनें निवांत । अनि-र्वाच्य तो ॥ ७१ ॥ जयासि प्रबोधही टाकेना । आला उन्मनीच्या अवसाना । राहिली चित्ताची चिंतना । निर्विकल्पीं त्या ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ अहंस्फूर्ति विना योगी चित्तं चिंतनवर्जितं ।
बोधशक्ति विना बुधिः कल्पनारहितं मनः ॥ १ ॥

जे अहंस्फूर्तीसि नाहीं आले । ते नाहंकृतीनें निवाले । मी कोण कैंचे हें नाथिलें । असेचिना तया ॥ ७३ ॥ सोऽहंस्वरूपानुसंधान । हें हा

१ सिताबरून भाताची परीक्षा या न्यायानें.

असेचिना मुळीहून । निरालंबस्थितिनिर्वाण । योगेश्वर ॥ ७४ ॥
.. ॥ श्लोक ॥ वेदांतः— अहं कोऽहं नाहं इतिसंकल्पवर्जिता ।
निरालंबस्थितिः सम्यक् सदैव विराजते ॥१॥
मूळ खंडोनियां गेलें । उन्मनीचें भान सरलें । सदोदित तें संचलें । आपुलें स्वरूप ॥ ७५ ॥ तेंचि पुढें निरूपण । स्वरूपाची ऊणखूण । अनुभवाचें देऊनि अवधान । अवधारिजे ॥ ७६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । अलक्षलक्षाची अंतर्कळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ७७ ॥ यकादशरुद्रे ॥ तृतीय उल्लासः संपूर्णः ॥

---

॥ श्रीरामचंद्रायनमः । श्रीरामसमर्थअंतर्भाव । निर्विकार सत्यस्वभाव । निर्गुणबोधें स्वानुभव । घेती महामुनी ॥ १ ॥ उत्पत्तिस्थितिक्षयरहित । निवांत अनुभविती संत । महामननसीळ ध्यानस्थ । बैसले प्राप्तोस्तव ॥ २ ॥ त्या स्वरूपाची प्राप्ति । नव्हेचि पां कोण्हेही युक्ती । चक्षूनें प्रकाशेना स्थिति । ना वाचेसि न ये ॥ ३ ॥ ना दैवतप्रसादेंकरून । स्वरूपलाभ नव्हे जाण । नाना तपें साधनेंकडून ज प्राप्त नव्हे ॥ ४ ॥ जें सत्कर्मेंहीं प्राप्त नव्हे । तपें तीर्थाटणें जें दुर्‍हावे । जें विशुध्दमत्वें करून फावे । ऐसें ही घडेना ॥ ५ ॥ जेथें ज्ञानाचा[1] उपाय न चले । जेथें निश्चळ ध्यानयोग राहिले । ते सद्गुरुप्रसादें लाधलें । स्वतःसिध्दरूप ॥ ६ ॥ जें नेत्रेंकडून आन वाचेनें । दैवें तपें कर्में न जाणे । तो ज्ञानेंकडूनच परिपूर्ण । विशुध्दसत्वनिर्वाण जाणतसे ॥ ७ ॥ जें साधनें प्राप्त नव्हेचि जाण । तत्वता तेंचि तें न होयचि तें आपण । सहजप्राप्तीची खूण । सद्गुरूनें दिल्ही ॥ ८ ॥ जें उपनिषदीं वर्णिलें । अद्वैतशास्त्रीं प्रशंसिलें । जें समाधिसुखें सेविलें । साधूजनीं ॥ ९ ॥ जे कां महा विरक्तीं अनुष्ठिलें । जे स्वानंदसंभूनें अनुभविलें । जें तपोधनीं आर्जविलें । सर्वस्व देऊनि ॥ १० ॥ जें उदासीनतेचें अभ्यं-

[1] हा चरण अर्धवट आहे.

तर। जें निरुपाधीचें जिव्हार। जें निरावकाशाचें साचार। संपूर्ण हृदय ॥ ११ ॥ ऐसें तें स्वस्वरूप निर्मळ। निरालंब अचंचळ। तयाच्या स्वरूपें अविकळ। जाले योगी स्वयें ॥ १२ ॥ मुख्य मीपणापासूनि मुकले। निर्ममतेनें विसांवले। स्वसुखेंचि सुखावले। निवाले सहज ॥ १३ ॥ बंधमोक्षपदद्वय जाण। ममत्व आणि निर्ममत्व पूर्ण। मायाममत्वेंचि बंधन। नसोनि पावले ॥ १४ ॥ निर्ममयोगें सनातन। जालें मुक्तीचें अधिष्ठान। अर्जुनाप्रति श्रीकृष्ण। उत्तरगीतेसि बोलिला ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ द्विपदे बंधमोक्षाख्ये निर्ममेति ममेति च।
ममेति बध्यते जंतुर्निर्ममेति प्रमुच्यते ॥ १ ॥

निरावकाशीं सनातन। निरालंब सुखजीवन। निर्मनदशा अनुसंधान। तेथें पवाडले ॥ १६ ॥ ज्ञानाचें अधिष्ठान तत्वता। ज्ञानासि सामाउनि स्वभावता। अपरोक्षस्वरूपें असतां। अपरोक्ष सहज ॥ १७ ॥ जाणीव मुळींहूनि नसे कांहीं। तें जाणिवेसि कळेचिना पाहीं। जाणो ह्मणोनियां प्रवाहीं। बहुत पडिले ॥ १८ ॥ जेथें जाणीव तितुकें अज्ञान। नेणीव तेही तैसीच जाण। जाणिवेनेणिवेतीत समाधान। जालें पाहिजे ॥ १९ ॥ सर्वां असोनि दिसेना। जवळि असे परि भासेना। पाहातां दृष्टीसि तयाविना। अवकाश कैंचा ॥ २० ॥ तयामध्येंचि हें विश्व वर्ते। परि विश्वाचेनि न प्रवर्ते। सर्वांचे हृदयीं सर्वां परतें। तेंचि तें संपूर्ण ॥ २१ ॥ धरूं जातां हातासि न ये। हातामाजि संपूर्ण आहे। जें वळें सारितां न होये। तिळभरि परतें ॥ २२ ॥ चुकऊं जातां चुकेना। जें विसरें विसरवेना। जें आठवेंही आठवेना। काय करावें तया ॥ २३ ॥ पाहतांचि त्या संपूर्णपणें। पाठी लागलें कायकारणें। कोठेंही जातां सन्मुखतेनें। विन्मुख नव्हेचि ॥ २४ ॥ जें शस्त्रखणखणाटीं तुटेना। जें प्रळयविद्युत्पातें फुटेना। जें प्रळयप्रभंजनें लोटेना। स्वयंभ उभें ॥ २५ ॥ जें प्रळयोदकें भिजेना। जें वज्रांगघसणी झिजेना। जें प्रवृत्तियोगें रिझेना। नाशेना कल्पांतीं

॥२६॥ जें प्रळयपावकें जळेना। जें प्रळयप्रकाशें उजळेना। जें नाना तमें काळवंडेना। परमतत्त्व स्वयें ॥ २७ ॥ तया स्वरूपाची संगति। अंतर्भावी निजप्रतीती। संतस्वयेंचि अनुभविती। तेंचि होउनी ॥ २८ ॥ तया संतांचें लक्षण। कवणासि होयिल प्रमाण। जेथें वाचेसहित मन। आटोनि गेलें ॥ २९ ॥ तयासि श्रवणाची चाड नसे। मननासि मनचि न दिसे। लोकदृष्टया प्रारब्धवशें। श्रवणींच बैसले ॥ ३० ॥ नित्य अध्यात्मश्रवण। प्रारब्धीं हें काळहरण। अपरोक्ष वस्तुनिरूपण अखंड होतसे ॥ ३१ ॥ सिद्धांचा हा स्वभाव जाण। नित्यानित्यनिरूपण। साधकांसी शिकवण। होतसे सहज ॥ ३२ ॥ श्रवणार्थी निजमनन। अर्थरूप तें अनुसंधान। आईकण्याविषईं अपूर्व तें जाणोन। तात्पर्य घ्यावें ॥ ३३ ॥ श्रवणीं अभ्यास उपपत्ति। सत्यान्वयअर्थसंगती। दृष्टांतयोगें दार्ष्टांतीं। निजलाभ घ्यावा ॥ ३४ ॥ येथें साक्षात्कार श्रवणीं। नित्यविवर निरूपणीं। अर्थारूढचि होऊनि। चर्चा व्हावी ॥ ३५ ॥ श्रवणावांचूनि साधन। आत्मज्ञानाचें संरक्षण। अखंडीत निरूपण। चर्चा असावी ॥ ३६ ॥ जळीं जळमय लवण। ब्रह्मानुसंधानीं उन्मन। हें अनुभवमार्गवें प्राशन। केलियां वरें ॥ ३७ ॥ निःशेष अनुभवदशा। ज्ञप्तिस्वरूप निराशा। उभयसंस्कारें परेशा। प्रतिष्ठिलें जिहीं ॥ ३८ ॥ तें सूक्ष्मदशेचें निदाण। निबिडसुखें अनुसंधान। कांहीं येकपणें स्मरण। असें तेथें ॥ ३९ ॥ ज्ञान उत्पन्नकाळीं दुर्बळ। असे सूक्ष्मरूप केवळ। ते समाधिसुखें निवळ। प्रशस्त व्हावें ॥ ४० ॥ काष्ठमथनीं अग्नि निपजे। तो प्रथमदशेसि निर्वुजे। नाना उपायेंचि पेटविजे। तैसेंचि ज्ञान ॥ ४१ ॥ काष्ठें उष्णें जरि वाळती। तरि ते धडधडा जळती। कांहीं आरद्रें असतां करिती। कासावीस धूम्रें ॥ ४२ ॥ धुरानें भरती डोळे। क्षोभक होय उतावेळें। तें ज्ञान परि वृत्तीच्या प्रबळें। संतप्त करी ॥ ४३ ॥ प्रकाश नव्हेचि प्रशस्त। तंवरि पाक होयिना निश्चित। अग्नि प्रबळलियां

१ 'साधनें' असावें की काय ? २ आर्द्र, ओली.

काष्ठजात । कांहीं उरो नेदी ॥ ४४ ॥ देहबुद्धीचीं इंधनें । वाळलीं[1] त्रितापमहाउष्णें । कडकडा मोडूनि विरक्तीनें । ज्ञानाग्नींत घातलीं ॥ ४५ ॥ ऐसा प्रबळला जो अग्नि । पट्टणें दहन करीत तक्षणीं । तैसाचि प्रबळला जाय वनीं । वनांतरें जाळित ॥ ४६ ॥ मग वाळलें बोलें न म्हणे । ब्रह्मांडनिवर्तक प्रदीप्तीनें । वाढला तरि प्रवृत्तीनें । निवृत्तीसि आणो ॥ ४७ ॥ देहबुद्धीसि करी दहन । निर्वाणज्ञानहुताशन । त्या ज्ञानाचें व्हावया उपशम । समाधि पाहिजे ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञानेन दीप्यते देहो बुद्धिर्ब्रह्मसमाधिना ।
ब्रह्म ज्ञानाग्निना नित्यं दह्यते पुण्यपापजं ॥ १ ॥

उत्तरगीता—

आकाशासारिखें सूक्ष्म । जयाचें शरीर निरुपम । सर्वव्यातीनें परम । पारे आडळेना ॥ ४९ ॥ सबाह्याभ्यंतरीं पूर्ण । विज्ञानदीपिका लाऊन । पाहावा अंतरींचा अंतरीं सघन । अंतरात्मा ॥ ५० ॥ पोकळीं सांडूनि आकाश । मरींव सुखें सावकाश । परेमाजि तैसा परेश । शोधूनि पाहावा ॥ ५१ ॥ निमिषार्धाच्या सहस्रवरी । त्याहून सूक्ष्म अभ्यंतरीं । परात्पर निर्विकारीं । अनुसंधान व्हावें ॥ ५२ ॥ परब्रह्मीं निजअनुसंधान । स्थिरावलियां सनातन । दुश्यपापराशी संपूर्ण । जळोनि जाती ॥ ५३ ॥ सर्वदां ब्रह्मीं अनुसंधान । साक्षात्कारी कृतार्थजन । सुकृतराशी सनातन । पदरीं जयाच्या ॥ ५४ ॥ मनोमयप्रवृत्तीचा व्यापार । विश्वजाग्रती स्वप्नसंसार । सुषुप्ति तुर्या निर्विकार । नित्य अनुसंधानीं ॥ ५५ ॥ अंतःकरणीं कल्पना अपार । तितुकियांचें ही अभ्यंतर । घेऊनि स्वभावेंचि निर्विकार । अनुसंधानीं वसे ॥ ५६ ॥ पूर्वीं कृतत्रेतद्वापारीं । ब्रह्मानुसंधानें शरीरीं । देहनिर्वाणदद्दोचरीं । आसन चळेचि ना ॥ ५७ ॥ अस्थी गेलियां प्राणनिर्वाण । क्षुधे तृषेतें न पडे व्यसन । सर्वदां स्वस्वरूपीं अनुसंधान । अखंड बैसका ॥ ५८ ॥ देहविसर्जन जालियां । वृत्तीसि येणेंचि नाहीं तया । नित्यतृप्तीनें हृदया । आली

1 हाडें.

अवाप्ति ॥ ५९ ॥ ऐसें कृतयुगाचें धारिष्ट । युगें युग होत आलें कनिष्ठ । आतां ब्रह्मीं व्हावया निष्ठ । पळहि स्थिरावेना ॥ ६० ॥ स्वभाविक हा युगधर्म । मनाचा चांचल्यअनुक्रम । या कारणें ब्रह्मप्राप्ति परम । कठिण आहे ॥ ६१ ॥ नित्योपजीविका सुखैकधन । मनाचे उपसर्गउपशमन । सहस्त्रावधि तर्क अंतःकरण । प्रवाहीं पडे ॥ ६२ ॥ इतुके संकल्प निरसोनि । निवळ व्हावें अनुसंधानीं । ते समयीं निवांत होऊनि । स्वरूपचि होआवें ॥ ६३ ॥ ऐसें कैसेनि घडे आतां । या विकल्पीं न रिघतां । प्राप्तीचे अनुसंधानीं तत्वता । राहूनि पाहा ॥ ६४ ॥ पूर्वीं मनें सृष्टि मनें संव्हार । होते सामर्थ्याचे ऋषेश्वर । तयांचेचि कुळींचा विस्तार । सृष्टींत भरला ॥ ६५ ॥ तैंच्याचिया वेदश्रुतिस्मृती । मंत्रबीजाक्षरें सामर्थ्ये किती । तैंचीच ते उपदेशरीति । परंपरेनें ॥ ६६ ॥ तैंचें सामर्थ्य आलें दिसोनि । आतां सामर्थ्य लोपलें जनीं । ऐसेंचि हो ह्मणोनि । अंतरूं नये ॥ ६७ ॥ पूर्वींचीच हे वसुंधरा । पिकत आली परंपरा । मागिल्या फळभागविस्तारा । गणील कवण ॥ ६८ ॥ आतांचे सृष्टींतील झाडें । हें चि पूर्वील पाहतां निवाडें । सुखें कल्पतरूचेनि पडिवाडें । फळत होतीं ॥ ६९ ॥ तैसींच सस्यादिक सकळ । सुरस गोडीनें रसाळ । पिकत होतीं तत्काळ । इच्छेनुसारें ॥७०॥ कल्पिले पदार्थ प्राप्त व्हावे । सिद्धी वोळगती स्वभावें । आतां सामर्थ्याचेनि नांवें । तृणही होयिना ॥ ७१ ॥ पूर्वील मनुष्यें पाहातां वोंड[1] । सामर्थ्येंहीं तैसींच उघड । तेंचि परंपरेनें दुर्वाड । दुर्बळ जालें ॥७२॥ लाहनाळल्या[2] तैशाचि आकृती । तेंविचि सूक्ष्म जाल्या सर्व स्थिती । आयुष्याची वर्तती रीती । तेणेंचि प्रकारें ॥७३॥ ऐसें पाहतां हें सविस्तर । बहुत दिसोन आलें अंतर । करावयाचा निर्धार । निश्चयेंसीं ॥ ७४ ॥ पूर्वील क्षुधा ते दुर्धर । तियेचे तृप्तीसि पाहिजे अपार । या कारणें तो विस्तार । तैसाचि होता ॥ ७५ ॥ आतांही पृथ्वी पिकतचि आहे । वनस्पती फळसंभार वाहे । अल्पक्षुधेसि तृप्ति होय ।

---

१ मोठीं, भव्य. २ लहान झाल्या.

पाहा प्रतीति ॥ ७६ ॥ अल्पचि अनुसंधानीं अविकळ । असतां ब्रह्म होयिजे तत्काळ । कां जें परिसासि लोह लागतां वेळ । न लगे सुवर्ण व्हावया ॥ ७७ ॥ तैसिये परी अनुसंधान । हृदयीं सांपडे समाधान । वस्तु हारपली ते परतोन । सांपडे जैसी ॥ ७८ ॥ तैसी हृदयींची वस्तु संपूर्ण । हारपली होती पुरातन । ते गुरुकृपेनें नित्यनूतन । प्रतीतीसि आली ॥७९॥ जे घेतां न ये ना ठेवितां न ये । संचलीच सदोदित आहे । आहे नाहीं म्हणणें न साहे । केवळ ऐसी ॥ ८० ॥ साक्षत्वज्ञानाअतीत सर्वदा । पाहातें पाहाणें न साहे कदा । ते अद्वयवस्तु ब्रह्मविदां । आतुडलीसे ॥ ८१ ॥ विज्ञानस्वरूप संत । स्वरूपाचें अनुभव मूर्त । अनंत संत मिळोनि अनंत । वस्तूचि जाले ॥ ८२ ॥ अनंतकृपेच्या प्रसादें । ब्रह्मानुसंधानसंवादें । वस्तुअनुभवस्वानंदें । कृतार्थ जाले ॥ ८३ ॥ सद्गुरुकृपा घनामृतवृष्टि । स्वानंदसुखें पिकली सृष्टि । स्वसुखाच्याचि परिपाटी । घातलें सद्गुरूनें ॥ ८४ ॥ चमत्कारें चि तारिली सृष्टि । सद्गुरूची महिमा मोटी । च्यान्हीं युगें समान पोटीं । सामाविलीं जेणें ॥ ८५ ॥ युग पळसंख्येसि कारण । काळ जाला होतां प्रमाण । काळासीच केलें प्राशन । प्रतीतीनें ॥ ८६ ॥ आम्हांसि लाहान थोर ह्मणतां न ये । आत्मज्ञानासि तेणें चि प्रत्यये । प्रतीतीसि प्रमाण काये । दुसरें असे ॥ ८७ ॥ स्वयेंचि प्रतीति प्रमाण । ब्रह्मानुभवनिर्वाण । सद्गुरुकृपा अनुसंधान । अवधान द्यावें ॥ ८८ ॥ अद्वैतअनुभवसुख । सर्वदां जयासि सन्मुख । तयासि प्रवृत्तिउल्लेख । असोनि नसे ॥ ८९ ॥ श्रवणामृत साचार । नित्यप्रतीतीच्या मुखें अपार । हृदयासि आणिजे निरंतर । निजनिष्ठेनें ॥ ९० ॥ तुह्मी श्रवण सिद्धींचे साक्षात्कार । प्रतीतीचेचि अवतार । तुमचे सृष्टीचा उद्धार । रूढला श्रवणीं ॥ ९१ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । अद्वैतामृतअवलीळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ९२ ॥ येकादशरुद्रे । चतुर्थ उल्लासः संपूर्णः ॥

॥ श्रीरामचंद्रायनमः । श्रीरामसमर्थ श्रवणीं । नित्यमुक्त ठेऊनि । विभूषित निजानुसंधानी । शोभले कैसे ॥ १ ॥ उपदेशपरंपरा । अळंकृतमुक्तविवरा । स्वरूपांबरधरा । मुक्त चि ते ॥ २ ॥ स्मरणद्योतक मुक्तता । विस्मरणाची स्वभावता । उभयतातीत समानता । देखिली सहज ॥ ३ ॥ तिये स्वरूपतेचे अंतरीं । समान सारिखेंचि पैसारी । निरालंब भूमिका बरी । निर्मळ निजांगें ॥ ४ ॥ सहज अस्तिक्यतेवरी । साक्षत्वाची जाळी उजरी । जुनाट जर्जर दोरी । विस्तीर्णपणे ॥ ५ ॥ जेथवरी पैस पवाडला । तेथवरी तंतु विस्तारला । तैसा तैसा चि आला । गुणक्षोभासी ॥ ६ ॥ गुणीं गुणक्षोभातीत । हा निजतंतु अक्षोभित । चौथे अवस्थेंत स्वतंत । शोधूनि पाहावा ॥ ७ ॥ पाहतें पाहणें सर्वस्व जाय । अखंडित अनुसंधान होय । तो चि तो मूळतंतु निश्चयें । जाणिजे ऐसा ॥ ८ ॥ मूळ सकळांचें स्वरूप । मुळीं तंतु अनुसंधानरूप । प्रतीतीचें ज्ञान तद्रूप । हे स्वरूपता ॥ ९ ॥ स्वरूपता शुध्द व्हावया । निवळावें भावत्रया । स्वभावपरवडी यया । अवधारिजे ॥ १० ॥ येक अनादिसिध्द स्वभाव । निर्मळ निश्चळ निरावेव । निर्गुण निराश्रय ठाव । अक्षय सहजें ॥ ११ ॥ या स्वभावाच्या ठायीं । जन्ममरण नसे चि कांहीं । बंधमोक्षकल्पना ही । असेचि ना तया ॥ १२ ॥ या चि स्वभावाच्या आश्रयें । स्फुरली विस्तीर्णता निराश्रय । स्वभाव तो समाश्रय । अनादिपणें दुसरा ॥ १३ ॥ या अभिनव स्वभावीं । निवळले ब्रह्मानुभवी । वेदादि महाकवि । निज उमजले ॥ १४ ॥ ज्ञान अनादिपणें शाश्वत । स्वभाव हा सदोदित । मायाब्रह्माचा सिध्दांत । येथें चि जाला ॥ १५ ॥ हा चि स्वभाव जगत्कारण । देवादिदेव पुरातन । यासी च ह्मणिजे सर्वअधिष्ठान । अद्वयस्वरूपें ॥ १६ ॥ स्वभाव ज्ञानघन आत्मा । प्रसवला शब्दव्योमा । या चि स्वभावें सीमा । टाकिली नामरूपें ॥ १७ ॥ या ज्ञानस्वभावावरी । अज्ञानस्वभाव विस्तारी । न कळोनियां सर्व-

शरीरीं । कारण होय ॥ १८ ॥ जेंवि द्रव्येंकरूनि संसार । सांग करूं ये सविस्तार । तैसा जगत्कारण अहंकार । स्वभाव तिसरा ॥ १९ ॥ कांहीं च नसोनि पदरीं । साभिमानें भरला भरी । चत्वारि खाणी वाणी निर्धारी । विस्तारला ॥ २० ॥ ज्ञानाज्ञान उभयसाक्षी । निरावेव भावें परिक्षी । तो ज्ञानस्वभाव अलक्षी । समरसोनि गेला ॥ २१ ॥ अज्ञानज्ञानतुळाधार । होऊनि समरसले साचार । त्या ज्ञानस्वभावेंचि निर्विकार । स्वभाव देखिला ॥ २२ ॥ ज्ञानस्वभावें अनुभविलें । परब्रह्म प्रतीतीसि आलें । ज्ञान स्वभावेंवीण ठेलें । ब्रह्मासी कोण पुसे ॥ २३ ॥ तिनी स्वभाव निरंतर । व्यापकतेनें पदरें पदर । स्थूळ शरीरासि परात्पर । आले असतो ॥ २४ ॥ त्यास्तव हृदयांत रिघोन । स्वभावत्रयासि वोळखोन । आस्तिक्यस्वभावीं रूढोन । समरसावें ॥२५॥ परब्रह्म तत्पद स्वभाव । त्वंपद मायास्वभाव । असीपद ज्ञानस्वभाव । जीव संबंधी ॥ २६ ॥ हे तिनी स्वभाव मिळोनि । जीव रूढला विद्यमानी । अज्ञानस्वभावें करूनि । जीवासि पतन ॥ २७ ॥ ज्ञानस्वभावें नित्यमुक्त जीव । ब्रह्मस्वभावे जीव निरावेव । हें ज्ञानस्वभावें चि सर्व । प्रांजळ जालें ॥ २८ ॥ या स्वभावत्रयासि दृष्टांत । बरा विवरिजे देऊनि चित्त । जैसी वेळूंची जाळी पर्वतांत । विस्तारली असे ॥२९॥ तैसा हा मायावंशजात । विस्तारला संसार अप्रांत । ज्ञानप्रळयाग्नीनें कल्पांत । होऊनि जाय ॥ ३० ॥ आकाश निर्विकारस्वभाव । अज्ञानस्वभाव वंशीं सर्व । त्यांत गुप्त वन्हि अभिनव । स्वभाव ज्ञानाचा ॥३१॥ वायूचे स्वभावें चळण । होय उत्पत्ति स्थिति निदान । त्या त्या प्रसंगेंकरून । उपेगासि ये ॥ ३२ ॥ वायूचे घसणीकरून । वंशीं पेटला तो हुताशन । तेणें जाळूनि टाकिलें वन । हा ज्ञानस्वभाव ॥ ३३ ॥ मायावन ज्ञानहुताशनें । जाळूनि टाकिलें प्रदीप्तानें । आपण हि सरिसाचि ज्ञानें । उपशमला ॥३४॥ नभीं च तिगुणें संभलें । परि त्या गग-

---

१ 'तत्पद परब्रह्मस्वभाव' असें असावें. २ वांवूची. ३ वांवू. ४ संभ-(व)लें (?)

नास्ति नाहीं कांहीं लागलें । तैसें निजअस्तित्व आपुलें । निर्विकार ॥३५॥ निर्विकार स्वभावें सहज । उपशमें ज्ञानाज्ञानपुंज । जगत्कारणाचा उमज । हारपला ब्रह्मीं ॥ ३६ ॥ हा सद्गुरुकृपेचा प्रसाद । मात्रत्रय-अनुवाद । केवळ स्वसुखाचा कंद । प्रतीतीसि आला ॥ ३७ ॥ प्रतीतीच्या हृदयारविंदीं । निरावरणमकरंदीं । पवाडला बोधस्वानंदीं । निर्वाण जाला ॥ ३८ ॥ स्वसुखाच्या सरोवरीं । स्वसुखें चि विहार करी । सच्चिदानंदलहरी । प्रगट होय ॥ ३९ ॥ अभिनव महीगर्कीत । बुडाला जो अप्रांत । स्वयें चि तो अनंत । होऊनि ठेला ॥ ४० ॥ ना तरी स्वरूपचिदंबरीं । झेंपावला जाय निर्धारीं । तो विहंगम चमत्कारी । निर्विकार होय ॥ ४१ ॥ जो उपशांतीच्या पाळवें । मावळला जाय जीवें । तया दीपाचि ऐसा स्वभावें । वस्तीसी आला ॥ ४२ ॥ जैशी वन्हीची भूमि निर्वाळली । धडधडीत तेजें रसरसिली । तेथें कापुराची केळी । पेरणी सुखें ॥ ४३ ॥ नित्य वायूचा पर्जन्य पडे । अंकुरूनि पीक विरुढे । सरसावोनि कांडोवांडी रोकडें । आलें विश्वफळा ॥ ४४ ॥ तैसी ज्ञानाची निर्वाणभूमि । त्यावरि पेरिली हे ब्रह्माहमस्मि । स्वसुखप्रतीतीच्या व्योमीं । न समाय तें पीक ॥ ४५ ॥ सद्गुरुराजराजेश्वरें । दिल्हें अस्तित्व आपुल्या निर्धारें । तें चि विज्ञान साक्षात्कारें । संपूर्ण होय ॥ ४६ ॥ सहजस्थितीची मुद्रा अखंड । जागतसे ज्ञानमार्तंड । उतैटलें नभ प्रचंड । प्रमाणासि न ये ॥ ४७ ॥ अवचट समाधि न फावे । विस्मयो ही न संभवे । कृपाकरूनि सद्गुरुदेवें । स्वभावें दिधलें ॥ ४८ ॥ हे सहजीं सहज भेटी । पडे सहजमिठी । अनुभवाचां कसवटी । त्रिपुटीरहित ॥ ४९ ॥ निःशेष जाणीव सरे । अकल्पित प्रतीती अवतरे । महास्वसुखाचे गर्कीत त्वरें । बुडऊनि टाकी ॥ ५० ॥ सनातनसुखसिंधुभितरीं । ज्ञानस्वभाव वास्तव्य करी । जैसा कर्पूर जळांतरीं । सुवासें राहे ॥ ५१ ॥ तैसा

१ डोहांत. २ प्रत्येक कांड्यावर, पेरावर. ३ उतास आलें, बाहेर वाहूं लागलें. ४ कसोटी.

सूक्ष्म साक्षात्कार । ज्ञप्तिस्वरूप संस्कार । स्वगतभेद दुर्धर । शोधूनि पाहावा ॥ ५२ ॥ स्वगतें स्वजातीसि आणिलें । स्वजातीनें विजातीसि दिल्हें । विजातीनें विटंबिलें । स्वगतासि त्या ॥ ५३ ॥ जेथें स्वगतभेद नाहीं । स्वजातीसि नसे कांहीं । पाहातां ते विजातीसिही । ठाव नसतां ॥ ५४ ॥ अहंब्रह्माहमस्मीचें स्फुरण । हा स्वगतभेद पुरातन । ऐसा अस्तनीचा कृशानें । सर्वांग व्यापी ॥ ५५ ॥ कांहीं अवकाश नसतां । स्वगतभेदासी तत्वता । ठाव जाला तो चि पाहातां । स्वजातिविजातीसि ॥ ५६ ॥ अवकाश नसतां चि कांहीं ब्रह्मीं जीव स्वगत पाहीं । जीवाची उपाधि सर्व हि । अवस्थामुळें ॥ ५७ ॥ स्वभावत्रयेंकडून । जीवीं च भेदत्रयाचें भान । जीव स्वगत चि जाण । भेद ब्रह्मीं ॥ ५८ ॥ जीव ब्रह्मरूपें पाहातां । भेदासि ठाव चि नाहीं तत्वता । पाहावयासी कारण स्वभावता । स्वगतभेद ॥ ५९ ॥ स्वगतभेदासी ह्मणावें ज्ञान । त्या चि ज्ञानें विवंचून । जीवासी अस्तित्वें वोळखोन । स्वजातीय केलें ॥ ६० ॥ त्यास्तव ब्रह्मांश जीव । ह्मणती हा स्वजातीचा भाव । आतां विजाती ते सर्व । मायाजनित ॥ ६१ ॥ ब्रह्म अद्वैत निरावेव । तेथें भेदत्रयासी अभाव । अरूपासि रूपचि स्वभाव । असे चि ना ॥ ६२ ॥ भेदशून्य अद्वितीय । निरंजन निजहृदय । निर्धूतबोध निःसंशय । जाहलें सहज ॥ ६३ ॥ ध्यान्ही अवस्थातीत । हृदय जालें सदोदित । निर्मळ निश्चळ निवांत । ज्ञानें अवलंबिलें ॥६४॥ शुध्द स्फटिकाचा गाभारा । सोज्वळ गगनउभारा । विशुध्द सत्वाच्या जिव्हारा- । माजि तैसें ॥ ६५ ॥ आत्मस्वभावें परिशुध्द सर्व । स्वयंभ घडावलें अपूर्व । स्वामीचे हृदयींचें पूर्व । निजहृदया आलें ॥ ६६ ॥ अवस्थातीत सहजें । उमजला तो निजउमजें । सुखानुवादें समजे । प्रतीतीसि आला ॥ ६७ ॥ तेथें श्रवण ना निजनयन । अर्थ ना अर्थावग्रहण । परमार्थ तो सनातन । प्रतीतीसि आला ॥ ६८ ॥ प्रज्ञेचें जिव्हार घेऊनि । स्वरूपाच्या

१ अग्नि.

जाणावें । रूढला पुरुष या नावें । प्रकृति पुरुष ॥ २० ॥ चैतन्य साक्षी पुरातन । याचीं च विशेषणें जाणोन । अर्थ प्रांजळे सनातन । पाहावा हृदयीं ॥ २१ ॥ आदिदेव हा निरंजन । सज्जनीं प्रतिष्ठिला सुखैकघन । डोळां घालूनि ज्ञानांजन । दृष्टीसि दाविला ॥२२॥ अखंडासनीं समसमान । देव बैसला सनातन । अनन्यप्रतीतीचें अर्चन । होतसे तया ॥ २३ ॥ अपरोक्षप्रत्ययाचा संपूर्ण । जाहला समारंभ निर्वाण । निरावरण देवध्यान । केलें ऐसें ॥ २४ ॥ विज्ञानवस्त्रें परिधान । साक्षात्कार विभूषण । सच्चित्सुखाचें स्तवन । परा गाऊनि होय ॥२५॥ निष्कंपज्ञानाचा सोज्वळ । प्रकाशला दीप निश्चळ । स्वरूपानुभवें सकळ । समर्पिला तयासी ॥ २६ ॥ सोहंभावषोडशोपचारें । अर्चिला अनंत विज्ञानकरें । प्रसन्न जाला साक्षात्कारें । हृदयस्थ माझा ॥२७॥ समाधानप्रदक्षणा पूर्ण । घातलें समाधिलोटांगण । निःशब्दब्रह्ममहामौन । मंत्रपुष्प जालें ॥ २८ ॥ पुडती नमन पुडती स्तवन । पुडती श्रीमुख विलोकन । पडती घाली लोटांगण । अष्टांगभावें ॥ २९ ॥ येथून त्रिपुटीविसर्जन । न दिसे ध्येय ध्याता ध्यान । दुर्लभ अनंताचें अर्चन । या चि जन्में ॥ ३० ॥ या चि जन्में जना सार्थक । जालों अनंताचा अर्चक । अनंतउपासना उपासक । उचार अनंतनामाचा ॥३१॥ अनंतनामें सुमनमाळा । अखंड तळपतसे माझिये गळां । अनंतरूपाचा जिव्हाळा । पाहिला अनंत दृष्टीसी ॥ ३२ ॥ अनंतमूर्तीचें हृदय । अनंत सिध्द अनुभविती स्वयें । अनंत प्रतीतीचें हृदय । अनंतस्वरूप ॥ ३३ ॥ अनंत विश्वेश्वर साक्षी । अनंत हृदयींचा परिक्षी । अनंत स्वरूपासि लक्षी । अनंतयोगें ॥ ३४ ॥ विष्णु सदाशिव विधाता । इंद्रादि अष्टमूर्ति तत्वता । तेतीसकोटीदेवधर्ता । भर्ता आदिशक्तीचा ॥ ३५ ॥ गण गंधर्व विद्याधर । यक्ष पिशाच गुह्यक किन्नर । सिध्द चारण किंपुरुष शरीर । सर्वांचें धर्ता ॥ ३६ ॥ कपिलादि महायोगीश्वर । सनकादि सिध्द दिगंबर । महातपस्वी अनुष्ठाते अपार । देहधर्ता ॥ ३७ ॥ आठ्यांशी सहस्र ऋषे-

श्वर ॥ नवकोटि कात्यायनीविस्तार । छप्पन्न कोटि भूतावळी साचार । शरीरें धरी ॥ ३८ ॥ अंडज जारज स्वेदज उद्भिज । चौऱ्यांशी लक्ष योनी सतेज । चौं भूतांचें अभ्यंतर सहज । अनंतदेहधारी ॥ ३९ ॥ अणुरेणुहून सूक्ष्म । देहधारक निरुपम । अंतरात्मा चि तो परम । ब्रह्मांडदेहधारी ॥ ४० ॥ देहघटीं सदोदित । अनंतघटीं अखंडित । लीळादेहधारी अनंत । मूळपुरुष ॥ ४१ ॥ अनंत देहामाजि वसे । अनंतसाक्षित्वें प्रकाशे । अनंतज्ञानें चि येतसे । प्रत्ययासि ॥ ४२ ॥ हा अनंता अनंत स्वयें । याचें प्रमाण केलें न जाये । याची च कृपा यासि होये । तरि हा उमजे ॥ ४३ ॥ हा आपआपणासी गोवी । हा आपआपणासि उमजवी । हा आपआपणासि दावी । सोय स्वरूपाची ॥ ४४ ॥ हा आपआपणासि अनुभवी । हा आपआपणासी गोसावीं । हा आपआपणासि महाकवी । आपणासी वर्णिता ॥ ४५ ॥ या अव्यक्त पुरुषाची चर्या । विश्वसाक्षिणी[1] अवस्था तुर्या । जीचेनि स्वरूपयोगचित्सूर्या । फावला दृष्टीसी ॥ ४६ ॥ चिदाकाश सुखें भरीव । जिचेनि चैतन्य वायुप्रभव । जीचेनि निजतेजाचें वैभव । प्रकाशलें ॥ ४७ ॥ जीचेनि निजजीवन जीववी । जीचेनि निजधारणा पदवी । ते चिच्छक्ति जाणावी । महापुरुषाची भार्या ॥ ४८ ॥ जीची अपंचीकृत काया । जीची कुमारी अविद्या माया । हे जुनाटपुरुषाची जाया । संस्कारविहीन ॥ ४९ ॥ तो तरि निःसंग ब्रह्मच्यारी । हे अनादि कर्णकुमारी । पित्यासी जन्मविती होय उदरीं । देऊनि पुरुषत्व ॥ ५० ॥ ना तो निःसंग ब्रह्मच्यारी । गरोदर जाला अभ्यंतरीं । प्रसवला स्वयंभ कुमारी । अभिनव हे ॥ ५१ ॥ ते नित्यकुमारी पासूनि । गुणान्वय गुणक्षोभिणी । त्रैलोक्यवंध्या विश्वजननी । आली कन्येचे उदरा ॥ ५२ ॥ जियेपासूनि गुणक्षोभ । त्रिगुणाचा प्रपंच सक्षोभ । देवत्रयाचे स्वयंभ । प्रपंच जाले ॥ ५३ ॥ अविद्या वांजेची संतती । जे कां नपुंसकी रातली[3] होती । गंधर्व-

---

१ विश्वसाक्षिणी ( ? ). २ पुढें ५७ वी ओवी पहा. ३ रममाण झाली.

सृष्टीची आयिति । भरोवरी होतसे ॥ ५४ ॥ मुळीं ब्रह्मच्यारी निर्वाण । उदरासी आली अविद्या निदान । सोयरीक हे संबंधेंवीण । प्रवृत्तीची ॥ ५५ ॥ मायराणी ब्रह्मबीजा । होय ब्रह्मा चि आत्मजा । निसवंच्या षंडात्मजा । प्रसवली ते ॥ ५६ ॥ नवल तियेचें विंदाण । श्रवणावाटे व्याली गगन । त्वचे पासूनि पवन । प्रसवली ॥ ५७ ॥ चक्षूपासूनि निजतेज पूर्ण । जिव्हेपासूनि निजजीवन । घ्राणापासूनि सनातन । वसुमति प्रसवे ॥ ५८ ॥ पंचेवीस तत्वांचें मूळ । वदनकमळीं प्रसवे सकळ । जियेच्या करकमळीं अखिळ । आकृतीसि आलें ॥ ५९ ॥ जियेच्या पदकमळीं । पावनमूळ महीतळीं । जे छत्तीसा तत्वांची आगळी । चैतन्यकळा ॥ ६० ॥ मुळींच अव्यक्तदशा केवळ । जियेच्या सूक्ष्मीं प्रज्ञामूळ । हृदय अष्टधा कमळ । विकासलें कैसें ॥ ६१ ॥ पुरुष निर्विकार हृदयीं । प्रकृति वर्ते सर्वां ठाईं । प्रकृतीचेनि प्रवाहीं । पुरुष पडिला दिसे ॥ ६२ ॥ जैसी जळीं चंद्रिका पाहे । तुटतुटोनि वाहती होये । आकाशींचा चंद्र काय । वाहेल तैसा ॥ ६३ ॥ ज्ञान अज्ञानसहवासें । भासे भ्रमासरूप तैसें । तरळिये दृष्टीसी दिसे । नसोनि सेना ॥ ६४ ॥ अंतःकरणाचे दोष । होय भोगिता चिदाभास । जीवसंकल्पें विशेष । आक्रमला ॥ ६५ ॥ अंगुष्ठमात्र कोशांतरीं । वसोनि जाणिवेचा पैस धरी । ज्ञानरूप अभ्यंतरीं । प्रकाशतसे ॥ ६६ ॥ जीच्या भासें सकळ हे भासती । ते हे प्रकाशाची ज्योति । त्या ज्योतीच्या अंतर्भावें पुडती । होतो भाव अपार ॥६७॥ अगम्य आणि अगोचर । नसे चि रूप ना रेखा शरीर निःशब्दसुखें साचार । प्रलयासि येती ॥६८॥ ऐसिया स्वभावीं निवळला । तो सकळस्व-भावाजिव्हाळा । तो ज्ञानस्वरूपनिजडोळा । देखिला हृदयीं ॥ ६९ ॥ हृदयकमळाचा विस्तार । पंचतत्वें त्रिगुण साचार । जीवपद्‌पद निरंतर । वसे अभ्यंतरीं ॥ ७० ॥ कमळकोशकर्णिका । स्वसुखमकरंदबै-

---

१ अमरूप सृष्टीची. २ मौज, कौतुक. ३ कानांतून.

सका। पंचतन्मात्रावास निका। घेतसे तो भ्रमर॥ ७१॥ कमळांची अष्टविध दळें। पृथ्वीपासूनि सत्त्वळीळे। पळमात्रांत येकवेळे। विहार करी॥ ७२॥ अथवा स्थिरावला चि राहे। ना तरि विलासक्रमान्वयें। दळें दळ रिघता होय। दळसंस्कार॥ ७३॥ आदिमध्यांतदळीं। गुणत्रयानुगुणमेळी। दळीं विचरतां तो अळी। तैसा चि वेधे॥ ७४॥ वसुमतीच्या पत्रावरी। विहरे चिद्भृंग विहारी। सत्वाच्या चि संस्कारीं। विश्वजागृतीसि ये॥ ७५॥ पूर्ण रजाच्या संस्कारीं। वेधला जाय शरीरीं। नाना विषयव्यापारीं। परिभ्रमे॥ ७६॥ जैसें स्वप्नांतरीचें कार्य। कांहीं नसतां होय आश्चर्य। तैसे परी संसारीं जाय। भुलोनियां॥ ७७॥ पृथ्वीदळावरि विचरतां। सुषुप्ति प्रवृत्ति तत्वता। भ्रांतदुश्चित्तव्यामोहता। अधिकावतसे॥ ७८॥ त्रिगुणप्रत्यक्षपणें क्षोभवी। तेव्हां हे त्रिविधभाव दावी। मिश्रत्रिगुंटी[1] प्रगटवी। आश्चर्य तें॥ ७९॥ तमसत्वें सुषुप्ति। रजसत्वें स्वप्नस्थिति। रजतमें भ्रांति। प्रगट होय॥ ८०॥ ऐसे चि त्रिविधागुण। क्षणक्षणा पालटोन। क्षोभविती अंतःकरण। अनेकवृत्तीनें॥ ८१॥ जीवनदळासी येतां मधुकर। मिळणीसि मिळे प्रसंगानुसार। विषयाविषयीं तत्पर। जैशासी तैसा॥ ८२॥ हा रजोगुणाचा अतिशय। तमोगुणें बीजरूप होय। जीवापासूनि विषय। प्रवृत्तीसि आणी॥ ८३॥ सत्वें तें परिपाळण होये। प्रवृत्तीसी कारण जीवन स्वयें। एवं त्रिगुणान्वयें। गोवी जीवभृंगा॥ ८४॥ तैसें चि उगवीतसे ळीळा। लामतां मुळीं सत्वजिव्हाळा। मिश्रगुणाची अंतरकळा। जीवनीं अपार॥ ८५॥ मिळणीनें विपरीत सुपरीत। न मिळतां सुपरीत विपरीत। ऐसियापरीं विहरत। भृंग जीवनदळीं॥ ८६॥ तेजपत्रावरि जीवभृंग। येतां अतर्क्य अंतरंग। ज्ञानवैस धरूनि सांग। प्रवेशे विस्तारी॥ ८७॥ विरक्तीचा योग उजरी। सो तमाचा उद्वेग अंतरीं। भक्तीचा अंतरंग धरी। शुद्ध रजोगुणें॥ ८८॥ सत्वाच्या अंतरंगें पूर्ण। स्वरूपध्यानें

1 त्रिगुणी (?).

होय सुदीन । तेजों मिश्रगुण संपूर्ण । ग्रंथकोटि होती ॥ ८९ ॥ पवमान दळावरि भ्रमर । तें स्वरूप धारणेचा चि घर । ना तरि तो संसार । अति भ्रमित उठे ॥ ९० ॥ नित्यनेमें अनुष्ठान विधि । ना तरी उगाचि वाढवी उपाधि । तमसत्वें निरुपाधि । करी तीर्थाटणें ॥ ९१ ॥ रजसत्वें मानसपूजा । रजतमें अज्ञानाचा राजा । विशुत्ध-सत्वें सहजा । निजदशेसी भोगी ॥ ९२ ॥ महद्भूतआकाशदळीं । लक्षें पैसावे अंतराळीं । ना तरि स्वानंदकल्लोळजळीं । चुबुकळतो ॥ ९३ ॥ रजें मंथांतरधारणा । तमें रूढे समाधिस्थाना । विशुत्धसत्वें आपणा-। माजि मज्जे आपण ॥ ९४ ॥ सकळाधार अहंकार । तें केवळ तमाचें दळसार । करितां जीवभृंगें विहार । सिद्धी घोळगती ॥ ९५ ॥ उत्पत्ति स्थिति संहार । प्रांजळ होय अभ्यंतर । साक्षीचा साक्षी निरंतर । ईश्वर चि तो ॥ ९६ ॥ महदहंकारदळीं । तमें पंच-मूत समूळीं । रजोगुणानुमेळीं । पंधरा तत्वें ॥ ९७ ॥ सत्वगुणें कर-णपंचक । हा शुत्धगुणाचा भाव येक । मिश्रगुणाचा अनेक । धिंवसा वसे ॥ ९८ ॥ रजोगुणीं ब्रह्मस्फुरण । तें राजसीक पत्र विस्तीर्ण । तेथें भृंग पवाडतां जाण । कारण होय ब्रह्मांडा ॥ ९९ ॥ सत्वगुणें राजसदळीं । स्वानंदसुखें हृत्कमळीं । कर्णिकेसी येऊनि ते वेळीं । मकरंद सेवितो ॥ १०० ॥ सत्वाच्या दळावरी जातां । परतोनि न येतो मागुता । जैंवि लवणाचा मर्छे पवाडतां । सिंधुमाझारीं ॥ १ ॥ ना तरि कापुराचा विहंगम । वेधला अग्निरूप व्योम । भूतजातप्लवंगम । पडिला काळमुखीं ॥ २ ॥ नीवारशूकवत्तन्वी । तिये सीखेमाजि अनु-भवी । तो महादेवकवी । वेदें वर्णिला ॥ ३ ॥ तो अक्षरब्रह्म स्वयें । तो शिवरूप सर्वात्मा होय । तो चि ब्रह्मस्वरूप निश्चयें । अवधारिजे पुढें ॥ ४ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिंव्हाळा प्रांजळ जीव भृंगलीळा । ह्मणे मेरुअनंत ॥ ५ ॥ यकादशरुद्रे ॥ षष्टउल्लासः संपूर्णः ॥

१ भीति. २ मासा. ३ शिरला असतां. ४ देवभाताच्या टोंकाप्रमाणें बारीक (चंद्रकोर) (?). ५ मस्तकावर, जटेंत,

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ प्रज्ञाधर । उपरमार्थेचि परमेश्वर । मावेद्वयींच साचार । प्रतिष्ठिलां ॥ १ ॥ गोचर भाव अगोचर । विशुद्धसत्वाचें अभ्यंतर । अपरोक्षानुभव साचार । प्रतीतीसि ये ॥२॥ समानतत्वीं महत्तत्व । प्रांजळ होय सर्वसाक्षित्व । द्रष्ट्रपणेंवीण निजतत्व । अनुभवीतसे ॥ ३ ॥ निजतत्वीं परतत्वप्रतिष्ठा । होय ज्ञानसृष्टीचा स्रष्टा । विज्ञानभानूचा द्रष्टा । द्रष्ट्रत्वविहीन ॥ ४ ॥ निजमुळींचा सद्भाव । जाणोनि ध्यान्ही हीं अभाव । वृत्तिरूपें अहंभाव । उरोचि नेदी ॥ ५ ॥ प्रशस्त होय ब्रह्मरूप । न धरीच सत्याचाही संकल्प । तो निरालंब आपैआप । निर्विकारी ॥ ६ ॥ ब्रह्मारण्यप्रकाशक । महद्ब्रह्मनिवर्त्तक । अक्षरब्रह्मप्रबोधक । मूळ विश्वेश्वर ॥ ७ ॥ त्याचे विज्ञानाची पाहाट फुटे । पांथीक लागती निजवाटे । स्वरूपप्राप्ति अवचटें । होय साक्षात्कार ॥ ८ ॥ प्रणवाचा गिरी वेघोनि । विसांवले उन्मनसदनीं । मग तेचि परमात्मयाचेनि । पावती ब्रह्मीं ॥ ९ ॥ ब्रह्म सदोदित आपण । अनुभवासि नाहीं कारण । हें साक्षित्ववरि ज्ञान । स्वभाविक ॥ १० ॥ प्रारब्ध साक्षित्वाच्या सेवटीं । ज्ञानस्वरूपसमसाटी । प्रारब्धी असतांचि परिपाटि । न पडती कदां ॥ ११ ॥ निर्लोभ अनुतापें वरिष्ठ । भक्तराज सद्भावें उत्कट । स्वयंभज्ञानाचें मूळपाठ । सहजस्थितीनें ॥ १२ ॥ दयेचे संपूर्ण उदधि । अद्वैतचर्या नित्यसमाधि । स्वयंभसुखाचे त्रिशुद्धी । भद्राचळ ते ॥१३॥ विश्रांतिउद्यानीचे वसंत । शांतिवसुधेचे नृपसंत । कैवल्याचे सुशोभित । कळस शृंगारले ॥ १४ ॥ बोधक्षीरार्णवींचे मीन । चिद्गगनींचे सुभौन । साक्षात्कारदशेचें सुखवर्धन । सौजन्यचक्रवर्ती ॥ १५ ॥ स्वसुखगगनसुधाकर । योगेश्वरांचे ईश्वर । अद्वैतशास्त्रप्रभाकर । विश्व उद्धरिते ॥ १६ ॥ अखंडनिवृत्तीच्या शिखरीं । अनुभवीत मुद्रा अगोचरी । गुरु आराध्यलिंग अंतरीं । प्रसन्न केले ॥ १७ ॥ त्या प्रसन्नतेचेनि साक्षात्कारें । गिराक्षरार्थगजरें । विज्ञानामृतजिव्हारें । निवविली

१ वैराग्यामुळें. २ दृश्य व अदृश्य अशा सर्व वस्तंत. ३ सूर्य.

सकळ सृष्टी ॥ १८ ॥ निजहृदयीं उल्लेख निवळला । तो स्वरूपाकारें क्रमला । अतिक्रमला ह्मणोन तयाला । अतिउल्लेख ह्मणावा ॥ १९ ॥ उल्लेखीं अतिउल्लेख पूर्ण । निर्वाणसंज्ञा अभिधान । निर्वाणसंज्ञेनें उपरमोन । परब्रह्म व्हावें ॥ २० ॥ ह्मणोनि यासि बोलिजे परम । हेंही सामावलें जाय अंतर्याम । परात्पर ऐसें सुवर्म । त्यातें ह्मणिजे ॥ २१ ॥ आतां विसंज्ञा ते बोलिजेत । ते अनुभवपंचकें निवांत । मरणचि जाण निभ्रांत । संकेत विसंज्ञा ॥ २२ ॥ निजउल्लेखीं संज्ञालक्षण । निर्वाणकर्पूरहुताशन । ज्ञानप्रळय संपूर्ण । सेवटीचा ॥ २३ ॥ उल्लेखीं प्रकृतिपुरुषज्ञान । ज्ञानहुताशननिर्वाण । प्रवृत्तिनिवृत्तिनिदान । मूळमायेसी ॥ २४ ॥ मायेनें माया निवर्तली । साक्षीनें साक्षि सरली । अज्ञानें अज्ञानाची जाली । शांति समूळ ॥ २५ ॥ ज्ञानें ज्ञान सामावलें । विज्ञानें विज्ञान सरलें । साक्षात्कारासि घोंटिलें । साक्षात्कारें ॥ २६ ॥ तरुवरें बीजासि भक्षिलें । निर्वाणफळीं बीज उदेलें । बीजें बीजासि भर्जिलें । उगवेल काय ॥ २७ ॥ अविवेकें होतां निरसन । मूळमायेसि जालें निदान । ऐसें उल्लेखामाजि संपूर्ण । प्रबळलें निज तेज ॥ २८ ॥ अतिक्रमला ज्ञानपुंज । उल्लेखीं अतिउल्लेख सहज । जीवशिवाचा निजउमज । सामावला ॥ २९ ॥ अतिउल्लेखाची अंतरस्थिति । उन्मनीपर विश्रांति । अतिउल्लेखचि आदिअंतीं । आस्तिक्य होय ॥ ३० ॥ पूर्व ना तो अपरपर । आठव ना तो होय विसर । केवळ अपरोक्ष साक्षात्कार । अतिउल्लेख तो ॥ ३१ ॥ सद्गुरुअनंतमौनीनें । अतिउल्लेखसंकेतज्ञानें । बोधिलें अभ्यंतर तेणें । निर्विकार जालों ॥ ३२ ॥ निमाला दीप परतोनि न ये । अंतःकरण हारपोनि जाये । प्रत्यक्षचि गुरुरायें । देहीं वर्तविलें ॥ ३३ ॥ प्राण घेतियावरि संपूर्ण । देहीं संज्ञा राखेल कोण । वासनातनूचें जीवन । घेऊनि गेला ॥ ३४ ॥ मुळेंवीण शाखापदर । कैसा होयील पां विस्तार । मुळींचा मुळीं निर्विकार । अतिउल्लेख तो ॥ ३५ ॥ कीं सुमनेंवीण परिमळ । कैसा सेविजे तो अकळ । तैसा अतिउल्लेख तो केवळ । समरसोनि गेला ॥ ३६ ॥ फळेंवीण तो सुरस । कैसा

सेविजे निर्विशेष । अतिउल्लेख अखंडैकरस । सामावला ब्रह्मीं ॥ ३७ ॥ नाहीं प्रमाणाची सीमा । गुरुकृपा मोक्षगरिमा । अतिउल्लेखमहिमा । तत्वता परब्रह्म ॥ ३८ ॥ अतिउल्लेख भावें ब्रह्म । अतिउल्लेख निर्वाण व्योम । अतिउल्लेख परंधाम । निर्वाण सहजें ॥ ३९ ॥ अनंतासि करूनि अभिवंदन । परमपरात्परज्ञानें पूर्ण । संज्ञेमाजि निर्वाण । विसंज्ञा बाणली ॥ ४० ॥ वाचा गिळोनि बोलविलें । प्रज्ञेवीण अनुसंधाना आलें । अवस्थेवांचूनि जालें । समाधान ॥ ४१ ॥ ते मी तत्वता परब्रह्म । प्रसन्न जाला गुरुसार्वभौम । सर्वातीत अंतर्याम । ब्रह्में प्रतिष्ठिलें ॥ ४२ ॥ दृष्टीसि घालूनि बाहेरी । दाविलें अरूप अभ्यंतरीं । चिद्रत्नाची परिक्षा बरी । करविली जात्यंधासि ॥ ४३ ॥ पिसें बहिरें आणि मुकें । वर्तविलें येकें कौतुकें । कवणासि कवणाचें ठाउकें । नव्हेच कदां ॥ ४४ ॥ यंत्र चळत ज्या कळेनें । चित्कळाचि चमत्कारानें । हारपोनि गेली विस्मयानें । ऐसें जालें ॥ ४५ ॥ यंत्रसूत्र यंत्रीं मिळोनि । नवल वर्तविलें वर्त्तमानी । न बोलतां न हालतां निदानी । नेलें कैसें ॥ ४६ ॥ अगोचर प्रज्ञेचा धर । सहजस्थितीचा निर्धार । तो हा निर्वाण साक्षात्कार । निजांगें होय ॥ ४७ ॥ भरूनि पूर्वापर सोय । तत्वें तत्वासि निरविता होय । निजसत्वासि म्हणे सदय । बरें जालें होतासि ॥ ४८ ॥ निजसत्वा होतासि म्हणउनि । बोळविलें निरंजनी । समागमें देऊनि । समर्पिलें वस्तूसि ॥ ४९ ॥ निजरजाचें अभ्यंतर । सद्गुरुभजनें निरंतर । बोळविलें परात्पर । सुखेंचि मजला ॥ ५० ॥ तमोगुणाचें निजजिव्हार । बोळलें प्रसन्नतेनें साचार । नित्यविरक्तीनें निर्विकार । बोळवीत आलें ॥ ५१ ॥ त्रिगुणाची अधिष्ठान दैवतें । बोळवीं मज प्रसन्नचित्तें । स्वरूपसमावेश उचितें । पावचीत आली ॥ ५२ ॥ ओंटमातृका अभ्यंतर । प्रसन्न जाला मज ओंकार । प्रबोधगजरें निर्धार । बोळवीत आला ॥ ५३ ॥ तत्पद त्वंपद असिपद । सच्चिदानंदपदें संवाद । बोळवीत आला सुखैककंद । सद्गुरुराणा ॥ ५४ ॥ जे जे तत्वें अंतर्यामी । प्रकाशकी

उपमेसंगमीं[1]। ते ते निर्वाण परंधामी। घाळ्वीत आली ॥ ५५ ॥ पंचतत्वाचें तत्वसार। हिरण्यगर्भ ईश्वरशरीर। षड्गुणेशर परात्पर। घाळवीत आला ॥ ५६ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण। चौथें देह महाकारण। मूळमाया जगत्कारण। प्रसन्न जाली ॥ ५७ ॥ विराट हिरण्यगर्भ अव्याकृति। आठवा देह मूळप्रकृति। पुरुष आणि ते मायाकृति। अभिवंदिली भावें ॥ ५८ ॥ देहींच स्थान मान अवस्था। गुणभोगशक्ति वस्तुता। अभिवंदुनियां आतां। आज्ञा घेतली ॥ ५९ ॥ सकळ इंद्रियसमुदाव। संकल्पविकल्प भावाभाव। परमार्थसहकारी सद्भाव। तुम्हासि अभिवंदन ॥ ६० ॥ अनादि मायापट्टणीं। बहुत काळवेळें करूनि। राहिलों होतों मिळणी। योगें तुमच्या ॥ ६१ ॥ बहुत जन्मजन्मांतरें। देह धरूनि विश्वाकारें। वर्तवीत मज चमत्कारें। आणिलें येथें ॥ ६२ ॥ हा नरदेह तुम्ही धरूनि। सार्थकासि आणिला जनीं। विरक्तीनें अनुताप अंगिकारूनि। सद्भावासि आणविला ॥६३॥ सद्भावें गुरूसि शरण रिघोनि। तत्वें तत्व करोनि भांजणी। देहसंस्कार त्यागूनि। निरहंकृतीसि आणिलें ॥ ६४ ॥ तत्वें तत्व सकळ। मुळासि येऊनि निवळ। मूळचि केलें निर्मूळ। समूळ निरासें ॥६५॥ आतां तुम्हांसि अभिवंदन। मजवरी कृपा केली जे संपूर्ण। ते चिदयेनें कळवळून। मला ब्रह्मार्पण करा ॥ ६६ ॥ अहंस्फूर्तीचें विसर्जन। संकल्पाचें प्राणोत्क्रमण। काष्ठापरी अचेतन। अभिवंदन तियेसी ॥ ६७ ॥ प्रज्ञेवीण स्वसुखी होत। मरण अनुभवी जीत। निदानासि अनुभवित। निवर्त्तवर्णे ॥ ६८ ॥ हे परमसंज्ञा सदोदित। परात्परविसंज्ञेसि निवांत। सेऊनि विज्ञानामृत। सुखावली जे ॥ ६९ ॥ अपरोक्षसुखसंजीवनी। कृपा असों द्यावी येथूनि। तुझ्याचि स्वहस्तेंकरूनि। बोळवीं मज ॥ ७० ॥ ग्रंथकोटीचीं अभ्यंतरें। सुझावीत आलों मज निर्धारें। तयांसि माझें साक्षात्कारें। अभिवंदन ॥ ७१ ॥

[1] वेगम (?).

पावन हरिहरांच्या कीर्ति । पवित्र कीर्ति अवतारपंक्ति । पावन परंपरा विख्याति । श्रवणें मज सांभाळिलें ॥ ७२ ॥ पावन सित्वाचे महिमे । आठे निरुपमाचे उपमे । शशिसूर्य गगनक्षेमें । अभिवंदन ॥ ७३ ॥ सागर सरिता सरोवरें । वनें गिरिवर विस्तारें । छपन्नकोटि निर्धारें । भूमीसी अभिवंदन ॥ ७४ ॥ माझ्या मीपणाचें जिव्हार । अपरोक्ष-ज्ञान साचार । तयासी माझा नमस्कार । मीपणासी न येतां ॥ ७५ ॥ अनादि जें कां अज्ञान । विश्वबीजाची सांटवण । समूळ अभावासी येऊन । मुक्त केलें मजला ॥ ७६ ॥ अभावें अभाव सरला । भावें भाव वोसरला । स्वभावाचा निवर्तला । स्वभाव मुळीं ॥ ७७ ॥ मी मजपासूनि आतां । कृतार्थ जाहलों तत्वता । त्या मज माझें चि आतां । अभिवंदन ॥ ७८ ॥ मी मज नाडळेचि आतां । कोण सांगेल माझी कथा । महा अद्वैतमुद्रा तत्वता । अनिर्वाच्य जालें ॥ ७९ ॥ या उपरी देशिक परिपूर्ण । सत्यस्वरूप सनातन । शिष्य जाला ब्रह्मार्पण । सद्गुरुपदीं ॥ ८० ॥ अनंतसद्गुरु परब्रह्म । अनिर्वाच्य जाला अनुक्रम । निःशब्दब्रह्मीं निरुपम । विराली परा ॥ ८१ ॥ हें परतत्त्व परिशुध्द । येथें अबोध ना प्रबोध । हें चि तत्वता स्वतःसिध्द । स्वरूप साधूचें ॥ ८२ ॥ स्वरूपानुभव स्वयंभ । नसे चि ज्ञानत्रिपुटीचा क्षोभ । स्वानंदजीवनें अक्षोभ । दशोसि आणिती ॥ ८३ ॥ परतत्वें स्वरूपनिर्वाण । उपदेशिती स्वरूपज्ञान । ते चि प्रतीतीचें निरूपण । अवधारिजे पुढें ॥ ८४ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । सकळ तत्वांसि प्रार्थिलें डोळा । म्हणे मेरुअनंत ॥ ८५ ॥ येकादशरुद्रे ॥ सप्तमउल्हासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीरामसमर्थ पूर्वापर । नित्यमुक्तीचें माहेरघर । अखंड विरक्तांचें जिव्हार । निजभक्तांचें ॥ १ ॥ निरस्तदशा अविकळ । राहिलें आस्तिक्यें केवळ । गगन उजळलें प्रांजळ । आ-

स्तिक्यें जेणें ॥ २ ॥ जेथें जालेंचि नाहीं कांहीं । चळे ना कल्पांत जालियांही । तें चि सत्वनिरासें हृदयीं । निज निवळें ॥ ३ ॥ निव-र्तवितां निरसलें । तितकें दृश्य वोसरलें । निरसितां निरसेना उरलें । आस्तिक्य तें चि तें ॥४॥ चहूं भूतांचा निरास । साक्षित्वाचा सरिसाचि नाश । सहज उर्वरित त्यास । मावील कवण ॥५॥ सदोदित उदासीन । शुध्द बुध्द निरंजन । हे विज्ञानाची वोळखण । हारपली सहजें ॥ ६ ॥ सुलीन ज्ञानाचे स्वभाव । अभिन्नपणें स्वानुभव । त्यास्तव स्वरूपसद्भाव । ठसावे ज्ञानीं ॥ ७ ॥ निर्भय निर्विकार निर्गुण । हें चि गुरुकृपेचें अ-भय पूर्ण । अपरोक्षज्ञानाचें अनुसंधान । असताचि असे ॥ ८ ॥ सरितेचें जीवन सरलें । परि तियेचे हृदयीं भरिलें । उपायेंचि काढितां आलें । कित्तेक उपेगा ॥ ९ ॥ तैसें निरस्तदशेचें ज्ञान । ज्ञानियाचें अनुसंधान । सहजस्थितीनें संपूर्ण । उपेगासि ये ॥ १० ॥ जो स्वयें अमृतपानें धाला क्षुधा काय बाधील तयाला । परि तेणें सेविलें त्या पीयूषाला । आर्जिजे अपेक्षित ॥ ११ ॥ स्वभावपरिपक्वता सकळीं । विस्तारलीसे भूमंडळीं । तैसी अद्वैतदशा सफळी । वरुषतसे ॥ १२ ॥ अमृतोपमें फळें रसाळें । माधुर्याचे सांटे परिमळें । स्वभाव गोडीनें आगळें । वैभव त्याचें ॥ १३ ॥ पदार्थ पदार्थासि न सेवी । तैसा अपरोक्ष तो अनुभवी । परि तयासि रसना प्रीतीनें जीवीं । ध्यावें अपेक्षित ॥ १४ ॥ संपूर्ण सृष्टींतील पदार्थ । पदार्थद्रष्टेंवांण होती व्यर्थ । प्रबोधासि न येतां परमार्थ । होय तैसाचि ॥ १५ ॥ राजगृहीं द्रव्य भरलें । दुर्भिक्षें प्रजेसि गाळिलें । उपेगा न येतां जालें । ज्ञा-नासि तैसें ॥१६॥ अमृतजळें मेघ भरले । वर्षतां तैसेचि गेले । प्रबो-धासि न येतां जाले । तैसे महापुरुष ॥ १७ ॥ महा आरण्यांतील स्थळीं[1] । अमृतसंजीवनीचीं फळें । परिपक्वतेसि येऊनि रसाळें । वि-गळित जालीं ॥ १८ ॥ तैसीच महारण्यमाळती । सुमनें सुवा-सिकें होती । उपेगा न येताचि जाती । आहेळोनियां ॥ १९ ॥

[1] वाढून.

महापर्वतशिखरीं । कर्पूरकदळी लक्षवेन्हीं । प्रबळूनि भूमीमाझारीं । मुद्गीन होती ॥ २० ॥ तैसेंचि अपूर्व नानापरीं । पदार्थ असती द्वीपांतरीं । निर्मनुष्य तेथें भरोवरी । कवणें कीजे ॥ २१ ॥ तैसेचि परेचे अंतर्भाव । उल्लेखीं निवळोनि स्वभाव । विसरोनि गेले म्हणती वाव । विस्मृती कैंची ॥ २२ ॥ सोपानचढणीचें शिखर । अतिऊर्ध्व विज्ञानजिव्हार । तेथें संभवती हे प्रकार । न भाविताचि ॥ २३ ॥ कल्पवृक्ष सुखें रूढला । निजजीवनें स्थिरावला । मग आठव न लगे तयाला । फळासि येतां ॥२४॥ तेंवि त्या परेच्या अभ्यंतरीं । पदार्थाची भरोवरी । होत जातसे पसरी । उभयसेवा ॥ २५ ॥ जेंवि खगें धारेवेरी वर्षलें । जीवन आपणचि विभागलें । तेंवि पराअभ्यंतर चालिलें । प्रवृत्तिनिवृत्तीसि ॥ २६ ॥ ना तें पर्वत उगमींचें जळ । चालिलें दोहीं सवां निर्मळ । ना तें अधोर्ध्व अंतराळ । पृथ्वीकरितां ॥ २७ ॥ अर्धमात्राकाअभ्यंतर । तुर्या उन्मनीरूप निर्धार । स्वरूपांबरींच साचार । साक्षित्वीं रूढले ॥ २८ ॥ निराश्रय निर्विकारस्थिति । राहिली उन्मनीपर विश्रांति । त्यान्हीं सबरळेसि वर्तविती । तुर्या साक्षित्वें ॥ २९ ॥ या कारणें निजजिव्हार । ज्ञानें अनुभवलें अगोचर । प्रवृत्तिनिवृत्ति दोहीं पर । स्वरूपअनुभवें ॥ ३० ॥ केवळ सहजस्थिति विज्ञान । अखंडीत समाधान । तें संपूर्णपणें निर्वाण । परेसि आतुडे ॥ ३१ ॥ जैसें अप्रांत परब्रह्म । आतुडे प्रतीतीमाजि वर्म । तैसें परेचें अंतर्याम । सांपडे प्रतीतांसी ॥ ३२ ॥ परेसि जितुकें अनुभविलें । तितुकें अनुसंधानें धारलें । स्वयंभसुखें दृढावलें । अभ्यंतर ॥ ३३ ॥ तें अवचट मुखें फरूनि । जैसें निदिस्छ चावळे जनीं । मूळयंत्रविशेषेंकडूनि । वैखरीस आलें ॥ ३४ ॥ निजप्राणें तनूसि धरिलें । तैसें अवधानें रूढविलें । तत्वमाळेसि चाळविलें । अनुसंधानसूत्रें ॥ ३५ ॥ अर्थरूप निजअक्षरें । अनुसंधान साक्षात्कारें । ब्रह्मप्रतीतीच्या अभ्यंतरें । प्रसवतसे जिव्हार ॥ ३६ ॥ हा स्वभावसिद्ध साक्षात्कार । तैसाचि स्वभाव-

१ बागूना (?). २ भरेवर, पृथ्वीवर.

सिध निर्धार । स्वभावसिध साचार । प्रबोध होतसे ॥ ३७ ॥ बोधीं चतुर्थ देहमुळीं । पुरुषाची राणीव आगळी । परि ते अखंडित फळली । पाहिजे प्रतीतीसि ॥ ३८ ॥ चहूं देहाचें विसर्जन । मूळ साक्षित्वाचें अवसान । शरीरींच अनुभवी जी प्रमाण । तोचि वक्ता ॥ ३९ ॥ जितुकें उच्चारासि आलें । ग्रंथकोटि विस्तारलें । बोधाचें रूप संभवलें । वेदाचि सारिखें ॥ ४० ॥ अनिर्वाच्या वेदहृदय । तें चि परब्रह्म निश्चयें जिहीं अनभेऊनि स्वयें । आणिलें उपेगा ॥ ४१ ॥ नसतां साक्षित्व ज्ञानमूळीं । अपरोक्षज्ञान निश्चळीं । अक्षरें अक्षर लिहिल्या वोळी । वाचितां निवळे ॥ ४२ ॥ ते अक्षरें तरि निर्विकार । अर्थरूप निरंतर । वक्ता सुखें परात्पर । निवांत जाला ॥ ४३ ॥ तयापासूनि हा उच्चार । मुळींचा प्रणवविस्तार । वेद शास्त्रग्रंथ अपार । तेथूनि निघाले ॥ ४४ ॥ नदी सागरसंगमीं पाहिली । ते चि समुद्राअभ्यंतरीं रिघाली । तयाचे अभ्यतरींची काढिली । नव जाय यत्नें ॥ ४५ ॥ तैसें हें उफराटें जिन्हीं । आपणांत आपण रिघालें साचार । म्हणूनि प्रणवघाट अपार । पाहुंपेलें नव्हों ॥ ४६ ॥ तें कें वे या वैखरीसि आलें । तरि स्वानंदाचें भरण भरलें । तरीमाजि वाहिलें । समुद्रीचें जळ ॥ ४७ ॥ हा अभिनवाचा महिमा । टाकूनि निरावरणसीमा । पावले जे परंधामा ।

उगमासि जातांचि सर्वेही । आटोनि गेले ॥ ५४ ॥ जो कां प्रवृत्तीचा निजउगम । प्रत्यक्ष अनुभऊनि विश्राम । तो चि निवृत्ताचा होय संगम । सांक्षित्व सरलें ॥ ५५ ॥ तया निवासस्थळासि साचार । प्रतीतीच्या योगें अपार । नामें ठेऊनि साक्षात्कार । भोगिला ज्ञानें ॥ ५६ ॥ गुणासि न ये चि म्हणऊन । नामें प्रतिष्ठले निर्गुण । वृत्तीसि न येतां अनुसंधान । निवृत्तिरूप या अर्थे ॥ ५७ ॥ नये चि कांहीं केलियां विकारा । त्यास्तव निर्विकार ह्मणोनि परा । पारुषली याचि अर्थे निर्धारा । परात्पर ह्मणिजे ॥ ५८ ॥ रूपासि न ये ह्मणऊनि अरूप । विकल्पासि पुरे निर्विकल्प । ते परकीय नव्हे स्वरूप । ह्मणिजे या अर्थे ॥ ५९ ॥ तुमसें आपपर स्वभावें । या अर्थे अपरोक्ष जाणावें । प्रतीतीसि न ये म्हणोनि म्हणावें । अद्वय सहजें ॥ ६० ॥ एसें स्वरूपज्ञान निखळ । आपआपणांत केवळ । जैसें गंगेमाजि गंगाजळ । प्रवाहीं पडिलें ॥ ६१ ॥ नातरी तेजीं तेज प्रकाशलें । ज्योतीबाहेर नाहीं पडिलें । तैसें विज्ञान आपुलें । आपणामाझारीं ॥ ६२ ॥ अतिवेगाची चपळता । जाणीवपवनाची सत्ता । गगनीं पुरवोनि समता । परती होय ॥ ६३ ॥ तें विज्ञान अतिक्रमलें । स्वयंमज्ञानाचें बिंब सगळें । गाळूनि चिदाकाशमंचैलें । उरलें केवळ ॥ ६४ ॥ ज्ञानीं सामावलें ज्ञान । कवणें म्हणावें तें विज्ञान । ज्ञानाची पायेरी अतिक्रमून । गेलें सहज ॥ ६५ ॥ कांहींयेक स्वरूपानुभवें । अनुभवलें तें ज्ञानाचि जीवें । अनुभविता हें ज्ञान स्वभावें । रूढला होता ॥ ६६ ॥ ज्ञानामाजि सखोल सांटवण । स्वानंदप्रतीति विज्ञान । ज्ञानामध्यें सनातन । ज्ञेयाचि संचलें ॥ ६७ ॥ दृष्टीमाजि अवकाश भरलें । परि घेतां नये दृष्टीच्या अंचलें । निहारें दृष्टीचेनि चाटोळें । करूनि टाकी ॥ ६८ ॥ ज्ञानखेचरीस निर्वाण । करूनि टाकिलें तें चिद्गगन । ज्ञानेंसहित सनातन । प्रतीतीसि आलें ॥ ६९ ॥ चिदाकाश म्हणावें त्यासी । ज्ञान वोसरतां अवकाशीं । प्रतीतीनें निरावकाशीं । अवकाश पुरे ॥ ७० ॥ चिदाकाश म्हणावें क-

१ पदरानें.

वर्णे । प्रतीत सरली अभिन्नपणें । ज्ञानविज्ञानआस्तिक्य तेणें । स्फुरेचि ना कांहीं ॥ ७१ ॥ ऐशी हे स्वरूपता । सद्गुरूची कृपा तत्वता । इयेसि म्हणावें सायुज्यता । चौथी मुक्ति ॥ ७२ ॥ प्रतीतीच्या अभ्यंतरें । बोळली आपणावरि येकसरें । त्रिपुटीरहित साक्षात्कारें । वाचेसि आली ॥ ७३ ॥ आदिपुरुषाचें अभ्यंतर । घेऊनि आदिशक्तीच निरंतर । आदि अनादि दोहीपर । बोधीं प्रतिष्ठिली ॥ ७४ ॥ जैसी परिसाचे आंगीं सत्ता । लोह आंगीं सकांचनता । वाचा गुरुकृपेनें तत्वता । स्वरूप प्रसवे ॥ ७५ ॥ स्थोवगी[१] दैवत प्रतिष्ठिलें । ध्यानासि आणितां प्रत्यक्ष जालें । जयाच्या नांवें रूढविलें । नामें तयाच्या प्रगटे ॥ ७६ ॥ ऐसा ब्रह्मप्रतिष्ठाकर्चार । ज्ञानविधाता चिदंबर । जयाच्या मंत्रबीजें साकार । दैवत प्रगटलें ॥ ७७ ॥ निजानुसंधानें आवाहन । सत्यप्रतिष्ठा सनातन । प्रतीतीनें धरूनि ध्यान । प्रत्यक्ष केलें ॥ ७८ ॥ बाणतां पूजा प्रतीतीची । ध्याता होय तें स्वयेंचि । परि ध्यानाध्येयध्यानाची । त्रिपुटी नसे ॥ ७९ ॥ निजहृदयीं च सनातन । केलें परब्रह्म आवाहन । गुरुकृपेनें आपण । प्रत्यक्ष जालें ॥ ८० ॥ आवाहन ना विसर्जन । अर्चन ना तें अनार्चन । ब्रह्मीं होय ब्रह्मार्पण । ऐसिया रीती ॥ ८१ ॥ हा ज्ञानाचाचि अंतर्भाव । स्वरूपें प्रगटे स्वभाव । साक्षित्वासि न येतां निरावेव । पावे प्रतिष्ठा ॥ ८२ ॥ हा व्यतिरेकाचा अनुक्रम । अन्वयें सहित गिळिलें ब्रह्म । उगळिलें नाहींच सुवर्म । बाणोनि गेलें ॥ ८३ ॥ आकाशीं आकाश घनवट । तेंचि चिदाकाश निघोट । प्रतीतीस येतां अवचट । प्रतीती[२] स्रुरे ॥ ८४ ॥ मरण आंगीं घुमारलें[३] । त्या वेवधानें बरळलें । तैसें विज्ञानासि जालें । साक्षात्कार ॥ ८५ ॥ जिवींचि मरण अनुभवी । हे विज्ञानाची आत्मपदवी । अनुभऊनि जीवींच्या जीवीं । जाय वोसरोनि ॥ ८६ ॥ पाहातां जीवाचे चि अभ्यंतर । नव्हेचि गुणसाक्षी ना संस्कार । नव्हे चि स्था-

---

१ दगडांत. २ परिपूर्ण ३ संचरलें. ४ ' आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां ' या तुकारामाच्या अभंगांत हाच अर्थ आला आहे.

नमान ना व्यवहार । ना ते अवस्था नव्हे ॥ ८७ ॥ जीव आकाशासि म्हणावें । जीव व्यापक तो चि स्वभावें । परि ज्ञानआस्तिक्यताभावें । स्फुरला दिसे ॥ ८८ ॥ त्यास्तव जीवाचें अभ्यंतर । जीवेंचि जाणावें निरंतर । जीवासि जीव लाऊनि साचार । जीवें अनुभविजे ॥ ८९ ॥ साचचि जीवाचा जिव्हाळा । पैस अवकाश मोकळा । त्या जीवासि वेळोवेळां जीव अनुभवी ॥ ९० ॥ येक जाणीवरूप जीव आपण । येक जीव जाणिवेचें अधिष्ठान । त्यास्तव जाणिवेचा जीव लाऊन । अधिष्ठान व्हावें ॥ ९१ ॥ त्या निरावकाशीं सावकाश । प्रतीत ज्ञानाचा प्रकाश । परात्पर मूळपुरुष । तेथें प्रतिष्ठला ॥ ९२ ॥ सनातन ज्ञान-प्रतिष्ठा । प्रसन्न जाली अंतरनिष्ठा । अपरोक्ष उपासना श्रेष्ठा । सांभाळित आली ॥ ९३ ॥ ज्ञानरविवंशपरंपरा । प्रकाशित स्वरूपांबरा । गुरुकृपेनें अभ्यंतरा । दावीत प्रभेनें ॥ ९४ ॥ पराअभ्यंतरींचे पदार्थ । पदार्थज्ञानें ते परमार्थ । प्रकाशूनि केले कृतार्थ । उपेगेंसीं ॥ ९५ ॥ निजानंदस्वरूप ज्ञानें । अनुभविले पदार्थ संपूर्ण । गुरुसूर्यकरें सनातन । दाविलें डोळां ॥ ९६ ॥ आत्मा ज्ञानाचा नयन । गुरुकृपा सूर्य संपूर्ण । साक्षात्काराचेनि आत्मज्ञानें । अवलोकन करी ॥ ९७ ॥ पाहावयासि दृष्टीमाझारी । बाहेर न येतां प्रवेश करी । पाहातेंचि पुरे निर्धारीं । तें चि सनातन ॥ ९८ ॥ संपूर्ण चिदाकाश घन । डोळां रिघालें अंजन । सदोदित निरंजन । निदान देखिलें ॥ ९९ ॥ साधकासि देऊनि बळी । काढिलें निधान समूळीं । प्रमाणासि न येतां निश्चळीं । तें चि तें भरलें ॥ १०० ॥ वस्तुरूप पुरातन । निज सांपडलें निधान । प्राप्तीचा अधिकारी आपण । पायाळ जालों ॥ १०१ ॥ तंव ते साधकाची आहुती । घेउनि जालें निधान स्थिति । पायाळ धन जालें प्रतीती । अभेदअर्थें ॥ २ ॥ समाप्तीसि आलें सर्व । आतुडली वस्ति हे अपूर्व । गुरुकृपेनें केलें आहे । निधानप्राप्तीसि ॥ ३ ॥ तें चि पुढें

१ निधान, ठेव. ( परब्रह्मरूपी ) २ पायाळू, पायाकडून जन्मास येणाऱ्याला पुरलेलें ठेवणें दिसतें अशी कल्पना आहे. ३ पात्र, योग्य

निरूपण । सद्गुरुकृपा निजनिधान । प्राप्त जालें तें सनातन । सुखें अनुभविजे ॥ ४ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । निजानुसंधानें निवळा । ह्मणे सेवअनंत ॥ १०५ ॥ येकादशशब्दे ॥ अष्टमउल्लास संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीरामसमर्थकुळधन । स्वरूपार्थाचें निधान । सद्गुरुकृपेनें संपूर्ण । चढलें हातासी ॥ १ ॥ जें आपणाचि पासीं अखंडित । जें आपणचि तें सदोदित । बळीसी देऊनियां जीवित । लाधलों स्वयें ॥ २ ॥ जें ठेवितां न ये ना टाकितां न ये । ज्याचें प्रमाण केलें न जाये । तें स्वरूप ठेवणें निश्चयें । प्राप्त जालें ॥ ३ ॥ सांठवणें चि पूर्ण निधान । उघडें चि सत्य सनातन । तेथें घेतां नां देतां प्रमाण । कवणें कीजे ॥ ४ ॥ धनासी धन अनुभवी । हे हि येक अनुभवठेवी । अद्वैतासी दावावी । ठेवी कवणें ॥ ५ ॥ दुजेन वीण संचलें चि असे । अनुभवावया कारण नसे । गुरुकृपेच्या प्रकाशें । प्रकाशलें ॥ ६ ॥ म्हणऊनि तें अभ्यंतरधन । प्रतीतीच्या करीं घेऊन । पाहतां निजदृष्टीसी संपूर्ण । सीमा चि नसे ॥ ७ ॥ वेचितां प्रबोधउपजीविके । धन अधिकावे कौतुकें । स्वरूपानुभव विवेकें । उपळब्धि त्याची ॥८॥ अक्षय सनातन ठेवा । लाधलों मी निजविसांवा । न लगे विश्रांतीसी योजावा । उपाय दुसरा ॥ ९ ॥ सद्गुरूची निजसंपदा । लाधलों मी स्वसुखपदा । मी माझी सर्व आपदा । दुन्हावली ॥ १० ॥ आणिलें ज्ञानाचे जाग्रतीसि । नाहीं माया निद्रातम निशि । नसे ज्ञानदिवस प्रकाशी । ऐसें तें अधिष्ठान ॥ ११ ॥ प्रभा ज्ञानसूर्य अस्तवे । परंतु निशा ते न संभवे । आत्मप्रकाशक विभवें । नसे चि चंद्रमा ॥१२॥ रात्रीं दिवसवीण अखंड । उदेला अद्वैतबोधमार्तांड । मायाब्रह्म भावना प्रचंड । फाळोखें नसे ॥ १३ ॥ अखंडीत आणि अद्वैत । हा हि उमस चि नसे सेथ । त्या परंधामीं अनंत । सद्गुरु वसे ॥१४॥

---

१ खर्च केल्यानें अधिकाधिक होणारें असें हें अपूर्व धन आहे.

ज्यांचे प्रतीतीची सूक्ष्मता । नये चि नाना युक्तीच्या हाता । जेथें वेदशास्त्रें तत्वता । निर्बुजोनि गेलीं ॥ १५ ॥ जेथें ब्रह्मादिकांच्या युक्ति । आटोनि गेल्या समाधिस्थिति । जे युक्तीच्या योगें कल्पांतीं । प्राप्त नव्हे ॥ १६ ॥ ज्या स्वरूपासि नाहीं ज्ञानाज्ञान । जें न साहे चि कांहीं येकपण । त्यावस्तूसि भिन्न न होतां आपण । वसों जाणे ॥१७॥ वेगळेपणासि न येतां । वस्तूचि होऊनि तत्वता । अनुभवीत स्वरूपता । नांदतसे सुखें ॥ १८ ॥ अद्वैत आपला आपण येक । तयासि कैंचे असतील सेवक । ऐसें म्हणाल तरी लोक । तेणें चि अनुग्रहिले ॥ १९ ॥ लोकांसि अनुग्रही स्वरूपें । परि नातळे चि त्या संकल्पें । अखंड निर्विकल्प विकल्पें । विटाळला चि नाहीं ॥ २० ॥ प्रणवासहित परा । अद्वैत जिन्हारें निर्जरा । विज्ञान जीव चिदंबरा । माजि खेळविला ॥ २१ ॥ स्वरूपांबर वसुमति । अपरोक्षज्ञानाची प्रतीती । सद्गुरुकृपा हृदयाप्रति । टिकवीतसे सुखें ॥ २२ ॥ ज्ञानत्रैलोक्याची सांटपण । तया ज्ञानाचा साक्षी निर्वाण । परात्पर विज्ञानघन । अनुग्रहीत गुरूचा ॥ २३ ॥ आत्मा सच्छिष्य पुरातन । देशिक ब्रह्म सनातन । गुरुशिष्यांचें हृदय संपूर्ण । काय म्हणावें तया ॥ २४ ॥ जो परमात्मा आदिदेव । तो सच्छिष्य निजस्वभाव । जेणें अर्जविला निरावेव । सद्गुरु सर्वदा ॥ २५ ॥ जो सच्छिष्यपणें सदोदित । उभा ठाकला अखंडित । अनंतापासूनि तो निश्चित । परता नव्हे कदां ॥ २६ ॥ अनंत सर्वस्वें आपुला केला । नाहीं अनंतेवीण वेगळा जाला । अनंतासी सेवित राहिला । निरंतर ॥ २७ ॥ सर्वदा सेविता अनंत । निजध्यास जाला बळिवंत । भृंगीच्या ध्यानें अकल्पित । कीट भृंग चि जाला ॥ २८ ॥ तयाचा सद्भाव प्रत्यक्ष[1] जाला । मातीचा द्रोण[2] प्रतिष्ठिला । तो चि उपदेशों लागला । दिम्यास्त्रविद्या ॥ २९ ॥ हा

१ कृपापात्र. २ गुरु. ३ द्रोणाचार्य. एकलव्य नामक निषादानें द्रोणाचार्यांची मातीची मूर्ति करून तिच्या पासून अस्त्र विद्येचें अध्ययन केलें अशी भारतांत कथा आहे.

निरूपण । सद्गुरुकृपा निजनिधान । प्राप्त जालें तें सनातन । सुखें अनुभविजे ॥ ४ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । निजानुसंधानें निवळा । ह्मणे मेरुअनंत ॥ १०५ ॥ येकादशशतें ॥ अष्टमवल्लास संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः । श्रीरामसमर्थकुळधन । स्वरूपार्थाचें नि-धान । सद्गुरुकरेनें संपूर्ण । चढलें हातासी ॥ १ ॥ जें आपणाचि पासीं अखंडित । जें आपणचि तें सदोदित । बळीसी देऊनियां जी-वित । लाधलों स्वयें ॥ २ ॥ जें ठेवितां न ये ना टाकितां न ये । ज्याचें प्रमाण केलें न जाये । तें स्वरूप ठेवणें निश्चयें । प्राप्त जालें ॥ ३ ॥ सांठवणें चि पूर्ण निधान । उघडें चि सत्य सनातन । तेथें घेतां नां देतां प्रमाण । कवणें कीजे ॥ ४ ॥ धनासी धन अनुभवी । हे हि येक अनुभवठेवी । अद्वैतासी दावावी । ठेवी कवणें ॥ ५ ॥ दुजेन वीण संचलें चि असे । अनुभवावया कारण नसे । गुरुकृपेच्या प्रकाशें । प्रकाशलें ॥ ६ ॥ म्हणऊनि तें अस्यंतरधन । प्रतीतीच्या करीं घेऊन । पाहतां निजदृष्टीसी संपूर्ण । सीमा चि नसे ॥ ७ ॥ वेचितां प्रबोधउ-पजीविके । घन अधिकावे कौतुकें । स्वरूपानुभव विवेकें । उपलब्धि त्याची ॥८॥ अक्षय सनातन ठेवा । लाधलों मी निजविसावा । न लगे विश्रांतीसी योजावा । उपाय दुसरा ॥ ९ ॥ सद्गुरूची निजसंपदा । लाधलों मी स्वसुखपदा । मी माझी सर्व आपदा । दुव्हावली ॥ १० ॥ आणिकें ज्ञानाचे जाग्रतीसि । नाहीं माया निद्रातम निशि । नसे ज्ञानदिवस प्रकाशी । ऐसें तें अधिष्ठान ॥ ११ ॥ प्रभा ज्ञानसूर्य अस्तवे । परंतु निशा ते न संभवे । आत्मप्रकाशक विभवें । नसे चि चंद्रमा ॥१२॥ रात्रीं दिवसवीण अखंड । उदेला अद्वैतबोधमार्तंड । मायाभ्रम भावना प्रचंड । काळोखें नसे ॥ १३ ॥ अखंडीत आणि अद्वैत । हा हि उमस चि नसे तेथ । त्या परंधामीं अनंत । सद्गुरु वसे ॥१४॥

---

१ खर्च केल्यानें अधिकाधिक होणारें असें हें अपूर्व धन आहे.

ज्यांचे प्रतीतीची सूक्ष्मता । नये चि नाना युक्तीच्या हाता । जेथें वेदशास्त्रें तत्वता । निर्बुजोनि गेलीं ॥ १५ ॥ जेथें ब्रह्मादिकांच्या युक्ति । आटोनि गेल्या समाधिस्थिति । जे युक्तीच्या योगें कल्पांतीं । प्राप्त नव्हे ॥ १६ ॥ ज्या स्वरूपासि नाहीं ज्ञानाज्ञान । जें न साहे चि कांहीं येकपण । त्यावस्तूसि भिन्न न होतां आपण । वसों जाणे ॥१७॥ वेगळेपणासि न येतां । वस्तूचि होऊनि तत्वता । अनुभवींत स्वरूपता । नांदतसे सुखें ॥ १८ ॥ अद्वैत आपला आपण येक । तयासि कैंचे असतील सेवक । ऐसें म्हणाल तरी लोक । तेणें चि अनुग्रहिले ॥ १९ ॥ लोकांसि अनुग्रही स्वरूपें । परि नातळे चि त्या संकल्पें । अखंड निर्विकल्प विकल्पें । विटाळला चि नाहीं ॥ २० ॥ प्रणवासहित परा । अद्वैत जिन्हारें निर्जरा । विज्ञान जीव चिदंबरा । माजि खेळविला ॥ २१ ॥ स्वरूपांबर वसुमति । अपरोक्षज्ञानाची प्रतीती । सद्गुरुकृपा हृदयाप्रति । टिकवीतसे सुखें ॥ २२ ॥ ज्ञानत्रैलोक्याची सांटवण । तया ज्ञानाचा साक्षी निर्वाण । परात्पर विज्ञानघन । अनुग्रहीत[१] गुरूचा ॥ २३ ॥ आत्मा सच्छिष्य पुरातन । देशिक[२] ब्रह्म सनातन । गुरुशिष्याचें हृदय संपूर्ण । काय म्हणावें तया ॥ २४ ॥ जो परमात्मा आदिदेव । तो सच्छिष्य निजस्वभाव । जेणें अर्जविला निरावेव । सद्गुरु सर्वदा ॥ २५ ॥ जो सच्छिष्यपणें सदोदित । उभा ठाकला अखंडित । अनंतापासूनि तो निश्चित । परता नव्हे कदा ॥ २६ ॥ अनंत सर्वस्वें आपुला केला । नाहीं अनंतेंवीण वेगळा जाला । अनंतासी सेवित राहिला । निरंतर ॥ २७ ॥ सर्वदा सेविता अनंत । निजध्यास जाला बळिवंत । भृंगीच्या ध्यानें अकल्पित । कीटि भृंग चि जाला ॥ २८ ॥ तयाचा सद्भाव प्रत्यक्ष जाला । मातीचा द्रोण[३] प्रतिष्ठिला । तो चि उपदेशों लागला । दिव्यास्त्रविद्या ॥ २९ ॥ हा

१ कृपापात्र. २ गुरु. ३ द्रोणाचार्य. एकलव्य नामक निषादानें द्रोणाचार्यांची मातीची मूर्ति करून तिच्या पासून अस्त्र विद्येचें अध्ययन केलें अशी भारतांत कथा आहे.

तरी घनानंद सचेत । सत्यस्वरूपें श्रीअनंत । साच चि प्रसन्न जाला अद्वैत । तरि काय येक न करी ॥ ३० ॥ प्रतीतीचे पदार्थ जनीं । पाहातां, दुःखें जाती निरसोनि । विंचु सर्प तत्क्षणीं । उतरती विषें ॥ ३१ ॥ सप्रतीत महा मोहरे । अनुभवासी येती निर्धारें । नानावल्लीरस चमत्कारें । आरोग्य करिती ॥ ३२ ॥ नाना दिव्यरसायनें । परिक्षेसी येती अनुभवानें । नाना सिध्दांचे मुखीचे वचनें । प्रत्यक्ष प्रतीती ॥ ३३ ॥ जयाचें करितां चि स्मरण । विघ्नें जाती निरसोन । जयाचें घेतां चि दर्शन । महालाभ होती ॥ ३४ ॥ महापुरुषार्थी ऋषेश्वर । उपदेशमाळा मंत्रसार । पुराणें श्रवणें निर्धार । लागती हाता ॥ ३५ ॥ कितीयेक गुप्त प्रगट । असती सिध्द सुखें चि उत्कट । काया माया काष्ट लोष्ट । साधारण दिसती ॥ ३६ ॥ कोणीकडे आकृतिरूपें असती । कोठें पदार्थरूपें भासती । स्थावरजंगम जगती । सर्वत्र साधुस्वरूपें ॥ ३७ ॥ विश्वरूपें साधु प्रगट । विश्वातीत सुखें घनवट । विश्वंभरबोधें निकट । निजप्रतीति दे ॥ ३८ ॥ विश्वाकारें साधुदर्शन । न देखती गुणागुण । ते साधू चि चित्स्वरूपें जाण । पाहती साधूसी ॥ ३९ ॥ अव्यक्त व्यक्तीसी आला । चहुं खाणींत विस्तारला । तो दृष्टीसि आम्ही देखिला । साधूस्वरूपें ॥ ४० ॥ जो अव्यक्त ना व्यक्त कांहीं येक । येथें न चलती उपदेश तर्क । सामावले जाती चिदर्क । विज्ञानप्रभेसीं ॥ ४१ ॥ तो निष्कळंक आदि अनंत । प्रतीतीचें हृदय निवांत । अनुभवामाजि सदोदित । अनुग्राहित अकळ ॥ ४२ ॥ कांहीं च न कळोनि जीवीं । निवळीत निजानुभवीं । स्वयें चि परतत्वपदवी । देतसे सकळां ॥ ४३ ॥ वेदें वर्णितां उदारपण । अर्थसंपत्तीनें करी निर्वाण । याचेसी नाम घेतां चि पूर्ण । शांतीस आणी ॥ ४४ ॥ खडतर नामाची महिमा । उरों नेदी जन्मकर्मा । उलंघूनि मरणाची सीमा । निर्वाण करी ॥ ४५ ॥ नामप्रशंसेनें जग तरलें । नामें चि भवाब्धिसी उतरलें । नामें चि निजानंदें अवतरलें । श्री अनंताचें ॥ ४६ ॥ अनंत नामसंजीवनी । भवरोग विध्वंसिनी । भवतापउपश-

मनी। लाधलों अनंतकृपा ॥ ४७ ॥ अनंत साक्षित्वाचा शेवट। अनंत स्वरूपाचें मूळपीठ। अनंतसाक्षात्कारीं उत्कट। योग फळला ॥ ४८ ॥ जें जें तत्व अनंतरूपी। तें तें तत्व तेथें चि समर्पी। अनंतासी समर्पिलें संकल्पीं। पुरे चि कल्पना ॥ ४९ ॥ संकल्पशून्य अनंतसेवा। लाधलों अनंतपदीं विसांवा। समर्पलों अनंतासि हेवा। हा हि मज नसे ॥ ५० ॥ अनंतसद्गुरुसमीप। अनंतरूपें सद्रूप। प्रतीतीनें आपेंआप। अनंतमौनी जाला ॥ ५१ ॥ मी माझें न स्मरे मजला। अनंतबोधें उमजला। मी च मजमाजि निजेला। मीपणासी न येतां ॥ ५२ ॥ यापरी अनंतयोग मज। अनंतानुग्रहीत सहज। अनंतहृदयींचें वेदबीज। प्रतीतीसि आलें ॥ ५३ ॥ आइकोनि आईकणें आईकवि। हे नाइकतेपणाची पदवी। हृदय श्रोत्रासि आईकवी। त्रिपुटीवीणें ॥ ५४ ॥ पाहाण्यामाजि सर्वदां पाहे। परि तो पाहतेपणासि न साहे। ऐसिया त्रिलोकनें होये। ग्रंथ पाहातां ॥ ५५ ॥ जो वाचे वाचकता वदवी। वाचक न होनि अनुभव दावी। तें चि वाचेनें वाचवी। ग्रंथांतर ॥ ५६ ॥ जो मनासी मनपणें पाहे। परि मनासि नातळे निश्चयें। निर्मन योगें चि होये। मनन करितां ॥ ५७ ॥ जयास कांहीं च नसे ध्यास। तो चि तयाचा निदिध्यास। या चि अध्यासें अभ्यास। करी ग्रंथपठण ॥ ५८ ॥ जो अपरोक्ष स्वयें साचार। कवणें करावा तयाचा निर्धार। तयासी तयाचा चि साक्षात्कार। ग्रंथश्रवणीं ॥ ५९ ॥ शब्दवृत्ति श्रवणेंवीण। नित्य श्रवण-भक्ति आराधन। अद्वैताचें चि कीर्तन। कीर्तिरूप करितसे ॥ ६० ॥ त्यासी नाम नाहीं निर्गुण। त्याचें चि करि नामस्मरण। स्मरण करा-वया भिन्न। उरला नसे ॥ ६१ ॥ जो स्वयें चि विद्यमान। सर्वगत अधिष्ठान। तो चि अपरोक्षज्ञानेंकरून। पादसेवन करी ॥ ६२ ॥ जयासि अर्चक ना अर्चन। तें चि अनुभवेंकरून। सर्वदां आपणासि आपण। अर्चितसे ॥ ६३ ॥ जयासि वंदनत्रिपुटी नसे। तो चि निजप्रतीतिउद्देशें। आप आपणा वंदितसे। पुढती पुढती ॥ ६४ ॥

जो येकला येक अखंडित । तो चि निजप्रतीतीनें सदोदित । आपआपलें सप्रतीत । दास्य करितसे ॥ ६५ ॥ ज्यासि सद्‍य ना निष्ठुर नुमसे । जो अद्वयस्वरूपें चि असे । तो चि प्रतीतीच्या सौरसें । आपुलें सद्‍य करी ॥ ६६ ॥ जो स्वयेंचि निजनिदान । नुमसे चि महाअद्वैतपण । स्वात्मसुखें आत्मनिवेदन । आपणासि करी ॥ ६७ ॥ ज्याच्या सहवासें सलोकता । कृतार्थ करी आदि विधाता । विष्णुहरादिक तत्वता । ज्याचेनि कृतार्थ ॥ ६८ ॥ तो कैळासादि तींहीं लोकीं । नित्य सलोकता विलोकी । समीपता ते येकायेकीं । आप आपुली जया ॥ ६९ ॥ सर्वदां आत्मत्वें चि आपण या स्वरूपतेनें असे जाण । सायुज्यता तरि समरसोन । राहे आपआपणांत ॥ ७० ॥ नवविधा भक्तीचें अभ्यंतर । चतुर्विधा मुक्तीचें जिव्हार । नित्यस्वरूपसाक्षात्कार । ऐसा चि होतसे ॥७१॥ अनंत परब्रह्मवस्तीनें । वसलीं अनंतब्रह्मांडज्ञानें । तया ब्रह्मांडाचीं अंतःकरणें । बोधासि आणिलीं ॥७२ ॥ कोण्हासि विक्षेपें चि दुर्धर । भवनिवृत्तीसि आणी साचार । येकासि भवदुःखें अपार । अनुतापासि आणी ॥७३॥ येकासि अंतरींच्या अंतरीं । स्वभावें चि बोध करी । येकासी श्रुतिशास्त्रांतरीं । उमजऊनि करी अर्हे ॥ ७४ ॥ येकाचा होऊनि जीवलग । सांगे स्वरूपाचा अंतरंग । येकासी अवचट सुखें योग । करी वस्तूचा ॥ ७५ ॥ ज्ञान अवतार पंक्तीनें । अनंतसिध्द अनंतज्ञानें । उपदेशिलें अनंतकृपेनें । अनंत जीव ॥७६॥ अनंतवेळा अनंतावतार । अनंतज्ञानी विश्वाकार । केला विश्वाचा उध्दार । अनंतसमर्थें ॥ ७७ ॥ अनंतसमर्थें राम ऐसा । प्रबोधीलसे कृपेनें कैसा । जननीजनक जैसा । जीवापासूनि जिव्हाळा ॥ ७८ ॥ कदाचित प्रसंगेकरूनि । मायबापें पालटती जनीं । कल्पांत जालिया हि मनीं सद्गुरु पालटेना ॥ ७९ ॥ देवभक्त ही संकल्पमूळें । पालटतील कोण्हे येका काळें । गुरुशिष्याचे जिव्हाळे । क्षोभा न पवाति ॥ ८० ॥ प्रणवाचें मूळ अभ्यंतर । निवळलें गुरुकृपेनें निरंतर । कल्पांत जालियांही साचार । पालट न धरी ॥ ८१ ॥ केवळ स्वानुभवाचें शिखर । सदोदित निर्विकार । अनंतमौनीचें

जिन्हार । अनंत चि अनुभवी ॥ ८२ ॥ तें स्वभावकृपेनें अकळ । प्रबोधिलें निजतत्व केवळ । निजवस्तूची प्रतीत निश्चळ । दिधली स्वयंभ ॥ ८३ ॥ दीपासवें ज्योति प्रगटे । होय वस्तुप्राप्ति अवचट । सद्गुरुकृपा चि घनवटे । स्वरूपांबरीं ॥ ८४ ॥ स्वरूपांबर निरंतर । अभिन्नसाक्षात्कारें निर्विकार । प्रसन्न जाला दयाकर । सद्गुरुस्वामी ॥ ८५ ॥ आतां प्राप्तिअप्राप्तीचा कांहीं । मज असे चि ना संकल्प विकल्पही । निजप्रतीतसहीत पायीं । विनटलों सद्गुरूचे ॥ ८६ ॥ परब्रह्मवस्तीचा विश्राम । सद्गुरु अनंत निरुपम । गाळींव व्योम परंधाम । परब्रह्म स्वयें ॥ ८७ ॥ हा निवृत्तीचा निजसेवट । अक्षयानंद ब्रह्मपट । संकल्पशून्य अनुद्वाट । मूळ समाप्ति ॥ ८८ ॥ जो वृत्तीसी च आला नाहीं । ऐसा चि अनुभविला पांहीं । त्या अनुभवाची कांहीं । महिमा चि न कळे ॥ ८९ ॥ अनुभव त्रिपुटीवेगळा । सित्यस्वरूप जिन्हाळा । अनिर्वाच्य निजअस्तिक्यलीळा । अपरोक्ष वस्तु ॥ ९० ॥ उपक्रम ना उपसंव्हार । अद्वैतब्रह्म अगोचर । चमत्काराचे संकेत निर्विकार । उपदेशीं च त्या ॥ ९१ ॥ ज्ञानें ज्ञान चि निवळलें । तेणें सर्व हि निर्मूळ जालें । स्वभावस्थितीनें फळलें । पूर्वार्जित ॥ ९२ ॥ अकळ अनुसरलें मीपण । अकळ फळलें अनुसंधानें । अकळ सद्गुरुकृपेचें ज्ञान । प्रतीतीसि आलें ॥ ९३ ॥ उपशमलें मीपण अकळ । अनुभवलें अकळ अचंचळ । अकळ सद्गुरुकृपेनें सकळ । प्रतीतीसि आलें ॥ ९४ ॥ अकळ काळ निरसला । अकळ दैवयोग फळला । अकळ अभिमान वोसरला । अवचट सुखें ॥ ९५ ॥ भवविघ्न नासोनि गेलें । परत्र आवघें हातासि आलें । सद्गतिदायक फळलें । गुरुभजन ॥ ९६ ॥ स्वभावस्थितीनें सहज । भेटला आत्मा रघुराज । प्रवृत्तिनिवृत्तिपर उमज । समजोनि गेला ॥ ९७ ॥ अनादि समाप्तीची समाप्ति । अनिर्वाच्य म्हणणें किती । शून्येंवीण शब्दोत्पत्ति । असे चि ना ते ॥ ९८ ॥ ग्रंथसमाप्तीचें अभ्यंतर । ग्रंथगर्भ चि निरंतर । आदि ना अंत अपरंपर । संख्याविहीन तो ॥ ९९ ॥ आदिअंत देखिला नाहीं ।

हें चि अर्थांतर ग्रंथहृदयीं । अर्थरूप होऊनि निश्चयीं । ग्रंथ श्रवण कीजे ॥ १०० ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । आद्यंत ग्रंथाचा भाव निवळा । म्हणे मेरुअनंत ॥ १०१ ॥ येकादशरुद्रे । नवमउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ मुळींचा । स्वयंभगभरित ज्ञानाचा । स्वरुपानुभव सृष्टीचा । निजउजाळा ॥ १ ॥ स्वरूपप्राप्तीवरी कळस । चिदाकाशींचा ध्रुवनिवास । अद्वैतसित्धीचा विलास । अपरोक्षरूपें ॥ २ ॥ स्वानंदसिंधु स्वयंभ । शांतीचा झरा अक्षोभ । निसत्सौभाग्याचा आरंभ । शोभा सन्मणी ॥ ३ ॥ नित्यसमाधिविसांवा । सायुज्यसामरस्य ठेवा । अमृतसित्धीयोग बरवा । सद्गुरुप्रसादें ॥ ४ ॥ अनुभव भवन सुंदर । निगममथित मनोहर । सार नवनीत अगोचर । हातासि आलें ॥ ५ ॥ जे सद्गुरुकृपाकरें । प्राप्त जालें निजविवरें । त्या अर्थप्रमेयाचीं अक्षरें । ढाळें चालिलीं ॥ ६ ॥ हे आदिविभूति रचना । अक्षरें रूपें ब्रह्मांडें नाना । परात्परविधिरसना । प्रगटली परमार्थें ॥ ७ ॥ जेंवि महाराजसेनासंभार । अश्वामार्गें अश्व मनोहर । कीं कुंजरापाठीसीं कुंजर । थाटें चालिले ॥ ८ ॥ ना ते सुवर्णशिखरापरीं । रथ घडाडिले पृथ्वीवरी । तेंवि प्रमेयांतरभरोवरी । होतसे अक्षराची ॥ ९ ॥ पुरुषार्थांचे पदातिवीर । निधडे समरंगणीं झुंजार । शत्रुनिवर्तकसंभार । उठावले बळें ॥ १० ॥ तैसें चि ग्रंथाचें अभ्यंतर । अनंतप्रमेयें बोध दुर्धर । भवनिवर्तक साचार । उठावले बळें ॥ ११ ॥ ह्मणती भारतीची सेना दुर्धर । रथी महारथी रणशौरे वीर । तैसे चि भारतीचे भाव निर्धार । भवभंजनबळें ॥ १२ ॥ चहूं पुरुषार्थांचीं फळें । नित्यप्राप्तीच्या करतळें । झेलीत चालिले उसाळें । सहज स्थितीच्या ॥ १३ ॥ तो हा अक्षरब्रह्मविस्तार ।

---

१ प्रवाहरूपानें. २ कौरवपांडवांच्या युद्धांतील. ३ सद्गुरूच्या उपदेशरूप वाणीचे. ४ उसळीनें, आनंदाच्या उच्या मारीत.

अनंतहृदयींचा निर्धार । अखंडीतस्वरूपें साचार । अखंडाकारें ॥ १४ ॥ ब्रह्मप्राप्तीचें अभ्यंतर । ग्रंथप्रसाद अगोचर । किंवा अद्वैतशतांगें भास्कर । मोक्षध्वजा फडके ॥ १५ ॥ ना हें अद्वैतप्राप्तीचें विमान । अनंतकृपेचें महिमान । आत्मबोधें समसमान । गतीनें आलें ॥ १६ ॥ अनंताचें हृदय स्वयंभ । ग्रंथरूप अनंतलाभ । विश्रांति आपणासी अक्षोभ । जोडला स्वानंदें ॥ १७ ॥ ग्रंथरूप देवालय । देव सदोदित स्वयें । देवभक्त निजप्रत्ययें । स्तिथीसी आलें ॥ १८ ॥ गुरुशिष्यां निजप्रलय । अभेदवक्ता अनंत होये । अखंडश्रोता शिष्य निश्चयें । प्रश्नप्रत्योत्तरें ॥ १९ ॥ शिष्यप्रश्न ग्रंथपीठिका । गुरुप्रबोध रचनौभूमिका । प्रतीतीनें चालिला अर्थ निका । कळसपर्यंत ॥ २० ॥ राम सार्वभौम सनातन । ग्रंथविमानीं समसमान । अनुभवसिंहासनीं आर्पण । बैसला आस्तिक्यें ॥ २१ ॥ श्रीरामाचें वास्तव्यस्थळ । प्रणवें प्रतिष्ठलें केवळ । विज्ञानसुवर्णें रसाळ । परिपूर्तीसि आणिलें ॥ २२ ॥ अनंतप्रतीतीचीं वचनें । अनर्घ्य स्वरूपचिद्रत्नें । अभंगप्रबोधसुमनें । जडलीं निगुती ॥ २३ ॥ महाप्रळय वज्रचपेटे । लागतां न भंगे कोटें[6] । अभंगग्रंथस्थितीनें प्रगटे । महाप्रसाद ॥ २४ ॥ तळीं शांति सखोलपाया । नित्यविरक्तीनें आणिला भरोनियां । स्वरूपीं च विसांवोनियां । भक्तीनें निर्मळ ॥ २५ ॥ जें जें प्रणवापासूनि चाले । तें तें तत्वअर्थी रूढविलें । अन्वयघडमोडीनें आलें । क्रमें चि व्यतिरेका ॥ २६ ॥ अन्वयवेतिरेकक्रमान्वयें । पाया उभारिला निराश्रयें । कल्पांतीं चळेना अक्षय । ग्रंथरूप रचना ॥ २७ ॥ कर्म उपासना आणि ज्ञान । पाया त्रिशुधि त्रिकांड पूर्ण । वरि विज्ञानरचना गहन । चालिली चिरकळा ॥ २८ ॥ प्राकार गोपुरें परम । राजांगणें निरुपम । ठायीं ठायीं रचना व्योम । मंडपस्थितीनें ॥ २९ ॥ नव विधान नव प्राकार । दशम स्वरूपें अगोचर । वरि परब्रह्म निर्विकार । येकादश

१ अद्वैतरूप स्थावर २ पाया. ३ घर रचिलेली इमारत. ४ अति[illegible] ५ चुन्यानें. ६ मंदिराच्या भिंती.

हें चि अर्थांतर ग्रंथहृदयीं । अर्थरूप होऊनि निश्चयीं । ग्रंथ श्रवण कीजे ॥ १०० ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । आद्यंत ग्रंथाचा भाव निवळा । म्हणे मेरुअनंत ॥ १०१ ॥ येकादश-खंडे । नवमउल्लासः संपूर्णः ॥

---

श्रीरामचंद्रायनमः ॥ श्रीरामसमर्थ मुळींचा । स्वयंभगर्भस्ति ज्ञानाचा । स्वरुपानुभव सृष्टीचा । निजउजाळा ॥ १ ॥ स्वरूपप्राप्ती-वरी कळस । चिदाकाशींचा ध्रुवनिवास । अद्वैतसिध्दीचा विलास । अपरोक्षरूपें ॥ २ ॥ स्वानंदसिंधु स्वयंभ । शांतीचा झरा अक्षोभ । नित्यसौभाग्याचा आरंभ । शोभा सन्मणी ॥ ३ ॥ नित्यसमाधिविसांवा । सायुज्यसामरस्य ठेवा । अमृतसिध्दीयोग बरवा । सद्गुरुप्रसादें ॥ ४ ॥ अनुभव भवन सुंदर । निगममथित मनोहर । सार नवनीत अगोचर । हातासि आलें ॥ ५ ॥ जे सद्गुरुकृपाकरें । प्राप्त जालें निजविवरें । त्या अर्थप्रमेयाचीं अक्षरें । ढाळें चाळिलीं ॥ ६ ॥ हे आदिविभूति रचना । अक्षरें रूपें ब्रह्मांडें नाना । परात्परविधिरसना । प्रगटली पर-मार्थे ॥ ७ ॥ जेंवि महाराजसेनासंभार । अश्वामागें अश्व मनोहर । कीं कुंजरापाठीसीं कुंजर । थाटें चालिले ॥ ८ ॥ ना ते सुवर्णशिखरा-परीं । रथ घडाडिले पृथ्वीवरी । तेंवि प्रमेयांतरभरोवरी । होतसे अक्ष-राची ॥ ९ ॥ पुरुषार्थाचे पदातिवीर । निधडे समरंगणीं झुंजार । शत्रुनिवर्तकसंभार । उठावले बळें ॥ १० ॥ तैसें चि ग्रंथाचें अभ्यं-तर । अनंतप्रमेयें बोध दुर्धर । भवनिवर्तक साचार । उठावले बळें ॥ ११ ॥ ह्मणत्ती भारतीची सेना दुर्धर । रथी महारथी रणशौरे वीर । तैसे चि भारतीचे भाव निर्धार । भवभंजनबळें ॥ १२ ॥ चहूं पुरुषार्थीचीं फळें । नित्यप्राप्तीच्या करतळें । झेळीत चालिले उर्साळें । सहज स्थितीच्या ॥ १३ ॥ तो हा अक्षरब्रह्मविस्तार ।

---

१ प्रवाहरूपानें. २ कौरवपांडवांच्या युद्धांतील. ३ सद्गुरूच्या उपदेशरूप वाणीचे. ४ उसळीनें, आनंदाच्या उच्या मारीत.

अनंतहृदयींचा निर्धार । अखंडीतस्वरूपें साचार । अखंडाकारें ॥ १४ ॥ ब्रह्मप्रातीचें अभ्यंतर । ग्रंथप्रसाद अगोचर । किंवा अद्वैतशतांगे भास्कर । मोक्षध्वजा फडके ॥ १५ ॥ ना हें अद्वैतप्रातीचें विमान । अनंतकृपेचें महिमान । आत्मबोधें समसमान । गतीनें आलें ॥ १६ ॥ अनंताचें हृदय स्वयंभ । ग्रंथरूप अनंतलाभ । विश्रांति आपणासी अक्षोभ । जोडला स्वानंदें ॥ १७ ॥ ग्रंथरूप देवालय । देव सदोदित स्वयें । देवभक्त निजप्रत्ययें । स्तिथीसी आले ॥ १८ ॥ गुरुशिष्यां निजप्रत्यय । अभेदवक्ता अनंत होये । अखंडश्रोता शिष्य निश्चयें । प्रश्नप्रत्योत्तरें ॥ १९ ॥ शिष्यप्रश्न ग्रंथपीठिका । गुरुप्रबोध रचनाभूमिका । प्रतीतीनें चालिला अर्थ निका । कळसपरियंत ॥ २० ॥ राम सार्वभौम सनातन । ग्रंथविमानीं समसमान । अनुभवसिंहासनीं आपण । बैसला आस्तिक्यें ॥ २१ ॥ श्रीरामाचें वास्तव्यस्थळ । प्रणवें प्रतिष्ठलें केवळ । विज्ञानसुवर्णें रसाळ । परिपूर्तीसि आणिलें ॥ २२ ॥ अनंतप्रतीतीचीं वचनें । अनर्घ्य स्वरूपचिद्रत्नें । अभंगप्रबोधसुधेनें । जडलीं निगुती ॥ २३ ॥ महाप्रळय वज्रचपेटे । लागतां न भंगे कोटें[6] । अभंगग्रंथस्थितीनें प्रगटे । महाप्रसाद ॥ २४ ॥ तळीं शांति सखोलपाया । नित्यविरक्तीनें आणिला भरोनियां । स्वरूपीं च विसांवोनियां । भक्तीनें निर्मळ ॥ २५ ॥ जें जें प्रणवापासूनि जालें । तें तें तत्त्वअर्थीं रूढविलें । अन्वयघडमोडीनें आलें । क्रमें चि व्यतिरेका ॥ २६ ॥ अन्वयव्यतिरेकक्रमान्वयें । पाया उभारिला निराश्रयें । कल्पांतीं चळेना अक्षय । ग्रंथरूप रचना ॥ २७ ॥ कर्म उपासना आणि ज्ञान । पाया त्रिशुद्धि त्रिकांड पूर्ण । वरि विज्ञानरचना गहन । चालिली चित्कळा ॥ २८ ॥ प्राकार गोपुरें परम । राजांगणें निरुपम । ठायीं ठायीं रचना व्योम । मंडपस्थितीनें ॥ २९ ॥ नव विधान नव प्राकार । दशम स्वरूपें अगोचर । वरि परब्रह्म निर्विकार । येकादश

१ अद्वैतरूप रथावर २ पाया. ३ घर रचिलेली इमारत. ४ अतिमूल्यवान्. ५ चुन्यानें. ६ मंदिराच्या भिंती.

पावन । चतुर्थ रुद्रींचें निरूपण । एवं निरोपिलें ॥ ६५ ॥ आतां पंचम रुद्राची पीठिका । चतुर्थ रुद्रचि होय निका । विचार अनुक्रमें विवेका । प्रथांतर रूढविलें ॥ ६६ ॥ पंचम रुद्रीं प्रथमोल्हास । विरक्तीचा होय प्रकाश । द्वितीयोल्हासीं विचारास । निवळ केलें ॥ ६७ ॥ तृतीय उल्हासीं विशेष । शमादिषट्कअभ्यास । चतुर्थोल्हासीं मुमुक्षता निर्दोष । निरोपिली ॥ ६८ ॥ पंचमोल्हासीं जाणिजे । प्रस्ताविकबोध सहजें । षष्ठोल्हासीं निजउमजे । फावली अमृतवेळा ॥ ६९ ॥ सप्तम उल्हासीं लीळा । क्रियेचा महिमा हेळण जिव्हाळा । अष्टमोल्हासीं अंतरकळा । प्रस्ताविक पुढती ॥ ७० ॥ नवमोल्हासीं श्रीराम-। उपासनेचें निजवर्म । दशमोल्हासीं परम । स्वरूपाचळ तो ॥ ७१ ॥ एकादश उल्हासीं संपूर्ण । भक्त अंतर्निष्ठेनें सज्ञान । सलगीनेंच केलें भांडण । ईश्वरेंसीं ॥ ७२ ॥ पंचम रुद्र एवंप्रकारें । निरूपिला अर्थ विस्तारें । षष्ठ रुद्रासि त्याचि अभ्यंतरें । अर्थोपपत्तीसि आणिलें ॥ ७३ ॥ आतां षष्ठ रुद्रीं विवर । परमार्थ चढोवढीनें साचार । चालिलें प्रतीतीनें अभ्यंतर । उल्हासें उल्हास ॥ ७४ ॥ जैसीं शुक्तापरीस सुढाळें । माळेसि वोविलीं मुक्ताफळें । अवघीं सारखींच तेजाळें[१] । कोणासि आगळें म्हणावें ॥ ७५ ॥ प्रथमोल्हासीं गहन । निरोपिलें अपरोक्ष साधन । द्वितीयोल्हासीं निर्वाण-। योग उपासनेचा ॥ ७६ ॥ तृतीय उल्हासीं पुढती । स्वामिसंभाषण प्रीती । चतुर्थ उल्हासीं प्रतीति । निजभक्तांची ॥ ७७ ॥ पंचमउल्हासीं अभिनव । रामउपासक अंतर्भाव । षष्ठोल्हासीं निर्भव[२] । स्वरूपउपासना ॥ ७८ ॥ सप्तम उल्हासीं जिव्हाळा । निदानानुभवलीळा । अष्टम उल्हासीं अंतर्कळा । तारकउपासनेची ॥ ७९ ॥ नवमोल्हासीं निवळा । निजात्मयोग अवलीळा । दशमोल्हासीं शिवराम रहस्यअंतर्कळा-। प्रतीतीनें स्तविला ॥ ८० ॥ एकादश उल्हासीं जिव्हाळा । विष्णुसायुज्यें प्रगटला । एवं अवाप्तीसि[३] आला । षष्ठ रुद्र ॥ ८१ ॥ आतां सप्तम रुद्रींचें प्रमेय । केवळ वेदां-

१ तेजस्वी. २ श्रेष्ठ. ३ समाप्तीला.

तीचें हृदय । निवळ होऊनियां स्वयें । रुद्रचि अनुवादला ॥ ८२ ॥ नवरसांमध्यें सुरस । मधुर लागला करुणारस । सप्तम रुद्रीं करुणासिंधूस । भरितें आलें ॥ ८३ ॥ शिशु आक्रंदतां आईकोनि । धांवोनि हृदयीं धरी जननी । तेंवि करुणारसें प्रगटोनि । आलिंगिलें मज ॥ ८४ ॥ केवळ करुणेची मूर्ति । दाशरथी राम विख्याति । त्या सप्तमावताराची कीर्ति । सप्तम रुद्र हा ॥ ८५ ॥ सप्तमरुद्रीं प्रथमोल्हास । आत्मानुभव निर्विशेष । द्वितीय उल्लासीं प्रगटतत्वास । प्रगट केलें ॥ ८६ ॥ तृतीय उल्लासीं अवलीळे । रामपरतत्व प्रगटलें । चतुर्थ उल्हासीं प्रार्थिलें । तया हृदयस्थासि ॥ ८७ ॥ पंचमोल्हासीं सुप्रसन्न । प्रत्यक्ष जाला रघुनंदन । षष्ठोल्हासीं संभाषण । श्रीरामासि केलें ॥ ८८ ॥ सप्तम उल्हासीं अवलीळा । रामअमृतभाषणलीळा । राघवक्षेत्र पाहिलें डोळां । अष्टम उल्हासीं ॥ ८९ ॥ नवम उल्हासीं गहन । जालें पंचतत्वलिंगार्चन । दशमोल्हासीं निर्वाण । सिद्धावबोधतो ॥ ९० ॥ एकादश उल्हासीं जिव्हाळा । ग्रंथप्रतीती अमृतवेळा । हा चि केला रामसोहळा । सप्तम रुद्र ॥ ९१ ॥ अष्टम रुद्रीं अनुसंधान । तत्वें तत्वपरिशोधन । तीर्थावळीनें अवधान । रूढीसि आणिलें ॥ ९२ ॥ अष्टमरुद्रीं प्रथमोल्हास । स्वरूपदृष्टी अविद्यानिरास । द्वितीय उल्लासीं साक्षत्वास । सहज उमजविलें ॥ ९३ ॥ तृतीय उल्हासीं स्वलीळा । शून्य स्वभाव निवळ केला । चतुर्थ उल्हासीं मायाकमळिणी अंतर्कळा । प्रगट केली ॥ ९४ ॥ पंचम उल्हासीं इत्थंभूत । मायाब्रह्मींचा विवर्त । षष्ठ उल्हासीं आदिअंत । निवळ पंचीकरणें ॥ ९५ ॥ सप्तम उल्हासीं स्वलीळा । भूगोळरचना निवळा । अष्टम उल्हासीं तत्वमाळा । जीवशिवान्वित ॥ ९६ ॥ नवमोल्हासीं पिंडोत्पत्ति । दशमोल्हासीं मरणस्थिति । एकादशोल्हासीं निश्चिति । ज्ञानाग्निप्रळय ॥ ९७ ॥ अष्टमरुद्रींचें अर्थांतर । मायाब्रह्म सारासार । जाला प्रतीतीचा उद्धार । अष्टम रुद्रीं ॥ ९८ ॥ नवम रुद्रीं प्रथमोल्हास । निरोपिलें दक्षणमानस । प्रशंसिलें उत्तरमानस । द्वितीय उल्हासीं ॥ ९९ ॥ तृतीय उल्हासीं

अपूर्व । जालें शरयूआख्यान सर्व । चतुर्थ उल्हासीं भक्तीनें अर्हे । रामवनीं विहार ॥ १०० ॥ पंचम उल्हासीं पावन । जालें अयोध्येचें दर्शन । षष्ठोल्हासीं प्रवेशन । श्रवणादि पादसेवनें ॥ १०१ ॥ सप्तमोल्हासीं सन्मुखता । अर्चनादि निवेदन तत्वता । श्रीरामभजनीं भक्तां । प्रवेश जाला ॥ २ ॥ अष्टम उल्हासीं रामदर्शन । नवमोल्हासीं यात्रा पावन । दशमोल्हासीं रघुनंदन । भक्तीं समागमें आणिला ॥ ३ ॥ येकादश उल्हासीं अभिनव । जाला जन्मनौमीचा उत्सव । सदोदित अंतर्भाव । नवम रुद्रीचा ॥ ४ ॥ दशम रुद्रींची अवतारिका । उपन्यास परमार्थवेदिका । उपक्रम सप्तभूमिका । अनुभवें गहन ॥ ५ ॥ दशमरुद्रीं प्रथमोल्हास । निरोपिला कर्मसंन्यास । द्वितीय उल्हासीं स्वप्रकाश । स्वतःसिद्ध योग ॥ ६ ॥ तृतीय उल्हासीं संपूर्ण । बोलिलें हृदयसिंधुमथन । चतुर्थोल्हासीं निदानें । ध्यारी अभाव सारिले ॥ ७ ॥ पंचम उल्हासीं अवधारीं । प्रमाणासि त्यागात्यागविवरी । षष्ठोल्हासीं निर्धारी । प्रारब्धयोग ॥ ८ ॥ सप्तमोल्हासीं विज्ञान । अनुभवीत सिध्दावसान । अष्टमोल्हासीं आख्यान । सप्तभूमिकेचें ॥ ९ ॥ नवमोल्हासीं निरूपण । जीवन्मुक्तप्रकरण । दशमउल्हासीं अनुवादन । ब्रह्मसमाधीचें ॥ १० ॥ एकादश उल्हासीं पवित्र । प्रवेश ब्रह्मारण्य स्वतंत्र । निजप्रतीतीनें गुरुमंत्र । फळितार्थ जाला ॥ ११ ॥ दशम रुद्रीं दशा गहन । जैसें दहावें काशीखंड पावन । कैवल्यक्षेत्रासीं प्रमाण । ग्रंथ काशीक्षेत्र हें ॥ १२ ॥ दशमावरणाचे सुभद्र । उचंबळले अद्भुत समुद्र । प्रमाण टाकूनि सुखसांद्र । परिपूर्तीसि आले ॥ १३ ॥ अभंगबोधकाया आदिरुद्र । भवनिवर्तक वीरभद्र । इतुकियाचा वर कळस महारुद्र । अकावा तो ॥ १४ ॥ त्या त्रिजयरूप अकराव्या रुद्रें । अद्वयस्वसुखज्ञानसमुद्रें । एकादश योगींचे योगींद्रें । चाळविलें प्रमेय ॥ १५ ॥ तें ब्रह्मरूपअनुसंधान । ब्रह्मवेत्ता ना ब्रह्मावधान । तेथींची महारुद्रें चि खूण । अनुभविजेत सुखें ॥ १६ ॥ एकादश रुद्रीं प्रथमोल्हास । पाहिलें येकादश रुद्रास । द्वितीयोल्हासीं निराभास । स्वरू-

पध्यान केलें ॥ १७ ॥ तृतीयोल्हासीं प्रत्यक्ष । निरोपिलें अलक्ष लक्ष । चतुर्थोल्हासीं अनपेक्ष । अद्वैतामृत केलें ॥ १८ ॥ पंचमोल्हासी निश्चयें । निवळ स्वभावत्रय भेदत्रय । षष्ठोल्हासीं हृदय । कमळीं जीवभृंगचर्या ॥ १९ ॥ सप्तम उल्हासीं केवळ । तत्वें प्रार्थिलीं सकळ । अष्टम उल्हासीं प्रांजळ । अनुसंधान जालें ॥ १२० ॥ नवमोल्हासीं अकळ । ग्रंथीचे भाव सकळ । दशमोल्हासीं अविकळ । ग्रंथान्वय आला ॥ २१ ॥ आतां येकादश उल्हास । ग्रंथस्वरूपाचा कळस । बैसोनि ग्रंथप्रासादीं चित्प्रकाश । अवलोकन ॥ २२ ॥ येकादश तो मस्तकावरी । खेचरींदशा अगोचरी । अलक्षस्थितीनें विहारी । चिद्विहंगम ॥२३ ॥ सूक्ष्मात्सूक्ष्मतर तीक्षण । बैसों न सके अवधान । तो कळससंकेत गहन । सद्गुरुकृपेचा ॥ २४ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा । ग्रंथान्वयेंचि निवळा । म्हणे मेरुअनंत ॥ १२५ ॥ येकादश रुद्रे । दशमउल्हास संपूर्णः ॥

---

॥ श्रीरामचंद्रायनमः । श्रीरामसमर्थ निरावरण । अक्षयाचें सुखप्रावरण । अपरोक्षदशेचें सुवर्ण । प्रतीतीनें झळाळी ॥ १ ॥ अलक्षस्थितीची दशा गहन । शुद्धस्वरूपानुभव निर्गुण । वस्तूची प्राप्ति निर्वाण । अनुभवाचा कळस ॥ २ ॥ एकात्मतेची पाहाट फुटली । चिदाकाशबिंबीं घनवटली । अनुभव घोंटुनि उठिली । दशा ते अनंत ॥ ३ ॥ उल्लेखवृक्षाचिये डाहळी । होता स्वयंभसुखें सोहंमूळीं । पक्षरहित तो अंतराळीं । उडोनि गेला ॥ ४ ॥ सहजआस्तिक्यता सनातन । विहंगमदशेनें आपआपण । झेंपावला चिद्गगन । घेऊनि हृदयीं ॥ ५ ॥ अद्वैत एकजिनसी विशाळ । सोहंपक्षी निजअंतराळ । व्यापकपणें सुनिश्चळ । होऊनि ठेला ॥ ६ ॥ सदोदित तें अंतराळ । समसमान साळमाळ । तयाचि ठायीं अनुभवमूळ । आटोनि गेलें ॥ ७ ॥ सदोदित आकाश निर्मळ । स्थिरावला अनुभव अनिळ । विरोनि गेलें

संपूर्ण भक्तीचा जिव्हाळा । केवळ करुणेचा कळवळा । अभंगविरक्तीनें आगळा । सद्गुरुकरितां ॥ २५ ॥ सद्गुरुकरितां स्वरूपप्राप्ति । सद्गुरुकरितां भवभयनिवृत्ति । सद्गुरुकरितां निजविश्रांति । वस्तूचि तत्वता ॥ २६ ॥ गुरुकृपें अतर्क्य उमजले । गुरुकृपें अभेद अनुभवले । गुरुकृपे अभंग जालें । सहजचि तें ॥ २७ ॥ गुरुकृपेचा अभंगयोग । गुरुअद्वय अंतरंग । गुरुदयेनें निःसंग । निजांगप्राप्ति ॥ २८ ॥ सकळ तत्वांची मूस जाली । विचित्राकारें पैसावली । तयामाजि विस्तारली । कांहीं अपूर्वता ॥ २९ ॥ तैसें अनेक रितीचें ज्ञान । अनेक उपदेशविंदाण । ते संकाटासारखेंचि जाण । करितां न ये कीं ॥ ३० ॥ संपूर्ण दृश्य उभारलें । युक्त तितुकें पाहिजे घेतलें । लक्ष चौऱ्यासी विस्तारले । नाना जिनस ॥ ३१ ॥ त्यामाजि लाभती वस्तु कवण । जे कां होय विचारसांठवण । तें घडौतीचें होय प्रावरण । शीतोष्णनिवृत्ति ॥३२॥ अनेकजन्मदुःखहुडहुडी । मरणांत खेद त्रिताप घडी । हे चि शीतोष्णांची बाधा रोकडी । न बाधी ज्या वस्त्रें ॥ ३३ ॥ ते सद्गुरुकृपेचें प्रावरण । नरदेह परम पावन । ज्यामाजि निवळलें ज्ञान । स्वरूपाचें ॥ ३४ ॥ सकळ देहामाजि देह पावन । नरदेह सुखैकघन । सद्गुरुकृपेनें संपूर्ण । कृतार्थ जाला ॥ ३५ ॥ वरकड देहीं नरदेहासी । समानता करावी कैसी । तैसें चि ज्ञान नानाजिनसी । समान कैसें होयील ॥ ३६ ॥ निरसे भवभय आपदा । भोगिजे ते ज्ञानसंपदा । विकल्प ज्ञानाची भाग्य सदा । घाउटीनें काय होतें ॥ ३७ ॥ ज्ञानामाजि माया खळमळ । ते अकळचि बुडवी तात्काळ । माझ्यासमर्थाचें ज्ञान प्रांजळ । लेश न साहे वृत्तीचा ॥ ३८ ॥ सकळ अवेवीं वदन । होय वोळखीचें अधिष्ठान । लावण्यशोभेचें संपूर्ण । निधान होय ॥३९॥ जेणें वोळखि सकळशरीरीं । मुखश्री शोभा साजिरी । तैसें समस्त सृष्टीमाझारीं । समर्थज्ञान निर्मळ ॥ ४० ॥ सकळ इंद्रियांत नयन । इंद्रियें वापुडीं तेणेंवीण । तैसें अतींद्रिय ज्ञान । निर्मळ सहजें ॥ ४१ ॥ नयन श्रवणासि आला । पाहतां आइकता तोचि जाला । हो

अभ्रपटळ । मूळमायेचें ॥ ८ ॥ सहजअंतराळीं, अंतराळ । सरली संधीची सीमा विशाळ । तेथें आकाश आणि पाताळ । भेद बुडाला ॥ ९ ॥ जाणिवेचा घट संपूर्ण । फुटता सहज निरावरण । तयासि अनुभविती सज्जन । ते चि होऊनियां ॥ १० ॥ अनुभवत्रिपुटी नातळे । अनुभविता नये चि निराळें । विज्ञानआस्तिक्यता निवळे । सहजअपरोक्ष ॥ ११ ॥ स्थिरावले ते नव्हेचि कीं स्थिर । विराला आस्तिक्यतें विवर । निजांगेंचि शाश्वत थार । तेंचि तयासी ॥ १२ ॥ द्वैताद्वैत महाद्वैत । हाही वृत्तीचाचि संकेत । तये वृत्तीमाजि अनंत । निजआस्तिक्यतेनें ॥ १३ ॥ त्यासि स्वरूपसंभावना । व्हावयाची इच्छा घडेना । कल्पांत जालियां विघडेना । ऐसें तें अभंग ॥ १४ ॥ निजांगें चि अभंगस्थिति । त्यांतें चि निजांगयोग अनुभविती । येऊनियां सहजस्थिति । होती सुलीन ॥ १५ ॥ अनुभविता ना अनुभव । अनंतवस्तु निरावेव । योगवियोग भावाभाव । नसती तया ॥ १६ ॥ ऐसा शाश्वत श्रीअनंत । स्वरूपसद्गुरु सदोदित । भेदासि न येतां प्रबोधित । आश्चर्य पहा ॥ १७ ॥ बोधावें ब्रह्म जयासी । त्याचाचि रंगव निश्चयेसीं । होता सहजआस्तिक्यतेसीं । मुळींहूनि ऐक्यता ॥ १८ ॥ चिदानंदसुखदर्पण । काढितां समीप समर्पण । सदोदित संपूर्ण । केलें श्रीअनंतें ॥ १९ ॥ बैसऊनि निजपंक्तीसि सुखें । स्वभावस्थितीच्या हरिखें । अपरोक्षतोष निजमुखें । विस्तारलें अमृत ॥ २० ॥ सहज अमृताच्या परवडी । परिपाक अमृतगोडी । रसना रसेवीण चवी गाढी । चाखविली मज ॥ २१ ॥ ऐसें परिपाळिलें मज । दिल्हें निजआस्तिक्य सहज । सद्गुरुदया कैवल्यध्वज । प्राप्तीच्या कळसीं ॥ २२ ॥ उत्सवाची सिद्धि रथोत्सव । स्वरूपाची सीध्दि अनुभव । भोजनाची सिद्धि अभिनव । परवडीनें ॥ २३ ॥ कळस संपत्तीची सीमा । सार्वभाम भोगी महिमा । सकळ सार्थकाची गरिमा । सद्गुरुकरितां ॥ २४ ॥

आस्तिक्यता । अपंचीकृतमूतसत्ता । त्रिगुणदेवाची येकात्मता । शोभा आगळी ॥ ५९ ॥ अर्धनारीनटेश्वर । प्रकृतिपुरुपअभ्यंतर । गुणसाम्यअद्भुतधर । पाठार तो ॥ ६० ॥ अनंतकोटी ब्रह्मांडें । मिरवळी बीरश्रीचीं तोंडें । त्रिकाळें कीर्तिमुखें प्रचंडें । पाठार वेष्टतो ॥ ६१ ॥ तयाचे तळवटीं विज्ञान । पंचभूतसाक्ष्यत्वज्ञान । पंचीकृत प्रपंच निर्माण । होतसे सहज ॥ ६२ ॥ आश्चर्याच्या आश्चर्यकोटी । उभारल्या चित्रविचित्र सृष्टी । पाहतां शोभा ते निजदृष्टी । घोटूनि उठे ॥ ६३ ॥ तो स्वयंभ अंतस्थगाभारा । चतुर्विध पुरुषार्थउभारा । सभोंवता अंतस्थी फेरा । फिरतां वृत्ती सरे ॥ ६४ ॥ हा चि गुणक्षोभ अक्षोभ । प्रवृत्तिनिवृत्तिमुळें लाभालाभ । साक्षीज्ञानविज्ञानसुप्रभ । शोभा मिरवली ॥ ६५ ॥ तथा तळवटीं महाभूतिक । विराट रचलें भयानक । सळोनि पडिले येकें येक । प्रवृत्तिज्ञानी ॥ ६६ ॥ सहजशांतीचें पाटांगण । तया अंतरथीं स्वानंदघन । तया विमानामाजि अधिष्ठान । राम सदोदित ॥ ६७ ॥ राम होय समर्थ अनुभवे । राम होये अनंतविभवें । राम समर्थ अनंतभावें । सहज प्रतिष्ठला ॥ ६८ ॥ तया अनंतासी अभिवंदन । अपरोक्षयाचासिद्धि गिळोन । धरिलें सहजसुखें मौन । अनंतमौनी च तो ॥ ६९ ॥ अनिर्वाच्य अनुभवस्थिति । वदला अनंत अनंतग्रंथीं । जेवीं अस्तिक्यतेचे निजगती । विस्तारा आली ॥ ७० ॥ सूर्याचेनि प्रकाशलें । चक्षूनें चि पाहलें । सूर्यचक्षूचेनि जालें । दृश्य गोचर ॥ ७१ ॥ हे सकळही भगवंताचें । कार्य अद्भुत सृष्टीचें । विचित्रपंक्तीनें सत्ताचें । सामर्थ्य उभारलें ॥ ७२ ॥ कर्त्तारें केलें सकळ कांहीं । पहावया त्यावीण दुजें नाहीं । संभवे चि प्रवाहीं । जगत्कारण ॥ ७३ ॥ जगत्कारण येक ईश्वर । ज्ञानसत्तात्मक साचार । अनंतसृष्टीचा विस्तार । तेणें केला ॥ ७४ ॥ हात न हालतां युक्तीचा । होतसे पदार्थ ब्रह्मांडींचा । अभिनव महिमा सामर्थ्याचा । कवणासि र कळें ॥ ७५ ॥ हें अघटित विस्तारलें । ज्ञान तितुकें ठायीं पुरविलें । सत्ताव्यापकतेने केलें । परिपाळण तयाचें ॥ ७६ ॥ तो अनादिसिद्ध

धारा । घ नि बैसलों अवधारा । साधक हो तुम्ही ॥ ९४ ॥
अवधानासि ईन मागुता । समूळ सोडुनि या अस्था । हें चि
अनंतस्मरण आता । जालें अनिर्वाच्य ॥ ९५ ॥ अनंतअ-
नुमवलिंगा पूर्ण । विज्ञानओंकारप्रवाहें गहन । येकादशरुद्रें
अभिषेचन ें निजअनुसंधान ॥ ९६ ॥ प्रथमरुद्रीं स्तवननिर्घोरें ।
द्वितीय रुद्रीं घोषगजरें । तृतीयरुद्रीं अर्चनचमत्कारें । अनंत अर्चिला
॥ ९७ ॥ चतुर्थ रुद्रीं विरक्तिभरें । निजभक्तीच्या अभ्यंतरें । पंचम
रुद्रीं ज्ञानप्रकारें । अनुभविला केवळ ॥ ९८ ॥ षष्ठ रुद्रीं आराध्यरूप
सप्तमीं तो चि चित्स्वरूप । अष्टमी मायाआरोप । प्रांजळ केला ॥९९॥
नवमी सं उपासना । दशमीं समाधिध्याना । एकादशीं तो गुरुराणा ।
हृदयाि आणिला ॥ १०० ॥ अनंतज्योतिर्लिंग निष्कळंक । स्वयंभ
रतल अभेदेक । प्रतीतीच्या योगें निश्चयात्मक । ठेविलें हृदयीं
। १ ॥ तेथें पूज्य ना पूजक । निर्विकल्प निष्कळंक । येकपणें-
एक । परब्रह्म ॥ २ ॥ अनंतशिवलिंग ऐसें । ग्रंथअभ्यंतर
करसें । श्रवणसरोजीं विश्वासें । अर्चिजे भक्तीं ॥ ३ ॥ दीक्षा
कपाणिपावन । परात्परगुरूसि वंदन । दीक्षाविरक्तिभक्तिज्ञान ।
र्थस्वरूप ॥ ४ ॥ परमगुरूसि अभिवंदन । दीक्षा सकळार्थे
पन्न । अनंतसद्गुरूसि नमन । पूर्ण कृतार्थता ॥ ५ ॥ अनंत-
नी महामौन । जेथें माया चि अनुत्पन्न । सहज अनिर्वाच्य निर्वाण ।
अवाप्ती ॥ ६ ॥ इति श्रीरामसोहळा । सद्गुरुकृपेचा जिव्हाळा ।
अवाप्ती अभिनवकळा । ह्मणे मेरुअनंत ॥ १०७ ॥ येकादशरुद्रे ।
दशउल्लासः संपूर्णः ॥ श्लोक ४ ओव्या १०७

शिवरामाचे बाळक । केशवरामस्वामी जगीं शोभती सम्यक । त्यांचा रामसोहळा निष्कळंक । सत्राशेंपंचताळा सुभानुअब्दीं कृष्णाजी लेख केले ॥




१ सगुण ( ? ). २ ( ? ). ३ राम.